देशभक्त नरसिंह चिंतामण ऊर्फ तात्यासाहेब केळकर यांस त्यांच्या
एकसष्ठाव्या वाढदिवसानिमित्त पुणें, केळकर–वाढदिवस–
मंडळातर्फे समारंभानें समर्पण केलेला ग्रंथ

# केळकर

केळकर–वाढदिवस–मंडळ, पुणें.

शके १८५४ ] [ सन १९३२

किंमत दोन रुपये

# प्रस्तावना

शके १८५४ श्रावण वद्य षष्ठी रोजीं दे० भ० तात्यासाहेब केळकर यांना ६१ वें वर्ष लागतें. साठ वर्षे पूर्ण झालीं म्हणजे धार्मिक रूढीस अनुसरून कांहीं होमहवन करावें लागतें. पण हें जें करावयाचें तें ज्याचें त्यानेंच करावयाचें असतें. जसा इंग्रज लोक आपला वाढदिवस आपण साजरा करतात व इष्टमित्रांना बोलावून तो दिवस सुखासमाधानांत व आनंदांत घालवितात तशीच वर उल्लेखिलेली षष्टयब्दपूर्ति आपल्या घरीं करून इष्टमित्रांस बोलावून यजमानानें धार्मिक अर्चनानें पवित्र बनविलेला ऐहिक आनंद त्यांच्या संततींत उपभोगावयाचा अशी आपलीहि चाल आहे. परंतु ज्यांच्या साठ वर्षांचा अनुभव त्यांना स्वतःलाच नव्हे तर इतरांनाहि सुखप्रद झाला त्यांना जेव्हां हीं साठ वर्षे पुरीं होतात तेव्हां इतरांनाहि कांहीं होमहवन करणें जरूरच आहे असें वाटतें. आपण साठ वर्षे जगलों, आपली जगत रहावें; संतत, संपत आजवर भोगली, आपलीहि भोगत रहावी; आजापणजांची स्मृति कायम ठेविली आणि ती पुत्रपौत्रांच्या हवालीं करण्याची तरतूद करून ठेविली, अशा तऱ्हेचा कांहींसा समाधानाचा आणि सृष्टिकर्त्यापुढें मान लवविण्याच्या बुद्धीचा हा एक भाग्यवान् माणसाचा उद्गार असतो, असें म्हणावयास हरकत नाहीं. परंतु ज्या माणसाच्या हातीं केवळ त्याच्या आजापणजाचीच नव्हे, तर ज्या जनसमूहांत तो वागतो त्याच्या पूर्वजांची स्मृति हातीं आली असेल, ज्यानें आपलीच संतत-संपत पाहिली असें नव्हे तर लोकांच्या संततीची व संपत्तीची काळजी वाहिली व निगा राखिली, जो पूर्वींच्या स्मृति, केवळ आपल्या तथा स्वतःच्या पुत्रपौत्रांच्या नव्हे, तर त्यांत कांहीं वैभवाची भर घालून इतर भावी पिढ्यांच्या हातीं देतो, त्याला जेव्हां साठ वर्षे पुरीं होतात तेव्हां इतर माणसांनी सुद्धां त्याच्यासंबंधींचें कांहीं एक होमहवन करावें हाहि शिष्टाचार संमत असाच मानला पाहिजे. ज्या ज्या मानानें लोक या माणसाचें ऋण लागतात त्या त्या मानानें हा संस्कार कमी अधिक वैभवाचा व लोकांचें मनोगत कमी अधिक व्यक्त करणारा व्हावा हें उघडच आहे. सर्वश्रेष्ठ अशा धर्मसंस्थापकापासून किंवा स्वदेशाचें पांग फेडणाऱ्या वीरापासून तों तहत आपल्या प्रपंचाच्या बाहेर, थोडें कां होईना, पाहून जो लोकांना ज्ञान द्यावें किंवा लोकांचे संसार सुखी करावे यासाठीं अल्पहि यत्न करतो त्याच्यापर्यंत सर्व माणसांविषयीं जनतेच्या मनांत कांहीं एक उतरती श्रेणी लागलेली असते व तिच्यांतील त्या त्या माणसाचा अनुक्रम पाहून लोकसनूर आपली कृतज्ञताबुद्धि व्यक्त करीत असतो. मुद्दाम कोणीं जर फसविलें नसलें किंवा यदृच्छया फसगत झाली नसली तर

जनसमूहाचें सर्वसामान्य मत प्रायः बरोबर असतें असें समजावयास हरकत नाहीं. आणि या मतास अनुसरूनच लोक आपली कृतज्ञता व्यक्त करतात. म्हणून अत्यंत श्रेष्ठ अशा पुरुषावतंसासाठीं ज्या संस्काराचें नांव खर्ची पडतें त्या संस्काराचें नांव, अल्पहि मोठेपण प्राप्त झालेल्या सामान्य माणसासाठीं खर्ची पडलें, तरी त्यांत माणसाला अयोग्य असें कांहींच वाटत नाहीं. कारण संस्काराचें नांव तेंच असलें तरी कृतज्ञता व्यक्त करण्याच्या तऱ्हा व गौरव हीं व्यक्तीच्या महिम्यावरच अवलंबून राहतात.

वयाच्या अवघ्या चोविसाव्या वर्षापासून म्हणजे स्वतःचा संसार उभा राहिला त्या वेळेपासूनच इतरांच्या सुखाची काळजी वाहण्याचें काम तात्यासाहेब यांनीं जें चालू केलें तें ह्यातीची मजल साठ वर्षांवेरी येऊन पोहोंचेपर्यंत अखंड रीतीनें चालविलेलें आहे. दुसऱ्यास ज्ञान देणें व दुसऱ्याचें जीवित सुखी करणें हेंच जर लोकसेवेचे दोन प्रकार असतील तर त्यांचा अवलंब तात्यासाहेब यांनीं पुरापूर केला आहे, असें म्हणावयास कांहींच प्रत्यवाय नाहीं. त्यांनीं ही दोन प्रकारची लोकसेवा एकाच साधनानें केली व तें साधन म्हणजे 'केसरी' पत्र हें होय हिंदुस्थानांतील लोकांचें भाग्य उदयास यावें, ते दास्यांतून मुक्त व्हावेत यासाठीं झगडा करण्याचें जें खडतर मत 'केसरी 'नें हौसेनें पत्करलें होतें तेंच, 'केसरी 'चें संपादकत्व पत्करून तात्यासाहेबांनीं स्वतः अंगीकारिलें आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. गेल्या ३६ वर्षांतील निदान महाराष्ट्रांतील राजकारणाचे जे अनेक चढउतार झाले, त्यांत ज्या नागमोडी उत्पन्न झाल्या, त्याला जे फुगे लागले, त्या सर्वांचें स्मरण ज्यांच्या मनांत जागृत आहे त्यांना तात्यासाहेब यांनीं देशाचें भाग्य उदयास यावें म्हणून काय खटपट केली हें सांगावयाची जरूर नाहीं. असें ठासून म्हणतां येण्यासारखें आहे कीं, महाराष्ट्र देशांत जें जें कांहीं भडक किंवा पुसट रंगाचें राजकारण आजपर्यंत झालें त्या सर्वांशीं तात्यासाहेब यांचा अत्यंत निकट असा संबंध आहे. हें लोकसेवेच्या एका प्रकारासंबंधानें झालें. दुसरा प्रकार म्हणजे लोकांना ज्ञान देऊन शहाणें करणें हा होय. राजकारणाच्या बाबतींत त्यांच्याहून श्रेष्ठतर असा पुढारी महाराष्ट्र देशांत होऊन गेलाय आहे. पण हा जो उत्तरोक्त प्रकार सांगितला यांत तात्यासाहेबांची बरोबरी महाराष्ट्रांत आजपर्यंत कोणालाहि करतां आलेली नाहीं आणि अखिल भारतांत किती संपादकांनीं केली असेल याविषयीं शंकाच आहे. फार काय सांगावें, आपल्या प्रतिभेनें काढलेले किंवा इतरांच्या प्रतिभेंतून वेंचून घेतलेले ज्ञानाचे तेजस्वी कण वाचकांच्या मनावर पसरवून ते दीप्तिमान करण्याच्या या कामीं तात्या.

साहेब यांनीं जे श्रम केले ते जर वगळले तर खुद्द 'केसरी'चें अर्धेअधिक वैभव हिरावून घेतल्यासारखें होईल असें आम्हांस निःसंदिग्ध वाटतें. या दृष्टीनें पाहतां त्यांनीं देशांतील राजकारणाची संततधार धक्केचपेटे सोसून जबाबदारीनें चालू ठेविली याबद्दल व अखिल राष्ट्राला ज्ञान देऊन चौकस व शहाणें बनविलें याबद्दल प्रस्तुतच्या महाराष्ट्रास कृतज्ञता वाटावी व ती त्यानें योग्य प्रसंगीं व्यक्त करावी हें साहजिक आहे. अनेकांच्या मनांत एकच गोष्ट असते; पण तिला परिस्फुटता पहिल्यानें एकाद्या ठिकाणींच येते. या न्यायास अनुसरून ही कृतज्ञता व्यक्त करण्याची बुद्धि आमच्या या 'वाढदिवसमंडळा'च्या द्वारां प्रस्फुट झाली इतकेंच. आपण जें आमचें चांगलें केलें त्याची आठवण आम्हांला आहे व तें उपकारबुद्धीनें आम्ही स्मरतों, हें आपलें बरें करणाराच्या कानीं घातलें म्हणजे आपण आपलें कर्तव्य केलें असें उपकृतास नेहमींच वाटतें. या बुद्धीस अनुसरून प्रस्तुतचा ग्रंथ आमच्या मंडळानें तयार करून तात्यासाहेब यांच्या ६१व्या वाढदिवशीं त्यांस नजर करावयाचें योजिलें व योजनेप्रमाणें हा ग्रंथ आता सिद्धहि झाला आहे. वामनराव जोशी, द. बा. पोतदार, द. वि. आपटे, ग. र. अभ्यंकर, वि. पां. दांडेकर, वि. स. खांडेकर, वि. ह. कुलकर्णी अशांसारख्या महाराष्ट्रांत मशहूर असलेल्या गेल्या पिढींतील व चालू पिढींतील लेखकांनीं लेख लिहिण्याचें आनंदानें पत्करिलें हें तात्यासाहेबांच्या लोकप्रियतेचेंच फळ आहे. त्यांच्या वाङ्मयाचे जे ठळक ठळक विशेष आहेत त्या सर्वांसंबंधानें चांगल्या अधिकारी माणसांनीं लेख लिहिले व ग्रंथ चांगला सिद्ध होतो असें दिसूं लागलें. परंतु तात्यासाहेब यांच्या चरित्राशिवाय या ग्रंथाला पूर्तता यावयाची नाहीं असें वाटूं लागलें. चरित्र लिहावयाचें म्हणजे केळकर यांच्या फार संनिधच्या माणसानेंच तें लिहावयास हवें. अर्थात् आमच्यांपैकीं सदाशिवराव बापट यांच्यावर ही कामगिरी आम्ही सोंपविली. आम्हांस हें माहीत होतें कीं, तात्यासाहेब हे करमणुकीच्या वेळीं सध्यां आत्मचरित्र लिहीत असतात. अर्थात् हें गुप्त लिखाण त्यांनीं कितीहि जपून ठेवून चालविलेलें असलें तरी जरणुकीच्या कातळांतून कांहीं आल्हादकारक ओलावा बाहेर झिरपावयाचाच. रा० बापट यांनीं या झिरपणाऱ्या ओलाव्यावरच भागवलें आहे का आंत हात घालून वेळोवेळीं कुळचे भरून घेतले आहेत याची आम्हांला नेमकी माहिती नाहीं. पण तात्यासाहेबांची थोडीशी नाखुषी करून घेऊन त्यांनीं आमचा हा ग्रंथ सांग व्हावा म्हणून पुष्कळच विकाटी दाखविली व उपलब्ध करून घेतलेले गमतीच्या हकीकतीचे रजःकण, मोठ्या रसिकतेनें—पण तात्यासाहेब यांच्या रुचीस मुळींच न खपणारी जो मूर्तिपूजा तिचा यत्किंचित्‌हि अवलंब न करतां—एकत्र रचून

मोठा सुंदर असा चरित्रस्तूप आम्हांस रचून दिला. वर सांगितलेल्या लेखकांनीं लिहिलेले लेख व बापटांनीं लिहिलेलें तात्यासाहेबांचें चरित्र यांच्या जोडीला केळकर यांच्या वाङ्मयांतील उत्तमोत्तम विचारांचे वेंचे हेहि मुबलक घेतलेले असल्यामुळें ग्रंथ वाचल्यानें तात्यासाहेब यांच्याविषयींची कल्पना वाचकांला यथार्थपणें होईल अशी आम्हांस उमेद वाटते. लौकिक व्यवहारास अनुसरून, त्यांच्या जीवितांतील या शुभ-प्रसंगीं त्यांचे आप्त, इष्टमित्र, चहाते व अनुयायी हे सर्व आपापल्या पदवीस, रुचीस व दिलास अनुसरून त्यांना योग्य ते ते आहेर करतीलच; पण हा वाङ्मयरूप आहेर तात्यासाहेब यांच्या रुचीला विशेष पसंत पडेल असें त्यांच्यांशीं घडलेल्या आजपर्यंत-च्या सहवासावरून आम्हांस वाटतें. असो. ग्रंथ तयार करावयाचा असें एकदां निश्चित झाल्यानंतर हीं योजनेचीं चाकें अत्यंत जलदीनें गरगरूं लागलीं. आत्मभावाचें ओंगण हें मुबलक असल्यामुळें कोठेंहि व्यत्यय किंवा खटका न येतां ग्रंथ सिद्ध होईल तसं-तसा छापून देण्याचेंहि काम आनंद छापखान्याचे मालक रा० जोशी व मॅनेजर रा० गुर्जर यांनीं मोठ्या तत्परतेनें करून अवघ्या दोन महिन्यांत संपवून दिलें. त्यांनीं दाखविलेल्या या उत्साहाबद्दल मंडळ त्यांचें अत्यंत ऋणी आहे. लेखकवर्गा-बद्दलची आमची कृतज्ञताबुद्धि कशी व्यक्त करावी, हेंच आम्हांस समजत नाहीं.

थोडा अनौचित्याचा दोष पत्करून सुद्धां आम्हांस आमच्यापैकींच आणखी एकाचे आभार मानावयास हवे. रा. शंकरराव जोशी, इतिहाससंशोधक, यांनीं या ग्रंथाच्या संपादनाच्या कामीं जे अविश्रांत श्रम केले, त्याची फेड कशानेंहि होणार नाहीं. गेले कांहीं महिने या ग्रंथाचा त्यांनीं केवळ ध्यासच घेतला होता असें म्हणा-वयास हरकत नाहीं.

ह्यानंतर ज्या मासिकांतील या ग्रंथांतील लेख किंवा लेखाचा कांहीं भाग येथें उद्धृत केला आहे त्यांच्या संपादकांचे सामान्यानें आभार मानतों. तसेंच आर्टिस्ट आर. जी. पोतनीस ह्यांनीं चित्रांचे ठसे करून दिले याबद्दल त्यांचे आभारी आहों. शेवटीं उताऱ्यासंबंधानें एक गोष्ट सुचवावीशी वाटते; ती ही कीं, श्री. केळकरांचा लेख समजून केसरींतील एकादा लेख म्हणजे एकच लेख भाग २ मध्यें राजकारणविषयांत उपा-ख्यानाच्या अलिकडे आला आहे. असें होणें अपरिहार्य आहे. हा लेख ' गेलीं पांच वर्षें ' ह्या तात्यासाहेबांच्या ग्रंथांतील आहे. वर्तमानपत्राच्या संपादकीय कारभारांत संपादकांना जें पत्करावें लागतें त्यांतीलच कांहीं तत्संसर्गीलादि न पत्करावें लागणें अशक्य आहे. असो. संकल्पिल्याप्रमाणें हा पाहुणे आठवीच्या घरांत गेलेला ग्रंथ अनेकांच्या साहाय्यामुळें व परमेश्वराच्या कृपेमुळें अवघ्या दोन महिन्यांत सिद्ध झाला ह्याबद्दल आनंद वाटतो.

२४ ऑगस्ट १९३२

ल. म. भोपटकर
श्री. म. माटे



महाराष्ट्राचे थोर मुत्सद्दी देशभक्त

आणि

मराठी साहित्याचे आचार्य

श्रीयुत नरसिंह चिंतामण ऊर्फ तात्यासाहेब केळकर

यांस

त्यांचे एकसष्टावे वाढदिवसानिमित्त

'केळकर' ग्रंथ

सादर समर्पण.

केळकर-वाढदिवस-मंडळ, पुणें.

## केळकर-वाढदिवस-मंडळ, पुणें.

अध्यक्षः— *लक्ष्मण बळवंत भोपटकर, एम्. ए., एलएल्. बी.,*

उपाध्यक्षः— धोंडो कृष्ण साठे, बी. ए., बी. एस्सी.

कार्याध्यक्षः— श्रीपाद महादेव माटे, एम्. ए.

खजिनदारः— डॉ. गोपाळ सदाशिव पळसुले, एल्. एम्. अँड एस्. (मॅ.)

सभासदः—
- सदाशिव विनायक बापट, आठवणीकार
- अनंत वासुदेव फडणीस,
- गणेश विनायक देवधर,

चिटणीसः—
- शंकर नारायण जोशी, इतिहाससंशोधक
- दत्तात्रय बापू रानडे, एम्. ए.

# नरसिंहाभिनन्दन !

[ कवि—प्रो० लक्ष्मणशास्त्री लेले ]

(शा. वि. वृत्त)

(१)

कांटे टाकुनिया गुलाब-कलिका जन्मासि आली नवी !
नेत्रां कंटकशून्य कोमलतनू कीं केतकी लोभवी !
किंवा त्यागुनि उग्र गंध फुलली ही चंपकाची कळी !
आहे वा मधुमालती हिमकणीं नाहीं जिला पीडिली !

(२)

कुन्दश्री मधुगंधपूर्ण विलसे आरामसंचारिणी !
किंवा ही तनुधारिणी वनरमा दिव्या मनोहारिणी !
सोडोनी निज कालिमा मिरवते कस्तूरिका पांडुरा !
बाणाची पुनरुत्थिता कृति महाश्वेताचि वा सुंदरा !

(३)

कोणाची असली विलक्षण कृती सांगा असावी बरें !
विद्वद्वृन्द जयासि वंदिति महामोदें अमंदादरें !
आहे तो नरसिंह ! केळकर ज्या लाभे उपाख्या पहा !
मोठा उत्सव आज त्या उलटली साठी म्हणोनी अहा !

(४)

साठी गांठियली असे पृथिविच्या पाठीं किती राहती !
मोठाही गणिती समर्थ न दिसे त्यांची कराया मिती.
जन्मा येउनिया फुकाचि मरती त्यांची पडे विस्मृति.
जो कोणी करितो अलौकिक कृती त्यालाचि संमानिती.

(५)

वाणी आणिक लेखणी भजति ज्यालागोने दासीपरी.
लाभे दुर्लभ लोभनीय पदवी श्रीशारदामंदिरीं.
माता आणि पिता असे उभयतां अन्वर्थ केले सयें.
श्रीचिंतामणि तात, माय महिलाभूषा यशोदा स्वयें.

(६)

ज्याच्यांतील रस प्रसन्न मधुर द्राक्षाफलाचे परी,
    रत्नें काव्यमयींचि दीप्त भरलीं ज्याच्या विशालोदरीं;
जो आहे अवगाहन-क्षम सदा आबालवृद्धांप्रती,
    ऐसा वाङ्मयसिन्धु अद्भुत रची; कैसा नव्हे तो कृती!

(७)

नाहीं आढळणार फार करुनी सद्वस्तु ऐसी जनीं
    कीं याची प्रतिमा जिला न शिवली सद्भावसंदर्शिनी.
नोहे एकहि वाङ्मयाङ्ग, न जियें संचार याचा सुखें,
    लीलेनें रसिकान्तरंग रमवी, उल्हासवी तन्मुखें.

(८)

वाही देशहितासि देह, करितो श्रीशारदासेवना;
    दावी मध्यमपांडवासम असा हा सव्यसाचीपणा;
शत्रूला मृदु साधनें वश करी त्या पंचबाणापरी.
    भासे भीषण अल्पही नचि, जरी अत्युग्र नामा धरी.

(९)

केव्हां हा नरसिंह दावि चरित श्रीकृष्णजीचें जनीं,
    याची वेणु विराजते रसिकहृद्वृन्दावनीं मोहनी.
केव्हां वामनसा बलिप्रशमनें लोकां करी विस्मित.
    केव्हां दारुण दर्शवी करुनियां शार्दूलविक्रीडित!

(१०)

गातो सर्व ऋतूंत यातहि सुरांमध्यें, स्ववर्णे स्थित।
    ऐसा कोकिल कोण अद्भुत जनस्थानांतरीं संस्थित!
सर्वश्वेत, विपक्ष, वाङ्मयविषें मज्जावया आदरी।
    सांगा मानधि अन्य कोण विहरे या राजहंसापरी!

(११)

कोणी वाग्भट वाङ्मतंगज तसा आचार्य या ठेविती,
    कापी सुंदर देशभक्त पदवी कोणी यया लाविती.
देवा! हे नरपुंगवाधि अपत्या दीर्घायु आरोग्यही.
    हा दावो विजयी! सखी विजयिनी श्रीभारतीया मही!

---

# अनुक्रमणिका

## भाग १ ला

## मार्मिकांचा रसबोध

## उतारे–टीका ( पृष्ठें २६ )



## उतारे–वर्णन ( पृष्ठें २२ )



## उतारे–धार्मिक सामाजिक ( पृष्ठें ९१ )

उतारे-राजकारण ( पृष्ठें ८० )

# के ळ क र

## भाग पहिला
## मार्मिकांचा रसबोध

### १ श्रीयुत केळकर व कांहीं साहित्यविषयक प्रश्न

( प्रो. वामन मल्हार जोशी, एम्. ए., हिंगणे—आश्रम. )

कित्येक लोक क्रिकेट टेनिस वगैरे खेळ उत्तम खेळतात. पण त्यांच्यापैकीं प्रत्येकाला त्या त्या खेळाविषयीं सशास्त्र सुंदर व मनोरंजक चर्चा करतां येईल असें नाहीं. शिक्षक, सेनापति, मुत्सद्दी वगैरे संबंधी असेंच आहे, म्हणजे आपआपलीं कामें चागलीं करणारे जे असतात त्या सर्वांना आपआपल्या कामाची मार्मिक मीमांसा साधेलच असें नाहीं, तर ती त्यांपैकीं काहींनाच साधते. साहित्यांतील काव्यनाटकादि जे प्रकार आहेत त्यात नामांकित कामगिरी करून दाखवून पुनः तद्विषयक चर्चा करणें फारच थोडयांना साधते. कालिदास, भवभूति, ज्ञानदेव, तुकाराम, मोरोपंत, इत्यादिकांनीं रसपूर्ण काव्यें लिहिलीं, पण रसचर्चा त्यांना कांहीं साधली नाहीं—प्रयत्न करून साधली नाहीं असें नव्हे—तर त्यांनी या दिशेनें प्रयत्नच केला नाहीं.

पण ग्रीस देशांतील प्लेटो, किंवा जर्मनींतील गटे, किंवा इंग्लंडमधील वर्ड्स्वर्थ, शेली, किंवा संस्कृतमधील रसगंगाधरकार जगन्नाथ कवि, किंवा महाराष्ट्रांतील श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, यांच्यासारखे असे कांहीं थोडे साहित्यभक्त असतात कीं त्यांना दोन्ही गोष्टी साधतात. नेपोलिअनप्रमाणे साहित्य-क्षेत्रांत ते पराक्रम करतात; इतकेंच नव्हे तर तद्विषयक विवेचनहि ते करतात. किंवा हाच अर्थ निराळ्या तऱ्हेनें सांगावयाचा म्हणजे साहित्य—क्षेत्रांतील ते कर्मयोगी व ज्ञानयोगीहि असतात. नरसिंह चिंतामण केळकर हे अशांपैकींच आहेत.

यापुढें जाऊन मला असेंहि म्हणावेंसें वाटतें कीं, वाङ्मयक्षेत्रांत ते खरे 'भक्तियोगी' आहेत. ईश्वरविषयक भक्तीच्या बाबतींत त्यांना मागें टाकणारे

महाराष्ट्रांत आज पुष्कळ लोक सांपडतील; पण वाङ्मयविषयक भक्तीच्या बाबतींत त्यांची बरोबरी करणारा रा. श्री. कृ. कोल्हटकरांशिवाय मला कोणी दिसत नाहीं,—आतांपर्यंत तरी कोणी झालेला नाहीं, पुढें कोणीहि होणार नाहीं असें कोण कशाला म्हणेल ?

लोकमान्य टिळक, भारताचार्य चिंतामणराव वैद्य वगैरे अधिक विद्वान् किंवा बहुश्रुत असतील; कवि या दृष्टीनें किंवा नाटककार किंवा निबंधलेखक किंवा लघुकथालेखक या नात्यानें त्यांच्याहून अधिक योग्यतेचे लोक कांहीं आहेत; पण सुंदर आणि अनेकविध वाङ्मय-कलाकृति करून त्यांच्या स्वरूपाविषयीं, लक्षणांविषयीं वगैरे रसपूर्ण व मार्मिक मीमांसा करणारे आणि सर्वांत अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे वाङ्मयात्मक रसाची खरी भक्ति करणारे महाराष्ट्रांत किती आहेत ? केळकरांची ही भक्ति त्यांच्या अंगांत इतकी बाणलेली आहे कीं राजकारणासंबंधी, समाजकारणासंबंधी, शिक्षणासंबंधी किंवा इतर कोणत्याहि विषयासंबंधानें ते विचार करूं लागले किंवा लिहूं-बोलूं लागले म्हणजे मूळ प्रसंगाच्या विवेचनाला अनुरूप अशा सात्विक संतापादि भावनांवर देखील वाङ्मयात्मक रसास्वादलालसेचें प्राबल्य होऊन मूळ भावनेचें रूपान्तर होतें. मी काय म्हणतों तें उदाहरणें देऊन स्पष्ट करतों. लोकमान्य टिळक हे राजकीय किंवा सामाजिक प्रतिपक्षावर टीकालेख लिहीत आहेत अशी कल्पना केली तर कोणाची दयामाया न ठेवतां—' आडवें आलें तर पोटचें देखील कापलें पाहिजे ' अशा हट्टास पेटून-प्रतिपक्षावर लेखनात्मक हल्ला करीत आहेत असा कल्पनाचक्षूंपुढें देखावा दिसेल. पण तशाच परिस्थितींत केळकर लिहीत आहेत अशी कल्पना केली तर प्रतीपक्षावरचा माझा हल्ला जोराचा तर झालाच पाहिजे पण वाङ्मयदृष्ट्या सुंदरहि झाला पाहिजे अशा भावनेनें ते लिहीत आहेत असा देखावा आपणांस दिसेल. आपल्या युक्तिवादानें व प्रहारांनीं प्रतिपक्षी चीत झाला पाहिजे हा टिळकांचा मुख्य प्रश्न व त्याला चीत केलें असें मनाला वाटलें म्हणजे "चीत कसें केलें' यापेक्षां 'चीत केलें' यांतच त्यांना अधिक धन्यता वाटायची. केळकरांना प्रतिपक्ष्यास चीत करण्यांत अर्थात् आनंद होईलच, पण वाङ्मयदृष्ट्या कशा सुंदर रीतीनें प्रतिपक्ष्याचा युक्तिवाद उलटविला, कशा चातुर्यानें त्याच्या पेचांतून सुटलों, नाइलाज म्हणून निर्दयपणा स्वीकारून जीव घेणारा टोला जो लगावला तो किती सफाईनें लगावला, सरकारच्या जबरदस्तीमुळें टीकात्मक लेखन म्हणजे तारेवरचें काम किंवा सुळावरची पोळी

अशी स्थिति ओळखून आपण कसें अंग संभाळून व किती खुबीनें तलवारीचे गुप्त वार केले–या व अशा विचारांपासून उत्पन्न होणाऱ्या वाङ्मयविषयक स्वसामर्थ्यप्रतीतीमुळें त्यांना अधिक आनंद होईल, व आपल्या युक्तिवादांतील, भाषेंतील, कोटयांतील वगैरे सौंदर्य पाहून तद्विषयक रसास्वाद घेण्यांत तर ते विशेष रममाण झालेले आपल्या कल्पनेला दिसतील–निदान माझ्या कल्पनेला ते तसे दिसतात. आपण प्रतिपक्षावर केलेला वार कारीगर न होतां तो निसटला हें पाहून टिळकांना जें दुःख वाटलें असतें तें 'आपण वार किती सफाईदार केला होता' या जाणीवेनें विशेष कमी झालें नसतें.–त्यांच्या अंगीं बाणलेल्या गीतोपदिष्ट तत्त्वज्ञानानें ते जितकें कमी झालें असतें तितकें तें वरील जाणीवेनें कमी झालें नसतें. केळकरांचा वार प्रतिपक्ष्यानें चुकविला तर त्यांनाहि दुःख होईलच, पण गीतोपदिष्ट तत्त्वज्ञानापेक्षां स्वकीय वाक्पटुत्वाच्या जाणीवेनें तें त्यांना अधिक सह्य होईल. किंबहुना मी असेंहि म्हणूं शकेन कीं केळकर हे निसटून जाणाऱ्या प्रतिपक्ष्याच्या वाक्कौशल्याची तारीफहि करूं शकतील. क्रिकेटच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे आपण फेंकलेल्या चेंडूमुळें शत्रूची वुइकेट जरी मिळाली नाहीं, किंबहुना त्यानें तो चेंडू आडवला किंवा बाऊंडरीवर दवडला तरी देखील ते स्वतःचा चेंडू चांगला फेंकला गेला असल्यास त्यांतील कौशल्याचें व असा चेंडू तटविणाऱ्या किंवा मारणाऱ्या शत्रूच्या शहामतीचें क्षणभर कौतुकच करतील व मागूनहि न लाजतां याबद्दल गप्पागोष्टी करतील. 'कुळकर्णी-लीलामृतांत' रा. पाटील यांनीं प्रत्यक्षतः कुळकर्ण्यांवर व अप्रत्यक्षतः ब्राह्मणवर्गावर जो ताशेरा उडविलेला आहे त्यावरील केळकरांचा लेख वाचला म्हणजे आपली वुइकेट घेणाऱ्या प्रतिपक्ष्याच्या कौशल्याची ते तारीफ करूं शकतात हें कळून येईल. अच्युत बळवंत कोल्हटकर यांचें व केळकरांचें बरेंचसें बिनसलें असतां देखील केळकर हे अच्युतरावांच्या लेखनशैलीची व वाक्पटुत्वाची प्रांजळपणें स्तुति करीत, यावरूनहि हाच मुद्दा सिद्ध होतो कीं, केळकरांना वाङ्मयात्मक विलास इतके प्रिय आहेत कीं या विलासांच्या निमित्तानें शत्रु त्यांना घाव मारूं लागला तर बचाव करतां करतां ते घाव घालणाऱ्याच्या चतुराईचें मनांत कौतुक करूं शकतात व योग्य वेळीं जनांतही मनांतलें कौतुक बोलून दाखवूं शकतात.

वरील क्रिकेटचे वगैरे दाखले घेऊन कांहीं लोक मला म्हणतील कीं, राजकीय, सामाजिक वगैरे रणांगणांस केळकर हे वाङ्मयात्मक क्रीडांगण समजून वागत होते, व त्या त्या प्रसंगाला अनुरूप अशा गंभीर भावना

व कर्मप्रवृत्ति त्यांमध्यें हीनबल होत्या. पण असें म्हणणें म्हणजे माझ्या म्हणण्याचा विपर्यास करणें होईल. प्रश्न सध्यां गौण म्हणून इतर भावना सोडून देऊन फक्त सात्त्विक संतापाचाच विचार केला तर मला उदाहरणांनीं असें सिद्ध करून देतां येईल कीं, वरील आरोप चुकीचा आहे. सरकारच्या दडपशाहीसंबंधानें लिहितांना 'मेल्याशिवाय स्वर्ग दिसत नाहीं असें देवच बोलून चुकलेला आहे' असें व्यंग्यार्थपूर्ण वाक्य काय सात्त्विक संतापाशिवाय लेखणींतून बाहेर पडावें? मा. रा. बोडस यांच्यावर लेख लिहून 'मा.रा. बो.'चें 'बोडण' केळकरांनीं जें बाहेर काढलें होतें, शिवरामपंत परांजप्यांनीं 'ध्रुवाची गोष्ट खोटी' अशा प्रकारचा मथळा देऊन लिहिलेल्या गोष्टींवर त्यांनीं जी गोष्ट लिहिली होती, खाडिलकरांच्या मेनकेंत जी राजकीय कुचेष्टा आली होती तिला प्रत्युत्तर म्हणून त्यांनीं जें लिहिलें होतें, प्रो. फडके व प्रो. घारपुरे यांनीं १९२१ च्या राष्ट्रीय शिक्षणाच्या चळवळींत केळकरांवर जे आरोप केले होते त्यांवर केळकरांनीं शिवाजी मन्दिरांत दोन दिवस जीं भाषणें केलीं —या व अशा उदाहरणांचा विचार केला म्हणजे केळकरांना संसार म्हणजे केवळ वाङ्मय-क्रीडांगण वाटत नसून प्रसंगानुसार भावनावश होऊन चार हात करणारे ते आहेत हें कोणालाहि कबूल करावें लागेल. पण या प्रसंगीं देखील भावनावशतेच्या अनुषंगानें वाङ्मयात्मक रसास्वादलोलुपता दृग्गोचर होतेच, हें ते ते लेख किंवा तीं तीं व्याख्यानें वाचीत असतांना वाचकांच्या ध्यानांत आल्याशिवाय राहणार नाहीं.

आणि याचें खरें कारण असें कीं, ते कांहींहि करूं लागले तरी त्यांची वाङ्मयभक्ति डोकावतेच व आपली सत्ता गाजवतेच, इतकी त्यांना ती प्रिय, सहज व दुर्दम्य आहे. अमुक एक प्रसंगावर ते लिहूं किंवा बोलूं लागले आहेत आणि त्यांनीं त्याला यथार्थ व सुंदर उपमादि अलंकारांनीं सुशोभित केलेलें नाहीं असें झालेंच नाहीं. इंग्लिश वाङ्मयांत 'मिडास' नांवाच्या एका राजाची एक गोष्ट आहे. या राजाविषयीं असें म्हटलेलें आहे कीं, त्याचा ज्याला स्पर्श होई तें सर्व सुवर्णमय होऊन जाई. केळकरांचा हस्तस्पर्श असाच आहे,— जो विषय ते हातीं घेतात तो सुवर्णालंकृत होतो! किंवा आपल्या इकडील वाङ्मयांत युवतींचा चरणस्पर्श झाल्यावर लवकरच विशिष्ट वृक्ष फलपुष्पयुक्त होतात असा जो एक कविसंकेत आहे त्याचा आधार घेऊन मला असें म्हणावेंसें वाटतें कीं एखादा रुक्ष विषयवृक्ष वाङ्मयपुष्पांनीं प्रफुल्लित झालेला पाहावयाचा असल्यास केळकरांचा त्याला हस्तस्पर्श कर-

च्यावा म्हणजे इष्ट हेतु साध्य होईल. कविसंकेताप्रमाणें पाहतां कांहीं विशिष्ट वृक्षांसंबंधींच युवति या प्रभावशाली होतात; पण केळकरांचें प्रभावशालित्व सर्वगामी आहे. केळकर सिमल्याचें वर्णन करोत किंवा विलायतेहून पत्रें पाठवोत, इतिहाससंशोधनाबद्दल चर्चा करोत किंवा 'मराठे व इंग्रज' यांच्या संबंधाचें निरीक्षण करोत, निर्यमक कवितेबद्दल लिहोत किंवा टिळकांच्या आठवणींना प्रस्तावना लिहोत, 'तोतयाच्या बंडा'वर नाटक लिहोत किंवा 'माझी आगगाडी कशी चुकली' याविषयीं लघुकथा लिहोत, 'संस्कृत विद्येचें पुनरुज्जीवन' करूं पाहोत किंवा वर्तमानपत्रांतील जाहिरातींचें महत्त्व वर्णन करूं लागोत,—जो विषय या साहित्यमक्ताच्या व रसज्ञ ज्ञानयोग्याच्या आणि वाङ्मयकलापटु कर्मवीराच्या हातीं येईल त्यांत बहुश्रुतता, वैदग्ध्य, माधुर्य, सालंकारत्व, रसप्राचुर्य, रसलोलुपता इत्यादि गुणांची भर पडून तो खुलून दिसावयाचाच व फुलून जावयाचाच.

त्यांच्या लिखाणाची विविधता व सुरम्यता पाहून त्याला एखाद्या मोठ्या उद्यानाची किंवा कलात्मक-वस्तुसंग्रहाची उपमा द्यावीशी वाटते. या विस्तृत उद्यानाचें किंवा कलात्मक वस्तुसंग्रहाचें निरीक्षण किंवा परीक्षण करावयाचें म्हटलें म्हणजे राजकारणांतील Divide and Rule या भेदनीतितत्त्वाचा अंगीकार करून एकेका भागाचा एकेकदा समाचार घेतला पाहिजे. आणि या दृष्टीनेंच प्रस्तुत लेखांत केळकरांच्या सर्व वाङ्मयकलाविलासासंबंधीं न लिहितां त्यांनीं अंतर्मुख होऊन वाङ्मयकृतीबद्दल, म्हणजे त्यांच्या स्वरूपाविषयीं, तत्त्वाविषयीं वगैरे जें बरेंचसें लिहिलेलें आहे त्यापैकीं कांहींचें थोडक्यांत सारांश रूपानें वर्णन करून त्यांतील गुणदोषांचें दिग्दर्शन करावयाचें आहे. प्रस्तुत लेखांत त्यांच्या काव्यांबद्दल चर्चा येणार नाहीं, तर काव्यांविषयीं त्यांनीं काय लिहिलें आहे यांविषयीं येईल. त्यांचे गद्यपद्यप्रबंध नानाविध व रसपूर्ण आहेत; पण त्या सर्वांविषयीं न लिहितां गद्यपद्याविषयीं, यमकांविषयीं, काव्याविषयीं, रसास्वादाविषयीं वगैरे त्यांनीं जें लिहिलेलें आहे, त्याविषयीं या लेखांत विवेचन करावयाचें आहे.

## केळकरांचा अधिकार

केळकरांच्या वाङ्मयमीमांसेला विशेष महत्त्व अनेक दृष्टींनीं आलेलें आहे. राजकारणांत बरेंच महत्त्व असलेल्या 'केसरी'चे ते संपादक होते म्हणून त्यांच्या प्रत्येक शब्दाला महत्त्व येतें ही गोष्ट खरी असली तरी ती सध्यां माझ्या मनांत

नाहीं. मीं हा लेख लिहितांना राजकीय दृष्टि अजीबात वगळलेलीच आहे. केळकर यांची वाङ्मयमीमांसा मला विशेष मननीय वाटते, तें त्या मीमांसेच्या राजकीयेतर व स्वतःसिद्ध गुणांमुळेंच होय. एक तर वर दर्शविल्याप्रमाणें केळकरांची वाङ्मयक्षेत्रांत " आधीं केलें मग सांगितलें " अशा प्रकारची स्थिति आहे. ते केवळ टीकाकार नव्हेत, तर कथा–नाटक–निबंधादि वाङ्मय स्वतः लिहून नांव मिळविलेले टीकाकार आहेत. काव्यहि त्यांनीं लिहिलेलें आहे व तें उच्चतम दर्जाचें नसलें तरी त्यांत वरेच गुण आहेत. चरित्र, ऐतिहासिक निबंध, प्रवासवर्णनें, वगैरे अनेक प्रकारचे लेख त्यांनीं स्वतः लिहिलेले आहेत. अर्थात् वाङ्मय–निष्पत्तीसंबंधीं व वाङ्मयकलेसंबंधीं त्यांना स्वानुभवावरून बोलण्यासारखें पुष्कळ आहे व अनुभवाच्या बोलाची केव्हांहि किंमत विशेष असणार.

दुसरी गोष्ट अशी कीं ते बहुश्रुत आहेत. त्यांनीं मराठी, इंग्रजी व संस्कृत मिळून जितके ग्रंथ वाचले असतील तितके वाचलेले लोक फारच विरळा—महाराष्ट्रांत तरी फारच थोडे. ( माझ्या डोळ्यांपुढें चिंतामणराव वैद्यच तेवढे सध्यां उभे राहत आहेत.) कायद्यासंबंधीं व वर्तमानपत्रांतील हरतऱ्हेच्या विषयांसंबंधीं जीं पुस्तकें व जे लेख वाचले असतील ते सोडून दिले तरी शेक्सपिअर, गोल्डस्मिथ, जॉन्सन, ॲडिसन, बर्क, रस्किन, कार्लाइल, गटे, लेसिंग, इत्यादि जुने तसेंच अलीकडचे विरेल, शॉ, गॅल्सवर्दी, गार्डिनर, ब्रॅडले, वगैरे पाश्चात्य लेखक त्यांनीं इतके वाचले आहेत कीं त्यांची यादी सहज छापील पांच दहा पानें होतील इतकी लांबेल. मराठींतील वरेच जुने कवि, आधुनिक मराठींतील बहुतेक सर्व गद्य लेखक व वरेचसे कवी यांचा त्यांना चांगला परिचय आहे. संस्कृतमधील बहुतेक प्रसिद्ध नाटकें व साहित्यशास्त्रावरील बरेचसे ग्रंथ हीं त्यांनीं अभ्यासिलीं आहेत. आणि तीनहि भाषांतील हे ग्रंथ मार्मिकपणें आणि रसास्वादाच्या दृष्टीनें वाचलेले आहेत, केवळ परीक्षेकरितां किंवा विद्वत्त्वप्रदर्शनाकरितां नव्हे.

त्यांच्या रसिकत्वाच्या जोडीला त्यांचा स्वभावजन्य समतोलपणा व त्यांची सविवेकता हे गुण त्यांना लाभले आहेत. शिवाय केसरीचे संपादक व राजकीय पुढाऱ्यांपैकीं एक या नात्यानें त्यांचा अनेक व अनेकविध लोकांशीं अनेक प्रकारचा संबंध येऊन लोकांना काय पाहिजे असतें, लोकांना काय आवडतें, कां आवडतें वगैरे त्यांना समजलेलें आहे व लोकाभिरुचि कशी आहे याबद्दल त्यांचें मत अधिकारयुक्त समजलें पाहिजे. जागजागचे नवे व जुने वक्ते, लेखक, कवि, कीर्तनकार, शास्त्री, प्रोफेसर, इतिहाससंशोधक, चित्रकार, मूर्तिकार, गवई, वजवय्ये,

वगैरे कलाविलासी किंवा शास्त्रचिकित्सक लोक त्यांना भेटत असल्यामुळें त्या लोकांचीं ध्येयें, त्यांच्या आवडी–निवडी, त्यांचे गुणदोष वगैरे गोष्टी त्यांना जितक्या प्रमाणांत स्वानुभवानें ठाऊक आहेत तितक्या प्रमाणांत फारच थोड्यांना ठाऊक असणार. अर्थात् वाङ्मयकलेविषयीं व शास्त्राविषयीं नवे व जुने विचार व मनोभाव, तसेंच नवी व जुनी कृति, यांच्या नाडया पाहून योग्य चिकित्सा व मीमांसा करण्यास यांना फारच मोठा अधिकार प्राप्त झाला आहे.

केळकरांनीं केवळ वाङ्मयात्मक कलाकृतीच निर्माण केल्या असत्या किंवा बहिर्मुख दृष्टीनें लोकांच्या कलाकृतींचें परीक्षण–समीक्षण केलें असतें, किंवा केवळ रसास्वादांत ते रममाण झाले असते, तर त्यांच्या वाङ्मयविषयक मीमांसेला आजचें असामान्य महत्त्व आलें नसतें. लेखाच्या प्रारंभींच दिग्दर्शित केल्याप्रमाणें आपण जें करतों तें कसें व कां करतों, आपली जी कलाकृति आहे तिचें सामान्य स्वरूप काय, तिचें ध्येय काय, तिच्यापासून आनंद कां होतो, वगैरे गोष्टींचें अंतर्निरीक्षण करण्याचें सामर्थ्य केळकरामध्यें असल्यामुळें वरील अधिकारांत आणखी भर पडली आहे. अंतर्निरीक्षणाची कला जितकी सोपी वाटते तितकी नाहीं. परहृदयापेक्षां स्वहृदय जाणणें सोपें आहे असें वाटतें, पण तें वाटतें तेवढें सोपें नाहीं. कविजन परकायाप्रवेश करतात, व सज्जन लोक परहृदय जाणतात, पण स्वहृदयप्रवेश करण्यास जी अंतर्मुखप्रवृत्ति लागते व जी विवेचक दृष्टि लागते ती प्रत्येकांतच असते असें नाहीं. अध्यात्मतत्त्व जाणण्याकरितां " आत्मा वै श्रोतव्यः मन्तव्यः निदिध्यासितव्यः " असें म्हटलें आहे तें ' आत्मज्ञान ' सोपें म्हणून नव्हे, तर कठीण असून खऱ्या ज्ञानाला आवश्यक म्हणून. याच न्यायानें वाङ्मयाच्या क्षेत्रांत देखील काव्याचा वगैरे आत्मा ' श्रोतव्यः मन्तव्यः निदिध्यासितव्यः " असें म्हटलें पाहिजे, आणि या वचनानुसार श्रवण–मनन–निदिध्यासाची ज्याला आवड व शक्ति असेल त्यालाच हा वाङ्मयात्मक आत्मा ज्ञात व लभ्य होईल. केळकरांच्यामध्यें ही आवड व ही शक्ति आहे. त्यांनीं वाङ्मय–सागरावरून अनेक ठिकाणाहून उड्डाण केलें आहे व वाङ्मय–सागरांत ते अनेक ठिकाणीं डुंबलेले व रममाण झालेले आहेत, इतकेंच नव्हे तर वाङ्मयसागराच्या बुडाशीं जाऊन व तेथें डोळे उघडून पाहून ते तळ घेऊन आलेले आहेत !

त्यांची वाङ्मयचिकित्सा वाचनीय होण्याचें आणखी एक कारण असें कीं, त्यांची वाणी रसाळ आहे. साहित्यशास्त्रांतला कसलाहि रुक्ष विषय असो किंवा सूक्ष्म भेद असो, त्याचें पृथक्करण व विवेचन करतांना ते इतके रंगतात

करांनीं दिलेल्या वरच्यासारख्या उपमांनीं कमी होत नाहीं काय ? अर्थात् होतेच. तात्पर्य, तर्कावर अधिष्ठित असलेली केळकरांची वाङ्मयविषयक चर्चा विद्वत्व, विवेकित्व, विनोदित्व इत्यादि बहुमोल आंतर सद्गुणांनीं युक्त असल्यामुळें व उपमादि अलंकारांनीं सुशोभित असल्यामुळें ती मधुर कलाकृतीप्रमाणें रसिकांस आदरणीय व सेवनीय वाटते यांत नवल नाहीं.

असो. एवढी प्रस्तावना करून केळकरांच्या वाङ्मयविषयक चर्चेतील एकेका विषयाकडे आतां मी वळतों.

## काव्य म्हणजे काय ?

वाङ्मयाचा पृथक्करणात्मक विचार करूं लागल्यावर गद्य व काव्य हा भेद प्रथम ध्यानांत येतो. केळकरांनीं उज्जयिनी येथें नुकतेंच जें भाषण केलें त्यांत या प्रकारांचा भेद दर्शविण्याचा चांगला प्रयत्न केलेला आहे. " माझें लेखन मुख्यतः विवेचनात्मक व तर्कनिष्ठ असतें असें मला वाटतें. म्हणून मी गद्य-लेखक या सदरांतच पडेन " असें म्हणून विवेचन व तर्कनिष्ठता हे गद्याचे व्यवच्छेदक विशेष होत हें त्यांनीं सुचविलें आहे तें बरोबर आहे. गद्य व काव्य हा भेद बाह्य लेखनपद्धतीवर अवलंबून नसून लेखनाच्या परिणामावर अवलंबून आहे हें ते जाणून आहेत. ते सदर व्याख्यानांतच म्हणतात कीं " कित्येक लेखक गद्यच इतकें सरस लिहितात व कित्येक लेखक पद्यच इतकें नीरस लिहितात कीं संसारांत अनेक वेळां अनुभवाला येतें त्याप्रमाणें दादाला अक्का व अक्काला दादा म्हटलें तर तें शोभेलहि." पण जनरूढीला अनुसरून आणि **'प्राधान्येन व्यपदेशाः भवन्ति'** या न्यायानें ते जुने शब्द ठेवण्यास तयार आहेत. गद्य व काव्य यांमध्यें भेद आहे तो दाखवून काव्याचें काव्यत्व भावनाप्रवर्तनामध्यें आहे हें त्यांनीं पुढील उदाहरणानें स्पष्ट केलें आहे. " बाणभट्टाची कादंबरी गद्यरूप असली तरी तें काव्यच होय व राजतरंगिणी पद्यमय असली तरी तें गद्यच होय. इंग्रजींतहि कार्लाइल व इमर्सन यांचे लेख गद्यरूप असले तरी तें काव्यच होय व वर्ड्स्वर्थ यांची कविता पद्यरूप असली तरी तें गद्यच होय." माझ्या मतें गद्य-पद्यांचीं बाह्यलक्षणावलंबी भाषा सोडून द्यावी. बोधप्रधान व रसप्रधान असे दोन प्रकार मानावेत व 'गद्य-लेखक' आणि 'काव्य-लेखक' असें न म्हणतां 'प्रबोधक' लेखक व 'रसोत्पत्तिपर' ( किंवा रसजनक किंवा रसाविष्कारक ) लेखक असें म्हणावें. पण केळकर म्हणतात त्याप्रमाणें " शब्दसंकेत हा दुस्तर आहे व तो पाळलाच पाहिजे !."

## अलंकार-विचार

खऱ्या काव्याला छंद, यमकें, अलंकार, वगैरेंची आवश्यकता नाहीं हें केळकर तत्त्वतः कबूल करतात. पण लगेच मागच्या दरवाजानें या सर्वांना ते आवश्यक अंगांच्या योग्यतेला नेऊन बसवितात. उदाहरणार्थ " रस हा काव्याचा आत्मा असेल " असें अर्धवट कबूल करून लगेच ते " अलंकृत भाषा हा त्या रसरूपी आत्म्याचा निदान देह होय " असें मानण्यास ते आपणांस सांगतात. दुसऱ्या एका ठिकाणीं ते म्हणतात, " अलंकार, वक्रोक्ति, व्यंग्योक्ति, हाहि काव्याचा आत्मा नव्हे असें म्हणणारे लोक संकुचित दृष्टीचे आहेत. " " रसोत्कर्ष होण्याला स्वभावोक्ति पुरी पडूं शकेल, पण ती नेहमींच पुरी पडते असें नाहीं. " यमकें हीं आवश्यक नसतील असें कबूल करून पुनः त्यांच्या गौरवार्थ ते म्हणतात कीं " यमकानें नुसता शब्दच नव्हे तर कल्पनाहि सुचतात. " त्यांचें हें सर्व म्हणणें खरें आहे आणि काव्याकाव्यांमध्यें भेद करून तारतम्य ठरवलें म्हणजे पुष्कळसा वाद मिटण्यासारखा आहे. भावनाविलासांप्रमाणें कल्पनाविलासांना व विचार-विलासांना गौरवाचें स्थान देण्यास माझी हरकत नाहीं; पण तर-तम-भाव ठरवावयाचा म्हटला म्हणजे भावनाविलासांना उच्चतम स्थान द्यावें लागेल असें मला वाटतें आणि भावनाविलासात्मक उच्चतम काव्यांचा आत्मा अलंकार नव्हे, किंवा वक्रोक्ति नव्हे किंवा व्यंग्योक्तिहि नव्हे हें म्हणणें मान्य करावें लागेल. भावनाविलासात्मक उच्चतम काव्यांचा 'देह' म्हणून देखील अलंकारादिकांना मान्यता देण्यास मी तयार नाहीं. कारण ' देह ' म्हणणें म्हणजे ते आवश्यक आहेत असें मान्य करण्यासारखें आहे. तालबद्ध रचना, छंद, अनुप्रास, यमकें, अर्थालंकार, वक्रोक्ति, व्यंग्योक्ति इत्यादींमुळें भाषणाला किंवा लेखनाला शोभा येते हें मला कबूल आहे. यांचें पुष्कळ वेळां कवींना बंधन वाटत नाहीं, तर स्वाभाविकपणेंच असले सालंकार व मधुर वाक्प्रबंध त्यांना सुचतात हेंहि कबूल. यमकादिकांचें बंधन असतें म्हणूनच कांहीं वेळा कवींना वगैरे डोकें खाजवावें लागतें, व त्यांच्या कल्पनाविलासाच्या व बुद्धिविलासाच्या सामर्थ्याला चालना मिळते, त्यांची स्वतःची व वाचकादिकांची तद्विषयक हौस पुरवली जाते आणि उभयतांना सात्त्विक काव्यनंदाचा लाभ होतो हें सर्व मला मान्य आहे. काव्य म्हटलें म्हणजे तें भावनाविलासात्मकच पाहिजे असा माझा आग्रह नाहीं; बुद्धिविलास व कल्पनाविलास यांचें मला इतरांप्रमाणेंच कौतुक वाटतें आणि तज्जन्य आनंद

लुटतांना मला कमीपणा किंवा लाज वाटत नाहीं. शाब्दिक कोटयांचा देखील मी भोक्ता आहें, मग त्याहून उच्चतर असलेल्या अलंकारादिकांनीं माझें मन प्रफुल्लित होतें हें कबूल करण्याची जरूर नाहीं. कल्पनावैभव, शब्दप्रभुत्व इत्यादिकांनीं उत्पन्न झालेलीं आश्चर्य, चकितता, कौतुक इत्यादींनीं विशिष्ट अशी एक संमिश्र भावना असते व भावना ही सात्त्विक आणि उच्च स्वरूपाची असूं शकते असें केळकरांनीं जें मार्मिकपणें दाखविलें आहे तें सर्व यथार्थ आहे. कोणत्याहि बौद्धिक व्यापाराशेजारीं तद्विशिष्ट भावना नियमानें असतेच हें मानसशास्त्रीय तत्त्व या संदर्भात ध्यानांत धरावें. सर्वच काव्यें भावनाविलासात्मक असतात असें या अर्थानें म्हणतां येईल; पण अशांचें प्राधान्य पाहून नांवें ठरविलीं तर सामान्यत: ज्यांना भावनाविलासात्मक काव्यें म्हणतात त्यांतील उच्चतम काव्यांना यमकें, अलंकार, इत्यादींची आवश्यकता नाहीं, तीं अंगभूत नाहींत, तर अनुषंगानें, गौणरीतीनें व अनियमपूर्वक येणारीं आहेत असें मला म्हणावयाचें आहे. अलंकारादिकांच्या विरुद्ध लिहिणारे लॉक (Locke) प्रभृति लोक देखील अलंकारांचा उपयोग करतात असें केळकर म्हणतात. यावरून एवढेंच सिद्ध होईल कीं त्यांचा उपयोग करणें मनुष्यमात्रास आवडतें—त्यांची योग्यता उच्चतम आहे हें असल्या उदाहरणांनीं सिद्ध होत नाहीं, किंवा उच्चतम वाङ्मयाला तीं आवश्यक असतात हेंहि सिद्ध होत नाहीं. शुद्ध व उच्चतम विनोद शब्दनिष्ठ किंवा कल्पनाविलासात्मक नसतो किंवा बुद्धिविलासात्मक नसतो तर तो प्रसंगनिष्ठ असतो असें अलीकडे म्हणूं लागले आहेत तेंच शोक-शृंगार वगैरे रसांसंबंधानेंहि म्हणतां येईल. हिंगणें येथील शाळेंतील एका आठ दहा वर्षांच्या मुलीला कुंकूं न लावतां फिरल्याबद्दल मीं रागावूं लागलों असतां "तात्या, मला कुंकूं लावायचं नसतं" असें ती आजाण बालिका जणूं कांहीं आपण म्हणतों त्यांत कांहींच नाहीं अशाच भासणाऱ्या स्वरांत म्हणाली. या वाक्यांत तालबद्धता आहे का नाहीं कुणास ठाऊक, पण यमक, उपमा, उत्प्रेक्षा वगैरे अलंकार नाहींत. तरी माझ्या हृदयांत त्या वेळीं काय झालें तें माझें मला ठाऊक! हा प्रसंग खरा घडलेला, पण असला प्रसंग काव्यांत, कादंबऱ्यांत वगैरे कवीनें वर्णिलेला वाचला तर भावनात्मक उच्चतम शोकरस उत्पन्न होईल. या काव्यांत 'अंगभूत' असा कोणताहि अलंकार नसला तरी चालेल; किंबहुना अलंकारांनीं कदाचित् रसहानि होईल!

विशिष्ट प्रसंगाचें वर्णन करून त्यावेळीं वापरलेले अलंकाररहित

साधे शब्द देखील रसोत्पत्ति करूं शकतात याचीं अनेक उदाहरणें देतां येतील. मृच्छकटिकांतील शकार आपण खून करण्याचा प्रयत्न करून सबरून न्यायसभेंत नुसतें ' मी नाहीं केला ' ( न मया ) असें म्हणतो ते शब्द; किंवा आथेल्लो शेवटच्या अंकांत दुष्ट इॲगोला जेव्हां तलवारीनें वार करतो तेव्हां इॲगो "I bleed, Sir; but not killed" ("मला जखम झाली आहे, पण प्राण वांचला आहे") असें शान्तपणें व निर्लज्जपणें बोलतो ते शब्द; किंवा उत्तररामचरितांतील सीतेनें रामाविषयीं आदरपूर्वक उद्गारलेले " म्हणूनच हे रघुकुलाला भूषणभूत आहेत " अशा भावार्थाचे शब्द; किंवा रामानें आपल्या परिचारकाला " मला पूर्वीप्रमाणेंच रामभद्रच म्हणत जा " अशा आशयाचे सांगितलेले शब्द—यांत छंद नाहीं, यमक नाहीं, अलंकार नाहीं, कल्पनाविलास नाहीं, बुद्धिविलास नाहीं—असें असतां तो तो रस उत्कटतेनें उत्पन्न होतो. कित्येक वेळां तर कवी हे प्रसंगाचा असा बनाव जुळवून आणतात कीं तेथें विशिष्ट पात्र तुटक तुटक चाचरत बोलतें त्यांतच रस भरलेला असतो. आथेल्लोमधील कॅशो ( Cassio ) दारूच्या निशेंत ' हा माझा डावा हात आणि हा माझा उजवा हात ' असें अडखळत बोलतो तें, किंवा हॅम्लेटमधील ऑफिलिआ ही वेड लागल्यावर कांहींतरी बोलते तें वाचकांना येथें आठवेल. " ब्रह्म म्हणजे काय ? " असें विचारल्यावर ब्रह्म हें अनिर्वचनीय आहे हें स्वानुभवानें जाणणाऱ्या गुरूनें जें मौन स्वीकारलें तें देखील "गुरोस्तु मौनं व्याख्यानम् " अशा तऱ्हेचें झालें ! किंवा ब्रह्मविषयक गहन गोष्टी सोडून व्यावहारिक गोष्टींविषयीं बोलावयाचें म्हणजे एखाद्या निष्कपटी विद्यार्थिनीनें भाबडेपणानें भलताच प्रश्न विचारला असतां गुरु जें मौन स्वीकारतो तेंहि ' गुरोस्तु मौनं व्याख्यानम् " अशा तऱ्हेचें असतें. अशा प्रकारच्या प्रसंगाचें वर्णन आपण जे वाचक वाचतों त्यांना या मौनात्मक व्याख्यानांतील ' ध्वनि ' म्हणा किंवा ' रस ' म्हणा, अत्यंत आल्हाददायक होतो.

तात्पर्य, कवींनीं, नाटककारांनीं, कादंबरीकारांनीं वगैरे असे प्रसंग वर्णिले आहेत कीं तेथें साध्या शब्दांनीं देखील उच्चतम रसोत्पत्ति झाली आहे. यापुढें जाऊन असेंहि म्हणतां येईल कीं, त्या प्रसंगीं अलंकारिक भाषा कोणीं वापरली आहे अशी कल्पना केली तर तेथें रसहानि झाली असती !

अलंकारादिकांची फाजील आवश्यकता नाहीं असें केळकर कबूल करतात, पण त्यांचा स्वाभाविकपणेंच सालंकार वैदग्ध्याकडे व लालित्याकडे

कल असल्यामुळें तें त्यांना जें महत्त्व देतात तें मला पसंत नाहीं. हें फाजील महत्त्व देण्याचें एक कारण असें दिसतें कीं, रस व अलंकार यांत तत्त्वतः ते भेद मानीत नाहींत,—अलंकार हा रसाचाच जणूं कांहीं प्रकार आहे असें ते मानतात. " रस व अलंकार यांच्या स्वरूपांत वास्तविक इतकाच फरक कीं, रसांचे स्थायिभाव जीवसृष्टीच्या भावनांवर अधिष्ठित असतात व अलंकाराचे स्थायिभाव अचेतन सृष्टीवरहि अधिष्ठित होऊं शकतात. " व खरें म्हटलें म्हणजे वर निर्दिष्ट केलेल्या प्रसंगांसारखे प्रसंग वर्णन करून स्वाभाविक रसोत्पत्ति करण्याकडे लेखकांची अधिकाधिक प्रवृत्ति व्हावी म्हणून या मुद्याचा एवढा प्रपंच केला, बाकी तत्त्वतः आमचा मतविरोध आहे असें मुळींच नाहीं.

## कलाविलासाच्या मागें हेतुसंशोधनाचा गुप्त पोलिस

काव्यानंदाला कारणीभूत वाग्विलास असतो, मग हा विलास प्रधानतें करून भावनारम्यत्वमूलक, कल्पनावैभवमूलक किंवा बुद्धिवैभवमूलक असो. वाग्विलास हा अलंकारांच्या काय व रसांच्या काय मुळाशीं असतो. या दृष्टीनें रसाचें व अलंकाराचें मी एकरूपत्व मानूं शकेन. तसेच भावनांचा, कल्पनांचा व बुद्धीचा परस्परांशीं अत्यन्त निकट संबंध असतो, इतका कीं तीं एकमेकांच्या अंगभूत आहेत या अर्थानेंहि मी रसाचें व अलंकाराचें एकरूपत्व मानूं शकेन. पण सामान्य दृष्टीनें पाहतां रस व अलंकार यांमध्यें जो भेद मानिलेला आहे तो महत्त्वाचा आहे व त्याकडे दुर्लक्ष करणें युक्त नव्हे म्हणून आणि काव्यादि वाङ्मयप्रबंध ऐतिहासिक, आधिभौतिक ज्ञान देण्याकरितां किंवा नैतिक उपदेश करण्याकरितां नसतात हें केळकरांनीं अनेक ठिकाणीं अनेक तऱ्हांनीं सांगितलें आहे तें ध्यानांत धरण्यासारखें आहे. कीर्ति, अर्थप्राप्ति, सदुपदेश हे हेतु गौण व आनुषंगिक होत, ते प्रधान नव्हेत हें ध्यानांत न धरल्यामुळें कित्येक वेळां कवीचा इष्ट हेतु जो काव्यानंद देणें तो बाजूला राहून टीकाकार अप्रस्तुत गोष्टींबद्दल उगाच वाद घालीत बसतात. आतां नीतिदृष्टीची आणि काव्यदृष्टीची अगदीं फारकत आहे कीं काय, म्हणजे कवि, चित्रकार वगैरेंनीं नीति–अनीतीचा विचार न करतां केवळ कलाविलास म्हणून पाहिजे ते वाग्विलास किंवा चित्रात्मक विलास करावेत काय हा मुद्दा विचार करण्यासारखा आहे. पण तत्पूर्वी केळकरांनीं या विषयीं जें सुंदर विवेचन केलें आहे तें त्यांच्या बडोदें येथील व्याख्यानांतून लहान उतारा घेऊन सांगतों.

"कलाविलासाच्या मार्गे हेतुसंशोधनाचा गुप्त पोलीस लावून दिला तर अनर्थकारक परिणाम झाल्याशिवाय राहणार नाहींत. वाङ्मयाला नैतिक प्रबंध म्हणणें आणि साखरभाताला नुसत्या साखरेचा केलेला भात म्हणणें हीं दोनहि सारख्याच समंजसपणाचीं होत. शिल्पशास्त्रांत कलेच्या दृष्टीनें निरनिराळे आकार बनविणें यांत प्रतिभाकौशल्य दिसून येतें. पण देवळाचें उंच शिखरच सुंदर कां, तर तें आकाशांत ईश्वर आहे असें उंच बोट करून दाखवितें म्हणून, अथवा तीन तीन कमानींची जोडीच कां शोभते तर तिजवरून त्रिमूर्ति ब्रम्हाविष्णूमहेश्वराची आठवण होते म्हणून असें म्हणणें बरोबर होईल काय! ताजमहालाच्या पांढऱ्या शुभ्र दगडांत जी रंगीबेरंगी कुसर बसविली आहे तिचा नैतिक हेतु शोधून काढणारानें ताजमहाल पाहण्यास जाण्याचे श्रम न घेतलेलेच बरें. चित्रकार पौराणिक किंवा ऐतिहासिक चित्रें रंगवितो तेव्हां त्याचा हेतु कलेच्या दृष्टीनें सुंदर चित्रें रंगविण्याचा असतो कीं नीतिबोध करण्याचा असतो? पोहावयास पडणारा मनुष्य जलक्रीडा करतो ती स्नानाच्या हेतूनें नव्हे. शिकारी क्षत्रिय अरण्यांत मृगयाविलास करतो ती एक दिवस चांगलें मांस खावयाला मिळावें म्हणून करीत नाहीं! गवई दीप राग आळवितो तो अर्थशास्त्रदृष्ट्या मशालजीचा खर्च वांचविण्याकरितां नव्हे. तात्पर्य, 'अधिकस्याधिकं फलं' या न्यायानें, कलेच्या दृष्टीनें वाङ्मय सुंदर असून त्यांतूनच नीतिबोध निघण्यासारखा असल्यास दुधांत साखर पडेल; पण त्याचा मूळ हेतु नीतिबोध नाहीं तें वाङ्मयच नव्हे हें म्हणणें यथार्थ नाहीं, ............... शुद्ध निरपेक्ष आनंद हाच कलेचा हेतु व तें च तिचें फळ होय."

शेवटल्या वाक्यांतील 'आनंद' या शब्दामागें 'शुद्ध' हें विशेषण लावलेलें आहे तें फार महत्त्वाचें आहे. कला ही नीतीची दासी नसेल, कलेनें आत्मप्रसादाकरितां स्वतःच्या मनाला 'पूत' वाटेल तें करावें व नीतीची फाजील प्रतिष्ठा ठेवूं नये हें खरें असेल, पण तिनें 'मनःपूत' वागावें व नीतीचा खून करावा (किंवा इतकी कडक भाषा नको असल्यास) तिनें औचित्यभंग करावा असा मात्र याचा अर्थ नव्हे. औचित्य सर्वांनींच पाळलें पाहिजे. अश्लील व श्लील यांबद्दल वसन्तव्याख्यानमालेंत बोलतांना हें केळकरांनीं सुंदर रीतीनें सुस्पष्ट केलें होतें. चारचौघांत जें वाङ्मय वाचण्यास संकोच वाटेल किंवा जें चित्र पाहण्यास अवघड वाटेल तें अनुचित. आतां संकोच वगैरे जें कांहीं आहे तो सगळा संस्कृतीचा भाग आहे असें कांहीं लोक म्हणतील. लोकांच्या मनाचा, संस्कृतीमुळें या दोहोंना, विशिष्ट मनोघटना झाली असेल

तर ही घटना कायम आहे तोंपर्यंत त्यांना वाटणारें अनौचित्य टाळलेलें बरें. काव्याकडे काव्यदृष्टीनेंच पहावें असें केळकर म्हणतात त्या वेळेस नैतिक अनौचित्याकडे दुर्लक्ष करावें असा त्यांचा भावार्थ नाहीं. काव्यात्मक कलेनें व इतर कलांनीं मनाची लाज नसली तरी जनाची लाज ठेवावी असेंच ते म्हणतील. आतां नीति–अनीति–विषयक विचारसरणी व मूलभूत सिद्धान्त यांविषयींच जर पूर्ण मतभेद असेल तर काय करावयाचें याचा विचार केळकरांनीं कोठें केलेला दिसत नाहीं. पण त्यांच्या लेखांचें एकंदरींत धोरण असें दिसतें कीं नीतीनें नाकानें कांदे सोलूं नयेत व कलेनें नीतीला कोंपऱ्यांत बसवूं नये. कलाविषयांत नीतीनें लुडबूड करूं नये हें खरें असलें तरी अनीतीची दुर्गंधि आपल्या क्षेत्रांत येणार नाहीं अशी काळजी कलेनें घेणें हें औचित्याला धरून नाहीं काय, असें केळकर विचारतील. 'कुळकर्णी–लीलामृता'सारख्या पुस्तकांतील किंवा प्रभाकरादिकांच्या लावण्यांतील सौंदर्य त्यांना समजतें. 'पण पहिलें सौंदर्य असत्यानें शबलित व दुसरें नैतिक अनौचित्यानें दूषित म्हणून तीं शुद्ध आनंद देऊं शकत नाहींत असें ते म्हणतील. रघुवंशांत अजराजाच्या सुराज्य-व्यवस्थेचें शृंगारिक भाषेंत जें वर्णन केलें आहे त्याचा रसास्वाद ते घेऊं शकतात, पण तें सदोष आहे हें ते ओळखून असतात. रसास्वाद किंवा कलाविशिष्ट आनंद हाच हेतु किंवा हेंच फळ म्हटलें तरी हा रस किंवा हा आनंद 'शुद्ध' व औचित्ययुक्त असलाच पाहिजे असें त्यांचें म्हणणें आहे. परिपूर्ण व ध्येयात्मक आनंदाच्या दृष्टीनें तरी त्यांचें हें म्हणणें मान्य करण्याशिवाय कोणालाहि गत्यन्तर नाहीं.

## काव्यानंद कां होतो ?

आतां सुंदर वाङ्मयापासून मनाला आनंद कां व कसा होतो यांविषयीं केळकरांनीं जी 'सविकल्प समाधीची' उपपत्ति बडोदें येथील अध्यक्षीय व्याख्यानांत प्रथम विदग्धसभेपुढें मांडिली ती त्यांच्याच शब्दांत सांगून त्यांतील गुणदोषांकडे मागून वळतों. केळकर म्हणतातः—

"आपली तर भूमिका सोडावयाची नाहीं, पण बसल्या बैठकींत इतर भूमिकांचाहि अनुभवानंद सेवावयाचा, ही गोष्ट प्रतिभाच घडवूं शकते. आपण नवरसांचेंच उदाहरण घेऊं. रसपूर्ण असें काव्य वाचतांना जो आनंद होतो तो आत्मौपम्यबुद्धीमुळेंच. कोणत्याहि रसाचा स्थायिभाव क्षणभर दुसऱ्याचा घेऊन आपलासा केल्याशिवाय रसप्रतीति होत नाहीं. प्रत्यक्ष आपली मुलगी

सासरीं चालली असतां डोळ्यांतून पाणी गाळीत जे शब्द आपण बोलतों तें आपणांला काव्य नव्हे. तो आत्मभूमिकेवरचा एकेरी अनुभव. पण तेंच शाकुन्तलाच्या चौथ्या अंकांतील कण्वावरचा कन्याविरहप्रसंग वाचीत असतां डोळ्यांतून पाणी गाळीत जे शब्द आपण वाचतों ते मात्र आपणांला काव्य किंवा वाङ्मय—कारण, येथें एका ऐवजीं दोन भूमिका होतात. वाचक आपली भूमिका न सोडतां मनानें दुसऱ्या भूमिकेवर संक्रमण करतो व प्रतिभेनें अनुभव घेतो म्हणून तें दुःख नसून रसास्वादाचा आनंद होय."

या विवेचनानंतर केळकरांनीं रघुवंशांतील व मुक्तेश्वराच्या भारतांतील उदाहरणें देऊन आपलें म्हणणें विशद केलें आहे आणि अखेरीस रसांप्रमाणेंच अलंकारांना आपल्या सविकल्प समाधीच्या उपपत्तीच्या चौकटींत बसविण्याचा प्रयत्न केला आहे. हा त्यांचा प्रयत्न मला थोडासा अयशस्वी वाटतो. पण मतभेद दर्शविण्यापूर्वी त्यांचें म्हणणें त्यांच्याच शब्दांत सांगतों. ते म्हणतातः—"बहुतेक अलंकार हे उपमा व रूपक यांच्या निरनिराळ्या परीच आहेत. उपमा व रूपक या दोहोंत पूर्ण किंवा ईषत्—तादात्म्य असा फरक असला तरी एकरूपताप्रतिपादन हाच दोहोंचा मुख्य उपयोग आहे. या तादात्म्यानें तरी आनंद कां होतो असें विचारलें तर त्यांचेंहि उत्तर रसाविषयीं दिलें तेंच होय. रस व अलंकार यांच्या स्वरूपांत वास्तविक फरक इतकाच कीं रसाचे स्थायिभाव जीवसृष्टीच्या भावनांवर अधिष्ठित असतात व अलंकारांचे स्थायिभाव अचेतन सृष्टीवरहि अधिष्ठित होऊं शकतात. स्त्रीला लतेची उपमा दिली असतां आनंद होण्याचें कारण हें कीं समगुण अशा दोन पदार्थांचा अनुभव मनाला एकदम घेतां येतो व हीच गोष्ट समगुण अशा जितक्या अधिक पदार्थांविषयीं एकदम घडेल तितका आनंद वाटेल. या आनंदानें एक प्रकारची तल्लीनता येते व तो आनंद फारच उत्कट झाला तर त्यापासून समाधान लाभूं शकेल. या दृष्टीनें पाहतां 'खरी सविकल्प समाधि' उत्पन्न करूं शकतें तें वाङ्मय' अशी नवीन व्याख्या मीं बनविली आहे."

ही उपपत्ति मला मान्य नसली तरी तिनें मराठी साहित्यचर्चात्मक विचारांत चांगली भर घातली आहे व विचारांना चालना दिली आहे हें मी आनंदानें कबूल करतों. पूर्वी कवींची किंवा रसिकाची स्तुति करावयाची झाली म्हणजे विषयाशीं तादात्म्य पावण्याची भाषा आपण ऐकत होतों. कवि विषयाशीं तद्रूप होतो व त्याच्या भावना अनावर झाल्यामुळें कारंजाच्या फवाऱ्याप्रमाणें त्या काव्यरूपानें बाहेर पडतात अशी भाषा पूर्वी ऐकूं यावयाची

( व अजूनहि येतेच आहे ! ) Poetry is the spontaneous overflow of powerful feelings हें वर्ड्स्वर्थचें वाक्यहि अशा संदर्भात कानांवर आदळा-वयाचेंच. पण काव्य करतांना कवि मूळभूत भावनांना पूर्णपणें वश झालेला नसतो तर तो शान्त झाल्यावर पुनः स्मृतीच्या व कल्पनेच्या साहाय्यानें पूर्वीच्या भावनांना एक प्रकारें जागृत करीत असतो व अशा छायात्मक भावनांचा क्षोभ एक प्रकारच्या मनःशान्तीच्या अधिष्ठानावर होऊन त्या शान्तिसागरांत छायात्मक भावनांचा कल्लोळ उत्पन्न झाल्यावर काव्यप्रसव होतो असें वर्ड्स्वर्थचें खरें म्हणणें होतें तें कानांवर सहसा येत नाहीं. योगांतील समाधि व हें कलाविषयक तादात्म्य यांतील साम्यामुळें या कलाविषयक तादात्म्याला समाधिविषयक पूज्यभावाचा फायदा मिळून तें कलाविषयक टीकावाङ्मयांत वेदवाक्यप्रमाणें सादर स्वीकरणीय ठरलें. पण केळकरांची उपपत्ति प्रत्यक्षतः रसिकांच्या मनःस्थितीसंबंधी असली व कवीच्या मनःस्थितीचा विचार त्यांत अप्रत्यक्ष असला तरी या दोन मनःस्थितींचा अत्यन्त जिव्हाळ्याचा संबंध असल्यामुळें सविकल्प समाधीच्या उपपत्तीमुळें तादात्म्याची चुकीची उपपत्ति मागें पडली आहे, ही चांगली गोष्ट झाली. काव्यानन्द हा विशिष्ट प्रकारचा आनंद आहे व त्याचें पृथक्करण करून त्याचें स्वरूपवर्णन करणें व कारणमीमांसा करणें हें तत्त्वदृष्ट्या जरूरीचें आहे व वाङ्मयदृष्ट्या मनोरंजक आहे हें केळकरांनीं या प्रश्नाला आपल्या अध्यक्षीय भाषणांत महत्त्व देऊन लोकांच्या नजरेस आणलें व या प्रश्नाकडे रसिकांचें लक्ष वेधलें हा मराठी वाङ्मयाचा मोठाच फायदा झाला आहे.

आतां कोणतीहि उपपत्ति निघाली म्हणजे ती सर्वांनाच पसंत पडेल असें नाहीं. अर्थात् सविकल्प समाधीची उपपत्ति मला किंवा इतरांना कांहीं बाबतींत पसंत पडत नाहीं यांत आश्चर्य नाहीं. माझा मतभेद थोडक्यांत व विरोधाभासात्मक शब्दांत सांगावयाचा म्हणजे मी असें म्हणेन कीं, केळकरांच्या सविकल्पत्वाला मनांत कोणताहि विकल्प न ठेवतां मी मान्यता देतों, पण त्यांच्या उपपत्तींतील 'समाधीपासून आनंद होतो' या म्हणण्याला जल-समाधि देऊं इच्छितों ! काव्य करतांना कवि, किंवा काव्यरसास्वाद घेतांना रसिक हा विषयाशीं पूर्ण तादात्म्य पावत नाहीं, तर त्याची समाधि सविकल्प असते हें मला पूर्णपणें मान्य आहे. कवीनें, वक्त्यानें, कलाकुशलानें, रसिकानें स्वतःला विसरावयाचें खरें, पण पूर्णपणें विसरावयाचें नाहीं. नैतिक क्षेत्रांत जसें स्वार्थ विसरणें हें ध्येय आहे, पण उच्च अर्थाचा जो ' स्व ' त्याचा अर्थ

विसरावयाचा नाहीं तर उलट ' आत्मज्ञान ' करून घेऊन ' आत्मप्राप्ति ' करून घेणें हें ध्येय असतें त्याप्रमाणेंच रसास्वादाचे बाबतींत देखील रसिकानें एका अर्थी स्वतःला विसरावयाचें आहे व एका अर्थी एक विशिष्ट व ब्रह्मानंदतुल्य अलौकिक आनंद देणाऱ्या स्वानुभवाचा उत्कर्ष साधावयाचा आहे. काव्यात्मक आनंदांत समरसत्व असतें, तादात्म्य असतें, पण हें वाच्यार्थानें घ्यावयाचें नसतें तर तें ' अलौकिक ' असतें आणि त्यांत सविकल्पत्व असतें हा मुद्दा जितका लोकांच्या ध्यानांत यावा तितका येत नाहीं.

शोकरसाचा आनंद घेतांना पूर्ण तादात्म्य पावल्यास आपणांस शोक होईल, शोकरसाचा आनंद होणार नाहीं. शोकगंभीर नाटकांमध्यें ( Tragedies मध्यें ) आनंद होतो तो तन्मयता अपूर्ण असते म्हणून होऊं शकतो, पूर्ण तन्मयता झाल्यास शोकरस उत्पन्न न होतां शोक उत्पन्न व्हावयाचा आणि 'एकच प्याल्यां'तील ' सिंधू ' चें वगैरे बालगंधर्वाचें शोकरसोत्पादक नाट्य पाहतांना कांहीं अडाणी बाया शोकप्रचुर देखावे सह्य न झाल्यामुळें नाटकगृह सोडून जातात हें मीं ऐकलें आहे. मला देखील या बायांप्रमाणें रडूं येतें, पण मी बराच समरस झालों तरी स्वतःची वा. म. जोशी ही भूमिका ( व खुर्ची ) सोडीत नाहीं. आणि म्हणून मला रसास्वाद घेतां येतो !

समरसत्वाकडे प्रवृत्ति किंवा गति आहे, जितकें त्याच्या जवळ जातां येईल तेवढें जावयाचें, अगदीं जवळ जाण्याची कमाल किंवा पराकाष्ठा करावयाची, पण स्पर्श मात्र करावयाचा नाहीं असा हा प्रकार आहे आणि त्याला जराशी कठिण पण समर्पक उपमा द्यावयाची म्हणजे गणितांतील ' असंपाति ' रेषेची ( Asymptote ची ) देतां येईल. ' असंपाति ' रेषा अशी असते कीं, तिच्या स्वाभाविक दिशेनें ती लांबविली असतां दुसऱ्या एका विशिष्ट वक्र रेषेजवळजवळ जाण्याकडे तिची प्रवृत्ति असते पण अनंततेपर्यंत लांबविली तरी ती स्पर्श कधीं करूं शकत नाहीं. असंपाति रेषेची इंग्लिशमध्यें अशी व्याख्या केलेली आहे—" Asymptote is a line which approaches nearer and nearer to some curve but though infinitely extended would never meet it. " पोहतांना आपण पाण्यांत बहुतेक बुडलेले असतों, पण पूर्णपणें कधीं बुडत नाहीं, आणि बुडी घेतली तर लगेच बाहेर येतों, त्याप्रमाणेंच काव्यरससागरांत क्रीडार्थ अवगाहन करीत असतां 'स्व' ला आपण पूर्णपणें बुडूं द्यावयाचें नाहीं, तर डोकें वर ठेवून पोहत असावयाचें आणि असें केलें तरच अलौकिक आनंद होईल. नाहीं तर आपत्ति ओढवावयाची !

(आणि अशी एकदां आपत्ति ओढवली होती म्हणतात. आमच्या गांवीं एकदां नारसिंह अवताराचा अभिनय करतांना एक गांवकरी भंगट नट इतका आपल्या भूमिकेशीं तन्मय झाला कीं, हिरण्यकश्यपूची भूमिका घेणाऱ्या नटाचा तो खरोखरीं प्राण घेऊं लागला आणि मग श्रोतृवर्गांतील कांहीं लोकांना रंग-भूमीवर जाऊन विचाऱ्या हिरण्यकश्यपूवेषधारी नटाला प्राणान्तिक संकटांतून वांचवावें लागलें ! पूर्ण तादात्म्याचा हा असा परिणाम होतो !)

आतां अधिक विस्तार न करतां काव्यानंदांतील सविकल्पत्व मान्य करून सविकल्प 'समाधी'पासून आनंद होतो हें जें केळकरांचें म्हणणें त्याचा विचार करूं या. केळकर म्हणतात, वाचक आपली भूमिका न सोडतां मनाप्रमाणें दुसऱ्या भूमिकेवर किंवा भूमिकांवर संक्रमण करतो व या अर्थानें जगाचें आकलन करण्याची त्याची महत्त्वाकांक्षा अल्पांशानें पुरी होते म्हणून त्याला आनंद होतो आणि जितक्या अधिक भूमिकांशीं त्याचें तादात्म्य होईल (अर्थात् सविकल्प तादात्म्य होईल) तितका त्याला अधिक आनंद होईल. आतां सर्व जगाचें आकलन करून घ्यावें अशी जीवाची महत्त्वाकांक्षा असते हें खरें आहे. त्याचप्रमाणें हें आकलन झालें असतां आनंद होतो हेंहि खरें आहे. एखाद्या गोष्टीचा कार्यकारणभाव समजला, किंबहुना एखाद्या वस्तूचें नांव जरी समजलें तरी देखील आनंद होतो असा अनुभव आहे. इतके दिवस अज्ञात असलेल्या गोष्टीचें आकलन झालें या जाणिवेनें जो आनंद होतो तो विद्यानंदाचा एक घटक आहे यांत शंका नाहीं. कलाजन्य आनंदांत देखील हा एक घटक आहे हेंहि कबूल करण्यास हरकत नाहीं. पण हा घटक अगदीं गौण आहे व कलानंदाचा तो व्यवच्छेदक विशेष नव्हे.

आपली भूमिका न सोडतां दुसऱ्या भूमिकेशीं समरसत्व होणें शक्य आहे व यांत आतां वर म्हटल्याप्रमाणें एक प्रकारचा आनंद आहे हें कबूल केलें तरी कलानंद किंवा काव्यानंद सविकल्प, समाधीपासून उत्पन्न होतो या उपपत्तीवर अनेक आक्षेप घेतां येण्यासारखे आहेत. केळकरांनीं कण्वाचें व शकुंतलेचें उदाहरण घेऊन आपली भूमिका न सोडतां आपण कण्वाशीं किंवा शकुंतलेशीं समरसता पावतों म्हणून आनंद होतो असें म्हटलें आहे; आतां मला असा प्रश्न पडतो कीं, एखाद्या गाईचें व तिच्या वासराचें सुंदर दृश्य पाहून किंवा रंगविलेलें रंगेल चित्र पाहून किंवा रेखाटलेलें शब्दचित्र पाहून मला जो आनंद होतो तो गाई-शीं तादात्म्य पावून का वासराशीं ? यापेक्षांहून दुसरा व अधिक कठिण प्रश्न असा कीं एखादवेळेस प्रातःकाळीं टेंकावरून नदीकांठचा रम्य देखावा पाहून

आनंदित होतों तो नदीशीं तादात्म्य पावून, का झाडाशीं, का टेंकडीशीं, का आभाळांतील अनेक रंगी ढगांशीं ? येथें कोणी उत्तर देईल कीं आपण सृष्टिकर्त्याशीं क्षणैक तादात्म्य पावतों व त्याचें अंतरंग जणूं कांहीं आपणांला क्षणभर कळून त्याचें वैभव आणि कौशल्य पाहून आपण आनंदित होतों. त्याचप्रमाणें वरील गाईच्या व वासराच्या, तसेंच तैलचित्राच्या व शब्दचित्राच्या उदाहरणांत आपण चित्रकाराशीं व कवीशीं तद्रूप होतो आणि आपली भूमिका तर सोडीत नाहीं म्हणून आनंद होतो असें उत्तर देतां येण्यासारखें आहे; पण हें उत्तर केळकरांच्या उदाहरणांवरून तरी त्यांना विवक्षित आहे असें दिसत नाहीं. कारण त्यांच्या उदाहरणांत कण्व, अज, पांडव इत्यादि पात्रांशीं आपण तादात्म्य पावतों असें म्हटलें आहे; हे प्रसंग वर्णन करणाऱ्या कालिदास व मुक्तेश्वर कवीशीं तादात्म्य पावतों असें म्हटलेलें नाहीं.

अचेतन सृष्टीशीं तादात्म्य कसें पावावयाचें हा प्रश्न केळकरांनीं रस व अलंकार यांतील त्यांनीं जो भेद दाखविला तो दाखवितांना उत्पन्न झाल्यासारखा दिसतो, पण त्याचें महत्त्व पुरतेपणीं त्यांच्या ध्यानांत आल्यासारखें दिसत नाहीं. ते म्हणतात. "रस व अलंकार यांच्या स्वरूपांत इतकाच फरक कीं, रसाचे स्थायिभाव जीवसृष्टीच्या भावनांवर अधिष्ठित असतात व अलंकाराचे स्थायिभाव अचेतन सृष्टीवरहि अधिष्ठित होऊं शकतात. स्त्रीला लतेची उपमा दिली असतां आनंद होण्याचें कारण हेंच कीं, समगुण अशा दोन पदार्थांचा अनुभव एकदम घेतां येतो. इत्यादि इत्यादि." केळकरांनीं लतेला अचेतन म्हटलें आहे तें चिन्त्य आहे, पण तें सोडून देऊन "स्थायिभाव सृष्टीवर अवलंबून असतात" या म्हणण्याचा अर्थ काय याचा विचार करूं या.

( हा विचार करतांना एक अशी गोष्ट ध्यानांत येते कीं, केळकर हें 'भाव' हा शब्द शास्त्रीय काटेकोरपणानें न वापरतां कित्येक वेळां ढिलेपणानें वापरतात. उदाहरणार्थ, "सुभाषित आणि विनोद" या पुस्तकांत पान २० मधील ३४ व्या कलमांत "अंतःकरणाची जी सहज व स्वाभाविक वृत्ति तिला भाव असें म्हणतात" असें सांगून लगेच २१ पानावर " रसानुकूलविकृति भावः" अशीहि एक व्याख्या देतात व यांची एकवाक्यता किंवा तथ्यातथ्यता दाखविण्याचा प्रयत्न करीत नाहींत. पान २२ वर "सात्त्विक भाव म्हणजे सुखदुःखादि भावांनीं भावित असें जें अंतःकरण त्यापासून

उत्पन्न होणारे जे भाव ते" असें त्यांनीं म्हटलेलें आहे व 'भाव' शब्दाच्या अर्थाबद्दल अधिकच संशय उत्पन्न केलेला आहे ! )

हा प्रश्न बाजूला ठेवून स्थायिभाव सचेतन सृष्टीवर व अचेतन सृष्टीवर अधिष्ठित असण्यावर रस व अलंकार यांमधील भेद ठरविणें कितपत योग्य आहे हें पाहण्याचा प्रयत्न करूं या. खरें सांगावयाचें म्हणजे या बाबतींत माझें मन मला असें सांगतें कीं, केळकरांचा अर्थ मला चांगला समजला नसावा, किंवा त्यांच्या लेखनांत ढिलेपणा असावा. कारण रस हे अंतःकरणाची अवस्था सुचवितात व 'अलंकार' हे कांहीं अंतःकरणाची अवस्था सुचवीत नाहींत, ही शाब्दिक शंका सोडून दिली तरी अलंकारांपासून उत्पन्न होणारी अवस्था व रस या संज्ञेनें सूचित होणारी मनोऽवस्था ( किंवा वाटल्यास तज्जनक वाक्प्रबंध ) यांतील भेद अचेतन व सचेतनत्वावर अवलंबून कसा आहे हें कळणें कठीण आहे. कारण निर्जन अरण्य किंवा श्मशान यांच्या सरस वर्णनानें रसोत्पत्ति होऊं शकते व उलटपक्षीं सचेतनाला सचेतनाची उपमा दिली (उदाहरणार्थ विष्णुशास्त्री यांना मराठी भाषेच्या बाबतींत शिवाजीची उपमा दिली किंवा टिकळांना रामदासाची उपमा दिली ) तरी सचेतनत्वामुळें अलंकार उत्पन्न होत नाहीं असेंहि नाहीं. 'अलंकाराचे स्थायिभाव अचेतन सृष्टीवरहि अधिष्ठित असतात' या केळकरांच्या वाक्यांतील 'हि' या शब्दावर जोर दिला तरी अर्थ-समर्थनाचे बाबतींत विशेष भर पडेल असें वाटत नाहीं म्हणून, व गौण मुद्द्याचा अधिक विस्तार करणें युक्त नव्हे म्हणून, मुख्य प्रश्नाकडे वळूं या.

माझ्यामतें अलंकारांपासून जो आनंद होतो त्यांत अनेक पदार्थांचें एकाच वेळीं आकलन होतें हा एक घटक असला तरी हा घटक गौण आहे. भूगर्भशास्त्राचें किंवा रसायन शास्त्राचें किंवा कोठल्याहि शास्त्राचें अध्ययन चाललें असतां देखील अनेक पदार्थांचा एकदम आनंद घेतां येतो, पण तेथें कलात्मक आनंद नसतो, या एका उदाहरणावरून सुंदर अलंकारापासून किंवा कोणत्याहि कलात्मक वर्णनापासून जो आनंद होतो तो त्या अलंकारांच्या किंवा कलात्मक वर्णनाच्या सौंदर्यापासून होतो, आकलित पदार्थांच्या किंवा व्यक्तींच्या संख्येवर नसतो किंवा एकसमयावच्छिन्न अनुभवावर नसतो हें ध्यानांत येईल.

काव्यानंद काय किंवा कोणताहि कलात्मक अथवा सहज सौंदर्यजन्य आनंद काय, अनेक कारणांनीं उत्पन्न होत असतो. विशिष्ट वेळीं किंवा

विशिष्ट व्यक्तीच्या बाबतींत निरनिराळीं कारणें प्रधानत्वेंकरून प्रभावशाली होत असतील; पण व्यक्तिभेद, प्रसंगभेद वगैरे येथें न मानतां त्यांचा येथें थोडक्यांत निर्देश करतों.

(१) एक कारण असें कीं सहज सुंदर–किंवा कलानिर्मित सुंदर वस्तु बहुधा इन्द्रियांना सुखकर असते. फुलें, नद्या, हिरवळ हीं नयनानन्ददायक असतात. चित्रें वगैरेहि अशींच असतात. काव्यें कर्णमधुर असतात. शिवरामपंत परांजप्यांसारख्यांच्या वक्तृत्वांत (इतर गुणांबरोबर) आवाजाची माधुरी हा एक गुण असतो. गालिचा स्पर्शसुख व नयनसुख देतो. फुलें अत्तरें वगैरे घ्राणेंद्रियास सुखवितात. स्त्रियांच्या सौंदर्यानें होणाऱ्या आनंदांत नयनादि इन्द्रियांच्या संभाव्य सुखांचा अंतर्भाव थोड्याबहुत प्रमाणांत कित्येक वेळां असतोच. सुभाषित व विनोद या ग्रंथांत हास्यरसापासून कां आनंद होतो त्याचें विवेचन करतांना रुधिराभिसरण वाढतें, जीवपेशींना चालना मिळते व इन्द्रियांवरील ताण हास्यरसापासून कमी होतो इत्यादि जें विवेचन केळकरांनीं केलें आहे त्याचीहि येथें कांहीं जणांना आठवण होईल.

(२) सहजसौंदर्यजन्य आनंदाचें किंवा काव्यादिकलाजन्य आनंदाचें दुसरें एक कारण असें कीं तन्निर्मिति करणाऱ्याशीं आपली एक प्रकारची समरसता उत्पन्न होऊन त्याच्या सामर्थ्याची, बुद्धिवैभवाची, कौशल्याची, सहृदयतेची वगैरे आपणांस प्रतीति होते; व आपणांमध्यें आश्चर्य, आदर, वगैरे भावना उत्पन्न होऊन त्यांचा अलौकिक असा परिपोष होतो. अनुभव असल्यामुळें बागेतलें सुंदर फूल पाहिलें म्हणजे मोहरीहून लहान अशा बीजापासून सुसंगत आकारानें व रंगांनीं युक्त सुगन्धयुक्त फूल, काळी-माती, पाणी, हवा व प्रकाश यांशिवाय दुसऱ्या कशाचें साहाय्य न घेतां, एका रात्रीं, कोणाला न कळतां, स्तब्धपणें, खटाटोप वगैरे न करतां, उत्पन्न करणाऱ्या–एकच फूल नव्हे तर फुलें फळें वगैरे अनंतविधवस्तु अनंतकालापासून उत्पन्न करीत असलेल्या–अबुद्धिगम्य जगदात्म्याच्या अद्भुतरम्य चातुर्याचें व सामर्थ्याचें कोणाला कौतुक वाटणार नाहीं ! हुबेहुब चित्र काढणाऱ्या चितान्याचें आपण कौतुक करतों, त्याचें एक कारण हें कीं असलीं चित्रें आपणांस साधत नाहींत व आपण त्याच्या कलाकौशल्यानें चकित होतों. (आपलें कौशल्य वाढलें म्हणजे हा आनंद कमी होण्याचा संभव असतो हें ध्यानांत धरण्यासारखें आहे. कवीप्रमाणें व वक्त्यांप्रमाणें आपणांमध्यें वाक्पटुत्व नसतें हें एक त्यांच्याबद्दल आदरयुक्त प्रेम वाटण्याचें

कारण आहे. काव्याचें किंवा वक्तृत्वाचें स्वतःचें म्हणून एक सौंदर्य असतेंच व तें मुख्य कारण आहेच. पण सामर्थ्य, सहृदयत्वादि गुणांची प्रतीति हीहि कित्येक वेळां या कारणांत भर घालते हें मला म्हणावयाचें आहे.

( ३ ) कवीचा किंवा वक्त्याचा आणि आपला अनुभव जुळला व आपणांला जें पटलें होतें व जें म्हणावेंसें वाटत होतें तेंच, पण आपणांला साधणार नाहीं अशा मधुर रीतीनें, त्यानें म्हटलेलें आपण पाहिलें म्हणजे आपल्या अपेक्षासाफल्यानें आनंद होतो व आपणहि एका अर्थी कवि किंवा वक्ता यांच्याशीं ( भाषाप्रभुत्वाच्या बाबतींत नाहीं तरी ) विचारांत व भावनेंत समानधर्मे आहोंत या जाणिवेनेंहि कित्येक वेळां आनंद होतो. इंग्लिश कवि पोप यानें म्हटल्याप्रमाणें—What was oft thought but never so well expressed असें जेव्हां कवि किंवा वक्ता बोलतो तेव्हां तो लोकप्रिय होणें हें साहजिक आहे. केळकर म्हणतात कीं दुसऱ्याचा अनुभव आपलासा आपण करतों म्हणून आनंद होतो, पण आतांच्या या मीमांसेंत आपला अनुभव तोच दुसऱ्याचा—आणि आपल्यापेक्षां श्रेष्ठ असलेल्याचा—अनुभव असतो हें पाहून आत्मप्रत्ययांत व आत्माभिमानांत भर पडते आणि म्हणून आपणांस त्या काव्यापासून वगैरे आनंद होतो, असें म्हटलेलें आहे !

( ४ ) काव्यांपासून वगैरे विचारसाहचर्याच्या योगें (through association of ideas ) अनेक प्रिय किंवा सुंदर वस्तूंची आठवण होते व ही आठवण एक प्रकारचा आनंद देते, हें एक चौथें कारण. कादंबऱ्यांत, निबंधांत वगैरे उपमादि अलंकार असतात ते अर्थ विशदीकरणार्थच असतात असें नाहीं. उपमादिकांच्या द्वारें फुलें, स्त्रिया, वगैरेंची आठवण झाली तर—या वस्तु केव्हांहि प्रिय व सुंदर म्हणून ( त्यांच्याशीं सविकल्प समाधि होते म्हणून, नव्हे ) आपणांस त्यांच्या स्मृतींमुळें आनंद होतो. सुंदर वस्तूंचीच स्मृति मला विवक्षित नाहीं, तर सुंदर वचनें, विचार, भावना, प्रसंग वगैरेंची देखील स्मृति जर काव्यापासून झाली तर व तें काव्यहि रमणीय वाटण्यास हें एक कारण होऊं शकतें.

साहचर्य-नियमानें किंवा अन्य कारणानें उत्पन्न होणाऱ्या सुखद स्मृति-लहरींची आपणांस नेहमींच स्पष्ट जाणीव असतेच असें नाहीं. अबोधपूर्वहि कांहीं स्मृति असतात व त्यांना चाळना मिळाल्यामुळें मनुष्य आनंदित किंवा दुःखित होऊं शकतो हें येथें सांगितलें पाहिजे; पण त्याचा विस्तार करणें अनुचित होईल म्हणून आवरतें घेतों.

( ५ ) कोट्या वगैरे ऐकून आपणास आश्चर्य वाटतें व अपेक्षाभंगामुळेंहि आपणास आनंद होतो हें केळकरांनीं 'सुभाषित व विनोद' या पुस्तकांत दाखविलेंच आहे, तेव्हां त्याचें दिग्दर्शनच पुरे.

( ६ ) हास्यरसाच्या आनंदांत कित्येक वेळां हास्यास्पद ठरविलेल्या व्यक्तीसारखे आपण नाहीं, आपण त्याहून श्रेष्ठ आहों, या जाणिवेनें आनंद होत असतो हेंहि केळकरांनीं वरील पुस्तकांतच दाखविलें आहे.

( हास्यरसाचा विचार पुढें थोडासा अधिक करावयाचा म्हणून आहे तो येथेंच सोडून देऊं. )

(७) रम्योदात्त ( Subilme )देखावे किंवा प्रसंग पाहिले असतां किंवा त्यांचें वर्णन वाचलें असतां जो आनंद होतो त्याचें कारण कॅन्ट ( Kant ) या तत्त्ववेत्त्यानें असें दिलें आहे कीं हे रम्योदात्त देखावे व प्रसंग कितीहि सामर्थ्य-सूचक असले व त्यांपासून आपाततः भीति उत्पन्न होण्यासारखी असली तरी आनंद होतो याचें कारण असें कीं सृष्टीच्या प्रचण्ड शक्तीहून आपली नैतिक शक्ति प्रचण्डतर व प्रबलतर आहे अशी जाणीव तेथें उत्पन्न होत असते व या आत्माभिमानपोषक व आत्मप्रत्ययवर्धक जाणिवेपासून आनंद होत असतो. मुसळधार पावसांत रेन-कोट, व बूट वगैरे घालून ऐटीनें व निर्धास्तपणें चालण्यांत जो आनंद होतो तो अशाच जातीचा असतो, पण क्षुद्र क्षेत्रांत व क्षुद्र प्रमाणाचा, असतो एवढेंच !

( ८ ) शोकरसोद्भव आनंदाचा विचार करूं लागल्यास आणखी अशाच उपपत्ति सांपडतील; पण त्या सर्वांचा विचार न करतां सहजसौंदर्यजन्य व कला-सौंदर्यजन्य आनंदामधील आणखी एका घटकाचा विचार करूं या. हा घटक असा कीं हरतऱ्हेच्या वस्तूंत, देखाव्यांत, प्रसंगांत, वगैरे जें एखादें सत्य, सौंदर्य, रम्यत्व किंवा उदात्तत्व वास करीत असतें पण जें सामान्य लोकांना कळत नाहीं, तें प्रतिभावान् चित्रकार, कवि, लेखक वगैरे आपआपल्या कलाकृतींच्या द्वारें इतरांस प्रतीत करून देतात. थोर पुरुषांच्या आपत्तींत, शूर योद्ध्यांच्या मरणांत, विधवांच्या विलापांत, ( होय, विलापांत ) जें ध्येयादित्यजन्य रम्यत्व आहे त्याचा प्रत्यय कवींनी वगैरे आणून दिला म्हणजे आपणांस आनंद होतो. हें कबूल करणें म्हणजे 'सविकल्पसमाधी'-मुळें आनंद होतो ही केळकरांची उपपत्ति मान्य करण्यासारखेंच दिसतें आणि मी विरोधाकरितांच विरोध करीत आहें असें कांहीं लोकांना वाटेल; पण तसें नाहीं. जें रम्यत्व, उदात्तत्व वगैरे आपणांस सामान्यतः दिसत नाहीं त्याचा

प्रत्यय आपली भूमिका न सोडतां आपणांस आला म्हणजे काव्यानंद, कलानंद वगैरेची उपलब्धि होते असें मी म्हणत आहें. पण केळकरांच्या उपपत्तींत रम्यत्वादि गुणांना आवश्यक स्थान दिलेलें नाहीं. मी आपली भूमिका न सोडतां मला कविसामर्थ्यानें हिमालयदर्शनाचा लाभ झाला तर आनंद आहे, एखाद्या शेतखान्याचें किंवा उकिरड्याचें किंवा स्मशानाचें प्रत्यक्ष, किंवा काव्यवाचनाच्या द्वारें अप्रत्यक्ष दर्शन झाल्यामुळें आनंद होणार नाहीं हें उघड आहे. हां, शेतखान्याचें वगैरे वर्णन देखील एखादवेळेस आनंद देईल,—जर तें रम्य असेल तर. भूमिका न सोडतां मला रम्य देखाव्याशीं एका अर्थी समरस होतां आलें यामुळें आनंद झाला तर त्यांत समरसत्वाचें अंग आहेच आहे, पण रम्यत्व असलेलें वर्णन हें आनंदाचें प्रधान कारण आहे. भूमिकेचा आधिभौतिक अर्थ न घेतां 'स्व'त्वाची भूमिका हा जो केळकरांचा विवक्षित अर्थ त्या अर्थाच्या दृष्टीनें विचार करावयाचा म्हणजे 'स्व'-त्व न गमावतां मी जर शाकुन्तलामधील कण्व. किंवा रघुवंशांतील अज किंवा मुक्तेश्वराच्या महाभारतांतील पांडव यांशीं समरस झालों तर आनंद होईल. एखाद्या विदूषकाशीं किंवा शिखंडीशीं समरसत्व पावून होणार नाहीं. तो देखील होईल; केव्हां? तर कवीनें त्यांचे विनोदाच्या वगैरे द्वारें रम्य स्वभावविशेष दाखविले असतील तेव्हां आणि अशा प्रसंगीं जो आनंद होईल तो वर्णनाच्या रीतीची प्रतीति असल्यामुळें किंवा असल्या प्रसंगांत सुप्त गुप्त असलेल्या रम्यत्वाची प्रतीति असल्यामुळें आनंद होईल. केळकरांचा असाच अर्थ असेल तर मतभेदच नाहीं. पण असा अर्थ असावा असें वाटत नाहीं.

माझ्या म्हणण्याचा एकंदरींत रोख असा आहे कीं, वस्तुगत रम्यत्व-उदात्तत्वादि गुणांमध्यें ( किंवा कांटेकोरपणें बोलावयाचें म्हणजे त्यांच्या प्रतीतींत आनंददायकत्व आहे व हें आनंददायकत्व उपरिनिर्दिष्ट अनेक रीतींनीं होत असतें. या आनंदांत सविकल्प समरसत्व असतेंच; पण त्याला भलतेंच महत्त्व न देतां वस्तुगत किंवा वर्णनगत रम्यत्वास व इतर कारणांस योग्य महत्त्व दिलें जाईल अशी उपपत्ति असेल तरच ती पूर्णपणें मान्य होईल, नाहींतर ती एकांगी, अतएव अमान्य, होईल.

सौंदर्यविषयक आनंदाची मीमांसा करतांना एका घटकाचा मात्र अवश्यमेव उल्लेख केला पाहिजे. त्याला नांव कांहीं देतां येत नाहीं, कारण तो अनिर्वचनीय आहे. सौंदर्याची कितीही जरी मीमांसा केली तरी त्यांत कांहीं तरी अनिर्देश्य असा भाग राहतोच, त्याचप्रमाणें सौंदर्यजन्य आनंदाचेंहि आहे.

मनुष्यानें पृथक्करण करावें, चर्चा करावी, वादविवाद करावा, पण अखेर काव्यादिकांच्या सौंदर्यांत व तज्जन्य आनंदांत कांहीं तरी शब्दातीत व केवळ हृदयसंवेद्य असें असतें हेंहि कबूल करावें. एखादी वस्तु किंवा एखादी व्यक्ति आपणांस प्रिय होते व आनंद देते त्यांत कांहीं तरी शब्दांच्या व विचारांच्या कक्षेबाहेरील असा ' आन्तर हेतु ' असतो—

व्यतिषजति पदार्थानान्तरः कोऽपि हेतुः ।
न खलु बहिरुपाधीन् प्रीतयः संश्रयन्ते ॥

—हें तत्त्व, पृथक्करणात्मक मीमांसेचा प्रयत्न किंवा तद्विषयक उत्साह कमी होऊं न देतां ध्यानांत धरणें आवश्यक आहे. आपल्या अपूर्णावस्थेंतलीच अर्थात् ही असमाधानकारक स्थिति आहे. पूर्णावस्थेंत पूर्ण ज्ञान होऊन पूर्ण आनंदाचा अनुपम उपभोग घेण्यास सांपडेल; तोंपर्यंत आपल्या मीमांसेची मर्यादा ओळखलेली बरी.

वर उल्लेखिलेल्या निर्वचनीय व अनिर्वचनीय अशा उभयविध काव्यानंदकारणांचा उल्लेख न करतां केवळ सविकल्प समाधीचाच उल्लेख करणें हें मला सदोष वाटतें. कारण या उपपत्तींत एका आवश्यक अंगाचा जरी उल्लेख केलेला असला तरी दुसऱ्या व अधिक महत्त्वाच्या अंगांकडे दुर्लक्ष केलें गेलें आहे. काव्यानंदात्मक जो अलौकिक अनुभव आहे तो संमिश्रस्वरूपाचा आहे. त्यांत 'स्व'चें ज्ञान असतें, 'स्व' पूर्णपणें लुप्त होत नाहीं, हें केळकरांनीं दाखविलें आहे, तें बरोबरच आहे. त्याचप्रमाणें त्यांत आपली भूमिका न सोडतां दुसऱ्या व्यक्तींशीं तादात्म्य होतें किंवा दुसऱ्या अनेक वस्तूंचें आकलन होतें आणि हें तादात्म्य किंवा आकलन जितकें व्यक्ति-समावेशक किंवा वस्तु-समावेशक होईल तितका काव्यानंद अधिक, हेंहि मान्य करण्यासारखें आहे. काव्यानन्दानुभवांत वर दर्शविल्याप्रमाणें इन्द्रियसुखास्वाद, आत्माभिमानाचा उत्कर्ष, आत्मसामर्थ्यप्रतीति, परसामर्थ्यप्रतीतीमुळें उत्पन्न होणारें आदरयुक्त कौतुक, साहचर्यनियमांमुळें उत्पन्न होणाऱ्या बोधपूर्व किंवा अबोधपूर्व सुखकर आठवणी, सामान्यतः ध्यानांत न येणारें अशा वस्तुनिष्ठ किंवा प्रसंगनिष्ठ गूढ किंवा गहन सत्त्याचें, सौंदर्याचें, श्रीमत्त्वाचें, ऊर्जितत्वाचें, उदात्तत्वाचें वगैरे ज्ञान होऊन तें पटल्यामुळें मनाला येणारी सात्त्विक प्रसन्नता, इत्यादि अनेक गुंतागुंतीचे धागे म्हणा, पापुद्रे म्हणा, किंवा अंगें म्हणा, असून केवळ स्वप्रतीतिपूर्वक परव्यक्तीशीं तादात्म्य पावण्यासच महत्त्व देणें हें गैरसमज उत्पन्न करणारें आहे, म्हणून मी त्याला विरोध करतों.

विरोध करण्याचें आणखी एक व अधिक महत्त्वाचें कारण असें कीं, आपण कित्येक वेळीं काव्यांतील नाटकांतील वगैरे कोणत्याहि एखाद्या व्यक्तीशीं किंवा सर्व व्यक्तीशीं तादात्म्य पावतों असें म्हणण्यापेक्षां त्यांतील कोणत्याहि व्यक्तींशीं तादात्म्य न पावतां सर्वांकडे एका विशिष्ट अशा दृष्टीनें पाहत असतों असें म्हणणें वस्तुस्थितीस अधिक धरून होईल.

उदाहरणार्थ, मुंबई विश्वविद्यालयाच्या एका परीक्षेला मी परीक्षक आहें अशी कल्पना करा व शेजारीं राहाणारा एक मुलगा पास झाला आहे व हें मला ठाऊक आहे अशी कल्पना करा. त्या मुलाची मुंबईहून तार न आल्यामुळें तो रडत आहे, त्याची आई दुःखीकष्टी झालेली आहे, त्याचे शत्रु मनांत आनंद पावत आहेत अशी आणखी कल्पना करा. परीक्षेचा निकाल ठाऊक असून हें सर्व मी निमूटपणें पहात आहें व कांहीं एक न बोलतां व सूचक शब्दांनीं वगैरे न सुचवितां मी स्वस्थ बसलों आहें अशीहि एक कल्पना करा (ही मात्र कदाचित् माझ्या ओळखीच्या माणसांना मोठी बिकट कल्पना वाटेल!)—तर अशा वेळीं मला एक प्रकारची मौज वाटेल आणि (मी सहानुभूतिशून्य आहें असें मानलें तर) आनंदहि होईल. अशा वेळीं मी त्या नापास झालों म्हणून समजणाऱ्या मुलाशीं किंवा त्याच्या आईशीं किंवा त्याच्या शत्रूशीं तादात्म्य पावलों म्हणून मौज किंवा आनंद वाटणार नाहीं, तर त्या देखाव्यांतील विपरीतत्व पाहून मला आनंद वाटेल. या उदाहरणापेक्षां ज्याला नाट्योचित गूढार्थित्व (Dramatic irony) म्हणतात, तसला एखादा प्रसंग डोळ्यांपुढें आणा. एखाद्या नायिकेनें कांहीं कारणास्तव पुरुषाचा पोषाख धारण केलेला आहे व नायकानें बुरखा घेतलेल्या स्त्रीचा पोषाख घेतला आहे आणि उभयतांना हें रूपान्तर ठाऊक नाहीं अशा स्थितींत त्यांचा जो संवाद होईल त्यांत असा पुष्कळ भाग आणतां येईल कीं, त्यापासून खरी वस्तुस्थिति जाणणाऱ्या प्रेक्षकांना हास्यरसजन्य आनंद होईल; पण त्या नायकनायिकांना तो संवाद भीति उत्पन्न करणारा किंवा शोकात्मक होईल. अशा प्रसंगीं प्रेक्षक त्या कोणाशींच समरस होत नाहीं व म्हणूनच तिऱ्हाइत प्रेक्षकाच्या दृष्टीनें पाहाण्यापासून जो आनंद व्हावयाचा तो त्याला होतो.

अशा प्रसंगीं सविकार समाधीची उपपत्ति डळमळूं लागते. आतां नायक-नायिकांचे हृद्गत जाणण्याकरितां प्रेक्षकाचें तादात्म्य झालेंच पाहिजे असें कोणी म्हणेल, पण हें जरी खरें असलें तरी आनंद तादात्म्यानुभावपेक्षां प्रेक्षकोचित बाह्य दृष्टीनें पाहण्यामध्येंच आहे. यावर कोणी म्हणेल कीं, असला

देखावा वर्णन करणाऱ्या नाटककाराच्या मनोऽवस्थेशीं प्रेक्षकाचें समरसत्व होतें, तर त्याला एक उत्तर एवढेंच देतां येईल कीं केळकरांनाच स्वसमर्थनाचा हा मार्ग पसंत आहे का नाहीं याबद्दल शंका आहे. दुसरें असें कीं नाटककाराशीं जरी तादात्म्य मानलें तरी या तादात्म्यस्वरूपी अनुभवामध्यें काव्यानंदजनक असें महत्त्वाचें अंग कोणतें हें पाहिलें पाहिजे आणि तें केवळ 'तादात्म्य' या शब्दानें दिग्दर्शित होतें कीं काय तें ठरविलें पाहिजे*. हपूस अंब्यापासून आनंद कां होतो तर जिव्हेचें हपूस अंब्याच्या रसाशीं तादात्म्य होतें हें म्हणणें खरें आहे; (कारण जिभेला रस लागल्याशिवाय चव कशी कळणार?) पण हपूसचा स्वाद, गोडी, तंतुरहितत्व इत्यादि गुणांचा उल्लेख न करतां सविकल्प जिव्हातादात्म्य हें आम्ररसानंदाचें कारण सांगितलें तर तें जितकें खरें आहे व सदोषहि आहे तितकेंच सविकल्प समाधीचें काव्यानन्दविषयक तत्त्व खरें व सदोषहि आहे.

आतां कोणी म्हणेल कीं, "तादात्म्य तेथें असतेंच ना, आणि या तादात्म्यांत तुम्ही म्हणतां त्या सर्व अनुभवांचा अंतर्भाव होत नाहीं काय?"– तर यावर असें उत्तर कीं, काव्यानन्दाचें कारण सांगतांना 'काव्यानंद होईल अशा प्रकारच्या सर्व अनुभवांशीं तादात्म्य किंवा समाधि' असें जर उत्तर दिलें तर तें खरें आहे. पण 'अश्व म्हणजे घोडा' किंवा 'अफूपासून झोंप येते तर त्यांत झोंप आणण्याचा गुण आहे' अशा प्रकारचें हें शब्दार्थसत्य किंवा द्विरुक्तिसत्य आहे त्यांत नवीन कांहींच नाहीं. आतां वरील कारणांतील तादात्म्याला सविकल्प हें विशेषण जर लावलें तर मात्र त्यांत कांहीं विशेष सांगितल्यासारखें होईल आणि हा विशेषच केळकरांच्या उपपत्तीचा सत्यांशरूपानें राहील. बाकी 'समाधि' ही एखाद्या फिरकोळ संन्याशाच्या समाधीप्रमाणें नाममात्रेंकरूनच पूज्य राहील!

## हास्यरसमीमांसा

हास्यरसाची केळकरांनीं जी मीमांसा केली आहे तिचा आतां विचार करूं या. ही मीमांसा वर थोडीबहुत आलीच आहे, व ती ज्या पुस्तकांत केळकरांनीं केली आहे त्या 'सुभाषित व विनोद' या पुस्तकाचेहि उल्लेख आलेलेच आहेत. हें पुस्तक हरतऱ्हेच्या कोटयांच्या, सुभाषितांच्या विनोदी

*टीपः—तादात्म्य नटाशीं, नाटकांतील पात्राशीं, का तत्सूचित सामान्य व्यक्तीशीं का दुसऱ्या कोणाशीं याचा विचार आपल्या इकडील साहित्यशास्त्रांत भट्टोद्भट, भट लोल्लट, अभिनवगुप्त इत्यादींनीं केलेला आहे तो येथें द्यावासा वाटतो, पण विस्तारभयास्तव देत नाहीं.

वचनांच्या उदाहरणांनीं भरलेलें आहे, अर्थात् तें अनेकांच्या आनंदास कारणीभूत झालेलें आहे. पण हा त्याचा विशेष नव्हे. त्यांत हास्यरसाबद्दल जी अनेक दृष्टींनीं चर्चा केलेली आहे ती फार महत्त्वाची आहे. तींत केळकरांचे बहुश्रुतपणा, मार्मिकपणा वगैरे गुण दिसून येतात. भाषेचें मात्र सौंदर्य जितकें दिसावें तितकें दिसत नाहीं. (अर्थात् केळकरांनीं तदनंतर लिहिलेल्या लेखांत व पुस्तकांत जितकें दिसतें त्या मानानें येथें दिसत नाहीं असें म्हणावयाचें आहे,—इतर अनेक लेखकांच्या मानानें तें कितीतरी पटीनें येथें दिसतें.) आरंभीं-आरंभींचें लेखन म्हणून म्हणा किंवा विचारांची एक सुंदरशी घडी त्यावेळीं बसलेली नव्हती म्हणून म्हणा किंवा लेखनास कालावधि पुरेसा न मिळाल्यामुळें म्हणा, हें पुस्तक म्हणजे अनेक सुंदर व मौल्यवान् वस्तूंनीं भरलेल्या अव्यवस्थित दिवाणखान्यासारखें झालें आहे. हास्यरसाविषयींची अनेकदृष्टींनीं अनेकांनीं केलेली मीमांसा यांत पाहण्यास मिळते; पण एका हातचें चित्र किंवा काव्य जसें सुसंघटित दिसतें व त्याचीं अनेक अंगें जशीं अन्योन्याश्रयी व परस्परपोषक दिसतात तसें यांत झालेलें नाहीं. परिणतप्रज्ञ झालेले नसतांना केळकरांनीं हें पुस्तक लिहिलेलें आहे याचें एक उदाहरण—'भाव' शब्दाच्या लक्षणाबद्दलचें—मागें दिलेलेंच आहे. पान. ११ वर 'गुण' शब्दाचा उपयोग त्यांनीं अशाच ढिलेपणानें केलेला आहे. 'गुण हे रसाचे धर्म आहेत' असें प्रथम म्हणून "ज्या शब्दार्थगुणामुळें अन्तःकरण द्रवीभूत होतें तो गुण माधुर्य होय" असें ते सांगतात व यांत विसंगति आहे हें ते क्षणभर विसरतात. अशा प्रकारचा ढिलेपणा क्वचित् प्रसंगींच आहे, पण तो आहे. आल्हाददायक उपमा, समर्पक दाखले वगैरे केळकरांच्या कोणत्याहि लिखाणांत यावयाचेच. कारण ही त्यांना ईश्वरदत्त देणगीच आहे, पण या ग्रंथाचें ग्रथन शिथिल असल्यामुळें व विचारांत निश्चिततेचें व आत्मप्रत्ययाचें तेज नसल्यामुळें या उपमादिकांचें जेवढें तेज पडावें तेवढें पडत नाहीं.

असो. या पुस्तकाबद्दल सामान्यविवेचन अधिक न करतां अन्तरंगाकडे वळूं या.

केळकरांनीं प्रथम सुभाषित, कोटि, Wit, Humour, इत्यादि शब्दांचा अर्थ निरनिराळ्या ग्रंथकारांचीं मतें व उदाहरणें देऊन निश्चित करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांच्या मतें परिभाषेची सध्यांची अनिश्चितता ध्यानांत घेऊन पुढील समीकरण मान्य करण्यांत यावें.

Wit and Humour = सुभाषित (हास्यरसोत्पादक शब्दप्रबंध)

Humour = विनोद (वचन) Wit = कोटि, वैदग्ध्य

पान १६ वर ते म्हणतात कीं संस्कृतांतील 'विनोद' हा शब्द उभयार्थ-व्यंजक असा असल्यामुळें तो कोटि, चतुरालाप, विनोदवचन या सर्वांवर व्याप्ति असणारा, जातिवाचक असा आम्हीं योजिला आहे. मग कोटीहून भिन्न असलेला जो विनोद त्याला शब्द कोणता? मला वाटतें जातिवाचक शब्द 'सुभाषित' व त्याच्या एका अंगाला विनोद आणि दुसऱ्या अंगाला 'कोटि' म्हणावें. वरील समीकरणावरून ह्याच बोध प्रथमदर्शनीं होतो. पण पान १६ वरील वाक्यानें संदिग्धता उत्पन्न झाली आहे. त्यांतली खरी गोष्ट अशी आहे कीं, इंग्लिशमध्यें ज्याप्रमाणें Wit, Humour हे शब्द निरनिराळ्या लोकांनीं निरनिराळ्या अर्थानीं पूर्वी वापरले त्याप्रमाणें मराठीची सध्यांची स्थिति आहे. कालांतरानेंच परिभाषा निश्चित होईल. तोंपर्यंत केळकरांनीं प्रयत्न करून ठरविलेल्या स्वरूपांचा विचार करूं या.

"निरनिराळ्या वस्तूंमधील चमत्कारिक व अनपेक्षित असे संबंध जोडून दाखविणें" असें म्हटलें असतां कोटि किंवा चतुरालाप यांची थोडक्यांत व्याख्या झाली. संबंधाचें अनपेक्षितत्व किंवा चमत्कारिकपणा हा कोटीचा आत्मा आहे. कोटीचा संबंध बुद्धिशक्तीशीं आहे व विनोदाचा संबंध हृदयभावाशीं आहे. कोटि चांगल्या रीतीनें करतां येण्यास बुद्धि प्रगल्भ व संस्कृत असावी लागते. विनोद हा अशिक्षित मनुष्यहि करूं शकतात. कोटीमध्यें नुसतें असंबद्धतादर्शनच नसतें, तर त्या असंबद्धतेचें स्वरूप नवीन कल्पना रचून व्यक्त करावें लागतें. विनोदास नवीन कल्पना अशी रचावयास लागत नाहीं तर त्या असंबद्ध स्थितीचेंच यथार्थ वर्णन दुसऱ्याचें लक्ष वेधेल अशा रीतीनें दिलें म्हणजे झालें."

कोटि व विनोद यांमधील भेदाचें वगैरे विवेचन केळकरांनीं जें उदाहरणें देऊन सुंदर रीतीनें केलें आहे, त्यांत भर घालण्याचा प्रयत्न करणें म्हणजे दिवाळींत विजेच्या दिव्यांनीं, आकाश–कंदिलांनीं वगैरे शृंगारलेल्या वाड्यांत आपल्या घरची पणती नेवून लावल्यासारखें व स्वतःमध्यें विनोदबुद्धि नाहीं हें दाखविण्यासारखें आहे. शिवाय विस्तारहि फार झालेला आहे. तेव्हां एक दोन गोष्टींचाच उल्लेख करतों. एक क्षुल्लक गोष्ट अशी कीं, इंग्लिशमधील wit म्हणजे कोटि करण्याची शक्ति किंवा वैदग्ध्य, कोटि नव्हे; कोटीला witty remark किंवा witticism म्हणावें. (witticism) हा शब्द बहुधा निन्दाव्यंजक असतो हें ध्यानांत ठेवावें. महत्त्वाचा मुद्दा कीं, विनोदाचे मृदु; मधुर, कटु, तीव्र, तीक्ष्ण असे अनेक भेद आहेत. त्या प्रत्येकाला जन्म देणाऱ्या बुद्धीचे विशेष (१) विनोदाचा हेतु, (२) त्याचें

क्षेत्र, (३) त्याचे मार्ग अथवा त्याचीं साधनें व (४) त्याचा श्रोतृवर्ग या चार दृष्टींनीं ध्यानांत धरले पाहिजेत. यासंबंधीं अधिक विवेचन न करतां फौलर (Fowler) या कोशकारानें Modern English Usage या कोशग्रंथांत कोष्टकाच्या रूपानें जें थोडक्यांत पण मार्मिक विवेचन केलें आहे तें दिलें म्हणजे माझे श्रम वांचून विस्ताराचें भय रहाणार नाहीं!

| | हेतु | क्षेत्र | मार्ग व साधनें | श्रोतृवर्ग |
|---|---|---|---|---|
| १ विनोद Humour | शोध | मानवी स्वभाव | निरीक्षण | सहानुभूति असलेले लोक |
| २ कोटित्व (Wit) | अर्थप्रकाशन करणें, दीपिका-दर्शन | शब्द व कल्पना | आश्चर्य-चकितता | विदग्ध (चतुर) लोक |
| ३ उपहास (Satire) | सुधारणा | नीति अनीति व चालीरीति | विशेषातिशय करणें (Accentuation) | स्वयंसंतुष्ट (The self-satisfied) |
| ४ उपरोध (Sarcasm) | दुःख देणें | दोष व व्यंगें | उलट बोलणें Inversion | आघातविपर्यभूत व प्रेक्षक लोक |
| ५ गालिप्रदान (Invective) | अकीर्ति किंवा यशोहानि करणें | गैरवर्तन | सरळ विधान | ऐकणारे सर्व-लोक |
| ६ गूढार्थत्व (Irony) (Ironical-Speech = गूढोक्ति) | विशिष्टवर्गाबरलच आपलेपणा दाखविणें (Exclusiveness) | वस्तुस्थिति-दर्शन | गूढताविर्भाव (Mystification) | आपल्या पुढ्यांतली मंडळी, अंतर्मंडळ (An inner circle) |
| ७ आदरशून्यत्व (Cynicism) | आत्मसमर्थन | नीतिमत्ता | लज्जापरित्याग करून आड-पडदा न ठेवतां सत्याचें वस्त्र-हरण करणें | स्वयंप्रतिष्ठित 'शिष्ट' लोक (The respectable) |
| ८ कटुहास्य (The sardonic) | पोटांतलें विष ओकून टाकून मोकळें होणें | आपत्ति | निराशा-क्रान्तता | स्वतः |

हास्यरसाचें विवेचन करतांना केळकरांनीं हास्यास्पद व हास्योत्पादक गोष्टींमध्यें जो फरक दाखविला आहे तो महत्त्वाचा व मननीय आहे. त्याचप्रमाणें शाब्दिक विनोद हा विनोद आहे, पण तो प्रसंगनिष्ठ विनोदापेक्षां हलक्या दर्जाचा आहे असें केळकर म्हणतात तें घ्यानांत धरण्यासारखें आहे. त्याचप्रमाणें केवळ आत्यन्तिक अतिशयोक्तीवर आधारलेला विनोदहि खालच्या पायरीचाच आहे हेंहि त्यांचें म्हणणें हल्लींच्या विनोदी लेखकांनीं मनन करण्यासारखें आहे. विनोद करणाऱ्याच्या मनांत कटुता, द्वेष, तिरस्कार, गर्व वगैरे असल्यास त्याच्या विनोदाचें स्वरूप सात्त्विक व उच्चतम राहूं शकत नाहीं हें, तसेंच विनोदबुद्धीमध्यें अनेक रंगांचे व अनेक प्रकारचे पापुद्रे असतात आणि ती संमिश्र स्वरूपाची आहे हें, केळकरांनीं ओळखलें आहे व पुढील अत्यंत मार्मिक वाक्यांत तें थोडक्यांत दिग्दर्शित केलें आहे. ते म्हणतातः “ विनोदी हास्य ऐकतांच त्या हांसणाराच्या मनांत शांतता, खेळकरपणा, आनंद, सहिष्णुता, विचारीपणा, सात्त्विकपणा, उदारभाव व ममता इत्यादि सर्व किंवा यांतील कांहीं तरी भाव मुख्यत्वेंकरून वसत आहेत अशी ऐकणाराच्या मनाची खात्री होते व विनोदाच्या अनेक विभावांच्या जाति लक्षांत घेतल्या असतां खऱ्या व अस्सल विनोदी माणसांत हे वर सांगितलेले गुणच असले पाहिजेत हें कळून येणारें आहे.” ‘खरे व अस्सल’ विनोदी लेख नसतील त्यांच्या विनोदांत तिखटपणा, अंबटपणा, बोचकपणा असतो. ‘विनोद’ या सदरांत जरी त्याची गणना केलीच पाहिजे तरी तो सात्त्विक व उच्चतम (किंवा केळकरांच्या भाषेंत ‘खरा व अस्सल’) नाहीं हें विसरून चालावयाचें नाहीं. गडकऱ्यांच्या विनोदांतील कोटया लोकांच्या घ्यानांत राहतात, पण त्यांचा खरा अस्सल विनोद धुंडिराजपंतांविषयींच्या विनोदांत दिसून येतो. हास्यामध्यें अनेक प्रकार आहेत, त्याचें विस्तारानें वर्णन करण्याचें कारण नाहीं; एवढें मात्र सांगितलें पाहिजे कीं, उच्चतम हास्य जें आहे त्यास द्वेषाचा वगैरे संस्पर्श होऊन तें दूषित झालेलें नसतें, तर तें प्रेमगर्भ असतें. ‘शांतता, खेळकरपणा, आनंद, सहिष्णुता, औदार्य,’ इत्यादि केळकरांनीं सांगितलेल्या उच्च मनोवस्था त्याच्या मुळाशीं असल्यामुळें तो सात्त्विक लोकांना रुचतो, व समाजोपकारक होतो. खऱ्या विनोदाचें थोडक्यांत लक्षण करावयास मला कोणीं सांगितलें तर मी ‘हास्योत्पादक गोष्टींचें प्रेमगर्भ व खेळकर वृत्तीचें चिंतन’ असें करीन.

या दृष्टीनें पाहतां केळकरांनीं पान १२८ मध्यें हॉब्स (Hobbes)

याची 'लाघवी'–संज्ञक जी हास्यमीमांसा दिली आहे ती एकांगी आहे हें ध्यानांत येईल. "हॉब्स याचें म्हणणें असें आहे कीं, आपल्याला जें हंसूं येतें तें आपल्या मनांत पर–सापेक्ष अशा श्रेष्ठपणाची कल्पना एकदम येऊन क्षणिक अहंकारवैभव प्रकट होतें त्यामुळें होय." दुसऱ्याची कुचेष्टा करून स्वतःची प्रतिष्ठा स्वतःजवळ वाढवून घेणें हेंच विनोदाचें रहस्य होय, अशा रीतीनें हॉब्सचें म्हणणें थोडक्यांत मांडतां येईल. हें मत केळकरांना पसंत नाहीं, हें वरील विवेचनावरून दिसून येईलच, पण त्यांतील चुकी जितक्या स्पष्टतेनें दाखवावयास पाहिजे होती व 'खऱ्या व अस्सल' विनोदाची मांडणी जितक्या उठावदार रीतीनें करावयास पाहिजे होती तितकी केळकरांनीं केलेली नाहीं, हें कबूल केलें पाहिजे.

केळकरांनीं हास्याबद्दल इंद्रियविज्ञानशास्त्रदृष्ट्या व इतर दृष्टींनीं जें विवेचन केलें आहे, त्याचप्रमाणें विनोदबुद्धीचा व्यावहारिक उपयोग, हास्यविनोदाच्या व्यावहारिक मर्यादा, इत्यादि अनेक मनोरंजक प्रश्नांसंबंधीं विवेचन केलेलें आहे. त्यांतील कांहीं भागांतले उतारे या पुस्तकांत भा. २ पृ. ४३–९२ वर घेतले असल्यामुळें व लेख लांबवावयाचा तरी किती असें वाटल्यामुळें लेखणी आवरतों. संस्कृतीच्या वाढीबरोबर काव्य मागें पडतें कीं काय, यासंबंधीं व इतर साहित्यविषयक प्रश्नांसंबंधीं, त्याचप्रमाणें त्यांच्या अनेक ग्रंथपरीक्षणांत उद्भूत झालेले जे अनेक प्रश्न उत्पन्न झालेले आहेत, त्यासंबंधानें उल्लेखहि न करतां त्यांची रजा घेतों. पण रजा घेण्यापूर्वी परीक्षणकार या नात्यानें त्यांच्याबद्दल माझ्या ज्या प्रेमाच्या तक्रारी आहेत त्या सांगतों. पहिली तक्रार अशी कीं, ते फारच समतोलबुद्धीनें लिहितात, एकांगित्व किंवा आत्यंतिकत्व त्यांत नसतें, आणि म्हणून परीक्षणकाराचें काम अवघड होतें ! प्रतिपक्षीयाला जेवढें कांहीं म्हणतां येण्यासारखें आहे तें सगळें केळकर आधींच म्हणून टाकतात आणि टीकाकाराला टीका करण्यास फारशी जागा ठेवीत नाहींत. याचें एक गमक म्हणजे त्यांच्या भाषाशैलीचा एक लहानसा विशेष सांगतां येईल. त्यांचीं पुष्कळशीं वाक्यें 'अमुक झालें तरी' 'अमका झाला तरी' 'अमुक असलें तरी' अशा तऱ्हेनें आरंभ केलेलीं असतात. एका पुस्तकांत सहजगत्या माझ्या ध्यानांत आलें कीं, एका पानांत सात आठ वेळां 'झालें तरी' 'झाला तरी' हे शब्द आले आहेत. पण तें पान आतां सांपडत नाहीं. पण त्यांचें कोणतेंहि पुस्तक व कोणतेंहि पान उघडलें तरी हा विशेष माझ्या ध्यानांत येतो व इतरांच्याहि ध्यानांत आला असेल किंवा येईल असें

वाटतें. गडयाला अंगावर घेऊन त्याला फेंकून देण्यांत ते फार कुशल आहेत. हें कौशल्य त्यांच्या स्वभावविशेषामुळें आलेलें आहे. समतोलपणानें, सारासार विवेक करून, सहानुभूतीनें, किंबहुना औदार्यपूर्वक दुसऱ्याकडे पहावयाचें, व आपल्याप्रमाणेंच त्याचीहि एक विशेष दृष्टि असेलच आणि त्या दृष्टीनें त्याचेंहि बरोबरच असेल ही जाणीव नेहमीं मनांत असावयाची, आणि दोष दिसले तर होतां होईतों हलक्या हातानें दाखवावयाचे, हा त्यांचा स्वभावविशेष आहे. हा विशेष त्यांच्या टीकाकाराला फार नडतो!

माझी दुसरी तक्रार अशी कीं, ते उपमा, दाखले वगैरे इतके चांगले देतात आणि भाषा अशी सजवतात कीं, टीकाविषयीभूत लेख टीकार्थ वाचीत असतां त्यांकडेच लक्ष जातें आणि त्यांतच रममाण होऊं पहातें!

पण या क्षुल्लक तक्रारी सांगितल्यानंतर इतकें विविध, इतकें विद्वत्वपूर्ण आणि विनोदादि गुणसंपन्न टीकात्मक वाङ्मय लिहिणाऱ्याचें आदरयुक्त व सविस्मय कौतुक जें वाटतें तें व्यक्त केल्याशिवाय मात्र राहवत नाहीं. केळकर केवळ साहित्यचर्चा करणार असते तरी देखील मराठी वाङ्मयांत उच्च स्थान पटकावते; मग केवळ रसज्ञ व विविधांगी टीकाकारच नव्हे तर संपादक नाटककार, लघुकथालेखक, नर्मटीकालेखक, ग्रंथपरीक्षक, चरित्रकार, इतिहासमधुग्रहणपटु, या नात्यानें त्यांच्याकडे पाहूं लागल्यावर पुनः हेच केळकर राजकारणव्यापृत, अनेकविध–परकार्य–निरत, देश–काल–वर्तमान–ज्ञाते असून त्यांच्यामध्यें सुधारणानुकूल स्वधर्माभिमान आहे, विवेकयुक्त देशाभिमान आहे, ध्येय वादित्व आहे, व्यवहारज्ञता आहे. हें सगळें ध्यानांत घेतल्यावर त्यांच्या असामान्य अष्टपैलूपणाबद्दल महाराष्ट्राला व बृहन्महाराष्ट्राला जो प्रेमयुक्त आदर वाटतो तो अत्यंत यथार्थ आहे याची प्रतीति येते. असा थोर पुरुष आतां परिणतप्रज्ञ झाला आहे, त्याच्या हातून महाराष्ट्राची आणि बृहन्महाराष्ट्राचीच नव्हे, तर अखिल भरतभूमीची अधिकाधिक सेवा घडो आणि त्याच्या सद्यशांत भर पडो एवढी इच्छा व्यक्त करून हा लांबलेला लेख संपवितों.

# २. श्रीयुत केळकर यांचे स्फुट निबंध

( श्री. दत्तात्रय केशव केळकर, बी. ए., पांचगणी )

केळकरांचें स्फुट व प्रासंगिक लिखाण हें त्यांच्या टिळकचरित्र, मराठे-इंग्रज, सुभाषित-विनोद-वगैरे सुप्रसिद्ध ग्रंथांपेक्षां पुष्कळच विस्तीर्ण आहे. टिळकचरित्र, मराठे-इंग्रज, सुभाषितविनोद, नाटयगुच्छ हीं केळकरी सृष्टींतील प्रमुख प्रेक्षणीय स्थळें होत. अवघ्या चार आठ दिवसांत अखिल हिंदुस्थान दृष्टीखालीं घालूं पाहणारा मुशाफरहि, दक्षिणेंतील प्रचंड देवालयें, उत्तरेंतील ताजमहाल, कुतुबमिनार व अजूच्या पहाडांतील जैनमंदिरें यांना धूळभेट दिल्याविना जात नाहीं; तद्वत् केळकरी वाङ्मयसृष्टीचा प्रवासी मदुरेच्या देवालया-प्रमाणें भव्य असे टिळकचरित्राचे खंड, ताजमहालाप्रमाणें प्रमाणबद्ध व रमणीय मराठे-इंग्रज, कुतुबमिनाराप्रमाणें घेरानें आटोपशीर पण विचारानें उंच असे सुभाषितविनोद, व जैनमंदिराप्रमाणें कलाकुसरीनें नटलेला नाटयगुच्छ हा डोळ्याखालीं घालणारच. पण एखाद्या देशच्या कलेचें मर्म जाणण्यास ज्याप्रमाणें त्या देशांतील प्रमुख कलादर्शाबरोबरच गांवगन्ना पसरलेल्या अनेक मूर्तींकडे लक्ष द्यावें लागतें, तद्वत् केळकरी वाङ्मयप्रदेशांतील मुशाफराला त्यांच्या अफाट स्फुट लिखाणाचें दर्शन घेतल्याविना त्यांच्या वाङ्मयस्वरूपाचें साकल्यानें ज्ञान होणार नाहीं.

लेखकाच्या जीवनाप्रमाणें त्याचें लिखाण हेंहि व्यक्तिगत बुद्धिप्रकर्ष व उपस्थित परिस्थिति या दोहोंचें अपत्य होय. केळकरांचें बरेचसें लिखाण स्फुट, प्रासंगिक व विपुल व्हावें हें परिस्थितीनेंच ठरवून टाकलें. त्यांनीं प्रथम कलम हातांत घेतल्याला आज तीन तपांहून अधिक काळ लोटला आहे. या प्रदीर्घ कालांत वर्तमानपत्रकार व पुढारी हीच त्यांची मुख्य भूमिका व हीच त्यांची नियामक परिस्थिति होय. या दीर्घ कालांत लेखन ही खाणें, पिणें, वसणें, उठणें यांसारखी रोजच्या दिनक्रमांतलीच एक आवश्यक व सहजसुलभ अशी गोष्ट होऊन बसली आहे. एखादा कर्मठ ब्राह्मण संध्येचीं चार आचमनें टाकण्यास चुकला असेल, किंवा तालिमबाज चार दंड काढण्याचें विसरला असेल, पण शाईंत टांक बुडविला नाहीं असा केळकरांचा एखादा दिवसहि गेला नसावा, असें वर्णन वस्तुस्थितीस फारसें सोडून होणार नाहीं. अग्रलेख, प्रस्तावना, अभिप्राय, व्याख्यानें, रिपोर्ट यांपैकीं कांहींना

कांहींचें तरी टांचण लिहिण्याच्या टेबलावर नित्याचेंच असायचें. आणि जेवणानंतर तोंडानें सुपारी चघळीत असतां हातानेंहि टांचणें चाळणें हा नित्यक्रमच बनलेला. या नित्यक्रमापोटीं विपुल लेखनसंभार निर्माण झालेला आहे. या सर्व संभाराला पुनर्मुद्रणाचा संस्कार लाभलेला नाहीं. पण केळकरकृत लेखसंग्रह, गद्यगुच्छ, इतिहासविहार, शिक्षणविषयक लेख, टिळकांचें पुण्यस्मरण, गेलीं पांच वर्षें व लेखनानन्द नांवाचा इंग्रजी निबंधसंग्रह, या पुनर्मुद्रित लिखाणांवरून केळकरांच्या स्फुट लिखाणाचें स्वरूप ध्यानांत येईल.

हें सर्व लिखाण प्रायः प्रासंगिक व म्हणूनच बरेंचसें खुद्द वर्तमानपत्रांतूनच अवतीर्ण झालेलें आहे. असलें लिखाण एकीकडे लिहिलें जावें व दुसरीकडे शाई वाळेपर्यंत विसरलेंहि जावें असा लेखक व वाचक यांमध्यें जणूं संकेतच असतो. नित्य नव्या उद्भवणाऱ्या विषयावर लिहीत असावें आणि दुसऱ्या दिवशीं पहावें तों पहिल्या दिवशींचा विषय शिळा झालेला, आणि त्यांवरील लेख त्याहून शिळा झालेला. जुनें वर्तमानपत्र नुसतें कोणी हातांतहि धरणार नाहीं. मग त्यांतील लेख कोण वाचणार ? नित्य नवीं फुलें तोडून आणून देवावर वहावीं व दुसऱ्या दिवशीं निर्माल्य म्हणून काढून टाकावीं ही अवस्था. अथवा पार्थिव पूजा करणारा शिवभक्त रोज नवा पार्थिव तयार करतो व पूजेनंतर गंगेस अर्पण करितो असाच हा प्रकार नाहीं कां ? आतां पार्थिवपूजकाचा पार्थिव गंगेंत अर्पण झाला पाहिजे हा संकेतच असतो. पार्थिवाची पिंडी कितीहि उत्कृष्ट साधली असली तरी पूजा केलेल्या पार्थिवाचें विसर्जन हें केलेंच पाहिजे असा दंडकच आहे. पण वर्तमानपत्रकाराचा लेख विस्मृतीच्या गंगेंत विसर्जन झालाच पाहिजे अशी लेखनशास्त्रांत कांहीं आज्ञा उपलब्ध नाहीं. अशी आज्ञा नसतांहि हा कटु अनुभव चाखण्याचें दिव्य मात्र वर्तमानपत्रकारांना हमेष करावें लागत असावें. रोज नित्य नवें हौसेनें असें जन्मभर लिहीत असावें, पण पाण्यावर काढलेल्या आकृतीप्रमाणें तें सर्व विरून जाऊन वाङ्मयांत स्वतःची भर कांहींच नसावी. उल्केप्रमाणें क्षणभर तेजानें दिपवावें, पण नक्षत्रमंडळांत पहावें तों स्थान कोठेंच नाहीं. या अनुभवाचा कडवटपणा हे लेखकच जाणोत. गणपतीची उत्कृष्ट मूर्ति पाण्यांत विसर्जन करतांना आपल्यालाहि नाहीं का असला थोडासा अनुभव येत ! त्यांतून आपण सुटका अशी करतों कीं, विसर्जनाकरितां म्हणून एक लहानशी स्वतंत्र मूर्ति पुजून मुख्य मनोमोहक मूर्ति ही कायमची ठेवून घेतों. प्रासंगिक

लेखकालाहि हेंच साधावयाचें असतें. म्हणजे प्रासंगिक म्हणून कांहीं लेख वा लेखांचा कांहीं भाग हा नष्ट व्हावयाचाच असतो. पण या प्रासंगिकांतून व तात्कालिकांतून कायमचा चिरंतन भाग निर्माण करावयाचा असतो. केळकरांच्या स्फुट लिखाणांतील बऱ्याच निबंधांना हें भाग्य लाभलें आहे हें वाचक जाणतातच. पैकीं 'गेलीं पांच वर्षे' किंवा कायदेभंग कमिटीपुढील साक्ष यांसारख्या लिखाणाचें महत्त्व मुख्यत: ऐतिहासिक आहे म्हणून असलें लिखाण क्षणभर सोडून दिलें तरीहि बाकी वाङ्मयात्मक लेख, भाषणें, प्रस्तावना हीं वाचलीं म्हणजे तीं प्रथम तात्कालिक म्हणून निर्माण झालीं असलीं तरी तीं आजहि सदाफुलीप्रमाणें टवटवीत आढळतात.

तात्कालिक आणि चिरकालिक यांचा हा सांधा कोणत्या क्रियेनें साध्य केला आहे, पारिजातकाच्या फुलाप्रमाणें हे स्फुटलेख तत्काल कोमेजून न जातां वकुल पुष्पाप्रमाणें ते चिरकाल सुगंधदायी असे कोणत्या गुणसमुदायानें बनले आहेत, ह्यांचा विचार करण्याचा मोह पडणें अस्वाभाविक नाहीं. या दृष्टीनें या स्फुट लिखाणांची छाननी करूं लागलें म्हणजे प्रथम असें आढळून येतें कीं, प्रासंगिकांतून वा तात्कालिकांतून चिरकालिक वाङ्मय निर्माण होण्यास नित्य उपस्थित होणाऱ्या अनेक प्रसंगांतून कोणत्या प्रसंगांस तात्कालिकाप्रमाणें चिरकालिकाहि अंग आहे हें हेरणें व नंतर प्रासंगिकास गौणत्व देऊन चिरकालिक अंग फुलविणें ही क्रिया अवश्यक असावी. पैकीं नित्याच्या हरहमेश प्रसंगांतून नेमके प्रसंग टिपून काढण्यास एक विशिष्ट प्रकारची दृष्टि लागत असते. 'साध्याहि विषयांत आशय कधीं मोठा कवीला दिसे' हीच ती दृष्टि होय. प्रसंग अद्वितीय लागतो असें नव्हे. प्रसंग नित्याचेच असतात; पण नित्याचे म्हणूनच ते सामान्य दृष्टीला अरमणीय वाटतात. जुनें ऐतिहासिक क्षुल्लक चिटोरें सांपडलें तरी त्याकडे आपण आदरानें पाहतों; पण चालू इतिहास आपल्याभोंवतीं रोज घडतच चाललेला असूनहि त्याकडे आपलें लक्ष वेधत नाहीं; आणि वेधलें तर त्यांत आपण इतके गुरफटून गेलेलों असतों कीं, साहित्यकाराला लागणारें मर्यादित तादात्म्य स्वीकारून त्या प्रसंगाकडे अर्धवट निरात्मबुद्धीनें पाहणें अशक्य होऊन बसतें. पण प्रासंगिक घटनांवर रमणीय निबंध लिहिणारांना हि दृष्टि लाभलेली असते. केळकरांचा मुख्य पेशाच वर्तमानपत्रकाराचा पडल्यामुळें गेल्या तीन तपांत घडलेल्या हरएक लहान मोठ्या प्रसंगावर त्यांना लिहिण्याचा प्रसंग आला आहे. त्यांत महायुद्धासारख्या प्रचंड प्रसंगाच्या भक्कम पायापासून तों

किर्लोस्कर नाटकगृहाच्या उद्घाटनसमारंभासारख्या आपाततः क्षुल्लक प्रसंगाच्या ठिसूळ पायावर टिकाऊ निबंधमंदिरें त्यांनीं उभारलेलीं आहेत. महायुद्धाच्या काळांत रणांगणावर तोफा चालू असतां वर्तमानपत्रकाराला कागदांवर रोजच लेखणी चालवावी लागे. ही लेखणी प्रायः तात्कालिक तपशीलांचींच चित्रें काढी व, तीं चित्रें पाटीवर पाण्यानें काढलेल्या चित्राप्रमाणें क्षणार्धांत उडून जात. पण अशा प्रकारचे तात्कालिक लिखाणाचे व्यवसाय म्हणून धुसळण चालू असतांनाच 'युद्धमीमांसा' नांवाचें निबंधनवनीत बाहेर पडलें आहे. दिल्लीदरबार हाहि एक वडा प्रसंग. त्या दरबाराचेंच नुसतें वर्णन करून वर्तमानपत्राच्या वाचकांची तहान भागवितां आली असती. पण तें वर्णन दरबाराचा शामियाना उलगडण्याच्या आधींच शिळें झालें असतें. दरबार आटोपला व तद्विषयक कुतूहलाहि मावळलें; पण दिल्ली हा शब्द उच्चारला कीं, अनेक पूर्व स्मृति जागृत होतात. दिल्लीच्या पाठीमागें हजारों वर्षांचा इतिहास दडलेला आहे. याच दिल्लींत अथवा इंद्रप्रस्थांत पूर्वी धर्मराज युधिष्ठिराचा राज्याभिषेकमहोत्सव झाला होता, याच दिल्लींतील रौप्यतख्त सदाशिवराव भाऊनें फोडलें होतें. यामुळें चर्मचक्षूंना गोचर होणारा दरबारचा समारंभ विलीन झाल्यावरहि आंतरचक्षूंपुढें हा ऐतिहासिक चित्रपट अंधुक तरळत असतोच व एतद्विषयक जिज्ञासा जागृत पण अतृप्त असते. अशा कुतूहलप्रवण स्थितींत खांडववन जाळून पांडवांनीं इंद्रप्रस्थ कसें वसविलें, खांडववनांतील अग्निप्रलयांतून असुरांचा कुशल शिल्पी मयासुर याचे प्राण कसे वांचले, याच मयासुरानें कैलासपर्वताच्या उत्तरेकडून उत्कृष्ट शिळा, रंग, चूर्णे वगैरे आणून अवघ्या चौदा महिन्यांत दहादहा हजार हात लांबीरुंदीचा अत्युत्कृष्ट राजवाडा कसा बांधला व बिंदुसरोवराजवळून आणलेले आठ हजार राक्षस त्याच्या रक्षणासाठीं कसे ठेवले, या राजवाड्यांत युधिष्ठिराच्या राज्यारोहणप्रसंगीं देशोदेशींच्या राजेरजवाड्यांनीं बहुमूल्य रत्नें, रत्नखचित व आकाशाप्रमाणें नीलवर्ण तलवारी, जडावाचीं चिलखतें, भरजरी झुली घातलेले हत्ती, बाल्हीक, आनर्त (काठेवाड) वनायु (इराण) वगैरे ठिकाणचे जगत्प्रसिद्ध घोडे वगैरेंचे करभार कसे दिले, समारंभास सुरवात होतांच युधिष्ठिरानें प्रथम, पांढरीं फुलें, अक्षता, भूमि, सोनें, रुपें, माणकें यांस हस्तस्पर्श केला व नंतर तो व्याघ्रचर्मानें मढविलेल्या सर्वतोभद्र सिंहासनावर द्रौपदीसह कसा अधिष्ठित झाला व श्रीकृष्णानें पांचजन्य शंखांतील उदकानें अभिषेक कसा केला, इत्यादि इत्यादि वर्णन वाचावयास मिळाल्यानें अतृप्त भावना तृप्त झाल्याचा आनंद मिळतो. याच

निबंधांत पौराणिक कालांतील कौरवपाडवांनंतर ऐतिहासिक काळांत दिल्ली येथें कोण कोण हिंदु व मुसलमान राजे झाले, याची सुसंगतवार हकीकत सांगत दिल्लीच्या हजार दोन हजार वर्षांच्या इतिहासक्षेत्रांतून वाचकांस हिंडवून आणलें आहे. या ऐतिहासिक सिंहावलोकनामुळेंच मूळ दरबारच्या निमित्तानें लिहिलेल्या ह्या तात्कालिक निबंधाला चिरकालिक स्वरूप आलें आहे.

याच प्रकारच्या ऐतिहासिक माहितीचा उपयोग इतर कांहीं निबंधांत केलेला आढळतो. महायुद्धानंतर ज्यूलोकांची धर्मभूमि जी पॅलेस्टाईन ती अनेक शतकांच्या पारतंत्र्यानंतर स्वतंत्र झाली एवढी नुसती बातमी देणें हें वर्तमानपत्राचें काम; पण या बातमीमुळें एकंदर धर्मक्षेत्रांच्या नाशाविषयीं मनांत उद्भवणारे विचार व विशेषतः हिंदूंचें आद्यक्षेत्र जें काशी त्या क्षेत्राचीं ऐतिहासिक स्थित्यंतरें रेखाटणें हें वाङ्मयसेवकाचें कर्तव्य होय. या कर्तव्यप्रेमामुळेंच या निबंधांत आपणांस श्रीक्षेत्र काशी हें गौतमबुद्धापूर्वीपासून पवित्र स्थान म्हणून कसें गणलें जात असे, खुद्द बुद्धानें आपल्या धर्मस्थापनेची मुहूर्तमेढ काशीसच कशी रोवली, पुढें सुमारें आठ शतकें तें बौद्धधर्माचें एक प्रमुख केंद्र कसें होतें, सातव्या शतकांतल्या ह्युएनत्संगाच्या काळींहि काशींत तीस पसतीस बौद्धमठ होते, बौद्धांच्या पाडावानंतर हिंदूंनीं देवळें कशीं बांधलीं, बाराव्या शतकांत तीं महंमद घोरीच्या हातीं कशीं पडलीं व तेव्हांपासून इंग्रजांच्या कबजांत जाईपर्यंत सहाशें वर्षें तीं परमधर्मीय मुसलमानांच्याच ताब्यांत कशीं राहिलीं, होळकर, शिंदे, पेशवे वगैरे मराठ्यांना ही स्थिति शल्यवत् कशी वाटे व त्यांनीं प्रयत्न केले पण काशींतील ब्राह्मणांत कडवेपणा नसल्यामुळें कसे फसले, हा सर्व इतिहास आपणांस वाचावयास मिळतो. शनिवारवाड्याचा जीर्णोद्धार करण्याचें सरकारनें ठरविलें या प्रसंगींही केसरीच्या वाचकांस त्या वाड्यासंबंधींच्या पूर्वापरवृत्तांताचा असाच अहेर सादर केला आहे. ही माहिती मुद्दाम यत्नपूर्वक प्रयत्न करून गोळा केली आहे व त्यावरून ह्या वाड्यांत पेशव्यांचें वास्तव्य अवघें पाऊणशेंच वर्षें कसें होतें, या पाऊणशें वर्षांत वाड्याला तीनदां आग कशी लागली, पाणीपुरवठ्याचे काम कसें चोख होतें, एका हौदांत चार भिंतींना कोनाडे ठेवलेले असून चार बाजूंनीं पाण्याचे रुंद पातळ प्रवाह पडावे व कोनाड्यांतून ठेवलेल्या रंगीबेरंगी दिव्यांच्या प्रकाशानें या कृत्रिम धबधब्यावर अंधाऱ्या रात्रीं इंद्रधनुष्याचा देखावा दिसावा अशी योजना कशी केली होती वगैरे हकीकत वाचावयास मिळते. शिक्षणविषयक निबंधांत मातृभाषा हीच बोधभाषा होण्यास

लायक होय यासंबंधीं अनेक वेळां लिहिण्याचा प्रसंग आला आहे त्यावेळींहि हिंदुस्थानांतील मातृभाषाविषयक चालू झगड्यावर उत्तम प्रकाश पडेल अशी इतर देशांतील म्हणजे राशियन अमलाखालील फिन्लंड, आस्ट्रियन अमलाखालील हंगेरी, ब्रिटिश अमलाखालील कानडा व दक्षिणआफ्रिका येथील देशभाषांचा झगडा कसा उढला गेला ह्या उपयुक्त माहितीनें लेख नटविला आहे.

कोणताहि प्रसंग असो तदुपस्थित विषय तत्संबंधीं हरतऱ्हेच्या उपयुक्त माहितीनें सजवून मांडावयाचा हें वर्णन सामान्यतः सर्वच निबंधांस लागू पडतें. संस्कृत विद्येचें पुनरुज्जीवन ही विस्तृत लेखमाला हें ह्या प्रकारचें एक ठसठशीत उदाहरण देतां येईल. १९१२ सालीं सर हारकोर्ट बटलर यांच्या उद्योगानें सिमल्यास एक आर्यविद्येच्या पुनरुद्धारार्थ तिच्या सहकारी व खाजगी पुरस्कर्त्यांचें संमेलन भरलें होतें. या निमित्तानें आजपर्यंत आर्यविद्येची मेकॉलेसारख्या अधिकाऱ्याकडून अवहेलना व विटंबना कशी झाली, ज्या आर्यविद्याविषयक पुस्तकाची किंमत मेकॉलेच्या विकृत दृष्टीस त्या पुस्तकांतील कागदाच्या किंमतीइतकीहि वाटली नाहीं, त्या आर्यविद्येच्या तेजानें चिनी वगैरे परकीय प्रवासी कसे दिपून गेले होते, व त्या तेजाची तक्षशिला, नालंद, उदंतपुरी, विक्रमशिला वगैरे विद्यापीठांतून शतकानुशतकें कशी जोपासना केली जात होती, या विद्यालयांतून शेकडों शिक्षक व हजारो विद्यार्थी विद्यासंवर्धनांत काल कसा घालवीत, त्यांतील पंडितांची परंपरा हजारों वर्षें अविच्छिन्न कशी टिकली, व काशी येथील पंडितपरंपरेच्या अग्रभागीं महाराष्ट्रीय पंडितच नेहमीं विराजत ह्याविषयीं वंग पंडित हरप्रसादशास्त्री यांनींच कशी साक्ष दिली आहे वगैरे वगैरे माहितींनीं भरगच्च असा आर्यविद्याजोपासनेचा हजारों वर्षांचा ऐतिहासिक चित्रपटच वाचकाच्या मनःचक्षूपुढून फिरविला आहे. लहान निबंधांतूनहि विविध माहितीच्या सुमनांचा असाच सडा पडलेला दिसून येतो. १९१४ सालीं अनेक देशी बँकांचीं दिवाळीं निघालीं त्यासंबंधीं लिहितांना मनुष्यस्वभाव सर्वत्र एकच असल्यानें अतिरिक्त लोभानें हिंदुस्थानांतल्याप्रमाणें विलायतेंतहि कसे गुण उधळलेले आहेत, इंग्लंडमध्यें गेल्या शतकाच्या प्रभातीं अठ्ठावीस वर्षांत एक हजार पेढ्या कशा रसातळास गेल्या, साउथ सी कंपनी नांवाच्या सुप्रसिद्ध लफंग्या कंपनीच्या व्यवहारांत इंग्लंडच्या पतीची कशी राख झाली, त्यावेळीं या धापेबाजी कंपन्यांचें पेवच पीकच आलें होतें व समुद्राचें पाणी गोडें करणें किंवा शिशापासून

रुपें करणें असलें मृगजल पाजणाऱ्या कंपन्यांनाहि भरमसाट पैसा लोक कसा देत व शेवटीं पश्चात्ताप पावत, वगैरे विलायती दिवाळखोरीचा इतिहास आंकड्यामुद्यांसह वाचकांस सादर केला आहे. ज्ञानाचीं सदावर्तें व भविष्य-कथन या लेखांतहि युरोपमधील जुनीं नवीं वाचनालयें च लोकांचा भोळसट-पणा याविषयीं अशीच ऐतिहासिक माहिती आढळते.

त्या त्या प्रसंगाचें अनुसंधान साधून प्रासंगिकांतून टिकाऊ वाङ्मय निर्माण करण्याचें आणखी एकच उदाहरण घेऊं. तें म्हणजे किर्लोस्कर नाटक कंपनीचा ज्युबिली-समारंभ व किर्लोस्कर नाटकगृहाचा उद्घाटनसमारंभ. नाटकगृहाच्या उद्घाटनसमारंभासारखा आपाततः क्षुल्लक प्रसंग तो कोणता! पण या निमित्ता-नें शेक्सपिअरच्या वेळचीं नाटकगृहें कशीं असत, नटाच्या दर्जाचीं स्थित्यं-तरें होत होत त्याला प्रतिष्ठितपणा प्राप्त कसा झाला, आपली भारतीय नाट्य-संस्था ही परक्याच्या अनुकरणापासून निघाली नसून स्वतंत्र कशी आहे, तसेंच नाट्याचा विशेषतः लोकशाहीच्या दिवसांत लोकशिक्षणाच्या दृष्टीनें केवढा उपयोग होणार आहे, प्राचीन ग्रीसमध्यें त्याचा काय उपयोग झाला, जर्मनीमध्यें शिलरसारख्याच्या नाट्यानें देशाभिमानाची ज्योत पेटविण्याची कोणती काम-गिरी बजावली वगैरे प्रकारच्या हरतऱ्हेच्या मेवामिठाईनें भरलेलें ताट वाचकांस सादर केलें आहे.

मृत्युलेख हीहि प्रासंगिक व वर्तमानपत्राच्या धंद्यांतील एक मामुली बाब होय. पण केळकरांच्या इंग्रजी पुस्तकांत रानडे, गोखले, नौरोजी, मेथा, स्पेन्सर, मोक्षमुल्लर, विवेकानंद वगैरेंचे जे मृत्युलेख समाविष्ट करण्यांत आले आहेत, त्यांत त्या त्या व्यक्तींच्या जीवितकार्याचा थोडक्यांत पण असा कांहीं स्पष्ट ठसा वठलेला आहे कीं, त्या त्या व्यक्तींचीं समग्र चरित्रें वाचून जी अंतिम कल्पना वाचक मनाशीं बसवील तीच या चिमुकल्या निबंधानेंहि पण तेवढ्या-पुरती यावी. साद्यंतचरित्र व धावतें स्वभावचित्र या दोहोंचा प्रांत भिन्न होय. पण आपल्या विशिष्ट कलाकौशल्यानें लघुकथेनें जसें कादंबरीहून स्वतंत्र असें स्थान आपणासाठीं निर्माण केलें आहे तसेंच, या थोडक्यांत व्यक्ति-सर्वस्व रेखाटणाऱ्या निबंधाविषयीं म्हणतां येईल. शिल्पकलेंत राक्षसप्राय विराट् मूर्तीपासून तों तांदुळाच्या लहानशा दाण्यावर कोरलेल्या व चष्मा लावून दिसणाऱ्या मूर्तीपर्यंत सर्वांचा समावेश होतो; आणि मूर्तिकार जातिवंत असेल तर पहिल्यांत जेवढें व्यक्तीचें आत्मबिंब उमटलेलें दिसेल तेवढेंच तारतम्यानें दुसऱ्यांतहि दृष्टोत्पत्तीस आल्याविना राहणार नाहीं. वर्तमानपत्राच्या दोनतीन

फॉलमी जागेच्या मर्यादेंत व्यक्तीच्या आयुष्यांतील महत्त्वाच्या सर्व प्रसंगांचा चित्रपट दाखवून त्या व्यक्तींचें जीवितकार्य स्पष्ट नजरेस भरेल असे रंग भरणें हें काम सोपें नाहीं. आयुष्यांतील प्रसंगाची नुसती जंत्री कुचकामाची. कार्याची प्रवचनवजा माहितीहि त्याज्य. तर थोडया जागेंतच पण व्यक्तीविषयीं जिव्हाळा उत्पन्न होईल व त्याच्या संगतींतच आपण वावरत आहों असा क्षण-भर भास होईल असा पाक उतरावा लागतो. असा उतरवितां येतो म्हणूनच लघुनिबंधालाहि वाङ्मयमंदिरांत स्वतःचें असें स्वतंत्र स्थान लाभतें. याची प्रचीति वर उल्लेखिलेल्या व इतरहि अनेक निबंधांत वाचकांनीं घेऊन पहावी.

मृत्युलेखाप्रमाणेंच वर्तमानपत्रकाराच्या धंद्यांत नेहमीं उत्पन्न होणारा प्रसंग म्हणजे ग्रंथपरीक्षण. हेंहि मूलत: प्रासंगिक व पाहुणें असलें तरी वाङ्मयां-त घरजांवई कसें होऊन बसतें हें इंग्रजी वाङ्मयांतील मेकॉलेच्या क्लाइव्ह, हेस्टिंग्ज, मिल्टन, बायरन, वगैरेंवरील निबंधांच्या वाचकांस सांगावयास नकोच. हे सर्व निबंध त्या त्या व्यक्तीच्या चरित्रात्मक ग्रंथाचीं परीक्षणें होत, पण मेकॉले हा जातिवंत लेखक असल्यानें परीक्षणाकरितां म्हणून जरी प्रथम तो हातांत कलम धारण करी, तरी लवकरच त्या भूमिकेचें त्याला विस्मरण पडे व नंतर त्याचें कलम त्याच्या स्वयंभू प्रतिभेच्या भरारीनें धावूं लागे. यामुळें असा चमत्कार घडून आलेला आहे कीं, मूळ ग्रंथांचा वाचक एक सांपडला तर मेकॉलेकृत त्याच्या परीक्षणात्मक लेखाचे वाचक हजारों आढळतील. केळकरांनीं आपल्या परीक्षणात्मक लेखांत मेकॉलेइतकें आपल्या प्रतिभेस स्वैर सोडलेलें नाहीं किंवा परीक्षकाच्या भूमिकेची विस्मृतिहि पडूं दिलेली नाहीं, हें त्यांच्या ऐतिहासिक लेखसंग्रहाचें परीक्षण, कौटिलीय अर्थशास्त्राचें परीक्षण, वैद्यांच्या महाभारत व रामायणावरील पुस्तकांचें परीक्षण ( इंग्रजी ), कोल्हटकरांच्या मतिविकार व गुप्तमंजूष यांचें परीक्षण हीं वाचलीं असतां ध्यानीं येईल. सबंध पार्लमेंटरी सत्रांत आवाहन–विसर्जनाच्या वेळीं मात्र जसें राजेसाहेबांचें दर्शन घडावयाचें तसा प्रकार मेकॉलेकृत परीक्षणांत ग्रंथकारांविषयीं झालेला आहे. परी-क्षणाच्या सुरवातीस एकदां ग्रंथकारांचा उल्लेख केला कीं, पुढें त्यांचें नांवगांवहि नाहीं. यामुळें उत्सवमूर्तिच पालखींतून मिरवावी व मूळ स्वयंभू मूर्ति गाभाऱ्यां-त दडून बसावी, तसा मूळ ग्रंथकारांच्या बाबतींत थोडा अन्याय झालासा वाटतो; तसा प्रकार येथें नाहीं. किंबहुना मूळांतीलच उपयुक्त पण मनोरंजक अशी सर्व माहिती टिपून थोडक्यांत समजावून द्यावयाची हीच पद्धति त्यांनीं स्वीकारली आहे. पण सामान्य वाचकांच्या दृष्टीनें आवश्यक तेवढीच माहिती

नेमकी उपलब्ध करून दिल्यानें तासभर घुमणाऱ्या गवयाचें गायन ऐकण्यास कंटाळणाऱ्या वा अवसर नसणाऱ्या रसिकांची फोनोग्राफमधील पांच मिनिटें चालणाऱ्या रेकॉर्डमध्यें त्यांच गवयाचे सर्व रंग ढंग थोडक्यांत ऐकण्यानें जशी सोय होते, तशी या परीक्षणांनीं करून दिली आहे. हीं परीक्षणें वाचून ऐतिहासिक लेखसंग्रहाचें पानहि न उघडतांहि परशुरामभाऊस चहा-कॉफी लागत असे, किंवा कौटिल्याच्या काळीं कबूतराच्या करवीं बातमी ने-आणण्याची कला अवगत होती असले मनोरंजक चुटके वाचक विसणार नाहींत. फोनोग्राफपेक्षां या परीक्षणास कॅमेऱ्याची उपमा अधिक सार्थ होईल. कारण फोटोग्राफर हा फोटो छापण्यापूर्वी त्यांत मूळांतील दोष राहूं नयेत म्हणून सफाईचा हात फिरवून आपली करामत दाखवितो व म्हणूनच फोटोग्राफी ही कला म्हणून नामाभिधान पावते. तसेंच परीक्षणात्मक लेखाचें आहे. मतिविकारावरील परीक्षणांत या विधानाचा पडताळा पहावयास सांपडेल. या परीक्षणांत मूळ नाटकांत नाटककाराचा हेतु सफळ कसा होत नाहीं हें दाखविल्यानंतर तो साध्य होण्यास नाटकाच्या रचनेंत कसे फेरफार करावे लागतील हेंहि दाखवून दिलें आहे. महाभारतावरील परीक्षणांत ( इंग्रजी ) महाभारताच्या कालनिर्णयासंबंधीं विचाराची एक नवीनच दिशा दाखविली आहे. महाभारताच्या कालनिर्णयाबाबत ज्योतिषाचेंच मंथन बहुतेकांनीं केलें आहे. पण आकाशस्थ ज्योतींचे अवलोकन करण्यांत चूर होऊन गेल्यामुळें महाभारताची अधिष्ठात्री देवता जी द्रौपदी तिच्या आयुष्यांतील एका डोळेफोड घटनेकडे या ज्योतिर्विदांचें दुर्लक्ष झालें आहे, ती आश्चर्यकारक घटना म्हणजे एका स्त्रीचा पांच पतींशीं विवाह ही होय. बहुपतित्वाची चाल एके काळीं लोकमान्य होती व नंतर ती त्याज्य ठरली असें इतिहास सांगतो. यामुळें ज्याकालीं ही चाल रूढ होती, तो पांडवांचा काल होय. अर्थात् समाजविकासाच्या दृष्टीनें कोणत्या अवस्थेंत ही चाल जारी असावी हा शोध लावण्याचें हें मोठें मनोरंजक कार्य कोणीं पंडितांनीं हातीं घ्यावें असें या परीक्षणांत सुचविलें आहे. प्रो० भाटे यांच्या ' अर्थशास्त्रा'वरील परीक्षणांत निवृत्तिपर वेदांतामुळें अर्थशास्त्रावर आपल्याकडे पूर्वी ग्रंथ झाले नाहीत या रूढ मताचा समाचार घेतलेला पाहण्यास सांपडतो. प्रथमतः रागतः प्राप्त अशा गोष्टीचा उपदेश करूं नये, असा दंडक असतांहि धनाचें महत्त्व वर्णन करणारी 'धनेभ्यः परो बांधवो नास्ति लोके । धनान्यर्जयध्वं धनान्यर्जयध्वम् । ' यासारखीं शुक्रनीतींतील वचनें कशीं अनेक आढळतात, तें दाखवून मग धर्मविषयक कल्पना

भिन्न असतांहि पूर्वी ग्रीस–रोम वगैरे देशांतहि अर्थशास्त्राकडे. विशेष लक्ष दिलेलें दिसत नाहीं यावरून अर्थशास्त्रविषयक उदासीनतेचें कारण निराळेंच असावें अशी शंका घेऊन अर्थशास्त्राकडे विशेष लक्ष अलीकडे वेधण्याचें खरें कारण म्हणजे गेल्या शतकांतील द्रव्योत्पादनशक्तीची अफाट अनपेक्षित वाढ हेंच होय, असें दाखविलें आहे. असो.

प्रासंगिक स्फुटलेखाचें विवेचन चालूं असतां केसरी–मराठ्यांतील नित्यक्रमाच्या साप्ताहिक लिखाणाबरोबरच साहित्यसंमेलन, नाट्यसंमेलन वगैरेंच्या अध्यक्षपदावरून केलेलीं भाषणें व अनेक साहित्यसेवकांच्या साहित्याला लिहिलेल्या प्रस्तावना यांचाहि उल्लेख करणें प्राप्त आहे. अध्यक्षमहाराजांचीं भाषणें हीं कंठाळी स्वरूपाचीं असावीं व लहान मूल भरलेल्या ताटाघरं बसून अनेक पदार्थ नुसतें चिवडतें, तद्वत् ह्या भाषणांतून अनेक विषयांची गल्लत असावी अशी प्रथाच पडलेली आहे. केळकरांचीं भाषणें हीं त्याला फारशीं अपवादात्मक नाहींत; पण या कंठाळी भागाबरोवर एखादा तरी नवीन व अपूर्व असा मुद्दा या भाषणांतून गोंवलेला आढळतो व यामुळेंच कंठाळी भागाला नुसतें ऐतिहासिक महत्त्वच उरलें तरी नवीन कल्पनेच्या भागाला स्वयंभू महत्त्व मिरवितां येतें. बडोद्याचें भाषण त्यांतील काव्यानंदाच्या अपूर्व उपपत्तीमुळें चिरकालिक झालें आहे, हें उदाहरण वाचकांस सहज आठवण्यासारखें आहे. नाट्यसंमेलनाचें भाषण, हें भरतकृत नाट्यशास्त्राच्या आधारें प्राचीन काळीं नटांचा धंदा प्रतिष्ठित कसा लेखला जाई व स्त्रियांची भूमिका स्त्रियाच कशा करीत वगैरे माहितीनें व नटांच्या धंद्याच्या प्रतिभाशाली तरफदारीनें नटलेलें आहे. इतर साहित्यसेवकांच्या साहित्याला जोडलेल्या प्रस्तावनांतूनहि प्रासंगिक व ग्रंथानुलक्षी अशा कोंदणांत एखादा स्वतंत्र कल्पनेचा खडा बसविलेला बहुधा आढळून येतो. यामुळेंच यांपैकीं पुष्कळ प्रस्तावना स्वतंत्र रीतीनेंहि वाचाव्याशा वाटतात. आधुनिक कवींची तरफदारी करणारी व शून्यसंशोधनासारखे त्यांचे दोष दाखविणारी टिळकांच्या कवितेची प्रस्तावना, कोल्हटकर व गडकरी यांच्या प्रतिभेंतील गुणावगुण थोडक्यांत वेचक शब्दांत मांडणारी 'सुदाम्याचे पोहे' व वाग्वैजयन्ती यांची प्रस्तावना, थोर माणसांच्या लहान गोष्टींनाहि महत्त्व कां व कसें प्राप्त होतें याची सोपपत्तिक चर्चा करणारी 'टिळकांच्या आठवणी'ची प्रस्तावना वगैरेंची वाचकांना सहज आठवण होण्यासारखी आहे.

अशा विविध तऱ्हेचे निबंध उठविण्यास विपुल वाचनाचा

हव्यास व हौस लागते. आणि हा हव्यास, ही हौस केळकरांच्या लिखाणांत किती दृष्टीस पडते हें त्यांचें लिखाण वरवर वाचणारांनाहि सांगावयास नको. गेल्या चाळीस पन्नास वर्षांत विचारांचीं जीं जीं आंदोलनें झालीं त्या सर्वांचें प्रतिबिंब या स्फुट निबंधांत पडलेलें आढळून येतें. प्रत्येक नवें मत, नवा विचार आत्मसात् करणें व आपल्या वाचकांना नवेंनवें व हरतऱ्हेचें ज्ञानामृत पाजीत राहणें ही मोठी हौस. गेल्या पन्नास वर्षांत प्राचीन हिंदुस्थानचा व मराठयांचा इतिहास या ज्ञानक्षेत्रांत अनेक नवीं साधनें उपलब्ध झालीं, अनेकांचे बौद्धिक परिश्रम खर्ची पडले व ज्ञानसंग्रह अनेक पटींनीं वाढला. यांतील सर्व प्रमुख वाङ्मय आत्मसात् करून केसरी–मराठयाच्या वाचकांस सादर केलेलें आढळून येतें. मराठयांच्या इतिहासाबाबत खरे यांच्या ऐतिहासिक लेखसंग्रहाचा व प्राचीन इतिहासाबाबत संस्कृत विद्या नांवाच्या निबंधाचा उल्लेख वर आलाच आहे. प्राचीन इतिहासासंबंधीं मुकर्जींच्या पुस्तकाचे आधारें लिहिलेला आर्यनौकानयन व अनेक ग्रंथांच्या आधारें सजविलेला व भरपूर माहितीनें समृद्ध असा 'हिंदुस्थानची प्राचीन संस्कृति' हा लेख यांचा आणखी उल्लेख करतां येईल. युरोपियन संस्कृतीचे हल्ले सर्व आशियाटिक राष्ट्रांवर सुरू होते व आहेत. या हल्लयाला सर्व आशियाटिक राष्ट्रांनीं एकजुटीनें तोंड द्यावें व आपल्या संस्कृतीचें वैशिष्टय कायम राखावें असें प्रतिपादन करणारे ओकाकुरा नांवाचे एक जपानी पंडित १९०३ मध्यें पुण्यास आले होते. त्यानिमित्तानें त्यांनीं 'पौर्वात्यांची संस्कृति' म्हणून जें पुस्तक लिहिलें आहे त्याचा आस्वाद मराठयाच्या वाचकांस अर्पण केला आहे. तत्त्वज्ञानी व समाजसुधारक म्हणून या काळांत स्पेन्सर व टॉलस्टॉय यांचें नांव दुनियेंत दुमदुमत होतें. या दोघांच्या मृत्युलेखांच्या निमित्तानें त्यांच्या विचारसरणीचा प्रसादहि वाचकांस वांटला आहे. जर्मनीचा शिलर, इटलीचे काव्हूर, ग्यारिबाल्डी, आयर्लंडचा पारनेल वगैरे अनेक थोर देशभक्तांच्या चळवळींचें दर्शन तर येथें घडतेंच. वेदोक्त, अस्पृश्यता, संमतिवय, पुनर्विवाह, संस्थानिक आणि प्रजा, औद्योगिक हलाखी, स्त्रीशिक्षण, धंदेशिक्षण वगैरे चालू प्रश्न हे व्यवसायाचे एक अंग म्हणूनच अभ्यासिलेले. पण या स्फुट लिखाणांत डार्विनच्या उत्क्रांतिवादावरहि लेख आढळतो (इंग्रजी). 'जीवो जीवस्य जीवनम्' किंवा 'जीवनकलह हीच उत्क्रांतीची गुरुकिल्ली' हा डार्विनचा सिद्धांत. या सिद्धांतामुळें 'बळी तो कान पिळी' ह्या तत्त्वाचा पुरस्कार करण्यास बळींना चांगलेंच फावतें; कारण ते म्हणणार कीं, हा निसर्गाचाच नियम आहे व त्याचें

साम्राज्य सर्वत्र आढळून येत आहे. ही समजूत सर्वस्वीं खरी नाहीं. अनेक प्राण्यांत कलहाऐवजीं मैत्री व प्रेम हींहि स्वभावतःच आढळून येतात. अतएव कलह हेंच जीवनतत्त्व मानणें चुकीचें होय. अशा प्रकारची विचारसरणी रशियन ग्रंथकार क्रोपोटकिननें मांडली. तिची माहिती वाचकांस सादर केली आहे. तसेंच विविधतेचा मासला ' म्हणून ख्राइस्ट ही ऐतिहासिक व्यक्ति होती काय ? ' ख्रिस्मस क्कॅरोल ( इंग्रजी ) वगैरे निबंधांचा उल्लेख करतां येईल.

हरतऱ्हेच्या माहितीमुळें दृष्टीला विशालत्व येतें, प्रत्येक प्रश्नाच्या अनेक बाजू दिसूं लागतात, प्रतिपक्षाच्या मनांतील ग्राह्यांश उमगूं लागून त्याच्या मनोनुनयाचा मार्ग दिसूं लागतो, व वादविवादाला वितंडतेचें स्वरूप न येतां विचारसरणींत सहानुभूतीचा ओलावा उत्पन्न होतो. मिथ्याग्रहाचीं टणक झालेलीं पुटें हलक्या हातानें खरवडून काढण्यास हा ओलावा फार उपयुक्त असतो.

संस्थान–प्रजापरिषद्, वेदशास्त्रोत्तेजक सभा व संगीत परिषद् अशा अगदीं भिन्न क्षेत्रांत केळकरांना अध्यक्षाचें स्थान स्वीकारण्याविषयीं विनंति करण्यांत येते, त्याचें बीज या हरतऱ्हेच्या ज्ञानसंग्रहाची हौस व प्रतिपाद्य विषयाकडे समाजाची सहानुभूति वळविणारी विचारसरणी बहुधा असावी. यांतच विरुद्ध पक्षाच्या भूमिकेवर मनानें क्षणभर आरूढ होऊन त्याला व आपणाला उभें राहण्याला समानभूमीचा केवढा तुकडा आढळतो हें प्रथम पाहण्याची खटपट करून त्यावरच जोर द्यावयाचा, हें या विचारसरणीचें मर्म दिसतें. मासल्यासाठीं अष्टोत्तरशत रामायणें-प्रस्तावना व संस्कृत विद्येचें पुनरुज्जीवन यांतील दोन उतारे घेऊं. केवळ शब्दांच्या कसरतीवजा भासणाऱ्या मोरोपंताच्या अष्टोत्तरशत रामायणाविषयीं नवशिक्षितांत फारसा आदर आढळत नाहीं. यामुळें या रामायणांचें कोणत्या दृष्टीनें कौतुक करण्यासारखें आहे, ह्याची मांडणी कशी केली आहे, ती पहाः—" आतां या अष्टोत्तरशत रामायणांकडे वाचकांनीं कोणत्या दृष्टीनें पहावें ह्याचा विचार करूं. रामायण हें एकच, तें एक वेळां गायिलें काय आणि एकशें आठ वेळां गायिलें काय, त्याचें अनेकवचन होऊं शकत नाहीं. मग पंतांनीं जो हा अष्टोत्तरशत रामायणांचा व्याप केला तो केवळ व्यर्थ होय असें म्हणावयाचें कीं काय ! छे ! असें तर मुळींच म्हणतां यावयाचें नाहीं. रामसेवा हेंच ज्यांचें अव्यभिचारी ध्येय त्या कवीनें आपला सारा जन्म त्या ध्येयाच्या पायीं वेचला यांत कांहींच सत्व नाहीं काय ? शिवाय मोरोपंतांच्या हातून मराठी भाषेच्या उद्धाराचें जें कार्य झालें तें अनिच्छतः झालें असें आम्हांस वाटत नाहीं.

पंतांनीं भगवंताच्या गुणगायनाची आपली आवड व मराठी भाषेच्या उद्धाराची त्यांस वाटत असलेली तळमळ यांचा जाणूनबुजून मिलाफ केला असावा असा आमचा तर्क आहे. संस्कृतमध्यें ग्रंथरचना करण्याची बाबा पाध्यांसारख्या इष्टमित्राची सूचना व संस्कृतमुळें येणारी प्रसिद्धि झिडकारून या मराठीच्या अभिमानी कवीनें जीं हीं एकशें आठ रामायणें रचिलीं त्यांचा मराठी वाङ्मयाला कांहींच उपयोग होणार नाहीं काय ? संस्कृत वाङ्मयोदधीमध्यें हजारों वर्षांपासून हजारों पंडितांनीं मनसोक्त क्रीडा केली आहे. आमच्या मतें हीच उणीव भरून काढण्याचें धोरण हीं रामायणें रचण्यांत पंतांनीं ठेवलें होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. चित्रकाव्यें हीं रसालंकारहीन म्हणून अधम होत हें साहित्यशास्त्रकारांचें मत गैरवाजवी असें तर केव्हांहि म्हणतां येणार नाहीं. तथापि आमचें इतकेंच म्हणणें कीं, चित्रकाव्यांना अधम लेखणें हे टीकाकारांनाच कळतें आणि स्वतः कवीला, विशेषतः साहित्यशास्त्रनिष्णात अशा पंतांना कळत नव्हतें असें म्हणावयाचें काय ? तर मग उत्तम रचना करितां येत असूनहि जाणूनबुजून अधम रचना करण्याचा खटाटोप पंतांनीं कां करावा ? याचें उत्तर हेंच कीं, निसर्गतः निरोगी प्रकृति असलेल्या मनुष्यालाच तालमींत जाऊन आपलें शरीर अधिक घटविण्याची लहर येणें जसें स्वाभाविक, तसें उत्तम काव्य करतां येत असूनहि चित्रकाव्यें रचून आपल्या बुद्धीला चार वळसे देण्याची लहर कोणा कवीस येणें साहजिक आहे. याशिवाय या प्रश्नाला आणखीहि एक बाजू संभवते. ती अशी कीं, पंतांच्या वेळीं सार्वत्रिक अभिरुचिच अशा काव्यांना अधिक प्रोत्साहक असावी. पंतांचा पंढरपुरस्थ मित्र राम वडवे यानें आपल्या मोरेश्वरवर्णनामध्यें ' अष्टोत्तरशत केलीं जेणें रामायणें प्रथमस तीं ' अशी रामायणांची प्रशंसाच केली आहे. चित्रकाव्याविषयीं नावड दाखविणारा पक्ष त्यावेळीं उपस्थित असता, तर पंतांनीं चित्रकाव्यें केलीं नसतीं असें आम्हांस वाटतें. तात्पर्य, पंतांनीं चित्रकाव्यें खरडण्यांत व्यर्थ वेळ दवडिला असा फलशून्य वाद आतां माजविण्यापेक्षां पंतांनीं चित्रकाव्यें किती सफाईदार रचिलीं याच दृष्टीनें वाचकांनीं या रामायणांकडे पहावें, असें आम्ही पुनःपुनः म्हणतों. "

चित्रकाव्याविषयीं जसा नव्या पिढींत अनादर डोकावतो तशीच जुन्या संस्कृत एकांगी विद्वत्तेबद्दलहि अनास्था दृष्टीस पडते. पण तींतील गुण रक्षण करावयाचे झाल्यास तिचीहि शुभ्र बाजू मांडून दाखविली पाहिजे. तें काम ' संस्कृत विद्येचें पुनरुज्जीवन ' या लेखांत फर्से केलें आहे, तें पहा. संस्कृत

पांडित्य व शिक्षणपद्धतिहि एकांगी, हा तीवरील मुख्य आरोप. त्यासंबंधीं लेखक लिहितो कीं " निवळ एकांगी शिक्षणापेक्षां अनेकांगी शिक्षण अधिक चांगलें हें कोणीहि कबूल करील. पण एकांगी शिक्षणाचेहि कांहीं फायदे असतात. एकाग्रता ही शरसंधानाप्रमाणें विद्याभ्यासासहि उपयोगी आहे. मानवी मनाच्या समीकरणांत एका गोष्टीला जें लक्ष दिलें तें दुसऱ्या गोष्टीवरून कमी झालें, हें व्हावयाचेंच. जुन्या पद्धतीच्या शिक्षणांत खरी एकाग्रता असे. यामुळेंच जुन्या काळचा उत्तम वैयाकरण किंवा नैयायिक घेतला तर व्याकरण किंवा न्याय या विषयांत त्याला अगोचर असा कोणताहि ग्रंथ, उपग्रंथ किंवा वादाचा मुद्दा सहसा राहत नसे. जुन्या पद्धतीचा दुसरा एक विशेष म्हटला म्हणजे स्मृतिसामर्थ्य. हातांत पुस्तक धरून अध्यापन करणें हा पूर्वी एक प्रकारचा कमीपणा मानला जाई. शिष्याकडून अध्ययन करवितांना गुरुजींच्या हातास चाळा हवाच असला तरी तो ग्रंथाचीं पानें चाळण्याचा नसे; तर पत्रावळी लावणें, तपकीर ओढणें, सुपारी कातरणें असला असे. जुने पंडित हे चालते बोलते ग्रंथ असत. आतां या एकांगी अध्ययनामुळें विषयाबाहेरचा मुद्दा निघाल्यास जुन्या पंडितांस पाण्याबाहेर काढलेल्या माशासारखें वाटे व अंगीं व्यवहारचातुर्य नसल्यानें ते क्वचित् यट्टेस पात्र होत हें खरें. पण अनेकांगी अशी जी आधुनिक शिक्षणपद्धति तिचेहि नफे—तोटे असेच आहेत. नव्या युगांत ग्रंथसंग्रह विपुल. साधारण उद्योगशील अशा कोणत्याहि विद्यार्थ्यास अमुक विषयांतलें थोडें तरी माहीत नाहीं, असें सहसा व्हावयाचें नाहीं. गुलाबदाणींतल्या कारंजांतून निघाल्याप्रमाणें आधुनिक विद्वानाच्या मुखांतून प्रसंगोपात्त विद्येच्या सहस्रधारा एकाच वेळीं स्रवत असून, शिवाय प्रत्येक धारेस निरनिराळ्या शास्त्रांचा निरनिराळाच सुगंध येत आहे, हा अजब चमत्कार पाहून जुन्या काळचा पंडित आश्चर्यानें थक्क व्हावयाचा; पण हें सर्व दिखाऊ आहे हें त्या बिचाऱ्यास काय माहीत ! आधुनिक विद्वानाच्या ज्ञानाची लांबी-रुंदी फार विस्तृत, पण त्याची खोली फार थोडी असते. यामुळें विद्यासमुद्राच्या तळाशीं बुडी मारून मोतीं वर आणणें हें त्याला दुष्कर होय. फार तर त्यानें सरस्वतीच्या क्रीडासरोवरांतील कमळांबरोबर उथळ पाण्यांत खेळावें ! " असो.

हरतऱ्हेच्या नवीन, मनोरंजक व उपयुक्त माहितीचा ताणा व स्नेहशीतल युक्तिवादाचा बाणा यांचा सणंग विणून वाचकांस अर्पण करावयाचा हा संयत्न सर्वत्र दिसतो. भरदार भरपूर माहितीच्या सूत्रामुळें हें सणंग जसें ठाशीव झालें आहे. तसेंच स्नेहार्द्रतेमुळें चिवट मजबूत बनलें आहे. पण गिऱ्हाईक

नुसती मजबुतीच पहात नाहीं. त्याला मजबुतीबरोबरच मनमोहकपणाहि पाहिजे. या दृष्टीनें या टिकाऊ शेल्यावर कलाविलासाच्या रेशमानें, प्रतिभेनें जी सुंदर वेलबुट्टी काढली आहे तो या महानत्त्वाचा आणखी एक विशेष होय. चिरकालिकाच्या दृष्टीनें हा विशेष अधिक महत्त्वाचा होय. पक्क्या रंगानें रंगविलेल्या वस्त्राचे धागेदोरे झिजूं लागले तरी रंगाची झांक शेवटपर्यंत टिकावी, तशी माहिती कालांतरानें शिळी झाली तरी प्रतिभेनें उडविलेला शिडकाव पूर्वीइतकाच तजेल रहावा असा अनुभव अपरिचित नाहीं. आणि मनोहर शिडकाव उडविण्याची आवड कलाप्रेमी प्रतिभेत उपजतच असते. ती निरोप सांगण्यास म्हणून घराबाहेर पडली तरी वाटेंत गुलाबाचें फूल नजरेस पडल्यास तें खुडून डोक्यांत खोवल्यावांचून राहणार नाहीं; कीं, पुष्करणी आढळल्यास मोकळेपणानें पाय सोडून मिनीटभर तरी कमलांची शोभा पाहिल्याशिवाय राहणार नाहीं. आणि निरोप सांगतांनाहि तो अशा गोडव्या शब्दांत व मानेला असा सुंदर हिसडा देत सांगते कीं, निरोप ऐकून झाल्यावर किती तरी वेळ ऐकणारा या रमणीय दूतीचा मोहक हावभाव आपल्या कल्पनेनें पुनःपुनः निरखून पहात असतो. तोच निरोप, त्याच मधुर कंठांतून तशाच मनमोहक रीतीनें पुनःपुनः ऐकावा असें वाटतें, तसेंच कलाविलासानें नटलेला निबंध पुनःपुनः वाचला तरी अवीट वाटते. असलीं कलाविलासाचीं स्थानें ह्या स्फुट निबंधांत पहाणाराला किती तरी आढळतील. वर्षर्तु संपून गेल्यावर मोकळ्या माळावर हरतऱ्हेचीं लहानसहान सुंदर फुलें सर्वत्र उगवलेलीं असतात, तशीं रमणीय उपमा-उत्प्रेक्षांचीं सुमनें जागोजागीं आढळतील; पण जेथें या फुलांचे सुंदर गालिचे बनलेले आहेत असे दोन तीन ताटवे पहा:—

पहिला उतारा संस्कृत विद्येचें पुनरुज्जीवन या लेखांतील घेऊं या. संस्कृत विद्येचें पुनरुज्जीवन या लेखांत परिस्थितीच्या कलाटणीमुळें माणूस जुन्या किंवा नव्या शिक्षणपद्धतीकडे कसा खेंचला जातो हें विशद करण्याकरितां म्हणून रँग्लर परांजपे यांचें उदाहरण घेतलें आहे. त्यांत प्रो. कर्व्यांचा आश्रय न मिळता तर परांजपे हे रँग्लर होण्याऐवजीं ते रघुनाथभटजी झाले असते येवढाच मजकूर सांगावयाचा आहे. पण रँग्लर-परांजपे व रघुनाथभट्ट परांजपे या दोन भूमिकाच इतक्या परस्पर-विसंगत आहेत, कीं त्या कल्पनेनें एकत्र मांडून त्या विसंगतीची मौज पाहण्याचा मोह कलाप्रेमी प्रतिभेला पडल्याविना कसा राहणार ! या कल्पनातरंगांत असतां इंग्रज लेखक लिहितो कीं "कर्व्यां-

सारखा आधुनिक विद्वान् हातीं धरण्यास न व्यामता तर रघुनाथास पंत ही पदवी न मिळतां भट्ट ही पदवी मिळाली असती. इंग्लंडांत कॅमनदीच्या कांठीं साइनथीटा कॉसथीटा या शब्दांचा पाठ तोंडांतून निघण्याऐवजीं मुर्डी गांवच्या परसांतील आवारांत नारळीपोफळींना पाणी लावींत लावींत वेदांतील ऋचांच्या जटापाठांचीं व वनपाठांचीं त्यांचीं आवर्तनें चालतीं; लुसलुशीत सुगंधी पियर्स सोपाऐवजीं नित्य सामिध शेकलेल्या अग्निकुंडांतील भरड भस्मच ते अंगास चर्चित वसते; केंब्रीजच्या पदवीधराच्या काळ्यानिळ्या शिपतरी टोपीऐवजीं हिरवी फीत लावलेली, तांबडी बनातीची टोपीच त्यांच्या डोक्यावर राहती; लॉर्ड कर्झन यांनीं प्रौढीनें वर्णिलेल्या ब्ल्यू रिवनऐवजीं दगडी चातीनें कातलेल्या व बोजड ब्रह्मगांठ मारलेल्या यज्ञोपवीताचाच ते अभिमान बाळगते " वगैरे. किंवा दुसरें एक उदाहरण म्हणून इतिहाससंशोधकाचें पुढील वर्णन पहाः–" इतिहाससंशोधक हा हातीं राज्याधिकार कार्डाचा नसतांहि प्रतिराजाच होय. संशोधकमहाराजांचा राजवाडा रंग उडून गेलेल्या चित्रांनीं भूषित असतो. त्यांचें सिंहासन म्हणजे पुसट लेख असलेला जुना दगड. त्यांचीं राज्यवस्त्रें म्हणजे कसरीनें खाल्लेले जुनाट कागदपत्र. त्यांच्याहि खजिन्यांत नाणीं भरलेलीं असतात, पण बाजारांत एकहि चालत नाहीं; आसपास अंधश्रद्धा व तर्कवितर्क यांचा गराडा पडून राहिलेला; अशा शून्य राज्यांत राज्य करणाऱ्या या राजाची मुद्रा म्हणजे शिक्कामोर्तबहि आहे. पण त्याच्या आज्ञापत्रानें वीटभर जमीनहि कोणाला दिली-घेतली जात नाहीं, आणि सैन्यदळच काय पण झाडाचें दळ म्हणजे पानहि तो हलवूं शकत नाहीं. " वगैरे.

आतां भविष्यकथन या निबंधांतील एक उतारा पाहूं या. भविष्य जाणण्याच्या लालसेंत आपल्या इच्छेच्या पोटीं सुप्त असणारें भाग्याचें नशीबच आपल्या पदरीं आहे तें आपणास कळावें अशी इच्छा असते. पण सर्वांचा आदर्श एकच स्वरूपाचा असतो, असें नव्हे. समाजांत मतवैचित्र्य भरपूर असतें. मग सगळ्यांचीच सोय कशी लागणार ? हा विषय प्रस्तुत आहे. येथें सगळ्यांचीच सोय लावण्याचा कोणीं प्रयत्न केलाच तर तो देखावा कसा दिसेल हें कल्पनेनें मांडून दाखवितांना लेखक लिहितो कीं, "–प्रत्येकाच्या इच्छेप्रमाणें समाजस्थिति एकेक दिवस तरी रहावी असें समजा, जर ईश्वराकडून ठरविण्यांत आलें तर वर्षभर रोज एक एक नवाच रंग कसा होईल तो पहा. एक दिवस पाळण्यांतल्या पोरांना बाळिंगें बांधतां येत नाहींत म्हणून पाळण्यालाच बाळिंगें बांधून झालेले बाळकिशाद दृष्टीस पडतील तर

दुसरे दिवशीं म्हातारपणीं झालें तरी तांब्याभर पाणी द्यायला कोणी सत्तेचें माणूस नको काय ? अशी सबब सांगून नववधूसंपादनाची लालसा धरणारे थेरडे अंगावर लपविलेली सुपारी हुडकून काढण्याचा खेळ आपल्या नवोढाशीं खेळत आहेत असें दिसेल ! आपल्या मृतपतीची धडधडणारी चिता हाच आपला खरा मोक्षमार्ग असें मानून तिजमध्यें आनंदानें प्रवेश करणारी साध्वी आज दिसेल, तर उद्यां पहावें तों साठीच्या जवळ आल्यानें नाठीबुद्धि झालेल्या प्रौढ कामिनी स्वैर पुनर्विवाहप्रसंगीं विडया तोडण्याकरितां नव्या करकरीत अशा दांताच्या कवळ्या जबडयांत बसवूं पाहत आहेत असें दिसेल ! आज पहावें तों मृगचर्मावर बसून पवित्र चमसानें वेदीमुखांत गोरस ओतून श्रौताग्नि प्रदीप्त करणाऱ्या अग्निहोत्र्यांच्या वषट्काराचा गंभीर ध्वनि चहूंकडे ऐकूं येईल, तर उद्यां मृगचर्माचे बूट पायांत चढवून वेत्रासनाधिष्ठित होऊन आणि स्फटिक चमसांतून आधुनिक सोमरसाचें पान झाल्यामुळें प्रदीप्त झालेला जठराग्नि पुढें लागलीच दुसऱ्या एका गोरसाचा स्वाहाकार करून शमवीत आहेत असें दिसून येईल. आज निर्जनवनांत गाईच्या शेणानें सारविलेल्या साध्या गवताच्या झोंपडींत आसनावर बसून व मांडीवर भूर्जपत्र घेऊन शिंपल्यांतील लाल्या शाईनें धर्मसिंधूच्या पोथ्या लिहिणारे दरिद्री विद्वान् चहूंकडे दिसतील, तर उद्यां गजबजलेल्या शहरांत लोहप्रासादाच्या दहाव्या मजल्यावर बसून शेंकडों मैल दूर असणाऱ्या आपल्या कारखान्यांतील सुपरिंटेंडंटला टेलिफोननें दैनंदिन आज्ञा सोडणारे लाखोपति चहूंकडे डोळ्यांला दिसूं लागतील, पण या सर्व कल्पना झाल्या. त्यांतील एकहि सर्वस्वीं खरी ठरण्याचा संभव नाहीं ."

शेवटीं नटाच्या धंद्याची वकिली व हौशी नटाचें वर्णन देऊन आटोपतें घेतों. नटाकडे पाहून नाक मुरडणाऱ्या शिष्टांना उद्देशून लेखक लिहितो कीं, " नाटकग्रंथकार हा नाटक लिहिण्यानें जर निंद्य ठरत नाहीं, तर त्या नाटकाचा प्रयोग करणारा नटवर्ग निंद्य ठरविणें गैर नाहीं काय ? जगांत तरी बहुतेक व्यवहारांत नाटक काय थोडें भरलें आहे ? भरसमाजापुढें तात्पुरतें वेषांतर करून म्हणजे झगा घालून न्यायासनापुढें उसनीं भांडणें घेऊन द्रव्याकरितां अवघ्या एक दोन तासांत जो दहापांच भूमिका घेतो तो वकील नटच नव्हे काय ? हा पहा आतां वादी तर पुढच्या क्षणास प्रतिवादी; आतां फिर्यादी तर लगेच आरोपी; आतां रस्तेलूट झाल्यामुळें दुःखी झालेली विधवा, तर दुसऱ्या क्षणीं आपला गुन्हा छपविण्याकरितां साक्षीदाराची कसून उलट

तपासणी करणारा अट्टल चोर; या क्षणास धर्मशास्त्राचे आधारानें दत्तकपुत्रांचे हक्क सिद्ध करून दाखविणारा सल्लागार, तर पुढल्या क्षणीं दत्तकपुत्रांमुळें वंचित झालेल्या मातेची कड घेऊन नीतितत्त्वांचे वळशावर वळसे उगाळणारा प्रतिनिधि. अशा वकिलाच्या एक का दोन भूमिका म्हणून सांगाव्या ! या सर्व भूमिका करितांना व्यक्ति एकच असतां रसानुकूल अभिनिवेश मात्र वेगवेगळे दाखविणाऱ्या वकिलांस नट कां म्हणूं नये हें मला तरी समजत नाहीं ! तीच गोष्ट इतर धंद्यांची. मोतीविक्या जेव्हां आपल्या मालाची स्तुति करतो, वाणी जेव्हां खोटा पासंग लावला असतांहि पारडें गिऱ्हाइकाकडेच झुकतें आहे असें दाखवितो, हरिदास जेव्हां तीन हात लांब व दोन हात रुंद अशा बैठकीवर कृष्णलीला वर्णन करितांना राधाकृष्ण, पेंद्या वगैरे होऊन निरानिराळे रस आळवितो तेव्हां तो एक प्रकारचें नाटकच करितो कीं नाहीं ? मग नाटककाराचा-च धंदा निंद्य कां मानावा ! " अशा रीतीनें तरफदारी केल्यानंतर लेखक पुढें लिहितो कीं, " पुष्कळ वेळां माझ्या कल्पनादृष्टीसमोर खालील देखावा दिसतो. एखादा सुशिक्षित पदवीधर समजा एम्. ए., एल्एल्. बी. स्वतंत्र धंद्यांत दरमहा चार पांचशें रुपये मिळवितो, त्यास नाट्यकलेचा नाद आहे. व तो केवळ शोका-करितां एखाद्या प्रतिष्ठित नाटकमंडळीचा भागीदार झालेला आहे. तो आपल्या शहरीं मंडळी असेपर्यंत आठवड्यांतून एक वेळ प्रयोगांत आपला पार्ट करतो. शनिवारीं संध्याकाळीं जरा लवकर जेवण करून तो आपल्या गाडींत बसून प्रयोगाचे वेळेपूर्वी एक तासभर नाटकगृहांत येऊन दाखल होतो. खिदमत-दाराचे हातीं घोडा देऊन तडक नाटकगृहांतील आपल्या खोलींत जातो व पेहराव पालटून आपली भूमिका करतो. खेळ संपतांच फिरून आपला वेष पालटतो व मंडळींत बसून कॉफीचा पेला घेत घेत प्रत्येक पात्रास त्याचे गुण-दोष सांगून, फिरून आपले गाडींत बसून घरीं जातो, व दुसरे दिवशीं सकाळ-पासून पूर्ववत समाजांत मिसळून जातो. " असो.

शेवटीं या निबंधांचा आणखी एक गुण लक्षांत येतो तो म्हणजे प्रमाणबद्ध रचना हा होय. वर्तमानपत्री लघुनिबंधाची लांबी-रुंदी ही परिस्थितीनेंच ठरवून टाकलेली असते. आंखून दिलेल्या या मर्यादेत जागेंतच लघुनिबंधाला आपली करामत करून दाखवावयाची असते. निबंध लहान असला तरी स्वतःपुरता परिपूर्ण असा पाहिजे, मोठ्या आम्रवृक्षाच्या लहानशा फांदीसारखा नव्हे, तर कलमी आंब्याप्रमाणें आकारानें लहान, पण पत्रपुष्पफळ वगैरे सर्व अवयवांनी संपूर्ण असा असला पाहिजे. चारदोन परिच्छेदांतच

सर्व संसार थाटावयाचा असल्यानें पहिल्याच परिच्छेदकांत विषयाची ओळख पटली पाहिजे व त्याविषयीं जिव्हाळा वाटूं लागला पाहिजे. म्हणजे विजेच्या गाडीप्रमाणें त्यांस पहातां पहातांच वेग आला पाहिजे व मुख्य मुख्य टप्पे घेऊन चारदोन परिच्छेदांतच प्रमेयाचा मुक्काम गांठला पाहिजे. तो गांठण्यास विषयाच्या अंगोपांगांचें ज्ञान कमी पुरतें असें नव्हे, तर विशिष्ट प्रसंगाला अनुलक्षून विषयाच्या अनेक अंगोपांगांपैकीं कोणतीं अंगें नेमकीं परिणामकारक होण्यासारखीं आहेत हें हेरण्याची दृष्टि लागते. या दृष्टीनें निवड व मांडणी झाली म्हणजे आकारानें लहान असा हा निबंध बांधेसूद रेखीव व घाटदार बठतो. तो कसा हें केळकरांचे निबंध हमेप वाचावयास मिळत असणाऱ्या वाचकांना सांगावयास हवें असें नाहीं.

# ३. चरित्रकार केळकर

( प्रो. श्रीनिवास नारायण बनहट्टी, एम्. ए., एलएल्. बी., नागपूर )

प्रस्तुत लेख लिहिण्याचें पत्करलें तेव्हां साहजिकच त्याच्या संबंधानें मनांत अस्फुट स्वरूपाचे कांहीं विचार घोळूं लागले. प्रथम क्षणभरच असें वाटलें कीं, तात्यासाहेबांचा वाङ्मयगिरि केवढा तरी प्रचंड ! त्याच्या एका विभागाचेंच कां होईना आलोचन व विवेचन आपल्या हातून कसें होणार ? परंतु ही कल्पना जितक्या झपाट्यानें आविर्भूत झाली तितक्याच झपाट्यानें खंडित होऊन अंतर्धानहि पावली. तात्यासाहेबांच्या लिखाणाला गिरीची उपमा देणें अगदींच अप्रयोजक; गिरीची दुर्गमता व ओबडधोबडपणा यांचा लेशहि तात्यासाहेबांच्या वाङ्मयांत नाहीं. त्यांच्या वाङ्मयाला सागराची उपमा द्यावी म्हटलें तर सागराचा खारटपणा आड येतो. शिवाय सागराचा अथांगपणा कमालीचा; तो रत्नाकर असला तरी त्यांतून रत्नें काढणें फारच कष्टाचें; केळकरांच्या लिखाणामधील वाग्ररत्नें सहजप्राप्य आहेत. वाङ्मयाला उद्यानाची उपमाहि पुष्कळ वेळां देतात. परंतु केळकरांच्या लेखनाच्या बाबतींत तीहि फारशी समर्पक वाटत नाहीं. उद्यान नुसतें बाहेरून डोळ्यांना व फार तर घ्राणाला तृप्ति देणारें; अंतर्गत पुष्टि कांहीं त्याच्यापासून मिळणारी नव्हे. म्हणूनच केळकरांचें वाङ्मय म्हणजे एक थाटाची सुग्रास मेजवानी आहे, अशी कल्पना केल्यास ती पुष्कळ अंशानें जुळेल असें मला वाटतें. मेजवानींत ज्याप्रमाणें नाना तऱ्हेचे चमचमीत, खमंग, उत्तेजक पदार्थ असतात, परंतु मुख्य अन्न गोड, सात्त्विक आणि पुष्टिकर असतें, त्याप्रमाणें केळकरांच्या वाङ्मयसंभारांत अनेक चुरचुरीत, सणसणीत, विनोदपूर्ण, उपहासयुक्त लेख आहेत; परंतु त्यांतील मुख्य भाग सात्त्विक, मनास पुष्टि देणारा असाच आहे. त्यांचें चरित्रात्मक लिखाण सर्व अशाच तऱ्हेचें म्हणजे गोड, सात्त्विक व पुष्टिदायक आहे, हें अवलोकनाअंतीं सहज दिसून येतें. तें भव्य असलें, तरी त्यांत दुर्गमता नाहीं; विस्तृत असलें तरी त्यांत खारटपणा नाहीं व सुंदर असलें तरी त्यांत कृत्रिमता व केवळ दिखाऊपणा नाहीं.

तात्यासाहेबांइतका चतुरस्र व बहुरंगी लेखक अजून आधुनिक महाराष्ट्रांत झाला नाहीं, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होण्याचा मुळींच संभव नाहीं. इतर लेखक आपआपल्या विशिष्ट क्षेत्रांमध्ये अत्युच्च पद पावले असतील; परंतु केळकरांच्या लेखणीचें सर्वतोगामित्व पाहूं गेलें असतां मोठें अद्भुत व चमत्का-

रिक वाटतें. ज्यांच्या लेखनशैलीचें व सामर्थ्याचें वांचकांनीं खरोखरच कौतुक करावें असे लेखक आधुनिक काळांत मराठींत पुष्कळच होऊन गेले व सध्याहि हयात आहेत. परंतु त्यांच्या वाङ्मयविषयक कर्तबगारीस एका प्रकारची परिसीमा असल्याचें आपल्यास आढळून येतें. खुद्द लोकमान्य टिळक हे केसरी-चें काम संभाळून फावल्या वेळांत नाटक लिहीत आहेत व पदांच्या चाली वगैरे बसविण्यासाठीं बालगंधर्वांच्या आणि त्यांच्या रोज बैठकी चालू आहेत, असें जर चित्र कोणीं आपल्या मनासमोर उभें करण्याचा प्रयत्न केला, तर तें किती विलक्षण वाटेल! असें दृश्य कल्पिण्याची आपल्या कल्पना-शक्तीवर कोणीं जबरदस्ती चालविलीच, तर विजेचा धक्का बसावा त्याप्रमाणें उपर्युक्त चित्रांतील दोन्ही अंगांच्या विरोधाचा चटका त्याला इतका जोराचा बसेल कीं त्याची कल्पनाशक्ति तेवढ्यापुरती विकल होईल व तें चित्र त्याच्या हातून पुरें होणार नाहीं. त्याचप्रमाणें वामनराव जोशी हे 'होऊं द्या तर दोन हात' किंवा 'चोरांच्या उलट्या बोंबा' यांच्या वर्गांत पडणारें एखादें सणसणीत, झोंबणारें, वर्दळीवर येऊन लिहिलेलें वर्तमानपत्री 'आर्टिकल' लिहावयास बसले आहेत; किंवा भारताचार्य चिंतामणराव वैद्य हे कॉलेजांत आलेल्या एखाद्या रम्य व हुरहुर लावणाऱ्या अनुभवावर सुंदरसें वीणागीत लिहावयाच्या बेतांत आहेत; किंवा विष्णुशास्त्री चिपळूणकर हे 'आर्यांचें मूलस्थान' किंवा 'गीतारहस्य' यांसारखा एखादा गहन शास्त्रीय ग्रंथ लिहिण्याच्या खटाटोपां-त निमग्न आहेत;—या किंवा अशाच कल्पना आपण करूं लागलों तर त्या विसंवादी व असंभाव्य आहेत, असें चटकन् आपणासच भासतें. उलट केळकरांच्याविषयीं कोणतीहि कल्पना करून पाहिली तरी ती विसंवादी अशी आपणास वाटत नाहीं. तात्यासाहेबांनीं आजवर वर्तमानपत्री आर्टिकलें लिहिलीं आहेत, निबंध लिहिले आहेत, टीकात्मक लेख लिहिले आहेत, 'सुभाषित आणि विनोद' यांसारखे वाङ्मयविवेचनात्मक, 'मराठे आणि इंग्रज' यांसारखे ऐतिहासिक व 'राज्यशास्त्र' यांसारखे शास्त्रीय चर्चात्मक प्रबंध लिहिले आहेत; चरित्रें लिहिलीं आहेत; नाटकें रचलीं आहेत; गोष्टी लिहिल्या आहेत; काव्यें केलीं आहेत;—तात्पर्य त्यांची लेखणी वाङ्मयाच्या सर्व क्षेत्रांतून आजपर्यंत वावरली आहे, आणि ती देखील कशीतरी गचाळ-पणानें, गयथानासारखी वावरली आहे, असें नसून विचक्षण लोकांना देखील कौतुकावह होईल, असा सलील सविभ्रम संचार तिनें सर्वत्र केला आहे. तात्यासाहेबांनीं अद्यून कादंबरी लिहिली नाहीं, तथापि ते कादंबरी लिहिणार

आहेत अशी बातमी लोकांनीं ऐकली तर लोकांना त्यांत विसंवादी किंवा अत्यंत विलक्षण असें कांहीं वाटत नाहीं. उलट ते कांहीं तरी चमत्कृतियुक्त व नावीन्यपूर्ण परंतु सफाईदार अशीच एखादी नवलकथा निर्माण करतील असें लोकांस वाटून त्यांचें कुतूहल जागृत होईल, इतकी त्यांच्या चतुरस्रतेची छाप लोकांच्या मनावर बसली आहे.

वाङ्मयाच्या सर्व क्षेत्रांमधून पसरलेल्या या त्यांच्या लिखाणाचें निरीक्षण करणें विशेषसें कठिण नसून उलटें सुलभ व आल्हाददायक आहे. त्यांनीं निर्मिलेल्या वाङ्मयाचे प्रकार निरनिराळे असतील, परंतु त्या प्रकारांमधून दृग्गोचर होणारें त्यांचें अंतरंग किंवा व्यक्तिमत्त्व हें असें आहे कीं सामान्य लोकांस त्याचें आकलन होण्यास बिलकुल अवघड वाटूं नये. हें त्यांचें व्यक्तिमत्त्व, किंवा त्यांची प्रवृत्ति, कशा प्रकारची आहे, निरनिराळ्या वाङ्मयप्रकारांमधून तिचा आविर्भाव कसा काय झालेला दृष्टीस पडतो, हें जाणून घेतलें म्हणजे त्यांनीं लिहिलेल्या वाङ्मयाचें रहस्य आपण अवगत करून घेतल्यासारखें होईल. कित्येक ग्रंथकारांचे ठायीं अनेक प्रकृति किंवा मनोवृत्ति एकत्र वसत असलेल्या दिसतात. त्यांची एक प्रकृति दुसऱ्या प्रकृतीशीं विसंगत किंवा विरोधी नसली तरी दोन्ही प्रकृति परस्परांहून अगदीं भिन्न असतात, ही गोष्ट स्पष्टपणें नजरेस येते. टिळकांचेंच उदाहरण घेतल्यास परस्परभिन्न अशा दोन प्रकृतींचें अस्तित्व स्पष्ट दिसून येईल. त्यांची एक प्रकृति गहनशास्त्राभ्यासी व चिकित्सक अशा पंडिताची होती, तर दुसरी प्रकृति लढाऊ वृत्तीच्या चळवळ्या राजकारणी पुढाऱ्याची होती. या दोन्ही प्रकृति टिळकांच्या ठिकाणीं जरी एकवटल्या होत्या तरी त्यांच्यामध्यें परस्पर अविनाभावित्वाचा संबंध होता व त्या दोन्ही नेहमीं एकत्र असावयाच्याच असें मुळींच म्हणतां येत नाहीं. उलट यांपैकीं एकेका प्रकृतीचेंच अस्तित्व ज्यांच्यामध्यें असतें असेच लोक सर्वत्र बहुधा दिसून येतात. डॉ. भांडारकर, बाळाजी प्रभाकर मोडक, शंकर बाळकृष्ण दीक्षित, भीमाचार्य झळकीकर इत्यादि उदाहरणें हीं एका बाजूचीं म्हणजे केवळ पंडिती प्रकृतीच्या ग्रंथकारांचीं म्हणून देतां येतील; तर गोपाळ कृष्ण गोखले, मुंजे, अभ्यंकर, गंगाधरराव देशपांडे हीं केवळ चळवळ्या राजकारणी पुरुषांची उदाहरणें म्हणून दाखल करितां येतील. टिळकांच्या बाबतींत परिस्थितीच्या प्रभावामुळें त्यांची राजकारणी प्रकृति हीच वर उसळून येऊन त्यांच्या जीवनाची स्वामिनी होऊन बसली. तथापि त्यांचें मनःसामर्थ्य दांडगें असल्यामुळें

च सुदैवानें म्हणा, दुर्दैवानें म्हणा, बंदिवासाची फुरसत त्यांना अनेकवार मिळाल्यामुळें त्यांच्या पंडिती प्रकृतीनेंहि आपला प्रभाव दाखविण्यास कमी केलें नाहीं; व 'मृगशीर्ष', 'आर्यांचें मूलस्थान' 'गीतारहस्य' इत्यादि चिरस्मरणीय ग्रंथांच्या द्वारें ती प्रगट झालीच. परिस्थितीचा प्रभाव जरी उलट असला, तरी प्रकृतिस्वभाव कसा उसळी मारून वर येतो याला उदाहरण एका तऱ्हेनें भाऊशास्त्री लेले यांचें देतां येईल. हे गृहस्थ खरोखर शास्त्री व वैदिक होते. परंतु स्वभाव चळवळ्या पडल्याकारणानें यांनीं वर्तमानपत्र काढलें, मासिक पुस्तक सुरू केलें, इतरहि अनेक उद्योग केले; आणि लोकांवर टीका करीत व स्वतःवर करून घेत त्यांनीं आपलें जीवन व्यतीत केलें.

प्रकृतीची किंवा मूलभूत प्रवृत्तीची ही मीमांसा हरएक मनुष्याच्या संबंधानें जरी करतां येण्याजोगी असली, तरी ग्रंथकार किंवा वाङ्मयनिर्माते यांच्यासंबंधानेंच आपणांस तूर्त विचार कर्तव्य आहे. टिळकांच्या दाखल्याचें स्पष्टीकरण वर याचकरितां केलें आहे. त्यांचें 'आर्यांचें मूलस्थान' इ० ग्रंथ पंडिती प्रकृतीचे ज्ञापक आहेत, तर केसरींतील लेख चळवळ्या राजकारणी प्रकृतीचे निदर्शक आहेत. अशींच इतर वाङ्मयवीरांचीं उदाहरणेंहि देतां येतील. शेक्सपियर हा जरी केवळ नाटककारच असला तरी तो बहुप्रकृतिक होता, यांत संशय नाहीं. त्याचीं सुखपर्यवसायी नाटकें हीं त्याच्या आशामय, समाधानी, विनोदपर अशा प्रकृतीचीं निदर्शक होत; तर त्याचीं शोकपर्यवसायी नाटकें हे त्याच्या निराशाग्रस्त, चिटलेल्या रौद्र प्रवृत्तीचे उद्गार होत, असें स्थूलमानानें म्हटलें असतां चालणार आहे. शेरिडन नामक नाटककाराचें उदाहरण तर याहून उघड आहे. कौशल्यपूर्ण रचना, वेचक संवाद चोचक व्याजोक्ति, खुबीदार विनोद, मजेदार संविधानक, यांनीं युक्त अशीं बहारीचीं नाटकें तरुणपणीं ज्यानें लिहिलीं तोच पुढें प्रौढ वयांत पार्लमेंटमधील उदारपक्षाचा पुढारी होऊन अप्रतिम वक्ता बनला!

बहुप्रकृतिक ग्रंथकारांचीं उदाहरणें याप्रमाणें बरींच देतां येतील, परंतु एकंदरीनें तसे लोक कमीच. गोल्ड्स्मिथनें कादंबरी लिहिली, नाटकें लिहिलीं, निबंधहि लिहिले. परंतु या सर्वांमधून त्याचें अंतरंग एकरूप असल्याची ओळख पटते. समाजस्थितीचें सामान्य चित्र वाचकांच्या डोळ्यांपुढें उभें करून समाजांतील व्यक्तींचे गुणदोष विनोदगर्भ वाणीनें दाखवावयाचे व सौम्य वाणीनें त्यांजवर टीका करावयाची;—हेंच गोल्ड्स्मिथच्या लिखाणाचें स्वरूप कादंबरींत काय, नाटकांत काय, किंवा निबंधांत काय, दृष्टीस पडतें. त्याच्या

विवेचनाचे विषय, त्या विषयांचा परामर्श घेण्याची त्याची पद्धत व त्याची लेखन-शैली हीं स्थूल मानानें सर्वत्र सारखींच दिसून येतात. आपल्याकडील उदाहरण घ्यावयाचें झाल्यास विष्णुशास्त्र्यांचें अगदीं ठळक म्हणून प्रथमच सांगतां येईल. विष्णुशास्त्र्यांचें सर्व लिखाण एकाच प्रकृतीचें निदर्शक आहे ही गोष्ट अगदीं उघड आहे. त्यांच्या केसरींतील लेखांपैकीं एखादा लेख निबंधमालेच्या पुस्तकांत छापला, किंवा निबंधमालेंतील लहानसा लेख केसरींतील लेखांमध्यें घुसडून दिला, तर बिलकुल विजोड दिसावयाचा नाहीं. श्री. वामन मल्हार जोशी यांचें लिखाण जरी अनेक वाङ्मयप्रकारांत समाविष्ट होत असलें तरी त्यांत दिसून येणारी प्रकृति एकरूपच आहे. तीच वादाची हौस, तीच तत्त्वजिज्ञासा, तीच विचारा-तिरेकामुळें चांगलें–वाईट, खरें–खोटें या आधारभूत कल्पना डळमळीत होऊन झालेली निरालंब स्थिति, तीच प्रसन्न व सोज्वळ भाषापद्धति ज्याप्रमाणें रागिणी, सुशीलेचा देव या कादंबऱ्यांत, त्याचप्रमाणें नीतिशास्त्रप्रवेश इत्यादि प्रबंधांतहि दृष्टीस पडते. तस्मात् हा ग्रंथकार एकप्रकृतिकच होय असें म्हणावें लागतें.

केळकरांच्या वाङ्मयात्मक प्रकृतीसंबंधानें अशाच तऱ्हेची मीमांसा करून कांहीं अंदाज बांधतां येतो कीं काय हें पाहूं. त्यांची प्रकृति एकरूपच आहे, कीं अनेकविध आहे, तिचें स्वरूप कसें काय आहे, याचा निर्णय करतां आल्यास त्यांच्या वाङ्मयात्मक कामगिरीचें रहस्य आपल्याला सुलभ रीतीनें अवगत होईल. केळकरांनीं अगदीं तरुणपणीं कर्तव्यक्षेत्रांत प्रवेश केल्यापासून आज-पर्यंत जर कोणतें एक कार्य अखंडितपणें केलें असेल तर तें वर्तमानपत्रकाराचें होय. वर्तमानपत्राचें क्षेत्र त्यांनीं स्वतःकरितां निर्माण केलें नाहीं, त्यांत प्रवेश करण्याची संधि योगायोगानेंच त्यांस मिळाली, हें खरें. तथापि मिळालेल्या संधीचा उपयोग करून घेऊन त्या व्यवसायाशीं पूर्णपणें तन्मय झाले असे केळकरच ! प्रारंभीं दहा बारा वर्षें 'मराठा' पत्राचे ते संपादक होते. त्यावेळीं मराठ्यांतील लेखनकौशल्याबद्दल अनेक मोठ्या गृहस्थांकडून हिंदुस्थानांत व विलायतेंत त्यांनीं वाहवा मिळविली होती. पुढें १९१० सालीं केसरीचें संपा-दकत्व यांजकडे आल्यावेळेपासून, त्यांतील मतें कशींहि असोत, संपादकीय लेखनकौशल्याच्या दृष्टीनें त्यांनीं त्या पत्राचें स्वरूप किती उच्च दर्जाचें राखलें आहे हें सर्व महाराष्ट्रीयांस विदितच आहे.

जसा एखादा अंगरखा मनुष्याच्या अंगास अगदीं बेतशीर बसावा त्या-प्रमाणें वृत्तपत्राच्या संपादकाचा व्यवसाय केळकरांच्या मनोभूमिकेस अगदीं बेतशीर रीतीनें शोभून बसला आहे. कित्येक माणसांचे मनोगुण वर्तमानपत्र-

काराच्या कर्तव्यास अपुरे ठरतात, तर कित्येक माणसें त्यास पुरून उरतात. अशा दोन्ही प्रकारच्या माणसांची प्रकृति वर्तमानपत्रकाराची नव्हे हें उघड आहे. श्री. वामनराव जोशी उत्कृष्ट वर्तमानपत्रकार झाले असते किंवा होतील असें त्यांच्याविषयीं माहिती असलेला कोणी मार्मिक मनुष्य म्हणणार नाहीं. अर्थात् असें आहे म्हणून त्यांची एकंदरीनें जी योग्यता आहे ती कमी होते असें नाहीं. इतर दृष्टींनीं त्यांची योग्यता कितीहि असली तरी वृत्तपत्रकार या नात्याने ते अपूर्णच ठरतील. याच्या उलट टिळक व गांधी हे वृत्तपत्रकाराच्या भूमिकेस पुरून उरले. टिळक हे लढाऊ राजकारणी पुढारी असल्यामुळें आपल्या राजकीय युद्धांत वर्तमानपत्र हें केवळ एक साधन म्हणून त्यांनीं उपयोगांत आणलें. वृत्तपत्राच्या प्रकृतीस सोसणार नाहीं इतकें धाडस व इतका तिखटपणा त्यांनीं आपल्या 'केसरी' पत्रांत ओतला. म्हणून त्याचें तेज असह्य होऊन त्यांच्या कारकीर्दींत त्यांजवर प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष संकटें आलीं.

याच्या उलट खऱ्या वृत्तपत्रकाराचे अंगीं जे गुण असणें अवश्य आहे ते, आणि तेवढेच, गुण केळकरांमध्यें पूर्णतेनें असलेले दृष्टीस पडतात. पैकीं सर्वांत मोठा गुण म्हणजे लिहिण्याची अतोनात हौस हा होय. टिळकांनीं केसरींत पुष्कळ लिहिलें तरी त्यांना वर्तमानपत्री लेख लिहिण्याचा एकंदरींत कंटाळाच असे, ही गोष्ट प्रसिद्ध आहे. दुसरा गुण चांगला वाचनीय मजकूर जलद लिहिण्याची शक्ति. हा गुणहि वृत्तपत्राच्या संपादकास अवश्य आहे; कित्येकांच्या अंगीं हा नसल्यामुळें ते वृत्तपत्रकार होण्यास पात्र ठरत नाहींत. वरील दोन गुणांप्रमाणेंच समतोलपणा व साधकबाधक चर्चा करून युक्तिवादानें आपलें म्हणणें पटवून देण्याची कुशलता हीहि वर्तमानपत्रकाराचे अंगीं अवश्य पाहिजे. टिळकांचें लिहिणें आवेशी, शिवरामपंत परांजपे यांचें लिहिणें भावनोद्दीपक किंवा छद्मी, औपरोधिक असें असावयाचें. परंतु प्रतिपाद्य विषयाची भरपूर माहिती देऊन, 'उलट बाजूनें असें देखील म्हणतां येईल कीं' अशा तऱ्हेच्या शब्दांनीं विरुद्ध पक्षाचाहि यथायोग्य उपन्यास करून, वर्णनीय विषयामधील नाना तऱ्हेचे विरोधाभास, अनेक उलटसुलट विचारांच्या दिशा मनोरंजक रीतीनें दाखवून सरतेशेवटीं आपलें म्हणणें वाचकांच्या गळ्यांत बांधावयाचें ही केळकरांची लिहिण्याची नेहमींची पद्धत होय. आपला समतोल बिघडला असा तर वाचकांस कोठेंहि भास होऊं द्यावयाचा नाहीं; परंतु आपला मुद्दा तर न सोडतां प्रतिपक्षाच्या पदरांत वाईटपणाचें भरपूर माप घालण्यास तर चुकावयाचें नाहीं,—हीं लिहिण्याची खुबी केळकरांसच साधते.

आणि असें खुबीदार लिहिणें हेंच वृत्तपत्रकारास सर्वथैव योग्य होय. राजकारणी पुढारी आपल्याच पक्षाचा आग्रह धरूं शकतो; परंतु वृत्तपत्रकारास समतोलपणाचा देखावा कायम राखावा लागतो. लोकांच्या मनांत आवेश उत्पन्न करून त्यांस कार्यास प्रवृत्त करणें हा टिळकांच्या लेखांचा परिणाम होय. लोकांचें रंजन करून आपलें म्हणणें त्यांस पटवून देणें, हें कार्य केळकरांच्या लेखांमुळें होतें. परंतु वर्तमानपत्रांचें खरें व नेहमींचें कार्य एवढेंच होय. मतपरिवर्तनाचाच परिणाम लोकांच्या कृतीवर अप्रत्यक्ष रीतीनें का होईना जो होईल, तो प्रत्यक्ष रीतीनें अट्टाहासानें घडवून आणण्याचें काम वृत्तपत्राच्या संपादकाचें नव्हे. पिचकारी हातांत घेऊन औषधाचें प्रत्यक्ष इंजेक्शन करणाऱ्या डॉक्टराप्रमाणें टिळक आपलीं मतें व आपला असंतोष लोकांच्या मनांत घुसवीत. तर औषध कोणचें घ्यावें पथ्यपाणी कसें करावें, हें सामोपचाराच्या वाणीनें समजावून सांगणाऱ्या वैद्याप्रमाणें केळकरांचें लिहिणें असे.

आचरणाचा दंडक—अर्थात् चांगल्या अर्थानें—जसा श्रीकृष्णानें पाळला तसाच तो वृत्तपत्रकारास पाळावा लागतो; आणि तो पाळण्यास अनुकूल अशीच वृत्ति केळकरांचीहि आहे. त्याचप्रमाणें राजकीय विषयांच्या व्यासंगाची हौस हीहि वृत्तपत्रकाराचे अंगीं असावी लागते. कारण वर्तमानपत्र म्हटलें म्हणजे तें प्रमुखत्वानें राजकारणास वाहिलेलें असावयाचें हा ठरावच आहे. सुधारक, सुबोधपत्रिका यांसारखीं सामाजिक किंवा धार्मिक विषयांस वाहिलेलीं पत्रें असतात, तीं या सामान्य नियमास अपवादच होत. तेव्हां राजकारणाचा दृढ व्यासंग वृत्तपत्रकारास असणें अत्यंत अवश्य होय. त्याप्रमाणें केळकरांचा राजकारणाचा व्यासंग किती गाढ आहे ही गोष्ट महाराष्ट्रवाचकांस कांहीं सांगावयास नको. बहुश्रुतता, व्यवहारकुशलता, मनुष्यस्वभावाचें मार्मिक ज्ञान हे गुणहि वृत्तपत्रकाराच्या अंगीं मोठ्या प्रमाणांत असावे लागतात. ते तसे केळकरांच्या अंगीं आहेत ही गोष्टहि कोणास सांगण्याची आवश्यकता नाहीं.

तात्पर्य, केळकर हे हाडाचे वर्तमानपत्रकार आहेत; आणि ते अर्थात् कोणत्याहि लघुत्वद्योतक अर्थानें नव्हे तर श्रेष्ठ अर्थानें जॉन मोर्ले, डब्ल्यू. टी. स्टेड किंवा नुकतेच वारलेले ' मँचेस्टर गार्डियन ' चे सी. पी. स्कॉट (थोरले) यांस ज्या अर्थानें वृत्तपत्रकार म्हणावयाचें त्याच अर्थानें केळकर यांसहि म्हटलें पाहिजे. आपल्या हिंदुस्थानांत क्रिस्तोदास पाल, शिशिरकुमार व मोतीलाल घोष, कस्तुरीरंग आयंगार, सी. वाय्. चिंतामणि असे जे कांहीं

श्रेष्ठ वर्तमानपत्रकार झाले व आहेत त्यांच्याच मालिकेंत केळकर यांस बसविलें पाहिजे. त्यांचें कार्य जरी मुख्यत्वेंकरून मराठींत झालें असलें तरी उपर्युक्त वृत्तपत्रकारांच्या कार्याहून तें कोणत्याहि रीतीनें कमी दर्जाचें नाहीं.

तेव्हां केळकरांची मुख्य प्रकृति वर्तमानपत्रकाराची होय हें वरील विवेचनावरून स्पष्ट होईल. असें जर आहे तर त्यांच्या चरित्रात्मक लिखाणाची उपपत्ति कशी लावावयाची ? आजपर्यंत केळकरांनीं जें लेखन केलें, त्यापैकीं अंदाजें दोन तृतीयांश भाग वर्तमानपत्राकरितां लिहिलेल्या लेखांचाच भरेल. परंतु त्यांचें चरित्रात्मक लिखाण देखील विस्तारानें लहानसहान आहे असें नाहीं. खुद्द टिळकचरित्राचीं मोठ्या आकाराचीं १९१३ पानें, ' लोकमान्य टिळकांचें पुण्यस्मरण ' या टिळकांच्या संबंधानें अनेक ठिकाणीं लिहिलेल्या स्फुटलेखांच्या संग्रहाचीं १९९ पानें, याप्रमाणें खुद्द टिळकांच्या विषयीं लिहिलेल्या मजकुराचींच मोठ्या आकाराचीं २०९८ पानें भरतात. यांत अलीकडील पांच वर्षांतील टिळकांच्या संबंधानें लिहिलेले लेख घातले तर ही संख्या आणखी थोडीशी वाढेल. याशिवाय त्यांचें मुख्य चरित्रात्मक लिखाण म्हणजे ' गॅरीबाल्डी ' ( १९८ पानें ) व आयर्लंडच्या इतिहासांतील ' चरित्रमाला ' ( ११४ पानें ) हें होय. यांतच त्यांनीं निरनिराळ्या प्रसिद्ध पुरुषांवर केसरींत लिहिलेले १९।२० मृत्युलेख भरीस घातले म्हणजे त्यांच्या चरित्रपर वाङ्मयाचें परिगणन पूर्ण झालें. त्यांनीं लिहिलेल्या ऐतिहासिक लेखांतहि कांहीं चरित्र-पर उल्लेख सांपडतील; त्याचप्रमाणें इतरांच्या चरित्रपर ग्रंथांना त्यांनीं कांहीं प्रस्तावना लिहिल्या आहेत, त्याहि जमेस धराव्या पाहिजे तर; परंतु त्यांचें स्वरूप किरकोळ असल्यानें आपल्या विवेचनाला त्यांच्यापासून कांहींच फायदा होण्याजोगा नाहीं.

आतां सूचिकटाहन्यायानें वर उल्लेखिलेल्या सामग्रीचें निरीक्षण करावयाचें म्हटल्यास त्यांनीं लिहिलेले मृत्युलेख प्रथम विचारासाठीं घेणें प्राप्त होतें. हे सर्व वर्तमानपत्रांत लिहिले असल्यानें केळकरांची वर्तमानपत्रकाराची प्रकृतिच या लेखांस प्रेरक झाली आहे हें उघड आहे. प्रसिद्ध पुरुषांचा मृत्यु झाला असतां त्यांच्या गुणवर्णनपर लेख लिहिणें हें वृत्तपत्रकारांच्या मामुली कर्तव्यांपैकींच एक आहे व तें केळकर उत्कृष्ट रीतीनें पार पाडूं शकतात असें त्यांनीं लिहिलेल्या मृत्युलेखांवरून दिसून येतें. केवळ करुणरसपूर्ण वर्णनानें वाचकांस अश्रु ढाळावयास लावणें हें कांहीं वर्तमानपत्रांतील मृत्युलेखाचें कार्य नव्हे. तें काम वाटल्यास कवीनें करावें. वृत्तपत्रकाराचें कर्तव्य म्हणजे गत व्यक्तीच्या चरित्रा-

ची स्थूल मानानें रूपरेखा सांगून तिनें केलेल्या कार्याचें सार्वजनिक दृष्टीनें महत्त्व काय हें समजावून देणें व त्या व्यक्तीच्या गुणांची अतिशयोक्ति न करितां महती गाणें. केळकरांचे मृत्युलेख या कसोटीस पूर्णपणें उतरतात. मरणसमयीं एखाद्या मनुष्याच्या दोषांचा पाढा वाचणें, तो प्रतिपक्षी असल्यास त्याची निंदा करून तो मेल्याबद्दल प्रकट किंवा गर्भित आनंदाचे उद्गार काढणें—हे सर्व प्रकार अनुचित, ग्राम्य व असदभिरुचीचे दर्शक होत. आपल्या अभिरुचीनें असलें ग्राम्य प्रदर्शन कांहीं वृत्तपत्रकार एकादे वेळेस करितात. परंतु 'केसरी'नें तसें कधींहि केलेलें नाहीं. केळकरांनीं लिहिलेला कोल्हापूरच्या शाहूमहाराजांवरचा मृत्युलेख ( भाग २ पृ. २०३–२०४ ) त्यांच्या उच्च अभिरुचीची साक्ष पटवील. वस्तुतः शाहूमहाराजांइतका विरोधी संबंध केसरीचा व टिळकांचा इतर थोड्याच व्यक्तींशीं आला असेल. इतर दृष्टींनींहि त्या मनुष्याबद्दल वेडेंवाकडें लिहावयाचेंच म्हटलें तर सत्यास न सोडतां कांहीं कमी मजकूर लिहितां आला असता असें नाहीं. ' आमचे स्वराज्यद्रोही छत्रपति ' या व इतर लेखांतून केळकरांनीं तसा प्रसंगानुसार लिहिलाहि होता. परंतु ' मरणान्तानि वैराणि ' हा दंडक लक्षांत ठेवून केळकरांनीं त्यांच्या फक्त गुणांचेंच वर्णन केलें. आतां त्याहि लेखांत, " बुद्धिमत्ता, मनुष्यस्वभावाचें ज्ञान व जबर महत्त्वाकांक्षा या त्रयीच्या जोरावर त्यांनी ' खासदरबारांत ' व ' आमदरबारांत ' ज्या अघटित घटना केल्या व करविल्या त्यांचें वर्णन, तज्ज्ञ माणसानें यथास्वरूप लिहिलें तर, तो एक मनोवेधक असाच ग्रंथ होईल यांत शंका नाहीं. "—अशा कांहीं मार्मिक खोंचा आहेत. परंतु त्या अगदींच ओझरत्या व सौम्य आहेत.

वर्तमानपत्रांत लिहिणाऱ्या व्यक्तींच्या आवडीनिवडी व ऋणानुबंध कांहीं विशिष्ट प्रकारचे ठरलेले असतात. शिवाय खुद्द वर्तमानपत्राच्या आवडीनिवडीहि परंपरेनें कांहीं ठराविक तऱ्हेच्या बनलेल्या असतात; आणि या व्यक्तीच्या व समष्टीच्या आवडीनिवडींच्या अनुरोधानेंच वृत्तपत्रांतील मृत्युलेखांत कोणच्या व्यक्तीस किती महत्त्व द्यावयाचें हें ठरतें. 'केसरी'मध्यें प्रो. जिनसीवाले व रा. ब. गणेश व्यंकटेश जोशी यांच्यावर मरणसमयीं मोठमोठे अग्रलेख लिहिले जाऊन हरि नारायण आपटे यांची बोळवण एका सामान्य स्फुट सूचनेंत करण्यांत यावी हें वैषम्य आम्हांस सध्यां बरेंच जाणवतें. * परंतु यास 'केसरी'संस्थेचा ऋणानुबंध व आवडनिवड हीच

* टीप—कै. आपटे ३-३-१९ सोमवारीं रात्रीं ७ वाजतां वारले. त्यानंतर उजाडणाऱ्या प्रकाशींच प्रसिद्ध व्हावयाच्या केसरींत सुमारें—पाऊण कॉलम इतका मृत्युलेख केसरींत आला आहे. —संपादक

बहुतांशीं कारणीभूत आहे. राजवाडे यांच्या मृत्युलेखापेक्षांहि वासुदेवशास्त्री खरे यांच्या मृत्युलेखानें थोडीशी जास्त जागा अडवावी व त्यास मुख्य लेखाचें स्थान देण्यांत यावें याचें कारण वैयक्तिक (खुद्द केळकरांच्या) ऋणानुबंधाखेरीज दुसरें बहुधा सांगतां येणार नाहीं. असो.

सर्वच मृत्युलेख केळकरांनीं मार्मिकपणें लिहिले असले तरी त्यांतल्यात्यांत ज्या व्यक्ति त्यांना व टिळकसंप्रदायाला आपल्या अशा वाटत त्यांचे मृत्युलेख केळकरांचे हातून अधिक सहृदयतेनें व प्रेमळपणाच्या भावनेनें लिहिले गेले आहेत, ही गोष्ट तारतम्यानें पाहतां सहज दिसून येते. याचें एक उदाहरण देण्याजोगें आहे; तें मोतीलाल घोष यांचें होय. सुरेंद्रनाथांच्या चरित्रांत मोतीबाबूंच्या चरित्रापेक्षां सांगण्याजोग्या गोष्टी दसपट अधिक असतांहि, मोतीबाबूंच्या टिळकांशीं असलेल्या विशेष ऋणानुबंधामुळें त्यांजवरील मृत्युलेख केळकरांनीं सुरेंद्रांवरील लेखापेक्षांहि अधिक विस्तारानें लिहिला ही गोष्ट साहजिकच झाली आहे.

हे मृत्युलेख लिहितांना विशेष परिश्रमानें माहिती मिळविण्याचा किंवा त्या लेखांतून कांहीं अभिनव किंवा गहन विचार मांडण्याचा केळकरांनीं प्रयत्न केलेला दिसत नाहीं. त्या वेळच्या इतर वर्तमानपत्रांतून आलेली माहिती, सहज उपलब्ध होणाऱ्या पुस्तकांतून मिळणारी माहिती व जवळपासच्या व्यक्तींनीं पुरविलेली माहिती यांचाच उपयोग त्यांनीं केलेला दिसतो. वृत्तपत्रकारास सामान्यतः एवढेंच करणें शक्य असतें. मृत व्यक्तीचे गुण व लोकहिताच्या दृष्टीनें तिचें महत्त्व हेंहि साधारणतः सर्वांस पटेल असेंच वर्णिलेलें असतें. तात्पर्य, वर्तमानपत्रकाराच्या भूमिकेवर आरूढ होऊनच हे मृत्युलेख लिहिले आहेत, असें सांगितलें म्हणजे त्यांचें यथातथ्य स्वरूपवर्णन केल्याप्रमाणें होईल.

आतां इटालियन व आयरिश देशभक्तांचीं चरित्रें जीं त्यांनीं लिहिलीं त्यांविषयीं विचार करूं. हीं चरित्रें वृत्तपत्राकरितांच जरी त्यांनीं लिहिलेलीं नसलीं तरी त्यांमधून त्यांची वृत्तपत्रकाराचीच प्रकृति दृष्टीस पडते. ही गोष्ट तीं चरित्रें वाचलीं असतां आपल्यास पटेलच; परंतु दुसऱ्या एका दृष्टीनें विचार केला असतांहि आपल्यास असेंच अनुमान करणें भाग पडतें. केळकर हे एक सहज प्रवृत्तीनें बनलेले वर्तमानपत्रकार आहेत व तदनुसार त्यांचा राजकारणाचा व्यासंगहि पहिल्यापासून बराच असला पाहिजे हें वर दिग्दर्शित केलेंच आहे. आतां एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस, हिंदुस्थानासारख्या

परतंत्र देशांत जन्मलेला, टिळकांसारख्या तेजस्वी पुरुषाच्या सहवासांत राहणारा व स्वतः मनानें देशाभिमानी असा पुरुष राजकारणाचा अभ्यास करीत असतांना इटालीच्या नुकत्याच घडून आलेल्या स्वातंत्र्यसंपादनाच्या अद्‌भुत इतिहासाकडे त्याचें लक्ष वेधूं नये ही गोष्ट शक्य तरी आहे काय? इटालियन देशभक्तांच्या अद्‌भुत कृत्यांनीं केळकरांचें विद्यार्थिदशेंतील कोवळें व भावनापूर्ण मन आकर्षित करून घेतलें असेल हेंहि संभवनीय आहे. तथापि त्या विषयाचें विशेष अवलोकन वृत्तपत्रकार झाल्यावरच त्यांनीं केलें असावें असें वाटतें. कारण विद्यार्थिदशेंतील भावनांचा उल्लास गॅरीबाल्डीच्या पुस्तकांत शोधूं गेल्यास फारसा सांपडत नाहीं. सारांश, वर्तमानपत्रकार या नात्यानें प्राप्त झालेला जो राजकीय विषयांचा व्यासंग त्यांतूनच गॅरीबाल्डीचें पुस्तक निर्माण झालें असावें असें वाटतें.

'आयर्लंडच्या इतिहासा'च्या उत्पत्तीची मीमांसा तर याहूनहि निश्चयात्मक रीतीनें करतां येते. १९०५ सालीं वंगभंगाच्या चळवळीचा जन्म झाला व पुढें थोडयाच अवकाशांत बहिष्काराची कल्पनाहि उदय पावली. बहिष्कार, अडवणूक वगैरे तत्त्वांच्या पुरस्कारार्थ त्या वेळेस ज्या चळवळी झाल्या, त्यांचें आयर्लंडांत एकोणिसाव्या शतकभर झालेल्या चळवळींशीं फार साम्य होतें. किंबहुना, अशा चळवळींची कल्पना कित्येकांना आयर्लंडच्या इतिहासावरून सुचली असण्याचाहि संभव आहे. बहिष्काराचा इंग्रजी प्रतिशब्द Boycott हा आयरिश चळवळींतूनच उत्पन्न झालेला आहे. तेव्हां अशासमयीं हिंदुस्थानांतील चळवळीस उपमानभूत झालेल्या आयर्लंडांतील चळवळींचा केळकरांसारख्या विचक्षण गृहस्थानें विशेष अभ्यास करावा व त्या अभ्यासाचें फल पुस्तकरूपानें आपल्या देशबांधवांस सादर करावें ही गोष्ट अगदीं साहजिक वाटते.

या चरित्रांच्या उगमाची मीमांसा सोडून खुद्द त्यांच्या स्वरूपाकडे नजर फेकली, तरी त्यांमधून लेखकाची वृत्तपत्रकाराची प्रकृतिच दृग्गोचर होते. एक तर हीं सर्व चरित्रें त्रोटक (Sketchy) स्वरूपाचीं आहेत. मुख्य मुद्दा सिद्ध करण्यापुरती माहिती, त्रोटक विवरण, भाषा व विवेचन यांमध्यें सजावटीचा उत्कृष्ट उठाव या सर्व गोष्टी लेखकाची, वृत्तपत्रकाराची प्रकृतिच स्पष्टपणें व्यक्त करतात.

आयर्लंडच्या राष्ट्रवीरांचीं चरित्रें गॅरीबाल्डीच्या चरित्रापेक्षां अधिक सुंदर व सरस पटलीं आहेत. गॅरीबाल्डीच्या चरित्रांत लेखकाच्या नवशिके-

पणाचा छाप थोडासा उमटलेला दिसतो. माहितीची सुसंगत जुळणी करून ती वाचकास आकर्षक वाटेल अशा तऱ्हेनें मांडण्याचें काम साधावें तितकें साधलें नाहीं; स्थल, काल व प्रसंग यांचें स्पष्टीकरण आपल्याकडील वाचकां-करितां जितकें व जसें करावयास पाहिजे तसें केलेलें नाहीं;—तथापि केळकरांच्या ग्रंथांचे गुणावगुण सांगून त्यांचें यथासांग परीक्षण करण्याचा प्रस्तुत लेखाचा उद्देशच नसल्यामुळें, १९०१ सालीं लिहिलेलें हें पुस्तक कांहींसें अपरिपक्व वाटणें साहजिक आहे, येवढीच गोष्ट येथें नमूद करणें बस होईल. गॅरीबाल्डी व मॅझिनी या दोन लोकोत्तर पुरुषांच्या चरित्रांचें सारग्राही दृष्टीनें आलोचन करून त्यांजपासून घेण्याजोगा बोध विशद करण्याकरितां 'एका विभूतीची शतसांवत्सरिक जयंती' व 'इटालियन देशभक्त मॅझिनी' हे १९०७ सालीं 'केसरीं'त लिहिलेले दोन लेख मात्र उत्कृष्ट वठले आहेत. त्यांत या महापुरुषांच्या जीवनाचें रहस्य गंभीर व परिणामकारक वाणीनें प्रतिपादन केलें आहे.

आयरिश राष्ट्रभक्तांचीं चरित्रें मात्र छोटींशींच परंतु उठावदार झालीं आहेत. त्यांतल्या त्यांत ग्रॅटन व ओकॉनेल यांचीं चरित्रें फारच मार्मिक व मनोरंजक वठलीं आहेत. चरित्रनायकाच्या मनोभूमिकेचें व स्वभाववैशिष्ट्याचें वर्णन व त्यानें केलेल्या कार्याचें आणि त्याच्या परिणामांचें विवरण इतक्या थोडक्या अवकाशांत इतक्या समर्पक व चटकदार रीतीनें लेखकास करत आलें, यावरून त्याच्या कौशल्याची उत्कृष्ट साक्ष पटते. या चरित्रांच्या अगोदर २०७ पानां-मध्यें, आयर्लंडचा त्रोटक इतिहास देऊन हिंदुस्थानची व आयर्लंडची तुलना केली आहे; तो भागहि वाचनीय झाला आहे. कोणच्याहि दोन गोष्टींची तुलना करून त्यांतील साम्यविरोध दाखविणें हें केळकरांस फारच चांगलें साधतें.

यानंतर टिळकचरित्राविषयीं विचार करणें ओघानेंच येतें. ह्या ग्रंथां-तील केळकरांची भाषा व वर्णनशैली जरी नेहमींचीच, म्हणजे त्यांच्या वृत्तपत्रां-तील लेखांत जशी आढळते तशीच, असली तरी त्याचा हेतु व त्याचें स्वरूप निराळ्या प्रकारचें आहे. हा ग्रंथ लिहिण्यांत त्यांनीं वर्तमानपत्रांतील माहिती-चाच मुख्यत्वेंकरून उपयोग केला आहे. तथापि ग्रंथ लिहितांना, ज्या लोको-त्तर पुढाऱ्याच्या संगतींत आपण पंचवीस वर्षें वागलों त्याचें चरित्र गाऊन महाराष्ट्रवाचकांचें कुतूहल पुरवावें हाच हेतु त्यांच्या मनांत असलेला दिसतो. तरी खुद्द या ग्रंथास अनुलक्षून अधिक कांहीं लिहिण्यापूर्वी चरित्रात्मक ग्रंथा-विषयीं थोडेंसें सामान्य विवेचन करूं.

चरित्रग्रंथ अनेकविध असतात. लेखकाचा उद्दिष्ट हेतु, त्याची मनोभूमिका, सामग्रीची निवड करण्याचा दृष्टिकोन, सामग्री जुळवून मांडण्याची पद्धत, ह्या सर्व गोष्टींतील फरकानुसार खुद्द चरित्रग्रंथाच्या स्वरूपांतहि फरक पडतो. मराठींत चरित्रग्रंथ अलीकडे बरेच होऊं लागले आहेत. परंतु चरित्रें कशीं लिहिलीं जातात व जावींत यासंबंधींचा तात्त्विक विचार करून तदनुसार चरित्रलेखनाची पद्धति सुधारावी असा प्रयत्न आपल्याकडे फारसा झालेला दिसत नाहीं. तरी या संबंधांत बराच विचार होणें जरूर आहे.

चरित्रग्रंथांचा एक प्रकार म्हणजे चरित्रनायकाला केवळ अवतार समजून त्याच्याठायीं सर्वगुणसंपन्नत्व कल्पून त्याचें उदात्त भाषेंत वर्णन करणें हा होय. श्रीरामचरित्र, श्रीकृष्णचरित्र, शिवाजीमहाराजांच्या बखरी व चरित्रें, अॅबटचें नेपोलियनचें चरित्र हीं अशा प्रकारच्या चरित्रांचीं उदाहरणें होत. हा विभूतिपूजेचाच एक प्रकार होय व खरोखरच पुरुष तशा योग्यतेचा असला तर हा प्रकार केवळ त्याज्यच ठरेल असें नाहीं. परंतु यांत चिकित्सकतेचा अभाव असतो व कित्येक वेळां विभूतिपूजेची ऊर्मि अस्थानीं खर्च केली जाते. वापटांचें बाजीरावाचें चरित्र हें अशाच अतिशयोक्तिपूर्ण वर्णनांचें एक उदाहरण म्हणून देतां येईल.

दुसरा प्रकार भावनात्मक चरित्रांचा. खरोखरच एखादा पुरुष लोकोत्तर व ' न भूतो न भविष्यति ' असा असला तर त्याला अवतारी पुरुष म्हणून त्याचें तशा तऱ्हेनें अद्भुतरसमय वर्णन केल्यास साजेल. तो पहिला प्रकार झाला; परंतु या दुसऱ्या प्रकारामध्यें व्यक्ति कशीहि असो, तिचे जे गुण असतील त्यांस अगडबंब स्वरूप द्यावयाचें, दोष असतील त्यांचा उल्लेख टाळावयाचा, कोणत्याहि बाबतींत त्या व्यक्तीचा कमीपणा म्हणून दिसून द्यावयाचा नाहीं;–अशा रीतीनें त्या व्यक्तीचें स्वरूप, तिच्या कार्यक्षेत्रापुरतेंच कां होईना, अतीव उज्ज्वल करून दाखवावयाचें ! यथातथ्य लेखनाची प्रवृत्ति पूर्वी उत्पन्न झाली नव्हती. त्यावेळीं पाश्चात्य देशांत देखील अशीं कमीपणाचा सर्व अंश गाळून टाकून शुद्ध ( ! ) केलेलीं चरित्रेंच लिहिण्याचा प्रघात होता. अशा प्रकारचीं चरित्रें कशीं अवडंबरमय असतात याचें डॉ० जॉनसननें एके ठिकाणीं मोठें सुंदर वर्णन केलें आहे. जॉनसननें ' प्रमुख इंग्लिश कवींचीं चरित्रें ' लिहिलीं आहेत. त्यांत पहिलेंच चरित्र काउले नामक कवीचें आहे. या कवीचें डॉ० स्प्रॅट नांवाच्या एका गृहस्थानें पूर्वी एक चरित्र लिहिलें होतें. त्यास उद्देशून जॉनसन आपल्या चरित्राच्या प्रारंभींच म्हणतो:—

"His zeal of friendship, or ambition of eloquence has produced a funeral oration rather than a history; he has given the character, not the life of Cowley; for he writes with so little detail, that scarcely anything is distinctly known, but all is shown confused and enlarged through the mist of panegyric."

'मित्रत्वाच्या भावनेमुळें किंवा आपलें भाषावैभव प्रकट करण्याच्या भरांत आल्यामुळें त्यांच्या हातून इतिहास लिहिला जाण्याऐवजीं एक स्तुतिपर वक्तृत्वाचें अवडंबरच निर्माण झालें आहे. त्यानें काउलेचें चरित्र लिहिलें नसून 'चारित्र्य' रेखाटलें आहे. कारण त्यानें चरित्राचा तपशील इतका कमी दिला आहे कीं, कोणतीच गोष्ट स्पष्टपणें कळत नाहीं व स्तुतीच्या धुक्यांत सर्व गोष्टींचा घोटाळा उडून जातो.'

अशा चरित्रलेखनपद्धतीमध्यें कित्येक गोष्टी कशा लपविल्या व बदलल्या जातात याचें उत्कृष्ट उदाहरण जॉनसननें पुढें लगेचच सांगितलें आहे— 'काउलेचा बाप वाणी होता, परंतु तो एक 'नागरिक' होता असें सामान्य विधान करून डॉ० स्प्रॅटनें त्याची खरी स्थिति लपविली आहे.' एका मोठ्या कवीचा बाप वाणी होता असें म्हणणें अगदींच ग्राम्य नव्हे काय ! बापानें वाणी होण्याचें एक पातक केलें; आतां चरित्रकारानें तरी त्याचा वाणीपणा उघडकीस आणण्याचें दुसरें पातक करूं नये !

अशा भावनात्मक पद्धतींचीं आपल्याकडील उदाहरणें म्हणजे पांगारकरांनीं लिहिलेलीं संत व कवि यांचीं चरित्रें होत. पांगारकरांच्या अंगीं चिकित्सक बुद्धि नाहीं असें नाहीं. त्यांचीं चरित्रेंहि एकंदरीनें उत्कृष्ट वठलीं आहेत. तथापि संतकवींचीं चरित्रें त्यांस अत्यंत पूज्य व पवित्र वाटत असल्याकारणानें त्यांच्या दोषांचा उल्लेख करण्याचें ते टाळतात व गुणांचें माप साहजिकच सढळ हातानें मोजतात. मोरोपंतांनीं स्वहस्तानें लिहून घेतलेल्या ग्रंथांत चार दोन वेदान्ताचे ग्रंथ सांपडतांच पंत हे महापंडित होते अशी त्यांची खात्री होते ! पंतकवितेंत त्यांना सर्वत्र गुणांचा प्रकर्षच झालेला आढळतो. दोषांचें परिमाण केवळ 'दर्यामें खसखस' इतकेंच त्यांस दिसतें ! असेंच दुसरें एक उदाहरण पारसनिसांच्या ब्रह्मेंद्रस्वामीच्या चरित्राचें आहे. एका यढेजात्री संन्याशास त्यांनीं योग्यतेच्या इतक्या उच्च शिखरावर चढविलें आहे कीं, आजपर्यंत तुकाराम–रामदासांचीं नांवें आपणापर्यंत चालत येऊन या महा-

प्रभावी स्वामीचें नांव मध्येंच कसें लुप्त झालें होतें याचा आपणास मोठाच अचंबा वाटूं लागतो! पांगारकरांच्या अंगीं चिकित्सकता असूनहि ती भाविकतेच्या आवरणामुळें कोठें कोठें दडपली जाते, तर पारसनिसांच्यामध्यें चिकित्सकतेचा मूळांतच अभाव दिसून येतो.

तिसरा प्रकार दृष्टान्तरूपी चरित्रांचा. चरित्रनायकाच्या ठायीं ज्या विशिष्ट गुणांचा उत्कर्ष झालेला आढळत असेल त्या गुणांचा केवळ दाखला म्हणून त्या व्यक्तीचें चरित्रकथन करावयाचें. अर्थात् ते विशिष्ट गुण त्याच्या चरित्रांत कसे प्रकट होत गेले हें सांगण्यावरच चरित्रकाराचा सर्व भर असावयाचा. अशा तऱ्हेनें लिहिलेलें चरित्र म्हणजे एक विस्तृत अर्थान्तरन्यासच होय. अगोदर गुण गृहीत धरावयाचे आणि ते चरित्रांतील प्रसंगांच्या उदाहरणानें सिद्ध करावयाचे. विख्यात ग्रीक चरित्रकार प्लुटार्क यानें आपलीं ग्रीक व रोमन पुरुषांचीं चरित्रें याच पद्धतीनें लिहिलीं आहेत. शिवाय त्यानें समानगुण अशा ग्रीक व रोमन पुरुषांच्या जोड्या घेऊन त्यांची तुलनाहि केली आहे.

चौथा प्रकार भूतार्थकथनपर चरित्रांचा. चरित्रनायकाच्या आयुष्यांत प्रारंभापासून अखेरपर्यंत जें जें घडलें तें तें जसेंच्या तसेंच सुसंगत रीतीनें सांगावयाचें; एवढ्याच हेतूनें असा चरित्रकार चरित्र लिहीत असतो. सत्यान्वेषण बुद्धि व सुंदर रीतीनें वृत्तांत कथन करण्याची कला या दोन गोष्टी अशा तऱ्हेनें चरित्र लिहिणाऱ्यास अवश्य असतात. अशा तऱ्हेच्या चरित्रकाराचा, जें घडलें तें सांगण्याचा, म्हणजे इतिहासकथनाचा, उद्देश प्रमुख असल्यामुळें तो चरित्रनायकाबरोबरच तत्कालीन समाजस्थितीचा व इतर वृत्तान्ताचाहि समावेश करतो. व अशा रीतीनें चरित्रनायकाच्या वृत्तान्तास सुंदर पार्श्वभूमि निर्माण करितो.

याच्यापुढें जाऊन चरित्रकार जेव्हां व्यक्तीच्या स्वभावाचें, तिच्या कार्यपद्धतीचें, गुणविकासाचें विवेचन करतो व ज्या समाजांत ती व्यक्ति जन्मली त्या समाजाची व तिची परस्पर क्रियाप्रतिक्रिया कशी घडून आली याचें विवरण करतो;— सारांश, त्या व्यक्तीच्या जीवनाचें रहस्य तात्त्विक दृष्टीनें मापन करितो तेव्हां त्याला निराळेंच महत्त्व प्राप्त होतें. हा चरित्रलेखनाचा पांचवा प्रकार म्हणण्यास हरकत नाहीं. सुप्रसिद्ध जॉन मोर्ले यांनी लिहिलेल्या चरित्रांमध्यें हीच पद्धति अंगीकारिली आहे. हिला तत्त्वप्रधान चरित्रलेखनपद्धति असें नांव दिल्यास चालेल. केव्हां केव्हां चरित्रकार हा स्वतः

पडद्यामागें राहून चरित्रनायकाचा जीवनवृत्तांत, रंगभूमीवर घडणाऱ्या नाट्य-प्रवेशांप्रमाणें अगर एकाद्या चित्रपटाप्रमाणें, वाचकांच्या डोळ्यांपुढून जाईल अशी वर्णनपद्धति स्वीकारतो व चरित्रनायकाचे स्वभावविशेष, त्याच्या खोडी, त्याचीं मतें, त्याचे गुणदोष इत्यादिकांवर प्रकाश पाडतील असे प्रसंग किंवा संवाद खुबीदार रीतीनें योग्य जागीं गुंफून देतो. अशा पद्धतीनें लिहिलेल्या चरित्राचें विख्यात उदाहरण म्हणजे बॉस्वेलनें लिहिलेलें जॉन-सनचें चरित्र होय. जवळजवळ अशाच पद्धतीनें परंतु खमंगपणा थोडासा वाढवून लिहिलेलीं एमिल लुड्विग या जर्मन ग्रंथकाराचीं 'बिसमार्क', 'नेपोलियन'–इ. चरित्रें अलीकडे बरींच लोकप्रिय झालीं आहेत. असें चरित्र चांगलें साधलें तर त्याला सुंदर कलाकृतीचें स्वरूप येतें व उच्च दर्जाच्या वाङ्मयांत त्यास अढळपद प्राप्त होतें. परंतु चटकदारपणा वाढविण्याच्या भरांत लेखकाचें सत्याकडे दुर्लक्ष होण्याचा या पद्धतींत बराच संभव असतो.

विवेचनाच्या सोयीकरितां वरील सर्व पद्धति परस्परांपासून पृथक् असें मानून त्यांचे गुणविशेष सांगितले आहेत. प्रत्यक्ष चरित्रग्रंथ पाहूं लागलें असतां त्यांत निरनिराळ्या प्रकारांची भेसळ झालेली आढळण्याचा पुष्कळच संभव असतो.

चरित्रकार केवळ भाविक मनानें चरित्रनायकास सर्वगुणसंपन्न महा-विभूति मानून चरित्र लिहील, तेव्हांचा तर प्रश्नच नाहीं; परंतु तो चिकित्सक बुद्धीनें व निष्ठुर सत्यान्वेषणबुद्धीनें जरी लिहिण्यास प्रवृत्त झालेला असला तरी चरित्रनायकाविषयीं आदराची भावना त्याच्या मनांत असते व ती असणें अवश्यहि आहे. ज्या व्यक्तीविषयीं आपण लिहितों, तिनें कांहीं तरी चांगलें कृत्य केलें आहे, यासाठीं तिचें चरित्र लिहिणें इष्ट आहे, इतकी तरी भावना चरित्रकाराची असल्याशिवाय त्याच्या हातून आस्थेवाईक प्रयत्न होणार नाहींत व चरित्र नीटसें लिहिलें जाणार नाहीं. हा सामान्य नियम झाला. परंतु एखाद्या व्यक्तीची निंदा करण्यासाठीं व तिचें महत्त्व कमी करून दाख-विण्यासाठींहि क्वचित् चरित्रें लिहिलीं जातात. इंग्लिश लोकांनीं लिहिलेलीं नेपोलियनचीं कांहीं चरित्रें अशा प्रकारचीं असावीं असें वाटतें.

चरित्रलेखनाचा याहूनहि एक विचित्र संप्रदाय सध्या मराठींत उदयास आल्यासारखा दिसतो. एकाद्या व्यक्तीचें चरित्र हें त्याच्या प्रतिपक्षीयांची निंदा करण्याकरितां लिहावयाचें! म्हणावयाचें चरित्र 'अ' चें परंतु 'अ' चा (मानीव अथवा खरा) प्रतिपक्षी जो 'ब' त्याची निंदा इतक्या उल्लासानें

केलेली असावयाची कीं, तितक्या उल्हासानें खुद्द चरित्रनायकाचें वर्णनाहि केलेलें नसावयाचें! या संप्रदायांत पडण्याजोगे कित्येक चरित्रग्रंथ अलीकडे झालेले आहेत. हा अजब संप्रदाय त्या सांप्रदायिकांनाच लखलाभ असो!

आतां केळकरांनीं आपलें टिळकचरित्र कशा तऱ्हेनें लिहिलें आहे हें पाहूं गेलें असतां प्रथमदर्शनींच असें दिसून येतें कीं, विभूतिपूजेचा किंवा भावनात्मक रीतीनें गुणगौरव गाण्याचा प्रकार त्यांनीं अवलंबिलेला नाहीं. टिळकांविषयीं त्यांच्या मनांत कितीहि आदर असला तरी तो एक आपणासारखाच साधा पुरुष होता ही भावना त्यांनीं कधींहि दृष्टीआड केली नाहीं. टिळक हे अलौकिक बुद्धिमत्तेचे व प्रचंड कर्तबगारीचे पुरुष असले तरी ते देखील आपणासारखाच प्रत्येक गोष्टीविषयीं साधकबाधक विचार करून प्रत्येक कृत्य करीत असत; त्यांच्या विचाराची गतिहि कित्येक वेळां कुंठित होत असे, त्यांचे अंदाजहि कित्येक वेळां चुकत असत, आपणाप्रमाणें तेहि क्वचित् मानवी विकारांचे आधीन होत असत;—अशीच समजूत टिळकचरित्र वाचल्यावर सर्वसामान्य वाचकाची होते. इतका हा ग्रंथ प्रांजळ झाला आहे.

चरित्रनायकास केवळ विशिष्ट गुणांचा गट्ठा मानून त्या गुणांचें विशदीकरण त्याच्या चरित्राच्या द्वारें कसें होतें हें दाखविण्याचा जो तिसरा प्रकार तोहि केळकरांनीं अवलंबिलेला नाहीं हें उघडच दिसतें. ही पद्धति सकृद्दर्शनीं वाटते तितकी त्याज्य नाहीं. एखाद्या व्यक्तीच्या जीवनांत सारभूत गुण कोणचे दिसून येतात तें शोधून काढणें आणि नंतर ते गुण कसे प्रकट झाले हें दाखविण्यासाठीं त्याचें चरित्र खुलवून सांगणें ही पद्धति वास्तविक पाहतां वाईट नाहीं. या पद्धतीच्या योगानें चरित्रांतील प्रत्येक प्रसंगाचें तात्त्विक महत्त्व काय व त्यापासून बोध कोणचा घ्यावयाचा हें वाचकाच्या मनावर ठळक रीतीनें बिंबविलें जातें. केळकरांनीं टिळकचरित्रांत ही पद्धति अवलंबिली नाहीं हें स्पष्टच आहे. चरित्रांतील प्रसंग जसे घडले तसे सांगून त्यावरून अनुमानें काढण्याचें काम त्यांनीं पुष्कळ अंशीं वाचकांवरच सोपविलें आहे. चरित्राचे गुण व त्यांतील रहस्य अगोदरच गृहीत धरून त्याचे दाखले म्हणून चरित्रांतील प्रसंगांचा उठाव करावयाचा ही पद्धति, चरित्रग्रंथांत नव्हे पण ता. २ ऑगस्ट १९२० च्या 'केसरी'त केळकरांनीं टिळकांवर जो मृत्युलेख लिहिला त्यांत फार चांगल्या रीतीनें अनुसरलेली दिसते. टिळकांवरचे केसरीतील इतर विशेष लेखहि अशाच पद्धतीनें लिहिले गेले आहेत.

सॉमरव्हेल्कृत चरित्रमंथाच्या नमुन्यावरहि प्रस्तुतचा चरित्रग्रंथ गेला

आहे असें म्हणवत नाहीं. असे चरित्रग्रंथ एखाद्या कादंबरीप्रमाणें चटकदार, सुश्लिष्ट व कौशल्यपूर्ण बनावटीचे असतात. चरित्रनायक आपल्यासमोर वावरत आहे, त्याचें चरित्र आपल्या डोळ्यांसमोर जणूं काय घडत आहे असा वाचकास भास व्हावा इतका वेधकपणा (vividness) त्यांत आणलेला असतो. केळकरांनीं कांहीं ठिकाणीं संवाद समाविष्ट केले आहेत व कित्येक प्रसंगांचीं त्यांनीं वठविलेलीं शब्दचित्रें हृद्य आहेत हें खरें; परंतु अशीं स्थळें थोडींच आहेत. एकंदरीनें पाहतां वृत्तांतकथनापलीकडे त्यांची मजल फारशी गेली आहे असें दिसत नाहीं.

अर्थात् सरतेशेवटीं केळकरांनीं स्वतः आपल्या ग्रंथाविषयीं प्रस्तावनेंत जें लिहिलें आहे तेंच शिल्लक रहातें. 'मीं [चरित्र] लिहिलें आहे तें मुख्यतः घडलेला इतिहास संगतवार सांगण्याच्याच दृष्टीनें लिहिलें आहे.' म्हणजे भूतार्थकथनपर म्हणून मागें चरित्रलेखनाची जी पद्धति सांगितली त्या पद्धतीनेंच हा ग्रंथ लिहिला गेला आहे हें उघड दिसतें. व्यक्तिविकास, गुणदोषदर्शन, तात्त्विक चर्चा व व्यापक दृष्टीनें चरित्राचें महत्त्ववर्णन या गोष्टी देखील खुद्द चरित्रांत फारशा आलेल्या नसून दर वर्षीच्या पुण्यतिथीच्या प्रसंगीं केसरींत तात्यासाहेबांनीं लिहिलेल्या लेखांत विवेचिलेल्या दिसतात. या केसरींतील लेखांपैकीं १९२६ सालापर्यंतचे लेख व इतरत्र त्यांनीं लिहिलेले कांहीं लेख 'लो. टिळकांचें पुण्यस्मरण' या पुस्तकांत संगृहीत केले आहेत. त्यांत लोकमान्यांच्या कामगिरीचें व वैशिष्ट्याचें विवेचन केलें आहे तें महाराष्ट्र वाचकांस सुविदित असल्याकारणानें त्याचा येथें अनुवाद करण्याचें कारण नाहीं.

खुद्द टिळकचरित्रांत वृत्तांतकथनाच्या पद्धतीचाच त्यांनीं बहुतांशीं अवलंब केला आहे हें वर दिग्दर्शित केलेंच आहे. व्यापक स्वरूपाची तात्त्विक चर्चा जरी त्यांनीं फारशी केली नसली तरी प्रत्येक प्रसंगाचें वर्णन करितांना त्याविषयींची साधकबाधक चर्चा त्यांनीं बरीच केली आहे. बहुधा प्रत्येक ठिकाणीं दोन्ही बाजूंचें म्हणणें संकलित रीतीनें देऊन समतोलपणा न गमावतां आपला कल कोणीकडे आहे हें खुबीनें दर्शविलें आहे.

टिळकचरित्राच्या बाबतींत कांहीं विशेषांचा मुद्दाम उल्लेख करण्यासारखा आहे. टिळकांच्या जीवनाशीं संबंध आलेल्या कित्येक व्यक्तींचीं शब्दचित्रें या चरित्रांत फार खुबीदार रीतीनें काढलेलीं दृष्टीस पडतात. पहिल्या खंडांतील क्राफर्ड ( भा. २ पृ. २०० ), गोपाळराव जोशी ( भा. २

पृ. २०१ ) दुसऱ्या खंडांतील श्रीपतबुवा भिंगारकर, दादाभाई नौरोजी, लॉर्ड कर्झन; तिसऱ्या खंडांतील फेरोजशहा मेहता (भा. २ पृ. २०९ )—यांचीं शब्दचित्रें या बाबतींत उदाहरणादाखल म्हणून सांगतां येतील. त्याचप्रमाणें टिळकांच्या आयुष्यांत आलेल्या अनेक प्रसंगांचें वर्णन खुबीदार मार्मिक व सरस असेंच वठलें आहे. कांहीं राजकीय प्रश्नासंबंधींचें विवेचनहि केळकरांच्या ख्यातीस साजेसें सुंदर व समर्पक आलें आहे. उदाहरणार्थ तिसऱ्या खंडाच्या ९ व्या भागांतील 'विलायतेंतील चळवळ' या विषयावरील विवेचन व आठव्या भागामधील अत्याचारी मार्गासंबंधींचें विवेचन कोणींहि, वाचून पहावें. (भा. २ पृ. २१८–२२४ )

परंतु अशा गोष्टींचा उल्लेख करीत बसणें म्हणजे टिळकचरित्राच्या हजारों वाचकांना जो अनुभव आजपर्यंत आलेला आहे त्याचेंच चर्वितचर्वण करीत बसणें होय. म्हणून सरतेशेवटीं एवढेंच सांगावयाचें कीं, ज्या दृष्टीनें म्हणजे केवळ कसा वृत्तांत घडला हें सांगावयाच्या दृष्टीनें हा ग्रंथ लिहिला गेला, त्या दृष्टीनें पहातां केळकरांच्या हातून तो जसा वठावा तसाच वठला आहे. या चरित्रग्रंथावर कित्येकांनीं टीका केल्या; परंतु त्या चरित्रग्रंथाची किंमत कमी करण्यास कारणीभूत होऊं शकल्या नाहींत.

साधनांच्या दृष्टीनें पाहिलें असतां 'केसरी'च्या मागील फाइली हेंच टिळकांचें चरित्र लिहिण्यास प्रमुख साधन म्हणून केळकरांनीं हाताशीं वागविलेलें दिसतें. आणि ही गोष्ट अगदीं साहजिक आहे. टिळकांचें सर्व चरित्र अगोदर अत्यंत सुप्रसिद्ध. आणि त्यांतील प्रत्येक खासगी किंवा सार्वजनिक गोष्ट केसरींत नमूद झालेली आहे. तेव्हां 'केसरी'सच तात्यासाहेबांनीं प्रमुख साधन म्हणून मानिलें असल्यास त्यांत दोषास्पद असें कांहींच नाहीं. पत्रांचा उपयोगहि जेथें तीं उपलब्ध झालीं तेथें त्यांनीं केलाच आहे.

प्रस्तुत ग्रंथाचें साकल्यानें परीक्षण करण्याचा लेखकाचा हेतुच नसल्यानें त्याविषयीं त्या दृष्टीनें अधिक कांहीं लिहिणें येथें अप्रस्तुत ठरेल. टिळकांच्या चरित्राचें परीक्षण करावयाचें तर परीक्षकाला चरित्रकारापेक्षाहि अधिक, किंवा निदान तितकी तरी टिळकांच्या जीवनाची माहिती असली पाहिजे. मग ती त्याला प्रत्यक्ष सहवासानें मिळालेली असो अगर कागदपत्रादि साधनांनीं त्यानें ती करून घेतलेली असो. परंतु अशा माहितीच्या बाबतींत प्रस्तुत लेखक हा केळकरांपुढें केवळ नवशिका दोमणपासारखा आहे ही गोष्ट उघड आहे. तस्मात् त्यांच्या चरित्रग्रंथाचें सर्व बाजूंनीं परीक्षण करण्याची स्वतःची योग्यता

आहे असें तो मानीत नाहीं. शिवाय प्रस्तुत लेखाचा हेतुहि तसा नाहीं, ही गोष्ट मागें स्पष्ट केलीच आहे.

टिळकचरित्राविषयीं कोठें कोठें किंचित् असमाधान जें दृष्टीस पडतें त्याचें खरें कारण असें आहे. सध्यांचा प्रौढ वयांतला जो वाचकवर्ग आहे त्याच्या समक्ष टिळकांच्या चरित्राचा बराच भाग घडून आला असून तो सर्व केसरींतून वेळोवेळीं प्रसिद्धहि झाला असल्याकारणानें महाराष्ट्र-वाचकवर्गास पूर्वीच बहुतांशानें माहीत झालेला होता. टिळकांचें सर्वच चरित्र प्रसिद्धपणें घडून आलेलें. लोकांस अज्ञात असा भाग त्यांत फारच थोडा! त्यामुळें केळकर-कृत चरित्रग्रंथ वाचल्यावर लोकांना माहीत असलेल्याच सर्व गोष्टी जेव्हां त्यांत वर्णन केलेल्या आढळल्या, तेव्हां त्यांना असें वाटलें कीं, 'उंः! या ग्रंथांत काय आपल्याला माहीत असलेलीच सर्व हकीकत आहे! अपरिचित, अभि-नव असें तर यांत फारसें कांहींच दिसत नाहीं!' परंतु टिळकांच्या जीवन-क्रमांतच लोकांना अपरिचित अशा गोष्टी कांहीं नव्हत्या तर त्या त्यांच्या चरित्र-ग्रंथांत तरी येणार कोठून? सामान्य वाचकवर्गाची जरी गोष्ट सोडली तरी टीकाकारांनीं हा विवेक करावयास पाहिजे होता. सध्यांचा वाचकवर्ग नाहींसा होऊन नवीन नवीन पिढ्यांच्या हातीं हा ग्रंथ जसजसा पडूं लागेल तसतशी त्याची खरी योग्यता अधिकाधिक नजरेस येत जाईल, यांत शंका नाहीं. म्हणूनच केळकरांचा हा ग्रंथ वाजवीपेक्षा लवकर लिहिला गेला असेंहि एका दृष्टीनें म्हणतां येईल.

तेव्हां, टिळकचरित्राचें स्वरूप सामान्यतः भूतार्थकथनपर असून विशिष्ट प्रसंगीं साधकबाधक चर्चेनें व तात्त्विक विवेचनानें युक्त असें झालें आहे हें वरील विवेचनावरून वाचकांच्या लक्षांत येईल. वृत्तांतकथनाची जी एक विशिष्ट मनःप्रवृत्ति तिचा प्रस्तुत चरित्रग्रंथ हा एक आविर्भाव होय. त्याच प्रमाणें कोणत्याहि गोष्टीचें तर्कशक्तीच्या योगानें सांगोपांग व साधकबाधक विवेचन करण्याची प्रवृत्तिहि त्यांच्यामध्यें कित्येक वेळां प्रभावी झालेली आढ-ळते. ही विवेचनशक्ति इतिहासाच्या प्रांतांत शिरली तेव्हां तिनें 'तोतयाचें बंड' हें नाटक व 'मराठे आणि इंग्रज' हा प्रबंध निर्माण केला. हीच विवेचकशक्ति साहित्याच्या प्रांतांत शिरली तेव्हां साहित्याच्या प्रांतांतहि तिनें आपला प्रभाव दाखविला. त्यांचा 'सुभाषित आणि विनोद' हा प्रबंध व वडोदें साहित्य संमेलन व उज्जयिनीचें संमेलन-येथील भाषणें व इतर कित्येक लेख यांमधून हा विवेचकशक्तीचा प्रभाव स्पष्ट दिसतो.

तथापि वृत्तांतकथनाची व विवेचनाची ह्या दोन मनःशक्ति (faculty) त्यांच्या वृत्तपत्रकाराच्या प्रवृत्तीला विसंवादी नसून त्या मुख्य प्रकृतीचींच अंगें होत, असें मानणें सयुक्तिक ठरतें. कारण वर्तमानपत्रकाराला त्याच्या नेहमींच्या कामामध्यें वृत्तांतकथन व विवेचन या दोन्ही गोष्टी वारंवार कराव्याच लागतात व या दोन्ही शक्ति मोठ्या प्रमाणांत त्याजपाशीं असल्याशिवाय तो चांगला वृत्तपत्रकार होऊंच शकणार नाहीं. केळकरांच्या बाबतींत ह्या दोन अंगभूत-शक्ति पृथक् रीतीनें कार्यकारी झाल्या, तशा इतर पुष्कळ वृत्तपत्रकारांच्या होत नाहींत. वर्तमानपत्राच्याच कामीं त्यांचा उपयोग होतो येवढेंच काय तें. परंतु टिळकांची गहन शास्त्रीय अभ्यासकाची प्रकृति त्यांच्या राजकारणी प्रकृतीशीं अगदीं भिन्न किंवा विसंगत होती, तसा प्रकार केळकरांच्या बाबतींत नाहीं. विवेचनशक्ति व वृत्तांतकथनाची शक्ति ह्या वृत्तपत्राच्या कामास अत्यंत अवश्यच आहेत. दुसरी एक प्रकृति केळकरांच्या ठायीं गौणरूपानेंच कां होईना, दिसून येते तिचा मात्र वृत्तपत्रकाराच्या प्रकृतीशीं विशेष संबंध आहे असें म्हणतां येत नाहीं. ती प्रकृति म्हणजे कलाप्रिय रसिकाची होय. त्यांची संगीत-विषयींची, नाट्याविषयींची आवड व त्यांनीं प्रत्यक्ष केलेलें नाट्यलेखन ह्या गोष्टी त्यांच्या कलाप्रिय वृत्तीची साक्ष देतात. या रसिकप्रकृतीचा वृत्तपत्र-काराच्या प्रकृतीशीं फारसा संबंध नाहीं. तस्मात् ती स्वतंत्र परंतु गौणरूपानें अस्तित्वांत असलेली प्रकृति असें मानिल्यास चालेल. तिचा उल्लेख करण्यापलीकडे तिजसंबंधीं प्रस्तुत लेखांत अधिक लिहिण्याचें कारण नाहीं.

तेव्हां केळकरांची मुख्य प्रकृति वृत्तपत्रकाराची. त्या प्रकृतीच्या अंगभूत-वृत्तींपैकीं विवेचकवृत्ति ही स्वतंत्र रीतीनें कार्यप्रवण होऊन तिनें कांहीं ऐतिहासिक व कांहीं साहित्यविषयक प्रबंध निर्माण केले; त्याचप्रमाणें वृत्तांतकथनाची अंगभूतवृत्तिहि अलग होऊन तिनें टिळकचरित्र व इतर चरित्रात्मक वाङ्मय उत्पन्न केलें. हीच केळकरांच्या वाङ्मयसंभाराची स्थूल परंतु यथातथ्य तात्त्विक मीमांसा होय.

---

# ४. नाटककार केळकर

( प्रो. विश्वनाथ पांडुरंग दांडेकर, एम्. ए., वडोदें. )

एकदां आम्ही कांहीं मंडळी एकीकडे चहा घेत असतांना काव्य-शास्त्र-विनोदाच्या प्रांतांत शिरलों. वेळ सकाळची होती आणि चहा चांगला जमल्यामुळें आमचा वादविवाद चांगलाच रंगला. त्या प्रसंगीं आम्हां वाक्पटूंपैकीं एकजण उद्गारले, " नांवानांवांनीं देखील एकप्रकारची हक्कदारी उत्पन्न होते. कोल्हटकर म्हटले कीं, मूकनायक किंवा सुदाम्याचें पोहे कर्ते कोल्हटकर डोळ्यांसमोर उभे रहातात. गडकरी म्हटले कीं, भावबंधन किंवा एकच प्याला कर्ते गडकरी आठवतात. " इतकें बोलून व घसा साफ करून ते म्हणाले " आणि केळकर म्हटले कीं, नाटिकाकर्ते केळकर यांचें नांव चटकन् जिभेवर येतें. काय ती केळकरांची........ "

पण आम्ही मंडळींनीं त्यांना पुढें बोलूं दिलें नाहीं. आमच्यापैकीं कांहींकांना धीर न धरवून त्यांनीं त्यांचें बोलणें खोडून काढलें. आणि शेवटीं " केळकर म्हणजे कोण ? " हा गंमतीचा प्रश्न " केळकर म्हणजे तोतयाचें बंड कर्ते केळकर " या उत्तरानें त्या चहा–सभेपुरता सुटला.

वरील आठवण नाटिकाकर्ते केळकर व तोतयाचें बंडकर्ते केळकर या दोघांत तुलना करण्याच्या हेतूनें दिलेली नसून सर्वसामान्य मंडळींना नाटककार या नात्यानें तात्यासाहेब केळकर यांची किती कमी ओळख आहे हें दाखविण्याकरितां दिली आहे. सांप्रत नाटककार या नात्यानें केळकरांची ओळख वाङ्मयाच्या अभ्यासकांना व बी. ए., एम्. ए. च्या विद्यार्थ्यांना फक्त असते. खाडिलकर-गडकरी हीं नांवें समाजाच्या खालच्या थरापर्यंत पोंचलीं आहेत. ती स्थिति केळकरांसंबंधीं नाहीं. नाटककार केळकरांचा परिचय फक्त कांहीं सुशिक्षितांपुरताच मर्यादित आहे.

पण याला कारणें देखील उघड आहेत. नाटक हा वाङ्मयप्रकारच प्रायः पहाण्या–ऐकण्याकरितां आहे. नाटकाची पकड प्रेक्षकांच्या मनावर जितकी आणि जशी बसते, तशी ती वाचकांच्या मनावर बसूं शकत नाहीं. नाटक हें सामुदायिक–मनाच्या आशा–आकांक्षा लक्षांत घेऊन रचिलेलें असतें. समाजाच्या भावनांना एका विशिष्टप्रकारें धक्का देऊन एक विशिष्ट प्रकारचा आनंद रंग–मंदिरांत उत्पन्न करण्याचें काम नाटकाचें. यामुळें रंगमंदिराच्या इतर साहित्याप्रमाणें लोकांच्या जमावाची देखील नाटकाला जरूरी

हेतूनें केलें. तसेंच शेरिडनच्या रायव्हल्सचें भाषांतर त्यांनीं करमणुकीकरितां केलें. हीं दोन नाटकें त्यांनीं १८९४–५ च्या सुमारास लिहिलीं. त्याच्यापूर्वी त्यांनीं एक नाटक लिहिलें होतें. पण तें एका नाटककंपनींत गहाळ झालें. हीं दोन किंवा तीन नाटकें म्हणजे नाटयवाङ्मय–क्षेत्रांतील केळकरांचीं पांगुळ-गाडयाला हातीं धरून टाकलेलीं पहिलीं पाऊलें होत. यानंतर केसरी–मराठा सारख्या राजकीय संस्थेंत त्यांच्या बुद्धीला अहर्निश श्रम पडल्यानें त्यांना घडीची देखील उसंत मिळत नसे. आणि यामुळें सरोजिनी व नवर-देवाची जोडगोळी या नाटकांनंतर आदमासें अठरा वर्षांनीं म्हणजे १९१२ पासून त्यांनीं पुनः नाटयवाङ्मयाकडे दृष्टि वळविली. आणि वर उल्लेखिल्यापैकीं पहिलीं सहा नाटकें पूर्ण लिहिलीं. या सहा नाटकांपैकीं चार नाटकें पूर्ण स्वतंत्र असून चंद्रगुप्त व अमात्यमाधव या दोन नाटकांतील कल्पना दुसरीकडून सुच-लेल्या आहेत. चंद्रगुप्त हें मुद्राराक्षस नाटकावर कांहींसें आधारलेलें असून अमात्यमाधव व लार्ड लिटनकृत रिचिलिओ या दोन नाटकांत कित्येक ठिकाणीं साम्य आहे. केळकरांचीं नाटकें म्हटलीं म्हणजे हींच सहा नाटकें होत. आणि प्रस्तुत लेखांत आपणांला विचार करावयाचा तो याच नाटकांसंबंधीं.

या नाटकांसंबंधीं विचार करीत असतांना पहिली एखादी गोष्ट डोळ्यांत भरत असेल तर ती त्यांच्या रचनाकौशल्याची. केळकरांच्या नाटकांतून कथा-सूत्रांची गुंतागुंत होते, पण ती गुंतागुंत फारच कुशलतेनें, वाचकप्रेक्षकांच्या मनाला ताण न पडतां, सोडविली जात असल्यामुळें एक प्रकारचा आनंद वाटतो. भाऊसाहेब पेशवे यांच्या तोतया–सुखनिधानामुळें तोतयाचें बंड या नाटकांत उत्पन्न होणारी गुंतागुंत केळकरांनीं फार कुशलतेनें सोडविली आहे. सुखनिधानाची पत्नी अमला इच्या अनपेक्षित पण इष्ट अशा आगमनानें पार्वतीबाईच्या अब्रूचें रक्षण होऊन नाना फडणीसांवरचा आरोपहि नष्ट होतो. कुठल्या अमृतसिद्धियोगावर केळकरांना अमलेच्या पात्राची कल्पना सुचली कोण जाणे. तिच्यामुळें नाटकाची रचना अत्यंत आकर्षक अशी बनली आहे. अमलेच्या पात्रावांचून नाटकाचा होतो असा शेवट होणें अशक्यच होतें. भाऊसाहेबांचा हुजऱ्या हैबतराव हा जेव्हां तोतयाच्या कानाला बिगबाळीचें भोंक नसल्याचा अत्यंत महत्त्वाचा शोध लावतो तेव्हांचा पेच प्रसंग अत्यंत बहारीचा आहे. त्याच प्रवेशांत दौलतगीर घाईघाईनें प्रवेश करून तोतया-च्या खऱ्या नांवाचा हैबतरावासमोर उल्लेख करतो आणि, त्यामुळें तोतया-ची सोळा आणे फजिती होते. चंद्रगुप्त नाटकांत गुंतागुंत फारशी

असते. नाटक हें स्वत: तर कलापूर्ण असायला पाहिजेच. पण ज्या नाटकांना उत्तम रंगमंदिरांतील उत्तम साहित्याबरोबर प्रेक्षकांचा भरपूर लाभ होतो तींच नाटकें उत्तम रंगतात. त्यांचीच पकड जनमनावर चांगली बसते आणि त्यांचीच हांक समाजांतील खालच्या थरापर्यंत पोंचूं शकते. खाडिलकर-गडकरी यांचीं नाटकें या दृष्टीनें भाग्यवान् असल्यामुळें त्यांचींच नांवें नाटककार या नात्यानें इतर कोणापेक्षांहि अधिक गाजलीं जातात. केळकरांच्या नाटकांना तसलें भाग्य नाहीं. आणि त्याचमुळें त्यांचें नांव नाटककार या नात्यानें बहुजनसमाजांत ऐकूं येत नाहीं. त्यांच्या सहा नाटकांपैकीं दोन नाटकांना ( कृष्णार्जुनयुद्ध आणि वीरविडंबन ). अजूनहि अधूनमधून रंगभूमीवर यायला सांपडतें. पण त्यांचीं चांगलीं नाटकें रंगभूमीवर सध्यां नसल्यानें वर सांगितल्याप्रमाणें त्यांची ओळख कांहीं सुशिक्षितांपुरती मर्यादित आहे.

असें असलें तरी अभिजात वाङ्मयाच्या कसोटीनें केळकरांच्या नाटकांची योग्यता निःसंशय वरच्या दर्जाची आहे. विषयाची निवड, रचनाकौशल्य, मनोवेधक स्वभावरेखाटन, मार्मिक सालंकृत भाषाशैली आणि सुशील व नर्म विनोद या गुणांमुळें त्यांचीं नाटकें नेहमींच वाचकांना रंजवितील अशीं आहेत. १९१२ ते १९१६ पर्यंत तोतयाचें बंड, चंद्रगुप्त, अमात्यमाधव व कृष्णार्जुनयुद्ध हीं त्यांचीं नाटकें चित्ताकर्षक नाटक मंडळी करीत असे व तीं त्यावेळीं फारच लोकप्रिय होतीं. अजूनहि हीं नाटकें जर एखाद्या नाटकमंडळीनें करावयाचें मनांत आणलें तर तिला लोकाश्रय मिळाल्यावांचून खचित राहणार नाहीं. पण महाराष्ट्रीय नाटक मंडळ्या मक्तेदारीच्या पद्धतीवर नाटकें करीत असल्यामुळें कंपनीबरोबर नाटकेंहि बुडतात. केळकरांच्या नाटकांचें असेंच झालें. चित्ताकर्षक नाटक मंडळी बुडाल्याबरोबर त्यांचीं नाटकें जीं एकदां मागें पडलीं तीं कायमचींच! सुदैवानें विश्वविद्यालयांतून मक्तेदारी कमी प्रमाणावर असल्यानें केळकरांचीं नाटकें मुंबई, नागपूर व कर्वे या विश्वविद्यालयांतून अभ्यासाकरितां लाविलीं जातात. आणि नाटककार या नात्यानें केळकरांचा परिचय असण्याचें बरेंचसें श्रेय या विश्वविद्यालयांनाच द्यावें लागेल.

केळकरांनीं तोतयाचें बंड, चंद्रगुप्त, कृष्णार्जुनयुद्ध, अमात्यमाधव, वीर विडंबन, संत भानुदास, सरोजिनी व नवरदेवाची जोडगोळी अशीं एकंदर आठ नाटकें लिहिलीं. त्यांपैकीं शेवटलीं दोन केवळ भाषांतरात्मक आहेत. टागोरांच्या सरोजिनी या बंगाली नाट्याचें भाषांतर त्यांनीं बंगाली शिकण्याच्या

हेतूनें केलें. तसेंच शेरिडनच्या रायव्हल्सचें भाषांतर त्यांनीं करमणुकीकरितां केलें. हीं दोन नाटकें त्यांनीं १८९४–५ च्या सुमारास लिहिलीं. त्याच्यापूर्वी त्यांनीं एक नाटक लिहिलें होतें. पण तें एका नाटककंपनींत गहाळ झालें. हीं दोन किंवा तीन नाटकें म्हणजे नाटयवाङ्मय–क्षेत्रांतील केळकरांचीं पांगुळ-गाडयाला हातीं धरून टाकलेलीं पहिलीं पाउलें होत. यानंतर केसरी–मराठा सारख्या राजकीय संस्थेंत त्यांच्या बुद्धीला अहर्निश श्रम पडल्यानें त्यांना घडीची देखील उसंत मिळत नसे. आणि यामुळें सरोजिनी व नवर-देवांची जोडगोळी या नाटकांनंतर आदमासें अठरा वर्षांनीं म्हणजे १९१२ पासून त्यांनीं पुनः नाटयवाङ्मयाकडे दृष्टि वळविली. आणि वर उल्लेखिल्यापैकीं पहिलीं सहा नाटकें पूर्ण लिहिलीं. या सहा नाटकांपैकीं चार नाटकें पूर्ण स्वतंत्र असून चंद्रगुप्त व अमात्यमाधव या दोन नाटकांतील कल्पना दुसरीकडून सुच-लेल्या आहेत. चंद्रगुप्त हें मुद्राराक्षस नाटकावर कांहींसें आधारलेलें असून अमात्यमाधव व लार्ड लिटनकृत रिचिलिओ या दोन नाटकांत कित्येक ठिकाणीं साम्य आहे. केळकरांचीं नाटकें म्हटलीं म्हणजे हींच सहा नाटकें होत. आणि प्रस्तुत लेखांत आपणांला विचार करावयाचा तो याच नाटकांसंबंधीं.

या नाटकांसंबंधीं विचार करीत असतांना पहिली एखादी गोष्ट डोळ्यांत भरत असेल तर ती त्यांच्या रचनाकौशल्याची. केळकरांच्या नाटकांतून कथा-सूत्रांची गुंतागुंत होते, पण ती गुंतागुंत फारच कुशलतेनें, वाचकप्रेक्षकांच्या मनाला ताण न पडतां, सोडविली जात असल्यामुळें एक प्रकारचा आनंद वाटतो. भाऊसाहेब पेशवे यांच्या तोतया–सुखनिधानामुळें तोतयाचें बंड या नाटकांत उत्पन्न होणारी गुंतागुंत केळकरांनीं फार कुशलतेनें सोडविली आहे. सुखनिधानाची पत्नी अमला इच्या अनपेक्षित पण इष्ट अशा आगमनानें पार्वतीबाईच्या अब्रूचें रक्षण होऊन नाना फडणीसांवरचा आरोपहि नष्ट होतो. कुठल्या अमृतसिद्धियोगावर केळकरांना अमलेच्या पात्राची कल्पना सुचली कोण जाणे. तिच्यामुळें नाटकाची रचना अत्यंत आकर्षक अशी बनली आहे. अमलेच्या पात्रावांचून नाटकाचा होतो असा शेवट होणें अशक्यच होतें. भाऊसाहेबांचा हुजऱ्या हैबतराव हा जेव्हां तोतयाच्या कानाला विगबाळीचें भोंक नसल्याचा अत्यंत महत्त्वाचा शोध लावतो तेव्हांचा पेच प्रसंग अत्यंत बहारीचा आहे. त्याच प्रवेशांत दौलतगीर घाईघाईनें प्रवेश करून तोतया-च्या खऱ्या नांवाचा हैबतरावासमोर उल्लेख करतो आणि, त्यामुळें तोतया-ची सोळं आणे फजिती होते. चंद्रगुप्त नाटकांत गुंतागुंत फारशी

नाटकाची अंतसूचक सुरवात आणि कथानकाच्या गुंतागुंतीची कुशलतेनें केलेली उकल या दोन गोष्टी नाट्यरचनेचा विचार करीत असतांना आपण पाहिल्या. तिसरी गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी अशी कीं, केळकरांच्या सर्वच नाटकांतील प्रवेशांची योजना फार मार्मिकपणें केलेली असते. ती पाहात असतांना आपणाला गुलाबांतील पाकळ्यांची आठवण होते. एका प्रवेशांतून दुसऱ्या प्रवेशाची सुरवात आणि त्याच्या पुढील प्रवेशांची रचना सुसंबद्ध असते. सर्वच प्रवेशांचा परस्परांशीं संबंध अत्यंत जिव्हाळ्याचा व पूरक असतो. प्रायः एका गंभीर व उत्तेजक प्रवेशानंतर मनाला करमणूक होऊन विश्रांति मिळेल अशा प्रवेशाची योजना केलेली असते. उदाहरण म्हणून आपण तोतयाचें बंडच घेऊं या. त्यांतील पहिलाच सुखनिधानाचा गंभीर व आकर्षक प्रवेश संपल्यावर पिकटंभटाचा विनोदी प्रवेश सुरू होतो. त्यानंतर पार्वतीबाई पूजेला बसल्याचा महत्त्वाचा प्रवेश संपल्यावर सुखनिधान–दौलतगीर हा प्रवेश सुरू होतो हें खरें. पण या प्रवेशांत सूक्ष्म विनोद असल्यानें त्याचा प्रेक्षकांच्या मनावर ताण पडत नाहीं. चवथ्या अंकांतील पार्वतीबाई–अमला हा करुण प्रवेश संपल्यावर तोतयाच्या फजितीचा विनोदी प्रवेश सुरू होतो. शेवटल्या अंकांत हें प्रमाण थोडेंसें बदललें. त्यांत पहिला संबंध व दुसऱ्याचा थराचसा भाग विनोदी, खेळकर स्वरूपाचा संपल्यावर विठाईच्या वधापासून तें अमलेच्या खुनापर्यंत सर्वच भाग करुण–गंभीर असा उतरला आहे. पण याचमुळें नाटक अत्यंत हृदयस्पर्शी बनलें आहे.

प्रवेशांच्या मांडणीची ही जी गोष्ट सांगितली ती बहुतेक सर्व नाटकांना सारख्याच प्रमाणांत लागू पडते. केळकरांच्या नाटकांत निरुपयोगी असे प्रवेश फारसे नाहींतच. फारसें नाहींत असें म्हणण्याचें कारण, दोन चार ठिकाणीं केवळ विनोदाकरितां प्रवेशांची रचना करण्यांत आली आहे. तोतयाच्या बंडांतील पिकटंभट–चिकटंभट किंवा बाजीराव–खुशालराव यांचे प्रवेश, चंद्रगुप्तांतील कांतिवर्मा–व्यतिपात या जोडीचे प्रवेश, कृष्णार्जुनयुद्धांतील ऋषिकुमार व गंधर्व यांचे प्रवेश—हे सर्व या सदरांत पडतील. या प्रवेशांवांचून त्या त्या नाटकांची कांहीं हानि झाली असती असें मुळींच नाहीं. पण विनोदी प्रवेशांच्या बाबतींत जी चूक गडकऱ्यांच्या हातून झाली तीच चूक, लहान प्रमाणावर कां होईना, केळकरांच्या हातून झाली. सुदैवानें असले प्रवेश थोडेच असल्यामुळें केळकरांच्या नाट्यसृष्टीला त्यामुळें उणेपणा आलेला नाहीं; आणि वर जें प्रवेशांच्या सरस मांडणीविषयीं सांगितलें त्यालाहि या उदाहरणांनीं बाध येण्याचें फारसें कारण नाहीं.

नाहीं. जी थोडीशी गुंतागुंत उत्पन्न होते ती एकतर चंद्रकांत व चंद्रगुप्त या दोन निरनिराळ्या व्यक्ती आहेत अशी तारिणीच्या मनांत कल्पना उत्पन्न झाल्यामुळें व चाणक्यानें नंदांचा समूळ नाश करावयाची अघोर प्रतिज्ञा घेतल्यामुळें होते. या गुंतागुंतीच्या सोडवणुकीमुळें चाणक्य मिथ्याप्रतिज्ञ ठरतो हें खरें. पण त्याला त्याच्या अमानुष प्रतिज्ञेबद्दल शिक्षा देण्याचा नाटककाराचा मूळांत हेतुच असतो. चाणक्य ब्राह्मण असूनहि तामसी असतो व क्षुल्लक कारणा- वरून नंदांचा निःपात करावयाचें ठरवितो. पण त्याची प्रतिज्ञा पुरी व्हावयाची म्हणजे त्याचा प्रिय शिष्य चंद्रगुप्तहि—तो नंदवंशांतील असल्यामुळें—मरणें अवश्य होतें. चंद्रगुप्त नाटकांत चाणक्याला पडणारा पेंच तो हाच. या शिवाय याच नाटकांतील हरनंद–चंद्रगुप्ताच्या लढाईचा प्रसंग रचनेच्या दृष्टीनें फार सरस आहे. कृष्णार्जुनयुद्ध या नाटकाची रचना तर अथपासून इतिपर्यंत कलात्मक आहे. कृष्णार्जुनकलहाचें जाळें नारद इतक्या कुशलतेनें विणतो कीं, त्यांत सर्वजण सांपडूनहि पुनः कोणाच्याच जीवाला अपाय होत नाहीं. कृष्णार्जुनयुद्ध काय किंवा चंद्रगुप्त काय या दोनहि नाटकांचा शेवट अमुक अमुक प्रकारें होणार असें चतुर प्रेक्षकांना प्रथमपासून कळतें. चंद्रगुप्तांतील बळिरामाचें भुयारांतील भाषण कलेच्या दृष्टीनें फार सरस आहे. त्यामुळें भावी अनर्थाच्या सूचनेबरोबर विमोचनाची कल्पना देखील होते. चंद्रगुप्त नंदवधाची प्रतिज्ञा घेत असतांना "प्रतिज्ञाहि खोटी आणि नांवहि खोटें. चंद्रगुप्ता मला तुझी प्रतिज्ञा मिथ्या केलीच पाहिजे."—असें बळिराम स्वतः गुप्त राहून बोलतो. या त्याच्या भाषणांत सारें नाटक बीजरूपानें सांठविलें आहे. त्याचप्रमाणें कृष्णार्जुनयुद्धांत सुरवातीला चोहींकडे आनंद व शांततेचें वातावरण पसरलें असतांना पडद्यांत नारद म्हणतो, "स्वप्नांत येत नाहींत अशाहि गोष्टी अनुभवायला येतात" या नारदाच्या भाषणानें लवकरच अभूत- पूर्व असें कांहीं आपणाला पाहायला सांपडणार याविषयीं प्रेक्षकांची खात्री पटते. ही अभूतपूर्व गोष्ट म्हणजे दोन जीवश्चकंठश्च मित्रांतील युद्ध होय; अशा तऱ्हेनें या दोन्हीं नाटकांच्या अथमध्यें इतिच्या स्वरांचा अंदाज लागतो. नाटकाची सुरवात अंतसूचक असावी असें म्हणतात. शेक्सपियरच्या प्रथम प्रथमच्या सर्व नाटकांतून हीच पद्धत स्वीकारलेली दिसते. संत भानुदास या एका नाटकाखेरीज केळकरांच्या बाकी राहिलेल्या दोन नाटकांत हीच पद्धत पद्यावरास सांपडते. इतकें कीं, तें एक त्यांच्या नाटयरचनेचें वैशिष्टय माना- यला हरकत नाहीं.

नाटकाची अंतसूचक सुरवात आणि कथानकाच्या गुंतागुंतीची कुशलतेनें केलेली उकल या दोन गोष्टी नाट्यरचनेचा विचार करीत असतांना आपण पाहिल्या. तिसरी गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी अशी कीं, केळकरांच्या सर्वच नाटकांतील प्रवेशांची योजना फार मार्मिकपणें केलेली असते. ती पाहात असतांना आपणाला गुलाबांतील पाकळ्यांची आठवण होते. एका प्रवेशांतून दुसऱ्या प्रवेशाची सुरवात आणि त्याच्या पुढील प्रवेशांची रचना सुसंवद्ध असते. सर्वच प्रवेशांचा परस्परांशीं संबंध अत्यंत जिव्हाळ्याचा व पूरक असतो. प्रायः एका गंभीर व उत्तेजक प्रवेशानंतर मनाला करमणूक होऊन विश्रांति मिळेल अशा प्रवेशाची योजना केलेली असते. उदाहरण म्हणून आपण तोतयाचें बंडच घेऊं या. त्यांतील पहिलाच सुखनिधानाचा गंभीर व आकर्षक प्रवेश संपल्यावर पिकटंभटाचा विनोदी प्रवेश सुरू होतो. त्यानंतर पार्वतीबाई पूजेला बसल्याचा महत्त्वाचा प्रवेश संपल्यावर सुखनिधान–दौलतगीर हा प्रवेश सुरू होतो हें खरें. पण या प्रवेशांत सूक्ष्म विनोद असल्यानें त्याचा प्रेक्षकांच्या मनावर ताण पडत नाहीं. चवथ्या अंकांतील पार्वतीबाई–अमला हा करुण प्रवेश संपल्यावर तोतयाच्या फजितीचा विनोदी प्रवेश सुरू होतो. शेवटल्या अंकांत हें प्रमाण थोडेंसें बदललें. त्यांत पहिला संबंध व दुसऱ्याचा थराचसा भाग विनोदी, खेळकर स्वरूपाचा संपल्यावर विठाईच्या वधापासून तें अमलेच्या खुनापर्यंत सर्वच भाग करुण–गंभीर असा उतरला आहे. पण याचमुळें नाटक अत्यंत हृदयस्पर्शी बनलें आहे.

प्रवेशांच्या मांडणीची ही जी गोष्ट सांगितली ती बहुतेक सर्व नाटकांना सारख्याच प्रमाणांत लागू पडते. केळकरांच्या नाटकांत निरुपयोगी असे प्रवेश फारसे नाहींतच. फारसे नाहींत असें म्हणण्याचें कारण, दोन चार ठिकाणीं केवळ विनोदाकरितां प्रवेशांची रचना करण्यांत आली आहे. तोतयाच्या बंडांतील पिकटंभट–चिकटंभट किंवा बाजीराव–खुशालराव यांचे प्रवेश, चंद्रगुप्तांतील कांतिवर्मा–व्यतिपात या जोडीचे प्रवेश, कृष्णार्जुनयुद्धांतील ऋषिकुमार व गंधर्व यांचे प्रवेश—हे सर्व या सदरांत पडतील. या प्रवेशांवांचून त्या त्या नाटकांची कांहीं हानि झाली असती असें मुळींच नाहीं. पण विनोदी प्रवेशांच्या बाबतींत जी चूक गडकऱ्यांच्या हातून झाली तीच चूक, लहान प्रमाणावर कां होईना, केळकरांच्या हातून झाली. सुदैवानें असले प्रवेश थोडेच असल्यामुळें केळकरांच्या नाट्यसृष्टीला त्यामुळें उणेपणा आलेला नाहीं; आणि वर जें प्रवेशांच्या सरस मांडणीविषयीं सांगितलें त्यालाहि या उदाहरणांनीं बाध येण्याचें फारसें कारण नाहीं.

रचनाकौशल्याचा विचार करीत असतांना आणखीहि एक गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी आहे. केळकर आपल्या नायक–नायिकांना एकदम रंगभूमीवर न आणतां त्यांच्याविषयीं प्रेक्षकांच्या मनांत जिज्ञासा किंवा सहानुभूति उत्पन्न करून नंतर त्यांना पुढें आणतात. नाट्यशास्त्रांतील हा सर्वसाधारण पण अत्यंत उपयुक्त असा नियमच आहे. आणि कळत किंवा न कळत केळकरांनीं या नियमाचें पालन करून आपल्या नाट्यसृष्टींत बहार उडविली आहे. तोतयाचें बंड या नाटकांतील नायिका पार्वतीबाई व नायक नाना फडणीस यांना एकदम प्रेक्षकांसमोर न आणतां ज्या खलांकडून ते पीडले जात असतात त्यांना अगोदर पुढें आणलें आहे. सुखनिधान, दौलतगीर व रामचंद्र नाईक या त्रिकुटाला प्रथमच रंगभूमीवर आणून पार्वतीबाई कोणत्या दुष्ट ग्रहांच्या अंमलाखालीं आहेत हें दाखविलें आहे. चंद्रगुप्त नाटकांतील चंद्रगुप्त आणि तारिणी यांना कांहीं वेळ मागें ठेवून त्यांच्याविषयीं कुतूहल उत्पन्न केलें आहे. अमात्यमाधव या नाटकांत रुद्रदाम व कृष्णदेवराय यांच्या कारस्थानाची अगोदर कल्पना देण्यांत अमात्यमाधवाविषयीं प्रेक्षकांच्या मनांत आपलेपणा उत्पन्न करण्याचाच हेतु आहे. वीरविडंबनांतील नायक अर्जुन किंवा उत्तर यांना अशाच प्रकारें बराच वेळ पडद्याआड ठेवून प्रेक्षकांना दुर्योधनादि मंडळींच्या कारस्थानाची ओळख प्रथम करून दिली आहे. कृष्णार्जुनयुद्धांतील नायक नारद याच्या आगमनापूर्वी तर फारच कुशलतेनें उत्कंठा उत्पन्न केली आहे. रंगभूमीवरच्या पात्रांच्याच ठिकाणीं तर्कवितर्क उत्पन्न करून प्रेक्षकांना त्यांत युक्तीनें सामील करून घेतलें आहे. एकट्या संतभानुदास या नाटकांत मात्र भानुदास जरी मागाहून प्रवेश करीत असला तरी त्याच्या आगमनाविषयीं उत्कंठा उत्पन्न झालेली नसते. या एका नाटकाखेरीज केळकरांच्या सर्व नाटकांतून नायक–नायिकांचे प्रथम प्रवेश कलेच्या दृष्टीनें सरस असतात.

रचनाकौशल्याचा विचार केल्यानंतर केळकरांच्या नाट्यसृष्टींत आपलें मन वेधून घेणारी दुसरी गोष्ट म्हणजे तिच्यांतील स्त्री–पुरुष पात्रें होत. या पात्रांसंबंधीं स्थूल मानानें असें म्हणतां येईल कीं, तीं खरींखुरीं, व्यवहारांत नित्य आढळणारीं आणि बुद्धीला पटणारीं अशीं असतात. अत्यंत सद्गुणी किंवा दुर्गुणी पात्रें केळकर रंगवीतच नाहींत. सर्वसामान्य स्त्री–पुरुषांकडेच त्यांचा ज्यास्त ओढा असतो. त्यांच्या नाट्यसृष्टींत वावरणारीं माणसें ब्रह्मदेवाच्याहि सृष्टींत वावरत असलेलीं आपणाला दिसतात. हा त्यांच्या स्वभावाचा

तुम्ही एक गुण किंवा दोष माना; पण जगांत न आढळणारें असें ते कांहीं निर्माण करूंच शकत नाहींत. इतकेंच काय पण जगांत मोठ्या प्रमाणावर आढळणाऱ्या गोष्टींचीच शब्दसृष्टि ते निर्माण करितात. आणि याच कारणामुळें अनेक वेळां त्यांच्या नाटकांत सर्वच पात्रें आपापल्या परीनें चांगलीं असतात; तर कित्येक वेळां चांगुलपणाच्या बाबतींत त्यांची परस्परांत सात्त्विक चढाओढ लागते. उदाहरणार्थ चंद्रगुप्त हें नाटक आपण घेऊं या. या नाटकांतील मुख्य पात्रें—चंद्रगुप्त, चंदनदास, हरनंद, बव्रिराम—सर्वच थोर मनाचीं आहेत. प्रत्येकाचें जीवनध्येय ठरलेलें आणि त्यामुळें त्यापासून निर्माण होणाऱ्या जीवनसंगीतांत प्रत्येकजण रमलेला! आपल्या ध्येयापासून, आपल्या जीवन–तत्त्वज्ञानापासून एकालाहि ढळावेंसें वाटत नाहीं. या दृष्टीनें चाणक्यालाहि याच प्रभावळींत बसवायला कांहींच हरकत नाहीं. दुसरें उदाहरण तोतयाचें बंड या नाटकाचें घेतां येईल. या नाटकांतील दोन प्रमुख स्त्रीपात्रें पार्वतीबाई व अमला या सद्गुणी आहेत. दोघीहि सत्त्वधीर आहेत. तिसरें उदाहरण कृष्णार्जुनयुद्धाचें घेतलें तर तिथें ही गोष्ट अधिकच प्रामुख्यानें दिसते. त्यांतील मंडळी बोलूनचालून देवकोटींत गेलेली. या नाटकांतील पात्रें आपल्या चांगुलपणाचा ठसा प्रेक्षकांच्या मनावर उमटविण्याचा प्रयत्न आपापल्या परीनें करीत असतात. अनेक चांगलीं माणसें व्यवहारांत एके ठिकाणीं नांदतांना दिसलीं तरी तीं एका नाटकांत नांदवूं नये, असें या बाबतींत टीकाकारांचें म्हणणें आहे. त्यांच्या म्हणण्याचा भावार्थ असा कीं, आपल्या चांगल्या पात्रांना उठाव मिळवून धावयाचा असेल तर बरींच चांगलीं पात्रें शेजारीं शेजारीं बसवूं नयेत. इतकेंच नाहीं तर त्यांच्या शेजारीं वाईट पात्रें—आत्यंतिक वाईट पात्रें—बसवावीं. परिणामाच्या दृष्टीनें टीकाकारांचें हें म्हणणें सहज पटण्याजोगें आहे. आणि स्वतः केळकरांनींहि एकदोन ठिकाणीं या गोष्टीचा अवलंब केला आहे. तरी देखील एवढें खरें कीं, साधारण मध्यम प्रतीचीं अनेक चांगलीं पात्रें एकाच नाटकांत निर्माण करण्याची त्यांना एक प्रकारें हातोटी साधली आहे. हा त्यांच्या स्वभावविशेषाचा परिणाम आहे. आणि याचमुळें त्यांच्या नाटकांत अस्सल प्रतीचा एकहि खळ नाहीं. खलपात्रें ते निर्माण करूंच शकत नाहींत. आपल्या नाट्यसृष्टींत त्यांनीं सुखनिधान, दौलतगीर, रुद्रदाम, भीमसिंग वगैरे कांहीं खळ निर्माण केले आहेत; पण यांपैकीं पहिल्या प्रतीचा दुष्ट कोणी नाहीं. स्वभावतःच पापी, आत्याच पापकर्मात आनंद मानणारा, दुष्ट कर्माकडे खेळ या दृष्टीनें पाह-

णारा—असा एकहि खल ( Villain ) त्यांच्या नाटकांत नाहीं. त्यांच्या नाटकांत आयागो, यॅशिमो, लेडी मॅक्बेथ वगैरेसारखी मंडळी नाहींत. त्यांचीं सर्व खल–पात्रें एकदोन दुर्गुण असलेलीं साधारण कच्याच दिलाचीं अशीं आहेत. रुद्रदाम हा त्यांतल्यात्यांत जरा कठिण मनाचा दिसतो. पण तोहि भित्राच आहे. सुखनिधान हा तर बोलूनचालून पापभीरु. पार्वतीबाईंची कल्पना डोक्यांत आली कीं, त्याला कापरेंच भरतें ! दौलतगीर बराच दुष्ट आहे, पण तोहि धूर्त, पक्का नाहीं. भीमसिंग हा जात्या दुष्ट नाहीं. कांहीं कारणांमुळें तो दुष्ट बनलेला असतो. शिवाय रुद्रदामाच्या हातांतील तो एक खेळणें आहे. मरणापूर्वी तो दोन हात रुद्रदामाशीं खेळून मरतो हें खरें. पण रुद्रदामाला थांकविण्याचें सामर्थ्य त्याच्या अंगीं नाहीं. तात्पर्य हें कीं, इंग्रजी नाटकांच्या वाचनानें खलासंबंधीं जी आपली कल्पना झालेली असते, तिच्या कसोटीला उतरणारीं खल–पात्रें आपल्याकडे नाहींतच. गडकऱ्यांचा घनश्याम खल या नात्यानें चांगल्यापैकीं आहे. पण त्याची तुलना आयागोशीं केली तर तो फिकाच ठरेल. केळकरांच्या नाटकांत खरोखरीच्या खलपात्रांचा अभाव कसा आहे हें आपण वर पाहिलेंच. त्यांचा प्रत्येक खल मनुष्य सद्गुणांची थोडीशी तालीम केल्याबरोबर सद्गुणी बनेल असा आहे. पापी मनुष्यांना भविष्यकाळ असतो असें म्हणतात. केळकरांच्या खलपात्रांच्या बाबतींत असेंच म्हणतां येईल. पापनिवृत्ति त्यापैकीं प्रत्येकाला मिळूं शकेल.

आतां आपण केळकरांच्या कांहीं चांगल्या पात्रांकडे वळूं या. सहा नाटकें मिळून आपल्या स्मरणांत राहतील अशीं दहा बारा पात्रें केळकरांनीं खास निर्माण केलीं आहेत. त्यांपैकीं पुरुषपात्रांचा प्रथम विचार करूं या. केळकरांचे सर्वच पुरुष विचारवंत आहेत. त्यांची राहणी साधी, विचारसरणी मोठी व वागण्याची पद्धत निश्चित स्वरूपाची असते. तोतयाच्या बंडांतील नाना फडणीस घ्या, किंवा चंद्रगुप्तांतील चंदनदास, चाणक्य व चंद्रगुप्त हीं मंडळी घ्या, किंवा वीरविडंबनांतील अर्जुन घ्या, अथवा अमात्यमाधवांतील माधवाचार्य घ्या, अथवा कृष्णार्जुनयुद्धांतील नारद घ्या— हीं सर्व मंडळी एकेका निश्चित हेतूनें प्रेरित झालेली आहेत. चाणक्य, वीर विजय, उत्तर व हरनंद हीं पात्रें मागाहून बदललेलीं आपणाला वाटतात. त्यांच्या स्वभावांत फरक पडलेला आपण पाहातों. याशिवाय बाकी सर्व प्रमुख पुरुष–पात्रें–सुरवातीपासून शेवटपर्यंत जशींच्या तशींच राहतात. जीवनक्रमाचें कांहीं निश्चित तत्त्व ठरल्यावर मनुष्यानें नेहमीं त्याप्रमाणें वागावें हें अगदीं स्वाभाविक आहे.

ज्यांचीं हीं असलीं तत्त्वें ठरलेलीं नसतात त्यांच्या वर्तनांत परिस्थितीप्रमाणें फरक पडतो. शेक्सपिअरची बहुतेक पात्रें बदलणारीं असतात. त्याच्या उलट आधुनिक नाटककार बर्नार्ड शॉ यांचीं पात्रें सुरवातीपासून शेवटपर्यंत जशींच्या तशींच राहतात. नाटककार भावनाप्रधान असेल तर प्रायः त्याचीं पात्रें सतत बदलणारीं (Evolving) बनतील. जर तो तर्कप्रधान असेल तर तीं स्थिरवृत्तीचीं (Static) होतील. केळकरांच्या ठिकाणीं पहिल्यापेक्षां दुसराच गुण अधिक असल्यानें त्यांचीं पुरुषपात्रें स्थिरवृत्तीचीं बनलीं आहेत. याच गुणाच्या जोडीला दुसरा गुण वसत्तायला पाहिजे तो हा कीं, हीं सर्व पात्रें वादविवाद करण्याच्या कामीं, बिनतोड युक्तिवाद करण्याच्या कामीं अत्यंत निष्णात असतात. कृष्णार्जुन-युद्धांतील नारदाचा युक्तिवाद बिनतोड असतो. प्रत्येक पात्राला उलट सुलट जें जें तो सांगतो तें तें त्या त्या वेळीं तर्कशुद्ध वाटतें. त्याचप्रमाणें स्वतः श्रीकृष्ण व अर्जुन या दोघांतील लढाईच्या वेळचा संवाद असाच तर्कशुद्ध आहे. नाना फडणीस पार्वतीबाईशीं किंवा विशेषतः रामचंद्र नाइकाशीं जो संवाद करतात तो अत्यंत कुशलपणें करतात. हें संवाद-कौशल्य किंवा वाक्पटुत्व वीरविडंबनांतील अर्जुन, चंद्रगुप्तांतील चंदनदास व बळिराम, अमात्यमाधवांतील माधवाचार्य यांच्या ठिकाणींहि दिसून येतें. हीं सर्व मंडळी भावनाप्रधान म्हणण्यापेक्षां बुद्धिप्रधान आहेत. याचा अर्थ असा नव्हे कीं, त्यांच्या ठिकाणीं भावनेचा ओलावा मुळींच नाहीं. पार्वतीबाईच्या किंवा अमलेच्या दुःखानें दुःखी होणारा नाना फडणीस, मीनाक्षी व हंसेश्वरीची काळजी वाहणारा माधवाचार्य, हरनंदावर अकृत्रिम प्रेम करणारा चंदनदास, चंद्रगुप्तावर अनुपम प्रेम करणारा चाणक्य किंवा उत्तराचा बालिशपणा पाहून दुःखी होणारा अर्जुन--या सर्वांच्या ठिकाणीं कोमल भावना नाहींत असें कोण म्हणेल ? पण इतकें मात्र खरें कीं, हीं मंडळी भावनावश होत नाहींत. एक प्रकारची स्थितप्रज्ञावस्था त्यांच्या ठिकाणीं आढळते. आणीकाहि एक गोष्ट या पात्रांसंबंधीं लक्षांत घ्यायला हवी. यांपैकीं एकहि पात्र फाजील गंभीर नाहीं. त्यांच्या स्वभावांत बालपणा किंवा मूढपणा थोडासा असतोच असतो. थोडासा अल्लडपणा, हूडपणा किंवा विचित्रपणा त्याच्या वृत्तीला शोभून दिसतो. आणि याच गुणामुळें माधवाचार्य हंसेश्वरीला पति शोधून काढण्याविषयीं सांगत असतांना तिची थट्टा करतो, नाना फडणीसाला अमलेची भटकन्ती पाहून विनोद सुचतो, अर्जुनाला आपलें बृहन्नडेचें सोंग पाहून हंसूं येतें,

आणि चाणक्याला आपण मिथ्याप्रतिज्ञ ठरलों म्हणून स्वतःचीच निर्भर्त्सना करावीशी वाटते. थोडक्यांत आपण असें म्हणूं शकूं कीं, केळकरांचीं पुरुषपात्रें निश्चित ध्येयाचीं, स्थिरवृत्तीचीं, बुद्धिप्रधान पण भावनेला पारखीं न झालेलीं आणि स्वभावांत थोडा विचित्रपणा किंवा खेळकरपणा असलेलीं अशीं आहेत. याशिवाय वरींचशीं दुय्यम दर्जाचीं पात्रें केळकरांच्या नाटकांतून आढळतात. त्या पात्रांचा उपयोग सभोंवतालची परिस्थिति दाखविण्याकडे, मुख्य कथानकाचा ताण सैल करण्याकडे, क्वचित् चंद्रगुप्तांतील कांतिवर्मा–व्यतिपात या जोडीप्रमाणें मूळ कथानकाला कलाटणी देण्याकडे, व अनेक वेळां केवळ विनोदनिष्पत्तीकरितां केलेला असतो.

आतां आपण स्त्री–पात्रांकडे वळूं या. केळकरांच्या नाटकांत पुरुषपात्रांच्या मानानें स्त्री–पात्रें थोडीं असतात; पण तीं पात्रें भरीव व आपल्या मनावर कायमचा ठसा उमटवतील अशीं असतात. केळकर हीं पात्रें नाजुक वोटांनीं व सुबक रंगांनीं रंगवितात. त्यांनीं आपल्या नाट्यसृष्टींत पार्वतीबाई, अमला, द्रौपदी ( वीरविडंबन ), तारिणी व हंसेश्वरी अशा पांच सुंदर स्त्रिया निर्माण केल्या आहेत. या सर्व स्त्रिया थोर शीलाच्या, संस्कृत मनाच्या व अढळ विचाराच्या आहेत. या पांचीहि स्त्रियांवर दुःखाचे, संकटाचे प्रसंग आले असतांना त्या आपल्या निश्चितार्थापासून ढळत नाहींत. पार्वतीबाईवरील दुःख आणि त्यापासून निर्माण झालेलीं तोतयासारखीं आगंतुक संकटें हाच तोतयाच्या बंडांतील मुख्य विषय असूनहि पार्वतीबाई कोठेंहि पोरकटपणा दिसेल असा शोक करीत नाहींत. त्यांचा स्वाभिमान व कुलाभिमान पतीच्या शोधार्थ पुणें सोडून बाहेर जायला त्यांना मनाई करतो. अमला सतत बारा वर्षें पतिशोधार्थ हिंडत असतांना देखील तिची वृत्ति खंबीर असते. अज्ञातवासांत असतांना द्रौपदी आपलें दुःख शांत मनानें सहन करिते. तारिणी प्रेम कीं कर्तव्य या पेंचांत सांपडून, एकीकडे हृदयाचे शतशः तुकडे होत असूनहि, कर्तव्याचा कठिण मार्गच स्वीकारते. त्याचप्रमाणें हंसेश्वरी संकटाच्या जबड्यांत असूनहि आपलें मन मुळींच चळूं देत नाहीं.

निश्चितार्थापासून न ढळणें हा जसा केळकरांच्या स्त्रीपात्रांचा एक विशेष आहे, तसाच प्रेमळपणा हा त्यांचा दुसरा विशेष होय. या सर्व स्त्रियांचें आपापल्या प्रियकरांवरील प्रेम मनापासून व निस्सीम आहे. पार्वतीबाई मृत पति जिवंत आहे या कल्पनेशीं पंधरा वर्षें खेळत होत्या ! त्यांचें त्यांच्या पतीवर अनन्यसाधारण प्रेम होतें, यांत शंकाच नाहीं. अमलेचें पतिप्रेम हें तर खरो-

खरीच अनुपम आहे. ती आपल्या पतीचा शोध बारा वर्षें करीत असते; आणि शेवटीं सुखनिधान तिला तो तिचा पति नाहीं असें म्हणायला सांगत असतांना, ती तसें न करितां त्याच्या हातून मृत्यु स्वीकारते. केवढें अतुल हें पातिव्रत्य ! तारिणीचें पतिप्रेम याहिपेक्षां निराळें आहे. तिच्या प्रेमांत पोरकटपणाचा अंश देखील नाहीं. प्रसंग पडला असतांना ती आपल्या प्रियकराची निर्भर्त्सनाहि करायला चुकत नाहीं. चंद्रगुप्त तिला मनापासून प्रिय असतो. तरी देखील प्रेम कीं कर्तव्य असा प्रश्न पडला असतांना ती कर्तव्याच्याच बाजूनें निकाल देते, व चंद्रगुप्ताचीं दुरुत्तरें शांतपणें ऐकून घेते. हंसेश्वरीच्या प्रेमाची कसोटी आणीक वेगळ्या तऱ्हेनें लागते. रुद्रदामासारख्या नीच मनुष्याचा पति म्हणून स्वीकार करणें किंवा आपल्या डोळ्यांदेखत वीरविजयाचा शिरश्छेद पाहाणें या दोन गोष्टी तिच्या समोर ठेवल्या असतांना ती दुसरी गोष्टच दुःखी मनानें स्वीकारते.

या स्त्रियांचा तिसरा विशेष म्हणजे त्यांची कर्तृत्वशक्ति. सर्वसामान्य इतर स्त्रियांप्रमाणें त्या केवळ चूल आणि मूल यांकडे लक्ष देणाऱ्या नाहींत. त्याचप्रमाणें एका कोंपऱ्यांत बसून मुळूमुळू रडण्याची देखील त्यांना संवय नाहीं. प्राप्त परिस्थितीला टक्कर देऊन ती बदलण्याचा त्यांचा सतत प्रयत्न चाललेला असतो. ऑफिलिआप्रमाणें निमूटपणें त्या दुःख सहन करणाऱ्या नाहींत. पार्वतीबाई उघड उघड नानांना प्रश्नांच्या पेंचांत धरून तोतया नजरेला घालण्याचें अभिवचन मिळवितात. वगंभटाला पत्र देऊन त्या रत्नागिरीला रवाना करितात. अमलेचें कर्तृत्व तर सहज समजण्याजोगें आहे. वीरविडंबनांतील द्रौपदी, विराट नगरांतील सर्व पुरुष–सैनिक रणांगणावर गेले असतांना, नगररक्षणाची जबाबदारी स्वतांवर घेते. तारिणी ही तर बोलून चालून कर्तव्याचा कंटकमय मार्गच स्वीकारते. हरनंदाला ती ब्रह्मपुत्रानदीपर्यंत पोंचवायला जाते च एके ठिकाणीं भागुरायण या सेनापतीशीं लढते देखील. हंसेश्वरीच्या हातून प्रत्यक्ष विधायक अशी कांहीं कामगिरी होत नाहीं. खंबीर मनःस्थितींत ती निश्चयात्मक कांहीं शब्द बोलते. पण पार्वतीबाई, अमला, द्रौपदी किंवा तारिणी यांच्या अंगांतील धमक तिच्यांत नाहीं. हंसेश्वरीपेक्षां अमात्यमाधवांतील राणी अधिक कर्तृत्वान् अशी आहे. एका हंसेश्वरीखेरीज केळकरांच्या सर्व नायिका परिस्थितिरूपी मृत्तिकेला आपल्या इच्छेप्रमाणें घडविण्याचा प्रयत्न करीत असतात. त्या कोमल भावनांनीं युक्त असूनहि फारशा कोठें भावनावश होत नाहींत. पार्वतीबाई कांहींशा भावनाधीन आहेत, यांत शंका नाहीं.

पण त्यांची मनःस्थितिहि कांहींशी निराळीच आहे. पति जिवंत आहे अशी त्यांची दृढ समजूत असल्यामुळें त्यांच्यावर मधून मधून भावनावश होण्याचा प्रसंग येतो. मनांत तीव्र भावना उसळत असतांना भावनावश न होणारी तारिणी पाहून आपणाला तिचें कौतुक करावेंसें वाटतें. हंसेश्वरी या बाबतींत तारिणीची धाकटी बहिण शोभण्यासारखी आहे. एकाएकीं भावनावश न होणें, हाहि केळकरांच्या स्त्री–पात्रांचा विशेष म्हणतां येईल. त्यांचीं स्त्री–पात्रें सरळ आणि खंबीर पण कोमल मनाचीं आहेत. निश्चित हेतूनें प्रेरित झाल्यामुळें त्यांच्यांत फारसा बदल होत नाहीं हें खरें; पण त्याचमुळें तीं तेजस्वी-देखील बनलीं आहेत. पार्वतीबाई, अमला, द्रौपदी, तारिणी व हंसेश्वरी–या स्त्रिया केळकरांच्या नाट्यसृष्टींत प्रमुख आहेतच. पण मराठी नाट्यवाङ्मयांतहि त्यांना वरच्या दर्जाचें स्थान अवश्य द्यावें लागेल. या स्त्रिया अत्यंत तेजस्वी व स्फूर्तिदायक आहेत.

केळकरांच्या नाट्यसृष्टींत विविध प्रकारची, निरनिराळ्या स्वभावाची, व वेगवेगळ्या वयाची मंडळी आहेत. पण त्यांत मुलांना फारसें कोठेंच स्थान नाहीं. कृष्णार्जुनयुद्धांत वीणा व मदिरा या दोन मुली आहेत. पण त्यांच्याकडे कांहींच महत्त्वाचें काम नाहीं. त्याचप्रमाणें संत भानुदास या नाटकांत चक्रपाणी हा एक मुलगा आहे. पण तोहि दोन चार वेळां चारदोन वाक्यें उच्चारण्यापलीकडे कांहीं करीत नाहीं. मूलस्वभाव ज्यांत व्यक्त होईल असें तो कांहींच करीत नाहीं. खलपात्रांच्या बाबतींत मागें जें विधान केलें त्याच्याहिपेक्षां निश्चयात्मक विधान मुलांच्या बाबतींत आपण करूं शकूं; आणि तें हें कीं, केळकरांना आपल्या नाट्यसृष्टींत बालकें निर्माण करतां येत नाहींत. वीरविडंबनांतील उत्तर आणि उत्तरा या जोडीकडे याच्याविरुद्ध आक्षेप म्हणून कोणी बोट दाखवील, पण साध्या मूलपणापलीकडे ही जोडी गेली आहे. उत्तर एखाद्या बालकाप्रमाणें अल्लडपणा करतो. त्यामुळें तो मूर्ख ठरेल, पण बालक ठरणार नाहीं.

केळकरांनीं सहा नाटकें मिळून निरनिराळ्या स्वभावाचीं पात्रें कशीं निर्माण केलीं आहेत तें आपण पाहूं या. याकरितां कोष्टकाची रचना केल्यास ठीक होईल. कारण एकाच पात्राच्या अंगीं अनेक गुण, क्वचित् विरोधी असेहि, असूं शकतात.

| स्वभावगुण | पात्रें |
|---|---|
| स्वार्थी ... .... ... | सुखनिधान, दौलतगीर, राणी व रुद्रदाम. |

| | |
|---|---|
| लोभी .... .... .... | विठाई, वगंभट, चोथलेबुवा व पाटील. |
| निःस्वार्थी.... .... .... | वळिराम, माधवाचार्य, नारद. |
| स्वार्थत्यागी .... .... | तारिणी, हंसेश्वरी, अमला व भानुदास. |
| तमोगुणी .... .... .... | चाणक्य, राणी, हरदेवराय, गालव आणि चंदनदास. |
| चंचल .... .... .... | अमला, राणी, चंद्रगुप्त, वीरविजय, भीमसिंग, हैवतराव. |
| शांत किंवा स्थिर .... | पार्वतीबाई, द्रौपदी, तारिणी, हंसेश्वरी, भानुदास, वळिराम, नारद, माधवाचार्य, हनुमान् व नाना फडणीस. |
| महत्त्वाकांक्षी .... .... | चंद्रगुप्त, माधवाचार्य, हरनंद, वीरविजय, सुखानेधान, दौलतगीर, राणी. |
| राक्षसी महत्त्वाकांक्षी .... | चाणक्य, रुद्रदाम, भीमसिंग |
| स्वभावतः दुष्ट .... .... | रुद्रदाम, राणी. |
| सकारण दुष्ट .... .... | चाणक्य, भीमसिंग. |
| गंभीर .... .... .... | पार्वतीबाई, अमला, तारिणी, हंसेश्वरी, नाना व चंद्रगुप्त. |
| गंभीर पण खेळकर .... | नारद, अर्जुन, चाणक्य, माधवाचार्य, हनुमान्, वळिराम, द्रौपदी व मीनाक्षी. |

वरील कोष्टकावरून आपणांला कळलेंच असेल कीं, विविध प्रकृतींचीं व विविध गुणांचीं अनेक पात्रें केळकरांनीं निर्माण केलीं आहेत. हीं सर्व पात्रें खरीखुरीं वाटतात. रस्त्यावरून जातांना, मंडळींशीं गप्पागोष्टी करतांना, देवघेवीचा व्यवहार करतांना व एखादें मोठें कार्य हातीं घेतलें असतांना— आपणांला अशा पात्रांपैकीं पुष्कळशीं भेटतात. या सर्व पात्रांच्या उचारांत व आचारांत असभ्य किंवा असंभाव्य असें कांहींच नाहीं. त्या त्या प्रसंगीं आपण त्या त्या पात्रांप्रमाणेंच वागलों असतों असें आपणांला वाटतें. अमला, तारिणी, माधवाचार्य किंवा वळिराम या पात्रांप्रमाणें जरी क्वचित् प्रसंगीं आपणांला वागतां आलें नाहीं, तरी तीं पात्रें आपल्या जीवनांत स्फूर्ति निर्माण केल्यावांचून खचित राहणार नाहींत.

केळकरांच्या नाटकांत आपलें लक्ष वेधून घेणारी तिसरी गोष्ट म्हणजे त्यांची भाषाशैली. त्यांच्या भाषाशैलीचा पहिला गुण म्हणजे तिचा साधे-

पणा. त्यांचें कुठलेंहि नाटक उघडून त्यांतील कुठलेंहि पान आपण वाचलें तरी कोठेंहि आपणांला दुर्बोध वाक्यरचना, दुर्बोध शब्दांची योजना किंवा दुर्बोध म्हणींचा उपयोग केलेला आढळणार नाहीं. तोतयाच्या बंडांत क्वचित् ठिकाणीं कांहीं म्हणी व शब्द अपरिचित वाटतात. पण ह्या नाटकांतील कांहीं स्थळांखेरीज केळकरांच्या कुठल्याहि नाटकांत असा प्रकार आढळत नाहीं. त्यांचीं नाटकें वाचीत असतांना डोंगराची चढण चढल्यासारखें आपणांला वाटत नाहीं, तर आस्फाल्टच्या गुळगुळीत रस्त्यावरून आपण जातों आहों असें वाटतें. संस्कृतांत अशा भाषाशैलीला प्रासादिक म्हणतात. केळकरांची भाषा अशाच प्रकारची आहे. त्यांच्या भाषेचा दुसरा गुण म्हणजे थोडक्या शब्दांत विपुलार्थ प्रकट करणें हा होय. तोतयाचें बंड, कृष्णार्जुन-युद्ध व चंद्रगुप्त या नाटकांत हा गुण प्रामुख्यानें दिसतो. केळकरांच्या भाषेंत पाल्हाळिकपणाचा अंश देखील नाहीं. तोच विचार, तीच कल्पना, निर-निराळ्या शब्दांच्या कसरतीकरून सांगण्याचा त्यांना मनापासून तिटकारा आहे. यांचें कारण त्यांची परिस्थितिहि असूं शकेल. इतर अनेक महत्त्वाचीं कामें करीत असतांना त्यांना आपली वाङ्मयसृष्टि निर्माण करावी लागली. आणि याचमुळें त्यांनीं शब्दांचा उपयोग काटकसरीनें पण कौशल्यानें केला. थोडक्या शब्दांत पुष्कळ गोष्टी ते सांगतात, याचें कारण झालें तरी हेंच. त्यांच्या भाषेचा तिसरा विशेष म्हणजे तिची सुसंस्कृतता. त्यांच्या भाषेचा पेहराव खानदानी प्रकारचा असतो. त्यांचीं नाटकें वाचीत असतांना आपल्या अंतःकरणावर चुकूनहि वाईट संस्कार होत नाहींत. उलट आपलें मन अधिकाधिक सुसंस्कृत होत जातें. याचें कारण त्यांची भाषा सदभिरुचीच्या अंकुशाखालीं सतत असते. काळ, प्रसंग, व्यक्ति यांचा विचार करून लिहिल्यासारखी त्यांची भाषा दिसते. केळकरांच्या भाषेचा चौथा गुण म्हणजे पात्रांच्या तोंडीं साजेल अशी भाषा ते योजितात. व्यवहारांत आपण असें पहातों कीं, एका कुटुंबांतहि घरांतल्या शिकलेल्या कर्त्या पुरुषांची एक प्रकारची भाषा असते, तर घरांतल्या आजीबाईची दुसऱ्या प्रकारची. घरांतल्या मुलामुलींची तिसऱ्या प्रकारची तर घरांतल्या नोकरमाणसांची आणीक चवथ्या प्रकारची. वरांतील सुशिक्षित व वाङ्मयप्रेमी सदाशिव-रायांनीं एक प्रकारची कोटी केली तर घरांतील सदोबा आचारी तशीच कोटी करतील असें नाहीं. केळकरांच्या नाटकांत हा विवेक फारच कसोशीनें पाळलेला दिसतो. त्यांच्या भाषेचा पांचवा गुण सौंदर्य हा होय. केळकरांच्या

साही नाटकांतील भाषा सहजसुंदर आहे. उपमा, रूपक, उत्प्रेक्षा, विरोध इत्यादि निरनिराळ्या प्रकारच्या अर्थालंकारांनीं त्यांनीं आपली भाषा सजविली आहे. कुठलाहि अर्थालंकार ते साध्या शब्दांत रंगवितात. शब्दांची कसरत करून कधींहि ते अलंकार साधूं पहात नाहींत. भाषासौंदर्याच्या दृष्टीनें तोतयाचें बंड हें नाटक केळकरांच्या सर्व नाटकांत श्रेष्ठ ठरेल. याशिवाय त्यांच्या भाषेचा गुण म्हटला म्हणजे युक्तिवाद. त्यांच्या नाटकांतील बहुतेक सर्व संवाद या गुणानें युक्त असतात. बुद्धियोग हें त्यांच्या भाषेचें वैशिष्ट्यच आहे. कृष्णार्जुनयुद्धांतील कृष्ण, अर्जुन व नारद; तोतयाच्या बंडांतील नाना; चंद्रगुप्तांतील चंदनदास, तारिणी व हरनंद; वीरविडंबनांतील उत्तर; अमात्यमाधवांतील माधवाचार्य;—या सर्व मंडळींच्या भाषेकडे पाहिलें असतांना त्यांतील बुद्धीची चमक सहज कळते. केळकरांची भाषाशैली बुद्धीला रंजविणारी आहे. पण यासिवायहि एक सातवा विशेष त्यांच्या भाषेचा आहे. आपल्या हृदयांत निरनिराळ्या भावना उत्पन्न करण्याचें सामर्थ्यहि त्यांच्या भाषेंत आहे. तोतयाच्या बंडांतील पार्वतीबाई व अमला यांचीं करुणरसपरिपोष करणारीं भाषणें, चंद्रगुप्तांतील चंदनदास व तारिणी यांचीं राजभक्तीनें प्रेरित होऊन केलेलीं वीररसाचीं भाषणें, अमात्यमाधवांतील सात्त्विक शृंगार व करुण रसांचा परिपोष करणारीं हंसेश्वरी व वीरविजय यांचीं भाषणें—हीं सर्व या दृष्टीनें पहाण्याजोगीं आहेत.

केळकरांच्या नाट्यसृष्टींत चवथी महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्यांचा विनोद ही होय. केळकरांनीं "सुभाषित आणि विनोद" हा प्रबंध लिहिल्यानंतर आपलीं नाटकें लिहिलीं. त्यामुळें सुभाषित (Wit) आणि विनोद (Humour) यासंबंधींच्या त्यांच्या कल्पना दृढ होऊन त्यांना आपल्या नाटकांत या दोहोंचाहि संस्कारी उपयोग करतां आला. त्यांच्या साही नाटकांचा विचार केला असतांना असें दिसतें कीं, त्यांचा कोटीपेक्षां विनोदाकडेच अधिक ओढा आहे. तोतयाचें बंड किंवा चंद्रगुप्त या दोन नाटकांत त्यांनीं मधून मधून कोट्या केल्या आहेत; नाहीं असें नाहीं. पण एकंदरींत विनोद करण्याकडेच त्यांची प्रवृत्ति दिसते. सुभाषित आणि विनोद या प्रबंधांत त्यांनीं विनोदाचें, "असंबद्ध स्थितीचें यथार्थ वर्णन दुसऱ्याचें लक्ष वेधेल अशा रीतीनें करणें"—असें स्पष्टीकरण केलें आहे. या स्पष्टीकरणाप्रमाणेंच त्यांनीं विनोदाचा उपयोग आपल्या नाटकांत केला आहे. विनोददर्शन मुख्यतः परिस्थितीच्या वर्णनावर अवलंबून असते. केळकरांचा विनोदहि परिस्थितिनिर्मित असतो.

त्यांच्या नाटकांतून एक प्रकारचें वातावरण निर्माण केलेलें असतें. याचा अर्थ असा कीं, त्यांच्या नाटकांतून विनोदाचा संचार सूक्ष्मपणें सर्वत्र झालेला असतो. प्रेक्षकांच्या किंवा वाचकांच्या मुखावरून स्मिताची रेषा सहसा किंवा अकारण ढळूं द्यावयाची नाहीं असा त्यांचा निर्धारच दिसतो. त्यांचीं नाटकें पहात असतांना प्रेक्षकांच्या हंसून हंसून मुरकुंड्या वळायच्या नाहींत हें खरें. पण वर सांगितलेल्या सूक्ष्म–विनोद–संचारामुळें प्रेक्षकांच्या मनावर नाटकाचा ताणहि बसणार नाहीं.

विनोदाकरितां त्यांनीं कांहीं पात्रें योजिलीं आहेत. पण असे प्रसंग फार थोडे आहेत. शिवाय या पात्रांचा मुख्य नाटकाशीं मुळींच संबंध नसतो असें नाहीं. केवळ विनोदाकरितां एखाद्या प्रसंगाचा किंवा पात्राचा उपयोग ते सहसा करीत नाहींत. कृष्णार्जुनयुद्ध, चंद्रगुप्त, वीरविडंबन व संत भानुदास या नाटकांत मुख्य पात्रांकडूनच विनोद केला जातो. शिवाय हा विनोद कष्टसाध्य नसून सहजीं साधलेला असतो. केळकरांच्या विनोदाचें मुख्य लक्षण म्हणजे संभावितपणा. त्यांचें कोणतेंहि नाटक आपण पहा, त्यांत असभ्य प्रकारचा विनोद कोठेंहि सांपडणार नाहीं. त्यांच्या विनोदापासून एकप्रकारचें उच्च वातावरण तयार होतें. या दृष्टीनें विचार करतां कृष्णार्जुनयुद्धांतील नारद, व चंद्रगुप्तांतील बळिराम यांचीं भाषणें मनन करण्याजोगीं आहेत. वाचक–प्रेक्षकांना हंसवावयाचें तर खरें, पण त्याजबरोबर त्यांच्या मनाची उन्नति होईल, त्यांना कांहीं बोध घ्यायला सांपडेल, अशा प्रकारें विनोदाची योजना करावयाची. नारद व बळिरामाचें उदाहरण वर पाहिलेंच. या दोघांच्या हंसण्यापासून इतर पात्रांचें कल्याणच होतें. चाणक्याची थट्टा करण्यांत अशाच प्रकारें वाचक-प्रेक्षकांना बोध मिळवून देण्याचा हेतु दिसतो. भानुदास नाटकांतील विनोद हा तर मुद्दामच देवस्थानांची उत्पत्ति कशी होते, लोकांना कसा त्रास होतो, वगैरे गोष्टी स्पष्ट करण्याकरितां योजिला आहे. देशांत एखादी घडामोड होत असतांना कांहीं माणसें त्याचा फायदा घेऊन लोकांना कशा प्रकारें नाडतात, हें कांतिवर्मा–व्यतिपात या जोडीच्या कृष्णकृत्यांवरून समजतें. उत्तराच्या संभाषणांत तर थोडक्याद्धन मनुष्य फाजील लाडांनीं कसा बिघडतो, पराक्रमाच्या खोट्या गप्पा कशा मारतो, वगैरे गोष्टी दाखविण्याचा हेतु आहे या सर्व गोष्टींवरून थोडक्यांत आपणाला असें सांगतां येईल कीं, केळकरांचा विनोद सहजसुंदर, परिस्थिति-निर्मित, सभ्य व सन्मार्गदर्शी असतो.

आणीकहि एक गोष्ट केळकरांच्या विनोदासंबंधीं लक्षांत ठेवण्याजोगी आहे. त्यांच्या नाटकांत हास्य आणि करुणरस एकमेकांच्या हातांत हात घालून फिरत असतांना दिसतात. गालावर स्मिताची रेषा उमटते ना उमटते, तोंच डोळे पाण्यानें डबडबण्याचे किती तरी प्रसंग त्यांच्या नाटकांत येतात. उदाहरणाकरितां पुनः एकवार " तोतयाचें बंड " या सर्वांगसुंदर नाटकाकडे आपणांला वळायला हवें. या नाटकांतील तिसऱ्या अंकाचा पहिला प्रवेश या दृष्टीनें लक्षांत ठेवण्याजोगा आहे. तो सबंध प्रवेशच बहारदार व काव्यमय आहे. रात्रींच्या वेळीं शहरच्या वेशीजवळ धर्मोजी व इतर चौकीदार आगटीजवळ बसून थट्टा विनोद करण्यांत व पोवाडे म्हणण्यांत वेळ घालवीत असतात. अशा वेळीं एकाएकीं करुणदेवी अमला प्रवेश करिते; आणि तिच्या आगमनाबरोबर विनोदी वातावरण प्रथम गंभीर व नंतर करुण बनतें. चवथ्या अंकांतील तिसरा प्रवेशहि असाच हास्य-शोक-मिश्रित आहे त्यांतील विठाईच्या भाषणानें प्रेक्षकांना हंसूं येतें ना येतें, तोंच अमला-पार्वतीबाई यांच्या दुःखानें त्यांच्या डोळ्यांत अश्रु उभे राहतात. पांचव्या अंकांतील दुसऱ्या प्रवेशांत अशीच हर्ष-शोकाची सांगड घालण्यांत आली आहे. त्यांतील वगंभट-विठाईच्या प्रेमचेष्टा पाहून प्रेक्षकांना क्षणभर मौज वाटते ना वाटते तोंच हैबतरावाच्या आगमनानें त्या प्रवेशांत वातावरण इतकें जड आणि सुन्न बनतें कीं, त्याचा शेवट विठाईच्या वधानें होतो.

केळकरांच्या नाट्यसृष्टींत आपल्या मनाला आनंद देणारी पांचवी महत्वाची गोष्ट म्हणजे त्यांच्या नाटकांतून केला जाणारा अप्रत्यक्ष उपदेश. केळकरांनीं आपलीं नाटकें लोकांना विशिष्ट गोष्टींची शिकवण देण्याच्या हेतूनें लिहिलीं नाहींत. नाट्यवाङ्मयाची आवड, कलेची सेवा करण्याची अंतःकरणांतील तळमळ, सौंदर्यनिर्मितीची हृदयाला लागलेली आस, म्हणून त्यांनीं आपलीं नाटकें लिहिलीं. उपदेश करण्याच्या हेतूनें त्यांनीं मुळींच लिहिलीं नाहींत. आणि कोणत्याहि वाङ्मयसेवकानें उपदेशाचा मुद्दा गौणच समजावा. अप्रत्यक्ष रीतीनें जर वाचकांना बोध देतां आला तर तो अवश्य द्यावा. पण उपदेशकाची भूमिका कधींहि पत्करूं नये. वाङ्मयांतील उपदेश फुलांतील सुगंधाप्रमाणें असावा. दिसूं मात्र नये, पण अनुभवितां यावा.

केळकरांच्या नाटकांतील उपदेश असाच प्रकारचा आहे. त्यांनीं प्रत्यक्ष उपदेश केला नसला तरी त्यांच्या नाटकांत कित्येक तत्वें अप्रत्यक्षपणें गोंविलीं गेलीं आहेत. कांहीं नाटकांत तीं वरवर दिसतात. तर कांहींत तीं किंचित्

खालीं गेलेलीं दिसतात. हीं तत्वें किंवा हा उपदेश कोणत्या प्रकारचा आहे तें आपण पाहूं या. तोतयाचें बंड या नाटकांत अमुक एक निश्चित तत्व सांगितलेलें नाहीं. पण भोळें, भावडे, भावनाप्रधान ( Emotional ) मन असलें कीं, मनुष्याला आपल्या भावनाप्रमाणेंच सर्व जग कसें दिसूं लागतें, त्याच्या भावनांचें रूपांतर स्थिर वृत्तींत ( Sentiment ) कसें होतें, त्यामुळें त्याच्यावर कसकसे अनर्थ ओढवतात वगैरे गोष्टी पार्वतीबाईच्या पात्रावरून कळतात. त्याचप्रमाणें एखाद्या क्षुल्लक गोष्टीला, जबाबदार मंडळींचें दुर्लक्ष झाल्यावर, केवढें भयंकर स्वरूप येतें, हें तोतयाच्या ( सुखनिधानाच्या ) बंडावरून समजतें. कृष्णार्जुनयुद्धांतील जीवनमीमांसा अधिक स्पष्ट प्रकारची आहे. मनुष्याची आत्मप्रीति किती बलवत्तर असते, त्या आत्मप्रीतीपुढें बंधुजन व स्नेही किती तुच्छ वाटतात, या गोष्टींचें प्रतिबिंब या नाटकांत पहावयास सांपडतें. कृष्णाचें अर्जुनावर अलोट प्रेम असूनहि स्वाभिमानरक्षणार्थ तो अर्जुनाशीं कसा लढला हें या नाटकांत दाखविलें आहे. त्याचप्रमाणें हेतुशुद्ध कलहप्रीति आपणांला हंसवून रडवून शेवटीं कसें सुखी बनविते, हें नारदाच्या चारित्र्यावरून समजतें. सत्ताधारी लोक गरीब वर्गाला कसे छळतात, त्यांना स्पर्श करण्यांत त्यांना अपमान झाल्यासारखा कसा वाटतो वगैरे गोष्टींचा बोध गंधर्वाच्या व गंधर्वस्त्रीच्या वागण्यावरून होतो. चंद्रगुप्त या नाटकांत तामसी मनुष्याची थट्टा करण्याचा नाटककाराचा हेतु दिसतो. अपराधाचें माप न ठरवितां शिक्षेकरितां केलेल्या राक्षसी प्रतिज्ञा शेवटीं कशा विफल ठरतात हें चाणक्याच्या उदाहरणावरून कळतें. ब्राह्मणानें क्रोधवश होऊन आपली अवनति करूं नये, त्यापासून त्याचें व इतरांचें नुकसान होतें, हेंहि तत्व या नाटकांत गोंविलें आहे. त्याचप्रमाणें, भक्तीकरितां मनुष्यानें रानोमाळ हिंडण्याचें कारण नाहीं, भक्तीचा विषय कांहींहि असूं शकेल व चालूं शकेल, तुमची भक्ति मात्र शुद्ध, अव्यभिचारी असावी असेंहि या नाटकांत सांगितलें आहे. तुम्ही भक्ति दिव्यदेवताची करा किंवा राजदेवताची करा, दोन्हींपासून तुम्हांला समाधान वाटेलच वाटेल. चंदनदासाचें पात्र राजदेवताच्या भक्तीची मीमांसा करण्याच्या हेतूनेंच जणूं काय निर्माण केल्यासारखें वाटतें. अमात्यमाधव या नाटकांत तोतयाचें बंड या नाटकाप्रमाणें पृष्ठभागावर तरंगणारें तत्व नाहीं. आपला हेतु शुद्ध असल्यावर कितीहि बिकट परिस्थिति निर्माण झाली तरी शेवटीं आपणांला यश कसें मिळतें हें माधवाचार्यांच्या चारित्र्यावरून दिसतें. स्वतःची बुद्धि न चालवितां दुसऱ्याच्या बुद्धीनें चाल-

णाऱ्या मनुष्याचा अधःपात कसा होतो, हें राजा हरदेवराय याच्या हकिकती-वरून कळतें. त्याचप्रमाणें प्रेम हें बाह्यपरिस्थितीला न जुमानतां स्वतःच्या ठिकाणींच आनंद कसें मिळवूं शकतें, आणि शेवटीं अशा प्रेमाचा विजय कसा होतो, हें हंसेश्वरी व वीरविजय या दोन पात्रांवरून समजतें. हृदयाचा चांगुलपणा हा जाति किंवा परिस्थितिपेक्षां व्यक्तीवरच कसा अवलंबून असतो या गोष्टीचें ज्ञान मीनाक्षी आपणाला करून देते. वीरविडंबन या नाटकांत फाजील लाड केले असतांना आनुवंशिक चांगले संस्कारहि लुप्तप्राय कसे होतात हें कुमार उत्तर याच्या वागणुकीवरून समजतें. त्याचप्रमाणें चांगल्या परिस्थितींत वाईट मनुष्यहि कसा सुधरूं शकतो हें अर्जुन व उत्तर यांच्या परस्परसंबंधावरून कळतें. मनुष्याच्या उन्नतीकरितां मानाप्रमाणेंच अपमानाचा देखील कसा उपयोग होतो हें अर्जुनानें घेतलेल्या बृहन्नडेच्या सोंगावरून आपणाला समजतें. संत भानुदास या नाटकांतील हेतु तर उघडच आहे. देवस्थानांची उत्पत्ति प्रथम अगदीं क्षुल्लक व निरर्थक वस्तूपासून होऊन पुढें त्याचेंच रूपांतर एखाद्या सुलतानशाहींत कसें होतें, देवस्थानांतील पुजारी व व्यवस्थापक देवाच्या नांवाखालीं लोकांना कसे छळतात आणि लोभानें प्रेरित होऊन शेवटीं देवालाहि विकायला कसे तयार होतात इत्यादि गोष्टी आपणाला या नाटकावरून कळतात.

येथपर्यंत झालेल्या चर्चेनंतर आपणाला एका कठिण प्रश्नाचें उत्तर द्यावें किंवा ठरवावें लागणार आहे. महाराष्ट्रीय नाट्य-वाङ्मयांत केळकरांच्या नाटकांचें स्थान काय, हाच तो प्रश्न होय. या बाबतींत कालाची कसोटी हीच खरी व अधिक यशस्वी समजावयाची. अमुक काळीं अमुकाची नाट्य-कृति खूप गाजली म्हणून ती पुढेंहि तशीच गाजेल अशी ग्वाही कोणी देऊं शकत नाहीं. तसेंच आज एखाद्याचीं नाटकें रंगभूमीवर नाहींत म्हणून तीं पुढेंहि त्याच्याच घरांत कीटकांच्या भक्ष्यस्थानीं पडतील, असेंहि कु-भविष्य कोणी वर्तविल्यानें तें खरें ठरूं शकत नाहीं. लोकमान्यता किंवा लोकाभिरुचि ही पाऱ्याप्रमाणें चंचल असते. केवळ ती कोणाएकाला प्राप्त झाली म्हणून तो मोठा, आणि दुसऱ्याला तिनें अवमानिलें म्हणून तो छोटा, असा पोरकट विचार टीकाकारांच्या डोक्यांत येऊंच शकत नाहीं. इंग्रजी वाङ्मयांत जॉन लिलीचें उदाहरण प्रसिद्ध आहे. त्याच्या अमदानींत त्याचें वाङ्मय इतकें गाजलें कीं, तो उपयोजील तशी भाषा बोलण्यांत लोकांना धन्यता वाटे. राजदरबारांत देखील त्याच्याच भाषेचें वेड. इलिझाबेथ राणीला देखील त्या भाषेचें वेड. पण

त्तीं पडताळून पहावीं. दोन्हीहि नाटकांची सरसता विवादापलीकडील आहे. येथें मुद्दा फक्त भाषेचा ध्यानांत धरावयाचा. अशा सहज-सुंदर व प्रासादिक भाषेच्या लेण्यामुळें केळकरांचीं नाटकें वाङ्मयांत अढळ स्थान मिळविण्याच्या लायकीचीं बनलीं आहेत.

आणीकाहि एक विशेष गुण त्यांच्या नाटकांत आढळतो. तो म्हणजे त्यांचा सद्गृहस्थी बाणा. त्यांचीं नाटकें घरंदाज मंडळींनीं एकत्र बसून पहाण्याजोगीं असतात. केळकरांच्या नाटकांत एखाद्या अश्लीलता संशोधकाला अश्लील शब्द दुर्बिणीन्यांत कोठें आढळतील तेवढेच! येरव्हीं तुम्हांला अपशब्द वापरलेला कोठेंहि आढळावयाचा नाहीं. औचित्याचा (Propriety) भंग त्यांच्या नाटकांत कोठेंहि झालेला दिसावयाचा नाहीं.

त्यांच्या नाटकांतील प्रसंग व व्यक्ति व्यवहारांत आपणाला नित्य आढळतात. कांहीं नाटककार आपणांला परिचित वाटणाऱ्या व्यक्तिच तेवढ्या निर्माण करूं शकतात. शेक्सपिअरनें असल्या व्यक्ति निर्माण केल्या आहेत. कांहीं नाटककार आपणांला पटतील असेच प्रसंग रचतात, बर्नार्ड शॉ यांनीं असले प्रसंग निर्माण केले आहेत. पण मौज ही कीं, केळकरांच्या नाटकांत या दोन्ही गोष्टींचा सुंदर मिलाफ झालेला दिसतो. त्यांच्या नाटकांत आपणांला परिचित व्यक्तींबरोबरच परिचित प्रसंगहि पाहावला सांपडतात. आपण आपलेंच चित्र नाटकांत पहात आहोंत असें वाटतें. शॉ किंवा शेक्सपिअर या अव्वल दर्ज्याच्या नाटककारांशीं केळकरांची तुलना करण्याचा हेतु येथें मुळींच नाहीं. कारण असली तुलना अनुचित असते. पण सांगण्याचा मुद्दा इतकाच कीं, केळकर खरेखुरे प्रसंग व व्यक्ति निर्माण करण्यांत अत्यंत कुशल आहेत.

बुद्धियोग हें केळकरांच्या नाटकांचें प्रमुख वैशिष्ट्य होय. गडकऱ्यांची नाट्यसृष्टि भावनागम्य आहे. सूक्ष्म, तरल, इंद्रधनुष्याप्रमाणें बदलत्या रंगांची व भावनाप्रधान मनुष्यालाच आकलणारी अशी त्यांची नाट्यसृष्टि आहे. कोल्हटकरांची नाट्यसृष्टि लहान प्रमाणावर पण गडकऱ्यांप्रमाणेंच कल्पनांच्या नाजुक धाग्यांनीं तयार झालेली आहे. तिच्यांत तुम्हांला आनंददायी असें वातावरण असेल, पण तें तुम्हांला तुमच्या घरीं आढळणार नाहीं. तिपल्या व्यक्ति तुम्हांला आवडतील, मोहवितील, पण त्या अपरिचित वाटतील. तिपली भाषा ऐकून तुम्हांला हास्याच्या उकळ्या फुटतील, पण कांहीं एक पटल्याचें समाधान तुम्हांला वाटणार नाहीं. याच्या उलट केळकरांच्या

नाट्यसृष्टीचें आहे. तुमच्या बुद्धीला पटतील, परिचित वाटतील असले प्रसंग, असल्या व्यक्ति ते निर्माण करतात. त्यांच्या नाटकांची तुम्ही भाषा पहा. बुद्धियोग हेंच तिचें गमक. तुम्हांला एखादी गोष्ट पटवून देण्याची तिची वृत्ति. मनांतल्या मनांत समाधानाची टाळी तुम्ही वाजवाल अशी सर्वसामान्य माणसाच्या बुद्धीला पटणारी त्यांची भाषा. आणि भावनांना त्यांच्या नाट्य-सृष्टींत कांहीं कमी प्रवेश आहे असें नाहीं. पण त्या भावना तुम्हांला अत्यंत परिचित, बुद्धिगम्य वाटतील, अशा असतात. केळकरांच्या नाटकांत कल्पने-च्या उत्तुंग भराऱ्या, भावनांचे नाजुक खेळ किंवा शब्दांची मोहमाया—या वस्तु आढळणार नाहींत हें खरें. पण व्यवहारांत पदोपदीं दिसणाऱ्या गोष्टींचेंच सत्यकथन व व्यक्तींचेंच सत्यनिदर्शन त्यांच्या नाट्यसृष्टींत खचित पाहावला सांपडेल. मराठी नाट्यवाङ्मयांत त्यांची तुलना किर्लोस्कर, देवल, खाडिलकर, कोल्हटकर किंवा गडकरी यांपैकीं कोणाशींच करतां येणार नाहीं व करणें इष्टहि नाहीं. हे सर्व निरनिराळ्या संप्रदायाचे प्रवर्तक झाले. केळकरांची नाट्यसृष्टि स्वतःसिद्ध, स्वयंपूर्ण अशी आहे. तिला सुवाङ्मयाची कसोटी लावितां येईल, तुलनेची लावितां येणार नाहीं. आणि त्या कसोटीला ती पूर्णपणें कशी उतरते हेंच आतांपर्यंत आपण पाहिलें व सिद्ध करण्याचा प्रयत्न केला.



# ५. केळकरांचा विनोद

(श्री. विष्णु सखाराम खांडेकर, शिरोडें)

दिग्विजयी शिकंदर बादशहाच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिलेले पाहून त्याच्या स्नेह्याला अत्यंत आश्चर्य वाटलें. राजाचें रडणें हें सामान्य मनुष्याच्या दृष्टीनें 'वदतो व्याघाता'चेंच उदाहरण! त्यांतहि शिकंदर म्हणजे भाग्यदेवतेचा कंठमणि! आपलें काळें तोंड उजळ करण्याकरितां मूर्तिमंत दैव त्याच्या नांवाचा आश्रय घेऊं लागलें होतें! अशा भाग्यशाली शिकंदराच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिलेले पाहून स्नेह्यानें त्याला विचारलें, "मित्रा, इतकं वाईट वाटण्यासारखं काय झालं? तूं पादाक्रांत केलेला एखादा प्रांत पुन्हां स्वतंत्र होऊं लागल्याची बातमी आली आहे काय?"

शत्रूंना नित्य तरवारीचें पाणी दाखविणाऱ्या हातानें आपल्या डोळ्यांतील पाणी पुशीत बादशहानें उत्तर दिलें, "छेः रे! सारं जग जिंकून झालं. आतां जिंकायला देशच उरला नाहीं म्हणून रडूं आलं मला."

गेल्या तीन तपांतील आपल्या विविध व विपुल वाङ्मयनिर्मितीकडे पाहून केळकरांनींहि कधींतरी असाच दुःखाचा सुस्कारा सोडला असेल. काव्य, कथा, नाटक, चरित्र, प्रवासवर्णन, टीका, निबंध, वाङ्मयचर्चा, इतिहास इत्यादि ललितवाङ्मयांतील व त्याच्या सरहद्दीवरील विभागांत त्यांची लेखणी सदैव स्वच्छंद संचार करीत असते. त्यामुळें कांहींतरी नवीन लिहिण्याची लहर त्यांच्या प्रतिभेला आली कीं शिकंदराप्रमाणें 'हें तर सारं जुनंच' असे खिन्नपणाचे उद्गार तिच्याहि तोंडून केव्हांतरी खास निघाले असतील!

गॅरीबाल्डी व टिळक यांच्यासारख्या भिन्न कालांतल्या व भिन्न देशांतल्या देशभक्तांच्या चरित्रगंगेंत जिनें अवगाहन केलें, स्वराज्य गमावणाऱ्या मराठ्यांप्रमाणें तें कमावणाऱ्या आयरिश लोकांच्या सहवासाचा लाभ जिला घडला, कृष्णार्जुनांत कलह लावणाऱ्या नारदापासून भाऊसाहेब पेशव्यांच्या तोतयापर्यंतचीं अनेक स्वभावचित्रें जिनें आपल्या कलमानें रेखाटलीं, तिच्या तोंडीं हे उद्गार शोभून जातील यांत संशय नाहीं! पण प्रतिभेचें नशीब शिकंदरापेक्षांहि शिकंदर असल्यामुळें तिचा खिन्नपणा क्षणिकच असतो. शिकंदराच्या तरवारीकरितां पृथ्वीच्या पाठीचा विस्तार थोडाच वाढणार होता! उलट प्रतिभावंताला आपलीं गगनचुंबी मंदिरें उभारायला कल्पनासृष्टींत नेहमीं हवी तेवढी जागा मिळते.

केळकरांची वाङ्मयसृष्टि विस्तार व विविधता या दोन्ही दृष्टींनी मोठी असल्यामुळें तिचें सर्वसामान्य वर्णन करणें थोडेंसें कठिण आहे; पण इंद्रधनुष्य वस्तुतः सात रंगांचें असलें तरी त्यांतले हिरवा, पिवळा व तांबडा हे तीन रंगच ठळकपणें उठून दिसत नाहींत का? वाङ्मयहि तसेंच असतें. केळकरांचें लिखाण म्हणजे काव्यशास्त्रविनोदाचा त्रिवेणीसंगम हें तर खरेंच! पण या त्रिवेणीसंगमांतील शास्त्ररूपी सरस्वतीचा प्रवाह गुप्त असल्यामुळें संगमाच्या जागीं शुभ्र काव्यगंगा व कृष्ण विनोदयमुना याच काय त्या प्रेक्षकाच्या डोळ्यांत भरतात. या संगमांत पोहणाऱ्याप्रमाणें तो पाहणाराऱ्याहि हें लवकरच लक्षांत येतें कीं, इथें मुख्य प्रवाह यमुनेचा व उपप्रवाह गंगेचा अशी अदलाबदल झाली आहे. केळकरांच्या प्रतिभेच्या म्यानांत काव्य व विनोद या दोन्ही तलवारी राहूं शकतात हें खरें; पण म्यानांत दोन तलवारी असल्या तरी त्यांतली एक सैनिकाची अधिक आवडती व्हावी यांत अस्वाभाविक असें काय आहे? त्या दृष्टीनें पाहिलें तर केळकरांच्या बुद्धीचा स्वाभाविक कल काव्यापेक्षां विनोदाकडेच दिसतो. त्यांच्या व्याख्यानाला जाणारा वर्तमानपत्राचा प्रतिनिधि कोऱ्या कागदावर मधून मधून हंशा हे शब्द घरूनच लिहून गेला तरी चालण्यासारखें असतें. 'संस्कृत विद्येच्या पुनरुज्जीवनासारखा गंभीर विषय! पण त्यांतहि त्यांची सूक्ष्म विनोदबुद्धि, रणभेरी वाजूं लागल्या असतांनाहि सतार छेडणाऱ्या सव्यसाची सेनापतीप्रमाणें, सलील विहार करूं शकते. जुन्या व नव्या पद्धतींनीं शिकणाऱ्या पंडितांविषयीं ऊहापोह करितां करितां त्यांनीं काढलेलें शब्दचित्र फारच मौजेचें आलें आहे. (मागील पृ. ४९–५० पहा.)

लेखकाच्या पहिल्या अपत्याच्या तोंडवळ्यावरून त्याच्या प्रतिभेच्या स्वरूपाचें बहुधा अनुमान करतां येतें. केळकरांनीं वाङ्मयांत प्रवेश केला तो 'नवरदेवाची जोडगोळी' या विनोदी नाटकाच्या द्वारानें. मराठी गद्य रंगभूमि त्या वेळीं स्वर्गस्थ देवतांशीं गर्जना–गोष्टी करणाऱ्या भीमदेवाच्या ताब्यांत होती. अशा वेळीं शेरिडनच्या विनोदप्रधान नाटकाचें रूपांतर त्या रंगभूमीवर आणणें हें होळीच्या दिवशीं रंगपंचमी साजरी करण्यासारखेंच होतें. पण विनोदप्रवण प्रवृत्तीमुळें केळकरांनीं तें रूपांतर केलें. स्वतंत्र नाटकें लिहिण्याच्या वेळींहि कलहप्रिय नारद व गानलोलुप उत्तर यांचींच कथानकें त्यांच्या डोळ्यांपुढें सहज उभीं राहिलीं, ही गोष्टहि लक्षांत घेण्याजोगी आहे.

काव्य काय अगर विनोद काय, दो [illegible] उपजतच

असावी लागते. आंधळ्याला कितीहि जाड कांचांचा चष्मा दिला, तरी त्याचा जसा उपयोग नाहीं, त्याप्रमाणें बहिःसृष्टि व अंतःसृष्टि यांतील सौंदर्याचें संवर्धन करणारी सुसंबद्धता अगर विनोदविलासाला पोषक असा विसंगतपणा सूक्ष्मतेनें जाणण्याची शक्ति नैसर्गिकच म्हटली पाहिजे. तसें नसतें तर कालिदासाच्या काव्यरसांत बुडून कोरडे राहणारे अगर बोलण्याखाण्याखेरीज ओठांना विभक्त होऊं न देणारे हरीचे लाल जगांत दिसलेच नसते!

परंतु झाडांवर कलम करावें त्याप्रमाणें नैसर्गिक काव्यविनोदशक्तीवर वाचन, निरीक्षण, परिस्थिति व लेखकाचे स्वभावगुण यांचा संमिश्र परिणाम होतो. केळकरांच्या विनोदाचा या दृष्टीनें विचार करूं लागलें कीं, प्रख्यात विनोदी लेखक श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांच्याशीं कॉलेजमध्यें असतांनाच झालेला त्यांचा स्नेह, वर्तमानपत्राच्या धंद्यांत पडल्यामुळें त्यांच्या वाचनाला आणि अनुभवांना आलेली विलक्षण विविधता, वर्तमानपत्री लेखकाला आपलें लिखाण अळणी वाटूं नये म्हणून त्यांत मीठमसाला घालण्याची नेहमीं वाटणारी आवश्यकता, इत्यादि गोष्टी सहज सुचतात. या सर्वांपेक्षांहि महत्त्वाचा घटक म्हणजे केळकरांच्या टीकाशक्तीचा सर्वांगसुंदर विकास हा होय. वर्तमानपत्र ही जगांतली चराचर पदार्थांवरील टीका खरी! पण या टीकेच्या क्षेत्राची लांबी व खोली हीं बहुधा व्यस्त प्रमाणांत असतात! या अफाट टीका-सागराच्या पृष्ठभागावर पोहणारांस मोत्यें वेंचून काढणारा पाणबुड्या क्वचितच आढळायचा! पण वाचन, निरीक्षण, मनन, इत्यादिकांना आपल्या उपजत समतोल स्वभावाची जोड देऊन गेल्या तीन तपांत केळकरांनीं आपल्या टीकाशक्तीचा सुंदर विकास केला आहे.

सुरवंटाचें फुलपांखरूं व्हावें त्याप्रमाणें टीकेचें अनेकदां विनोदांत रूपांतर होऊं शकतें. केळकरांचीं 'विलायतचीं वातमीपत्रें' चाळलीं तर या नियमाचीं उदाहरणें वाटेल तितकीं सांपडतील. हाउस् ऑफ कॉमन्सचें वर्णन करतांना ते लिहितात, "प्रधानमंडळी बसतात त्या कोपऱ्यांत तर अंधारच होता; ज्या साम्राज्यावर सूर्य कधींच मावळत नाहीं, त्याचा सर्व कारभार याच अंधारांत चालतो!" थोडासा पाऊस पडल्याबरोबर इंग्रज लोकांना किती आनंद होतो याचें पुढील वर्णन किती मौजेचें आहे! 'दीड दिवसांत उणापुरा एक इंच पाऊस झाल्याबरोबर 'एक एकरीं शंभर टन पाणी मिळालें' असा हिशेबहि करून टाकून वर्तमानपत्रांनीं 'आतां पिकें चांगलीं' असा शेरा मारला. इंग्रज लोक पावसाप्रमाणें अधिकाराच्या

बाबतींतहि अल्पसंतुष्ट असते, तर काय बहार झाली असती! येथें ऊन व पाऊस हीं एका दिवसांत दहापांच वेळां पाठशिवणीचा खेळ खेळतात. त्यांपैकीं एकालाहि येथील लोक भीत नाहींत. इंग्रज लोकांना स्वतःकरितां छत्री लागत नाहीं; पण आपलें छत्र जगांतील सर्व लोकांच्या डोक्यावर रहावें याविषयीं मात्र त्यांना अहर्निश काळजी वाटत असते! कोणी म्हणेल हा हवेचा मजकूर पत्रांत कशाला? पण इंग्रजी संप्रदायाप्रमाणें हवामानाचे दोन शब्द बोलल्याखेरीज इतर गोष्टी बोलण्याऱ्या नसतात.''

या वर्णनांतील मजकूर रुक्ष रीतीनें कुणीहि सांगितला असता. पण पिसारा उभारून नृत्य करणाऱ्या मोराप्रमाणें आनंद देण्याचें वरील उताऱ्यांतील सामर्थ्य त्या वर्णनांत आलें असतें काय?

सूक्ष्म टीकाबुद्धीच्या पायावर विनोदाचें मंदिर बहुशः उभारलें जातें. यामुळें टीकाकाराच्या स्वभावभेदांप्रमाणें त्याच्या विनोदाचेंहि स्वरूप भिन्न होत असतें. टीकाकाराला 'नावडतीचें मीठ अळणी' लागत असलें, कीं विनोदांत त्यानें अतिशयोक्तीचा आश्रय केलाच म्हणून समजावें. राजकीय व सामाजिक प्रश्न केवळ भावनांवर अवलंबून ठेवणारा टीकाकार विनोदी पद्धतीनें लिहूं लागला कीं, उपरोध, उपहास, वक्रोक्ति व व्याजोक्ति या अस्त्रांचा तो पदोपदीं उपयोग करूं लागतो. टीकाकाराच्या स्वभावाचा उच्छृंखलपणा त्याच्या विनोदांत प्रतिबिंबित झाल्याचीं उदाहरणेंहि विपुल सांपडतील. केळकरांचा विनोद बहुधा नेमस्त असतो. याचें कारण त्यांची टीकाबुद्धि जितकी मार्मिक तितकीच सात्त्विक आहे हें होय. चिकित्सा आणि सहानुभूति या सवतीसवती त्यांच्या लिखाणांत बहिणीबहिणींप्रमाणें वागत असल्याचें आढळून येतें.

या अनुपम टीकाबुद्धीच्या कॅमेऱ्यानें ते दुसऱ्यांप्रमाणें स्वतःचींहि मजेदार क्षणचित्रें घेऊं शकतात. विलायतेच्या प्रवासांत केळकर–पटेल व शास्त्री–कुंझरू या राष्ट्रीय आणि नेमस्त जोडप्यांना एकत्र खोली मिळाली होती. योगायोगानें नेमस्त जोडीच्या वांट्याला वरच्या जागा आल्या. या योगायोगाचा उल्लेख करतांना केळकर लिहितात, "एका अर्थानें जहाजांत तरी हे दोन नेमस्त दोन जहालांच्या डोक्यावर चढले असें झालें खरें. मग इंग्लंडांत उलट सुलट कसें काय होतें तें पहावें!..........आम्ही सर्व एका केबिनमध्यें आहों हें तर खरेंच; पण एका इंग्रजी म्हणीप्रमाणेंहि आम्ही सर्व एकाच बोटींत आहों. "We are in the same boat" ही गोष्ट लक्षांत

ठेवूनच आम्हां सर्वांचें परस्परांशीं वर्तन विलायतेंत होईल अशी मला आशा आहे. " बोटीवरील गप्पागोष्टी देशी भाषेंतच चालतात हें लिहितांना ते उद्गार काढतात, " देशी भाषेंत गप्पा चालतात, तशा इंग्रजींत रंगूं शकत नाहींत. शिवाय साहेबाला आमच्या चुका कळतील म्हणून पोटांत भीति ! ही साहेबाची भीतिच अजून आम्हांस बाधते; पण ती जायला आमचें डोकें आणखी थोडें वर निघालें पाहिजे. " वर्फाच्छादित आल्पसपर्वताला वर खोबरें पसरलेल्या वांगीभाताच्या ढिगाची त्यांनीं दिलेली उपमा वाचून ' खून, खून, काव्यदेवीचा खून ' म्हणून ज्यांनीं आरडाओरडा केला, ते हा पर्वतप्राय वांगीभात ओलांडून पुढें गेलेच नसावेत. कारण ही उपमा दिल्यानंतर केळकरांनीं लगेच पुढें " या उपमेवरून मला वांगीभात खाण्याची इच्छा झाली आहे असें मात्र समजायचें नाहीं. " असे उद्गार काढलेच आहेत.

निबंध-चरित्र-इतिहासादि वाङ्मय ललितलेखणीनें लिहिलें तरी एकंदरींत विचारप्रधानच. कोटाला लावलेल्या अस्तराप्रमाणें अशा प्रकारच्या वाङ्मयालाहि केळकर विनोदाची जोड देऊं शकतात. पण अस्तराचें कापड कितीहि तलम असलें तरी त्याचें अस्तित्व कोट वरवर पाहणारांना जसें कळत नाहीं, त्याप्रमाणें ' टिळकचरित्र ' अगर ' मराठे व इंग्रज ' हीं पुस्तकें वाचणारांना केळकरांच्या नाजुक विनोदाची कल्पना येणें शक्य नाहीं. या पुस्तकांतून " गोऱ्या गोऱ्या लोकांच्या युद्धांत काळेपणाची किंचित्हि छटा असलेल्या लोकांची मुळींच मदत घ्यावयाची नाहीं हा इंग्रजांचा बाणा बोअर लोकांशीं युद्ध होतें तोंपर्यंत टिकला; पण प्रस्तुतच्या युद्धामुळें प्राणसंकट उपस्थित झालें तेव्हां पूर्वीचे स्वावलंबनाचे इंग्रजांचे विचार टिकले नाहींत. आतां तर त्यांना नीग्रोपेक्षांहि दसपट काळा आदमी मिळाला तरी त्याची मदत ते घेतील; तो बंदूक धरण्यास समर्थ असला म्हणजे झालें ! " असले विनोदतुषार आढळतात. पण त्यांचें प्रमाण रहदारीच्या रस्त्याच्या कडेनें क्वचित् आढळणाऱ्या हिरवळीपेक्षां अधिक नाहीं.

चरित्रात्मक अगर ऐतिहासिक लेखनापेक्षां निबंधलेखन विनोदाला स्वभावतःच अनुकूल असतें. ' केळकरकृत लेखसंग्रहां ' तील निवडक निबंध वाचले कीं, नृत्यकुशल मनुष्याच्या साध्या पदन्यासांतहि डौलदारपणा असतो या तत्त्वाची प्रचीति येते. जाहिराती किंवा भविष्य असा विनोदसुलभ विषय असो अगर रिस्ले साहेबांनीं हिंदी स्त्रियांवर बॉबचे लाडू वळण्याचा घेतलेला आक्षेप, हुंड्यापायीं स्वतःला जाळून घेणारी स्नेहलता, मतिविकार नाटक,

अशांसारखा राजकीय, सामाजिक वा वाङ्मयिक विषय असो, विचारयुक्त विवेचनाच्या वस्त्राला विनोदाची बारीक किनार काढून तें आकर्षक करण्यांत केळकर अत्यंत कुशल आहेत याचा प्रत्यय येतो. फोडीवरून संबंध आंब्याची कल्पना करणें कठिण नसतें म्हणून खालीं कांहीं उदाहरणें देत आहें.

" जाहिरातवाल्या व्यापाऱ्याची पत त्याच्या आसपासच्या भागांत जरी नसली तरी ' No prophet is honoured in his own country ' या म्हणीवर विश्वास ठेवून व्यापाऱ्यास आपल्या अपमान-दुःखाचें समाधान करून घेतां येतें, व घरती जितके वाचक दूर अंतरावरचे तितकीं त्यांच्यांतून त्यास गिऱ्हाइकेंहि अधिक मिळतात. या बाबतींत जाहि-रातवाला सृष्टिनियमांची पायमल्ली उघड करितो. गुरुत्वाकर्षणाचे नियमा-प्रमाणें अंतर जितकें जास्त तितका आकर्षणशक्तीचा जोर कमी; परंतु जाहिरातीच्या प्रसिद्धीचें क्षेत्र जसें पसरत जातें तसतशी जाहिरातवाल्याच्या मालाच्या गुणाची आकर्षणशक्ति कमी न होतां वाढतच जाते. "

" रिस्लेसाहेबांच्या बोलण्याचा रोंख ' हिंदी स्त्रिया खुनी व अत्याचारी होतीलच ' असें विधान करण्यापेक्षां ' होऊं नयेत ' अशी आशा प्रकट करण्याकडेच अधिक आहे, हें आम्हांस कबूल आहे. परंतु कोणचीहि आशा व्यक्त करण्याच्या मूळाशीं एक प्रकारचा संशय तरी असतो; व प्रस्तुत बाबींत या संशयाचीहि आम्हांस तितकीच चीड वाटते. कित्येक गोष्टींचें नुसतें शाब्दिक साहचर्यहि मनुष्यास सोसवत नाहीं. समजा कीं, आपले गव्हर्नर-साहेब हे प्रजापालनदक्ष आहेत अशी समजूत असणाऱ्या एखाद्या म्युनिसि-पल प्रेसिडेंटनें उद्यां एखाद्या मानपत्रांत अत्यंत सद्‌बुद्धीनें, ' सरकार प्रजेला एखाद्या व्याघ्राप्रमाणें भक्षिणार नाहीं अगर खाटिकाप्रमाणें कापणार नाहीं अशी आम्हांस आशा आहे.' असें जर म्हटलें तर त्याला ते काय म्हणतील !"

" कोल्हटकर यांची नाटकपात्रांनीं बोलण्याची भाषा पुष्कळच ठिकाणीं लिहिण्याच्या किंबहुना निबंधाच्या भाषेसारखी असते. परंतु जेव्हां स्त्रियांच्याहि तोंडांत ती भाषा येते तेव्हां ती फारच बोजड वाटते. हिंदुस्थानांतहि अंगणां-तला केर काढणाऱ्या बटकीसुद्धां संस्कृत बोलत असत. पण तें भोजराजाच्या व कालिदासाच्या वेळीं ! "

केळकरांचें बहुतेक निबंधलेखन केसरीसाठींच झालें. राष्ट्रीय जागृती-च्या भुवताऱ्यावर नजर ठेवून दर आठवड्याला उपस्थित होणाऱ्या नव्या नव्या विषयाच्या किनाऱ्यानें त्यांनीं वर्षानुवर्षे आपली निबंधनौका चालविली.

हें नौकानयन प्रशांत सरोवरांतील स्वच्छंद नौकाविहारापेक्षां तत्त्वतःच भिन्न असल्यामुळें त्यांच्या निबंधांत आत्मभावना, कल्पनास्वातंत्र्य व विनोद-विलास यांना पूर्ण अवसर मिळाला नाहीं यांत नवल कसलें ! सभेंतील भाषण कितीहि सहजसुंदर असलें तरी खेळीमेळीच्या संवादाचें स्वरूप त्याला कुठून येणार ? निरीक्षणसूक्ष्मता, विनोदप्रवणता व भाषाप्रभुत्व या केळकरांच्या वाङ्मयगुणांच्या संगमांतून गार्डिनर, लिंड, चेस्टरटन्, मिल्ने या लेखकांच्या लिखाणासारखे लघुनिबंध निर्माण होणें अशक्य होतें असें नाहीं. पण सहजसुंदर भावनिबंध लिहावयाला लागणारें विषय, कल्पना व वेळ यांचें स्वातंत्र्य वर्तमानपत्राच्या लेखकाला सहसा मिळत नाहीं. चित्रकार सैनिक झाला कीं त्याच्या हातांला रणांगणावरील भव्य देखाव्याचें चित्र रेखाटण्याऐवजीं तलवारीचे घाव घालण्यांतच दंग व्हावें लागतें.

भावनिबंधांसारखें कलात्मक लेखन केळकरांच्या हातून झालें नसलें, तरी त्यांच्या निबंधांनीं मराठी वृत्तपत्रांना एक निराळें वळण लावलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. वृत्तपत्राच्या संपादकाला मतप्रसार केला पाहिजे हें तर खरेंच. पण मतप्रसाराचें कडु चाटण विनोदाच्या मधांत मिसळून दिलें तर रोगी तें हंसतमुखानें घेतो हें तत्त्व पुरेपुर ओळखून तें अमलांत आणण्याची पराकाष्ठा करणारे संपादक तीनच—काळकर्ते परांजपे, केसरीकार केळकर व संदेशसंस्थापक कोल्हटकर. आगरकरांच्या लेखनांत प्रासंगिक विनोद असला तरी टिळकांप्रमाणें त्यांच्या लेखनाचाहि ओज हाच आत्मा आहे. परांजपे–केळकर–कोल्हटकर या त्रयींत परांजपे उपरोधाचे भोक्ते, केळकर कोटीचे भक्त व 'अच्युतराव कोल्हटकर सुलभ विनोदाचे पुरस्कर्ते असें ढोबळ वर्गीकरण केलें असतां फारशी चूक होणार नाहीं. परांजप्यांचें लिहिणें उन्हासारखें ! सावलींतल्या वाचकाला त्याच्याकडे पाहून आनंद होईल; पण तें प्रत्यक्ष अंगावर घेण्याची वेळ आली तर तो छत्री हुडकायला लागल्याशिवाय राहणार नाहीं. केळकरांचें लिहिणें म्हणजे स्वच्छ चांदणें ! चोराच्या मनाशिवाय त्याचा चटका सहसा कुणाला बसायचा नाहीं. अच्युतरावांच्या लिखाणांत बहुधा संध्यारंगांचें संमेलनच आढळतें. विनोदी पद्धतीचा अवलंब करून वाचकांचीं मनें अंकित करणाऱ्या या तीन वाङ्मयसेनानींचीं निशाणें एखाद्या व्यंगचित्रकाराच्या हातांत पडलीं, तर तो त्यांच्यावर फार सुंदर चित्रें काढील.

या तीन संपादकांनीं वृत्तपत्रांच्या लेखनांत क्रांति घडवून आणली यांत

संशय नाहीं. पण परांजप्यांची लेखनपद्धति सर्वैथैव व्यक्तिनिष्ठ व कोल्हट-करांचें निम्मेशिम्में लिहिणें फार उथळ ! यामुळें केळकरांच्या निबंधांइतका त्यांच्या लेखनाचा मराठी वाङ्मयावर ठसा उमटलेला नाहीं. केळकरांचे निबंध विषयाचें गांभीर्य न गमावतां तो चटकदार कसा करावा हें शिकण्याचे कामीं मार्गदर्शक होतील यांत संशय नाहीं. पण या गोड भविष्यापेक्षांहि केळकरांच्या लेखनाचा ज्यांच्यावर निःसंशय परिणाम झाला आहे, अशा विद्यमान लेखकांकडेच बोट दाखविणें अधिक बरें ! वसंत ऋतु पल्लवपुष्पांचे संभार आणून ते वृक्षवेलींवर चिकटवितो असें थोडेंच आहे. पण त्याच्या आगमनाचा पल्लवांच्या उद्गमाशीं व पुष्पांच्या विकासाशीं संबंध नाहीं, असें कोण म्हणेल? केळकरांच्या निबंधलेखनाचे तुल्यगुण प्रो. वा. म. जोशी यांचे लेखनांत सांपडतात. तसेंच प्रो. फडके, ग. त्र्यं. माडखोलकर, द. के. केळकर प्रभृतींच्या लेखनशैलीवर तात्यांच्या लेखनशैलीचा असाच अप्रत्यक्ष परिणाम झाला आहे.

उत्तर ध्रुवावर सहा महिन्यांची रात्र असली तरी विषुववृत्तावर ती बारा तासांचीच होते. केळकरांचें विचारप्रधानसाहित्य सोडून त्यांच्या ललितवाङ्मयाकडे वळलें कीं, हाच अनुभव येतो. मतप्रचार मागें पडला, विषयाचें पारतंत्र्य लोपलें म्हणजे कल्पनेला स्वाभाविक पंख फुटतात. पन्नाशी उलटल्यानंतर त्यांनीं तयार केलेला काव्योपहार पहावा. या उपहाराच्या नांवांत काव्य असलें तरी अंतरंगांत विनोद कांहीं कमी नाहीं. या संग्रहांतील विरहिणीच्या प्रणयपत्रिकेचा केळकरांनीं दिलेला दुसरा नमुना खरोखरच नमुनेदार आहे. ही विरहिणी म्हणते—

" होतां ऊन्ह कमी क्लबांत नियतें क्रीडार्थ मी जावया ।
माझा ओव्हर कोट बॅट नससी सांगानि तूं ध्यावया ।
जोडीदार गडी नवा प्रतिदिनीं साजे तसा शोधितें ।
खाकें घेउनि तत्करा कशितरी दांपत्य संपादितें ॥ "

सृष्टीच्या संसारावर त्यांनीं बसविलेलें मोटारीचें रूपक इतकें कल्पकतेचें आहे कीं, अशा कल्पना सुचणारे सारथि पहायला शाकुंतलांतील मातलीचीच गांठ घेतली पाहिजे. कुणबाऊ भाषेंत गाणारा हा मोटार-सारथि सृष्टीच्या पसाऱ्याविषयीं म्हणतो—

" विनब्रेक अशी मोटार । विन ' लेसन ' ची ड्रायव्हर ।
अखि अखंड चाले दूर । न्हाइ कधीं जणूं संपणार ॥ "

' मी कवि आहें समजलां, ' ' स्त्रीविषयक सुभाषितगुच्छ, ' ' हें पहा आमचें नवें राज्य ' या कवितांतहि विनोदाच्या अस्पष्ट वा स्पष्ट छटा दिसून येतात ! विशेषतः राजा मिळत नसलेलें व म्हणून प्रजासत्ताक असणारें त्यांचें ' नवें राज्य ' फार गमतीचें आहे. या राज्यासारखी व्यवस्था हिंदुस्थानांतल्या संस्थानांत आढळणें सुद्धां कठिण !

" तार पोष्ट दोनिबी खातीं । दिलें गोगलगाइच्या हातीं ।
काय बिशाद यत्याल तक्रारी । धा वर्सांत येक डिलिव्हरी ॥
बैलाला मास्तर क्येला । कदि मारि न इद्यार्थ्याला ।
घेऊन शिकशन खास । करुन सोडीं आपुल्या सरिस ॥ "

' विलायतेच्या यात्रेची तयारी ' ही कविताहि प्रासंगिक अनुभवांतील विसंगतत्व केळकर किती सूक्ष्म दृष्टीनें पाहूं शकतात, याचा उत्तम नमुना आहे.

त्यांच्या सहा स्वतंत्र नाटकांपैकीं ' वीरविडंबन, ' ' कृष्णार्जुनयुद्ध ' व ' तोतयाचें बंड ' हीं विनोददृष्ट्या अधिक महत्त्वाचीं आहेत. चंद्रगुप्तांत ' कांतिवर्मा ' व ' व्यतिपात ' या पात्रांच्या द्वारें हेर ऊर्फ गुप्तपोलीस यांचीं विनोदी चित्रें रेखाटण्याचा केळकरांनीं प्रयत्न केला आहे. पैशासाठीं हेर करीत असलेला सिद्धसाधकपणा ( चंद्र० पृ. २०-२१ ) शाब्दिक शिष्टाचार ( पृ. ४८-४९ ) इत्यादि गोष्टींच्या पटेंत थोडासा विनोद उत्पन्नहि होतो. पण एकंदरीत पाहिलें तर या विनोदी चित्रांच्या रूपरेषा वाऱ्यासारख्या पुसट व त्यांचे रंग पाण्याइतके फिक्के वाटतात.

' तोतयाचें बंड ' हें नाट्यकलेच्या दृष्टीनें केळकरांच्या सर्व नाटकांत श्रेष्ठ ठरेल. या नाटकांत कथापरिचयाच्या कामीं किंचित् उपयोगीं पडणाऱ्या पिकटंभट, चिकटंभट, खुशालराव, बाजीराव, धर्माजी, निंबाजी, सर्जा वगैरे गौण पात्रांच्या संवादांवर विनोदाची छाया आहे. बदफैली बगंभट व व्यभिचारी विठाबाई यांचा लाल झगडाहि कांहीं कमी हास्यकारक नाहीं. पण एकंदरीत बगंभट-विठाबाईच्या प्रवेशांत प्रेक्षकांच्या अंतःकरणांत हास्यापेक्षां तिटकाराच अधिक उत्पन्न होतो. गौण पात्रांच्या प्रवेशांत कांहीं ठिकाणीं चांगल्या कोट्या आढळतात; परंतु नाट्यकथानकाशीं निगडित अशा विनोदी

प्रसंगांची पार्श्वभूमि मागें नसल्यामुळें हे प्रवेशहि फारसे आकर्षक होत नाहींत ह्या पात्रांच्या कोट्या वाचतांना, शंकराचार्यांनीं मृत अमरुक राजाच्या शरीरांत जसा प्रवेश केला होता, त्याप्रमाणें नाटककारहि मधून मधून फालतू पात्रांच्या अंगांत संचार करतो, असें वाटल्यावांचून राहत नाहीं. चिकटंभटाला यशाला ओंगण घालण्याची नम्र सूचना करणारा चिकटंभट पुढें म्हणतो, " रोज तुला शिंकेचा शकुन पटतो; आणि आज तुला तोफेचाहि शकुन पटत नाहीं. " हैबतरावासारख्या शिपाईगड्याची बायको धाईट चालीची असेल वा नसेल; पण एखाद्या कडव्या सुधारकाप्रमाणें " एकीला धायचा पिंड हातानें वळायच्या आधींच दुसरीच्या हातचा घांस गिळायची आपली योची तयारी. " ह्या पुरुषांवर तिनें झाडलेला ताशेरा तिच्या तोंडीं कितपत शोभतो हा प्रश्नच आहे.

या नाटकाचें कथानक करुणरसालाच अनुकूल असल्यामुळें प्रमुख भूमिकांपैकीं कोणतीहि हास्यपरिपोषक होणें शक्यच नव्हतें. असें असूनहि कथानकाच्या ओघांत आलेल्या एका प्रसंगाचा केळकरांनीं अत्यंत चातुर्यानें उपयोग करून घेतला आहे. या प्रवेशांत ( अंक ४ प्र. ४ ) हैबतराव धर्मभटाचा वेष धारण करून तोतयाकडे जातो व त्याचें बिंग बाहेर काढतो. कथानकाची प्रगति, नाट्यवंचना ( Dramatic Irony ), प्रासंगिक विनोद, व सुंदर कोट्या यांचा या प्रवेशांत इतका उत्कृष्ट मिलाफ झाला आहे कीं, मराठी नाट्यवाङ्मयांतील उत्कृष्ट प्रवेशांत त्याची सदैव गणना होईल. केळकरांची विनोदबुद्धि या प्रवेशांतील संवादांत पूर्णपणें प्रतिबिंबित झालेली दिसून येते. " आम्ही काय बोलून चालून भिक्षुक असामी ! बुंदीचे लाडू हेच आमचे आपले तोफांचे गोळे ! दर्भाच्या काड्या याच आमच्या तरवारी, भाले व बरच्या ! चौघड्याचा नगारा हेंच आम्हां आजवर एकलेलें रणवाद्य ! " अशीं विनोदप्रचुर वाक्यें या प्रवेशांत सर्वत्र विखुरलीं आहेत.

'कृष्णार्जुन युद्धांत'हि भित्रे ऋषिकुमार, दारूबाज गंधर्व, चित्ररथाच्या दासदासी इत्यादिकांच्या संभाषणांत मधून मधून विनोद डोकावतो. पण पावसाच्या उडत्या शितोड्यांना सरीची सर कुठून येणार ? या नाटकांत इतरांना कळसूत्री बाहुली करून नाचविणाऱ्या विनोदी नारदाची भूमिकाच मुख्य असल्यामुळें तें विनोदप्रधान होण्याला हरकत नव्हती. पण नारद ज्यांच्यावर आपल्या विनोदाचा प्रयोग करतो, ते कृष्णार्जुन असामान्य कोटी.

तले आणि ज्या तत्त्वाच्या प्रतिपादनार्थ हा प्रयोग होतो तें तत्त्वहि अत्यंत गंभीर ! शिवाय ' आपण जगासाठीं कीं जग आपल्यासाठीं ' ? हें कोडें कृष्णार्जुनापुढें सोडविण्यासाठीं टाकतांना नारदानें रचलेलें कारस्थान विशेष हास्योत्पादक आहे असेंहि नाहीं. यामुळें खळखळ वहाणारा हास्यरस या नाटकांत फारसा दृग्गोचर होत नाहीं. तथापि कळ लावून नामानिराळा राहणारा नारद आणि " नारदा, जा, तुम्ही कृष्णाला सांगा कीं, चित्ररथाचं डोकंच जाग्यावर नाहीं. मग तूं तें कसें तोडणार ? " असें सांगणारा मद्यपी चित्ररथ या जोडीमुळें नाटकांत बऱ्याच ठिकाणीं विनोदाचें दर्शन दिसतें. शब्द अगर कल्पना यांच्या साहाय्यावांचून केवळ परिस्थितीमुळें उत्पन्न होणारा विनोद, नारद भर मध्यरात्रीं द्रौपदीला गंगातीरावर नेण्याकरितां येतो तेव्हां उत्पन्न होतो. दुय्यम भूमिका व प्रसंग यांना कात्री लावून प्रमुख विनोदी पात्रांना व प्रसंगांना नाटककारांनीं अधिक अवसर दिला असता तर या नाटकांतील प्रासंगिक विनोद निःसंशय अधिक रंगला असता.

' वीरविडंबन ' नाटकांत गानशूर पण रणभीरु असलेल्या उत्तराच्या मध्यवर्ती भूमिकेचा विकास बरा झाला आहे. पहिल्या अंकाच्या चवथ्या व पांचव्या प्रवेशांत उत्तर-उत्तरा यांच्या गायन-शाळांचा चुरशीचा सामना विनोदाच्या स्वाभाविक छटांनीं चांगला खुलून दिसतो. भावाबहिणींचा वादविवाद, त्यांत स्त्रीपुरुषांविषयीं येणारे विनोदी उल्लेख, अमात्य आणि राणी यांच्यासारख्या कान असून बहिऱ्या असणाऱ्या माणसांकडे आलेलें गायनपरीक्षेचें काम इत्यादि गोष्टींची हास्यरसाचा परिपोष करण्याच्या कामीं चतुरतेनें योजना करण्यांत आली आहे. उत्तरानें मुलींच्या पायांत सोडलेली चित्राची वेटकुळी या पोरखेळांत सहज खपून जाते.

दुसऱ्या अंकांतील पहिल्या प्रवेशांत हेरांचा मूर्खपणा अतिशयोक्तीचा आश्रय करून दाखविला आहे. अतिशयोक्ति ही साखरभातांतल्या साखरेप्रमाणें योग्यप्रमाणांत असते तोंपर्यंतच तिची गोडी ! या प्रवेशांत कांहीं ठिकाणीं या नियमाचा भंग झाला असला तरी निरीक्षणाचें वैचित्र्य व विनोदाची पार्श्वभूमि यांचें मनोरंजक मिश्रण त्यांत झालें आहे. अंक २ प्र० २ व अंक ३ प्र० ३ या दोन प्रवेशांतील अर्जुन व उत्तर यांचे संवाद मर्यादित अत्युक्ति, कोटि व उपहास यांच्या संगमामुळें चित्ताकर्षक वाटतात. उत्तराची वाच्छिश वडबड आणि त्याचा भित्रेपणा यांच्यामुळें उत्पन्न होणाऱ्या स्वभावजन्य विनोदाचीहि त्यांतच भर पडते. तोतयाच्या बंडांतील दैवतराव व

तोतया यांच्या प्रवेशाइतका कलासुंदर प्रवेश या नाटकांत नसला तरी लेखकाची परिणत विनोदबुद्धि दाखविणारीं अनेक स्थळें आहेत.

नाटक हें लालित्याचें आगर असलें तरी त्यांत विनोदाला पूर्ण अवसर मिळतोच असें नाहीं. उन्हाळ्यांत दुपारीं लपंडाव खेळायची हुक्की आलेल्या मुलांना आजोबांची झोंपमोड होणार नाहीं ही दक्षता जशी घ्यावी लागते, त्याप्रमाणें विनोदाला कथानक, विषय, स्वभावरेखन इत्यादिकांना धक्का न लागेल अशा बेतानें नाटकांत वावरावें लागतें. यामुळें केळकरांच्या विनोदशक्तीचा स्वच्छंद संचार त्यांच्या नाटकांत दिसत नाहीं. कारंजाचें दृश्य रमणीय असलें तरी छोट्या धबधब्यांतली गंमत त्यांत कधीं तरी दिसते काय ?

विनोदपर गोष्टी व लेख यांच्यावर असलें नियंत्रण नसल्यामुळें केळकरांच्या विनोदशक्तीचा उत्कर्ष त्यांत दृष्टीस पडतो. गीता लोकांना शहाणें करण्याकरितां अवतरली असली, तरी तिनें एखादा मनुष्य किती वेडा होऊं शकेल याचें चित्र त्यांनीं ' गीताराव ' या विनोदी स्वभावचित्रांत काढलें आहे. यांतील विनोदपोषक स्वभावदोष व थोड्या कोट्या कोणालाहि आवडतील. ' सामाजिक चालीरीतींचा फरक ' हें स्वभावचित्र ' गीतारावा ' पेक्षां सरस आहे. बाळंभटजींची जुनी दृष्टि व त्यांना पहावी लागणारी नवी सृष्टि यांच्यांतील विरोधावर उभारलेला या लेखांतील विनोद जितका मनोरंजक तितकाच उद्बोधक आहे असें म्हणतां येईल. ' माझी आगगाडी कशी चुकली ' ही गोष्ट वगळून मराठींतील विनोदी गोष्टींचा कोणताहि संग्रह पूर्ण होऊं शकणार नाहीं. स्वभाव, प्रसंग व वर्णनशैली या तीन्हींतूनहि निघणाऱ्या विनोदाचीं सुंदर उदाहरणें या गोष्टींत आढळतात. ' यजमानाचा होतो पाहुणचार, पण पाहुणा होतो यंडगार ' हा या गोष्टींतील अनुभव निराशाजनक नसला तरी हास्यजनक खास आहे. ' शृगालसम्मेलन ' व ' मेनका ' या लेखांतील उपरोधउपहास आणि ' शारदेची आकाशवाणी, ' ' म्हणा स्वराज्य मतदार की जय ' या लेखांतील प्रासंगिक विनोद चटकदार वाटतो. ' दुर्जनसिंह महाराजांनीं नवस कसा फेडला' या गोष्टींत आग्याडोंबासारखा नसला तरी खाजकुलीइतका उपरोध खास आहे.

शब्द, कल्पना, परिस्थिति, प्रसंग व स्वभाव हे विनोदाचे पंचप्राण होत. यांतील एक प्राण भाषेच्या शरीरांत असला तरी विनोदाचें अस्तित्व याचकाला पटतें. प्रासंगिक, स्वभावजन्य व परिस्थितिमूलक विनोदाला कधा

व नाटकें यांच्या इतकें निबंधांचें क्षेत्र अनुकूल नाहीं. तथापि 'कृष्णार्जुन-युद्ध' व 'वीरविडंबन' यांतील वातावरण, 'तोतयाच्या बंडा' तील चवथ्या अंकाचा चवथा प्रवेश आणि 'माझी अगगाडी कशी चुकली !' ही गोष्ट केळकरांच्या या प्रकारच्या विनोदाचीं उत्कृष्ट उदाहरणें होत. परिस्थितिमूलक विनोद 'विलायतेच्या बातमीपत्रां' प्रमाणें त्यांच्या निबंधलेखनांतहि क्वचित् दृग्गोचर होतो. ओहेन्री अगर पी. जे. वुडहाऊन यांचें 'विनोदाकरितां विनोद' हें तत्त्व केळकरांनीं ललित-लेखनांतसुद्धां कधींहि अंगीकारिलेलें दिसत नाहीं. त्याचा स्वाभाविक परिणाम त्यांच्या निबंधांतील विनोद मुख्यतः कल्पना प्रधान होण्यांत झाला. विनोद म्हणजे गारगोटीवर गारगोटी घासून उत्पन्न होणारा अग्नि होय. तो उत्पन्न होतांना मौज वाटली आणि वाऱ्यांच्या लहरीवर त्याचें आयुष्य अवलंबून नसलें तरी त्याचें दर्शन होईपर्यंत केवढी तपश्चर्या करावी लागते ! उलट कोटी म्हणजे आगपेटींतील काडी ! ओढली काडी अन् शिलगाविली विडी ! अग्निदेवता क्षणार्धांत प्रसन्न ! पण वाऱ्यानें ती मधेंच विझली तर पुन्हा ओढायची मात्र सोय नाहीं. अर्थात् वर्तमानपत्रांत गंभीर विषयाच्या विवेचनांत विनोद फुलवीत बसण्याला सवड मिळत नसल्या-मुळें केळकरांच्या विनोदबुद्धीनें कोटीचाच आश्रय केला यांत अस्वाभाविक असें काय आहे !

शाब्दिक सहानुभूतीप्रमाणें शाब्दिक कोटीचेंहि महत्त्व फारसें नसलें तरी तिचें अस्तित्व सर्वत्र आढळतें व प्रसंगीं ती उपकारकहि होते. केळकरांना शाब्दिक कोट्यांची हौस नाहीं असें नाहीं. पण विपुलता, समर्पकता व सरसता या दृष्टींनीं त्यांच्या शाब्दिक कोट्या कोल्हटकर-गडकऱ्यांच्या मानानें फिक्क्या वाटतात. 'ही कुरवंडी पाहून माझी तर घाबरगुंडी उडाली,' 'बृहन्नडे, मला मान देण्यापेक्षां तूं शत्रूच्या हातीं माझी मान देणार असेंच कां म्हणेनास ?' (वीरविडंबन). 'मला विल हा शब्द कसा ठाऊक असणार ? भिल्ल हा शब्द मात्र ऐकलेला होता. तेव्हां वाटलें कीं, तंट्या भिल्लाप्रमाणें हाहि कोणी एखादा पराक्रमी भिल्ल होऊन गेला असेल, म्हणून त्याचें नांव ज्याच्या त्याच्या तोंडीं झालें आहे.' (शारदेची आकाशवाणी), 'विलायतेंतहि नवरीपेक्षां डावरीलाच भुलून अनेक लग्नें होतात.' (हुंड्यावर बहिष्कार). 'तुला पुरुषा-ला सुकवितां येतें, पण पुरुषसूक्त येत नाहीं' ! (तोतयाचें बंड) असले वर्णसाम्यात्मक पोरखेळ त्यांच्या लेखनांत अनेकदां आढळतात. क्रिकेटशीं अगदीं अनभिज्ञ असलेल्या मनुष्यानें हात फिरवून चेंडू टाकावा व तो समोरच्या

-तीन काठयांच्या रोखानें सुद्धां जाऊं नये, तशी शुष्क शाब्दिक कोट्यांची स्थिति असते. पण केळकरांच्या शाब्दिक कोटयांपैकीं कांहीं इतक्या सफाईदार व सुंदर असतात कीं, त्या पाहून डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच खेळाडूच्या त्रिफळा उडवून टाकणाऱ्या कुशल गोलंदाजीचीच आठवण व्हावी.

"संपादक—योद्धयाला जशी हाडावरची जखम तशी संपादकाला प्रेस ॲक्ट खालची जामीनकी!

हरिदास—बरोबरच आहे. दोन्हीहि भरण्याला सारख्याच कठिण, इतकेंच त्यांचें जे आहत्ते साम्य!" (मौजेचे चारप्रहर पृ० ११९).

"ज्या मानानें मिळकत सूक्ष्म त्या मानानें मिळकतीवर हक्क सांगण्याची दृष्टि सूक्ष्म असावी यांत आश्चर्य नाहीं. शब्दशः कुशाग्रानेंच जेथें वांटण्या कराव्या लागतात व मर्यादा ठरवाव्या लागतात, जेथें ग्राहकबुद्धि कुशाग्रच व्हावी!" (टि. च. खं. १ ला. पृ. ९).

तथापि श्लेषात्मक कोटया केळकरांच्या विनोदांत एकंदरींत कमीच. हास्योत्पादक अगर स्मितजनक अर्थचमत्कृतिच त्यांना अधिक आवडते. त्यांची सौंदर्यदृष्टि किती उज्ज्वल आहे याची कल्पना 'झिम् झिम् झिम् पर्जन्य पडे' ही चिमुकली कविता वाचूनसुद्धां येईल. पण संपादकीय व्यवसायामुळें काव्य-सृष्टींत प्रवेश करून समाधि लावायला त्यांना फारशी सवड कधींच मिळाली नाहीं. सूर्यचंद्रांपेक्षां गोऱ्या अधिकाऱ्यांकडे आणि मेघगर्जनेहूनहि बॉंबच्या स्फोटाकडे त्यांना अधिक लक्ष द्यावें लागलें. याचा परिणाम म्हणजे त्यांच्या उज्ज्वल कल्पकतेचा व्यावहारिक कल्पनांकडे असलेला कल होय. 'विलाय-तेच्या प्रवासवर्णनां'त ते लिहितात, "या सुमारास पश्चिमेकडे ढग येण्यास सुरवात झाली होती, व सूर्य मावळतांना काळ्या कुळकुळीत वानराच्या लाल तोंडासारखा दिसत होता." ही उपमा शूद्रकाला सुचली असती तर त्यानें ती शकाराच्या तोंडीं घालावयाला कमी केलें नसतें. अज्ञातवासाचे अवघे चार दिवस उरले असूनहि त्यांचा आपल्याला भरंवसा नाहीं हें सांगतांना द्रौपदी 'उदयकालीं गमे गहन श्यामा, ही त्रियामा' या संगीताच्या जोडीला गद्यांत म्हणते, "देवा भात शिजेपर्यंत दम निघतो, पण तो पानावर वाढीपर्यंत दम निघत नाहीं; बाळपणचा अनुभव मनांत आण."

व्यावहारिक कल्पनांच्या आवडीमुळें त्यांच्या 'विलायतेच्या प्रवासां'त-सुद्धां पोंगीभात, पापड वगैरे अस्सल हिंदी पदार्थांचें दर्शन होतें. त्यांचें वाङ्मय हें जसें विविध विभागांच्या दृष्टीनें, त्याप्रमाणें उपमादृष्टांतांकरितां योजलेल्या

खाद्यपदार्थांच्या दृष्टीनेंहि साहित्यसम्मेलनच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

या व्यावहारिक कल्पनांमुळें केळकरांच्या लिखाणांतील काव्य कमी झालें असलें तरी विनोद निःसंशय वाढला आहे. अर्थचमत्कृति, उपमा, दृष्टांत, व्याजोक्ति, उपहास, साम्यविरोध इत्यादि भिन्न भिन्न वेष परिधान करणारी त्यांची विनोदी कल्पकता वाङ्मयाला सदैव भूषणभूत होऊन राहील. खालील वाक्यांसारखीं वाक्यें पहायला त्यांचें वाङ्मय मधूनमधून चाळलें तरी पुरे.

" कुळकर्णीलीलामृतासारख्या ग्रंथाकडे केवळ वाङ्मयाच्या निर्विकार दृष्टीनें पाहूनच स्तब्ध बसतां येत नाहीं. त्याचा हेतु व परिणाम यांजकडेहि लौकिक दृष्टीनें पाहिलें पाहिजे. एखादा विंचू नांगीचा आंकडा पाठीवर वळवून तरतर धावत आहे हा देखावा चित्रकलेच्या दृष्टीनें चांगला दिसेल; पण तो घरांत निघाला असतां कोणताहि मार्मिक चितारी हातांतील रंगशलाका टाकून देऊन पादत्राण घेतल्याशिवाय गप्प बसणार नाहीं. "

" डोंगरे यांनीं चिरोल साहेबांस भीष्माचार्यांची उपमा दिली आहे ! भीष्माचार्य जसे धनुर्विद्येंत तसेच चिरोलसाहेब लेखनविद्येंत निष्णात आहेत, ही गोष्ट आम्हांसहि मान्य आहे. पण खुद्द भीष्माचार्यांनीं 'अर्थस्य पुरुषो दासः' हें जसें तोंडानें कबूल केलें, तसें चिरोलसाहेबांनीं तोंडानें मात्र न सांगतां हातानें सिद्ध केलें. "

" मनुष्यमात्रानें आपल्या ध्येयरूप आकांक्षेचें अग्निहोत्र कधींहि विझूं देऊं नये. तथापि रोजच्या भाजीचे बटाटे आगयारींतल्या किंवा अग्निहोत्राच्या विस्तवावरच भाजून घेण्याच्या आग्रहाला मूर्खपणाचें स्वरूप येतें, हेंहि विसरतां कामा नये. "

" भविष्यवाद्यांचा कुलक्षय होण्याची भीति कधींच नाहीं; कारण त्यांचे पोशिंदे जे श्रद्धाळु लोक त्यांचाहि कुलक्षय कधीं होत नाहीं. "

" नवऱ्याच्या येण्याजाण्यानीं बायकोला खोखोच्या प्रवासासारखें होतें. केव्हां खोलींतून बसलें उठावें लागेल याचा नेम नाहीं. "

" पानपतच्या लढाईंत पडलेले सगळेच लोक अलीकडे जिवंत होऊं लागले असून आपआपल्या विधवा बायकांना दर्शनहि देऊं लागले आहेत. पानपतच्या लढाईमुळें दक्षिणची लाख बांगडी फुटली म्हणतात. पण आतां ती सगळी पुन्हां भरावी लागणार ! कासारांच्या धंद्याला कांहीं दिवस तेजी येणार म्हणायची. "

केळकरांनीं विनोदासाठीं विनोद लिहिला नसला, तरी विनोदसृष्टि

निर्माण केली नसली, तरी मराठी वाङ्मयाला विनोददृष्टि देणाऱ्या आधुनिक लेखकांत त्यांचें स्थान अत्यंत उच्च आहे. समतोल बुद्धीमुळें अतिशयोक्तीची अतिशयोक्ति करून हास्यरस निर्माण करायला त्यांची विनोदबुद्धि सहसा तयार होत नाहीं. प्रतिपाद्य विषय सुबोध व मनोरंजक करण्याकरितांच ते बहुधा आपल्या विनोदशक्तीचा उपयोग करतात. अशा लिखाणांत कोटीसाठीं कोटी तरी कोण करीत बसेल ?

गडकऱ्यांच्या शाब्दिक कोट्या, कोल्हटकरांच्या अर्थचमत्कृतिपूर्ण कोट्या, परांजप्यांचा उपहास व अच्युतरावांचा खेळकर विनोद त्यांच्यांत कमी प्रमाणांत असला तरी, साध्या विषयांतूनसुद्धां त्यांना सदैव सहजसुंदर विनोद निर्माण करतां येतो. अच्युतरावांचा विनोद अनेकदां सर्कशींतल्या विदूषकाचें अनुकरण करतो, कोल्हटकर-परांजप्यांचा निम्मा अधिक विनोद 'किंग लियर' नाटकांतील विदूषकासारखा भासतो, आणि गडकऱ्यांच्या विनोदाची जात शकाराची वाटते असें म्हटलें, तर केळकरांचा विनोद शाकुंतलांतील विदूषकासारखा-क्षणभर गंमत करणारा पण राजालासुद्धां आपलें हृद्गत सांगण्याला भिणार नाहीं इतका समंजस असतो असें म्हणणें चूक होणार नाहीं.

प्रत्येक वाङ्मयांत काव्याप्रमाणें विनोदाचे विषयहि बहुधा ठराविक ठशाचे होऊन बसतात. तसें झालें कीं, त्या वाङ्मयाची स्थिति सांठलेल्या पाण्याप्रमाणें होते. त्यांत क्वचित् कमळें फुललीं तरी स्नानाचें सुख कुणालाहि मिळत नाहीं. वाङ्मयाचा प्रवाह वाहता राहिला तरच त्याचा विस्तार होण्याची शक्यता. मराठींतील विनोदाचा असा विस्तार करण्याचें श्रेय भापेचे भावी इतिहासकार ज्या निवडक लेखकांना देतील त्यांत केळकरांची प्रमुखत्वानें गणना होईल. 'टवाळा आवडे विनोद' ही बहुजनसमाजाची विनोदाची कल्पना बदलण्याला केळकरांचें लिखाण कांहीं कमी कारणीभूत झालें नाहीं. अस्पृश्य मानल्या गेलेल्या विनोदाला त्यांनीं राजकारणादि देवमंदिरांचीं द्वारें उघडीं करून दिलीं. त्यांच्या विनोदगर्भ वाङ्मयाच्या अभ्यासकांतूनच भावी पिढींतील लघुनिबंधकार निर्माण व्हावयाचे आहेत. पहांटे पूर्वेकडे दिसणाऱ्या शुक्राचें स्वयंभू तेज मोहक असतें हें तर खरेंच; पण रम्य उषःकालाचा दूत या दृष्टीनेंहि त्याच्याकडे आपण कौतुकानें पाहत नाहीं काय !

## ६. केळकर यांची लेखनशैली

( श्री. गजानन त्र्यंबक माडखोलकर, सहसंपादक महाराष्ट्र, नागपूर )

श्री. नरसिंह चिंतामण केळकर यांचें स्थान आज मराठी वाङ्मयांत अनेक दृष्टींनीं अनन्य समजलें जातें. वृत्तपत्रकार म्हणून गेलीं सतत तीन तपें ते लोकांपुढें आहेत; व त्यांच्या सावलीळ लेखणीनें जरी वाङ्मयाचे प्रायः सर्वच प्रदेश आपल्या संचारानें मंडित केलेले असले तरी महाराष्ट्रांतील बहुजनसमाज हा त्यांना मुख्यतः 'केसरी' चे संपादक म्हणूनच ओळखतो, आणि, त्यांत एक प्रकारचें औचित्य खचित आहे. वस्तूचा काय किंवा व्यक्तीचा काय, एकादा गुणविशेष इतका उत्कट असतो कीं, त्याच्यापुढें तिच्या बाकीच्या सर्व गुणांचें तेज लोपून जातें. विद्युत्‌शक्तीचे इतर उपयोग कितीहि असले, तरी वीज हा शब्द उच्चारतांच डोळ्यांपुढें विद्युद्दीपांची उज्ज्वल पंक्ति एकदम उभी रहाते. याचें कारण असें कीं, विजेच्या इतर कोणत्याहि उपयोगापेक्षां तिचा प्रकाशाचा पुरवठा करण्याचा गुणधर्म हा आपल्या अनुभवाला प्रत्यहीं येत असतो. हाच न्याय व्यक्तींच्याहि कर्तृत्वाला लागू पडतो. त्या कर्तृत्वाला जरी अनेक पैलू असले तरी त्यांपैकीं सर्वांत तेजस्वी पैलूवरच लोकांचें चित्त नेहमीं केंद्रित होतें. याचा अर्थ असा नव्हे कीं, त्याचे इतर पैलू लोकांना माहीत नसतात. पण, बहुजनसमाजाची प्रवृत्तिच अशी असते कीं, आपल्या दोघांच्या जीविताशीं जिचा जिव्हाळ्याचा संबंध येईल, तेवढीच गोष्ट नेमकी लक्षांत ठेवावयाची आणि, 'केसरी' इतका त्यांच्या जिव्हाळीला जाऊन भिडलेला असा केळकरांच्या कार्यक्षेत्रांत अन्य कोणता विषय दाखवितां येईल ? केळकरांचीं नाटकें आज जरी रंगभूमीवरून लुप्तप्राय झालेलीं असलीं, तरी तीं गोडीनें पाहिलेले लोक महाराष्ट्रांत अनेक सांपडतील; व त्यांनीं लिहिलेलें लोकमान्य टिळकांचें चरित्र तर हजारों लोकांनीं मोठ्या उत्कंठेनें वाचलेलें आहे. तथापि, 'केसरी'तील आपल्या विविध विषयांवरील लेखांनीं केळकरांनीं महाराष्ट्रीयांच्या लौकिक जीवनाच्या इतक्या अंगांचें दक्षतेनें संगोपन केलेलें आहे कीं, त्यांचें नांव उच्चारतांच त्यांच्या या संपादकीय कामगिरीचेंच स्मरण मनाला प्रथम आणि तीव्रतेनें होतें. इतकेंच नव्हे, तर निव्वळ वाङ्मयाचा भोक्ता असलेला असाहि मनुष्य 'केसरी'-तूनच त्यांचे सर्व वाङ्मयगुण प्रकट झालेले आहेत, असें मानतो.

आणि तें योग्यच आहे. कारण, केळकरांच्या भाषाशैलीचे जितके

## ६. केळकर यांची लेखनशैली

( श्री. गजानन त्र्यंबक माडखोलकर, सहसंपादक महाराष्ट्र, नागपूर )

श्री. नरसिंह चिंतामण केळकर यांचें स्थान आज मराठी वाङ्मयांत अनेक दृष्टींनीं अनन्य समजलें जातें. वृत्तपत्रकार म्हणून गेलीं सतत तीन तपें ते लोकांपुढें आहेत; व त्यांच्या सावलीलं लेखणीनें जरी वाङ्मयाचे प्रायः सर्वच प्रदेश आपल्या संचारानें मंडित केलेले असले तरी महाराष्ट्रांतील बहुजनसमाज हा त्यांना मुख्यतः 'केसरी' चे संपादक म्हणूनच ओळखतो, आणि, त्यांत एक प्रकारचें औचित्य खचित आहे. वस्तूचा काय किंवा व्यक्तीचा काय, एखादा गुणविशेष इतका उत्कट असतो कीं, त्याच्यापुढें तिच्या बाकीच्या सर्व गुणांचें तेज लोपून जातें. विद्युत्शक्तीचे इतर उपयोग कितीहि असले, तरी वीज हा शब्द उच्चारतांच डोळ्यांपुढें विद्युद्दीपांची उज्ज्वल पंक्ति एकदम उभी रहाते. याचें कारण असें कीं, विजेच्या इतर कोणत्याहि उपयोगापेक्षां तिचा प्रकाशाचा पुरवठा करण्याचा गुणधर्म हा आपल्या अनुभवाला प्रत्यहीं येत असतो. हाच न्याय व्यक्तींच्याहि कर्तृत्वाला लागू पडतो. त्या कर्तृत्वाला जरी अनेक पैलू असले तरी त्यांपैकीं सर्वांत तेजस्वी पैलूवरच लोकांचें चित्त नेहमीं केंद्रित होतें. याचा अर्थ असा नव्हे कीं, त्याचे इतर पैलू लोकांना माहीत नसतात. पण, बहुजनसमाजाची प्रवृत्तिच अशी असते कीं, आपल्या दोघांच्या जीविताशीं जिचा जिव्हाळ्याचा संबंध येईल, तेवढीच गोष्ट नेमकी लक्षांत ठेवावयाची आणि, 'केसरी' इतका त्यांच्या जिव्हाळीला जाऊन भिडलेला असा केळकरांच्या कार्यक्षेत्रांत अन्य कोणता विषय दाखवितां येईल ? केळकरांचीं नाटकें आज जरी रंगभूमीवरून लुप्तप्राय झालेलीं असलीं, तरी तीं गोडीनें पाहिलेले लोक महाराष्ट्रांत अनेक सांपडतील; व त्यांनीं लिहिलेलें लोकमान्य टिळकांचें चरित्र तर हजारों लोकांनीं मोठ्या उत्कंठेनें वाचलेलें आहे. तथापि, 'केसरीं'तील आपल्या विविध विषयांवरील लेखांनीं केळकरांनीं महाराष्ट्रीयांच्या लौकिक जीवनाच्या इतक्या अंगांचें दक्षतेनें संगोपन केलेलें आहे कीं, त्यांचें नांव उच्चारतांच त्यांच्या या संपादकीय कामगिरीचेंच स्मरण मनाला प्रथम आणि तीव्रतेनें होतें. इतकेंच नव्हे, तर निव्वळ वाङ्मयाचा भोक्ता असलेला असाहि मनुष्य 'केसरी'-तूनच त्यांचे सर्व वाङ्मयगुण प्रकट झालेले आहेत, असें मानतो.

आणि तें योग्यच आहे. कारण, केळकरांच्या भाषाशैलीचे जितके

विविध प्रकार त्यांच्या ' केसरी 'तील लेखांतून आढळतात, तितके त्यांच्या ग्रंथांतून सांपडणें शक्य नाहीं. ' संस्कृत विद्येचें पुनरुज्जीवन, ' ' जगद्गुरूंची गादी, ' 'चिरोल भाष्यभाषांतर, ' ' कौन्सिलांतील शकुंतलाख्यान, ' ' दिल्लीचा बादशाही दरबार, ' ' हे कोण आले ? बादशहांचे काका, ' मी वाईट, तूं वाईट, तो वाईट, ' ' स्वराज्यद्रोही छत्रपति, ' ' शारदेची आकाशवाणी, ' 'मुरलीधर कीं, गारुडी !' 'दुर्जनसिंह महाराजांनीं नवस कसा फेडला,' इत्यादि त्यांच्या 'केसरी'तील लेखांतून त्यांच्या भाषाशैलीचें केवळ वैदग्ध्यच नव्हे, तर वैचित्र्यहि विपुल पहावयाला मिळतें; तितकें तें त्यांच्या ग्रंथांतून खचित दृष्टीस पडत नाहीं. फार कशाला, त्यांच्या एकंदर वाङ्मयांतील निवडक वेच्यांचें जें ' गद्यगुच्छ ' म्हणून एक पुस्तक प्रसिद्ध झालें आहे, त्यावरूनहि त्यांच्या लेखनशैलीच्या विविधतेची तितकी कल्पना येऊं शकत नाहीं. कारण ग्रंथ म्हटला कीं, त्याच्या लेखनाला एकप्रकारचें वैठें, घोटीव व एकेरी स्वरूप सहजच येतें. मनुष्य ग्रंथ लिहावयाला बसला कीं, त्याच्या मनावर आपण मागील पिढ्यांचे वारसदार व पुढील पिढ्यांना जबाबदार असल्याच्या जाणीवेचें दडपण पडतें; प्रत्येक शब्द वेंचक व अभिजात पडावा म्हणून तो पराकाष्ठेचे श्रम घेतो, आणि स्वतःचे विचार इतरांच्या मतांच्या कसोटीवर तो इतके घासून पहातो कीं, त्यामुळें त्याचें वैशिष्ट्य जवळ जवळ नाहींसें होतें. अर्थात् त्याचें लिहिणें, सहजतेपासून इतकें दूर जातें कीं, त्यांत कोणत्याच प्रकारचा ताजेपणा फारसा उरत नाहीं. लेखकानें परिश्रमपूर्वक लिहावें, ही गोष्ट खरी. पण, त्याचें लिहिणें इतकें क्लिष्ट खास असूं नये कीं, तें लिहितांना त्याला स्वतःला जितके क्लेश झालेले असतात, तितकेच ते वाचतांना इतरांना व्हावे ! औचित्य हा जसा विचारांचा, तसा प्रसाद हा भाषेचा आत्मा आहे; व मनुष्याचें लिहिणें प्रसादापासून जितकें दूर तितकें तें बहुजनसमाजाला पराङ्मुख असतें. केळकरांच्या ग्रंथांतून हा दोष सहसा आढळत नाहीं. कारण त्यांच्या वृत्तपत्रांतील लेखनाप्रमाणें त्यांचें ग्रंथलेखनहि प्रवाहि म्हणजे धांवतें असतें. विमान हें आपल्याकडून कितीहि सावकाश चाललें, तरी त्याच्या त्या मंद गतींतहि एक प्रकारचा वेग असतो. केळकरांचें वाङ्मय धांवतें असण्याचें श्रेय मुख्यतः परिस्थितीलाच दिलें पाहिजे. वर्तमान पत्राच्या धंद्यांत पडलेल्या मनुष्याला जसें स्फूर्तीकरितां हात आंखडून बसणें परवडत नाहीं, तसेंच शब्दांच्याहि बाबतींत फारसें चोखंदळ राहून चालत नाहीं. कल्पनांसाठीं काय किंवा शब्दांसाठीं काय, जुन्या अभिजात वाङ्मया-

चा जामदारखाना धुंडाळीत बसण्याइतकी फुरसत त्याला नसते. नित्याच्या व्यवहारांतील कल्पनांचीं आणि शब्दांचीं चलनी नाणीं घेऊनच त्याला आपला कार्यभाग उरकावा लागतो. त्यामुळें त्याच्या लिहिण्यांत जसा सैलपणाचा दोष उद्भवतो, तसेंच भाषेचें आणि कल्पनांचें वैचित्र्यहि पण उत्पन्न होतें. केळकरांच्या ग्रंथापेक्षां त्यांच्या ‘ केसरी ’ मधील लेखांतील भाषाशैली जी इतकी विविधरूप वाटते, ती याच कारणामुळें.

‘जसा मनुष्य, तशी त्याची लेखनशैली' हें सुभाषित प्रसिद्ध आहे. पण कोणत्याहि लेखकाच्या भाषाशैलीवर केवळ त्याच्या स्वभावाचा, म्हणजे वैयक्तिक गुणावगुणांचाच ठसा उमटलेला असतो, असें मानणें व त्या दृष्टीनें त्याच्या वाङ्मयाच्या आदर्शांत त्याच्या व्यक्तित्वाचें हुबेहूब प्रतिबिंब पहावयाला मिळेल अशी अपेक्षा करणें मात्र चुकीचें होईल. कला म्हणजे मानवी जीवनाची अनुकृति, प्रतिकृति किंवा विकृति होय. जीवनाचें चित्रण करणें हें जरी कलेचें साध्य असलें, तरी त्या चित्रणांत मनुष्याच्या अनुभूतीप्रमाणेंच त्याच्या जीवनविषयक आकांक्षांच्यादि छटा उमटलेल्या असतात; व कित्येक वेळां त्या छटांचे रंग इतके गहिरे आणि गडद असतात कीं, त्यामुळें वास्तवाचें अद्भुतांत न कळत रूपांतर होऊन जातें. सर्व काळांत श्रेष्ठ जें ललित वाङ्मय, त्यांत तर हा चमत्कार नेहमीं दृष्टीस पडतो. शोकासारख्या वस्तुस्थितीचें हुबेहूब वर्णन करण्याचें कंकण हातीं बांधून बसलेल्याहि लेखकांदंबऱ्यांतून जे वास्तवाच्या कभिन्न ढगांवर अद्भुताचे मोहक संध्यारंग झळकतांना नेहमीं दिसतात, ते याच कारणामुळें. मनुष्यानें कितीहि प्रयत्न केला, तरी त्याला समाजाच्या तर राहोच, पण स्वतःच्याहि जीवनाचा पूर्ण आविष्कार करणें शक्य होत नाहीं. कारण, मनुष्याला स्वतःला तरी आपल्या आयुष्यांतील हरएक गोष्टीचें मर्म कुठें कळलेलें असतें ? त्या दृष्टीनें पाहिलें तर आपलें स्वतःचें जीवनसुद्धां अंशतः आपल्याला एक गूढच असतें, असें म्हणावें लागेल. शिवाय, घडलेल्या गोष्टी लक्षांत ठेवण्याच्या बाबतींत स्मरणशक्तीकडून होणारा लहरीपणा आणि बुद्धीच्या इतर सर्व शक्तींवर मात करण्याची कल्पनाशक्तीची प्रवृत्ति यांमुळेंहि वस्तुस्थितीचें आकलन आणि आविष्कार करण्याच्या बाबतींत जो गोंधळ होतो, तो निराळाच ! आणखी दुसरें असें कीं, मनुष्य लिहावयाला बसला, म्हणजे औचित्याच्या विवेकामुळें त्याच्या लिहिण्याला आपोआपच अनेक प्रकारच्या मर्यादा पडतात. कुलीनपणाची चाड ही जशी मनुष्याला चव्हाटपणानें वागूं देत नाहीं, तशी सदभिरुचीची भीड-

हि त्याला बेसुमारपणानें लिहूं देत नाहीं. त्याची सदभिरुचि जितकी सूक्ष्म, तितकें त्याचें लिहिणें सुसंस्कृत, आणि सुसंस्कृतपणा म्हटला कीं, संयम हा आलाच. शब्दांची निवड करण्यापासून तों विचारांची तीव्रता कमी करण्या-पर्यंत हरएक बाबतींत हा संयम दिसून येत असतो. विशेषतः समाजापुढें स्वतः उभें राहून जेव्हां मनुष्याला लिहावयाचें असतें, तेव्हां तर हीं बंधनें त्यास फार जाचतात. या बंधनांतून सुटण्याचा प्रयत्न मनुष्यानें केलेला नाहीं, असें नव्हे. सदभिरुचीची अमर्यादा केल्याचा आळ तर स्वतःवर येऊं नये आणि आपले क्रोधद्वेषादि विकार तर यथेच्छ उगवून घेतां यावे या बुद्धीनें वक्रोक्ति, आप्तोक्ति, रूपक इत्यादि अलंकार मनुष्यानें शोधून काढले आहेत, असें म्हटलें तर त्यांत काय चूक होईल ? जुलमी कायद्यांचा झडप चुकविण्या-करितां कै. शि. म. परांजपे यांनीं या ग्राम्या अलंकारांचा उपयोग किती कुशलतेनें केला, हें प्रसिद्धच आहे. अशा स्थितींत, मनुष्यानें वाङ्मय किंवा त्याची भाषाशैली हें त्याच्या व्यक्तित्वाचें हुबेहूब प्रतिबिंब असतें, असें कसें म्हणावें ?

तथापि, मनुष्याची लेखनशैली ही कांहीं एका मर्यादेपर्यंत त्याच्या वैशिष्ट्याची निदर्शक असते, एवढें कबूल करावयाला मात्र हरकत नाहीं. मानवी जीवनाचा कांहीं भाग असा असतो कीं, तो कोणत्याहि मूर्त किंवा दृश्य साधनानें व्यक्त होऊं शकत नाहीं. नदीचा प्रवाह हा दृश्य असतो. परंतु, त्या प्रवाहाच्या पोटीं असे अनंत झिरपे असतात कीं, ज्यांच्यामुळें ऐन उन्हाळ्याच्या दिवसांतहि तिच्या पात्रांत पाणी खेळतें रहातें, पण जे डोळ्यांना मात्र कधींहि दिसत नाहींत; त्याचप्रमाणें, प्रतिभाशाली व्यक्तींच्या निर्माणशक्तीचे (Creative genius) केवळ आधारच असे बुद्धीचे किंवा चारित्र्याचे अनेक विशेष इतरांना सर्वथैव अगम्य असे असतात. मनुष्याचें मन हें इतकें स्फुरणशाली आहे कीं, त्याला होणाऱ्या हरएक संवेदनेचा ध्वनिलेख घेणारें यंत्र अद्याप निघालेलें नाहीं. विकारांच्या किंवा भावनांच्या कांहीं छटा अशा असतात कीं, त्यांची मनाला फक्त अनुभूति तेवढी होते; अवबोध होत नाहीं. आणि, ज्याचा अवबोध होत नाहीं, त्याचा आविष्कार कसा करितां यावा ! टेनिसननें आपल्या एका शोकपर काव्यांत असें म्हटलें आहे कीं, "पाकोळ्या जशा पाण्याला ओझरता स्पर्श करून जातात, तशीं माझीं हीं गीतें माझ्या हृदयांत उचंबळलेल्या दुःखाणेवाला फक्त स्पर्श करून बाहेर पडलेलीं आहेत." सामान्य माणसाला ही अडचण फारशी जाणवत नाहीं.

कारण त्याच्याजवळ मुळीं व्यक्त करण्याजोगेंच फार थोडें असतें. पण, मनुष्याची बुद्धि जितकी तीव्र, मन जितकें स्फुरणशाली आणि आत्माविष्कारणाची त्याची इच्छा जितकी प्रबळ, तितकें त्याला भाषेचें पंगुत्व जास्त जाणवतें. तथापि, मानवी जीवन जास्तींत जास्त जर कशांत प्रकट होऊं शकत असेल, तर तें फक्त वाङ्मयांत. जीवनाचें प्रतिबिंब मानिलेल्या सर्व कळांत कठिण वाङ्मयाच्या आणि भावाविष्काराच्या सर्व साधनांत भाषेला जो अग्रपूजेचा मान दिला जातो, त्याचेंहि मर्म झालें तरी हेंच होय. शब्द हा स्वतः अमूर्त असेल; पण अशरीरी भावांत मूर्त स्वरूप देण्यांत त्याची इतर सर्व साधनांवर ताण आहे. रंगांना जे भाव रेखाटणें असाध्य ते तो मूर्तिमंत डोळ्यांपुढें उभे करितो; व त्याच्यांत वास करणारें अर्थगर्भ माधुर्य हें सप्तसुरांच्या मर्यादित, निरर्थ माधुर्यापेक्षां मनाला खचित अधिक हलवून सोडतें. किंबहुना, संदर्भानुसार विविध अर्थ व्यक्त आणि सूचित करण्याचे शब्दांचें सामर्थ्य इतकें अतुल आहे कीं, ललित साधनांच्या इतर कोणत्याहि सिद्धि जरी कदाचित् त्याच्या ठिकाणीं नसल्या, तरी एवढ्या एकाच शक्तीच्या जोरावर तो भावाविष्काराच्या सर्व साधनांत श्रेष्ठ ठरला असता. हें त्याचें सामर्थ्य शास्त्रीय वाङ्मयांत फारसें प्रत्ययाला येत नाहीं. गणितांत आंकड्यांचा जो उपयोग, तोच शास्त्रीय वाङ्मयांत शब्दांचा. शास्त्रीय ग्रंथांचें उद्दिष्ट फक्त प्रमेयांचें आणि प्रयोगांचें स्पष्टीकरण करण्याचें असतें. सुबोधता हेंच त्यांचें सर्वस्व पण नुसतें सुबोध लिहिणें म्हणजे भाषाशैली नव्हे. कै. त्रि. कों. ओक किंवा कै. वासुदेवराव आपटे यांच्याइतकी सोपी भाषा लिहिणारे लेखक महाराष्ट्रांत हाताच्या बोटांवर मोजण्याइतकेहि निघणार नाहींत. पण त्यांच्या त्या सुबोध लेखनाला भाषाशैली हें नांव कोण देईल? शब्द हें अर्थाचें वाहन आहे, एवढी एकच गोष्ट बहुधा त्यांना माहित असावी; त्यांच्या ठिकाणीं असलेल्या इतर शक्तींची जाणीव त्यांना होती, असें त्यांच्या लिहिण्यावरून तरी दिसत नाहीं. शब्द हें केवळ अर्थाचें वाहन नव्हे; तर अर्थाला सगुण स्वरूप देणारी, त्याला सावयव, सचेतन आणि सामर्थ्यसंपन्न करणारी ती एक दैवी शक्ति आहे, या जाणीवेनें जो त्याचा कुशल उपयोग करूं शकेल, तोच खरा लेखक; व भाषेची विशिष्ट अशी शैली फक्त त्याच्याच लिहिण्यांत दृष्टीस पडते.

याचा अर्थ असा नव्हे कीं, मनुष्याची लेखनशैली ही निव्वळ त्याला असलेल्या शब्दांच्या मार्मिक रचनांतून म्हणजे त्याच्या न्यासंगांतून उद्भूत होते.

लेखनशैलीचा संबंध व्यासंगाइतकाच व्यक्तिगत गुणावगुणांशींहि असतो. किंबहुना, मनुष्याचा स्वभाव, त्याच्या भोंवतालची परिस्थिति, त्याच्या अवलोकनाच्या आणि सहानुभूतीच्या मर्यादा, त्याची विचार करण्याची पद्धति व त्याचा व्यासंग या सर्व गोष्टींचा सामुदायिक परिणाम त्याच्या लेखनावर होत असतो. मनुष्यानें कितीहि प्रयत्न केला, तरी त्याला आपलें व्यक्तित्व जसें सर्वांशांनीं वाङ्मयांत प्रकट करितां येत नाहीं, तसेंच तें सर्वांशांनीं लपवितांहि पण येत नाहीं. आणि, ' मनुष्य तशी त्याची लेखनशैली ' या सुभाषितांत जर कांहीं तथ्यांश असेल, तर तो एवढ्यापुरताच. विनायक कवींचेंच उदाहरण घ्या. त्यांनीं आपल्या चारित्र्याची छाया आपल्या कवितेवर कुठेंच पडूं दिलेली नाहीं. तथापि, ' मोहानंतर, ' ' जोहार ' ' सुवास ' इत्यादि कविता वाचतांना आपल्या डोळ्यांपुढें त्यांचे चारित्र्यविशेष आपोआप उभे रहातातच कीं नाहीं ! कांहींचें लेखन एकांगी, कांहींचें गंभीर, कांहींचें विनोदपूर्ण, कांहींचें अतिरंजित तर कांहींचें अगदीं समतोल असतें. कांहींना सिद्धांतसूत्रें स्फुरतात; तर कांहींना कितीहि पल्लेदार वाक्यें लिहिलीं, तरी आपण विषयविवेचनाची मजल गांठल्यासारखी वाटत नाहीं. हा जो फरक मोठमोठ्या लेखकांच्या लिहिण्यांतून दिसतो, त्याचें मूळ त्यांच्या व्यक्तित्वाशिवाय अन्यत्र कुठें शोधणार ! शिवरामपंत परांजपे आणि कोल्हटकर हे दोघेहि स्थूल मानानें विनोदी लेखक; व दोघांचीहि कल्पनाशक्ति उच्च दर्जाची, पण, एकाच्या विनोदाचा आत्मा उपरोध, तर दुसऱ्याचा परिहास हा आहे. अच्युतराव कोल्हटकर आणि गडकरी या दोघांच्याहि लिहिण्यांत अतिरंजन फार. पण त्यांत तरी फरक किती ! असाच फरक इतरहि सर्व बाबतींत आढळतो. टिळकांचे उपमा–दृष्टांत वैदिक वाङ्मयाच्या व्यासंगापासून स्फुरलेले, कोल्हटकरांचे सुंदर वस्तूंच्या चिंतनामुळें सुचलेले आणि केळकरांचे रोजच्या व्यवहारांतून उचललेले असतात. फार कशाला, मनुष्याचें रोजचें जीवन जसें असेल, तसें स्वरूप अंशतः त्याच्या लेखनशैलीला प्राप्त होतें. ज्याच्या स्वभावीं चेंगटपणा आणि स्वभाव घुम्या असतो, त्याच्या लिहिण्यांत दुसऱ्याला आनंद देण्याचें सामर्थ्य सहसा नसतें.. उलट, मोकळ्या, उल्हासी आणि दिलदार मनुष्याच्या वाक्यांत पहावें तिकडे विनोदाचा हंसरा, प्रसन्न सूर्यप्रकाश पडलेला असतो. मनुष्याच्या वयांत

असें मानावयाला सामान्य वाचकाचें मन तरी प्रथमदर्शनीं खास तयार होणार नाहीं. खाडिलकरांच्या ' कीचकवध, ' ' सत्त्वपरीक्षा ' आणि ' सवतीमत्सर ' या तीन निरनिराळ्या कालखंडांत लिहिलेल्या नाटकांच्या भाषेंत तरी किती फरक आहे! तसेंच, बहुतेक सर्व ललित लेखकांच्या कृतींतून कांहीं ठरीव पात्रें पुनरुक्त झालेलीं आढळतात. याचें कारण असें कीं, मानवी स्वभावाचे जे विशेष, ध्येयाच्या रूपानें म्हणा किंवा अनुभूतीच्या रूपानें म्हणा, त्यांच्या मनावर ठसलेले किंवा त्यांच्या बुद्धीला पटलेले असतात, तेच सगुण साकार होऊन पुनः पुन्हा त्यांच्या लेखणींतून अवतरतात. अर्थात्, मनुष्याचा पूर्णावतार जरी त्याच्या वाङ्मयांतून प्रकट होत नसला तरी त्याच्या वैशिष्ट्याचे कांहीं अंश त्यांत कळत न कळत अवतीर्ण होतात; व तेवढ्यापुरतें ' जसा मनुष्य तशी त्याची लेखनशैली ' हें सुभाषित ग्राह्य मानावयाला हरकत नाहीं.

श्री. केळकर यांच्या भाषेवरहि अंशतः त्यांच्या परिस्थितीचा आणि अंशतः स्वभावाचा परिणाम झालेला दिसतो. कोल्हटकरांसारखे त्यांचे कॉलेजांतील सहाध्यायी मित्र असें सांगतात कीं, आम्हां स्नेहीमंडळींत कोणत्याहि विषयावर वादविवाद सुरू होऊन तो निकरावर आला, म्हणजे दोन्हीहि पक्षांच्या म्हणण्यांत थोडथोडें तथ्य आहे असें सांगून, केळकर हे नेहमीं तडजोडीचा मार्ग काढावयाला पुढें येत असत. केळकरांच्या वाङ्मयाचें एकंदर स्वरूप पाहिलें, म्हणजे हें विधान खरें असल्याबद्दल खात्री वाटते. त्यांच्या लेखनशैलीचा आत्मा युक्तिवाद हा आहे. त्यांचा कोणताहि लेख किंवा ग्रंथ घ्या. त्यांतील सारी चर्चा बुद्धिवादानें भरलेली आढळून येईल. म्हणजे असें कीं, ज्या विषयावर लिहावयाचें असेल, त्यावरील सारे आक्षेप आणि शंका स्वतःच उपस्थित करून त्यांचें निरसन करीत करीत वाचकांच्या बुद्धीवर आपल्या मताचा शह बसवावयाचा. त्यांच्या भाषेला हें वळण लागावयाला एका बाजूनें जशी त्यांची तडजोडीकडे असलेली स्वाभाविक प्रवृत्ति कारण झाली, तसें दुसऱ्या बाजूनें त्यांचें सार्वजनिक जीवनांतील स्थानहि कारण झालें. त्यांची भूमिका वर्तमानपत्रकाराची आहे. वर्तमानपत्रांचा उद्देश लोकांचा अनुनय करणें हा असतो. किंबहुना, याच्या पुढें जाऊन असेंहि म्हणतां येईल कीं, अनुनय हेंच सर्व वाङ्मयाचें आणि ललितकलांचें साध्य आहे. शिल्प, चित्र, काव्य, नाट्य, संगीत यांपैकीं कोणतीहि कला घ्या. लोकांचें चित्त आकृष्ट करण्याविना दुसरा कोणता उद्देश या कलांपुढें असतो, असें म्हणतां येईल ? ज्याची कविता रसिकांना मोहित करीत नाहीं असा

कांहि किंवा ज्याच्या गायनानें लोक लुब्ध होत नाहींत असा गायक आपल्या शास्त्रांत कितीहि निपुण असला, तरी त्याच्या त्या निष्फळ पांडित्याचा, काय उपयोग? कलावंत हे आपल्या कृतीच्या सुंदरतेनें आणि शास्त्रज्ञ हे आपल्या प्रमेयाच्या सयुक्तिकतेनें लोकांचा अनुनय करून त्यांच्या बुद्धीवर प्रभुत्व गाजवितात. वाङ्मय, कला आणि शास्त्रें यांचा उच्च तात्त्विक प्रदेश सोडून व्यवहाराच्या धूसर जगांत आलें असतां, तिथें तर अनुनयाशिवाय एकहि पाऊल पुढें पडणें शक्य नाहीं, असा अनुभव येतो. न्यायदेवतेच्या पवित्र मंदिरापासून तों निवडणुकीच्या चटोर चवाठ्यापर्यंत सार्वजनिक व्यवहारांतील हरएक केंद्रस्थानीं अनुनय हेंच यशःसिद्धीचें एकमेव साधन होऊन बसलेलें दृष्टीस पडतें. व्यवहारांत जर अनुनयाचें एवढें वर्चस्व आहे, तर तें वर्तमानपत्रांत किती असेल? कारण, वर्तमानपत्र म्हणजे एकंदर समाजाची रोजनिशी,—अवघ्या व्यवहाराचा आदर्श. समाजांतील सर्व घडामोडींची मार्मिक नोंद करणें हें जसें वर्तमानपत्राचें एक कर्तव्य, तसेंच त्या घडामोडींची चिकित्सा करून लोकांच्या विचारांना योग्य वळण देणें हें त्याचें दुसरें कर्तव्य. हें दुसरें कर्तव्य करण्यासाठींच मुख्यतः संपादकाचा अवतार असतो. आणि तें यशस्वितेनें करावयाला अनुनयाइतकें अमोघ साधन अन्य कोणतें असूं शकेल? लोकमान्य टिळकांनीं लोकमतावर आपली पकड बसविण्यासाठीं या साधनाचा उपयोग इतक्या उत्कृष्ट रीतीनें केला कीं, त्यांच्या प्रतिपक्ष्यांनीं 'लोकच्छंदानुवर्ती' ही एक नवीच सुसंस्कृत शिवी त्यांच्यासाठीं शोधून काढली. पण, राजकारणांत पडणाऱ्या सर्वच व्यक्तींना आज थोड्याबहुत प्रमाणांत तरी लोकच्छंदानुवर्तन करावें लागतेंच कीं नाहीं? आणि टिळकांनीं जर लोकच्छंदानुवर्तन केलें नसतें, तर ब्रिटिश सत्तेविरुद्ध एवढा प्रभावी असंतोष तरी त्यांना कसा निर्माण करितां आला असता? लोकच्छंदानुवर्तन हें केवळ वर्तमानपत्राचेंच नव्हे, तर सांप्रतच्या लोकशाहीचेंच मुळीं एक मुख्य अंग आहे; व हिंदुस्थानांतील लोकमत जसजसें जागृत आणि सुशिक्षित होत जाईल, तसतशी लोकांचा अनुनय करण्याची आवश्यकता सार्वजनिक चळवळींत भाग घेणाऱ्या व्यक्तींना तीव्रतेनें जाणवूं लागेल.

अनुनयाचे प्रकार अनेक आहेत; व निव्वळ वर्तमानपत्रापुरतेंच बोलावयाचें, तर परिस्थित्यनुसार त्याचा निरनिराळ्या लेखकांनीं निरनिराळ्या रीतींनीं उपयोग केलेला दृष्टीस पडतो. ॲडिसन आणि स्विफ्ट हे दोघे समकालीन लेखक; व इंग्लंडांतील वर्तमानपत्राचा धंदा त्या दोघांनींहि आप-

आपल्या परीनें उत्कर्षाप्रत नेला. पण, दोघांच्या लेखनशैलींत मात्र जमीन-अस्मानाचा फरक आढळतो. ॲडिसनची वाणी ही गुलकंदासारखी मधुर वाटते; तर स्विफ्टच्या वाणींत व्याजोक्तीचा विखार ओतप्रोत भरलेला आहे. खुद्द महाराष्ट्रांतील टिळक, आगरकर, शिवरामपंत परांजपे आणि केळकर हे चार वर्तमानपत्रकार घेतले तर त्यांच्याहि लेखनांत असाच फरक दिसून येतो. आणि त्याचें कारण हेंच कीं, लोकांचा अनुनय करणें हेंच जरी प्रत्येकाचें साध्य असलें, तरी स्वभावानुसार किंवा मतांच्या स्वरूपानुसार प्रत्येकाची अनुनयाची पद्धत मात्र वेगळी. टिळकांची पद्धत अशी होती कीं, प्रतिपक्षावर आवेशानें तुटून पडून, आपल्या विचारांच्या ओजस्वितेच्या जोरावर लोकांचीं मनें खेंचून घ्यावयाचीं. शत्रूशीं गनिमी काव्याची लढाई ते कधींच खेळले नाहींत, त्यांचे लेख म्हणजे तीं जणुं कांहीं प्रतिपक्षाला द्वंद्वयुद्धांत दिलेलीं आव्हानें किंवा समरांगणावर त्याला उद्देशून केलेलीं मर्मभेदक भाषणेंच वाटतात; व त्यांच्या लेखांतील बिनतोड कोटिक्रमापेक्षांहि त्यांतून प्रकट होणाऱ्या निर्भयतेच्या प्रखर तेजानेंच लोकमतावर त्यांची छाप अधि बसविली. आगरकरांविषयींहि असेंच म्हणतां येईल. त्यांचें काम टिळकांपेक्षांहि एका अर्थानें अधिक अवघड होतें. म्हणजे असें कीं, परकीय राज्यकर्त्यांविषयीं स्वाभाविक असलेल्या प्रीतीच्या अभावाची भूमिका टिळकांच्या कर्तृत्वाला जशी अनायासें लाभली, तशी स्थिति आगरकरांची नव्हती. त्यांना समाजांत शतकानुशतकें दृढमूल होऊन बसलेल्या मतांविरुद्ध लोकमत निर्माण करावयाचें होतें. ज्यांचा अनुनय त्यांना करावयाचा होता, ते लोकच मुळीं एका परीनें त्यांचे प्रतिपक्षी होते. त्यामुळें प्रतिपक्षावर नुसतें तुटून पडून त्यांचें निभावण्यासारखें नव्हतें. म्हणून, त्यांनीं पुष्कळदां लोकमताला जसें दुखविलें, तसेंच केव्हां केव्हां गोंजारलेंहि; व भाषेच्या सौष्ठवाकडे टिळकांप्रमाणें दुर्लक्ष न करितां, ती परिश्रमपूर्वक सजवून तिच्या सुंदरतेच्या जोरावर लोकमत आपल्याकडे आकृष्ट करून घेतलें. लोकांना मुद्दाम विश्वासांत घेण्याची गरज टिळकांना कधींच भासली नाहीं. उलट, आगरकरांनीं अंगीकारिलेली सुधारकाची भूमिका अशी होती कीं, आपल्या हेतूंचा प्रांजळपणा पटवून देण्यासाठीं त्यांना अनेकदां लोकांना आर्जवून विश्वासांत घ्यावें लागलें. तथापि टिळक काय किंवा आगरकर काय, या दोघांचेंहि लिहिणें एकंदरींत सरळच. तसें परांजपे यांचें नाहीं. अनुनयाचा एक प्रकार असा आहे कीं, व्याजोक्तीच्या जोरावर प्रतिपक्षाचीं मतें आणि स्थिति इतकी उपहासास्पद करून सोडावयाची कीं,

लोकांच्या मनांत त्याच्याविषयीं तीव्र तिरस्कार उत्पन्न होऊन, स्वतःच्या विशिष्ट मतांचा उघड पुरस्कार केलेला नसतांनासुद्धां, लोकमत आपोआप आपल्याला अनुकूल व्हावें. स्विफ्टनें आपल्या ' ड्रेपिअर 'च्या पत्रांत या पद्धतीचा उपयोग इतक्या यशस्वितेनें केला कीं, ब्रिटिश सरकारला आयर्लंडवर लादलेली आपली तांब्याच्या पैंडांची योजना परत घ्यावी लागली. स्विफ्टप्रमाणें परांजपे यांनींहि या पद्धतीचा उपयोग अत्यंत कुशलतेनें करून महाराष्ट्रांत एक नवीन राजकीय पंथ आणि मराठी वाङ्मयांत एक नवी लेखनशैली निर्माण केली. केळकरांची लेखनशैली या तिघांहि लेखकांपेक्षां भिन्न आहे. टिळक, आगरकर किंवा परांजपे यांचें आवाहन मुख्यतः भावनांना असतें. स्वाभिमान उद्दीपित करून टिळकांनीं, भूतदयेला पाझर फोडून आगरकरांनीं; आणि द्वेषभावाला आव्हान देऊन परांजपे यांनीं आपल्या विशिष्ट मतांचा पगडा समाजावर बसविला. उलट केळकरांचें आवाहन बुद्धीला असतें; भावनांना नव्हे. त्यांच्या निरनिराळ्या स्वरूपाच्या लेखांचे जे अनेक संग्रह गेल्या दहा वर्षांत प्रसिद्ध झाले आहेत, त्यांत प्रायः असा एकहि लेख सांपडणार नाहीं कीं, जो वाचून अंतःकरणांत भावनांचे कल्लोळ उठावे. प्रसंग किंवा विषय कितीहि क्षोभकारक असो, बुद्धीचा तोल सुटून ते भावनांच्या ओघांत वहात चालले आहेत, असें चुकूनहि कधीं आढळावयाचें नाहीं. टिळक किंवा परांजपे यांच्याप्रमाणें केळकरहि ऐतिहासिक दाखल्यांचा उपयोग आपल्या लेखांतून करितात. पण तो भावनांना हलवून सोडण्यासाठीं नव्हे; तर आपल्या युक्तिवादाची समर्पकता लोकांच्या मनावर बिंबविण्याकरितां. त्यांच्या उपमा-कल्पना देखील भावनांना उचंबळून सोडीत नाहींत; तर बुद्धीचें विनोदन करितात.

केळकरांच्या लेखनशैलीला हें वळण लागावयाला त्यांच्या स्वभावापेक्षांहि त्यांची परिस्थितिच अधिक कारण झाली असावी, असें वाटतें. कोल्हटकरांप्रमाणें ते जर नुसता लेखनाचा निर्वेध व्यवसायच करिते, तर त्यांच्या वाङ्मयांत बुद्धिवादाला इतका वाव कदाचित् मिळाला नसता. पण, दैवयोगानें 'केसरी'शीं त्यांचा संबंध येऊन, महाराष्ट्रांतील अशा एका पक्षाशीं त्यांचें वाङ्मय-कर्तृत्व निगडित झालें कीं त्याच्या मतांशीं त्यांना समरस होणें पुष्कळदा अशक्य होत असे. राष्ट्रीय पक्षाचें धोरण हें सामाजिक सुधारणेच्या बाबतींत, कोणत्याहि कारणामुळें कां होईना, एकंदरींत प्रतिगामी होतें; व त्या पक्षाचीं इतर पत्रें तर राहोतच, पण ' केसरी '-सुद्धां समाजसुधारणेच्या निरनिराळ्या उपक्रमांना सामान्यतः विरोधच

होत असे. उलट केळकर हे सुधारणावादी होते. आगरकरांइतके कडवे सुधारक ते नाहींत, हें खरें; पण, मनाला पटलेल्या सुधारणेच्या तत्त्वांचा सक्रिय पुरस्कार करण्यांत त्यांनीं अनेक कडव्या सुधारकांनाहि मागें टाकलें आहे. समाजसुधारणेचीं प्रायः सर्वच तत्त्वें त्यांना मनापासून प्रिय. धर्म आणि पूर्वपरंपरा यांचा अवमान न करितां, किंबहुना त्यांच्याशीं शक्य तितकें मिळतें घेऊनच, त्यांचा जास्तींत जास्त पुरस्कार कितीं करितां येईल, एवढयापुरताच काय तो त्यांचा इतर सुधारकांशीं मतभेद. शिवाय ते स्वभावतःच आत्यंतिक (extremist) नाहींत. म्हणजे असें कीं, कोणत्याहि तत्त्वाच्या अंतिम अग्रावर उभें राहून बोलणें हा त्यांचा स्वभाव नव्हे. तशा रीतीनें बोलण्यांत तत्त्वांच्या उदात्तपणाचा किंबहुना स्वतः बोलणाराच्याहि उच्च भूमिकेचा देखावा उत्तम होतो, हें खरें. पण, ज्या बहुजनसमाजाला उद्देशून हें सारें बोलावयाचें असतें, त्याला तें कितीहि आकर्षक वाटलें, तरी अनुकरणीय मात्र वाटत नाहीं. उत्तुंग पर्वतांच्या गुहांतून जसा अंधार, तशा उदात्त तत्त्वांच्या पोटांत नाना प्रकारच्या तर्कश्रुति दडलेल्या असतात; व त्या तत्त्वांचा असमंजस पुरस्कार हा समाजाच्या उन्नतीला पोषक न होतां, उलट अधःपातालाच कारण होतो. या गोष्टीची तीव्र जाणीव असल्यामुळेंच बहुधा, केळकरांनीं स्वतः कधीं कोणत्याच तत्त्वांचा पुरस्कार अविवेकानें केला नाहीं; व ज्यांनीं तो केला, त्यांच्याशीं एका विशिष्ट मर्यादेपलीकडे त्यांचें सहकार्य होऊं शकलें नाहीं. कोणतीहि कल्पना व्यवहार्यतेपासून जितकी दूर, तितकें त्यांना तिचें वावडें. त्यामुळें जहालपणा, मग तो समाजकारणांतील असो किंवा राजकारणांतील असो, त्यांना कधींच फारसा रुचला नाहीं. त्यांची वृत्ति मधुमक्षिकेसारखी आहे. कोणत्याहि विचारांतील सदंश तोच घ्यावयाला ते सदैव उत्सुक असतात. अर्थात् विशिष्ट मताविषयीं किंवा पक्षाविषयीं एकांतिक असा आग्रह त्यांना कधींच राहूं शकला नाहीं. ज्याची अभिरुचि आणि मतें हीं इतकीं आग्रहशून्य, त्यांचें बुद्धिसर्वस्व स्वतःचा पक्ष किंवा समाज याच्यांशीं बुद्धिवाद घालण्यांत खर्च व्हावें, यांत काय आश्चर्य ? ज्या राजकीय पक्षाशीं त्यांचा जन्माचा संबंध आला, त्याचे कांहीं बाबतींतील अतिरेक त्यांना रुचले नाहींत, व जी समाजसुधारणेची चळवळ त्यांना इतकी प्रिय आहे, तिच्या पुरस्कर्त्यांचा अविवेक हाहि त्यांना तितकाच उद्वेगकारक वाटत असे. या कारणांमुळें स्वकीयांच्या मतांतील अयुक्तता त्यांना दाखवून देण्यांत, म्हणजे पर्यायानें त्यांच्याशीं युक्तिवाद करण्यांत, त्यांचें सर्व आयुष्य गेलें. संमतिवयाचें

त्यांच्याइतके बहुविध व्याप प्रायः दुसऱ्या कोणत्याच संपादकानें उत्पन्न केले नसतील.

'केसरी'च्या संपादनाची धुरा त्यांनीं ज्या वेळीं आपल्या शिरावर घेतली, त्या वेळीं त्याची जबाबदारी आणि पसारा इतका मोठा होता कीं, प्रचंड वाळवंटांत जसा नदीचा ओघ जिरून जावा, तशी दुसऱ्या एकाद्या व्यक्तीची कर्तबगारी त्यांतच सर्व वेंचून गेली असती; पण 'केसरी'चें क्षेत्र अपुरें पडल्यासारखें वाटूनच जणूं कांहीं, केळकरांनीं आपल्या कर्तृत्वाचा प्रवाह इतरहि अनेक कार्यक्षेत्रांतून खेळवून, महाराष्ट्राचें राष्ट्रीय जीवन सर्व बाजूंनीं समृद्ध केलें. तीस वर्षांपूर्वी वर्तमानपत्राचा संपादक हा सर्व विषयांचा ज्ञाता आणि सर्व समाजाचा सल्लागार समजला जात असे. जिल्हा-गणिक पत्रें, जातिगणिक पक्ष आणि पक्षगणिक पुढारी यांचें आज पेंव फुट-लेलें असल्यामुळें, संपादकाला तें महत्त्व सांप्रत उरलेलें नाहीं, ही गोष्ट खरी. पण बहुश्रुतता, उद्योगशीलता आणि कोणत्याहि समंजस उपक्रमाला हातभार लावण्याची तत्परता या आपल्या निरुपम आत्मीय गुणांमुळें केळकरांनीं या बदलेल्याहि परिस्थितीला अपवाद उत्पन्न केला आहे. महाराष्ट्रांतील प्रायः सर्व चळवळींचे ते आधार आणि समाजाचे जवळ जवळ सर्व कामांतील ते सल्लागार आहेत. या त्यांच्या लोकोत्तर भूमिकेचा परिणाम त्यांच्या लेखनशैली-वर स्पष्ट झालेला दिसून येतो. ज्याच्या शिरावर सर्व समाजासाठीं विचार करण्याची जबाबदारी असते, त्याला प्रत्येक प्रश्नाचे निरनिराळे पैलू पाडावे लागतात. तत्त्वांतून तपशीलांत शिरावें लागतें आणि स्थूलाबरोबर सूक्ष्माचाहि विवेक करावा लागतो. त्यामुळें त्याला विचारांचे अनेक पर्याय सुचतात व त्याच्या प्रवाही भाषेतून एकाच वेळीं अनेक ध्वनि उमटून त्याच्या लिहिण्याला विलक्षण चौरसपणा येतो. केळकरांच्या वाङ्मयांत हे सारे गुण दृष्टीस पड-तात. त्यांचें कोणतेंहि विधान घ्या. त्याला सूचक विशेषणानें किंवा उपवाक्यानें मुरड घालून, त्याच्या मर्यादा आणि व्याप्ति या दोन्हीहि ध्वनित केलेल्या असतात. कोणतीहि कल्पना सूचित किंवा विशद करितांना उपमा, दृष्टांत विशेषणें, उपवाक्यें किंवा अर्थांतरन्यास यांचा उपयोग ते इतक्या कुशलतेनें करितात कीं, त्यांचें वाक्य वाचल्याबरोबर त्या कल्पनेचीं सारीं अंग-प्रत्यंगें डोळ्यांपुढें उभीं रहातात; इतकी वन्हर्य भाषा लिहिणारा लेखक महाराष्ट्रांत दुसरा क्वचितच सांपडेल. निरनिराळ्या चळवळींचें स्वरूप आणि त्या चाल-विणाऱ्या व्यक्तींचे स्वभाव यांचें विश्लेषण आणि विचिकित्सा, ह्यांच्याविषयीं

बिल, विधवाविवाह, बसूबिल, हीन जातींची उन्नति, पटेल-बिल इत्यादि स्वपक्षीयांना अत्यंत अप्रिय असलेल्या विषयांचा त्यांनीं 'केसरी' तून किंवा व्यक्तिशः केलेला पुरस्कार आणि असहकारितेच्या काळांत त्यांनीं गांधीजींच्या धोरणावर वेळोवेळीं केलेली टीका त्यांच्या या वैशिष्ट्याची निदर्शक म्हणून सांगतां येईल. भिन्न भिन्न विचारसरणींतील गुणांश तेवढा घेऊन त्यांचा समन्वय करावा, अशी त्यांच्या मनाची स्वाभाविक प्रवृत्ति. पण राजकारणांत शिरल्यामुळें एका विशिष्ट पक्षाच्या मतांचें प्रवर्तन करण्याची जबाबदारी त्यांच्या अंगावर पडून, त्यांच्या लेखनशैलीला, केव्हां स्वपक्षाशीं तर केव्हां प्रतिपक्षाशीं घातलेल्या, युक्तिवादाचें स्वरूप आलें. आणि, विशिष्ट मताचा अभिनिवेश असा त्यांच्या ठिकाणीं प्रायः मुळींच नसल्यामुळें, लोकमताचा अनुनय करण्यासाठीं त्यांना युक्तिवादासारख्या, बहुजनसमाजाला आकर्षण करावयाला फारसें सामर्थ्य नसलेल्या, बुद्धिप्रधान साधनाचा अवलंब करावा लागला.

राजकारणांत पडल्यामुळें केळकरांच्या लेखनशैलीस जसें युक्तिवादाचें स्वरूप आलें, तसाच तिला एक प्रकारचा चौरसपणाहि पण आला. फ्रेंच टीकाकार टेन यानें ॲडिसनविषयीं अशा आशयाचे उद्गार काढले आहेत कीं, "त्याच्या मनाला अर्धी अधिक स्फूर्ति राजकारणापासून मिळालेली होती. व्यक्तींना व संस्थांना आश्रय देणें, निरनिराळ्या निधींची व्यवस्था पहाणें, कायद्यावर भाषण करणें, माणसांच्या मनोगताचा ठाव घेणें, लोकमतांतील आगामी परिवर्तनांचा अंदाज करणें, प्रत्यहीं अनेक महत्त्वाच्या प्रश्नांचा निर्णय देणें, इत्यादि निरनिराळीं कामें त्याला लोकांच्या अपेक्षेनुसार, प्रतिपक्षाची नजर स्वतःवर रोंखलेली असतांना, नेहमीं करावीं लागत, त्यामुळें त्यांच्या बुद्धीचा परिपोष झाला आणि लेखनाला चालना मिळाली."* टेनचे हे उद्गार केळकरांनाहि लागू पडतात. गेल्या पन्नास वर्षांत 'केसरी'चे संपादक अनेक होऊन गेले. पण, आपल्या संपादकीय व्यवसायांतून

*...We feel that politics and government have given him half his mind. To exercise patronage, to handle money, to interpret the law, to divine the motives of men, to foresee the changes of public-opinion, to be compelled to judge rightly, quickly, and twenty times a day, on present and great interests, looked after by the public and under the espionage of enemies; all this nourished his reason and sustained his discourses."

त्यांच्याइतके बहुविध व्याप प्रायः दुसऱ्या कोणत्याच संपादकानें उत्पन्न केले नसतील.

'केसरी'च्या संपादनाची धुरा त्यांनीं ज्या वेळीं आपल्या शिरावर घेतली, त्या वेळीं त्याची जबाबदारी आणि पसारा इतका मोठा होता कीं, प्रचंड वाळवंटांत जसा नदीचा ओघ जिरून जावा, तशी दुसऱ्या एकाद्या व्यक्तीची कर्तबगारी त्यांतच सर्व वेंचून गेली असती; पण 'केसरी'चें क्षेत्र अपुरें पडल्यासारखें वाटूनच जणूं कांहीं, केळकरांनीं आपल्या कर्तृत्वाचा प्रवाह इतरहि अनेक कार्यक्षेत्रांतून खेळवून, महाराष्ट्राचें राष्ट्रीय जीवन सर्व बाजूंनीं समृद्ध केलें. तीस वर्षांपूर्वी वर्तमानपत्राचा संपादक हा सर्व विषयांचा ज्ञाता आणि सर्व समाजाचा सल्लागार समजला जात असे. जिल्हा-गणिक पत्रें, जातिगणिक पक्ष आणि पक्षागणिक पुढारी यांचें आज पेंव फुट-लेलें असल्यामुळें, संपादकाला तें महत्त्व सांप्रत उरलेलें नाहीं, ही गोष्ट खरी. पण बहुश्रुतता, उद्योगशीलता आणि कोणत्याहि समंजस उपक्रमाला हातभार लावण्याची तत्परता या आपल्या निरुपम आत्मीय गुणांमुळें केळकरांनीं या बदलेल्याहि परिस्थितीला अपवाद उत्पन्न केला आहे. महाराष्ट्रांतील प्रायः सर्व चळवळींचे ते आधार आणि समाजाचे जवळ जवळ सर्व कामांतील ते सल्लागार आहेत. या त्यांच्या लोकोत्तर भूमिकेचा परिणाम त्यांच्या लेखनशैली-वर स्पष्ट झालेला दिसून येतो. ज्याच्या शिरावर सर्व समाजासाठीं विचार करण्याची जबाबदारी असते, त्याला प्रत्येक प्रश्नाचे निरनिराळे पैलू पाडावे लागतात. तत्त्वांतून तपशीलांत शिरावें लागतें आणि स्थूलाबरोबर सूक्ष्माचाहि विवेक करावा लागतो. त्यामुळें त्याला विचारांचे अनेक पर्याय सुचतात व त्याच्या प्रवाही भाषेंतून एकाच वेळीं अनेक ध्वनि उमटून त्याच्या लिहिण्याला विलक्षण चौरसपणा येतो. केळकरांच्या वाङ्मयांत हे सारे गुण दृष्टीस पड-तात. त्यांचें कोणतेंहि विधान घ्या. त्याला सूचक विशेषणानें किंवा उपवाक्यानें मुरड घालून, त्याच्या मर्यादा आणि व्याप्ति या दोन्हीहि ध्वनित केलेल्या असतात. कोणतीहि कल्पना सूचित किंवा विशद करितांना उपमा, दृष्टांत विशेषणें, उपवाक्यें किंवा अर्थांतरन्यास यांचा उपयोग ते इतक्या कुशलतेनें करितात कीं, त्यांचें वाक्य वाचल्याबरोबर त्या कल्पनेचीं सारीं अंग-प्रत्यंगें डोळ्यांपुढें उभीं रहातात; इतकी वर्ह्य भाषा लिहिणारा लेखक महाराष्ट्रांत दुसरा कचितच सांपडेल. निरनिराळ्या चळवळींचें स्वरूप आणि त्या चाल-विणाऱ्या व्यक्तींचे स्वभाव यांचें विश्लेषण आणि विचिकित्सा, त्यांच्याविषयीं

बहुजनसमाजाच्या मनांत वसत असलेल्या आदराला सहसा धका लागूं न देतां, ते जे इतक्या सहृदयतेनें करितात, त्याचें मर्म झालें तरी तें त्यांच्या या लेखनशैलींतच आढळेल. त्यांचें वाक्य हें स्फटिकाच्या मण्यासारखें असतें. वाचकाच्या बुद्धीचे किरण त्यावर पडले असतां, त्यांतून अनेक ध्वन्यर्थांच्या तेजश्छटा स्फुरण पावून, त्याच्या जिज्ञासु मनाला नवीन प्रकारचा लाभ घडतो.

आणि, केळकरांच्या वाङ्मयांत भावनांची उत्कटता किंवा आवेशाची दीप्ति फारशी नसतांनासुद्धां त्यांना जी इतकी लोकप्रियता लाभली आहे, ती केवळ त्यांच्या या निरुपम लेखनशैलीमुळें. ज्याचें आवाहन केवळ बुद्धीला असतें, असा लेखक सहसा लोकप्रिय होत नाहीं. पण, केळकरांचें लेखन ललित गुणांनीं इतकें मंडित आहे कीं, त्यांचा युक्तिवाद न पटणाराहि मनुष्य त्यांच्या सौष्ठवानें मोहित होऊन जातो. चिपळूणकर आणि आगरकर हे केळकरांचे मराठींतील दोन आवडते लेखक; व या दोघांच्याहि लेखनशैलींतील गुणांश एकवटून त्यांची भाषा निर्माण झाली आहे, असें म्हटलें तर तें क्वचित वावगें होणार नाहीं. किंबहुना आगरकरांच्या नंतर त्यांच्या इतका मार्मिक, सरस, बाबदूक, विनोदी आणि बहुश्रुत संपादक महाराष्ट्रांत केळकरांहून दुसरा झालाच नाहीं. विचारांच्या दृष्टीनें जसें आगरकरांच्या लेखनाला, तसें वाङ्मयाच्या दृष्टीनें केळकरांच्या लेखनाला अतिशय महत्त्व आहे. आगरकरांच्या लेखनांत ओतप्रोत भरलेली स्वतंत्र विचारांची तडफ, तशी केळकरांच्या वाङ्मयांत नाहीं. तसाच त्या तडफेबरोबर येणारा ग्राम्य उच्छृंखळपणाहि पण त्यांत नाहीं. वनराजींतून वहाणाऱ्या ओढ्याचें पाणी कुठें स्फटिकासारखें शुभ्र, तर कुठें झाडांचीं पानें पडून कडवट व कलुषित झालेलें असतें. तसें आगरकरांचें वाङ्मय आहे. लिहिण्याच्या भरांत युक्तायुक्ताचीच काय पण क्वचित अश्लील व ओंगळ यांचीहि खंत त्यांनीं मानलेली नाहीं. उलट, केळकर आवेशाच्या अगदीं भरांत आले, तरीहि त्यांचें विचाराचें अवधान सहसा सुटत नाहीं. ते पक्षाभिमानी असले तरी पक्षैकनिष्ठ नाहींत. स्वतःच्या मतांचा अभिनिवेश त्यांना असला तरी इतरांच्या मतांचा केवळ उपहास करणेंच त्यांना मानवत नाहीं. त्यांच्या आणि चिपळूणकरांच्या लेखनशैलींत जर कुठें फरक असेल, तर तो इथेंच. स्वमतसमर्थनाच्या भरांत चिपळूणकरांनीं अनेक समकालीन व्यक्तींना कळत न कळत अन्याय केला आहे. केळकरांच्या हातून असा प्रकार घडलेला क्वचितच आढळेल. विचारांच्या काय किंवा भाषेच्या काय,

दृष्टीनें त्यांच्याइतकें समृद्ध वाङ्मय महाराष्ट्रांत दुसऱ्या कोणत्याहि लेखकानें निर्माण केलेलें नाहीं. त्यांचा अगदीं सामान्य लेख घेतला, तरी त्यांत सुद्धां विचाराचा एकाद दुसरा सुवर्णकण किंवा भाषेची कांहीं ना कांहीं कलाकुसर ही दृष्टीस पडतेच. किंबहुना, त्यांनीं श्रेष्ठ प्रकारचीं ग्रंथरचना जरी विपुल केलेली असली, तरी त्यांचें खरें लेखनसौष्ठव जर कुठें विविधतेनें प्रत्ययाला येत असेल, तर तें त्यांच्या 'केसरीं'तील लेखांतूनच. कारण, विद्वत्तेचें वैभव दाखविण्यापेक्षां कलेचें सौंदर्य खुलविण्यांतच त्यांचें कौशल्य नेहमीं अधिक दिसून येतें. आणि There is no ne that he did not enliven and make suggestive हे फ्रेंच टीकाकार सेंट ब्यूव्ह यानें मॉंटेन-विषयीं काढलेले उद्गार केळकरांनाहि लागू पडतात, यांत शंका नाहीं.

## ७. केळकर यांच्या वाङ्मयांतील विशेष

( श्री. विठ्ठल हरी कुळकर्णी, एम्. ए., गोरेगांव )

कालीदासाची उपमा, भारवींचें अर्थगौरव व दंडीचें पदलालित्य हे सर्व काव्यगुण माघकवीचे काव्यांत एकत्रित झाले असल्याचें कबूल करूनहि सुभाषितकारानें त्याला कवितेंत शेवटचें स्थान दिलें आहे ! कवितेच्या शेवटच्या चरणांत ढकलून पर्यायानें काव्यदेवीच्या पायाशींच बसण्याची माघाची योग्यता आहे असें सुभाषितकाराला ध्वनित करावयाचें असेल तर त्या कवीचें काव्यांतील गुणाधिक्य त्याला उपकारक होण्याऐवजीं अपकारक झालें आहे असें म्हणावें लागेल. सुदैवानें तात्यासाहेब यांनीं वाङ्मयांत निबंधकार या नात्यानें अपूर्व यश मिळवून ठेविलें आहे म्हणून बरें; नाहींतर माघकवीसारखी त्यांची स्थिति झाली असती. कारण तात्यासाहेबांनीं कविता लिहिली असूनहि ते कवि म्हणून प्रसिद्ध नाहींत, इतिहास-विषयक पुस्तकें लिहूनहि इतिहासकार म्हणून त्यांना कोणी संबोधीत नाहीं, त्यांनीं अर्धा डझनावर नाटकें प्रसिद्ध केलीं असूनहि नामांकित नाटककारांत त्यांची गणना होत नाहीं, व व्याख्यानें देणें हा त्यांचा नेहमींचा व्यवसाय असूनहि धुरीण वक्ता म्हणून त्यांचा बोलबाला नाहींच. मराठींतील उत्कृष्ट प्रबंधकार म्हणून तात्यासाहेबांनीं जर अपूर्व लौकिक मिळविला नसता तर वाङ्मयमंदिराच्या विविध दालनांत पदार्पण करूनहि त्यांत प्रमुख असें स्थान त्यांनीं कोठेंच मिळविलें नाहीं असें म्हणण्याची पाळी आली असती. परंतु वाङ्मयाच्या एका शाखेंत अग्रपूजेचा मान त्यांनीं मिळवून ठेविला असल्यामुळें इतर शाखांतील त्यांचें पदार्पणहि त्यांना भूषणप्रदच झालें आहे. रात्रीला ज्योतिष्मती हें अभिधान प्राप्त होण्याला मुख्यत्वें करून जरी चंद्रमाच कारणीभूत असला तरी तिच्या अंगणांतील नक्षत्रांच्या पसाऱ्यामुळें तिला कमीपणा न येता उलट तिच्या सौंदर्यांत भरच पडत नाहीं काय ?

तात्यासाहेबांच्या एकंदर वाङ्मयाचें समालोचन केलें असतां जी गोष्ट प्रमुखत्वें नजरेस येते ती ही कीं वाङ्मयाच्या विस्तीर्ण क्षेत्रांत तात्यांची बुद्धि चमकली नाहीं असा प्रायः एकहि भाग नाहीं. वीज कडाडून ज्या ठिकाणीं पडते तेथें ती धरणीचा ठावच घेते. परंतु तिच्या कडकडाटानें कर्णरंध्रें बधिर झाल्यामुळें व चकचकाटानें दृष्टि दिपून गेल्यामुळें प्रत्येकाला ती आपल्याच डोक्यावर पडत आहे किंवा काय असा भास होतो. तात्यासाहेबांची बुद्धिमत्ता

विजेप्रमाणेंच तेजाळ व तीव्र असल्यामुळें वाङ्मयाच्या विविध दालनांतील तिच्या कडकडाटानें व तेजानें त्यांतील मुर्धाभिषिक्त राजेहि क्षणभर विस्मित झाल्याखेरीज राहिले नाहींत. वस्तुतः काव्य; इतिहास, नाटक इत्यादि वाङ्मय प्रासादांत तात्यांनीं केवळ हौसेखातर प्रवेश केला. आपल्या सर्वगामी व चवचाल बुद्धीचे चोचले पुरविण्याकरितांच बहुधा त्यांनीं आपली लेखणी या विविध विषयांवर नाचविली. तथापि तात्यासाहेबांच्या वाङ्मयांतील विशेष असा कीं त्यांच्या बुद्धीचा सहज विलासहि कलेच्या विकासाला प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणें कारणीभूत व्हावा. तात्यांनीं फुटकळ कविता बरीच लिहिली असली किंवा इतर कवींच्या काव्यसंग्रहाला प्रस्तावना जोडल्या असल्या आणि कविसंमेलनांचे ते अनेकदां अध्यक्ष झाले असले तरी त्यांना कोणी कवि म्हणणार नाहीं. आपण कवि नसल्याचें खुद्द तात्याहि कबूल करतात ही गोष्ट इतर कविब्रुवांनीं लक्षांत ठेवण्यासारखी असून त्यांनीं अनुकरण करण्यासारखीहि आहे. " काव्याला जें भावनाप्राधान्य लागतें तें माझ्या स्वभावांत नाहीं" असा त्यांनीं स्वतःच कबुलीजबाब दिलेला आहे. त्यांनीं जी थोडी बहुत कविता लिहिली आहे ती केवळ "लहर आली म्हणून किंवा वाङ्मयाच्या क्रीडांगणांतला एक करमणुकीचा खेळ म्हणून. " परंतु मौज अशी कीं तात्यांनीं केवळ करमणुकीखातर म्हणून यमकांची जी जुळवाजुळव केली तिनें काव्यचिकित्सकांप्रमाणेंच अभिजात कवींसहि मोहनी घालण्यास कमी केलें नाहीं ! 'अभिनवकाव्यमाले'च्या पहिल्या भागांत तात्यासाहेब कवि म्हणून 'केशवसुत', टिळक यांच्या खुर्चीला खुर्ची लावून बसलेले आढळतात ! त्यांच्या ' वेषभूषा ' या कवितेनें तर' गोविंदाग्रजा'सारख्या अहंमन्य व बिनमुर्वतखोर कवीलाहि इतकें वेड लाविलें कीं त्यांनीं 'वेषभूषा'कारांस एक पद्यभूषा अर्पण करून आपला त्यांजविषयींचा आदर व्यक्त केला आहे.

तात्यासाहेब स्वतः धंदेवाईक इतिहाससंशोधक नसूनहि त्यांनीं जे इतिहास-विषयक लेख लिहिले आहेत त्यांवरून इतिहास-संशोधनाविषयींची त्यांची जितकी आवड दिसून येते तितकीच त्या कार्याला वाहून घेतलेल्या व्यक्तींबद्दल योग्य ती आदरबुद्धिहि दिसून येते. आपल्याकडील कांहीं इतिहास-संशोधकांमधील दुरभिमान, दुराग्रह आणि दुर्दमनीय मत्सर इत्यादि दुर्गुण जे दिसून येतात ते पाहिले म्हणजे तात्यासाहेबांनीं इतिहास-संशोधनास स्वतःला वाहून घेतलें असतें, तर फार बरें आलें असतें असें वाटतें. कारण स्वकीयाविषयीं योग्य तो अभिमान बाळगूनहि बुद्धीचा तोल ढळूं न देतां

सत्यान्वेषण करण्याची पात्रता त्यांच्या इतकी फारच थोड्या लोकांत आढळेल. ' इतिहास-संशोधन ' या विषयावर १९१४ सालीं तात्यांनीं जो लेख लिहिला आहे त्यांत प्रसिद्ध व प्रमादशील इतिहाससंशोधकांचा तात्यासाहेबांनीं जो प्रोत्साहनपर परामर्श घेतला आहे त्यावरून इतिहासकाराचे ठिकाणीं कोणत्या गुणांची व मनोरचनेची अपेक्षा असते हें त्यांनीं अतिशय मार्मिकपणानें सांगितलें आहे; इतकें कीं, खुद्द त्यांनीं इतिहास कसा लिहिला असता याची वाचकांस अचूक अटकळ व्हावी. परतंत्र राष्ट्र हें स्वातंत्र्याकरितां धडपडणाऱ्या इतर राष्ट्रांच्या इतिहासाकडे केव्हांहि सहानुभूतीनेंच पहाणार. श्री० केळकर यांच्या ' आयर्लंडचा इतिहास ' या पुस्तकाच्या मुळाशीं हीच भावना आहे. हिंदुस्थानाप्रमाणें आयर्लंडचें स्वातंत्र्यहि इंग्रजांनींच हिरावून घेतलें असल्यामुळें आयरिश लोकांच्या स्वराज्याच्या चळवळीचा इतिहास हा स्वातंत्र्यप्रिय महाराष्ट्रीयांना केव्हांहि उद्बोधकच होणार, परंतु आयरिश लोकांच्या स्वभावांत जो रम्य व विनोदगर्भ अद्भुतपणा आहे त्यानेंच तात्यासाहेबांच्या मनाला मोहनी घातली व त्यांना आयर्लंडचा इतिहास लिहिण्यास उद्युक्त केलें असें वाटूं लागतें. वस्तुतः ऑस्ट्रियाच्या जुलमी सत्तेखालीं चिरडून गेलेल्या तरुण इटलीच्या स्वातंत्र्याच्या चळवळीचा इतिहास आयर्लंडच्या इतिहासाहून कांहीं कमी आकर्षक नाहीं. परंतु आयरिश लोकांच्या स्वभावांतील विलक्षणपणा इटालियन लोकांच्या स्वभावांत नसल्यामुळें तात्यासाहेबांनीं त्या राष्ट्राचा इतिहास न लिहितां केवळ त्यांतील प्रमुख अशा दोन व्यक्तींवरच आपली लेखणी चालविली आहे. ' ग्यारिबाल्डी ' याचें स्वतंत्र चरित्र लिहिल्यानंतर त्याचा गुरु माझिनी याचें स्वतंत्र चरित्र लिहिण्याची तितकीशी आवश्यकता नाहीं. कारण त्यांत पुष्कळ पुनरुक्ति होण्याचा संभव होता. तथापि ग्यारिबाल्डीच्या महोत्सवाचा प्रसंग साधून तात्यासाहेबांनीं माझिनीवर एक छोटासाच पण शानदार लेख लिहून एका प्रकारचें औचित्यहि साधलें आहे. ' आयर्लंडचा इतिहास ' हा केवळ परकी लोकांचाच इतिहास, असल्यामुळें त्यांत श्री० केळकर यांच्या संशोधनात्मक चिकित्सक बुद्धीस फारसा वावर मिळाला नाहीं. शिवाय त्या लोकांच्या इतिहासापासून हिंदी लोकांस शिकण्यासारखें पुष्कळ असलें तरी हिंदु लोकांचा स्वाभिमान जागृत होईल असें कांहीं नाहीं. हें कार्य श्री० केळकर यांनीं मराठेशाहीचें प्रथम-शत-सांवत्सरिक याच्यपश्राद्ध म्हणून ' मराठे व इंग्रज ' हें पुस्तक प्रसिद्ध करून उत्तम प्रकारें साधलें. श्री०

केळकर यांचा पेशा इतिहास–संशोधकाचा नाहीं. " वास्तविक पाहतां, प्रस्तुत विषयावरील पुस्तक ज्यानें इतिहासाचा व्यासंग जन्मभर केला आहे अशाच एखाद्या गृहस्थाकडून लिहिलें गेलें असतें तर तें हवें आहे. " असें खुद्द त्यांनींच प्रस्तावनेंत म्हटलें आहे. परंतु असें असतांहि ज्यांनीं जन्मभर इतिहास–संशोधनाचें काम केलें आहे अशा व्यक्तींकडूनहि त्यांनीं शाबासकी मिळवावी हें त्यांस खाचित भूषणावह आहे; व त्याहीपेक्षां या पुस्तकानें त्यांच्या एका निंदानिपुण प्रतिपक्षाला इतकी भुरळ घालावी कीं, त्याला तसें सार्वजनिक रीत्या प्रसिद्ध करावयाचा मोह आवरूं नये हा तात्यासाहेबांच्या बुद्धिमत्तेचा खरा विजय होय !

नामांकित व यशस्वी नाटककार होण्याची महत्त्वाकांक्षा न धरतांहि तात्यांनीं आठ नाटकें लिहावीं हा त्यांच्या कलाविष्काराच्या हौसेचा एक उत्तम मासला आहे. आपण हीं नाटकें 'यशसे' किंवा 'अर्थकृते' लिहिलीं नसून केवळ कलाविलासाकरितांच लिहिलीं असल्याचें खुद्द त्यांनींच कबूल केलें आहे. १९२३ सालीं न्यू पूना कॉलेजांत तात्यासाहेबांनीं " माझीं स्वतःचीं नाटकें " या विषयावर व्याख्यान दिलें होतें. त्यांत ते म्हणतात:—" ज्यांचीं नाटकें रंगभूमीवर केलीं जातात असा नाटककार मी नाहीं. अशा तऱ्हेचा नाटककार होण्यास, अद्‌भुतपणा हा जो एक गुण लागतो, तो मजपाशीं नसल्यामुळें मी होईन असेंहि मला वाटत नाहीं. मीं नाटकाचा अतिशय भोक्ता आहे. हल्लीं जागरणें सोसत नाहींत म्हणून, नाहींतर नाटकें पहाण्याचा नाद मला आहे........मीं एकंदर आठ नाटकें लिहिलीं. पैकीं सहाच नाटकें लोकांच्या स्मरणामध्यें आहेत. पहिलें नाटक 'नवरदेवांची जोडगोळी' हें शेरिडनच्या 'ट्रू रायव्हल्स' ह्या पुस्तकाचें भाषांतर आहे. त्यांत महाराष्ट्रांतील कुणबाऊ भाषा पहाण्यास मिळेल. हें मी एल्एल्. बी. ची परीक्षा झाल्यावर निकाल होण्यास जो वेळ होता त्या वेळांत लिहून काढलें. दुसरें 'सरोजिनी' हें नाटक मीं साताऱ्यास वकिली करण्यास नुकतीच सुरवात केली असतां जें बंगाली शिकलों, तें कसें काय तयार झालें आहे, हें पाहण्याकरितां लिहिलें. आमच्या बंगाली शिक्षकांचें मत तें छापून काढण्यास हरकत नाहीं असें पडल्यामुळें मीं तें पुण्यास आल्यावर १८९५ मध्यें छापून काढलें. नंतर मी १८९५ ते १९१२ पर्यंत कोणतेंच नाटक लिहिलें नाहीं. त्याचें कारण मला तें जनेल असें वाटेना. त्यापुढें मीं जें नाटक लिहिलें तें 'तोतयाचें बंड' हें होय. हें नाटक पुणे

ऐतिहासिक आहे. यांत इतिहासाचा कोठेंहि विपर्यास झालेला नाहीं, असें वासुदेवशास्त्र्यांचें मत आहे. यानंतर 'चंद्रगुप्त' नाटक लिहिलें. ही अद्भुत कथा आहे. यांत इतिहासाचा भाग चंद्रगुप्त व चाणक्य या नांवाखेरीज कोणताहि नाहीं. यानंतर 'कृष्णार्जुनयुद्ध' लिहिलें; ही एक हाय कॉमेडी आहे. याला आधार जरी केवळ हरदासी कथेचा आहे तरी त्याची गणना पौराणिक नाटकांत करण्यास हरकत नाहीं. यापुढें 'अमात्य-माधव' हें लिहिलें. हेंहि एक 'रोमान्स'च आहे. मात्र यांतल्या माधवाचार्यांची कल्पना मला लॉर्ड लिटन्च्या 'रिन्झ्यू' या पात्रावरून सुचली आहे. यानंतर १९१८ सालीं मीं 'वीरविडंबन' हें नाटक लिहिलें. ही एक 'सटायर' आहे. या नाटकाची उभारणी एका रम्य कल्पनेवर आहे. ती कल्पना म्हणजे पांडवांसारख्या कर्दनकाळ योद्ध्यांचें अज्ञातवासांत झालेलें विडंबन होय. यांत माझा कटाक्ष विशेषतः अर्जुनावर आहे. जातीनें पुरुष असून वर्षभर स्त्रीचें सोंग घेऊन राहावयाचें, ही कल्पना रम्य नाहीं काय! माझें शेवटचें नाटक 'संत भानुदास' हें खरें नाटक नसून हा एक गांवगुंडी फार्स आहे. येथें आमच्या नाटकाचें आत्मवृत्त खलास झालें. आतां गुणदोषचर्चा. प्रथमतः मी माझे दोष सांगतों. माझें कोणतेंहि नाटक मी तत्त्वाकरितां लिहिलें नाहीं. केवळ कलेच्या अभ्यासाकरितां लिहिलें आहे. बहुधा कोणतेंहि नाटक तत्त्वाकरितां लिहिलें जात नाहीं. माझ्या पश्चात् 'तोतयाच्या बंडा' वरून एखादा लेखक असें तत्त्व काढील कीं, मीं हें नाटक भवितव्यतेचा प्रभाव दाखविण्याकरितां लिहिलें आहे. परंतु वस्तुस्थिति तशी नाहीं. नानाफडणविसावर संकट आलें होतें हा एकच विचार माझ्या मनांत घोळत होता व त्यांतून तो कसा पार पडला असेल ह्याची कल्पना करतांना मला 'अमले'ची कल्पना सुचली व ती वाढवून मी त्या नाटकाची समाप्ति केली. माझ्या चंद्रगुप्त नाटकाचें कोणी असें तत्त्व काढील कीं, मला चाणक्याच्या द्वारें मनुष्याची अविचारानें केलेली प्रतिज्ञा कशी पुरी होत नाहीं हें दाखवावयाचें होतें; परंतु खरें तसें नाहीं. त्यांत मला केवळ एका विदेशी कल्पनेचें स्वदेशी-करण करावयाचें होतें. कृष्णार्जुनयुद्धामध्यें मला वेदांत-तत्त्व प्रतिपादन करावयाचें नसून केवळ नारदाची कलहप्रियता व गालव-गंधर्वचरित्र वर्णन करावयाचें होतें. तीच स्थिति अमात्यमाधवाची त्यांतहि माझा ज्ञानोत्तर-कर्माचें प्रतिपादन करण्याचा हेतु नसून केवळ कलेचा अभिलाष हाच हेतु होता. तद्वत् 'वीरविडंबना' त मला मोठ्या लोकांवर आपत्ति येतात, हें

सांगावयाचें नसून वेषधारी अर्जुन कसा असेल, ह्या रम्य कल्पनेशीं विलास करावयाचा होता. 'भानुदासा'मध्यें मला संतसामर्थ्य वर्णन करावयाचें नसून गांवगुंडांचें वर्णन करावयाचें होतें. म्हणून माझ्या नाटकांचें निगमनपद्धतीनें निरीक्षण करून मी सांगतों कीं, नाटक तत्वाच्या दृष्टीनें लिहिलें जात नाहीं. निदान मला तरी लिहितां येत नाहीं. माझा दुसरा दोष असा कीं मला भावनेचा किंवा रसाचा अत्युत्कर्ष जो यशस्वी नाटककर्त्याला आवश्यक आहे, तो साधत नाहीं. माझ्यांत कथानकाची गुंतागुंत करण्याचें कौशल्य नाहीं व चवथा दोष असा कीं, मला मात्रेप्रमाणें अचूक लागूं पडणारा विनोद साधत नाहीं. आतां माझे गुण सांगतों. भाषा साधी व सोपी आहे. संविधानकें चित्ताकर्षक आहेत. शृंगार शुद्ध आहे. कोणत्याहि नाटकाचें Back ground उत्तान शृंगाराला पोषक नाहीं. त्यामुळें नाट्य-शास्त्रप्रणेत्या भरत-मुनींचा जो आदेश, नाटक हें पितापुत्र, पतिपत्नी यांना एकाच वेळीं पाहतां यावें तो बरोबर पाळला जातो, व माझ्या मतें या गोष्टीस फार महत्त्व आहे. हा नियम जर सरसकट पाळला गेला, तर नाटकांची सांप्रतची तिरस्कारार्हता बरीच कमी होईल." श्री० केळकर यांनीं नाटकें लिहिलीं तीं केवळ आपल्या उच्छृंखळ व कलाप्रिय बुद्धीचे लाड पुरविण्याकरितां, हें सिद्ध करण्या-करितांच केवळ हा उतारा घेतला नसून त्यांच्या नाटकांच्या अभ्यासकांस तो पुष्कळच उपयोगीं पडण्यासारखा आहे असें वाटल्यावरून घेतला आहे. 'तोतयाचें बंड' हें नाटक तात्यासाहेब केळकर यांनीं आपल्या बुद्धीचा हट्ट पुरविण्याकरितांच जरी लिहिलें तरी त्यानें तात्यासाहेब कोल्हटकर यांना नाट्यशास्त्रावर एक प्रदीर्घ प्रबंध लिहिण्यास प्रवृत्त केलें हा देखील वाचकांचे दृष्टीनें अप्रत्यक्षपणें मोठाच फायदा झाला आहे. सहकारवृक्षावर बसून आम्र-मंजरीच्या रसपानानें मनाला झालेला उत्कट आनंद कोकिळानें कूजन करून प्रकट करावा व त्यामुळें कवीचा चित्तक्षोभ होऊन त्यानें काव्यरचना करण्यास बसावें अशांतलाच हा प्रकार आहे.

हें सर्व सांगण्याचा हेतु एवढाच कीं श्री० केळकर अभिजात कवि, धंदे-वाईक इतिहासकार किंवा एखाद्या नाटकमंडळीनें रिझर्व्हड् किंवा रजिस्टर्ड करून ठेवलेले नामांकित नाटककार नसूनहि वाङ्मयाच्या ह्या प्रत्येक शाखेंतील त्यांची कांहींना कांहीं कृति ही लोकादरास पात्र झालेली आहे; एवढेंच नव्हे, तर तज्ज्ञांसहि मान्य झालेली आहे! श्री० केळकर यांच्या ठायीं असलेल्या बहुश्रुतपणामुळेंच त्यांना ह्या गोष्टी करितां आल्या व म्हणूनच ते एक उत्कृष्ट व मराठी भाषेला

ललामभूत असे निबंधकार होऊं शकले. फारण उत्तम निबंधकार हा स्वतः कवि नसूनहि काव्याचा मर्मज्ञ असावा लागतो, इतिहाससंशोधक नसूनहि ऐतिहासिक दृष्टि त्याला असावी लागते, धंदेवाईक नाटककार नसतांनाहि निदान नाटकें पहाण्याचा तरी त्याला नाद असावा लागतो. ( आतां जागरणें सोसत नसल्यास रात्रीचीं नाटकें वारंवार पहाणें त्याला शक्य होणार नाहीं ही गोष्ट वेगळी. ) शास्त्रज्ञ नसूनहि सर्व शास्त्रांशीं त्याचा परिचय असावा लागतो, स्वतः शोधक नसूनहि सर्व शोधांची त्याला चाळचलाऊ माहिती असावी लागते; थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे तो अष्टपैलू असावा लागतो. नरसोपंतांचे ठिकाणीं बुद्धीचा हा अष्टपैलूपणा असल्यामुळेंच ते इतके उत्तम निबंधकार होऊं शकले. त्यांतूनहि त्यांनीं वर्तमानपत्रकाराचा पेशा पत्करल्यामुळें त्यांच्या बुद्धीचे सर्व पैलू नेहमींच चकचकीत राहण्यास मोठीच मदत झाली. वर्तमानपत्रकार म्हणजे सर्व जगाचा नातेवाईक! तळ्यात अगदीं लहानसा दगडहि कोठें पडला तरी त्यामुळें पाण्याच्या पृष्ठभागावर लहरी उत्पन्न होऊन त्या सर्वत्र पसरतात त्याचप्रमाणें जगांत कोठेंहि जरा आवाज झाला कीं त्याचा प्रतिध्वनि वर्तमानपत्रकर्त्याचे मेंदूत उठला पाहिजे. त्याच्या बुद्धीचीं सर्व द्वारें नेहमीं सताड उघडीं असावयास पाहिजेत. सर्व विषयात त्याची गति अप्रतिहत असली पाहिजे. सर्व वादग्रस्त विषयांवरील त्याचीं मतें सदोदित तयार असलीं पाहिजेत वावदूकपणांत तो तरबेज असला पाहिजे; एवढेंच नव्हे तर गोल्डस्मिथच्या व्यक्तप्रामांतील तात्यापंतोजीप्रमाणें स्वतः वादांत हरूनहि प्रतिपक्षीच चीत झाला आहे असें समजून अधिक आवेशानें वादविवाद पुढें चालू ठेवण्याची त्याचे अंगांत धमक असावी लागते; कोणत्याहि मुद्दयावर निर्णय देतांना न्यायाधीशाची ऐट त्याला आणतां आली पाहिजे; अमुक एक गोष्ट आपणाला अगम्य आहे असें त्यानें भासूं देता कामा नये; कोणत्याहि गहन विषयावरील पुस्तकांवर देखील तत्काळ पाहिजे तेवढा लाखोंचक अभिप्राय देण्याची आपली लायकी असल्याचा आव त्याला आणता आला पाहिजे. डिकन्सच्या कादंबरींतील एका विद्वत्ताशून्य लक्ष्मीपुत्रानें ( हा पार्लमेंटचा एक सभासद होता ) आपला प्रायव्हेट सेक्रेटरी किती बहुश्रुत असला पाहिजे याचें जें दिग्दर्शन केलें आहे तें थोडा फरक करून वर्तमानपत्राच्या धंद्यांत शिरणाऱ्या लेखकालाहि लागू होण्यासारखें आहे.

तात्यासाहेब वर्तमानपत्राचे संपादक झाल्यामुळें बहुश्रुत बनले असें म्हणण्यापेक्षां ते बहुश्रुत असल्यामुळें यशस्वी संपादक झाले असें म्हणणें सत्यास

अधिक धरून होईल. त्या धंद्यांत शिरल्यामुळे त्यांच्या बहुश्रुतपणास अधिक वाव मिळाला ही गोष्ट मात्र खोटी नाहीं. तात्यासाहेबांच्या विद्वत्तेविषयीं विद्वानांचेंहि दुमत होईल असें वाटत नाहीं. " गद्य विद्वत्तेचें सोंग " अशी तात्यासाहेबांनीं स्वतःच गद्याची व्याख्या अगदीं अलीकडेच केली आहे. ही व्याख्या बरोबर असो वा नसो, त्यांत आपण गद्यलेखक या नात्यानें विद्वान् नसून केवळ विद्वत्तेचा आव आणीत असतों असें त्यांत त्यांनीं जें ध्वनित केलें आहे तें मात्र तितकेंसें खरें नाहीं. क्षणभर तात्यांचें म्हणणें खरें धरून चाललें तरी विद्वत्तेचें सोंग आणणें ही गोष्ट देखील सोपी नाहीं. पैशाप्रमाणेंच विद्वत्तेचें सोंग फार दिवसपर्यंत टिकवितां येत नाहीं; आणि तात्या तर आज सुमारें पंचवीस तीस वर्षें हें विद्वत्तेचें सोंग घेऊन महाराष्ट्राचे रंगभूमीवर वावरत आहेत; तेव्हां त्यांचें हें सोंग खरें नसून सोंगाचें केवळ ढोंग आहे असेंच मानावें लागतें. सुप्रसिद्ध नट गॅरिक याच्या अभिनयाचें वर्णन करतांना गोल्ड्स्मिथ म्हणतोः—

On the stage he was natural, simple, affecting;
'Twas only that, when he was off he was acting.'

रंगभूमीवरील गॅरिकप्रमाणेंच तात्यांचें सरस्वतीच्या विलासमंदिरांतील सोंग इतकें स्वाभाविक आहे कीं, तें सोंगच नव्हे. एखाद्यानें विद्वत्तेचा दिमाख दाखविला म्हणजे तो विद्वान् नाहीं असें सिद्ध होत नाहीं. मोर जेव्हां आपला पिसारा पसरून नाचूं लागतो तेव्हां तो आपल्या सौंदर्याचा दिमाखच दाखवीत नाहीं काय? पण म्हणून त्याचे ठिकाणीं सौंदर्य नाहीं असें कोण म्हणूं शकेल? तात्यासाहेबांची विद्वता ही मोराच्या पिसाऱ्याप्रमाणें आहे. ती अंगांत पूर्णपणें बाणलेली असल्यामुळें मोराप्रमाणेंच तिचा पसारा ते आपल्याबरोबर वाटेल तिकडे नेऊं शकतात व वेळ येतांच त्याचा फुलोरा उभा करावयास त्यांस बिलकूल अडचण पडत नाहीं. सूर्याला आपली प्रभा बरोबर घेतल्याखेरीज जसें प्रकाशतां येत नाहीं, त्याचप्रमाणें तात्यासाहेबांस आपली विद्वत्ता विसरून बोलतां अगर लिहितां येत नाहीं. आपल्या ज्ञानाचा हुकमी उपयोग करून घेतां येणें ही एक कला आहे; व ती हस्तगत करून घेणें सोपें नाहीं. पुष्कळ लोक विद्वान् असतात. परंतु त्यांतील बहुतेक आपली विद्वत्ता ठेवणीच्या कपड्यांप्रमाणें घरीं पुस्तकांचे कपाटांतच ठेवून जगांत वावरत असतात. त्यांची विद्वत्ता क्वचित् सणावारींच बाहेर पडावयाची. अशा लोकांना आपली विद्वत्ता नेहमीं आपल्या बरोबर फिरविणें जड जातें.

याचें कारण त्यांच्या बुद्धीस ती पेलत नाहीं हेंच होय. त्यांची विद्वत्ता ही त्यांची अर्धांगी होय. ही सौंदर्य-संपन्न नसते असें नाहीं; एवढेंच नव्हे तर ती पतिव्रताहि असते. परंतु ती बहुप्रसू नसूनहि तिला आपल्याबरोबर सदोदित मिरवीत नेणें त्यांना झेंपत नाहीं, निदान त्रासाचें वाटतें खास! कदाचित् वायु व सूर्य यांनाहि आपल्या विद्वत्तेचें दर्शन होऊं न देणें हें ते तिच्या पातिव्रत्याचें लक्षण समजत असतील! तात्यांची विद्वत्ता सर्वांगीण असल्यामुळे तिला त्यांच्या अर्धांगीची उपमा देतां येत नाहीं. अर्धनारीनटेश्वराची उपमा दिल्यास त्यांच्या विद्वत्तेचें विडंबन केल्यासारखें होईल. म्हणून कालिदासानें रघुवंशाच्या आरंभीं म्हटल्याप्रमाणें वाक् आणि अर्थ यांच्याप्रमाणें अभेद्य साहचर्य असणाऱ्या पार्वतीपरमेश्वराचीच उपमा त्यांना अधिक शोभेल. तात्यासाहेबांच्या वाङ्मयांतील झटकन् नजरेंत भरणारा विशेष म्हणजे जसा त्यांचा बहुश्रुतपणा तसा त्यांच्या विद्वत्तेचा विशेष म्हणजे त्यांतील डौल होय.

खऱ्या स्त्रीचें सौंदर्य केवळ तिच्या अवयवांच्या रेखीवपणावर अवलंबून असत नाहीं; तर तिच्या गतींतील मंदत्व, स्मितांतील मुग्धत्व आणि बोलण्यांतील स्निग्धत्व इत्यादि हावभावांमुळेंच त्या सौंदर्याला आकर्षकपणा प्राप्त होतो. तात्यांच्या विद्वत्तेंत जो डौलदारपणा आहे त्यामुळेंच ती इतकी विलोभनीय झाली आहे. सर्वसाधारणपणें विद्वत्ता आणि बोजडपणा यांचेंच साहचर्य विशेषेंकरून आढळून येतें. विद्वत्तेला नीरसपणाची जोड दिल्याशिवाय ती लोकादरास पात्र होणार नाहीं, अशी कित्येक विद्वानांची समजूत असते. परंतु तात्यासाहेबांच्या विद्वत्तेंत हा दोष बिलकूल दिसून येत नाहीं. विद्वत्तेच्या ओझ्याखालीं वांकून गेल्यामुळें दुर्मुखलेला चेहरा करून आपल्याप्रमाणेंच इतरांच्या डोक्यासहि शीण येईल असेंच पुष्कळ विद्वानांचें लिखाण अगर व्याख्यान असतें. परंतु मस्तकावर पृथ्वीचें ओझेंहि मोठया डौलानें धारण करणाऱ्या शेषाप्रमाणें तात्यासाहेब आपली विद्वत्ता अगदीं लीलेनें मिरवीत असतात. किंबहुना गर्वानें फुगून आवेशानें भूतलावर उडी घेणाऱ्या गंगेला शंकरानें जितक्या लीलेनें आपल्या जटाजूटांत झेलून अखिल मानवजातीला पुनीत केलें, तितक्याच सौकर्यानें तात्यासाहेबांनीं विद्वत्तेला आत्मसात् केलें आहे. त्यामुळें तिच्यांत अवगाहन करणें सर्वसाधारण मनुष्याला सुलभ जातें; एवढेंच नव्हे तर तिच्या मंदलहरी मनांत आनंदाच्या ऊर्मि उत्पन्न करतात. सर्कशींतील फसलेला घेऊन अगदी टोकावर जोगेतहि जरी आपलें

"या प्रसंगीं अध्यक्षस्थानीं बसण्याचा बहुमान आपण मला दिला, पण त्याबरोबर मजवर एक मोठा उपकारहि केला आहे. आणि त्या मानांत गर्क होऊन राहण्यापेक्षां त्या उपकाराची जाणीव माझ्या मनांत या क्षणीं प्रभावी होऊन राहिली आहे. तो उपकार हा कीं, ही सुप्रसिद्ध नगरी पहाण्याची इच्छा पुष्कळ दिवस मनांत असतांहि दुर्दैवानें आजवर ती कृतीनें सफळ झाली नव्हती, ती आपल्या या आमंत्रणानें सहजासहजीं सफळ झाली.... कोणत्याहि वस्तूच्या कल्पनेपेक्षां तिचें प्रत्यक्ष दर्शन हें केव्हांहि कमी सरस ठरतें असें म्हणतात. माझ्याहि मतें हा सिद्धान्त पुष्कळसा खरा आहे. पण आज या ठिकाणीं मला जुनी भोजविक्रमादिकांची अवंती पहावयास सांपडेल ही खोटी आशा मनांत धरून मी आलोंच नाहीं. तर केवळ अवंतीविषयक माझ्या कल्पनांना आधारभूत अशा प्राचीन वास्तुदेवतेचें दर्शन घेण्याकरितांच मी आलों आहें....आणि उज्जयिनी नगराचें जुनें 'अवंति' हें नांव उच्चारतांच अद्भुतरम्य अशा भावनांच्या गुंफेमध्यें किंवा भुलभुलाईमध्यें प्रवेश करणारें कोणाचेंहि मन त्यांतून बाहेर पडूं इच्छीतच नाहीं........ याचें कारण हेंच कीं, या परिभ्रमणामध्यें त्याला जुन्या वैभवाचे अनेक उदात्त देखावे दिसतात. स्कंदपुराणांत या नगरीला 'प्रतिकल्पा' हें नांव दिलें आहे तें सार्थ आहे...याच नगरींत श्रीकृष्णानें शिष्याची विनयवृत्ति ठेवून सांदीपनीच्या गुरुगृहीं विद्या संपादन केली, व गुरुपत्नीला तिच्या मृतपुत्राची भेट करून देण्याची अलौकिक गुरुदक्षिणा दिली! याच नगरींत प्रद्योत, शूद्रक, भर्तृहरि, विक्रमादित्य, भोज इत्यादि राजांनीं वैभवपूर्ण राज्यें उपभोगिलीं. यौगंधरायणासारखा महान कर्ता मुत्सद्दी येथेंच झाला. स्वप्नवासवदत्ता, प्रतिज्ञायौगंधरायण या भासकवीच्या नाटकांतील कथांचा संबंध अवंती नगरीशींच जोडला जातो. वसंतसेनेसारखी निःस्वार्थी गणिका व चारुदत्तासारखा दानशूर व अभिजात संभावित प्रणयी ही जोडी याच नगरींत होऊन गेली. गायनवादनकलेंत निष्णात असे राजे म्हणजे उदयन व बाज बहादूर आणि त्यांच्या गायनमोहित प्रियकरणी वासवदत्ता व रूपमती यांचा संबंध दुरून किंवा जवळून या नगरीशींच पोहोंचतो. प्राचीन कालिदासापासून आधुनिक वासुदेवशास्त्री खऱ्यांपर्यंत दोन हजार वर्षांतील कवींना या नगरीच्या वैभवसौंदर्यानें जितकें मोहित केलें आहे तितकें दुसऱ्या एखाद्या नगरानें क्वचितच केलें असेल. आधुनिक काळांत उंची प्रतीच्या व्यापारी वस्तूंची देवघेव व प्रसिद्धि परदेशापर्यंत याच नगरींतील शकवंशीय राजांच्या

राज्यांत झाली. ज्योतिषशास्त्राच्या संशोधनाचें एक मोठें केंद्र याच नगरींत प्राचीन काळापासून असून हल्लींच्या ग्रीनविचप्रमाणें रेखांशांचें उगमस्थान भरतखंडभर मानलें जाण्याचा मान याच नगरीला मिळाला. आणि बुद्धा-नंतरच्या काळांत आद्य श्रीशंकराचार्यांनीं याच नगरींत पाशुपतमतसांप्रदायी योद्ध्यांशीं वाद करून सभायुद्धांत विजय मिळवून वैदिकधर्मप्रस्थापनेचें एक कार्य केलें. अलीकडील इतिहासांत अवंतीचें–म्हणजे उज्जयिनीचें कोणतें स्थान होतें किंवा आहे या रुक्ष विषयांत मीं शिरत नाहीं. तथापि मराठ्यांनीं स्वातंत्र्य मिळविल्यानंतर जो उत्तरेकडे राज्यविस्तार केला त्याला माळवा प्रांत व उज्जयिनी शहर यांचें बरेंच साहाय्य झालेलें आहे."

भाषणाच्या सुरवातीला केवळ उज्जयिनी शहरावर तात्यासाहेबांनीं जर एवढी विद्वत्ता खर्च केली तर पुढें कविसंमेलनाचे अध्यक्ष या नात्यानें काव्या-वर बोलतांना उपयोगांत आणावी लागणारी विद्वत्ता ते आणणार कोठून, असें उज्जयिनीशहराच्या प्राचीन वैभवाचें व्युत्पन्न वर्णन ज्याच्या बुद्धीस पचणार नाहीं तोच म्हणेल. पण इतरांस त्याचें कौतुक वाटलें तरी नवल वाटणार नाहीं. कारण तात्यांच्या विलासप्रिय विद्वत्तेचा हा ढंग नवीनच आहे असें नाहीं. त्यांच्या विद्वत्तेची विलासप्रियता आणि तिचा नखरा हा त्यांच्या वाचक-वर्गास पूर्वीपासूनच परिचित असणार.

तात्यासाहेबांची भाषाशैली जी इतकी सुसंस्कृत आणि व्युत्पन्न (Classic) आहे त्याचें कारण हेंच. सतारीची एक तार छेडली असतां जवळच्या तिच्या इतर सर्व तारा सहसंवेदनेनें कंपित होऊन सुराला सूर देतात; त्याचप्रमाणें एकाद्या कल्पनेनें तात्यांच्या बुद्धीची एक तार छेडली गेली, कीं मग त्यांच्या बुद्धींतून उपमा–दृष्टांतांचा नुसता पाऊस पडूं लागतो. भांडणांत किंवा वाद-विवादांत शब्दानें शब्द वाढतो याचें कारण एकानें विशिष्ट अर्थानें वापरलेला शब्द दुसऱ्याचे बुद्धींत निराळीच भावना उत्पन्न करतो हें होय. परंतु तात्यां-च्या लेखनांतहि शब्दानें शब्द वाढतो कारण तात्यांची बुद्धि पराकाष्ठेची सहसंवेदनशील आहे हें होय. त्यांची बुद्धि जितकी विशाल आहे तितकीच सूक्ष्म आहे; जितकी तीव्र आहे तितकीच तरलहि आहे. यामुळेंच अगदीं प्राचीन व मृतवत् अशा संस्कृत वाङ्मयापासून तों इंग्रजी आदिकरून आधु-निक जिवंत भाषांतील वाङ्मयाचें आलोचन त्यांना विद्युद्वेगानें करतां येतें. उमाजी नाइकाचें नांव घेतांच रॉबिनहूडप्रभृति सर्व पाश्चात्य दरोडे-खोरांची मालिका त्यांच्या मनश्चक्षूंपुढें उभी राहते; माझिनी व ग्यारिबाल्डी

या गुरुशिष्यांचें वर्णन करतांना रामदास व शिवाजी या जोडीची त्यांस आठवण होते. मराठींतील पोवाडा हा शब्द उच्चारतांच तात्यांची बुद्धि इंग्रजींतील Ballads कडे गेलीच असें समजावें. ते इकडील शंकराचार्यांवर लिहूं लागले कीं, युरोपांतील पोपमहाराजांना आमंत्रण गेलेंच असेल अशी कल्पना करण्यास हरकत नाहीं. ग्रीक पुराणांतील Proteus बरोबर आपल्या पुराणांतील शंभासुर अवतरलाच असें खुशाल समजावें. मोरोपंतांच्या यमकलोलुपतेची चर्चा करतांना सॅम्युअल बटलर या चट्टेखोर इंग्रज कवीची One line for rhyme and one for sense ही ओळ त्यांस आठवली नाहीं तरच नवल. खाडिलकरकृत 'बायकांचें बंडा' वर टीका करतांना इंग्लंडमधील Mrs. Pankhurst नें चालविलेल्या स्त्रीस्वातंत्र्याच्या चळवळीचा उल्लेख करण्यास ते कधीं विसरणार नाहींत. यांच्या 'अर्थशास्त्राचीं मूलतत्त्वें' या पुस्तकाचें परीक्षण करतांना 'अर्थशास्त्र आणि वेदांत' असा त्यांनीं आपल्या लेखाला मथळा द्यावा हें त्यांच्या बुद्धिचापल्याला अनुसरूनच झालें. 'भविष्यकथन' असें शीर्षक असलेला तात्यांचा लेख पाहिला म्हणजे जगाच्या इतिहासांतलीं भूतकालचीं सर्व भविष्यें आपणांस आतां वाचावयास मिळतील असें भविष्य वाचकानें केल्यास तें खोटें ठरण्याचा बिलकूल संभव नाहीं. आणि खरोखरच त्या लेखांत रामचरित्र कलंकीपुराण, गर्गसंहिता, भविष्यपुराण, रासमाला इत्यादिकांबरोबर ज्यांत भविष्यकथांचा संबंध आला आहे अशीं ख्रिस्ताचें भविष्य, ज्यूलोकांचा 'मेसाया,' टेनिसनचें 'Akbar's dream' हें काव्य, व्हर्जिलचें 'इलिअड काव्य' व सेनेकाचें नाटक इत्यादि घटसारीं, ज्योतिष्याच्या कुंडलींत आकाशांतील ग्रहोपग्रह जितक्या तत्परतेनें बसतात तितक्याच तत्परतेनें तात्यांचे लेखांत बसलेलीं आढळतील! 'हिंदी दिवाळखोरीची खोटी व खरी मीमांसा' केल्यानंतर 'विलायती दिवाळखोरीचे मासले' वाचकांस सादर करण्याचा तात्यांस मोह झाल्यास त्यांत आश्चर्य तें कसलें! दिल्लीदरबारावर लेख लिहितांना हस्तिनापुरांतील पुरुवंशीय राजांपासून तों तहत पंचम जॉर्ज बादशहापर्यंत पसरलेल्या काळांतील ऐतिहासिक चित्रपट फाडून वाचकांस सादर करणें हें फक्त तात्यांच्या विद्वत्तेस व कल्पकतेस साजेसें आहे. तात्यांच्या बुद्धीचा हा विशेष लक्षांत घेतला म्हणजे बडोदें येथें भरलेल्या दहाव्या साहित्यसंमेलनप्रसंगीं अध्यक्षस्थानावरून भाषण करतांना त्यांनीं वाङ्मयाची व्याख्या "एखादी सविकल्प समाधि उत्पन्न करूं शकतें तें वाङ्मय" अशीच कां

केली याचा बरोबर उलगडा होतो. किंबहुना या व्याख्येचें त्यांनीं जें स्पष्टीकरण केलें आहे त्यांत त्यांनीं आपल्या बुद्धीचेंहि पृथक्करण केलें आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. (उतारे भाग २ पृ. ६८). या उताऱ्यांत तात्यासाहेबांनीं अभिजात वाङ्मयाचें जें वर्णन केलें आहे तें समर्पक आहे किंवा नाहीं हें साहित्यशास्त्रकोविदांनीं ठरवावें. परंतु खुद्द त्यांनीं स्वतः निर्माण केलेलें वाङ्मय निःसंशय त्यांच्या व्याख्येला अनुसरून आहे हें कोणालाहि कबूल करावें लागेल.

तात्यासाहेबांची भाषाशैली वर वर्णन केल्याप्रमाणें सुसंस्कृत व व्युत्पन्न असूनहि तिच्यांत एक प्रकारचा साधेपणा भासतो, हा तिच्यांतील आणखी एक विशेष होय. वर्तमानपत्रें हीं बहुजनसमाजाकरितां असल्यामुळें त्यांतील भाषा सुगम व सुबोधच पाहिजे हें खरें; व तात्यासाहेबांचे संपादकीय लेख सर्वसामान्य वाचकांचे मेंदूला विशेषसा शीण देणार नाहींत असेच आहेत हें कांहीं खोटें नाहीं. तथापि वर्तमानपत्राव्यतिरिक्त तात्यांनीं जे लेख किंवा पुस्तकें लिहिलीं आहेत त्यांतील भाषाहि सुगम आणि सुबोध अशीच आहे. तात्यासाहेबांची विद्वत्ता लक्षांत घेतां या सुगमतेबद्दल विस्मयच वाटतो. कारण ज्याचें बुद्धीस सहजासहजीं आकलन होत नाहीं तें विद्वत्ताप्रचुर अशीच बहुतेकांची समजूत असते. परंतु ज्याला आपले विद्वत्तापूर्ण विचार दुसऱ्याला रुचतील व पचतील अशा पद्धतीनें मांडतां येतात तीच खरी विद्वत्ता. सहजसुंदर व सोपी पण अलंकारिक अशी भाषा लिहितां येणें हें भाषाप्रभुत्वाचें प्रमुख लक्षण होय. हॅझ्लिट् ( Hazlitt ) ह्या इंग्रज निबंधकारानें घरगुती भाषासरणीविषयीं प्रदर्शित केलेले विचार येथें लक्षांत घेण्याजोगे आहेत.

साधी व सोपी भाषा लिहिण्याला भाषाप्रभुत्वच आवश्यक असतें असें सदरं लेखकाचेंहि मत असल्याचें आढळून येतें. तात्यांच्या भाषणांतील आणि लेखनांतील फरक झटकन लक्षांत येत नाहीं तो यामुळें. तात्यांच्या भाषासरणीचा विशेष असा कीं, ती अलंकृत असूनहि सुबोध भासते. दागिन्यांनीं आपलें सर्व शरीर मढवून आपलें सौंदर्य वाढविण्याचा प्रयत्न करणें हें ग्रामीण अभिरुचीचें द्योतक आहे. याचे उलट नागरसंस्कृतीची सौंदर्यसंपन्न युवति एखादा दुसऱ्याच पण भारी किंमतीच्या दागिन्यानें आपल्या सौंदर्याला खुलावट आणून पुन्हा साधेपणाचाहि डौल मिरविते. तात्यासाहेबांचे भाषापद्धतींत हाच गुण आहे. अगदीं तात्त्विक व रुक्ष विषयहि

ते उपमा-दृष्टांतांनी असा कांहीं सरस व सुबोध करून सोडतात कीं, प्रतिपाद्य विषयच अगदीं सोपा आहे अशी वाचक आपली फसवणूक करून घेतो. 'संस्कृत विद्येचें पुनरुज्जीवन' या अत्यंत विद्वत्ताप्रचुर व माहितीनें भरलेल्या लेखांत तात्यासाहेब म्हणतात:—" जुने पंडित हे खरोखरच चालते बोलते ग्रंथ असत. त्यांचें विषयनिष्णातत्व व पाठांतर हीं पाहून अलीकडच्या काळांतील मनुष्य थक्कच होऊन जावयाचा! पण या एकांगी शिक्षणामुळें जुन्या पंडितांच्या बुद्धीस एककल्लीपणा येत असे. व्यवहारचातुर्य अंगीं नसल्यामुळें त्यांचा क्वचित् पट्टाहि होई. समाजांतील अष्टपैलू व्यवहारांत शहाणपणाच्या चलनी नाण्याचा मोड पुष्कळशा लागतो; तेथें चवलपावलीच काय पण पैसा, पै व कवडयाहि लागावयाच्या. जसा पदार्थ भेटेल तसा योग्यतेप्रमाणें दुकानदाराच्या अंगावर टाकावयाला लागतें. जुन्या एकदेशीय पंडितांच्या पदरीं शहाणपणा पुष्कळ असे खरें, पण तें सगळें मोहरापुतळया किंवा बंदे रुपये यांच्या रूपानें; त्यांच्या जवळ परचुरण नाहीं; आणि दुकानदारास तर त्यांची मोहोर घेऊन खपायची नाहीं व पचायची नाहीं. यामुळें पदरीं द्रव्य व व्यवहाराच्या बाजारांत पदार्थ मांडलेले असतां भाजीहि घेतल्याशिवाय हात हालवीत परत यावें लागणार! बरें, भाजी मिळालीच तर अंगापासून केव्हांहि दूर न होणाऱ्या जरीकांठी शालजोडीच्या पदरांत बांधून शास्त्रीबुवा ती घरीं आणणार!"

तात्यासाहेबांजवळ जुन्या पंडिताच्या पदरीं असलेला शहाणपणा तर भरपूर आहेच, पण तो केवळ मोहोरापुतळया किंवा बंदे रुपयांचा नसून किरकोळ नाण्यांचाहि आहे. भारी किंमतीचा पदार्थ घेणें असल्यास त्यांजवळ जशी मोहोर आहे, त्याचप्रमाणें स्वल्प किंमतीचे पदार्थ घेण्यास त्यांजवळ फुटकळ कवडयाहि पुष्कळ आहेत. जुन्या पंडिताप्रमाणें तात्यांच्या अंगावरहि विद्वत्तेची जरीकांठी शालजोडी आढळणार नाहीं असें नाहीं; पण त्यांस ती वाटेल तेव्हां अंगापासून दूर करतां येते, एवढेंच नाहीं तर क्वचित् प्रसंगीं दुसऱ्याचे अंगावरहि फेकतां येते! तात्यासाहेबांचे ठिकाणीं विद्वत्ता व विद्वत्तेचा नखरा असूनहि त्यांची भाषा बोजड न वाटतां सुबोध व सोपी वाटते यांतच त्यांची खरी कुसरी आहे! सिंधु किंवा ब्रह्मपुत्रा यांसारख्या नद्या आपल्या ध्येयाच्या आड पर्वतप्राय अडचणी आल्या असतांहि त्यांची पर्वा न करितां हिमालयाचाहि भेद करून त्यांतून आपला मार्ग शोधून काढतात. पण म्हणून त्यांच्या कांठाकांठानें प्रवास करून

येणारा प्रवासी आपणच हिमालयाचा भेद केला अशी प्रौढी मारूं लागला तर तें त्याला शोभेल का ? तात्यासाहेबांचें वाङ्मय हें एखाद्या मोठ्या नदीप्रमाणें आहे. त्यांत उगमस्थानीं क्वचित् कोठें खळखळाट असला तरी सरसकट उथळपणाचा आरोप तिजवर करतां येणार नाहीं. कारण तिजमध्यें अनेक ठिकाणीं अतिशय खोल असे डोह आहेत. ढोपरभर पाणी पाहून कांहीं पोरें त्यामध्यें पोहावयास शिकलीं म्हणून त्या नदीचे मुखाजवळ तीं पोहूं शकतीलच असें नाहीं. तिच्यामध्ये कित्येक स्थळीं धबधबे आहेत त्याप्रमाणें कोठें कोठें भोंवरेहि आहेत. तथापि इतकें असूनहि खवळलेल्या समुद्राप्रमाणें त्यांत कोठेंहि तुफान दिसावयाचें नाहीं. अत्यंत रमणीय अशा सरोवरासारखीं दृश्यें त्यांत अनेक ठिकाणीं आढळतील.

तात्यांचे उपमादृष्टान्तहि अगदीं व्यवहारांतले असल्यामुळें वाङ्मयाशीं ज्याची सलगी विशेषशी नाहीं अशा संसाराशीं तद्रूप झालेल्या गृहस्थाश्रमी मनुष्यासहि गुंदगुल्या होऊन लेखकाविषयीं त्याचे मनांत आपलेपणा वाटावा. कित्येक वेळां तर त्यांच्या उपमा इतक्या घरगुती असतात कीं त्या वाचतांच आपण दिवाणखान्यांतून एकदम स्वयंपाकघरांत आलों कीं काय असा भ्रम उत्पन्न होतो ! " गव्हर्नरसाहेबांची भेट म्हणजे मोठ्या खर्चाचें काम ! शरीरानेंहि राबावें लागतें ! इतकेंहि करून त्यांच्या मर्जीचा पापड कोठें वांकडा होईल ही धास्ती." "सवतीचें मूल रात्रभर थंडीवाऱ्यांत उघडें पडावें, पण आपल्या जोरदार रक्ताच्या उबेच्या बळावर झोंप काढून त्यानें जागें व्हावें, आणि मग केवळ दिखाऊपणाच्या मायेनें 'माईसाहेबां'नीं त्याच्या अंगावर आपल्या अंगावरची चौघडी घालावी. मवाळांनीं बहिष्काराला आश्रय दिला तो अशा प्रकारें !" " दुधाच्या हंडयांत मोरचुताचा कण," " करनकऱ्याचा वसा ", " निसरगांठ देणें, " " सातांसमुद्रापलीकडे, " पी हळद गोरी " " खापरानें मडक्याला काळें म्हणण्यांत अर्थ नाहीं " इत्यादि वाक्यें, शब्दप्रयोग किंवा म्हणी कानावर पडल्या तर माजघरांत नातवाला थोपटीत असलेल्या आजीबाईंना देखील कान टवकारून ऐकण्याचा मोह पडावयाचा ! " हे कोण आले ? बादशहांचे काका ! " या लेखांत ड्यूक ऑफ कनॉट यांच्या स्वागतसमारंभाचें वर्णन तात्यासाहेबांनी पुढीलप्रमाणें केलें आहेः—" ड्यूकसाहेब आज मद्रासेस काय किंवा उद्यां इतर ठिकाणीं काय हिंडतील, फिरतील तेव्हां मारून मुटकून होणाऱ्या समारंभाचें त्रिवर्णचित्र आम्हांला डोळ्यांपुढें दिसत आहे. .... सरकारजवळ पैसा, मनुष्यबळ व सत्ता हवी

तितकी असल्यामुळें, त्यांना एखादें बंदर, शहर किंवा रस्ता शृंगारणें हें मोठेसें कठीण नाहीं. पण लोकांनीं खऱ्या प्रेमानें केलेल्या स्वागतसमारंभाची गोष्ट कांहीं वेगळीच आहे. पैसा खर्चून सरकारला विजेचे वाटेल तितके दिवे लावतां येतील, पण पाहुण्याला पाहून प्रेमकुतूहलानें स्त्रीपुरुषांचे ओंठ फुटून गेल्यामुळें आंतून झळकणाऱ्या शुभ्र दंतपंक्तींच्या चिराखदानाची शोभा हजारों विजेच्या दिव्यांनींहि येणार नाहीं. यूनियन जॅकचीं निशाणें पैशाला पांसरीभर मिळूं शकतात, व तोरणें लावण्याकरितां ओरबाडण्यास लागणाऱ्या वृक्षपल्लवांचीहि वाण या देशांत नाहीं. पण लोकप्रिय पाहुण्याला डोळाभर पाहून घेण्याकरितां जनतेच्या भुवयांनीं ज्या कमानी उभारल्या जातात तींच खरीं तोरणें! सरकारच्या पदरीं हवें तितकें सैन्य असल्यामुळें तमासगिरांची व्यवस्था ठेवून, आंत वाटेल तर चिटपाखरूंहि न फिरकूं देण्याची व्यवस्था सरकारास सहज करतां येईल. पण टिळक किंवा गांधी यांच्या दौऱ्यांत हजारों लोकांची एकच गर्दी होऊन माजणाऱ्या पंढरीच्या अवस्थेंत मनाला जो खरा आनंद लुटावयास सांपडतो त्याची सर या सरकारी समारंभाला कशी येणार! आम्हांला तर वाटतें कीं, राष्ट्रीय सभेनें मुद्दाम ठराव केला नसता तरी, कित्येक ठिकाणीं ड्यूकसाहेबांच्या आगमनाच्या पंचक्रोशींत स्वतंत्र दिलाचें चिटपाखरूंहि फिरकलें नसतें," या उताऱ्यांत उत्प्रेक्षा, रूपकें, वक्रोक्तिपूर्ण विनोद व खोंचदार शब्दांची मार्मिक योजना इत्यादिकांनीं विषयवर्णनास किती शोभा आणिली आहे! तात्यासाहेबांच्या केवळ प्रासंगिक लिखाणांतूनहि अशा तऱ्हेचींच काय पण याहूनहि सरस उदाहरणें वाटेल तितकीं काढून दाखवितां येतील. त्यांतहि राजकारणाच्या आखाड्यांतील दूषित वातावरणांत ज्यांना सतत वावरावयाचें आहे त्यांच्या बुद्धीस पक्षाभिनिवेशाचा व दुरभिमानाचा सांसर्गिक रोग जडणें अगदीं स्वाभाविक आहे. परन्तु हेकेखोरपणाविषयीं प्रसिद्ध असलेल्या लोकमान्य टिळकांच्या संगतींत इतकीं वर्षें राहून व भांडखोरपणाविषयीं प्रसिद्ध असलेल्या राजकीय पक्षांत उभा जन्म घालवूनहि तात्यासाहेबांचे मनोभूमिकेंत विलक्षण समतोलपणा टिकून राहिला आहे हें पाहिलें म्हणजे अचंबा वाटतो. या बाबतींत लो० टिळकांपेक्षां रावसाहेब रानड्यांचेच ते खरे शिष्य शोभतात. रावसाहेब रानड्यांच्या बुद्धींतील तीव्रता व व्यापकपणा, प्रतिपक्षाच्यादि गुणांचें कौतुक करण्याची सहृदयता इत्यादि गुणांप्रमाणें बुद्धीचा समतोलपणा हा गुणहि तात्यासाहेबांचे ठिकाणीं आढळून येतो. 'तडजोड' हें

त्यांच्या जीवितप्रमाणेंच वाङ्मयाचेंहि ब्रीद-वाक्य दिसतें. टिळकांना सामाजिक सुधारणा अप्रिय होती अशांतला बिलकुल प्रकार नाहीं. परंतु मवाळां वरील त्यांच्या रागामुळें मवाळांनीं पुरस्कार केलेल्या सामाजिक सुधारणेची टवाळी केल्याखेरीज त्यांना राहवत नसे. पुरुषपुनर्विवाह या विषयावर लिहितांना लो० टिळक लिहितात:—" स्त्रीपुनर्विवाहाचें मंडण आजपर्यंत पुष्कळ झालें, व आणखी जरूर वाटल्यास लेखण्या-मेनें सज्ज आहेत, तेव्हां सर्व सुधारणांचा मक्ता घेणारांनीं आपलासा करून टाकलेल्या स्त्रीपुनर्विहासारख्या भानगडीच्या विषयांत मध्येंच तोंड घालण्याची आम्हांला आज जरूर नाहीं आणि इच्छाहि पण नाहीं; परंतु पुरातन हिंदुधर्माचें पृथक्करण करून त्यांतील एकूण एक नासकेकुजके भाग आपल्या तर्कशास्त्ररूपी सूक्ष्मदर्शक यंत्रानें शोधून काढण्याचें जबरदस्त काम पत्करणाऱ्या कुशाग्रबुद्धि सुधारकाग्रणींच्या व तसेंच पुनर्विवाहाचें नांव काढल्याबरोबर माथें फिरून जाणाऱ्या व अंधपरंपरेनें प्राचीन स्मृत्यादि ग्रंथांचे गोडवे गाणाऱ्या धर्माभिमान्यांच्या लक्षांतून शास्त्रनिषिद्ध असून अलीकडे बोकाळलेला हा पुरुषपुनर्विवाह कसा अजिबात गळला याचें आम्हांस मोठें आश्चर्य वाटतें. " यां ठिकाणीं वस्तुतः अंध अशा धर्माभिमानी लोकांची टर करण्याकरितां लिहिलेल्या लेखांत सुधारकांवर तशेरा झाडला आहे. परंतु तात्यासाहेबांनीं लिहिलेल्या ' पुनर्विवाहासंबंधीं सारासार विचार ' या अतिशय विस्तृत अशा लेखांत सुधारक किंवा दुर्धारक यांजविषयीं अनुदारपणाचा एक शब्द देखील कोठें आढळणार नाहीं. या लेखांत अर्थातच तात्यांनीं विशिष्ट परिस्थितींतील विधवांच्या पुनर्विवाहाचें मंडनच केलें आहे. पण तें सर्व श्रुतिस्मृतींचा परामर्श घेऊन इतक्या समतोल आणि मार्मिक बुद्धीनें केलें आहे कीं शेंडींत दर्भ घालून तिला गांठ मारणाऱ्या कर्मठ धर्माभिमान्याच्या नाजुक धर्मबुद्धीलाहि त्यांत कांहीं वावगें वाटूं नये.

" धर्मबुद्धीनें धर्माचा योग्य विचार करून मग मनुष्यास स्वतःच्या बुद्धीस योग्य दिसेल तसें वागावें; केवळ भ्रम दुस्तर आहे म्हणून थांबूं नये. ......मनुष्याच्या मनाची श्रद्धा हेंच अखेर सर्वोत्कृष्ट प्रामाण्यसाधन ठरतें, व या प्रमाणावरच जगाच्या सुधारणेची नेहमीं भिस्त असते.......प्रत्येक काळ हा संक्रमणकाळ असतो व त्या काळामध्यें श्रेय व प्रेय यांचें द्वंद्वयुद्ध एकसारखें सुरू असतें.......प्रत्येक काळांत लोकमताची धांव शास्त्राच्या व रूढ आचाराच्याहि पुढें गहूंमर असतेच....लोकांची संमति हेंच सशास्त्रतेचें मुख्य लक्षण होय...विधवाविवाह सशास्त्र आहे असें म्हणणाऱ्यांमध्यें

सर्वजण धर्मभ्रष्टतेस प्रवृत्त झालेल्या कलिमूर्तिच आहेत असें नाहीं. सशास्त्रतेचा अभिप्राय देणाऱ्या गृहस्थांत कित्येक धर्मश्रद्धावान् पंडितहि होते, ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. विठोबाअण्णा दप्तरदार धर्मबुद्धीच्या एका पारड्यांत घातले व दुसऱ्या पारड्यांत स्वामी दयानंद, केशवचंद्रसेन, गुरु नानक, गुरु गोविंद, ईश्वरचंद्र विद्यासागर किंवा विष्णुबोवा ब्रह्मचारी यांपैकीं एकेकटे घातले तर कांटा कोणीकडेच झुकण्याचें कारण नाहीं. ऱ्या पक्षांत डॉ. भांडारकरांसारखे विद्वान्, सदाचरणी व उत्कृष्ट गृहस्थाश्रमी पंडित, दिवाणबहादुर रघुनाथराव, नरेंद्रनाथ सेन व कृष्णस्वामी अय्यर यांसारखे धर्मनिष्ठ, ज्ञानवृद्ध गृहस्थ, किंवा प्रो. गोखले, सर टी. माधवराव, न्या. तेलंग व रानडे यांसारखे विचारी लोक आहेत तो पक्ष केवळ कलिविडंबनाचाच प्रकार असेल असें म्हणणें धाडसाचें होईल."

तात्यासाहेबांच्या एकंदर विद्वत्तेचें आणि मनोवृत्तीचें या लेखांत इतकें उत्तम प्रतिबिंब पडलें आहे कीं, त्याकरितां तो सावंत वाचून काढला पाहिजे. त्यांच्या वाङ्मयसरितेंतील विद्वत्ता व विचार यांचे डोह या लेखांत ठिकठिकाणीं आढळतील.

टीकाकार या नात्यानें तात्यासाहेब यांनीं जें वाङ्मय निर्माण केलें आहे, त्यांत त्यांच्या मार्मिकपणाइतकीच त्यांची सहृदयताहि दिसून येते. हातांत कुऱ्हाड मिळतांच पुढें दिसेल त्या झाडावर ती चालविणाऱ्या जॉर्ज वॉशिंग्टनप्रमाणें हातांत टीकेचें शस्त्र घेतांच टीकाविषयीभूत झालेल्या लेखावर व तो लिहिणाऱ्या लेखकावर तुटून पडण्याचाच टीकाकारास अनावर मोह होतो. परंतु तात्यासाहेब हें आपल्या टीकेचें तीक्ष्ण शस्त्रहि रोग्याविषयीं सहानुभूति वाळगणाऱ्या सर्जनप्रमाणें फार हलक्या हातानें वापरतात. हें त्यांच्या सहृदयतेस साजेसेंच आहे. त्यांच्या मार्मिकपणाचें रूपांतर मर्मभेद करण्यांत न होता ग्राहकतेंत होतें. दोषदिग्दर्शन करतांनाहि मनुष्य हा स्खलनशील प्राणी आहे हें ते विसरत नाहींत. त्यांच्या या मार्मिकतेचा आणि सहृदयतेचा कमनीय विकास त्यांच्या 'आमचे स्वराज्यद्रोही छत्रपति' या लेखांत दिसून येतो. कोल्हापूरचे माजी शाहूमहाराज व इंग्रज सरकार यांचेमध्यें झालेला गुप्त पत्रव्यवहार जेव्हां केसरींत प्रथम प्रसिद्ध झाला, तेव्हां तो वाचून कोणत्या स्वदेशाभिमानी आर्यपुत्राला त्या संस्थानिकाचा संताप आला नसेल ! संस्थानी राज्यकारभारांतील कृष्णकारस्थानांची ज्याला थोडीशी तरी माहिती आहे, त्याला ही सर्व स्वकीयांचा द्रोह करणारी संस्थानें नामशेष

व्हावीं असें वाटूं लागतें. म्हणूनच संस्थानिकांच्या अंतर्गत व खाजगी कारभारावर देखील वेळीं अवेळीं सडकून टीका करण्यास प्रत्येक स्वतंत्र बाण्याचा वर्तमानपत्रकार अधीर झालेला असतो. मग खालसा मुलुखांतील प्रजेनें चालविलेली स्वराज्याची चळवळ चिरडून टाकण्याकरितां एखाद्या संस्थानिकानें केवळ इंग्रजसरकारची आपल्यावर इतराजी होऊं नये म्हणून गुप्तपणें काय काय उपद्व्याप केले याचा लेखी पुरावा हातीं मिळतांच त्या संस्थानिकाचे धाभाडे काढून त्याजवर पाहिजे तसें तोंडसुख घेण्याची आलेली सुवर्णसंधि कोणीतरी गमावील काय ? परंतु ती सुवर्णसंधि न मानतां एक अनिवार्य आपत्ति आहे असें समजून तात्यासाहेबांनीं 'आमचे स्वराज्यद्रोही छत्रपति' हा लेख लिहिला आहे असें वाटतें. लेखाच्या सुरवातीला सहृदय सुभाषितकाराच्या मनाला टोंचणाऱ्या सप्तशल्यांचें वर्णन करून "खरोखर स्वराज्यविरोधी छत्रपति ही औचित्यभंगाची परमावधिच नव्हे काय ?" असा सवाल टाकला आहे. तात्यासाहेब पुढें लिहितात:—

"महाराजांच्या स्वराज्यद्रोहाचें आविष्करण करण्यापूर्वी एकदोन गोष्टी सांगणें जरूर आहे. त्या ह्या; महाराजांचा व आमचा खासगी द्वेष कोणत्याहि प्रकारचा नाहीं. व तो असण्याचें कारणहि नाहीं. प्रस्तुत लेखक 'राजारामियन' असल्यामुळें त्यास कोल्हापुरासंबंधानें एक प्रकारचें प्रेमच वाटतें. वर्तमानपत्राच्या दृष्टीनें पाहतां केसरीचा व कोल्हापुरचा संबंध कशा प्रकारचा होता हें प्रसिद्धच आहे. महाराजांच्या दत्तकपित्याच्या संरक्षणाकरितां 'केसरी' झगडला, व त्याचे संपादक आगरकर व टिळक हे तुरुंगांत गेले............ संस्थानिक दुर्गुणी असला तरी इंग्रज सरकार व संस्थानिक यांच्या दरम्यान लढा पडल्यास पुणेकर संस्थानिकांचाच पक्ष उचलून धरतील ! स्वकीय व परकीय यांतील भेदाचें तारतम्य पुणेकरांना चांगलें माहीत आहे. दुर्दैवानें संस्थानिक मात्र हें तारतम्य जाणीत नाहींत याचेंच वाईट वाटतें !......... आम्हांला सुराज्यव्यवस्थेची चाड असली तरी संस्थानिक आपल्या अंतर्गत कारभारापुरते प्रायः स्वतंत्र आहेत किंवा असावे, असेंच आम्हांस वाटतें, त्यांच्या अंतर्गत कारभारावर टीका करणें न्यायाचें असलें तरी स्वकीय संस्थानांविरुद्ध परकीय इंग्रजसरकाराकडे ती एक प्रकारें चहाडी केल्यासारखेंच होतें. असल्या सूक्ष्म भावनेनें आम्हीं आपली लेखणी पुष्कळ वेळां पुष्कळशी आवरून धरलेली आहे. पण 'सव खाऊन वरती घडणावळ' मागण्याच्या गोष्टींतील अप्रामाणिक सुवर्णकाराप्रमाणें, महाराज सरकार

जेव्हां स्वतःच्या संस्थानांतील फराळ करून तृप्त न होतां वरती खालसांतील प्रजाजनांचें निष्कारण वैर साधून धडधडीत स्वराज्यद्रोह तोंडीं लावूं पहातात, तेव्हां ते आमच्या संस्थानाभिमानाची कसोटी पाहण्याचें धाडस करितात, असें म्हणण्यास काय हरकत आहे ? ....... महाराजांविषयीं अप्रीति वाटण्यास इतर थोडीं कारणें आहेत असें नव्हे. गेलीं सुमारें वीस वर्षें महाराजांनीं टिळकांचा किती द्वेष व छळ केला ही गोष्ट पुष्कळांना माहीत आहे; तथापि महाराजांवर प्रस्तुत टीका करितांना ती गोष्ट आम्हीं बिलकूल लक्षांत ठेविलेली नाहीं. व्यक्ति या नात्यानें महाराजांशीं आमचें भांडण नाहीं.......महाराज हे ब्राह्मणांचा जितका द्वेष करितात ही गोष्ट जितकी महशूर होती तितकी ते प्रजासत्ताक स्वराज्याचा द्वेष करितात. ही गोष्ट महशूर नव्हती. महाराजांस आमची एवढीच विनंति आहे कीं, ब्रिटिश मुलखांत स्वराज्य स्थापन होऊं घातलें तें आतां परत येत नाहीं, व संस्थानांतहि यथाकाल स्वराज्यसंस्थेचा प्रवेश व प्रसार झाल्याशिवाय रहात नाहीं व म्हणून यापुढें तरी छत्रपतींनीं स्वराज्यकल्पनेचा द्रोह सोडून द्यावा व प्रजेचा संतोष हेंच आपलें सुख असें मानून स्वराज्याच्या कल्पनेला पुष्टि द्यावी. तसें केल्यानें छत्रपतींच्या छत्राला अकल्पित रीतीनें एक नवेंच तेज चढेल !" सात्त्विक संतापानें अंतःकरणांतील सर्व कोमल भावना करपून जाव्या अशा प्रसंगींहि तात्यासाहेब जर सहृदयतेचा इतका ओलावा दाखवितात तर त्याच करवीरकर छत्रपतींवरील मृत्युलेख लिहितांना त्यांच्या सहृदयतेला पालवी फुटून त्यांतून गुणग्राहकतेच्या कळ्या दृग्गोचर व्हाव्या हें अगदीं स्वाभाविकच आहे. तात्यांनीं महाराजांवरील मृत्युलेखांत स्तुतिस्तोत्रांचीं फुलें तर उधळलीं आहेतच; पण महाराजांच्या वास्तविक दोषांचाहि बुका बनविला आहे. या बुक्यानें हात काळे झाले तरी त्यांतील मंद सुवासानें त्या काळेपणाचा क्षणभर विसर पडल्याखेरीज रहात नाहीं.

(उतारे भा. २ पृ. २०३–२०४ पहा)

तात्यासाहेबांनीं लिहिलेल्या सर्वच मृत्युलेखांत वरील प्रकारची सोज्ज्वळ सहृदयता दिसून येते. 'मरणान्तानि वैराणि' या सुभाषिताच्या आधारावर जरी अशा प्रकारच्या सहृदयतेची आवश्यकता प्रतिपादन केली तरी लौकिक रीतीस अनुसरून केलेला जुलमाचा रामराम व मनापासून केलेला नमस्कार यांत जमीन–अस्मानाचें अंतर असतें. प्रतिस्पर्धी जिवंत असतांनाहि वैरभावनेचें विष जे तात्या पचवूं शकतात, त्यांनीं तो मरण पावल्यावर

त्याच्या गुणांना आपल्या सहृदयतेच्या अमृताचे तुषार उडवून चिरंजीवित्व प्राप्त करून द्यावें हें स्वाभाविकच आहे.

व्यक्तीप्रमाणेंच पुस्तकांवर टीका करितांनाहि तात्यासाहेब सहृदयता, सहानुभूति व समतोलपणा या गुणत्रयीला फांटा देत नाहींत, हें जरी खरें तरी त्यामुळें दोषाविष्करण करावयाला ते विलकूल कचरत नाहींत, हें त्यांचे टीकालेख वाचले म्हणजे दिसून येईल. टीका 'समर्पक, भरपूर, सर्वांग-परामर्षी व निःपक्षपाती' असावी असें त्यांनींच एके ठिकाणीं म्हटलें आहे. श्री. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर हे तात्यासाहेबांचे जरी जिव्हाळ्याचे स्नेही आहेत तरी त्यांच्या 'मतिविकार' या नाटकांतील गुणदोषांची चर्चा करतांना तात्यांनीं या खाजगी स्नेहाचा बहुमानपूर्वक उल्लेख करूनहि त्याला टीकेच्या सार्वजनिक आखाड्यांत येऊं दिलेलें नाहीं, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. उपर्युक्त नाटकावर टीका करितांना नाटककारांशीं असलेला निकटचा स्नेहसंबंध आपली टीका दूषिततर करणार नाहीं अशी शंका त्यांची त्यांनाच आली; परंतु टीकाकार आपले मनामध्यें जोंपर्यंत ही शंका एकसारखी जागृत ठेवतो, तोंपर्यंत त्याच्या हातून हा पक्षपातीपणाचा दोष घडणार नाहीं असा त्यांनीं आपला अभिप्राय दिला आहे. "समकालीन व समव्यवसायी अशा लोकांनीं एकमेकांचे गुणदोष विवेकबुद्धीनें व निःपक्षपातिपणानें पहाण्याची शक्तिच कदाचित् ईश्वरानें मनुष्यास दिली नाहीं असें वाटतें." असे उद्गार तात्यांनीं याच नाटकावरील टीकेंत एके जागीं काढले आहेत; व तात्यांची श्री. खाडिलकर यांच्या 'मेनका' या नाटकावरील टीका वाचली असतां त्यांच्या उपर्युक्त उद्गारांत बरेंच तथ्य आहे असें वाटूं लागतें. तथापि या टीकेंतहि खाडिलकरांच्या नाटकांतील दोषाविष्करण करण्याच्या बुद्धीपेक्षांहि ज्या कल्पनांचा खाडिलकरांनीं आपल्या नाटकाला आधार घेतला त्याच कल्पनांचा आधार घेऊन टीकेंत त्यांच्यावर बाजू कशी परतवितां येईल ह्या विचारानें झालेला स्वतःच्या बुद्धीचा अहंकारच तात्यांच्या मनाचा समतोलपणा बिघडविण्यास कारणीभूत झाला असें म्हणावें लागतें. पण तात्यांच्या बुद्धीचा तोल क्वचित् प्रसंगीं सुटला तरी तिच्यांतील मार्मिकपणा मात्र कधींच नाहींसा होत नाहीं. एवढेंच नव्हे तर अशा प्रसंगीं त्यांची बुद्धि अधिकच मार्मिक बनते. माधवराव बोडसांनीं तात्या आदिकरून टिळकांच्या अनुयायांवर चित्रमयजगत्मधून जी कठोर टीका केली होती, तिला प्रत्युत्तर देतांना तात्यांनीं बाजू उलटविण्याच्या याच युक्तीचा अवलंब केला आहे. अग्नि चाळवला

असतां त्याजवरील राखाडी उडून जाऊन त्याचें तेज जसें अधिक प्रखर होतें त्याचप्रमाणें तात्या चंवताळले म्हणजे त्यांची आधींच कुशाग्र असलेली बुद्धि अधिकच अणकुचीदार बनते व मग प्रतिस्पर्ध्याचा डाव त्यावरच उलटविण्याला तिला वेळ लागत नाहीं. तात्यांच्या बुद्धींत विजेची चपळाई जरी नेहमीं दिसून येते, तरी विजेंतील दाहकपणा तिच्यांत सहसा आढळून येत नाहीं. परंतु माधवराव बोडसांवरील लेखांत तिचे चटके इतके लागोपाठ बसतात, कीं त्यानें प्रतिस्पर्ध्याचीं हाडेंच खिळखिळीं व्हावीं! हा लेख तात्यांच्या आवेशपूर्ण लेखनशैलीचें एक ठळक उदाहरण म्हणून दाखवितां येईल. परन्तु हीं अपवादात्मक उदाहरणें सोडलीं, तर तात्यांचें एकंदर टीकात्मक वाङ्मय 'रागाचें प्रदर्शन, अपशब्दभांडाराचें संशोधन, वाक्ताडनाचा विधि, व दोषदृष्टीचें आविष्करण' इत्यादि दोषांपासून पूर्णपणें अलिप्त आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. तात्या ग्रंथकार म्हणून जितके प्रसिद्ध आहेत, तितकेच 'प्रस्तावनाकार' म्हणून प्रसिद्ध आहेत. किंबहुना त्यांनीं स्वतः जितकीं पुस्तकें लिहिलीं नसतील तितक्या इतरांच्या पुस्तकाला प्रस्तावना लिहिल्या असतील. स्वतःचें घर शृंगारण्याचा ते एकवेळ आळस करतील,पण दुसऱ्याच्या घराचे प्रवेशद्वारावर तोरण बांधण्याचें काम ते हौसेनें करावयाला नेहमीं तयार असतात! तात्यांची 'प्रस्तावनाकार' म्हणून कुचेष्टा करावयासहि लोकांनीं कांहीं कमी केलें नाहीं; पण म्हणून तात्यांनीं उदयोन्मुख व होतकरू ग्रंथकारांस उत्तेजन देण्याचें आपलें व्रत अद्यापि चालूच ठेवलें आहे. सहृदय टीकाकारालाच प्रस्तावनाकाराचा मान मिळतो. छिन्द्रान्वेषी कठोर टीकाकारांना तें भाग्य क्वचितच लाभतें. प्रस्तावनाकाराला जर लग्नमण्डपांतील प्रवेशद्वारावर पाहुण्यांचें स्वागत करण्याकरितां उभ्या असलेल्या सद्गृहस्थाची उपमा दिली तर टीकेचें कठोर शस्त्र हातीं घेणाऱ्याला देवडीवरील पहारेकऱ्याची उपमा अधिक शोभेल. पहिला छानदार पोषाख करून, अत्तर लावून व तोंडावर हास्याची छटा आणून आपलें असें कांहीं स्वागत करतो कीं, त्यामुळें वधूवरांना पाहून जरी आपली तीव्र निराशा झाली तरी त्याचें फारसें वाईट वाटत नाहीं. पण दुसरा आपला काळा डगला, हातांतील संगीन व चेहऱ्यावरील उग्रपणा इत्यादिकांनीं आपल्या अंतःकरणांत अशी कांहीं धास्ती उत्पन्न करतो कीं, त्यामुळें आंतील बहुमोल रत्नांचेंहि दर्शन नको असें वाटूं लागतें. तात्यासाहेब पुस्तकांना प्रस्तावना लिहितात त्यांत त्यांच्या बुद्धीचा मार्मिकपणा जितका आढळतो, तितकाच तिचा प्रगमनशीलपणाहि दिसून येतो.

तात्यांचें वय पाहतां नवीन विचार व नवीन कल्पना ग्रहण करण्याचा लव-चिकपणा त्यांच्या बुद्धींत अजूनहि आढळतो, याचा अचंबा वाटतो. ह्या नवीन विचारांचा वा कल्पनांचा त्यांनीं पुरस्कार केला नाहीं तरी त्याचा स्वीकार करावा ही गोष्ट देखील कांहीं कमी महत्त्वाची नाहीं. तात्यासाहेबांच्या प्रस्तावना म्हणजे जुन्या व नव्या वाङ्मयाच्या दोन महासागरांना जोडणाऱ्या सामुद्रधुन्याच आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं. प्रस्तावनाकाराला नुसती सहृदयता किंवा मार्मिकपणा असूनच भागत नाहीं. तर ग्रंथवाचनाची एक अजब कलाच हस्तगत करावी लागते. अथपासून इतिपर्यंत ग्रंथ काळजीपूर्वक वाचूनहि डोक्यांत कांहीं एक परिणाम न होतां शेवटीं हा ग्रंथ हातांतच मिरवीत राहण्याची पाळी बहुतेक वाचकांवर येते. त्यांतूनहि पुस्तकांतील कांहीं विचार एखाद्या वाचकाचे डोक्यांत गुरफटून राहिले तरी त्यांचीं गुंतागुंत सोडवून त्यांत एकसूत्रीपणा आणण्याइतकें त्याचे मेंदूंत त्राण किंवा कसब राहात नाहीं. तात्यांचे बहुश्रुतपणावरून त्यांनीं अगदीं थोडक्या वेळांत मार्मिकपणानें ग्रंथ वाचण्याची कला चांगलीच संपादन करून ठेविली असली पाहिजे असा तर्क करावयास हरकत नाहीं. पायाळू मनुष्य जसा भूमिगत द्रव्य अचूक शोधून काढतो, त्याप्रमाणें तात्यांची बुद्धि ग्रंथांतील नावीन्य हुडकून काढण्यांत फारच तरबेज झालेली दिसते. डॉक्टर जॉन्सन यास लायब्ररींत जाऊन पुस्तकें चाळण्याचा फार नाद असे. पुस्तकें न वाचतां नुसतीं चाळल्यानें देखील आपल्या ज्ञानांत भर पडते, असें तो म्हणत असे व ही गोष्ट खोटी असेल असें वाटत नाहीं. आर्नोल्ड बेनेट हा तर या बाबतींत जॉन्सनच्याहि पुढें गेला होता. पुस्तकें नुसतीं चाळून पहावयालाहि तो तयार नसे. मिटलेल्या ग्रंथांच्या केवळ संगतींत राहूनच आपणाला बहुश्रुत बनतां येतें असें त्याचें मत होतें. डॉक्टर जॉन्सन हा जाडा विद्वान् होता खरा, पण विद्वत्तेचा बोजडपणाहि त्याच्या ठिकाणीं फार होता. उलटपक्षीं आर्नोल्ड बेनेट हा चांगला बहुश्रुत होता, पण त्याच्या ठिकाणीं विद्वत्ता नव्हती. तात्यासाहेबांचे ठिकाणीं जॉन्सनची विद्वत्ता व बेनेटचा चटकदारपणा ह्या दोन्ही गुणांचा सुंदर मिलाफ झाला आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

तात्यांच्या वाङ्मयांत इतका चटकदारपणा यण्याला त्यांची विनोद-बुद्धिच मुख्यत्वेंकरून कारणीभूत झाली आहे. बहुश्रुतपणाला मार्मिकपणा-बरोबर विनोदाची जोड मिळाली म्हणजे लेखनाला भारदस्तपणाबरोबर चटक-दारपणाहि आलाच म्हणून समजावें. तात्यांची विनोदबुद्धि किती तीव्र आहे

हें त्यांनीं लिहिलेलीं ' सुभाषित व विनोद ' इ० पुस्तकें वाचलीं असतां सहज कळून येण्यासारखें आहे. आपल्या वाङ्मय-संसाराच्या सुरवातीलाच तात्यांनीं हें पुस्तक लिहिलें असल्यामुळें त्यांची कष्टार्जित विनोदबुद्धि चांगली अनुभविक आहे असेंच कबूल करावें लागतें. तथापि असें असूनहि तात्यासाहेबांनीं श्रीपाद कृष्णांप्रमाणें निव्वळ विनोदी लेख लिहिले नाहींत, याचें कित्येकांस नवल वाटतें. परंतु थोडा विचार केला असतां आपणांला असें आढळून येईल कीं, तात्यांची विनोददृष्टि ही श्रीपाद कृष्णांच्या विनोदी दृष्टीइतकीच तीव्र किंवा चपल असली तरी श्रीपाद कृष्णांच्या इतकी ती पल्लेदार आणि पीळदार नाहीं. त्यामुळें ' सुदाम्याचे पोहे ' सहज पचविण्याइतकी त्यांजमध्यें धमक असली तरी ते कांडून-आसडून व भाजून तयार करण्याइतका बुद्धीचा चिवटपणा त्यांचे ठिकाणीं नाहीं. तात्यांजवळ विनोदभक्ति आहे, पण विनोदशक्ति नाहीं, असें म्हटलें असतां या दोन साहित्यकारांचा फरक लक्षांत येण्याला मदत होईल असें वाटतें. आपल्या नाटकांविषयीं बोलतांना " मला मात्रेप्रमाणें अचूक लागू पडणारा विनोद साधत नाहीं " असें तात्यांनीं म्हटलें आहे तें यामुळेंच. तात्यांनीं निर्भेळ विनोदी लेख लिहिले नसले तरी ज्यांत विनोद अजिबात नाहीं असा प्रायः त्यांचा एकहि लेख सांपडणार नाहीं. सुंदर व समर्पक उपमांप्रमाणें मित व मार्मिक विनोदाची पेरणी आपल्या वाङ्मयक्षेत्रांत त्यांनीं इतस्ततः केली आहे. आपल्या 'सुभाषित आणि विनोद' या पुस्तकांत एके ठिकाणीं (उतारे पृ. ९० पहा.) तात्यासाहेबांनीं विनोदाच्या परिमित उपयोगाविषयीं जे विचार प्रतिपादन केले आहेत त्याबरहुकुम त्यांनीं वाङ्मय निर्माण केल्यामुळेंच त्याला इतकी उज्ज्वलता आली आहे.

" विनोदशीलतेमुळें आत्मस्वभावाचें निरीक्षण मनुष्य करूं शकतो " असें उपर्युक्त पुस्तकांत एके ठिकाणीं तात्यांनीं म्हटलें आहे. ते पुढें लिहितात:— " जें शस्त्र आपण लोकांवर नेहमीं चालवितों तेंच अर्थात् स्वहितबुद्धीनें आपल्या वरच चालवून पहाण्याची इच्छा मनुष्यास एखाद्या ना एखादे वेळीं तरी होणारच. विनोद हा एक फिरता दिवा आहे; त्याचा प्रकाश दुसऱ्यावर जसा पडतो तसा आपणावरहि पडलेला पाहून त्याच्या उजेडांत ज्या गोष्टी दिसतील त्यांचा बोध आपणास सहजच होतो. ' माझें मलाच हंसूं ' येतें असा शब्दप्रयोग आपण व्यवहारांत नेहमीं ऐकलेला पहातों. याचा अर्थ उघड आहे. ज्याला दुसऱ्याचें नेहमीं हसूं येतें, त्याला स्वतःचें एखादे वेळीं तरी हंसूं

यईलच." तात्यांचे लेखनपद्धतींत आत्मशिक्षणाची व आत्मनिरीक्षणाची बुद्धि जी संतत दिसून येते; त्याचें कारण त्यांचा हा विशिष्ट प्रकारचा आत्मपरीक्षणशील विनोदप्रचुर स्वभाव हें होय. तात्यांना दोन मनें आहेत. त्यांचें एक मन कार्यप्रवण असून दुसरें चिंतनपर आहे. त्यांच्या मनाप्रमाणेंच त्यांची बुद्धीदेखील दोन प्रकारची आहे. एक बुद्धि उत्पादनशील असून दुसरी नियंत्रणात्मक आहे. त्यांच्या लेखणीच्या दोन टोकांपैकीं एक टोंक लेख लिहीत जातें व दुसरें त्याचें परीक्षण करीत जातें. तात्यांच्या वाङ्मयाचे तेच स्वतः उत्तम टीकाकार आहेत. पूर्वार्धात तात्यासाहेबांनीं आपल्या स्वतःच्या नाटकांवर केलेल्या भाषणाचा आम्हीं जो उतारा दिला आहे तो या दृष्टीनें मननीय आहे. त्या भाषणाच्या प्रस्तावनेंत ते म्हणतात—

" आज जो विषय भाषणाकरितां मीं घेतला आहे, त्या विषयावर भाषण करण्याची माझी प्रथम इच्छा नव्हती. परंतु ह्याच ठिकाणीं पूर्वी माझे मित्र रा. वामन मल्हार जोशी यांनीं स्वतःच्या ' रागिणी ' कादंबरीवर भाषण करून तशी एकप्रकारची वहिवाट घालून दिली असल्यामुळें मजवर ही आपत्ति आली आहे. ज्यांत स्वतःच्या गुणदोषांची चर्चा करावी लागणार अशा विषयावर बोलणें म्हणजे आपत्ति नाहीं तर काय ? परंतु आत्मनिरीक्षण करण्याची संवय कांहीं वाईट नाहीं. असा विचार करून पुन्हां मीं मुद्दाम निरोप पाठवून रुकार दिला व आज येथें आलों. स्वतःच्या नाटकावर स्वतः ग्रंथकारानें भाषण करणें ही अवघड गोष्ट आहे. कारण व्याख्यानांत त्याला स्वतःचे दोष सांगावे लागणार व त्यामुळें दोषांची आयतीच कबुली दिली जाणार ! बरें; तो आपले जे गुण वर्णन करील ते त्यांच्याच तोंडून आल्यामुळें त्यांची मूळची किंमत कमी होणार असा पेंच पडला आहे. तरी श्रोतृवर्गाला माझें असें सांगणें आहे कीं, मी सांगेन तेंच त्याच भाषेंत बाहेर प्रसृत करावें. ग्रंथकर्त्यानें स्वतःच्या गुणावगुणांचें आविष्करण करणें म्हणजे स्वतः आपल्या शरीरावर शस्त्रक्रिया करून घेण्यासारखें आहे. पूर्वी ही गोष्ट शक्य नव्हती. परंतु हल्लीं मात्र गुंगी आणणाऱ्या औषधांच्या मुळें ही गोष्ट शक्य झाली आहे. विद्वेषी टीकाकार डॉक्टरप्रमाणें चरचर कापणारी टीका करील हें सहज संभवतें. आतां एकप्रकारचें औषध पाठीच्या मणक्यांत ' इंजेक्ट ' केलें असतां खालचा भाग बधिर होतो व स्वतःचे शरीरावर स्वतःला शस्त्रक्रिया चरचर करतां येते. आपली आपल्यावर तशी टीकारूपी शस्त्रक्रिया करणें हल्लीं शक्य आहे; हें जाणूनच

मी अहंकारलोपाची भूल घेतों व भाषणास सुरवात करतों." तात्यांनीं हें भाषण १९२३ सालीं केलें. म्हणजे अहंकारलोपाची भूल घेऊन स्वतःचे लेखनावर टीकेची शस्त्रक्रिया करण्याचा पहिला प्रयत्न त्यांनीं सुमारें दहा-वर्षांपूर्वी केला. आज एक तपपर्यंत या आत्मपरीक्षणाचा त्यांचा अभ्यास चालू असल्यामुळें या शास्त्रांत ते हल्लीं किती पारंगत झाले असतील, याची कल्पनाच करणें बरें. आज तात्यांच्या वाङ्मयावर मल्लीनाथी करावयाला ते स्वतः जितके लायक व समर्थ आहेत तितका दुसरा कोणी नाहीं. प्रस्तुत लेखांत तात्यासाहेबांच्या वाङ्मयांतील व भाषणांतील उतारे उद्धृत करण्यांत हाताचा जो सढळपणा दाखविला गेला आहे त्यांतील हेतु हाच कीं, तात्यांच्या वाङ्मयांतील उत्कृष्ट नमुन्यांचा वाचकांस आस्वाद घेतां येऊन शिवाय तात्यांच्या मनोरचनेचें त्यांत जें उत्तम प्रतिबिंब पडलेलें आहे त्याचेंहि दर्शन त्यांस व्हावें.

तात्यांच्या विनोदप्रियतेचें पर्यवसान विनोदाशीं संलग्न असलेल्या अश्लीलपणांत न होतां तें दुसऱ्याच्या दांभिकपणाचें आविष्करण आणि आत्मपरीक्षण यांत व्हावें हा त्यांच्या सदभिरुचीचा आणि मनाच्या सुसंस्कृत-पणाचा सुपरिणाम आहे. वाङ्मयांतील अश्लीलतेवरील त्यांचा कटाक्ष आज-काल्चा नसून फार पूर्वीपासूनचा आहे. १९०७ सालीं कोल्हटकरांच्या 'मतिविकार' या नाटकावर पुण्याचे 'ज्ञानप्रकाशां'तून त्यांचा जो टीका-त्मक लेख प्रसिद्ध झाला होता त्यांत त्यांनीं अश्लीलतेवर जे विचार प्रकट केले होते व अगदीं अलीकडे याच विषयावर त्यांनीं जे विचार भाषणद्वारा व लेखनद्वारा प्रदर्शित केले आहेत त्यांत मुळींच फरक नाहीं. तात्यासाहेबांस सुंदर कल्पनांचें वेड किती आहे, हें नव्यानें सांगण्याची आवश्यकता नाहीं. तथापि सुंदर कल्पनेशीं संलग्न असलेल्या अश्लीलतेची कोल्हटकर यांनीं जी तरफदारी केली आहे ती देखील तात्यासाहेबांस मान्य नसल्याचें उपर्युक्त नाटकावरील टीकेंत दिसून येतें. ते म्हणतात—" कल्पना सुंदर असली म्हणजे मग तिच्या बरोबर कितीहि अश्लीलपणा आला तरी तो क्षम्य आहे असें कोल्हटकर यांस वाटतें; पण माझ्या मतें हें म्हणणें बरोबर नाहीं. कल्पना सुंदर असो वा नसो, पण पात्र व प्रसंग जर चित्ताकर्षक व लोकांचें मन रमविणारा असेल तर अशा ठिकाणीं अश्लीलता संबद्ध असूं नये. चित्ताकर्षक असें पात्र, प्रसंग अगर विचार यांशीं संलग्न असलेली अश्लीलता चिरपरिचयानें

स्वतःच चित्ताकर्षक होऊं लागते. " यावरून अश्लीलतेवरील तात्यांचा विरोध केव्हांपासूनचा आहे हें दिसून येईल. मिस् मेयो हिच्या ' हिंदमाता ' या गलिच्छ चोपडयावर टीका करितांना ' चांभाराचे देवाला खेटराची पूजा ' या न्यायानें क्वचित् शिष्टाचाराचा भंग होणें अपरिहार्य होतें. परंतु आपद्धर्म म्हणून कां होईना, शिष्टाचाराच्या मर्यादेचें अतिक्रमण करावें लागल्याबद्दल पुराणांतरींचे दृष्टांत देऊन तात्यांनीं टीकालेखांच्या प्रस्तावनेंत प्रायश्चित्त घेतलें आहे. आपल्या नाटकांतील ' शृंगार शुद्ध आहे ' हे तात्यांचे उद्गार त्यांच्या वाङ्मयविलासाचा विशुद्धपणाच दर्शवितात. सदभिरुचि आणि वाङ्मयावरील विशुद्ध प्रेम हींच त्यांच्या वाङ्मयकृतींच्या निर्मळत्वास कारणीभूत झालीं आहेत. वाङ्मयावरील त्यांच्या ह्या उदात्त व अव्यभिचारी प्रेमामुळेंच तात्यांची वाङ्मय–सरिता मंदाकिनीप्रमाणें मनोज्ञ, मळहीन व माननीय झाली आहे. अस्तु.

## ८. केळकर यांची कविता

( प्रो. वासुदेव गोविंद मायदेव, एम्. ए., हिंगणें )

श्री. तात्यासाहेब केळकरांची कविता मीं पहिल्या प्रथम अभिनवकाव्य-मालेच्या पहिल्या भागांत वाचली. त्यानंतर ' डोंगरीमाहात्म्यवर्णन ' माझ्या वाचनांत आलें. नंतर ' काव्योपहार ' माझे हातांत पडला. रत्नाकरांत त्यांची मधून मधून प्रसिद्ध झालेली कविता माझे अवलोकनांत आली. संगीतांतील राग प्रथम शब्दानें सूचित केलेली अशीं त्यांनीं रचलेलीं मराठी पदें, एकादी अर्पणपत्रिका व एकादें अष्टक हेंहि माझ्या वाचण्यांत आलें. परंतु दर खेपेस केळकरांच्या कवितेचें निश्चित स्वरूप माझे ध्यानीं आलें नव्हतें. आज ही सर्व कविता एकदम वाचली असल्यामुळें त्या योगें झालेलें मत या लेखांत देण्याचें योजलें आहे.

तात्यासाहेबांनीं माझ्या वाङ्मयपूजेंत पुष्कळ वेळां मदत केली आहे. मीं तांब्यांच्या कवितेचा पहिला भाग संगृहीत केला, तेव्हां सर्व फॉर्म्स त्यांनीं आपल्या नजरेखालीं घातले होते. त्यावर ते लिहिणारहि होते, पण त्यावेळेस तें साधलें नाहीं. नंतर तांब्यांच्या कवितेच्या दुसऱ्या भागाला प्रस्तावना लिहून दोन्ही भागांचा परामर्श त्यांनीं घेतला. पुढें माझ्या कवितांचा एक भाग मीं प्रसिद्ध केला. त्याला त्यांनीं प्रस्तावना लिहिली. अशा माझ्या साहित्याच्या उपासनेंत ज्यांनीं मला हाताशीं धरून उपकृत केलें त्यांच्याच कवितेवर लिहिण्यास मला सांगण्यांत यावें हा जरा गमतीचा योगायोग वाटतो.

तात्यासाहेब रसिक असल्यामुळें त्यांना गुरुवर्य तांब्यांच्या कवितेबद्दल मोठ्या मार्मिकपणानें लिहितां आलें. तसेंच तरुणांचे पाय मोडण्याची वृत्ति त्यांच्यांत नसल्यामुळें माझ्याहि कवितांचें त्यांनीं कौतुक केलें, परंतु हे त्यांचे ठिकाणीं वसत असलेले गुण माझे ठिकाणीं नसल्यामुळें त्यांचे कवितांचें परीक्षण कदाचित् इतक्या सहृदयतेनें मला करतां येणार नाहीं व त्यामुळें वाचकांची थोडीशी निराशा होईल कीं काय अशी भीति वाटते.

तात्यासाहेबांनीं लिहिलेलें सर्व साहित्य मनापुढें आणलें तर त्यांनीं केलेलें कवितालेखन त्यांचें जि...ळ्याचें वाटत नसून तो एक फुरसतीची व विरंगुळ्याची गोष्ट आहे असें वाटतें. त्यांच्या एकंदर लेखनाला जर एखाद्या वृक्षाची उपमा दिली तर त्या वृक्षाचें बळ व सौंदर्य दाखविणाऱ्या शाखा चरित्र, नाटक व निबंध या ठरतील. या तीनहि प्रांतांतील त्यांची कामगिरी

एवढी मोठी आहे कीं, त्यांचे पुढें त्यांची काव्यकृति कांहींच नाहीं. ह्या काव्यकृतीनें एवढेंच ध्यानांत येतें कीं, तात्यासाहेबांस ह्याहि गोष्टीची हौस असून ह्याहि बाबतींत त्यांनीं लिहिलेलें आहे.

जो विचार मनाला सर्वस्वीं पटतो, खरा वाटतो, सुंदर दिसतो, उत्तम शब्दांत व्यक्त केल्यामुळें मनाला वेध अथवा चटका लावतो त्याला जर काव्य म्हटलें, त्याचप्रमाणें जो विचार वाचून वाचक डोलतो, गुणगुणत रहातो व त्यांतील अधिकाधिक मौज लक्षांत घेऊन पुनः पुन्हां आनंदित होतो त्याला जर काव्य म्हटलें किंवा भावनांच्या भट्टी तावल्या जाऊन त्याच्या आंचीमुळें उत्पन्न झालेला रंग घेऊन प्रसन्न रूपानें जो विचार अवतीर्ण होतो त्याला जर काव्य म्हटलें तर केळकरांच्या पद्यलेखनाला 'कविता' हा शब्द लावणें बरें असें वाटतें. माझ्या म्हणण्याचा अर्थ हा कीं, त्यांची बरीच पद्यकृति छंदोबद्ध गद्यासारखी आहे. आंतील विचार गद्यच आहेत. ते छंदांत आहेत एवढेंच. त्या कृति बुद्धिचापल्य दाखवितात, पण हृदयाचें आंदोलन दाखवीत नाहींत. कल्पनेचा विलास दाखवितात, सहजसुंदरता दाखवीत नाहींत. त्या कविता आहेत, पण त्यांत खऱ्या काव्याचें प्रमाण कमी.

तात्यासाहेबांनीं ओंव्या, आर्या, साक्या, पदें, भूपाळ्या, फटके, गजल व श्लोक वगैरे सर्व मिळून सुमारें २००० ओळी कविता लिहिली आहे. त्यांत कांहीं संस्कृताचीं व इंग्रजी कवितांचीं रूपांतरें आहेत. कांहीं 'पैसाफंडाष्टक' व 'अर्पणपत्रिका' यांसारखी प्रासंगिक रचना आहे. रागदारी व्यक्त करणारीं हिंदी पदें नसावीं व तीं मराठीच असावीं या अभिनिवेशानें लिहिलेलीं पदें त्यांत आहेत. मनोविनोदन करण्यासाठीं लिहिलेली 'विलायतच्या यात्रेची तयारी'-सारखी साधी रचनाहि त्यांत आहे. 'सिंहदुर्गप्रशस्तीसारखी' व स्त्रीविषयक सुभाषितांसारखी प्रौढ व डौलदार रचनाहि यांत आहे व 'रचिसि केशभूषा' सारखें अत्युत्तम गीतहि त्यांत आहे.

इंग्रजी धर्तीवर लिहिल्या जाणाऱ्या आधुनिक कवितेच्या धर्तीवर त्यांनीं काव्याला अगदीं साधे विषय निवडले आहेत. कांहीं ठिकाणीं ती ती रचना ठाकठिकीची व थोडक्यांत केली आहे. पण कांहीं विषय रंगवितांना मराठी जुन्या कवींप्रमाणें श्लोकबद्ध, संस्कृतप्रचुर, कल्पनाविलास दाखविणारी पण्डितांस साजणारी रचना केली आहे. कांहीं ठिकाणीं मुक्तेश्वरी थाटाच्या ओवीलेखनाची नक्कल केली आहे. सारांश, तात्यासाहेबांची कविता नव्या व जुन्या मराठी कवितेला जोडणाऱ्या दुव्याप्रमाणें म्हणजे आगाशे, लेंभे, मोगरे यांच्या रचनेप्रमाणें वाटते.

तात्यासाहेबांच्या सर्व कवितेकडे लक्ष दिलें तर ती कविता संस्कृतप्रचुर आहे, असें म्हणणें भाग आहे. कांहीं ठिकाणीं तर ती संस्कृतप्राचुर्यामुळें क्लिष्टहि झाली आहे. पैसाफंडासारखा साधा विषय, तो जनतेला पटवायचा; तर कदर्यासि अल्पव्ययें कर्णकीर्ती—या क्लिष्ट श्लोकापुढील श्लोक १ पहा.

दुधाचा स्तना लागतां स्निग्धहस्त । सुखें देत पीयूष धेनू समस्त ॥
तुम्ही देउनीं अल्पशी एक मुद्रा । पुरा पूर घ्या राष्ट्र-लक्ष्मी-समुद्रा ॥ १ ॥

पुष्कळ वेळां नवीन कल्पना त्यांस सुचतात व त्या सुताराप्रमाणें छंदाच्या चौकटींत बसवितांना ते कसे बेजार होतात व करतात पहा.—

केदार अचल शिखरीं वसती करितो । परि तो
शिव जगताचें हृदयीं धरी ॥ केदार० ॥
प्रिया अपर्णा । पर्णा-भरणा । पुत्रद्वय ते विकृत मुखी
रक्षामय गृह तरि सहजसुखी निजभक्तांचें दुःख हरी ॥ केदार० ॥

'विलायतेच्या यात्रेची तयारी' या प्रकरणांत व 'दिव्य मोटर' या गाण्यांत भाषा मुद्दाम गोंधळ अशी वापरली आहे. तात्पर्य, त्यांच्या गद्य लेखनांत त्यांच्या स्वतःच्या शैलीचा ठसा जसा एकदम ध्यानांत येतो तसा त्यांच्या पद्यलेखनांत कोठेंच आढळून येत नाहीं.

तात्यासाहेबांची या जगांतील सर्व वस्तूंकडे 'ठीक आहे' या रीतीनें पहाण्याची वृत्ति असल्यामुळें कोणत्याहि कवितेंत वर्ण्य विषयाबद्दल निःसीम भक्ति, अलोट प्रेम अगर विलक्षण आदर आढळून येत नाहीं. भावनांची भट्टी रसरसून न पेटल्यामुळें अर्धेकच्चे भाजलेले, होरपळलेले विचार त्यांचेकडून वाचकांस सादर केले जातात. 'अगाध कांहीं तरी । दिसे हें अजरामर सुंदरी' हा टिळकांचा उद्गार पहा; 'समुद्रीं चहूंकडे पाणी । पिण्याला थेंबही नाहीं' ही तांब्यांची उक्ति पहा; 'धन्य तेचि भूमिजलीं पाश जयीं तोडिला' हे विनायकाचे शब्द ऐका; 'जगिं त्याविना कुणीही । रमणीय अन्य नाहीं ॥ थोरांत थोर समजा । हा हिंदुदेश माझा ।' हे टेकाड्यांचे शब्द वाचा. यांतील भावना-कल्लोळ किती आनंददायक वाटतो. तसें तात्यासाहेबांच्या कवितेंत कुठें हि होत नाहीं. त्यांच्या कवितेला भावनांचा ओलावा कमी. ज्या प्रेमगीतांत भावनांचा ओलावा आहे त्यांत सुद्धां कवि वाहा व पार्थिव रूपांत इतका रंगून गेलेला वाटतो कीं, त्यापुढें आंतर व दिव्य अशा प्रेमभावनांची त्याला कल्पनाच आहे कीं नाहीं, अशी शंका वाटूं लागते.

यथाःस्थळिं ठेवुनि तत्र मौळि साजिरा । हुंगुनि स्नेहार्द्रे । चिकुर कुमार गोजिरा ॥
चंपकसम फिरवुनि त्यामाजि मम करा । सेविन पार्थिव सौख्य अनिर्वाच्य परि खरें २

हें अवतरण पहा. तसेंच स्त्रीविषयक सुभाषितगुच्छसुद्धां अशाच अत्यंत जड व उत्तान कल्पनांनीं युक्त वाटतो.—

त्यांच्या कवितेंत कल्पनेचे सुंदर तरंग आढळतात व याचें उत्तम उदाहरण म्हणजे त्यांची ' वेषभूषा ' ही कविता होय. यांत एकाहून एक अशा सरस कल्पना आहेत; त्या कशा तें पहा—

कुरळ कुंतलां स्वैर वाळकांपरि आंवरुनी ठायीं,
उन्नतिमार्गें हळुहळु रिझवुनि नेतां श्रम तुज होई. ॥ रचिसी० ॥
पेंड पिळाचा वळुनि वांधितां ऐटदार वांटोळा,
शिवपिंडीतें वाटे वेढी सर्पराज जणुं काळा ! ॥ रचिसी० ॥
अर्धोन्मीलित कुंदकळ्यांचा गजरा घालिसि वरती,
गमतें गिरिशिरिं गंगामंडळ धरि रवि–किरणें कांती. ॥ रचिसी० ॥

पण उदात्त भावना याच्या शेवटीं नसल्यामुळें त्या कवनाची मौज कमी झाली आहे.

तात्यासाहेबांच्या कवितेंत सुविचार नाहींत, असें मात्र नाहीं. ते सर्वभर विखुरले आहेत. त्यांच्या कवितेंत विनोदहि आहे. पण नुसत्या सुविचारानें, नुसत्या कल्पनाविलासानें व नुसत्या वृत्तबद्धरचनेनें काव्य निर्माण होत नाहीं. म्हणून त्यांची कोणतीहि कविता हमखास सुंदर अशा कवनांत मोडत नाहीं. तरी बऱ्यापैकीं कविता सांगावयाच्या झाल्या तर 'झिम् झिम् झिम् पर्जन्य पडे,' 'वेषभूषा,' 'आवडता फकीर' वगैरे कविता होत.

आतां स्वाभाविकपणें हा प्रश्न उपस्थित होतो कीं, या प्रचंड गद्यलेखकास पद्यांत इतकें यश कां आलें नाहीं ? याचें उत्तर दुसरें तिसरें कांहीं नसून त्यांचा वर्तमानपत्राचा धंदा होय. त्या धंद्यांत त्यांना गद्यलेखनाची एवढी संवय झाली कीं, त्यापुढें पद्याकडे वळावें असें त्यांना वाटलें नाहीं. पद्य म्हणजे शब्दांची कसरत, करामत, भलतींच नियंत्रणें. कल्पना सांगायच्या त्यांना यमकें कशाला ! त्याला मोजक्या अक्षरांचे गण अगर मात्रांची संख्या कशाला ! काव्यांत कल्पनेचा आनंद, सहजसौंदर्य आणावयाचें, तें गद्यांतहि आणतां येतें. व तें काव्य त्यांच्या गद्यलिखाणांत इतक्यांदा आलें आहे कीं, पुष्कळ ठिकाणीं त्यांचे लेख गद्यात्मक असून काव्यविलासांनीं मंडित आहेत, काव्यात्मक आहेत, काव्यच आहेत. तात्पर्य, गण, मात्रा, वृत्त वगैरेंचा छंद पहिल्यापासून खरसा न धरल्यामुळें व मागणीबरोबर पुरवठ्याच्या लेखनाची संवय झाल्यामुळें खूप सरस अशी काव्यकृति त्यांच्या कवितांत आपल्याला आढळत नाहीं. राजकारणाच्या प्रचंड्या झटापटींत, कामाच्या विलक्षण व्यापांत व रोखठोक व्यवहारांत सारखें पडावें लागल्याकारणानें

# ९. केळकर व शिक्षण

(श्री.–दिनकर विनायक काळे, एम्. ए.)

हिंदुस्थानांतील सर्व प्रकारचें सार्वजनिक शिक्षण सहानुभूतिशून्य अशा परकी सरकारनें आपल्या राजकीय धोरणाच्या पुष्ट्यर्थ आपल्या हातीं राखिलें आहे, अशी वस्तुस्थिति असल्यामुळें लोकहितवादी वर्तमानपत्रें आणि लोकहितचिंतक देशभक्त ह्यांना हिंदुस्थानांतील व महाराष्ट्रांतील शिक्षण व शिक्षणविषयक धोरण यांचा विचार अवश्य करावा लागतो. केसरी व मराठा या पत्रांचे लेखक, संपादक व संचालक आणि महाराष्ट्राचे व हिंदुस्थानांतील पुढारी म्हणून श्री. केळकर यांचे शिक्षणविषयक विचार अनेक लेखांतून व भाषणांतून व्यक्त झाले आहेत. तसेंच केसरीच्या व्यापक धोरणामुळें त्या त्या विषयांशीं व समर्थविद्यालय आदिकरून राष्ट्रीयशिक्षण–संस्थांशीं तादात्म्य पावून जसे त्यांनीं १९२० च्या पूर्वी लेख लिहिले व भाषणें केलीं त्याप्रमाणेंच त्या सालानंतर असहकारितेंतून निर्माण झालेल्या टिळक–महाविद्यालयाचे ते प्रमुख पुरस्कर्ते असल्यामुळें स्वानुभवाचे व जिव्हाळ्याचे विचार त्यांना प्रगट करावे लागले आहेत. यामुळें अर्थातच त्यांचे विचार प्रौढ, प्रगल्भ, विविध, बहुतांशीं हिंदी शिक्षणांतील सर्व अंगोपांगांचा विचार करणारे, आणि म्हणून अभ्यसनीय झाले आहेत. त्यांतून सर्वच विषयांसारखे शिक्षणावरीलहि त्यांचे विचार समतोल बुद्धीचे असल्यामुळें ते वाचून कोणत्याहि वादग्रस्त प्रश्नाच्या उभय बाजूंतील सार काय तेवढें नेमकें जिज्ञासूला समजून घेतां येतें.

श्री. केळकरांचें शिक्षणविषयक लिखाण गेल्या पस्तीस वर्षांच्या केसरी–मराठ्याच्या फाईलांत इतस्ततः विखुरलेलें आहे. परंतु त्यांच्या नांवानें प्रसिद्ध झालेल्या 'शिक्षणविषयक लेख व व्याख्यानें', 'संस्कृत विद्येचें पुनरुज्जीवन', 'प्लेजर्स अँड प्रिविलेजिस ऑफ दि पेन' अशांसारख्या लेख-संग्रहांचे योगानें त्यांच्या अफाट लेखसंभारांतून निवड करण्याचें काम कांहींसें सुलभ होतें. श्री. केळकर यांच्या व्याख्यानांपेक्षां त्यांचे लेखच सहजगत्या अधिक पद्धतशीर उपलब्ध आहेत. आणि ते साहाजिकच केसरी–मराठ्यांत आणि त्यांच्या धोरणाच्या अनुरोधानें किंवा धोरणाच्या पुष्ट्यर्थच लिहिलेले आहेत.

केसरीच्या जन्माच्या वेळीं इ. स. १८३५ च्या मेकॉलेच्या खलित्यामुळें

त्यांचें नुसतें भावनामय जीवित राहिलें नाहीं. भावनावश जीवनहि मनास पटेनासें झालें. व म्हणून त्यांच्या पद्यकृतींत काव्य फारसें आलें नाहीं.

खरें, मनुष्य स्वतः रसिक असला तरी काव्य निर्माण करूंच शकेल असें नाहीं. तो इतरांच्या काव्यांतील रस चाखूं शकेल, चाखवूं शकेल. तो इतरांच्या काव्यांतील आनंद लुटील व लुटवील; परंतु तो रस व आनंद आपल्या काव्यकृतीनें निर्माण करूं शकेल असें नाहीं. ' गद्य उद्योगाचा सांठा, पद्य दैवाचा झपाटा ' असें तेच म्हणतात. आपल्याच माहितीच्या मंडळींबद्दल बोलावयाचें झाल्यास कांहीं उदाहरणें देतां येतील. प्रो. पटवर्धन तुकाराम वाचीत, नाचत डोलत व श्रोत्यांना डोलावयास लावीत. त्यांची स्वतःची कविता पाहिल्यास एकदोन कविता खेरीज ती मुळींच चांगली नाहीं. परंतु गद्य किती जोरदार, सरस व काव्यमय ? आमचे वामन मल्हार जोशी संगीत कळत नाहीं म्हणतात; पण कवितेंतलें संगीत ओळखतात, सांगतात, पटवतात; पण ते स्वतःच्या सप्तपदींत ( लिहिलेल्या सात पदांत ) कांहीं काव्य आणूं शकले नाहींत. पण त्यांचे गद्य पद्य. कांहीं वेळेस किती काव्यात्मक व रसाळ असतें. तात्पर्य, हौस म्हणून, करमणूक म्हणून, मनोविनोदन म्हणून तात्यांनीं कविता लिहिली; त्याचा त्यांस एवढा व्यासंग ठेवतां आला नाहीं. इतर कामाचे हिमालयाचे ढीग त्यांनीं उठवले आहेत. त्यांच्या इतकी महाराष्ट्राची व अपरोक्ष रीतीनें सर्व भारताची सर्वांगीण उन्नति करणारा महाराष्ट्रांत तरी दुसरा पुढारी नाहीं व गद्यलेखनांत त्यांच्याइतका अष्टपैलू रसिक व सफाईदार लेखक नाहीं वाङ्मयाच्या रणक्षेत्रा वर शत्रूकडून सुद्धां ज्यांनीं 'साहित्यचंद्र' ही पदवी मिळवली त्यांना उत्तम कविता लिहितां आल्या नसत्या असें कोण म्हणेल ? परंतु तिकडे त्यांस लक्ष देतां आलें नाहीं. हा त्यांचा दोष नव्हे, परिस्थितीचा आहे. या बाबतींत त्यांची कृति सर्व गुणसंपन्न निर्माण झाली नाहीं, तरी त्यांच्या सुकीर्तीला ती यत्किंचितहि कमीपणा आणणारी नाहीं.

# ९. केळकर व शिक्षण

(श्री.–दिनकर विनायक काळे, एम्. ए.)

हिंदुस्थानांतील सर्व प्रकारचें सार्वजनिक शिक्षण सहानुभूतिशून्य अशा परकी सरकारनें आपल्या राजकीय धोरणाच्या पुष्टयर्थ आपल्या हातीं राखिलें आहे, अशी वस्तुस्थिति असल्यामुळें लोकहितवादी वर्तमानपत्रें आणि लोकहितचिंतक देशभक्त ह्यांना हिंदुस्थानांतील व महाराष्ट्रांतील शिक्षण व शिक्षणविषयक धोरण यांचा विचार अवश्य करावा लागतो. केसरी व मराठा या पत्रांचे लेखक, संपादक व संचालक आणि महाराष्ट्राचे व हिंदुस्थानांतील पुढारी म्हणून श्री. केळकर यांचे शिक्षणविषयक विचार अनेक लेखांतून व भाषणांतून व्यक्त झाले आहेत. तसेंच केसरीच्या व्यापक धोरणामुळें त्या त्या विषयांशीं व समर्थविद्यालय आदिकरून राष्ट्रीयशिक्षण–संस्थांशीं तादात्म्य पावून जसे त्यांनीं १९२० च्या पूर्वीं लेख लिहिले व भाषणें केलीं त्याप्रमाणेंच त्या सालानंतर असहकारितेंतून निर्माण झालेल्या टिळक–महाविद्यालयाचे ते प्रमुख पुरस्कर्ते असल्यामुळें स्वानुभवाचे व जिव्हाळ्याचे विचार त्यांना प्रगट करावे लागले आहेत. यामुळें अर्थातच त्यांचे विचार प्रौढ, प्रगल्भ, विविध, बहुतांशीं हिंदी शिक्षणांतील सर्व अंगोपांगांचा विचार करणारे, आणि म्हणून अभ्यसनीय झाले आहेत. त्यांतून सर्वच विषयांसारखे शिक्षणावरीलहि त्यांचे विचार समतोल बुद्धीचे असल्यामुळें ते वाचून कोणत्याहि वादग्रस्त प्रश्नांच्या उभय बाजूंतील सार काय तेवढें नेमकें जिज्ञासूला समजून घेतां येतें.

श्री. केळकरांचें शिक्षणविषयक लिखाण गेल्या पस्तीस वर्षांच्या केसरी–मराठ्याच्या फाईलांत इतस्ततः विखुरलेलें आहे. परंतु त्यांच्या नांवानें प्रसिद्ध झालेल्या 'शिक्षणविषयक लेख व व्याख्यानें', 'संस्कृत विद्येचें पुनरुज्जीवन', 'प्लेजर्स अँड प्रिव्हिलेजिस ऑफ दि पेन' अशांसारख्या लेख-संग्रहांचे योगानें त्यांच्या अफाट लेखसंग्रहांतून निवड करण्याचें काम कांहींसें सुलभ होतें. श्री. केळकर यांच्या व्याख्यानांपेक्षां त्यांचे लेखच सहजगत्या अधिक पद्धतशीर उपलब्ध आहेत. आणि ते साहजिकच केसरी–मराठ्यांत आणि त्यांच्या धोरणाच्या अनुरोधानें किंवा धोरणाच्या पुष्टयर्थच लिहिलेले आहेत.

केसरीच्या जन्माच्या वेळीं इ. स. १८३५ च्या मेकॉलेच्या खलित्यामुळें

वाढीस लागलेली आणि १८६७ च्या सुमारास मुंबई आदिकरून युनिव्हर्सिटयांच्या स्थापनेनें दृढमूल झालेली पाश्चात्य शिक्षण-पद्धति हिंदुस्थानांत चाळीस पंचेचाळीस वर्षांची जुनी झाली होती. यामुळें तिजबद्दलची लोकांची पहिली आदरयुक्त आश्चर्याची भावना ओसरून निबंधमालेच्या स्फूर्तीनें संशयी चौकसपणाचा मनु केसरीला आरंभींच सुरू करतां आला. पहिल्या वीस पंचवीस वर्षांपर्यंत पाश्चात्य-पद्धतीची प्रगति, युनिव्हर्सिटीचे पदवीदान-समारंभ, डेक्कन कॉलेजमधील विद्यार्थी व प्रोफेसर, डेक्कन एज्युकेशन सोसायटीची वाढ, युनिव्हर्सिटीच्या परीक्षा, अशांसारखे विषय केसरीला पुरले. या वेळीं शिक्षणाचा फैलाव करण्याचे कामीं सरकार व जनता यांचें सहकार्य होण्याचे गोड विचार डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या कार्यकर्त्यांच्या मनांत घोळत होते. व 'राष्ट्रीय-शिक्षण' ह्या शब्दांची व्याप्ति राष्ट्रभर पसरलेलें शिक्षण अशीच मुख्यत्वेंकरून समजून तत्सिद्ध्यर्थ त्यांचे आटोकाट प्रयत्नहि चालू होते. तथापि इ.स. १८८२ तील हंटर कमिशनच्या निमित्तानें (१) शिक्षणाचें माध्यम मातृभाषा हें असावें; (२) शिक्षण स्वजनाधीन असावें; (३) शिक्षणपद्धति स्वाभिमानपोषक असावी व (४) शिक्षण स्वदेशोन्नतीला पोषक असें असावें; अशीं जीं तत्त्वें डेक्कन एज्युकेशन सोसायटीकडून म्हणजे केसरीपक्षाकडून (प्रि. आपटे यांच्या साक्षींत) सांगण्यांत आलीं, त्यांचा पुरस्कार केसरींतहि १८८८ पासून झालेला दिसतो. स्त्रीशिक्षण (१८९०), शिक्षक व राजकीय चळवळी (१८९८), असे पुढें महत्त्व पावलेले विषयहि केसरींत एक दोनदां डोकावून गेले. परंतु लॉर्ड कर्झन ह्या उत्साही व्हाइसरॉयच्या १९०४ च्या युनिव्हर्सिटी बिलानंतर मात्र पाश्चात्य पद्धतीच्या मुख्य मुख्य दोषांवर केसरीनें आणि त्याचे प्रमुख लेखक श्री. केळकर ह्यांनीं जबरदस्त गोलंदाजी करून, त्या बिलाच्या प्रतिकारार्थ उत्पन्न झालेल्या राष्ट्रीय शिक्षणाच्या चळवळींना मनापासून जोराचा पाठिंबा दिला. श्री. केळकरांच्या नांवानें माहीत असलेला पहिला लेख, 'जुन्या विद्यापीठांची आरति' हा २३ फे. १९०४ च्या केसरींत प्रसिद्ध झाला.

कलकत्ता युनिव्हर्सिटीच्या पदवीदानसमारंभाचे वेळीं भाषण करितांना लॉर्ड कर्झन यांनीं आपल्या नव्या युनिव्हर्सिटी बिलाच्या उद्देशून 'हिंदुस्थानां-तील उच्च शिक्षणाच्या जुन्या मनूचा अवतार आज समाप्त झाला. लवकरच नव्या मनूचा अवतार सुरू होणार' अशी द्वाही फिरविली. तिला उद्देशून नव्या बिलावर सडकून टीका या लेखांत केली आहे. त्यांत सिलेक्ट कमिटीनें

तयार केलेल्या मसुद्याचा सारांश देऊन, नवीन होऊं घातलेल्या कायद्यामुळें युनिव्हर्सिट्या सर्वस्वीं सरकारच्या अंकित कशा होणार याचें विवेचन केलें आहे. बिलाचे सर्वस्वीं भयंकर परिणाम होणार आणि सरकारच्या कदरीमुळें यापुढें खासगी कॉलेजें निघणें बहुधा असंभाव्य होईल असें यथार्थ भाकित श्री. केळकरांनीं करून विवेचनाच्या ओघांत 'एकाद्या देशांत परकीय सरकारचे हातांत शिक्षण जाणें म्हणजे देशांतील राष्ट्रीयत्वाचा नाश होणें' असा सिद्धांत मांडला आहे. न्या. चंदावरकर व नामदार गोखले यांनीं प्रस्तुत बिलाला विरोध केला असतांहि डॉ. भांडारकर यांच्यासारख्या गृहस्थांनीं कलकत्त्यास जाऊन सिलेक्ट कमिटीमध्यें ना. गोखले यांच्याविरुद्ध मत दिलें, ही गोष्ट लक्षांत घेतां श्री. केळकरांनीं त्यांस 'स्वदेशविद्वेषी!' असें विशेषण लाविलें आहे तें कोणासहि यथार्थच वाटेल.

इ. स. १९०४ च्या कर्झनच्या बिलानें बरीच खळबळ उडून गेली. हिंदी शिक्षणाचें भवितव्य व त्यांत समावेश करण्यासारखे विषय यांचा जारीनें विचार होऊं लागला. सरकारी शिक्षणाचें उद्दिष्ट स्पष्टपणें राष्ट्रविघातक वळणावर नेण्याचा कर्झनशाहीचा निश्चय जसा उघड उघड दिसूं लागला तसतसा गुरुदास बानर्जीसारख्या बंगाली मवाळ गृहस्थांचाहि स्वायत्त शिक्षणाकडील ओढा वाढून तिकडे 'नॅशनल कौन्सिल ऑफ् एज्युकेशन'ची स्थापना झाली. व महाराष्ट्र आदिकरून सर्वत्र स्वायत्त राष्ट्रीय शिक्षणाची प्राणप्रतिष्ठा झाली. स्वदेशी शिक्षण, स्वाभिमानप्रेरक शिक्षण, स्वधर्मशिक्षण वगैरे आवश्यक गोष्टींचा कसोशीनें ऊहापोह होऊं लागला. सरकार आपल्याला दुसरें कांहींच करूं देत नाहीं, तर आपण निदान आपल्या तरुण पिढीचें शिक्षण आपल्या हातीं घेऊन स्वराज्यसाधनाचे कामीं कार्यक्षम अशी कर्तबगार ताज्या दमाची मंडळी निर्माण करूं अशा आशेनें सर्व देश भरून गेल्याचा देखावा दिसूं लागला; तोंच १९०४ च्या 'ईस्ट अँड वेस्ट' मासिकाच्या मे महिन्याच्या अंकांत सुप्रसिद्ध रँगलर परांजपे यांचा 'हिंदुस्थानांत धार्मिक शिक्षणाची आवश्यकता आहे काय?' असा प्रश्नार्थक म्हणजे नकार-प्रेरक असा लेख प्रसिद्ध झाला. अर्थातच तो केळकरांच्या टीकेस पात्र झालाच.

प्रो. परांजपे यांच्या असंबद्ध प्रलापांना उत्तरें देत असतांना, (१) '१८५४'सालीं शिक्षणविषयक लिहिलेल्या स्टेटसेक्रेटरी सर चार्लस् वूड यांच्या मिनिटापासून आजतागायत सरकारच्या कोणत्याहि ठरावानें धर्म-

शिक्षणास प्रतिबंध केलेला नाहीं; ' (२) 'इंग्लंडसारख्या सुधारलेल्या देशांतहि धर्मशिक्षण सक्तीचें आहे, ' व अशा आणखीहि गोष्टी सप्रमाण मांडून दाखविल्या आहेत. व प्रोफेसरासारख्या जबाबदार माणसांनीं आपल्यावरील जबाबदारी ओळखून काय लिहिणें तें लिहावें, असा त्यांस इशाराहि दिला आहे.

इ. स. १९०४ मधील केळकरांचा तिसरा ( ६ जून १९०४ ) लेख 'देशी राजकुमारांचें शिक्षण' हा होय. यालाहि लॉर्ड कर्झन यांच्या सर्वगामी चळवळ्या स्वभावामुळेंच कारण घडलें. राजकुमारांचें शिक्षण हें इंग्रज राज्यकर्त्यांना विशेष जिव्हाळ्याचें कां वाटतें याचें मुत्सद्देगिरीचें कारण सांगून 'कर्तृत्वसंपन्न राजा निपजण्यास' हल्लींच्या अर्थानें सुशिक्षण मिळणें 'अवश्यकच आहे असें आम्हांस तरी निदान वाटत नाहीं,' असें त्यांनीं आपलें मत दिलें आहे. कारण 'खरें व्यवहारोपयोगी शिक्षण जबाबदारी अंगावर पडल्याशिवाय होत नाहीं.' आणि अशी जबाबदारी राज्यकारभार व युद्धकला अशा दोन्हीहि बाबतींत अलीकडे प्राप्त होत नाहीं. 'पैकीं युद्धकलेचें तर इंग्रजबहादूरांच्या आश्रयछत्रामुळें नांवच काढण्याचें कारण उरलें नाहीं व खरा राज्यकारभारहि संपुष्टांत ' येऊन तो पोलिटिकल अधिकाऱ्यांच्याच हातांत आहे ! यामुळें कोणत्याहि एतद्विरहित योजनांनीं राजकुमारांचें खरें हित कांहींहि होणार नाहीं, असा आपला निर्णय केळकरांनीं लेखाच्या शेवटीं दिला आहे.

सरकारच्या शिक्षणविषयक धोरणासंबंधीं अविश्वास या लेखांतील विधानांत उत्कटतेनें प्रकट झालेला दिसतो. मराठ्यामध्यें याच सालांत प्रो. परांजप्यांचा समाचार घेतल्यावर धर्मशिक्षणावर केळकरांनीं स्वतंत्र दोन लेख लिहिले. आपल्या देशांतील विद्वान् माणसांनीं काय करावें याबद्दल परकीयांच्या गैरमाहितीमुळें होणारी अनास्था पुढें ठेवून स्वदेशविषयक वास्तविक माहिती इतरांना पुरविण्याच्या वगैरे त्यांनीं अनेक सूचना केल्या व वक्तृत्वशिक्षणाच्या सार्वजनिक पाठशाला असाव्या अशाबद्दलहि एक लेख लिहिला. तात्पर्य, १९०४ सालांत केळकरांनीं बदलत्या परिस्थितीकडे लक्ष देऊन हिंदी शिक्षणाबद्दल बराच विचार केला व करविला.

यापुढील १९१० पर्यंतच्या वंगभंगादि धामधुमीच्या काळांतच बंगाल, महाराष्ट्र व वऱ्हाड यांतील राष्ट्रीय शिक्षणाचे स्वतंत्र प्रयत्न झाले. त्यांसंबंधीं वर्णनात्मक, उत्तेजनपर व सरकारी शिक्षणपद्धतीवर चर्चात्मक व

टीकापर असे नाना प्रकारचे भावनाप्रधान आणि विचारपरिप्लुत लेख अर्थातच केसरींत आले. यावेळीं सर्वांचेंच लक्ष महत्त्वाच्या राजकीय लढ्याकडे गुंतलें होतें. पण सरकारच्या जबर दडपशाहीमुळें १९१० च्या सुमारास हा लढा बराच मंदावला होता. या दडपशाहीचाच एक भाग म्हणजे १९१० मधील समर्थविद्यालयावर वगैरे आणलेली गदा होय. मात्र तीमुळें १९०४ प्रमाणेंच १९१० हें साल शिक्षणक्षेत्रांत क्रांतिकारक ठरलें. आणि 'समर्थ विद्यालयावर गदा' (८।६।१०), 'राष्ट्रीय शिक्षणाचें पुढें काय?' (८।११।१०) असे लेख केळकरांनीं स्वतः लिहिले.

समर्थविद्यालय ही महाराष्ट्राची अत्यंत आवडती संस्था दडपशाहीच्या चक्रासुराला बळी पडल्याचें वृत्त ऐकून महाराष्ट्राला वाटणारी हळहळच केवळ या लेखांत प्रतिबिंबित झाली आहे असें नसून समर्थविद्यालयाचे हेतु व उद्देश हे सरकारनें लावलेल्या ॲक्टाच्या कलमाखालीं येऊं शकत नाहींत अशाबद्दल साधार व बिनतोड चर्चा केली आहे. महाराष्ट्रांतील 'इष्ट असा एक शिक्षणविषयक नवीन प्रयोग' असें समर्थविद्यालयाचें वर्णन करून प्रचलित शिक्षणसंस्थांहून 'एक पाऊल पुढें टाकण्याची योजना' ह्या दृष्टीनें केळकरांनीं त्याचें केलेलें समर्थन कोणालाहि अतिशयोक्तीचें वाटणार नाहीं. व एकदम पूर्वसूचना न देतां बंदीचा हुकूम काढून असा वज्राघात करण्यापेक्षां 'चालकांना तडजोड करण्याची संधि देणें हेंच सरकारचें कर्तव्य होतें' हें केळकरांचें म्हणणें कोणाहि सरकारच्या चहात्याला देखील अन्यायाचें आहे असें म्हणतां येणार नाहीं. केवळ झालेल्या अन्यायाबद्दल उच्चार करूनच न थांबतां शक्य तोंवर विधायक विचार करण्याची केळकरांची प्रवृत्ति 'राष्ट्रीय शिक्षणाचें पुढें काय?' या पांच महिन्यांनंतरच्या लेखांत दिसून येते. समर्थविद्यालयाच्या चालकांनीं सरकारचा ग्रह समज दूर करण्याचे प्रयत्न केले. परंतु त्यांना अपेक्षित यश आलें नाहीं, असें दिसून आल्यानंतर पुढील विचार करणें अर्थातच अवश्य झालें. राष्ट्रीय शिक्षणाच्या तीन वर्षांच्या अनुभवावरून 'महाराष्ट्रांत स्वार्थत्यागाचें बीं जरी उत्कृष्ट रुजलें आहे' तरी महाराष्ट्रीयांची स्वाभाविक गरीबी.......व देण्याची इच्छा असतांहि सरकारच्या प्रतिकूलतेमुळें दात्यांस वाटणारी भीति, यांच्यामुळें राष्ट्रीय शिक्षणाच्या कार्यास मिळूं शकणाऱ्या द्रव्याची मर्यादा...संकुचित आहे' व 'राष्ट्रीय शिक्षणाचे प्रयत्न यापुढें यशस्वी व्हावयाचे असले तर सरकारच्या प्रतिकूलतेपासून त्यांचा बचाव केला पाहिजे' असें प्रांजळ

सिद्धांत त्यांनीं मांडले. ' राष्ट्रीय शिक्षणाची एक शाळा बुडाली तरी हताश न होतां, जरूर तर निराळ्या प्रकारची शाळा काढतां येईल कीं नाहीं ? ' असा विचार करण्याची वेळ आलेली आहे असा स्फूर्तिदायक संदेश ह्या लेखाचे शेवटीं दिलेला आहे. त्याचा महाराष्ट्रीयांनीं व खुद्द समर्थविद्यालयानेंच फक्त उपयोग करून घेतला ही गोष्ट जगजाहीर आहेच.

याच सालांत लिहिलेले 'राष्ट्र व शिक्षण,' 'शील सुधारणारें शिक्षण,' 'शेतकी शिक्षण व सुधारणा' आणि ' हीन जाति व शिक्षण' हे लेख शिक्षणाचा तात्त्विक दृष्ट्या विचार करणारे आहेत. पहिल्या लेखांत, इतर देशांच्या मानानें हिंदुस्थानसरकार लोकशिक्षणावर फार थोडा पैसा खर्च करतें; प्राथमिक शिक्षण लोकसंस्थाच संभाळतात, सक्तीच्या शिक्षणाचें तर नांवच नाहीं, धंदेशिक्षणाची शाळा एकहि नाहीं वगैरे हलाखीची वस्तुस्थिति व तिजबद्दल सरकारची जबाबदारी विशद केली आहे. व जपानचें उदाहरण घेऊन मनांत असेल तर अल्पावधींत काय फरक होऊं शकतो याचें चित्र यथार्थ रेखाटून ' शिक्षणाचा प्रसार राष्ट्रभर कसा होईल व राष्ट्रास अत्यंत उपयुक्त अशा रीतीनें तें कसें देतां येईल ' हेच दोन मुख्य मुद्दे शिक्षणाच्या दृष्टीनें विचारांत घेण्यासारखे महत्त्वाचे असे आहेत; असा पूर्ण व्यावहारिक निष्कर्ष काढला आहे. ' शील सुधारणारें शिक्षण ' ह्या लेखांत धर्मशिक्षणाचा आग्रहानें पुरस्कार केला असून, ' हीन जाति व शिक्षण ' ह्या लेखांत अस्पृश्यतेचा दोष बहुधा सुशिक्षणाच्या फैलावानें नष्टप्राय होईल असा तर्क विस्तारानें मांडला आहे. कारण ' या बाबतींतील धर्मसमजूत पालटण्याचा वाद माजवीत न बसतां हा भेदभाव आचारांत नाहींसा होण्याची रूढि कशी पडेल, याचाच विचार अधिक अगत्याचा आहे ' असें त्यांनीं मोठें मार्मिक विधान या लेखाच्या आरंभींच केलें आहे तें सर्वांस पटावें असेंच आहे.

हिंदु विश्वविद्यालयावरील ( इ. स. १९११, १९१३, १९१६ ) केळकरांचे लेख फार महत्त्वाचे आहेत. १९०५ मध्यें प्रथम तत्संबंधीं संकल्प जाहीर केल्यानंतरच्या पांच सहा वर्षांच्या शिक्षणक्षेत्रांतील कामगिरीचा आढावा घेतांना सरकारनें हाणून पाडलेल्या प्रयत्नांचा उल्लेख केल्यावर ' संस्था गेल्या तरी कल्पना मरत नाहींत ' असें केळकरांनीं सूचक विधान करून पुढें ' राष्ट्रीय शिक्षणाच्या कांहीं शाळा जरी सरकारनें बुडविल्या तरी निवळ शिक्षणविषयक अशी जी सुधारणा ती ' या नान्या रूपानें पडून आल्या-

वांचून राहणारच नाहीं असा निर्वाळा दिला आहे. त्यानंतर देशी भाषांतून शिक्षण, धर्म व नीति यांचें शिक्षण ह्या अवश्य सुधारणांचा उच्चार करून त्या बाबतींत अनेक व्यावहारिक सूचना केळकर ह्यांनीं प्रस्तुत लेखांत केल्या आहेत. एके ठिकाणीं 'हिंदुलोकांची स्वतंत्र युनिव्हर्सिटी झाल्यानें सरकारी नोकरींत प्रवेश झालेला नसतांहि विद्वान् म्हणून खरी मान्यता पावणें, ही गोष्ट साध्य होईल' असें सांगण्यांत केळकरांनीं अगदीं लोकांच्या मनांतील विचार बोलून दाखविले आहेत असें वाटतें. सरकारी शिक्षणसंस्था केवळ नोकर बनविण्याचे हमालखाने होत, ही सामान्य लोकांची झालेली समजूत किती यथार्थ होती हें या वाक्यावरून दिसून येईल. सरकारचा ताबा हिंदु युनिव्हर्सिटीवर रहाणार व शिक्षणाचें माध्यम इंग्रजीच राहाणार हीं वैगुण्यें केळकरांनीं दाखवून दिलीं. पण त्यांबाबत 'सर्वनाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पंडितः' या न्यायानें त्यांबद्दल विशेष प्रतिकूल लिहिलें नाहीं. हा सर्वस्वी परिस्थितीचाच दोष होय.

स्वदेशीय शिक्षणाबद्दल १९०४ पासूनच जागृति होऊं लागली होती. तिचें स्वरूप आतां नदीच्या ओघाप्रमाणें क्रमशः विस्तृत होत जाऊन लोकांच्या पुढें अनेक नवे नवे प्रश्न उपस्थित होऊं लागले होते. त्या सर्वांचा सविस्तर परामर्ष घेण्यास आपल्यापाशीं जागा नाहीं. केवळ साररूपानेंच पहावयाचें म्हटलें तर सक्तीचे शिक्षणाबद्दल म्हणजे विशेषतः त्याबद्दल खर्च व त्याची शक्यता यांबद्दल १९११, १९१६, व १९२० मध्यें त्यांनीं लेख लिहिले. १९१३ मध्यें दिल्लीसरकारनें बंगालसरकारच्या मनाविरुद्ध कलकत्ता युनिव्हर्सिटींतील तिघां व्याख्यात्यांना राजकारणांत भाग घेतल्याबद्दल शिक्षा केल्यावरून केळकरांनीं 'शिक्षण व राजकारण' हा सर्वमान्य लेख लिहिला. १९१४ मध्यें सर जॉर्ज क्लार्क ह्यांनीं 'उज्ज्वल अशा राजकीय ध्येयांचें ध्यान करणाऱ्या तरुणांच्या मनास विरजण पाडण्याकरितां' व्यावहारिक शिक्षणाचा उपक्रम केला; त्याचेंहि त्यांनीं एक इष्ट सुधारणा म्हणून स्वागत केलें व 'मोडी कीं बाळबोध!' या विषयावर दोन मनोरंजक परंतु मुद्देसूद लेख लिहून मोडीची तरफदारी केली. १९१९त देशी भाषेंतून शिक्षण व हातकाम यांच्या बद्दल आस्थेनें लिहिलें व १९१६ त देशीभाषांतून परीक्षा तरी घ्या असा लकडा लाविला. १९१७त मातृभाषेची आणखी लेख लिहून तरफदारी केली, व १९१८ त विद्यार्थ्यांनीं सभांना जाण्यांत विशेष हानि नाहीं असें प्रतिपादिलें. तात्पर्य, हिंदुयुनिव्हर्सिटी व तदनुषंगिक प्रश्न यांजवर केळकरांचे विचार या अवधींत पक्व होत होते, आणि असहकारितेच्या काळांत लोक-

मतानें डिवचतांच त्यांनीं त्याच अनुषंगानें टिळक महाविद्यालयाची स्थापना करण्याचें श्रेय घेतलें.

१९२० मधील असहकारितेच्या चळवळीमुळें विद्यार्थ्यांनीं शिक्षण-संस्थांवर घातलेला बहिष्कार, त्या विद्यार्थ्यांशीं विचारविनिमयार्थ झालेली सभा, त्या सभेंतून किंवा एकंदर चळवळींतून निघालेलें टिळकमहाविद्यालय, व त्यामध्यें केसरीच्या सर्व संपादकांनीं घेतलेला प्रमुख भाग ह्या गोष्टी प्रस्तुत पिढीच्या पूर्ण परिचयाच्या आहेत. 'पंधरा वर्षांपूर्वीच्या राष्ट्रीय शिक्षणाला जें मुख्यतः शिक्षणसुधारणेचें स्वरूप होतें तें कायम राहून शिवाय असहकारितेच्या चळवळीनें त्याला एक नवीनच जोर प्राप्त झाला आहे' ही जाणीव ठेवूनहि, राष्ट्रीय शिक्षणाची योजना करतांना भावनाप्रधान लोकांप्रमाणें मनांत 'जग-ड्व्याळ' कल्पना न ठेवतां केळकरांनीं 'हातानें होईल तेवढी लहानशी पण स्वावलंबी कृति'–टिळक महाविद्यालय–निर्माण केली. तरुणपिढीला 'राष्ट्राची भावी आशा' किंवा 'आधारस्तंभ' अशा नांवांनीं भुलवून 'लोकोत्तर स्वार्थ-त्यागाच्या भरीस घालण्याचें' पाप कोणीं करूं नये असें त्यांचें स्पष्ट मत होतें. तथापि पालकांशीं बोलतांना मात्र ते न्यायनिष्ठुर होऊन 'राष्ट्रीय शिक्षण व पालकांचें कर्तव्य' या लेखांत त्यांना स्पष्ट इशारा देण्यास चुकले नाहींत. स्वतःच्या मुलांच्या शिक्षणाचा प्रश्न हा सर्वस्वीं पालकांवर अवलंबून असल्या-मुळें, कॉंग्रेसच्या कार्यक्रमाचें महत्त्व व प्रचलित शिक्षणाचें वैयर्थ्य त्यांच्या मनावर बिंबवून दिल्यावर केळकर म्हणतात कीं, 'पालकवर्गानें मनावर घेत-ल्यास राष्ट्रीय शिक्षणाचा प्रश्न हटकून सुटून असहकारितेचें कार्य सफल होईल'. पण 'पालकांना स्वतः पुढें पाऊल टाकून विधायक व प्रगतिपर असें कांहींच करावयाचें नसेल तर सर्वनाश जवळ ठेवलेलाच आहे, हें मात्र त्यांनीं ध्यानांत ठेवावें.' महाराष्ट्राचें विचारपूर्ण, समंजस, सावधगिरीचें राजकारण, शक्य तेथें निश्चित प्रगति करण्याचा निश्चय, आणि समाजाचे नाडीवर हात ठेवून जरूर तर दोन पावलें पुढें खेंचून नेण्याची केसरीची परंपरा या सर्वांचा उत्कृष्ट नमुना या वेळच्या केळकरांच्या विचारांत, कृतींत व लेखांत दिसून येतो.

इ. स. १९२० हें साल जसें एकदां दडपलेल्या राष्ट्रीय शिक्षणा-च्या पुनरुज्जीवनामुळें चिरस्मरणीय झालें आहे त्याचप्रमाणें नव्या सुधा-रणा कायद्याचा अंमल त्याच सालीं सुरू झाल्यामुळेंहि नव्या लोकनियुक्त दिवाणांचाहि शिक्षणावरील कारभार त्याच सालांत जारी झाला व ना० परां-जप्यांच्या बेजबाबदार कारभाराबद्दल केसरीला व केळकरांना बरीच टीका

करावी लागली. १९२३-२४ सालांत प्रोफेसर कर्वे यांच्या स्त्रीशिक्षणाबद्दलहि केळकरांना लिहावें लागलें. ते स्वतःच ह्या बाबतींत क्रियावान् असल्यामुळें त्यांचें धोरण अनुकूल असलें पाहिजे हें सहज लक्षांत येण्यासारखें आहे. श्री. केळकरांसारख्या नेत्याच्या लेखांइतकेंच त्यांच्या कृतीलाहि महत्त्व दिलें पाहिजे. आणि जरी प्रमुख नेत्यावर बहुधा सर्व प्रकारच्या राष्ट्रांतील चळवळींना स्वतःच्या सहानुभूतीनें चैतन्य प्राप्त करून देण्याची जबाबदारी सहजच येऊन पडत असली तथापि त्यांतहि एकाद्या विषयांत त्यांनीं चांगलें लक्ष घातल्यामुळें होणाऱ्या फायद्याकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं. याच ग्रंथांत 'विविध संस्थांतील केळकरांची कामगिरी' स्वतंत्रपणें दिली आहे. त्यांतील शिक्षण-संस्था-बौद्धिक व शारीरिक वगैरे शिक्षण देणाऱ्या-सहज लक्षांत भरण्यासारख्या आहेत. महाराष्ट्रीय मंडळ, पैसाफंड कांचशाळा, नवीन समर्थ विद्यालय, टिळकमहाविद्यालय व सर परशुरामभाऊ व फर्ग्युसन कॉलेजें एवढींच नांवें पाहिलीं तरी केळकरांचें लक्ष व धोरण एकांतिक नसून सहानुभूतिहि व्यापक असल्याचें लक्षांत येईल. शिक्षणाबद्दलची त्यांची आस्था केवळ राजकारणी पुरुषाचीच नसून तींत शिक्षकाची कळकळ आणि हौस हींहि प्रतीत होतात. केसरीसारख्या राष्ट्रीय वृत्तपत्राचा संपादक म्हणजे प्रभावी लोकशिक्षकच होय. परंतु त्याचे वाचक इतके असंख्य आणि शिक्षणाचे विषय इतके विविध स्वरूपाचे असतात कीं, संपादनकार्य बहुतांशीं चळवळ किंवा प्रसार या स्वरूपाचेंच असतें. केळकरांनीं असहकारितेचे युगांत टिळकमहाविद्यालयासारखी संस्था निर्माण करून महाराष्ट्रीय राष्ट्रीय शिक्षणाचे प्रगतींत भर घातली एवढेंच नव्हे तर त्या महाविद्यालयांत आरंभीं आपल्या आवडीचे इमर्सन, नागरिकशास्त्र, व 'मराठे व इंग्रज' असे विषय शिकवून प्रत्यक्ष शिक्षकाचेंहि काम केलें. हातकाम व धंदेशिक्षण ह्या बाबतींत त्यांचीं मतें फार पुढारलेलीं आहेत. स्त्रीशिक्षण व तदनुषंगिक सुधारणा ह्यांचे ते कट्टे पुरस्कर्ते आहेत. वृत्तपत्रकलेचें शिक्षण केसरी-मराठा संस्थेंत देण्याची योजना करून त्यांनीं एक शिक्षणाची नवीच शाखा उघडली. पाश्चात्य पद्धतीच्या शिक्षणपद्धतींतील गुणांकडे दुर्लक्ष न करितां संस्कृत विद्येच्या पुनरुज्जीवनाचा जोरानें पुरस्कार केला, आणि या सर्व लेखनगत किंवा व्याख्यानांत उच्चारलेल्या विचारांचें क्रियेंत रूपांतर करून क्षणिक मोहाला बळी न पडतां स्वतःच्या मुलांना त्यांच्या मनाला पटलें व आवडलें असें राष्ट्रीय शिक्षणच दिलें.

## १०. केळकर यांची भाषणशैली

( श्री. सदाशिव विनायक बापट, आठवणीकार, पुणें. )

जें जें सूक्ष्म नाम घ्यावें । त्याचें रूप विंवरून द्यावें ॥
तरीच वक्ता म्हणवावें । विचारवंत ॥

—श्री समर्थ.

"He who has reason and good sense at his Command needs few of the arts of the Orator."

—GOETHE

गुरुवर्य तात्यासाहेब केळकर यांना सार्वजनिक सभांतून मनापासून बोलावयास नको. खेरीज वक्तृत्वास नैसर्गिक अशी अनुकूलताहि त्यांस कमी आहे. बोलावयास आरंभ केला कीं, त्यांना खोकल्याचा ठसका लागतो व तो भाषण संपवीपर्यंत वैऱ्याप्रमाणें त्यांस अडवीत असतो. या कारणानें, नको तें बोलणें, असें त्यांस होऊन जातें; परंतु त्यांनीं सार्वजनिक आयुष्याचा वसाच घेतला असल्यामुळें सार्वजनिक भाषणांना टाळून त्यांचें चालावें कसें ? ज्या उपाधींची मनुष्याला हौस त्या तो पत्करीलच; परंतु तात्यासाहेब यांचा विशेष हा कीं, ज्या उपाधि त्यांना सहज साधावयाच्या नाहींत त्यांपुढें स्वतः हात न टेकतां त्यांनाच ते आपल्यापुढें हात टेकावयास लावतील. म्हणून सार्वजनिक आयुष्यक्रम त्यांनीं स्वीकारला नसता तरी सभेंत वक्ते म्हणून ते एरव्हीं पुढें आले नसते, असें म्हणवत नाहीं. केसरी–मराठा संस्थेस येऊन मिळाले म्हणून ते संपादक झाले. तथापि तसे ते संपादक झाले नसते, तरी वकील या पेशानें ते वागणारच होते व वकीलाचा पेशा असा आहे कीं, वकील होणें म्हणजेच चारचौघांत उभें राहून भाषण करणें. एक वेळ संपादक मुका असला तरी चालेल, पण वकील हा बोलकाच पाहिजे. यासाठीं एल्एल्. बी. होऊन सातान्यास वकिलीची सनद घेतल्यावर तात्यासाहेबांनीं तेथील युनियन क्लबांत भाषणाचा एक प्रसंग मुद्दाम उकरून काढला. तें भाषण केवळ कोणा-एका व्यक्तीचे औपचारिक असे आभार मानण्याचेंच होतें; परंतु त्याकरितां त्यांनीं आधींपासून केवढी तयारी केली होती ! त्यांनीं जे चार शब्द बोलावयाचे होते ते प्रथम एका कागदावर लिहून काढले, सभेस जाण्यापूर्वी ते चार पांच वेळां वाचले व मग क्लबांत जाऊन त्यांनीं तें आभाराचें भाषण केलें !

यावरून एक मुद्दा स्पष्ट होतो. तो हा कीं, वकिली झाली तरी तिच्यांत कोर्टांत बोलावें लागणारच व वकीलाचा पेशाहि एक प्रकारें सार्वजनिकच असल्यामुळें गांवांत प्रसंगवशात् भरणाऱ्या सभांतूनहि भाषणें करण्याची त्याला पाळी येणार. शिवाय तात्यासाहेबांचा स्वभाव जात्याच चळवळ्या पडल्यानें सामान्य वकीलापेक्षां ते सभांतून अधिक वेळां चमकले असते, यांत शंका नाहीं. त्यांनीं वकिली सोडून संपादकत्व स्वीकारलें तें कोर्टांत कज्जेदलाली करण्यापेक्षां विद्याव्यासंग कायम ठेवून लेखनव्यवसाय चालविणें त्यांस श्रेयस्कर वाटलें म्हणून स्वीकारलें हें तर उघडच आहे; पण त्याबरोबरच वकिली पेशांतल्यापेक्षां संपादकीय पेशांत सार्वजनिक कामें करण्याची संधि जास्ती मिळेल यासाठींहि त्यांनीं संपादकत्व स्वीकारलें असें ओघानेंच कबूल करावें लागतें.

वर्तमानपत्राचा संपादक हा अद्यापि तरी हिंदुस्थानांत लोकांचा पुढारी समजला जातो. अनेक विषयांचा अभ्यास करणें हें त्याचें कर्तव्यच होऊन बसतें. संपादक या नात्यानें जसे अनेक विषयांवर तो लेख लिहितो तसें त्याला पुढारी या नात्यानें भाषण करावयास पाचारण झाल्यास तें नाकारून चालत नाहीं. बहुशः पुष्कळ वक्ते असे असतात कीं, त्यांना ज्या विषयावर भाषण करावयाचें त्याची वेगळी तयारी करण्याची जरूरी वाटत नाहीं. किंबहुना विषयाची तयारी न करतांच जो बोलतो तोच खरा वक्ता व त्यावरच सरस्वती-देवीचा वरदहस्त अशीहि सामान्यतः आपल्याकडे समजूत आहे. पण खरा युरोपियन वक्ता बहुधा हातांत मुद्द्यांचें किंवा माहितीचें टिपण घेतल्यावांचून सभेंत एखाद्या महत्त्वाच्या विषयावर बोलतांना आढळणार नाहीं. कारण त्याला आपल्या विषयांतील विशिष्ट मुद्देच श्रोत्यांपुढें मांडावयाचे असतात व त्यांतील एखाददुसरा मुद्दा गळाला तर त्याचा भाषण करण्याचा हेतु तितक्या प्रमाणांत निष्फळ होतो. परंतु आपल्या देशांत या संबंधाची कल्पना वेगळी आहे. कोणी हातांत टिपण घेऊन बोलूं लागल्यास त्यानें वक्तृत्वास कमीपणा येतो असें लोक मानतात.

तात्यासाहेब यांच्या भाषणास वरील कसोटी लावली तर त्यांची गणना खऱ्या वक्त्यांत होणार नाहीं. त्यांचीं सार्वजनिक आयुष्यांतील पहिलीं पहिलीं भाषणें ज्यांनीं ऐकलीं असतील त्यांना एक गोष्ट खास आठवेल. ती गोष्ट ही कीं, ते जाहीर भाषण करण्यास येत तेव्हां त्यांच्या हातांत एखाददुसरें पुस्तक हें असावयाचेंच. त्याशिवाय त्यांना आधार वाटूंच नये. परंतु त्यांच्या इतर

गुणांप्रमाणें याहि गुणांत त्यांची विलक्षण प्रगति झाली असल्यामुळें आतांशा विशेष प्रसंगाशिवाय ते भाषणाच्या वेळीं पुस्तकें आणीत नाहींत. पण त्यांचा नेहमींचा सांप्रदाय असा आहे कीं, ज्या विषयावर बोलावयाचें त्या विषयाचा नीट अभ्यास केल्यावांचून व त्यावर चिंतन केल्यावांचून ते कधींहि घराबाहेर पडावयाचे नाहींत. भाषणाच्या वेळीं त्यांच्याजवळ मुद्द्यांचीं व माहितीचीं भरपूर टांचणें टिपणें असतात व स्मरणाकरितां ते मधून मधून तीं नजरे-खालीं घालतात. हीं टिपणें म्हणजे अत्यंत परिश्रमानें व व्यवस्थेनें तयार केलेली त्या त्या विषयाच्या माहितीची व मुद्द्यांची तपशीलवार यादी होय. अशा या टिपणांचें एक बाड त्यांचे घरीं मला पहावयास सांपडलें. तें पाहून क्षणभर असें वाटलें कीं, आहे हें असेंच बाड छापून काढलें तरी खऱ्या अभ्यासु गृहस्थास तें मार्गदर्शक होईलच; पण शिवाय मनोरंजकहि होईल.

कित्येक वक्त्यांना विषयाची तांत्रिक माहिती असलेली पुरते. तेवढ्या माहितीस आपल्या वक्तृत्वाचा, भाषाप्रभुत्वाचा, कल्पकतेचा व काव्यमय वर्णनाचा दुजोरा देऊन श्रोत्यांच्या डोळ्यांसमोर ते रम्य चित्र उभें करतात. पण हें त्यांस नेहमीं हटकून साधतेंच असें मात्र नाहीं. उडाला तर तो भुई-नळा, नाहीं तर केवळ तो मातीचा गोळा. तात्यासाहेब हे या थाटाचे वक्ते नव्हेत. किंबहुना ते वक्ते नसून झाडाचे लेखक आहेत. या कारणानें त्यांचीं भाषणें म्हणजे त्यांनीं लिहिलेले सुंदर लेखच होत. इतरांप्रमाणें त्यांचीं भाषणें कापरासारखीं हवेंत उडून जाणारीं नसतात. कारण ते आपलीं भाषणें अभ्यासपूर्वक तयार करीत असल्यामुळें एखादे वेळीं त्यांस आपल्याच भाषणा-चा मागाहून रिपोर्ट लिहिण्याचा प्रसंग आल्यास ते आपलें मूळचें भाषण जसेंच्या तसें सांगत सहज लिहून काढतात. प्रथम प्रथम त्यांचीं भाषणें थोडीं नीरस होत. परंतु आपलीं भाषणें रसभरित, मनोरंजक व परिणामकारक होण्याकरितां तीं कशीं सजविलीं पाहिजेत याची नस त्यांना अनुभवानें सांप-डली, व त्या योगानें त्यांचीं भाषणें त्यांच्या लेखाइतकींच आतां उत्कृष्ट वठूं लागलीं. 'जेथें पिकतें तेथें विकत नाहीं' हा अनुभव सर्वत्रच आहे. त्यास अनुसरून ज्या वक्त्यांची इतर गांवांत प्रसिद्धि ते वक्ते आपल्या गांवीं बोला-वयास उभे राहिले तर त्यांचें भाषण ऐकण्यास श्रोते बहुधा अगदींच मोजके जमतात. कारण श्रोते आपल्या मनाशीं म्हणतात, "माहीत आहे काय बोलणार आहेत तें" पण मौज अशी कीं, तात्यासाहेबांच्या बाबतींत तसें कधीं होत नसून उलट म्हणींस दार खाणी लागते. ते आज बोलणार आहेत त्या

अर्थी कांहीं तरी नवा मुद्दा काढतील, नवा विचार मांडतील, नवी कोटी लढवितील, नवी माहिती सांगतील अशी लोकांची समजूत असल्यानें त्यांचें भाषण ऐकण्यास श्रोत्यांची नेहमीं गर्दी उसळल्याखेरीज रहात नाहीं.

श्रोत्यांची काळजी वाहणारा त्यांच्यासारखा वक्ता विरळा ! श्रोत्यांचा वेळ वांया जाऊं नये व आपलाहि वेळ अनाठायीं खर्च होऊं नये इकडे त्यांचें नेहमीं लक्ष असतें. श्रोते कंटाळण्यापूर्वी त्यांचें भाषण संपलें नाहीं असा प्रसंग उभ्या जन्मांत कधीं घडला नसेल. थोड्या वेळांत मनोरंजकपणानें भरपूर माहिती देण्याकडे त्यांचा कटाक्ष असतो. त्यांच्या लेखनाप्रमाणें त्यांच्या भाषणांत कृत्रिमपणा कधींहि सांपडावयाचा नाहीं. पाल्हाळीकपणाचा तर त्यांस रागच आहे. थोडक्या शब्दांत अर्थपूर्ण लिहिणें–बोलणें हा आतां त्यांच्या हातचा मळ झाला आहे. म्हणूनच 'Great writers and speakers are commonly economic in the use of words' हें वर्णन त्यांस पूर्णपणें लागूं पडतें. पुष्कळजण वक्ते या नात्यानें आपला कांहीं विशेष अधिकार आहे, आपण गुरु आहों, उपदेशक आहों, व श्रोते शिष्य आहेत असा अहंकार बाळगून भाषणास प्रवृत्त होतात; परंतु तात्यासाहेबांच्या अंतःकरणास ही भावना केव्हांहि शिवत नाहीं. विनय हा तर त्यांचा स्वभावच आहे. ज्या अर्थी विशिष्ट विषयावर भाषण करण्यास आपण उभे आहों, त्या अर्थी सदर विषयासंबंधानें शक्य तितकी भरपूर माहिती देणें हें आपलें कर्तव्य आहे इतकाच विचार त्यांच्या मनांत असतो. मात्र तें ज्ञान मनोरंजक व्हावें, कंटाळवाणें होऊं नये या गोष्टीचा ते स्वतःस कधींहि विसर पडूं देत नाहींत. वक्तृत्वाचा प्रसंग हा कांहीं विशेष प्रसंग आहे असें ते स्वतः समजत नाहींत व श्रोत्यांनाहि भासवीत नाहींत. जणुंकाय चारचौघांत बसून खेळीमेळीनें आपण गप्पा गोष्टी करीत आहों अशा तऱ्हेचा घरगुतीपणाचा रंग ते आपल्या भाषणास आणतात, व ती त्यांची वृत्ति श्रोतृवृंदांतहि अल्पावकाशांत सहजच प्रतिबिंबित होते. त्यांचें भाषण हा काव्यशास्त्रविनोदाचा एक मासलाच असतो. हरिदास आपल्या कीर्तनांत सर्व दर्जाच्या लहान–थोर श्रोत्यांचीं मनें वेधून घेतात तोच प्रयत्न तात्यासाहेब भाषणप्रसंगीं करीत असल्यामुळें श्रोत्यांस त्यांचें भाषण म्हणजे एक चमचमीत मेजवानी वाटते. कदाचित् हरिदासांचेंच धोरण त्यांनीं आपल्यासमोर कित्यादाखल ठेवलें असावें. तात्यासाहेब आपल्या मुख्य विषयाचें निरूपण यथोचित व यथासांग करतीलच; पण त्याबरोबरच सदर निरूपणास एक दोन मजेदार गोष्टींनीं, दहा पांच

तेच हास्यप्रसंग नाटकांतील पात्राप्रमाणें त्याला करावे लागतात. फार काय पण कित्येक वक्ते ठराविक आवेशाचे शब्दहि तसेंच उच्चारतात! पण तात्यासाहेबांचें मात्र तसें नाहीं. नेहरूरिपोर्टाचा दौरा महाराष्ट्रांतील ठळक पांचसहा मंडळीसह तात्यासाहेबांनीं अनेक गांवीं काढला होता. त्यावेळीं त्या एकाच विषयावर प्रत्येक गांवीं ते बोलत असत. पण मौज अशी कीं, एकदां जें बोलले तें पुन्हां दुसरीकडे कधींहि ते बोलले नाहींत; पण विषय मात्र पूर्वीपेक्षांहि अधिक सरसपणानें ते रंगवीत. तसेंच होमरूलच्या चळवळीचे वेळीं वऱ्हाडांत त्यांनीं व्याख्यानांचा दौरा काढला होता. त्यावेळींहि लोकांस हाच अनुभव आला. त्यांच्या भाषणांत समर्पक दृष्टांत, रूपकें व उपमा विपुल असतातच; पण एकंदरींत सबंध भाषणांत कळकळ सांठविलेली असून शिवाय त्यावर वाङ्मयाची तकाकी झळकत असते, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. त्यांच्या भाषणांत बरींचशीं इंग्रजींतील अवतरणें येतात व इंग्रजीच्या खालोखाल संस्कृत वाङ्मयांतील विशेषतः मृच्छकटिक, मुद्राराक्षस वगैरे-सारख्या नाटकांतील उल्लेख असतात. संतकवींच्या मात्र ते फारसे वाटेस जात नाहींत! अलीकडे अलीकडे त्यांच्या भाषणांत क्वचित् प्रसंगीं वेदांत-ग्रंथांतील वचनांचा उल्लेख येत असल्याचें आढळून येतें.

तात्यासाहेबांना जात्या फारसे युद्धप्रसंग नकोत. पण पेशा तर सार्व-जनिक कार्यकर्त्याचा पडल्यामुळें ते कित्येक युद्धप्रसंग टाळीत असले तरी कांहींना त्यांना तोंड देणें भाग पडतें. त्यांपैकीं बरेचसे युद्धप्रसंग त्यांजवर त्यांच्या प्रामाणिकपणानें आणिले आहेत. कित्येक वक्त्यांचा प्रयत्न आपण बाजूस राहून श्रोत्यांना भरीला घालण्याचा असतो. असहकारितेच्या चळ-वळींत याचा अनुभव पुष्कळांना आला असेल. विद्यार्थ्यांनीं शाळा, कॉलेजें सोडावीं, वकिलांनीं कोर्ट-कचेऱ्यांची पायरी न चढावी व पुढाऱ्यांनीं कौन्सिलाकडे पाठ फिरवावी अशी त्रिविध प्रकारची ती चळवळ होती. या त्रिविध प्रकारांपैकीं वकील व पुढारी हे जाणते व सुबुद्ध असल्यानें त्यांना दुसऱ्या कोणीं उपदेश करण्याचें कारण नव्हतें. येऊनजाऊन उपदेशाला पात्र काय ते विद्यार्थी. त्यांजवर उठल्यासुटल्या सर्वांनीं शाळा-कॉलेजें सोडण्याच्या उपदेशाची झोड उठवावयाची. तात्यासाहेब यांना इतर पुढाऱ्यां-प्रमाणें या प्रसंगीं ह्या उपदेश करण्याची पाळी आली असतां ती चुकवून कसें चालेल! अशा परीक्षेच्या वेळीं त्यांनीं आपलें वर्तन प्रामाणिकपणाच्या बाण्यास धरूनच ठेवलें. जें स्वतःस पटलें नाहीं, तें दुसऱ्यास सांगावयाचें

तेच हास्यप्रसंग नाटकांतील पात्राप्रमाणें त्याला करावे लागतात. फार काय पण कित्येक वक्ते ठराविक आवेशाचे शब्दहि तसेच उच्चारतात ! पण तात्यासाहेबांचें मात्र तसें नाहीं. नेहरूरिपोर्टाचा दौरा महाराष्ट्रांतील ठळक पांचसहा मंडळीसह तात्यासाहेबांनीं अनेक गांवीं काढला होता. त्यावेळीं त्या एकाच विषयावर प्रत्येक गांवीं ते बोलत असत. पण मौज अशी कीं, एकदां जें बोलले तें पुन्हां दुसरीकडे कधींहि ते बोलले नाहींत; पण विषय मात्र पूर्वीपेक्षांहि अधिक सरसपणानें ते रंगवीत. तसेंच होमरूलच्या चळवळीचे वेळीं वऱ्हाडांत त्यांनीं व्याख्यानांचा दौरा काढला होता. त्यावेळींहि लोकांस हाच अनुभव आला. त्यांच्या भाषणांत समर्पक दृष्टांत, रूपकें व उपमा विपुल असतातच; पण एकंदरींत सबंध भाषणांत कळकळ सांठविलेली असून शिवाय त्यावर वाङ्मयाची तकाकी झळकत असते, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. त्यांच्या भाषणांत बरोंचशीं इंग्रजींतील अवतरणें येतात व इंग्रजीच्या खालोखाल संस्कृत वाङ्मयांतील विशेषतः मृच्छकटिक, मुद्राराक्षस वगैरे-सारख्या नाटकांतील उल्लेख असतात. संतकवींच्या मात्र ते फारसे वाटेस जात नाहींत ! अलीकडे अलीकडे त्यांच्या भाषणांत क्वचित् प्रसंगीं वेदांत-ग्रंथांतील वचनांचा उल्लेख येत असल्याचें आढळून येतें.

तात्यासाहेबांना जास्त फारसे युद्धप्रसंग नकोत. पण पेशा तर सार्व-जनिक कार्यकर्त्याचा पडल्यामुळें ते कित्येक युद्धप्रसंग टाळीत असले तरी कांहींना त्यांना तोंड देणें भाग पडतें. त्यांपैकीं बरेचसे युद्धप्रसंग त्यांजवर त्यांच्या प्रामाणिकपणानें आणिले आहेत. कित्येक वक्त्यांचा प्रयत्न आपण बाजूस राहून श्रोत्यांना भरीला घालण्याचा असतो. असहकारितेच्या चळ-वळींत याचा अनुभव पुष्कळांना आला असेल. विद्यार्थ्यांनीं शाळा, कॉलेजें सोडावीं, वकिलांनीं कोर्ट–कचेऱ्यांची पायरी न चढावी व पुढाऱ्यांनीं कौन्सिलाकडे पाठ फिरवावी अशी त्रिविध प्रकारची ती चळवळ होती. या त्रिविध प्रकारांपैकीं वकील व पुढारी हे जाणते व सुबुद्ध असल्यानें त्यांना दुसऱ्या कोणीं उपदेश करण्याचें कारण नव्हतें. येऊनजाऊन उपदेशाला पात्र काय ते विद्यार्थी. त्यांजवर उठल्यासुटल्या सर्वांनीं शाळा–कॉलेजें सोडण्याच्या उपदेशाची झोड उठवावयाची. तात्यासाहेब यांना इतर पुढाऱ्यां-प्रमाणें या प्रसंगीं हा उपदेश करण्याची पाळी आली असतां ती चुकवून कसें चालेल ! अशा परीक्षेच्या वेळीं त्यांनीं आपलें वर्तन प्रामाणिकपणाच्या बाण्यास धरूनच ठेवलें. जें स्वतःस पटलें नाहीं, तें दुसऱ्यास सांगावयाचें

नाहीं याचें नांव प्रामाणिकपणा व याचाच अर्थ जबाबदारीची जाणीव. या गुणांच्या परीक्षेस तात्यासाहेब त्या बिकट काळांत टिकले व त्याबद्दल त्यांस असहकारितेच्या पुरस्कर्त्यांकडून दूषणेंहि सहन करणें भाग पडलें. इतर अनेक गुणांप्रमाणें सहनशीलता हा त्यांच्या अंगीं ठळक गुण आहे. ते प्रतिपक्षाचे शंभर अपराध पोटांत घालतील. पण ही सहनशीलतेची मर्यादा संपल्यावर प्रतिपक्षाशीं युद्ध पुकारतील त्यावेळीं आपल्या कोटिक्रमानें, युक्तिवादानें, पुराव्यानें व एक प्रकारच्या विशिष्ट पद्धतीच्या उपहासानें प्रतिपक्षाचे ते राईराईएवढे तुकडे करतील.

असहकारितेच्या काळांत राष्ट्रीय शिक्षणाचा पुरस्कार त्यांनीं केला, पण तो त्यांनीं आपल्या पद्धतीनें केला. त्यांनीं विद्यार्थ्यांना सरसकट रीतीनें शाळा–कॉलेजें सोडण्याचा आग्रह केला नाहीं. पण ज्यांनीं सरकारी शिक्षण-संस्था सोडल्या, त्यांच्याकरितां टिळक-महा-विद्यालय स्थापण्यांत पुढाकार घेऊन स्वतंत्र अशा राष्ट्रीय शिक्षणाची त्यांनीं सोय केली. तथापि तेवढ्यानें राष्ट्रीय शिक्षणाच्या ' कट्या ' पुरस्कर्त्यांचें समाधान न होऊन एका बाजूस राष्ट्रीय शिक्षणाचे हे मोठे कैवारी (!) व दुसऱ्या बाजूस तात्यासाहेब केळकर असा सामना शिवाजीमंदिरांत झडला. त्या प्रसंगीं तात्यासाहेबांनीं प्रतिपक्षास मनमुराद बोलूं दिल्यामुळें तो वाद दोनतीन दिवस भरास येऊन चांगलाच रंगला व अखेर तात्यासाहेबांनीं आपली बाजू मांडून प्रतिपक्षाचे सर्व मुद्दे खोडून काढले. या भाषणांत त्यांचे वरील सर्व गुण चांगलेच प्रत्ययास आले. प्रतिपक्षावर हल्ला चढवितांना प्रथम त्याचा पूर्वपक्ष स्वतःच मांडावा व एक एक मुद्दा खोडून काढावा अशी त्यांची न्यायाधीशासारखी पद्धत आहे. तसें करीत असतां ते विकारवश होत नाहींत, यामुळें तर त्यांचीच बाजू खरी असल्याबद्दलचा श्रोत्यांचा समज सहजच दृढावतो. आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे अशा युद्धप्रसंगीं कोणासहि अन्याय न व्हावा म्हणून डोळ्यांत तेल घालून ते जपत असतात. यामुळें केळकर ज्या पक्षास आहेत तो पक्ष न्यायाचा व सत्याचा आहे असा श्रोत्यांचा पूर्वग्रह असतो व तो तात्यासाहेबांस उत्कृष्ट वक्तृत्वापेक्षांहि अधिक लाभदायक होतो. पालघर येथें ठाणें-जिल्हा-परिषद भरली असतां बॅ. जमनादास मेहता व तात्यासाहेब यांच्यांत विरोध आला. त्यावेळीं तात्यासाहेबांपुढें मेहतांच्या वक्तृत्वाचें तेज दिपून गेलें. त्या बाबतींत स्वा[illegible]पणाप्रमाणेंच विद्वत्ता, प्रामाणिकपणा व तळमळ या गुणांच्या जोरावर तात्यासाहेबांनीं ती सभा जिंकली.

गंगाप्रवाहाप्रमाणें तात्यासाहेब यांची भाषणपद्धति मूळची शांत व गंभीर अशा प्रकारची आहे. खळखळाट, आवेश, क्षोभ हे प्रकार त्यांच्या भाषणांत नैमित्तिकच उत्पन्न होतात. भाषणप्रसंगीं कोणी त्यांस विनाकारण डंवचलें किंवा विरोध करणारा प्रतिपक्षी त्यांच्या बरोबरीचा भेटला अगर अन्यायानें त्यांजवर कोणी हल्ला केला अथवा दुष्टपणानें त्यांची कोणी कुचेष्टा केली तर एकदम शांतवृत्तीच्या म्यानांतून त्यांचें वक्तृत्वखड्ग बाहेर पडून तळपावयास लागतें व अशा वेळीं त्यांचें भाषण आवेशयुक्त होऊन फारच परिणामकारक होतें.

मतभेदामुळें पक्षोपपक्ष उत्पन्न होऊन त्यांचे तट पडले असतां तात्यासाहेब प्रत्येक पक्षांतील अनुकूल मुद्दे एकत्र करून त्यांतून सामान्यपणें समान भूमिका सिद्ध करण्याचा प्रयत्न करितात, व अशा त्या भूमिकेवर सर्व पक्षांचीं तोंडें एकत्र करणें हा तर त्यांचा हातखंडा आहे. तसेंच निरनिराळ्या पक्षांत बेबनाव उत्पन्न होऊन वखेडा होण्याचा प्रसंग आला असतां त्यांच्यांत तडजोड काढून समेट घडवून आणणें हा केळकरांच्या स्वभावांतील असाधारण गुण होय. या गुणाचा प्रभाव त्यांच्या जाहीर भाषणांतूनहि अनेक वेळां दृष्टीस पडला असून त्या योगें अनेक व्यक्तींचे तुटलेले स्नेहसंबंध पुन्हा जडले आहेत व कित्येक संस्थांवरील संकटांचें निवारणहि झालें आहे.

मराठीप्रमाणें इंग्रजींतहि भाषणें करण्याची त्यांच्यावर पाळी आली. याला कारण त्यांचें ' मराठा ' पत्राचें संपादकत्व. ते मराठा पत्राचे संपादक असल्यामुळें राष्ट्रीय सभेंत व परप्रांतांत भाषणें करण्याची त्यांजवर साहजिकच जबाबदारी पडली. मुळांत हौस असल्यामुळें, अभ्यासानें व पुष्कळ वर्षांच्या संवयीमुळें ते इंग्रजी लेख माहितीच्या तसेंच भाषेच्याहि दृष्टीनें उत्कृष्ट लिहितात. जी त्यांची समजूत लेखांच्या बाबतींत तीच भाषणांच्या बाबतींत. आपलीं इंग्रजी भाषणें माहितीनें भरलेलीं असावींत व त्यांची इंग्रजी भाषाहि उत्कृष्ट असावी अशी त्यांची इच्छा असल्यामुळें ते आपलीं महत्त्वाचीं इंग्रजी भाषणें अगोदर लिहून काढल्यावांचून सहसा करीत नाहींत. त्यांचें पहिलें इंग्रजी भाषण सन १८९७ सालीं उमरावतीस भरलेल्या राष्ट्रीय सभेंत झालें. त्यावेळीं त्यांचें वय अवघें पंचवीस वर्षांचें होतें. तो त्यांच्या सार्वजनिक आयुष्यक्रमाचा प्रारंभ होता. तेव्हांपासून गेल्या पस्तीस वर्षांत त्यांचो इंग्रजी भाषेवरील प्रभुत्वाच्या दृष्टीनें एकसारखी प्रगतिच होत गेली असून तिचा परिणाम त्यांच्या भाषणावर झाल्यावांचून राहिला नाहीं.

मराठींतून भाषण करतांनाहि त्यांना श्रम पडतातच; पण मला वाटतें, त्याहिंपेक्षां इंग्रजी भाषणाचे वेळीं त्यांना ते जास्त पडतात. म्हणून इंग्रजी बोलण्याचा प्रसंग ते आपण होऊन आपल्यावर सहसा ओढवून घेत नाहींत. कारण इंग्रजी लिहिण्याची त्यांना जितकी संवय आहे तितकी ती इंग्रजी भाषणाची नसावी. ही अडचण त्यांना एकट्यांनाच आहे असें नाहीं; तर बहुधा सर्वच महाराष्ट्रीय पुढाऱ्यांना आहे. महाराष्ट्रीयांचा व्यवहार सारा मराठींतूनच चालतो. त्यांच्यांत कोणी बडे कारखानदार नाहींत, कोणी प्रचंड पेढीवाले नाहींत अगर मोठे व्यापारीहि नाहींत. यामुळें संभाषणाचा व महत्त्वाच्या कामकाजाचा संबंध इंग्रजी भाषेशीं व इंग्रज लोकांशीं फार थोडा येतो. याचा परिणाम एकंदरीनें असा झाला आहे कीं, नांव घेण्याजोगे इंग्रजी वक्ते महाराष्ट्रीयांत कमी. तथापि जे थोडे वक्ते आहेत त्यांत तात्यासाहेबांचा दर्जा बराच वरचा लागेल. वक्तृत्वास नैसर्गिक आवाजाची अनुकूलता त्यांना नसतांहि त्यांनीं इतर रीतीनें या कामीं इतकें यश मिळविलें हेंच विशेष आहे. पण याचें आश्चर्य वाटावयास नको. कारण बुद्धि व यत्न हीं त्यांचे ठिकाणीं एकवटली असल्यामुळें या दोनहि गुणांच्या संगमाचा जो स्वाभाविक परिणाम व्हावयाचा तो येथेहि घडून आला आहे. त्यांचें नांव साऱ्या हिंदुस्थानांत मशहूर आहे याला त्यांचें राजकीय कर्तृत्व, इंग्रजी लेखनपटुत्व व विद्वत्त्व कारणीभूत आहेच; त्याखेरीज त्यांचें इंग्रजी वक्तृत्वहि कारणीभूत आहे हें विसरून चालणार नाहीं. सन १९२४ सालीं लोहगांवचा अर्जुना व सोल्जर चोकर यांच्या खटल्याचे निमित्तानें केसरीनें केलेल्या टीकेमुळें मुंबई हायकोर्टाची बेअदबी झाल्याबद्दल केसरीवर खटला होऊन त्यांत त्यास ९२०० रुपये दंड ठोठावण्यांत आला. यावेळीं केळकर यांनीं मुंबई हायकोर्टांत स्वतः खटला चालविला होता. त्याप्रसंगीं त्यांनीं हायकोर्टांत केलेलें विस्तृत भाषण त्यांच्या उत्कृष्ट इंग्रजी भाषणाचा एक नमुना आहे. तसेंच, ते असेंब्लीचे सभासद असतां त्यांनीं पब्लिक सेफ्टी बिलास विरोध करितांना जें भाषण केलें तें त्यांच्या स्वतःच्याहि मतें समाधानकारक वठलें असें त्यांनीं एका गृहस्थाजवळ म्हटलेलें प्रस्तुत लेखकास माहीत आहे. असेंब्लींतील वरील विषयावरील त्यांचें भाषण संपल्यावर सरकारचे फॉरेन सेक्रेटरी सर डेनिस ब्रे म्हणजे ज्यांनीं मूळ पब्लिक सेफ्टी बिल असेंब्लींत मांडलें त्यांचें भाषण झालें. त्यांनीं प्रारंभींच तात्यासाहेबांच्या संबंधीं काढलेले उद्गार नमूद करण्यासारखे आहेत. ते म्हणाले—

"Ordinarily, Sir, when my honourable friend Mr. Kelkar gets up to speak I settle myself down in my chair for a delightful half hour. For, I greatly enjoy his charm of manner, his urbanity of speech, his delightful quips and literary anecdotes, his touches of humour, the tolerance and moderation of his views."

इंग्रजी भाषणापेक्षां त्यांचीं मराठी भाषणें अधिक सरस वठतात. आजपर्यंत त्यांचीं शेंकडों भाषणें मराठींत झालीं असतील व त्यांत उत्तमहि अनेक असतील. पण त्या सर्वांत अतिउत्कृष्ट म्हणून एका भाषणाचा उल्लेख करावयाचा असेल, तर तो १९२२ मध्यें यवतमाळ येथें स्वराज्यसंघाच्या परिषदेनिमित्त लो. टिळकांच्या स्मारकयोजनेवर त्यांनीं केलेलें भाषण होय. या भाषणाची रसिकवर्य श्रीमंत दादासाहेब खापर्डे व लोकनायक बापूजी अणे यांनीं खासगी रीतीनें किती तरी प्रशंसा केली असल्याचें मीं ऐकिलें आहे. मराठींतून त्यांनीं अनेक नात्यांनीं भाषणें केलीं आहेत. अध्यक्ष नात्यानें भाषण असें त्यांनींच करावें असा त्यांचा लौकिक आहे. उपस्थित विषयाचा मोठ्या कौशल्यानें समन्वय करून शेवटीं सर्व मुद्दयांचा समारोप करण्याची उत्कृष्ट कला तात्यासाहेबांना फारच श्रेष्ठ प्रतीची साधली आहे. वस्तुतः अध्यक्षाच्या भाषणाला फारसें महत्त्व नाहीं अशी सामान्य समजूत आहे; परंतु तात्यासाहेब यांनीं आपल्या विशिष्ट पद्धतीनें ही समजूत पार बदलून टाकली आहे. माहिती, मुद्देसूदपणा, नावीन्य, कोटिक्रम, समतोलपणा, विनोद यांपैकीं कोणत्याना कोणत्या गुणांनीं ते अगोदरच्या सर्व व्याख्यात्यांवर पुष्कळ वेळां ताण करतात. बडोद्यास भरलेल्या महाराष्ट्र साहित्यसंमेलनाचे ते अध्यक्ष होते. त्यांचें तें अध्यक्षीय भाषण हा मराठी साहित्यांतील एक उत्कृष्ट मासला समजला जातोच, पण त्याखेरीज त्यांनीं त्यावेळीं श्रीमंत सयाजीराव महाराज यांजविषयीं गुणगौरवपर व आभारप्रदर्शक असें जें आयत्या वेळीं स्फूर्तीनें वेगळें भाषण केलें, तें कित्येक विद्वान् साहित्यभक्त आजहि नावाजीत आहेत. अध्यक्षाची साधी सूचना मांडणें किंवा अनुमोदन देणें अथवा उपवक्ता म्हणून बोलणें या गोष्टी अगदीं सामान्य आहेत. तरी या वेळीं सुद्धा त्या त्या प्रसंगांची मांडणी नवीन प्रकारानें करून ते श्रोत्यांचीं मनें नेहमीं हस्तगत करितात. ही त्यांची पद्धति महाराष्ट्रांत इतकी सर्वमान्य झाली आहे कीं, तिचें अनुकरण अलीकडे सर्वत्र होऊं लागलें आहे. त्यांनीं आपल्या भाषणशैलीनें

श्रोत्यांच्या अभिरुचीस विशिष्ट वळण लावलें असल्यानें निदान पुण्यांतील श्रोत्यांवर छाप ठेवणें इतर पुष्कळ वक्त्यांना जड जातें. भव्य मुद्रा, मोठा आवाज, अस्खलितपणा, वीरश्री, अभिनय, इत्यादि गुणांनीं मंडित अशा वक्त्यांची महाराष्ट्रांत वाण नाहीं. वाण असेल तर ती संकल्पित विषयावरील भरपूर माहितीची, अभ्यासाची, चिंतनाची, विचारशक्तीची व औचित्याची. श्रीसमर्थहि निराळ्या तऱ्हेनें असेंच सांगतात कीं—

वक्तृत्वाच अधिकार। अभ्यास न घडे सत्योत्तर॥
वक्ता पाहिजे साचार। अनुभवाचा॥

वरील सर्व गुण फारच थोड्या वक्त्यांत असल्यानें तात्यासाहेब केळकर व इतर वक्ते एकाच व्यासपीठावरून बोलत असतां तात्यासाहेबांचेपुढें इतर वक्ते सहजच फिक्के पडावे, हें स्वाभाविकच आहे.

सार्वजनिक रीतीनें भाषणें करण्यांत तात्यासाहेबांच्या आयुष्याचीं ३०।३५ वर्षें गेलीं. त्यामुळें त्यांना या पद्धतीचा अलीकडे कंटाळा वाटूं लागला आहे. म्हणून बसून संभाषण करण्याच्या पद्धतीचा ते शक्य तेव्हां अवलंब करतात. संभाषणपद्धति याचा अर्थ असा कीं, भोंवतालीं बसलेल्या लोकांनीं त्यांना निरनिराळ्या मुद्द्यावर प्रश्न विचारावे व त्यांना तात्यासाहेबांनीं उत्तरें द्यावीं. ही पद्धति विलायतेंत अवलंबण्यांत येते; पण ती साहजिकच फार अवघड आहे. कारण, श्रोता काय विचारील याचा नियम नसतो. त्याला दाही दिशा मोकळ्या; पण उत्तर देणाराला मोकळीक मुळींच नाहीं. त्यानें विचारल्या प्रश्नाला समर्पक उत्तर द्यावें, नाहींपेक्षां आपलें अज्ञान कबूल करावें. पण अशाचा परिणाम, श्रीसमर्थ म्हणतात, असा होतो कीं, "उत्तर विलंबीं पडिलें। श्रोतयांस कळों आलें॥ म्हणजे महत्त्व उडालें। वक्त्याचें॥" म्हणून ही पद्धति फारच अवघड, अतएव वक्त्याच्या परीक्षेची आहे. नेहमींच्या व्याख्यात्याला तशी अडचण नसते. त्यानें आपल्या मनाशीं विषय ठरवावा व तो तास दीडतास बोलून संपवावा. सदर विषयासंबंधानें श्रोत्यांना कांहीं शंका उरल्या असल्या तरी त्याची जबाबदारी व्याख्यात्यावर नाहीं. पण तात्यासाहेब ही सोपी वाट सोडून प्रश्नोत्तराची बिकट वाट पत्करितात, यांतच त्यांचा हजरजबाबीपणा, पक्षप्रज्ञता व आत्मविश्वास सिद्ध होतो यांत शंका नाहीं. आणि असे प्रसंग त्यांनीं ज्या ज्या वेळीं उपस्थित केले, त्या त्या वेळीं त्यांत त्यांनीं पूर्ण यशच मिळविलें आहे हें सांगण्यास आनंद वाटतो.

# ११ केळकर व इतिहास

(श्री. दत्तात्रय विष्णु आपटे, बी. ए., पुणें.)

राजकीय विषयाची चर्चा करण्यासाठीं चालविलेल्या केसरी पत्राचे संपादक व संचालक रा. तात्यासाहेब केळकर हे अनेक प्रसंगीं इतिहासांत लक्ष घालतांना आढळतात. त्यामुळें साहजिक असा प्रश्न उत्पन्न होतो कीं असें कां असावें ? ही त्यांची वैयक्तिक आवड असेल कीं 'अव्यापारेषु व्यापार' असेल किंवा हा कर्तव्यकर्माचाच भाग आहे असें त्यांना वाटत असेल ? यांपैकीं कांहींहि असलें तरी केसरीचे संपादक या नात्यानें इतिहासांत लक्ष घालण्याची केळकरांनीं नव्यानें प्रथा पाडली असें मात्र म्हणतां येणार नाहीं. केसरीचे संस्थापक विष्णुशास्त्री चिपळुणकर यांनीं हें पत्र काढण्यापूर्वी 'इतिहास' या विषयाचा पुरस्कार आपल्या प्रतिभासंपन्न लेखणीनें निबंधमालेंत केला होता आणि त्यामुळें राजवाड्यांसारख्यांना इतिहासाच्या कार्यास वाहून घेण्याची प्रवृत्ति झाली. इतकेंच नव्हे तर त्यांच्या देशाभिमानाच्या भावनेस ऐतिहासिक भावनेचाच मुख्य आधार होता, ही गोष्ट त्यांच्या चरित्रकारानें मुद्दाम नमूद केली आहे. लोकमान्य टिळकांचाहि प्रकार अशातलाच होता. राजकीय व्याप संभाळून देखील त्यांनीं वेदांचें प्राचीनत्व व गीतेचें रहस्य शोधण्यांत जो तऱ्हेच्या तऱ्हे अखंड व्यासंग चालू ठेवला तो लक्षांत घेतला असतां राजकारणाचे अत्यंत कठिण प्रश्न सोडविण्यास जी बुद्धीची तीव्रता अवश्यक असते, व तिला स्फूर्ति व्हावी लागते ती होण्यास ऐतिहासिक संशोधनाचा व चिंतनाचा व्यायाम उपयोगीं पडतो, हा त्यांचा जणु कांहीं अनुभव असावा असें वाटूं लागतें. याखेरीज रायगड येथील शिवाजीस्मारक कल्पना काढून व शिवाजी-उत्सवाची त्यास जोड देऊन जी प्रचंड जागृति त्यांना महाराष्ट्रांत करतां आली तिच्यामुळेंहि या विषयाची महती त्यांना वाटली असेल. एरव्हीं अनेक ऐतिहासिक प्रश्नांच्या चर्चेस केसरींत त्यांनीं रकानेच्या रकाने खर्ची घातले नसते किंवा राजवाडयांच्या चौथ्या खंडाच्या परीक्षणाचा प्रसंग साधून स्वतः संशोधनात्मक निबंध लिहिण्याचा किंवा 'जेधे-शकावली' सारखा कागद आस्थेनें इतिहासमंडळास सादर करण्याचा त्यांनीं खटाटोप केला नसता. त्यांच्या मागून केळकरांनींहि ही परंपरा अखंड चालू ठेवली आहे. यावरून असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं, केळकरांचा हा 'अव्यापारेषु व्यापार'हि नव्हे

किंवा केवळ वैयक्तिक आवड असेंहि नव्हें; महाराष्ट्रांतील जबाबदार वर्तमानपत्राच्या संपादकांत आढळणारी ही एक अंतःकरणाची सहजप्रवृत्ति आहे. किंबहुना 'कर्तव्याकर्तव्याविषयीं संदेह उत्पन्न झाल्यावेळीं अंतःकरणाची सहजप्रवृत्ति हेंच प्रमाण मानावें' या कालिदासोक्तीचेंहि हें प्रत्यंतर असण्याचा संभव आहे. याकरितां राजकारण व ऐतिहासिक प्रवृत्ति यांचा संबंध नित्य आहे कीं अनित्य आहे हें आधीं पाहिलें पाहिजे.

हा संबंध नित्य आहे असें दिसत नाहीं. इंग्लंडांत केवळ राजकीय विषयास वाहिलेलीं वर्तमानपत्रें चालतात. किंवा जास्त बारकाईची भाषा योजून असें ह्मणतां येईल कीं, विलायतेंत प्रत्येक राजकीय पक्षाची बाजू लोकांपुढें मांडून लोकमत आपल्याकडे वळवून घेण्यासाठीं एकेक वर्तमानपत्र तेथें चालविण्यांत येतें. मात्र तिकडची एक विशेष गोष्ट या बाबतींत लक्षांत ठेवली पाहिजे; ती ही कीं, विरुद्ध पक्षाच्या चुका दाखवून देण्यासाठीं जशी त्यांना टीका करावी लागते तशी राष्ट्राचें हित साधण्यास अमुक मार्ग श्रेयस्कर आहे असा विधायक कार्यक्रम दाखवून द्यावा लागतो. बहुमत ज्या कार्यक्रमास अनुकूल असेल त्या पक्षाच्या हातीं सर्व राज्याचें चालकत्व यावयाचें असल्यामुळें दूरवर विचार करून आपण नवीन कल्पना काढली व तिची इष्टता लोकांना पटवून दिली, तरच राष्ट्रकार्य घडवून आणल्याचें श्रेय आपणांस मिळणार आहे, अशी तेथील पुढाऱ्यांना खात्री वाटते. यामुळें राजकीय विचारांत लक्ष घालणाऱ्यांना तिकडे प्रोत्साहक परिस्थिति आहे आणि विटीदांडूच्या किंवा क्रिकेटच्या खेळांत ज्याप्रमाणें अलटूनपालटून राज्य घेण्याची पाळी येत असल्यामुळें डावास रंग चढतो आणि खेळगड्यांच्या सर्वांगीण व्यायामास मदत होते, तद्वत् तिकडे दोन पक्षांच्या चुरशीच्या सामन्यांत मोठमोठ्या राजकीय तत्त्वांचा शोध लागतो आणि लोकांना राजकारणाचें उत्तम शिक्षण मिळतें. या सर्व कामांत वर्तमानपत्र हें महत्त्वाचें साधन असल्यामुळें संपादक हें स्थान अत्यंत मानाचें गणलें जातें.

हिंदुस्थानांतहि राजकीय विषयास वाहिलेलीं वर्तमानपत्रें आहेत. लोकजागृति हेंच त्यांचें ध्येय आहे; आणि बुद्धीच्या व सात्त्विकपणाच्या जोरावर त्यांच्या संपादकांनीं लोकांचा आदर संपादन केला आहे. बहुमत त्यांच्या ह्मणण्यास अनुकूल आहे याबद्दल कोणास शंका नाहीं. पण बहुमत असलें तरी पुढें काय! कांहींच नाहीं. विलायतेंत बहुमतवाल्या पक्षाचें लग्न प्रत्यक्ष राजलक्ष्मीशीं लागतें. आणि आमच्या येथें बहुमतवाल्या वर्तमानपत्राच्या संपा-

दकाला जो सोहळा भोगावा लागतो त्याचें वर्णनच कशाला करावयाला पाहिजे ? तो आतां लहानांपासून थोरांपर्यंत आणि बायकांपासून पुरुषांपर्यंत सर्वांच्या परिचयाचा आहे. अशा परिस्थितींत राजकीय जागृतीसाठीं हातीं घेतलेल्या कलमानें तें काय करावें ? त्या कलमाचें कलमबंदीशीं लग्न लागलें असल्यामुळें त्यानें फार तर दरबारच्या हकीकती लिहाव्या किंवा अधिकाऱ्यांच्या बदल्या व नेमणुकाहि द्याव्या. पण यानें लोकांचें राजकीय शिक्षण होईल किंवा संपादकाच्या बुद्धीची वाढ होईल असें म्हणतां येत नाहीं.

अशा परिस्थितींत अधूनमधून सिंहावलोकन करणें हा केसरीचा सहज स्वभाव आहे. पुढें जाण्याऐवजीं मागें वळून पाहणें कधींकधीं हितावह आणि स्फूर्तिकारक असतें. राजकीय लेख लिहिणें हा कांहीं केसरीच्या संपादकांचा कुळधर्म नव्हे; किंवा इतर विषय लिहिल्यानें म्हणजे पत्र बाटेल, असेंहि समजण्याचें कारण नाहीं. स्वतःच्या बुद्धीस चालना मिळेल, लोकांची बुद्धि वाढेल आणि त्यांचा आत्मविश्वास दुणावेल असे कोणतेहि उपाय योजण्यास त्यांना कोण व कसा प्रतिबंध करणार ? निदान महाराष्ट्रांतील लोकांपुढें तरी हा इतिहासाचा उत्तम मार्ग मोकळा आहे; आणि त्याची जोपासना राजवाडे व खरे यासारख्यांच्या तपस्वी लेखणीनें केलेली असून, हा विषय लोकांच्या परिचयाचा झालेला आहे. बुद्धि, कर्तबगारी व संघटना यांची वाढ होण्यास यांत वाटेल तेवढा वाव आहे. यांत म्हणजे कोणीं दुसऱ्यांनीं आम्हांला ' वाटोळी परिषद् ' भरवून अधिकारदान केलें नाहीं तर लोकांचा मार्ग खुंटेल असें मुळींच नाहीं. इच्छा असली आणि खांद्यावर डोकें शिल्लक असलें कीं, महाराष्ट्रांतील कोणत्याहि खेड्यांत जा किंवा शहरांत असा, इतिहासांत प्रगति करण्याचा मार्ग खुला आहे. शिवाय हा मार्ग आक्रमीत असतां पूर्वजांचे गुण घेऊन दोषांचें क्षालन करण्यास चांगला अवकाश आहे. मराठेशाहींत महाराष्ट्र शब्दाचा जो संकुचित अर्थ दृष्टीपुढें येत होता आणि ज्यामुळें महाराष्ट्र दुभंगला किंवा तिभंगला असें आपल्या लक्षांत येतें, ती संकुचित दृष्टि सोडून खऱ्या महाराष्ट्राची व्याप्ति ठरविण्यास कोणाची आडकाठी येण्याजोगी नाहीं. शिवाजी महाराजांप्रमाणें ज्ञानेश्वर व भास्कराचार्य आणि पेशवाईप्रमाणें देवगिरीच्या यादवांची अमदानी महाराष्ट्राला एकसारखीच अभिमानास्पद व आपलेपणाच्या भावनेनें संशोधनास योग्य आहे हें पटवून घेतल्यास व पटवून दिल्यास महाराष्ट्रांतील बुद्धीची, संघशक्तीची त्याचप्रमाणें एकजुटीचीहि वाढ होण्यास किती तरी

याव आहे. हा मार्ग झटपट रंगाऱ्याचा नव्हे, सावकाशीचा आहे; पण सावकाशीचा असला तरी खात्रीचा व पायाशुद्ध आहे. तेव्हां केसरीकारांनीं ही वाट काढणाऱ्यांचा गौरव केला, त्यांच्याशीं सहकार्य केलें आणि आपणहि त्या वाटेनें चालून पाहिलें हें यथायोग्यच झालें. तथापि याहि मार्गांत गैरसमज उत्पन्न होण्यास अवसरच नाहीं असें म्हणतां येत नाहीं. राजकारण व इतिहास यांची सांगड घातली तर संगतीचा दोष इतिहासास बाधण्याचा संभव हा असावयाचाच. अशा वेळीं कोणत्या मात्रेचा वळसा द्यावा याबद्दल दे. भ. केळकरांना आलेला अनुभव उपयुक्त असल्यामुळें येथें सांगून ठेवण्यास हरकत नाहीं.

मुंबईचे एक कौन्सिलर ना. मि. मॉरिसन हे सन १९११ सालीं वादाच्या भरांत केळकरांना म्हणाले, "तुमच्या मनांत दोन प्रकारचे विचार घोळतात; एक तर तुम्हांला तुमचें स्वतःचें मराठेशाही राज्य गेलें याबद्दल वाईट वाटतें. व दुसरें तुम्हांला असें वाटतें कीं, आम्हां इंग्रजांना तावडतोब आपलें चंबुगवाळें घेऊन हिंदुस्थानांतून बाहेर घालवून द्यावें." यावर केळकरांनीं तावडतोब उत्तर दिलें, "आपण मजवर दोन आरोप ठेवले आहेत. पैकीं पहिल्या आरोपाची मी कबूली देतों. खरेंच आहे! शंभर वर्षांच्या पलीकडे अगदीं याच (पुणें) शहरांत आमच्या मराठे लोकांचें राज्य होतें, याबद्दल मला अभिमान वाटतो व तें नष्ट झालें याबद्दल मनापासून दुःख होतें. पेशवाई पाहिलेल्या माणसांबरोबर प्रत्यक्ष बोललेल्या माणसाशीं जर आम्हांला आज बोलतां येतें, इतकी पेशवाई अलीकडची, तर आम्ही तिची आठवण विसरूं म्हटलें तरी आम्हांस विसरतां येणार नाहीं. आणि तिची आठवण होऊन खेद वाटणें मनुष्यस्वभावास अनुसरूनच आहे. पण दुसरा आरोप मात्र खरा नाहीं. पेशवाईच्या गुणांबरोबर आम्हांला तिचे दोषहि आठवतात. शिवाय, मराठेशाही पुनः प्रस्थापित व्हावी अशी आमची इच्छा आहे असें घेऊन चाललें तरी, इष्टानिष्ट, शक्याशक्य यांच्या मधला विवेक करण्याची बुद्धि मला काय, किंवा माझ्या मताच्या इतरांना काय, ईश्वरानें दिलीच नाहीं असें आपण कसें मानतां!—"( मराठे व इंग्रज उत्तरार्ध पृ. १४४।१४५ )

यावरून राजकारण व इतिहास यांचा नित्यसंबंध इंग्लंडांत दिसला नसला तरी तो महाराष्ट्रांतील वर्तमानपत्रांच्या बाबतींत चालू काळांत तरी निश्चय आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. शिवाय "अंगावर पडलें म्हणजे कर्तेपण येतें आणि कोणत्याहि कामाचें खरें शिक्षण प्रत्यक्ष काम करण्यांत जसें मिळतें

तसें इतर कोठें मिळणें शक्य नाहीं; आज हिंदुस्थानांत विलायतेतून तरणी-बांड तिशीच्या आंतील युरोपियन मुलें सिव्हिल सर्विस परीक्षा देऊन कारभार करतात हें पाहून आपण मोठें कौतुक करतों; पण मराठेशाहींत जेव्हां मोठा कारभार करण्यास वाव होता, तेव्हां लहान वयाच्या मुलांनींच मोठमोठीं कामें केलेलीं आढळून येतील. जेथें वावच नाहीं तेथें केस पिकले तरी नालायखीच वाटण्यास यावयाची ! " या केळकरांच्या प्रतिपादनाचा हाच निष्कर्ष दिसतो कीं महाराष्ट्रांत कर्तबगारी आहे, बुद्धि आहे, हिंमत आहे; पण हे गुण बाहेर पडण्यास वावच नसेल तर त्यांचा परिपोष होण्याऐवजीं ते कमी होतील. ही अनिष्ट स्थिति टाळण्यासाठीं कार्याला स्फूर्तिवर्धक आणि कांटेरी कुंपणानें मर्यादित न झालेलें असें क्षेत्र लोकांना दाखविलें पाहिजे.

महाराष्ट्रांतील लोक मानाचे भोक्ते नाहींत, ते कामाचे भुकेले आहेत. त्यांना आळसाचा तिटकारा आहे. कामें लहान असोत कीं, मोठीं असोत तीं अंगावर घेऊन पार पाडावीं ही ईर्षा महाराष्ट्रांत वाढत्या प्रमाणावर दिसत आहे. अशा परिस्थितींत केळकरांचे ऐतिहासिक बाबतींतले परिश्रम मार्गदर्शक झाल्यावांचून खास रहाणार नाहींत. त्यांनीं अध्यक्ष म्हणून वक्ते म्हणून, इतिहासमंडळाचे कार्यकर्ते सभासद म्हणून, शिवचरित्रकार्यालयाचे उत्पादक म्हणून, ग्रंथप्रर्ते म्हणून, ऐतिहासिक ग्रंथांचे परीक्षणलेखक म्हणून जी कामगिरी केली आहे ती तपशीलवार देऊं गेल्यास ही यादी वरीच लांबलचक होईल. पण हा लेख अशी यादी देण्याच्या हेतूनें लिहिलेला नाहीं किंवा ती येथें देण्याचें प्रयोजनहि नाहीं. कारण या ग्रंथांत अन्यत्र दिलेल्या उताऱ्यांवरून ( भाग २ पृ. १–३३ ) व कोष्टकांवरून त्यांच्या उद्योगाची कल्पना कोणा-सहि येण्याजोगी आहे. तथापि ती यादी लांबलचक होईल असा मुद्दाम उल्लेख करण्याचा हेतु इतकाच कीं, त्यांच्या पाठीवरला इतिहासाचा भार त्यांच्यावर कोणीं वळेंच लादलेला नाहीं; तो त्यांनीं आपण होऊन हौसेनें व कर्तव्यबुद्धीनें उचलला आहे. यामुळें त्यांच्या कामाची यादी लांब झाली किंवा पाठीवरलें ओझें अधिक झालें तरी त्यांनीं त्याबद्दल विषाद मानल्याचें किंवा ' आपण ही नसती उठाठेव करीत आहों ' असे विचार मनांत आणल्याचें केव्हांहि आढळून आलें नाहीं. उलट हें काम आपल्या हातून झालें, याबद्दल त्यांना समाधानच वाटत असावें. यामुळेंच ते इतिहासाच्या कार्यांत निरलसपणें झटतात व या विषयींच्या चर्चेतहि सामील होतात. ' मला फुरसत नाहीं ' हें वाक्य इतिहासाच्या वांट्याला तरी त्यांनीं सांगितल्याचें दिसत नाहीं.

---

## १२. केळकरांचें ऐतिहासिक लिखाण

( प्रो. दत्तो वामन पोतदार, बी. ए., पुणें. )

महाराष्ट्र हा देश एका दृष्टीनें मोठा भाग्यशाली आहे. येथें श्रीज्ञानेश्वर-प्रभृति संतशिरोमणि आणि श्रीशिवछत्रपतिप्रभृति राजशिरोमणि चमकून गेले आणि त्यामुळें साहित्य व स्वातंत्र्य या दोन थडी भरून आनंद व अभिमान यांची महानदी येथें वाहत राहिली आहे!

स्वातंत्र्याची एक थड जरी सांप्रत हातची गेलेली आहे, तरी जुनी आठवण कांहीं साफ बुजलेली नाहीं. ही आठवण म्हणजेच इतिहास; आणि साहित्याच्या थडीला बसून या आठवणीवर गुजराण करण्यास तरी सांप्रत बाहेरचा प्रतिबंध दिसत नाहीं! साहित्याची ऐल थड आम्ही सांभाळून आहों, असें म्हणण्यास आजहि चिंता नाहीं! या थडींतील साहित्याच्या बादशाही सिंहासनावर श्रीज्ञानेश्वरांपासून मयूरेश्वरापर्यंत अनेक तेजस्वी पुरुष अधिष्ठित होऊन गेले आणि इतर अनेकांनीं या सिंहासनाचें रक्षण आपल्या तीव्र लेखण्यांच्या साहाय्यानें केलेलें आहे! आणि श्री. नरसोपंत केळकरांना 'साहित्य-सम्राट्' पदवी लावणारेहि याच परंपरेनें चालत आहेत असें म्हणावयास चिंता नाहीं.

आमच्या जुन्या आठवणी सांगणारे शाहीर, भाट किंवा बखरकार सभासद, कृष्णाजी शामराव, गोडसेभट वगैरे मंडळी सोडली, तरी विष्णुशास्त्री चिपळोणकर हे आमच्या महाराष्ट्राचे पहिले जोरदार शिंगाडे होत. यांनीं 'इतिहास' निबंध रूपी शिंग फुंकून सर्वांस खडबडून जागें केलें. त्यांच्या आधीं कीर्तने-रानडे-गुप्ते-प्रभृतींनीं घरचीच ऐतिहासिक संपत्ति शोधून सत्य-स्थापना आणि असत्य-निरास करण्याची मोठी खटपट केली! शोधांच्या खटपटीचा हा ओघ गेलीं चाळीस पन्नास वर्षे सारखा फोंफावत वाढतच आहे. साने, मोडक, खरे, पारसनीस, राजवाडे वगैरे व्यक्ति आणि भारत-इतिहास-संशोधकमंडळ, राजवाडे-स्मारकमंडळ, सत्कार्योत्तेजक-सभा वगैरे संस्था या उभयतांनीं त्याचें पात्र सतत रुंदावत व खोलावत जाईल असेच प्रयत्न केले आहेत.

वर ज्यांचा उल्लेख केला त्या व्यक्तींनीं जुन्या आठवणी, जुने पुरावे, जुन्या निशाण्या एवंच जुनें साहित्य शोधणें, पहाणें, तपासणें, छापणें, प्रसिद्ध करणें वगैरे सर्व प्रकारचेंच काम मुख्यत्वें केलें. परंतु हें एक प्रकारचें

पूर्वतयारीचें काम झालें. जमलेलें–जुळविलेलें व निवडून–निसून ठेविलेलें साहित्य घेऊन त्याचा गोड परिपाक करून लोकांस वाढण्याची कामगिरीहि अत्यंत अवश्य असते. किंबहुना तशी कामगिरी जर कोणी न करील, तर वरील जुळवाजुळवीचा उपयोग तरी काय? कांहींच नाहीं. तीच गोष्ट ऐतिहासिक साहित्याचीहि आहे. त्याचा नुसता संग्रह करून काम पुरें होत नाहीं. संगृहीत साहित्याची पुढली व्यवस्था लावली तरच बहुजनांस त्याचा उपयोग होतो. या प्रकारें संशोधक व संकलनकार ह्या दोन वर्गांतील मंडळीची इतिहासास व समाजास आवश्यकता असते.

आपल्या इकडे डॉ. भांडारकर यांनीं दख्खनच्या प्राचीन इतिहासाचें परिश्रमपूर्वक संकलन केलें; म्हणजे भांडारकर हे पहिले प्रतिष्ठित संकलनकार होत. परंतु हें संकलन त्यांनीं इंग्रजींत केलें आणि पुढें जरी त्याचें मराठी भाषांतर झालें, तरी आमच्या लोकांत त्याची प्रसिद्धि व्हावी तितकी साहजिकच झाली नाहीं. भांडारकरांच्याच पिढींतले लोकहितवादी गोपाळराव देशमुख! यांना विविध माहिती मिळविण्याचा जबर नाद! हिंदुस्थानच्या किंवा महाराष्ट्राच्या इतिहासाबाबत कांहीं विशेष संकलन यांनीं केलें नाहीं; तथापि 'ऐतिहासिक गोष्टी' वगैरे यांनीं बऱ्याच लिहून लोकांस इतिहासाची व ज्ञानाची गोडी लाविली. मात्र राजस्थान व गुजराथ या दोन देशांचा इतिहास संकलित रूपानें यांनीं मराठी वाचकांस उपलब्ध करून दिला. अद्यापिहि त्या विषयावर लोकहितवादी यांचे ग्रंथ मराठी वाचकांस वाचावे लागतात. ग्रँट डफ्चा इंग्रजींतला इतिहास केपिन् व साने यांनीं मराठींत उतरला, तेंहि एक उपयुक्त संकलनच म्हटलें पाहिजे. अर्थात् संकलनाचा मान डफ्चा; केपिन्–साने केवळ भाषांतरकार. भिडेकृत अष्टप्रधानांचा इतिहास हाहि संकलनपर इतिहासाचाच एक त्या वेळचा चांगला ग्रंथ म्हणून सांगतां येण्यासारखा आहे. सरंजामेकृत शियांचा इतिहास, किंवा कॅप्टन् मॅक्डोनल्डच्या इंग्रजीवरून केलेलें नाना फडणीसांच्या चरित्राचें विष्णुशास्त्री पंडित–कृत (?) भाषांतर असले प्रयत्न संकलनांतच गणावयास पाहिजेत. दणाईतकृत गोंव्याचा इतिहास किंवा नरगुंदकरांचा इतिहास वगैरे छोटे ग्रंथ यांतच घालावे लागतील. विनायक कोंडदेव ओक या प्रसिद्ध व लोकप्रिय लेखकाचेहि संकलित इतिहास बरेच आहेत. फ्रेंच राज्यक्रांतीचा इतिहास, ग्लाड्स्टन्चें चरित्र, अलेक्झांडरचें चरित्र वगैरे यांचे वाचनीय ग्रंथ विद्यार्थ्यांस फार उपयुक्त झाले आहेत.

या संकलित इतिहासलेखनाला मोठी चालना श्री. सयाजीराव महाराज गायकवाड या विद्याभिलाषी राजाच्या उदारतेनें एकवार मिळाली होती. 'राष्ट्रकथामाला' या नांवाची एक सुंदर माला निघून त्यांत जर्मनी, असीरिया, फ्रान्स् वगैरे देशांचे वृत्तांत व राजारामशास्त्री भागवत व गोविंदराव सरदेसाई अशांसारख्यांच्या हातून 'सीझरकडून सुलतानाकडे' (गिबनवरून) व 'इंग्लंड देशाचा विस्तार' (सीलीवरून) असे मोठमोठे संकलनात्मक इतिहासज्ञानविवेचनपर ग्रंथ प्रसिद्ध झाले. दुर्दैव म्हटलें पाहिजे कीं, हा सुंदर प्रयत्न पुढें चालला नाहीं. आणि या गोष्टीला पंचवीस तीस वर्षें होऊन गेलीं; तरी कांहीं पुनः कोणाचें लक्ष इकडे वळलें नाहीं.

राष्ट्रकथामालेनंतरच्या तीस वर्षांत संकलनात्मक ऐतिहासिक लिखाण पुष्कळच झालें आहे आणि तें नामांकित व किंमतीचें ठरणारें झालें आहे. त्यांत भारताचार्य चिंतामणराव वैद्य व रियासतकार गोविंदराव सरदेसाई यांचीं नांवें मुख्य म्हणून सांगतां येतील. चरित्रात्मक व प्रबंधात्मक ग्रंथ तर पुष्कळच झाले आहेत शिवाय वाङ्मयाचे इतिहासहि नांव घेण्याजोगे निपजले आहेत. या सर्व संकलनपर ग्रंथलेखनांत केळकर यांनी केलेल्या लेखनाचाच विचार येथें कर्तव्य आहे. इतरांशीं तुलना करण्याचा येथें प्रसंग नाहीं.

याप्रमाणें संकलनाचें काम चालू असतां प्राचीन, मध्ययुगीन व अर्वाचीन इतिहासाच्या संशोधनाचें, किंवा केळकर ज्यास वारंवार 'उद्धारा'चें म्हणतात, तें काम चालूच होतें. संकलन व संशोधन दोन्हीहि उपयुक्त कार्यें आहेत आणि समाजाच्या प्रगतीस दोन्ही पोषक आहेत. तथापि संशोधन आधीं बरेंच झाल्याशिवाय यथार्थ संकलन होऊं शकत नाहीं. संशोधनाचे उपयोग दोन. एक नवीन माहितीची भर घालण्याचा आणि दुसरा जुनी माहिती दुरुस्त करण्याचा. परंतु ही नवी माहिती किंवा जुन्याची दुरुस्ती अनेकांच्या द्वारा घडत राहून पुष्कळशी सुसती जमून राहिली तर ती एकाद्या अफाट अशा जिन्नसखान्याप्रमाणें किंवा कोठीप्रमाणें अवस्था होईल. या जिन्नसखान्यांतून किंवा कोठींतून योग्य तो माल उचलून त्यापासून नित्योपयोगी असे तयार पदार्थ बनविणें यांचेंच नांव संकलन; आणि कितीहि संशोधन केलें तरी अखेर त्याचें संकलनच जर व्हावयाचें नसेल तर तें संशोधन व्यर्थच ठरणार आहे. यासंबंधीं मोठें मार्मिक विवेचन तात्यासाहेब केळकर यांनीं दोन तीन प्रसंगीं केलें आहे, त्याची येथें आठवण होते. शके १८२० (इ. स. १८९८) मध्यें खरेशास्त्री यांच्या ऐतिहासिक लेखसंग्रहाचें 'केसरी'त परीक्षण करितांना

केळकर लिहितातः—"इतिहासाच्या उद्धाराचें काम दोन मार्गांनीं होणारें आहे. एक जुने कागदपत्र शोधून काढून व जुन्या दंतकथा इ. मिळवून त्या छापवून काढणें हा; व दुसरा अशा रीतीनें उपलब्ध व प्रसिद्ध झालेल्या माहितीवरून संशुद्धि, अन्वय, विरोधदर्शन, एकवाक्यता, व अनुमान इ. ठरीव रीतींच्या साहाय्यानें सुंदर आकृति तयार करितां येते."

ते पुढें पुनः म्हणतातः "मराठ्यांच्या इतिहासाच्या हल्लींच्या स्थितींत इतिहास लिहिण्यापेक्षां इतिहासाचीं साधनें मिळतील तितकीं जमविणें हेंच काम विशेष महत्त्वाचें आहे" (पुढें भाग २ पृ. ५ पहा) संकलित इतिहासाचें महत्त्व तात्यासाहेब कमी समजतात असें मात्र नव्हे. ते स्पष्टच सांगतात, "मराठ्यांचे काळचे आचारविचार, कायदेकानू, रीतभात, पोषाखपेहराव, उद्योगधंदे, हत्यारेंपात्यारें इत्यादि इतिहासाच्या महत्त्वाच्या उपांगाचें ज्यांत विवेचन केलेलें आहे, व मराठ्यांच्या काळची खरी स्थिति, त्यांचे गुणावगुण वगैरे गोष्टींविषयीं योग्य ज्ञान मिळून हल्लींच्या बदललेल्या स्थितींतहि ज्याचे वाचनापासून सदुपदेश व वैभवाकांक्षेची स्फूर्ति उत्पन्न होईल, अशा मराठ्यांच्या इतिहासाची वाण आहे, ती होईल तितक्या लवकर दूर करण्याचा प्रयत्न करणें हें प्रत्येक महाराष्ट्रीयाचें कर्तव्य आहे, ही गोष्ट इतरांप्रमाणें आम्हांसहि कबूल आहे" इतकें आहे तरी "ती उणीव भरून काढण्याचे जे मार्ग आहेत त्यांमध्यें इतिहासाची सामुग्री मिळविणें हा मार्ग अधिक महत्त्वाचा व अधिक श्रेयस्कर आहे असें आम्हांस वाटतें." असें कां तें रा. केळकर यांनीं एका मार्मिक दृष्टांतानें स्पष्ट केलें आहे तो असाः— "सुवर्ण हवें तितकें संग्रहीं असलें म्हणजे सोनारांचा खरा उपयोग पुढें लागतो. परंतु तोंपर्यंत खाणींत शिरून शोधकदृष्टीनें व दीर्घोद्योगानें कणाकणांनीं सोनें जमविणाऱ्या मजुरांचाच उपयोग अधिक आहे ही गोष्ट निर्विवाद आहे." (भाग २ पृ. ६). "आतां हें खरें कीं, बिचारे मजूर एकटेच काय करणार! त्यांना कामावर ठेवणारा श्रीमान्, त्यांना सूचना देणारा शास्त्रज्ञ, वगैरे मंडळींची अर्थातच या कामीं जोड पाहिजे."

याप्रमाणें इतिहास आधीं शोधून काढण्याची आवश्यकता रा. केळकर यांच्या मनांत पूर्णपणें ठसलेली होती आणि असें व्हावें हें योग्यच होतें. कारण या वेळीं रा. केळकर यांचे मनावर त्यांचे मिरज येथील गुरु कै० वासुदेव शास्त्री खरे यांच्या प्रयत्नांचा परिणाम झालेला ताजा होता. तसेंच सातान्यासहि केळकर प्रथम वकिलीसाठीं आले तों तेथें कै० पारसनीस यांचे

प्रयत्न चालू होते, आणि पुढें पुण्यास आले तों कै० राजवाडे यांचेहि प्रयत्न दृष्टीस पडण्यासारखे होते. एवंच महाराष्ट्रांत ' काव्येतिहाससंग्रह ' थांबल्यावर जो इतिहाससाधनप्रसिद्धीचा ओघ खंडित झाल्यासारखा दिसत होता तो रा. केळकर आपल्या उमेदींत येऊं लागण्याच्या सुमारास तीन नवे ओघ उत्पन्न होऊन अधिक जोरानें वाहूं लागला होता; त्यामुळें सर्वांचीच तिकडे दृष्टि लागून सहानुभूति वाढत होती. रा. केळकर यांनीं जरी पुढें स्वतः* इतिहाससंशोधन केलें नाहीं तरी ते इतिहाससंशोधनाचे एक मनापासूनचे पुरस्कर्ते होऊन राहिले यांत मात्र शंका नाहीं.

आतां हें निराळें दाखवावयास नको कीं, महाराष्ट्राच्या इतिहासाच्या अभ्यासाची गोडी केळकर यांस मूळचीच आहे. रोज इतर व्यवसाय करून दमलीभागलेली मंडळी जशी नेमानें फिरावयास जाऊन नवी व ताजी शुद्ध आणि उत्साहवर्धक हवा पोटांत घेतात व आपलें आरोग्य कायम राखतात, त्याचप्रमाणें महाराष्ट्राच्या आजच्या स्थितींतहि " इतिहासाच्या उच्चपर्वतावर मधून मधून चढून तेथील ताजी हवा पोटांत " घेऊन आपला मानसिक उत्साह व आरोग्य कायम राखण्याची खटपट स्वतः करून इतरांसहि करण्यास त्यांनीं प्रोत्साहन दिलें आहे. महाराष्ट्र हा देश सुदैवानें पर्वतमंडित असल्यानें त्याच्या वाचकांस मनानें तरी सारखे गड चढावे लागतात; आणि हें मनांत आलें म्हणजे इतिहासाला उच्चपर्वत म्हणून तेथली ताजी आरोग्यकारक हवा पोटांत घेण्याचा रा. केळकर यांचा उपदेश किती मार्मिक वाटतो तें पहा ! ( उतारे पृ. १, २ )

रा. केळकर जरी स्वतः संशोधनांत पडले नाहींत तरी संकलनाचें काम मात्र त्यांनीं सवडी सवडीनें करून मराठी वाङ्मयांत दोन उत्कृष्ट संकलनात्मक ऐतिहासिक ग्रंथांची भर घातली आहे. हे दोन ग्रंथ म्हटले म्हणजे एक ( १ ) आयर्लंडचा इतिहास आणि ( २ ) मराठे व इंग्रज. पैकीं आयर्लंडचा इतिहास हा प्रथमतः लेखमालेच्या रूपानें ' केसरी ' त आला होता. हिंदुस्थान व आयर्लंड यांची परिस्थिति पाहतां एकमेकांनीं एकमेकांचीं सुखदुःखें एकमेकांस सांगून अश्रु गाळून मनाचा भार हलका करावा असाच या दोन देशांचा संबंध आहे, आणि त्यामुळें स्वातंत्र्यासाठीं तहानेलेल्या दीनभारताला

* होतयाच्या बंडासंबंधीं काहीं पत्रें व केळकर घराण्याचे काहीं कागद, अशीं दोन संशोधनात्मक टिपणें रा. केळकर यांनीं भा. इ. सं. मंडळापुढें वाचल्याचें प्रसिद्ध आहे. लेखक.

चिमुकल्या आयर्लंडचा स्वातंत्र्यसंग्राम उद्बोधक वाटावा यांत नवल नाहीं. दोन्ही देशांची दुर्दशा इंग्लंडशीं संबद्ध असल्यामुळें. त्यांच्या दुःखाचें मूळ एकच आहे. असें आहे तरी आयरिश हे गोरे आणि भारतीय हे काळे हा भेद दोघांच्याहि परिस्थितीवर निराळा परिणामहि घडवून आणण्यास कसा समर्थ झाला हें पाहणेंहि कांहीं कमी मनोरंजक नाहीं. रा. केळकर हे राजकारणाच्या कटकटींत पडल्यामुळें त्यांस आयर्लंडच्या इतिहासाचा अभ्यास करणें ओघानेंच प्राप्त झालें. हॉलंड, आयर्लंड व इटली यांचे इतिहास स्वातंत्र्येच्छू राष्ट्रांनीं विशेष मन लावून अभ्यासण्यासारखे आहेत.

बाहेरील जगांतले हे देश आणि घरांतला खुद्द स्वतःच्या महाराष्ट्र देशाचा आणि उत्तर भारतांतील रजपुतांचा इतिहास मनांत वागवून स्वतःच्या खचणाऱ्या मनाचा उत्साह वाढवून घेणें हें राष्ट्रांतील प्रत्येक स्वातंत्र्येच्छु राजकारण्याचें कर्तव्य आहे. ज्याप्रमाणें पायगाडीच्या रबरी चाकाला छिद्रें पडून त्यांतली हवा निघून जाऊन सर्व नळी चिपटून निरुपयोगी होऊन जाते तशी स्थिति अपयश येऊन निराश होणाऱ्या स्वातंत्र्येच्छूंच्या मनाचीहि अधून मधून होते. अशा वेळीं वरील रबरी चाकांत ज्याप्रमाणें नवा वारा ठांसून भरून चाक चालतें करावें लागतें तसेंच समदुःखी देशांतील वीरांच्या कथा वाचून आपल्या गलित मनांतहि दम भरून त्यास पुनः उत्साहसंपन्न करतां येतें. रा. केळकर यांनीं लिहिलेल्या आयर्लंडच्या इतिहासाचा खरा उपयोग हाच आहे. आपल्या ग्रंथाचा विषयोपन्यास करतांना रा. केळकर यांनीं हीच गोष्ट स्पष्ट केली आहे. हिंदुस्थानचे नेमस्त पुढारी इंग्रज सरकारावर रागावले म्हणजे सरकाराला बजावीत कीं, " सांभाळा, अशानें हिंदुस्थानचें आयर्लंड होईल ! " आणि केसरीनें तर एका अग्रलेखालाच पंचवीस वर्षांपूर्वी " हिंदुस्थान आयर्लंड झालें ! " असा मथळाहि घडकून घातला होता ! " वास्तविक " केळकर म्हणतात " आयर्लंड व हिंदुस्थान या देशांमध्यें अर्थाअर्थी कांहीं एक संबंध नाहीं. दोहोंमध्यें अंतर तीनचार हजार कोस, धर्म वेगवेगळे, व ऐहिक विषयांचे दृष्टीनें पाहतां एकाचें दुसऱ्यावर अवलंबून असें कांहींच नाहीं. "....मग एकमेकांचीं एकमेकांविषयीं आंतडीं कां तुटून येतात ? याचें कारण असें कीं, " हिंदुस्थानच्या स्थितीसारखी ज्याची स्थिति आहे असा देश म्हटला म्हणजे एक आयर्लंडच ! या दोन राष्ट्रांत वैधर्म्य कांहीं थोडकें नाहीं. परंतु वैधर्म्याप्रमाणें साधर्म्यहि बरेंच आहे...व अशा राष्ट्राचा पांच-चारशें वर्षांचा इतिहास डोळ्यांपुढें आणितां आला तर त्यापासून उपयुक्त

असे व्यापक सिद्धान्त काढतां येणें शक्य आहे!' (आ. इ. विषयोपन्यास पृ. ४) " हिंदुस्थानच्या लोकांस तर आयर्लंडचा इतिहास आरशाप्रमाणें उपयोगीं पडेल असा आमचा समज आहे. ". आणि म्हणूनच सर्व बाबतींत जरी नसलें तरी " कांहीं बाबतींत समान स्थितींत असलेल्या अशा एका युरोपियन राष्ट्राचे पांचशें वर्षांचे इतिहासावरून आम्हीं हिंदुस्थानवासी लोकांनीं काय शिकावें अगर आम्हांस काय शिकतां येईल याचा बोध करून देणें हा " मुख्य हेतु " पुढें ठेवून आयर्लंडचा वृत्तांत रा. केळकर यांनीं वरील पुस्तकांत सविस्तर ग्रथित केला आहे.

हा केळकरांचा ग्रंथ मोठ्या श्रमानें लिहिलेला, उपयुक्त ज्ञानानें भरलेला, मननीय असा झालेला असून त्यांची विवेचक व समतोल वृत्ति त्यांत जागजागीं मनांत भरल्याशिवाय राहात नाहीं. इंग्रजींत लिहिले गेलेले आयर्लंडचे इतिहास सुद्धा एकरंगी नाहींत. आयर्लंडांत ज्याप्रमाणें पूर्णस्वातंत्र्यवादी, साम्राज्यवादी, निमस्वातंत्र्यवादी वगैरे भिन्न भिन्न पक्ष आहेत, तसेंच लिहिणाऱ्याचे मतानुरोधानें आयर्लंडाचे इतिहासहि बहुरंगी झालेले आहेत. हिंदुस्थानांतहि अभ्यासी लोकांत आयर्लंडाकडे पाहण्याची दृष्टी निरनिराळी आहे. स्वतःला राजनिष्ठ समजून आयर्लंडाला स्वातंत्र्यनिष्ठ मानणाऱ्यांपासून तों स्वतःला व आयर्लंडाला समान मनोभूमिकेवर आरूढ करणाऱ्यापावेतों निरनिराळी मंडळी निरनिराळ्या दृष्टीनें या प्रश्नाकडे पाहत असतात. अर्थात् अशावेळीं स्वतःच्या मनाचा व मतांचा रंग साहजिकच अभ्यासाच्या विषयावर उठणें,अपरिहार्यच होतें. अशी अडचण असतांहि रा. केळकर यांनीं सदरच्या आपल्या ग्रंथांत आपली शांति व न्यायबुद्धि ढळूं दिली नाहीं. नाहीं तर हा विषयच असा आहे कीं जसा खवळलेला समुद्र आपल्या लाटांबरोबर कांठावरील पदार्थांस ओढून नेतो तद्वत् मंडळी आयर्लंडचा रोमहर्षण स्वातंत्र्यसमर वाचीत असतां ओढली जातात आणि त्यांची शांति सारखी कायम रहात नाहीं. अंतःकरणाला विकारलहरी खेंचून घेतात. अशा कठिण प्रसंगांत मनाचा सावधपणा राखणें हें थोड्यांसच साधतें आणि रा. केळकरांनीं या अवघड कामांत चांगलें यश संपादन केलें आहे. आयर्लंडचा इतिहास या ग्रंथाचें एक वृत्तांतपर व दुसरा चरित्रपर असे दोन मोठाले भाग असून ते सरस उतरले आहेत. दुसरा भाग आजखी अलीकडील आयरिश देशभक्तांचीं चरित्रें जोडून रा. गाडगीळ यांनीं पुरा केला आहे.

मराठी भाषेंत आयर्लंडविषयीं उत्कृष्ट माहिती देणारा एवढा एकच नामांकित ग्रंथ आहे. अर्थातच त्यामुळें एक मोठीच उणीव भरून निघाली आहे.

यापूर्वी रा. केळकर यांनीं इटलीचा प्रख्यात दास्यविमोचक वीरवर ग्यारिबाल्डी याचें स्फूर्तिदायक चरित्र मराठींत लिहून प्रसिद्ध केलें होतें. आणि अशा रीतीनें स्वातंत्र्योन्मुख परतंत्र राष्ट्राला ज्यांचा इतिहास मार्गदर्शक झाला आहे, अशा इटालीसारख्या प्रख्यात देशांतल्या एका स्वातंत्र्यवीराचें यशोगान केलें होतेंच; पण हें एक लहानसें चरित्र होतें. हा कांहीं इटलीचा इतिहास नव्हे. इटलीचाहि इतिहास कोणी मार्मिक विद्वान् लिहून मराठींत प्रसिद्ध करील तर मराठींत एका मोठया सुंदर व महनीय ग्रंथाची निःसंशय भर घालतां येईल. मागें उल्लेखिलेल्या गायकवाडी राष्ट्रकथामालेंत एक जुन्या इटलीचा ऊर्फ रोमचा लहानसा इतिहास प्रसिद्ध झालेला आहे. आणि रा. केळकरांनीं आयर्लंड-च्या इतिहास लिहिण्यापूर्वी कांहीं वर्षें प्रदीप्त इटालियन देशभक्त म्याझिनी याचें एक दिव्यस्फूर्तिभरित चरित्र मराठींत प्रसिद्ध झालेलें होतें! इटलीच्या उद्धारक-चौकडीपैकीं ग्यारिबाल्डी व म्याझिनी यांचीं चरित्रें मराठींत या प्रमाणें येऊन गेलीं. दोघे राहिले. पैकीं एक जो काव्हूर, तो म्हणजे या चौकडींतील चतुर राजकारणी मुत्सद्दी. त्याचें मनोवेधक चरित्र आमचे मित्र रा. वासुदेवराव मुंडले यांनीं प्रसिद्ध केलें आहे. आणि आतां पिडमॉण्टकर व्हिक्टर ए. एल्. मन्युअल् या देशभक्त संस्थानिकाचें चरित्र तेवढें व्हावयास पाहिजे आहे; तें झालें म्हणजे संपूर्ण नाहीं तरी इटलीचा एका उज्ज्वल कालाचा इतिहास मराठी वाचकांस उपलब्ध झाला असें होईल.

रा. केळकर यांनीं मात्र येथें इटलीकडे वळून तिकडील ' उच्च पर्वता-वरील हवा ' आम्हांस मिळवून दिली आणि आयर्लंडांत तर मनमुरादच संचार करण्याची सोय करून ठेविली आहे. ' आयर्लंडचा इतिहास ' या पुस्तकासंबंधीं आणखी एक गोष्ट येथें सांगण्यासारखी आहे आणि ती म्हटली म्हणजे त्याची अर्पणपत्रिका. ह्या अर्पणपत्रिकेची अपूर्वाई अशी आहे कीं, तिनें हा ग्रंथ " शके १८३० सन १९०८ म्हणजे ज्या संवत्सरानें हिंदुस्थानां-तील प्रजा व राजा यांच्या तीव्र रागलोभांचा मासला परस्परांस दाखविला, तथापि ज्यानें हिंदी प्रजाजन व परकीय राज्यकर्ते यांतील लोकोत्तर व्यक्तीं-च्या धीरोदात्त स्वभावाची साक्ष जगास पटविली आणि हिंदी राष्ट्राचें एक पाऊल पुढें टाकविलें त्यांस हें पुस्तक अर्पण " करविलें आहे! तो काळ

ज्यांनीं प्रत्यक्ष पाहिला असेल त्यांस तर याची मार्मिकता व औचित्य चटकन् पटेल; परंतु मागाहून त्या काळचा इतिहास जाणणारेहि याचें महत्त्व सहज समजतील.

रा. केळकर यांचा आयर्लंडचा इतिहास वाचला म्हणजे अशी हळहळ वाटते कीं, अशाच प्रकारचे निरनिराळ्या राष्ट्रांचे उद्बोधक इतिहास आपल्या मराठींत व्हावयास पाहिजेत. इकडील राजकारण सतेज व सुबुद्ध करण्यास त्यांचा मोठा उपयोग होईल. रशिया, जर्मनी वगैरे पाश्चिमात्य आणि चीन, जपान वगैरे पौर्वात्य राष्ट्रें यांचे इतिहास मराठींत व्हावयास पाहिजेत. अमेरिकन् स्वातंत्र्ययुद्धाचाहि मनोवेधक इतिहास आपल्या तरुणांपुढें यावयास नको काय ? परंतु रा. केळकर यांच्या सारख्यांनीं लिहिलेला हा आयर्लंडचा इतिहास मात्र पाहिजेसा वाटून लोकांत खपला असा सुखानुभव आला नाहीं ! ग्रंथाचे भारे आपल्या डोळ्यांसमोर पडलेले पाहतांना ग्रंथकाराचें अंतःकरण उपवर मुलीकडे पाहून ज्याप्रमाणें कुटुंबाधिपतीचें, त्याप्रमाणें चिंताग्रस्त होतें. याच कटु अनुभवावरून केळकर यांनींहि या कामीं हात आखडता घेतला असावा. एखाद्या टिळकस्मारकनिधीसारख्या निधींतून असले राजकारणी इतिहास अधिकारी लेखकांकडून लिहवून त्यांस पारितोषिक देऊन, ते ग्रंथ घेऊन प्रसिद्ध करण्याची जर कोणी चतुर योजना करील तर तो मराठी वाङ्मयाला भूषणें, तज्ज्ञांना साहाय्य आणि राजकारणाला योग्य वळण मिळवून दिल्याचें असें त्रिविध श्रेय संपादन करील. लक्ष जावें अशा हेतूनेंच ही नम्र सूचना येथें केली आहे.

आयर्लंडाचा इतिहास संकलित करून वाचकांचे हातीं दिल्यानंतर रा. केळकर यांस एक कल्पना सुचली. शके १७३९ त पुण्यावर इंग्रजांचें निशाण फडकलें, म्हणून तें साल मराठी साम्राज्याच्या अस्ताचें साल समजतात. शके १८३९ त या मराठी साम्राज्याच्या महामृत्यूस शंभर वर्षे होतात; तेव्हां एकदां त्या निमित्तानें 'मराठीशाहीचें एक शतसांवत्सरिक वाङ्मयश्राद्ध' करावें ही ती कल्पना होय. प्रथम निरनिराळ्या तज्ज्ञ लेखकांकडून त्यांच्या व्यासंगाच्या १७३९ च्या क्रांतीच्या निरनिराळ्या पोटविषयांवर लेख लिहवून ते एकत्र प्रसिद्ध करावे अशी कल्पना होती आणि त्याप्रमाणें रा. हरिभाऊ फाटक यांनीं नांवें टाकून यादीहि केल्या होत्या. इंदुरास साहित्यसंमेलनाला जात असतां आगगाडींत रा. तात्यासाहेब यांनीं ही कल्पना या लेखकाजवळ सांगितली. त्यावेळीं रा. पंत पराडकर—या ग्रंथाचे प्रकाशक—हेहि तेथें होते. तथापि

पुढें अनेक लोकांकडून लेख वेळेवर हातीं येणें शक्य वाटेना. तेव्हां रा. केळकर यांनीं स्वतःच एकहातीं तें काम उरकण्याचें ठरवून यशस्वीहि केलें. ता. ८ मे १९१७ रोजीं वसंतव्याख्यानमालेंत 'शंभर वर्षांपूर्वी' या विषयावर एक व्याख्यान देऊन या विषयाचें 'सूतोवाच' त्यांनीं करूनहि टाकलें होतें. रा. केळकर यांच्यांत उरक विशेष वाखाणण्याजोगा आहे. येथें हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं यावेळीं लो. टिळक यांचे स्वराज्याचे दौरे, विलायतेची सफर, चिरोल खटला ही सर्व गडबड चालू होती आणि यावेळीं टिळक व त्यांचे परिवारांतील मंडळी यांना अविश्रांत काम करावें लागे. अशाहि स्थितींत रा. केळकर यांनीं 'मराठे व इंग्रज' हें विचारपूर्वक लिहिलेलें पुस्तक घाईनें कां होईना, पण लिहून, संपवून, प्रसिद्धहि करून टाकलें! यापेक्षां त्यांचे उरकशक्तीचा अधिक पुरावा तो कोणता पाहिजे?

मराठ्यांच्या इतिहासाचें केळकरांचें सूक्ष्म वाचन व अभ्यास आज पुष्कळ वर्षांचा म्हणजे जवळ जवळ २०।२५ वर्षांचा तरी होता! त्याच-प्रमाणें त्यांचें पाश्चिमात्य देशाच्या इतिहासाचें वाचनहि विस्तृत होतें. शिवाय टिळकांसारख्यांच्या नेतृत्वाखालीं राजकारणादि शास्त्रांचें त्यांचें प्रत्यक्ष शिक्षण आज दोन तपें होतें. मूळच्या कुशाग्र बुद्धीची जोड केळकरांच्या व्यासंगास मिळाली असल्यामुळें आणि त्यांत अंगच्या रसिकतेची आणि लेखनकौशल्या-ची भर पडल्यामुळें त्यांचें सर्वच लिखाण प्रौढ, उच्च व रम्य असें झालें आहे. 'मराठे व इंग्रज' हा ग्रंथ वरील कारणांस्तव अत्यंत लोकप्रिय झाला. खेरीज या ग्रंथाचा विषय म्हणजे सर्व मराठ्यांच्या जिव्हारीं लागणारा विषय असल्यामुळें ग्रंथ मोठ्या उत्सुकतेनें वाचण्यांत आला व त्यामुळें त्याच्या आवृत्ति भराभर खपून गेल्या. ग्रंथकारांस जरी घाई झाल्याची जाणीव होती आणि या विषयाचें "सांगोपांग व मनाजोगतें विवेचन करावयाचें तर आणखी एक एवढेंच पुस्तक लिहावें लागेल असें ग्रंथकारांस माहिती गोळा करितांना आढळून आलें" होतें; इतकेंच नव्हे तर "न जाणो, पुढें केव्हां हवा तितका वेळ मिळाल्यास कदाचित् ही गोष्ट घडून येईल!" असें त्यांचें आश्वासनहि होतें. तथापि अद्यापि कांहीं तसा योग आला नाहीं एवढें खरें!

रा. केळकर यांचा हा ग्रंथ प्रसिद्ध झाल्यावर त्यावर जागजागीं परीक्षणाचे निमित्तानें बऱ्याच विद्वानांनीं अभिप्राय प्रगट केले व बरीच मननीय चर्चा केली. कै. प्रो. लिमये (विविधज्ञानविस्तार) कै. प्रो. भानू (ज्ञानप्रकाश?) कै. राजवाडे (इतिहास व ऐतिहासिक) वगैरेंचीं मतें व मीमांसा मोठ्या

वाचनीय अशा उतरल्या आहेत. ग्वालेरचे रा. भा. रा. भालेराव यांनी मराठेशाही बुडाल्याची मीमांसा हा आपला कांहीं अपूर्व, नवीं ऐतिहासिक पत्रें असलेला निबंध यावेळीं प्रसिद्ध केला व खुद्द आम्हीं या ग्रंथाचें सविस्तर परीक्षण केलेलें स्वतंत्र ग्रंथरूपानें प्रसिद्ध झालेलें आहे. या परीक्षणग्रंथांत आम्हीं आपलें म्हणणें सप्रमाण पुढें मांडलें असल्यामुळें येथें त्याची पुनरुक्ति करीत नाहीं. या सर्व टीकालेखांचाहि परामर्ष घेऊन जर ग्रंथकार या पुस्तकाची पुनरावृत्ति काढतील, तर त्यांचा तो ग्रंथ अधिकच उठावदार होऊन अधिकच लोकप्रिय होईल.

मराठे व इंग्रज या ग्रंथाची रचना केवळ संकलनात्मक नाहीं. त्याहि-पेक्षा वरील पायरीचें काम केळकरांसमोर होतें. केवळ ठिकठिकाणीं विखुरलेली माहिती नीट काळजीनें खरीखोटी पारखून कालानुक्रमवार जुळविणें एवढेंच संकुचित कार्य त्यांनीं अंगिकारलें नव्हतें; तर एकंदर मराठे-इंग्रजांच्या समा-गमाचा जो प्रसंग इतिहासांत घडून आला, त्याची आपल्या मतानें कार्य-कारणपद्धतीनें त्यांत चर्चाहि करावयाचा त्यांचा हेतु होता. आतां अशी चर्चा योग्य प्रकारची होण्यास कर्त्याच्या अंगीं मोठा अधिकार असावा लागतो. कमावलेली तीव्र बुद्धि, न्यायाधीशाप्रमाणें दोन्ही बाजू पाहून न्याय देण्याची समतोल दृष्टि, आरशासारखें स्वच्छ मन, आणि एक प्रकारचें प्रतिष्ठितप्रज्ञत्व अंगीं असावें लागतें. तुकडेजोडीचें संकलन करणाऱ्याला ही ऐपत येत नाहीं. वरील ऐपत अंगीं असणारा हा एक प्रकारचा तत्त्वज्ञच असावा लागतो. अशी सारज्ञाची किंवा तत्त्वज्ञाची योग्यता रा. केळकर यांचे लेखणीस व डोक्यास आहे आणि त्यामुळेंच त्यांचा मराठे आणि इंग्रज हा ग्रंथ नुसता वाचनीय किंवा संग्राह्य असा नसून खरोखरीचाच मननीय व भूषणरूप झाला आहे !! चालू ग्रंथाच्या अखेरीस रा. केळकरांच्या लेखांचे जे कांहीं उतारे दिले आहेत ( भाग २ पृ. २०-३१ ) ते वाचले असतांना देखील वरील विधानांची सत्यता सहज पटेल. मूळ ग्रंथांतून जो कोणी मराठ्यांचें बादशाही धोरण व उपसंहार ही दोनच प्रकरणें वाचील तो तर वरील म्हणण्यांतलें मर्म स्वानुभवानेंच मान्य करील.

'ग्यारिबाल्डी' 'आयर्लंडचा इतिहास' आणि 'मराठे व इंग्रज' हेच केळकरांचे तीन मुख्य ऐतिहासिक ग्रंथ. तिन्ही ग्रंथांचीं नांवें मराठींतील प्रौढ ग्रंथवर्गांत मोडतात. आणि त्यांची लोकप्रियता त्यांच्या नांवाच्या वरील क्रमा-नुसारच वाढती राहिली आहे आणि तिहींतहि संकलनाबरोबरच तत्त्वदर्शनाचें जोगतीचें कामहि सफाईनें उरकण्यांत आलें आहे.

केळकरांचें सारें आयुष्य एकप्रकारें सार्वजनिक असल्यामुळें लिहिणें व बोलणें हा त्यांचा धंदाच होऊन बसला आहे असें म्हटलें तरी चालेल. अशा लिहिण्याबोलण्याचे निमित्तानें त्यांनीं ऐतिहासिक लेख व व्याख्यानें वरींच दिलीं आहेत. अशा लेखव्याख्यानांतून निवड करून एक **इतिहास-विहार** नांवाचें लहानसें पुस्तक रा. केळकरांचे वाङ्मयप्रेमी चिरंजीव रा. काशी-नाथबापू यांनीं प्रसिद्ध केलें आहे. यांत १८२० शकेंत रा. केळकरांनीं लिहि-लेल्या ऐतिहासिक लेखसंग्रहाच्या विस्तृत व मार्मिक परीक्षणापासून तों अगदीं अलीकडे पांच सहा वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेल्या शिवचरित्रप्रदीप ग्रंथाचेंहि परिक्षण आहे. या परीक्षणांचे निमित्तानें साहजिकच त्यांचें इतिहासविषयांत चित्त गुंतून राहिलें. खेरीज पुण्यास स्थापन झालेल्या भारत-इतिहास-संशोधक-मंडळाचे ते प्रथमपासून सभासद व पुरस्कर्ते असून त्याच्या कारभारी मंडळावरहि सभासद व अलीकडे तर उपाध्यक्ष आहेत. मंडळाच्या सभांना अनेक कामें असलीं तरी शक्यतोंवर ते हजर राहतात, अशी त्यांस या विषयांची मनापासूनची आवड असून त्यांनीं ती अनेक कामांच्या व विषयांच्या ओझ्याखालीं दडपून जाऊं न देतां टिकविली आहे. त्याचप्रमाणें गेल्या तीस वर्षांतील जागृतिकालांत, ठिकठिकाणीं ऐतिहासिक थोर पुरुषांचे उत्सव साजरे होत असतात. त्यांस भाषणें करण्याचे प्रसंग पुष्कळ वेळां साहजिकच आलेले आहेत. याप्रमाणें त्यांनीं जीं हीं प्रासंगिक व्याख्यानें दिलीं व लेख लिहिले, त्यांतील कांहीं निवडक लेख व व्याख्यानें वरील 'इतिहासविहार' या छोट्या ग्रंथांत प्रसिद्ध झालीं आहेत. त्यांत उमाजी नाईकापासून तों झांशीच्या राणीपर्यंत आणि शंभर वर्षांपूर्वीच्या पुण्यापासून तों नवीन दिल्लीपर्यंत अनेकविध विषय आलेले आहेत. हे लेख व व्याख्यानें केळकरांचा गुण दाखविल्याशिवाय राहात नाहींत. रा. केळकरांच्या लेखनांत विद्वत्तेची चमक, रसिकतेचा खमंग-पणा, उपमादि अलंकारांचें माधुर्य, युक्तिवादाचा दमदारपणा, मनाचा समतोल-पणा, आणि मांडणीचा उचितपणा आढळल्याशिवाय सहसा राहावयाचा नाहीं. इतिहास हा रुक्ष विषय समजतात. पण तोहि चित्तवेधक करण्याची हातोटी केळकरांच्या लेखणींत आहे. त्यामुळें या इतिहासविहारांत सहज कोठेंहि पान उघडलें तरी मनांत भरण्याजोगें एखादें तरी वाक्य आढळतेंच ! कोठें इतिहासाला कसोटीपेक्षां चाळणीचीच उपमा अधिक कशी लागू पडते, हें केळकर दाखवून देत आहेत; तर कोठें आपल्या हातची सत्ता व वैभव गमावून बसण्याचा प्रसंग आलेल्यांचें समाधान 'लोण घेऊन येणाऱ्या गड्यानें

## १३. केळकर व अर्थशास्त्र

( श्री. दत्तात्रय दामोदर देशपांडे, बी. ए., एफ. सी. आर. ए., पुणें. )

श्री. तात्यासाहेबांची अर्थशास्त्रविषयक कामगिरी ही दोन प्रकारची संभवते. एक वाङ्मयात्मक व दुसरी प्रात्यक्षिक. वाङ्मयात्मक कामगिरी म्हणजे श्री. तात्यासाहेबांनीं आतांपर्यंत अर्थशास्त्रविषयक जीं जीं भाषणें केलीं, व जे जे लेख लिहिले ही होय. अर्थशास्त्र हा कांहीं श्री.तात्यासाहेबांचा खास;आवडी- चा व विशेष व्यासंगाचा विषय नव्हे; व श्री. तात्यासाहेब हे कांहीं नामदार गोखले, न्यायमूर्ति रानडे अथव प्रो. वामनराव काळयांप्रमाणें नाणावलेले अर्थ- शास्त्रज्ञ आहेत असेंहि नव्हे. एका दृष्टीनें ते ह्या विषयावरील जिज्ञासु अभ्या- प्रकच आहेत. ते स्वत: आपणास ह्या विषयांतील अतज्ज्ञच ( layman ) व अंह्मात. व त्याप्रमाणें असेंब्लीतील एका भाषणामध्यें त्यांनीं आपल्या तरी शक्यअतज्ज्ञ म्हणूनच उल्लेख केला आहे. तथापि मौज अशी आहे असून त्यांनीतज्ज्ञाचीं भाषणें व लेख वाचावयास घेतले तर, हीं अतज्ज्ञा- देतां टिकविली असें त्या विषयांवरच्या व्यासंगी माणसासहि वाटल ठिकठिकाणीं ऐतिसाहेबांच्या इतर लिखाणाच्या व भाषणाच्या मानानें भाषणें करण्याचे भाषणें व लेख, हीं फार थोडीं आहेत; व तीं फार थोडीं त्यांनीं जीं हीं प्र त्यांत फार गोडी आहे. त्यांनीं ह्या विषयावर खूप लिहिले निवडक लेख। अतज्ज्ञ म्हणून न राहतां तज्ज्ञ ( expert ) झाले प्रसिद्ध झालीं जसे ते नाणावलेले ग्रंथकार आहेत, उत्तम नाटककार आणि शंभरांदी वक्ते आहेत, आदर्श संपादक आहेत, तसे ते प्रमाणभूत आलेले आहे झाले असते, व मग त्यांच्या त्या विषयांवरील व्यासंगाबद्दल राहात नाहींवाटलें नसतें. संपादक हा जरी अष्टपैलू विद्वान् असावा पणा, उपमरी कोणत्याहि विषयावर थोडया तयारीनें, तज्ज्ञ आक्षेप न पणा, आण्ण्या उत्तम तऱ्हेनें, विशेष व्यासंग नसतां लिहिणें अगर बोलणें, नाहीं. इतिसोपी नाहीं. असेंब्लीमध्यें ह्याच विषयावर फायनॅन्स मेंबर हातोटी केळ्ज्ञासमोर विषयाचें सांगोपांग विवेचन करणारें मुद्देसूद व भारदस्त कोठेंहि पानक सुप्रसिद्ध ग्रंथकारांचे व अनेक कमिटया व कमिशनें ह्यांच्या कोठें इतिहआधार देत तासचे तास करणें ही गोष्ट सोपी नव्हे. अशीं भाषणें हे केळकर सतांना त्यांना स्वत:विषयीं, व प्रतिपाद्य विषयाच्या स्वत:च्या गमावून बसीं पूर्ण आत्मविश्वास वाटत असे, व त्याप्रमाणें त्यांनीं त्या वेळचे

हिंदुस्थानसरकारचे फडणीस नामदार सर बेसिल ब्लॅकेट ह्यांस आव्हानहि केलें होतें. श्री. तात्यासाहेबांचें अर्थशास्त्रविषयक सर्वांत मोठें भाषण म्हणजे त्यांनीं १६–३–१९२७ रोजीं अॅसेंब्लींत सुवर्णचलन (Gold Coinage) सुरू करण्याविषयीं केलेलें भाषण होय. हें एकच भाषण वाचलें असतां, वाचकांस आढळून येईल कीं, श्री. तात्यासाहेबांनीं ह्या विषयाचा बराचसा खोल अभ्यास करून, व संपूर्ण माहिती मिळवून, सर्व तऱ्हेचे उलटेसुलटे आधार मिळवून, ह्या भाषणाची तयारी केली होती. निव्वळ तर्कशास्त्रशुद्ध व साधार भाषणानें जर कोणती गोष्ट साध्य होणें शक्य असतें, तर श्री. तात्यासाहेबांच्या ह्या भाषणानें सुवर्णचलन हिंदुस्थानामध्यें सुरू व्हावयास पाहिजे होतें! परंतु अॅसेंब्लीला निर्णायक अधिकार कांहींच नसल्यामुळें एकाद्या कॉलेजच्या History and Economics Association पुढें केलेल्या भाषणापेक्षां दुर्दैवानें अशा भाषणाचा जास्त उपयोग होत नाहीं. सदरहू भाषणामध्यें उत्तम तऱ्हेचा विनोद, प्रतिपक्षाला भारदस्तपणें आपण मूर्ख आहोंत असें सांगण्याची अपूर्व शैली वगैरे अनेक गुण दिसून येतात. उदाहरणार्थ, हिंदुस्थानांत सुवर्णचलन सुरू केल्यास काय फायदे होतील हें सांगितल्यावर, आपणास हिंदीचलनाच्या कायद्यास सदरहू दुरुस्ती आणण्यास काय कारणें घडलीं हें सांगत असतां त्यांनीं पुढीलप्रमाणें प्रस्ताव केला आहे:—

"Now, in this matter I must proceed with diffidence and hesitation because I am an ignorant layman, and nobody in this House wishes to put his knowledge of these matters against the great knowledge of the great expert who is the present Finance Member. But I have got some consolation in my desire to criticize him from a pamphlet which I

Finance, and most of all because he was gravely misled by his experts."

वरील उताऱ्यावरून इंग्रजी वाचकांस कळून येईल कीं, किती मर्मभेदक तऱ्हेनें ह्यांत फडणीसावर टीका केली आहे, व अप्रत्यक्ष तऱ्हेनें फडणीस हे मूर्ख असून ते चुका कां व कशा तऱ्हेनें करतात हें निव्वळ प्रो. केनीस् ह्यांच्या चर्चिलवरील टीकात्मक एक उतारा वाचून दाखवून दिलें आहे. चर्चिल हेहि इंग्लंडच्या प्रधानमंडळांतील फडणीसच असतांना त्यांजवर ही टीका केली होती. ह्या एकाच उताऱ्यावरून तात्यासाहेबांची समयसूचकता व समयज्ञता दिसून येते.

ॲसेम्ब्लींतील वादविवादांत नेहमीं सरकारी तज्ज्ञ अधिकाऱ्यांकडून हिंदी सभासदांवर 'ते नेहमीं अव्यवहार्य असतात' असा आक्षेप आणला जातो, मग ते त्या विषयांतील कितीहि कां तज्ज्ञ असेनात! ह्या आक्षेपांतील मख्खीचें खरें कारण पुढीलप्रमाणें असावें. हिंदी तज्ज्ञ सरकारास ज्या गोष्टी करावयास सांगतात त्या जर केल्या तर सरकारच्या हातांतील बरेच अधिकार जाऊन, पुन्हां ब्रिटिश लोकांच्या हितविरोधी अशा त्या गोष्टी असतात, म्हणून त्या सरकारास मूर्त स्वरूपांत आणतां येत नाहींत, आणण्याची इच्छा नसते, व म्हणून त्यांना त्या व्यवहार्य नसतात, व म्हणूनच हिंदी तज्ज्ञ हे अव्यवहार्य ( Impractical Theorists ) असतात. असो. ह्या आक्षेपाला श्री. तात्यासाहेबांनीं पाहुण्याकडून साप मारवावा त्याप्रमाणें परस्पर रॉयल सोसायटी ऑफ आर्टस्मधील एक मोठे तज्ज्ञ सर चार्लस् ॲडिस ह्यांचें मत उद्धृत करून उत्तर दिलें आहे. हुंडणावळीचा भाव ठरविण्यासाठीं जें रॉयल कमिशन नेमण्यांत आलें होतें, त्या कमिशनचा रिपोर्ट रॉयल सोसायटी ऑफ आर्टस्पुढें वादविवादासाठीं ठेवण्यांत आला होता. त्यावेळीं सर चार्लस् ॲडिस ह्यांनीं हा सर्व रिपोर्ट अत्यंत अव्यवहार्य ( Merely Impractical ) आहे असें मत दिलें. तथापि त्या अव्यवहार्य रिपोर्टाची तळी उचलावयास फडणीस तयारच; कारण त्या अव्यवहार्यतेमुळें इंग्लंडचा फायदा व्हावयाचा होता. असो. ह्याच वेळीं श्री. तात्यासाहेबांनीं फडणीसास पुढीलप्रमाणें आव्हान दिलें.—

"मी आहि पुढें जाऊन असें म्हणतों कीं, मी फडणीसाबरोबर ते तयार असल्यास, हिंदी पद्धतीप्रमाणें हुतुतूटीचा खेळ खेळावयास तयार आहें.

फडणीसांनीं एक प्रमाण मत म्हणून मांडावें, मी त्याच्या उलट दुसरें प्रमाण मत मांडीन. त्यांनीं एका तत्त्वज्ञाचें ( Theorist ) मत उद्धृत करावें, मी त्याच्या उलट दुसऱ्या तत्त्वज्ञाचे विचार पुढें ठेवीन. त्यांनीं एखाद्या प्रोफेसराचें म्हणणें पुढें मांडावें, त्याच्या उलट तितक्याच योग्यतेच्या दुसऱ्या प्रोफेसराचें म्हणणें मी पुढें मांडीन. त्यांनीं एखाद्या मोठ्या पेढीवाल्याची विचारसरणी मांडावी, मी त्याच्या उलट दुसऱ्या पेढीवाल्याची विचारसरणी मांडीन, व अशा तऱ्हेनें हा खेळ चालावा, आणि जर माझ्या म्हणण्याच्या पुष्ट्यर्थ मीं पुष्कळसे साक्षीदार आणले, तर माझ्या विचारसरणीची भरभक्कम पायावर उभारणी झाली आहे, हें त्यांनीं कबूल करावें. "

ह्या उपरिनिर्दिष्ट वाक्यावरून त्यांना आपल्या अर्थशास्त्रविषयक वाङ्मयाच्या परिचयाबद्दल व अभ्यासाबद्दल किती आत्मविश्वास वाटत आहे हें दिसून येईल. हिंदुस्थानांत सुवर्णचलन सुरू करावें, ह्या मागणींत फक्त हिंदी लोकच अनुकूल आहेत असें नसून इंग्लंडमधील सुप्रख्यात अर्थशास्त्राचे प्रोफेसरहि अनुकूल आहेत, हें श्री. तात्यासाहेबांनीं प्रो. ग्रेगरी, व प्रो. कॅनन ह्या दोघांचीं मतें उद्धृत करून सप्रमाण दाखविलें आहे.

अर्थशास्त्रामधील अत्यंत बिकट प्रश्न म्हणजे हुंडणावळीचे भाव स्थिर कसे राहतील हा होय. ह्या विषयावर एका सुप्रख्यात अमेरिकन प्रोफेसराचे विचार त्यांनीं आपल्या भाषणामध्यें दिले आहेत. ह्या प्रोफेसरसाहेबांनीं सुद्धां रशियामधील फडणीस एम्. विट् ह्यांच्याच मताचा अनुवाद केला आहे. हुंडणावळीचें नियंत्रण हें बाह्य साधनांनीं करतां येत नाहीं. तें नैसर्गिक रीत्याच केलें जावें. असें जर झालें नाहीं, तर हुंडणावळीचें स्थिरीकरणच अशक्य होईल. हुंडणावळीचे भाव स्थिर करण्यासाठीं पाश्चात्य राष्ट्रांनीं पुष्कळसे धाडमुठे व दंडुकेशाहीचे मार्ग स्वीकारले हें श्री. तात्यासाहेबांनीं पुढील उदाहरणें देऊन विशद केलें. कांहीं राष्ट्रांनीं विशिष्ट संस्थांच्या हातींच हुंडणावळीच्या व्यवहाराचें केंद्रीकरण केलें. कांहींनीं राष्ट्रांतील सट्टेबाजीच्या व्यवहारावर नियंत्रण घातलें. हुंडणावळीच्या चालू दराच्या प्रसिद्धीकरणास कित्येकांनीं बंदी केली. इटालीमध्यें कोणी जर सरकारनियुक्त हुंडणावळीच्या दराकडे लक्ष न देतां व्यवहार केला तर त्यास कायद्यानें शिक्षा देण्यांत येई वगैरे वगैरे. हिंदुस्थानांत यांपैकीं कोणताहि उपाय योजण्यांत येत नसे ही गोष्ट खरी, परन्तु हिंदुस्थानसरकारच्या हातांतहि कांहीं राखीव उपाय

आहेत, व त्यांच्या साहाय्यानें हुंडणावळीचे भाव स्थिर करण्याचा प्रयत्न केला जातो. सरकारच्या हातांत स्टेटसेक्रेटरीनें हिंदुस्थानसरकारावर व हिंदुस्थानसरकारनें उलट स्टेटसेक्रेटरीवर कितीहि रकमेच्या हुंडया काढण्याचा अनियंत्रित अधिकार आहे. आपल्या सोयीप्रमाणें व लहरीप्रमाणें भाव चढविण्याचें अगर उतरविण्याचें त्यांचे हातीं आहे. बाजारभावावर त्यांचें नियंत्रण आहे, व ह्याशिवाय सरकारी कायद्यानें ठरविलेला हुंडणावळीचा भाव आहे. वरील सूक्ष्मासूक्ष्म मार्गांनीं भाव स्थिर करण्याचा प्रयत्न केला जातो, परंतु तो कधींहि स्थिर रहात नाहीं. श्री. तात्यासाहेबांनीं आपले मित्र पंडित मोतीलाल नेहरु ह्यांचे मताचा अनुवाद करून असें सांगितलें कीं, ' अखेर नैसर्गिक असा कांहीं तरी भाव मानावा लागतो, व जरी हें परस्परविरोधी दिसलें तरी हा नैसर्गिक भाव म्हणजे सतत बदलणारा भाव असतो, व तो कायम स्वरूपाचा नसतो. कारण अखेर तो भाव म्हणजे आंतरराष्ट्रीय प्रमाण व देशांतील चालू पद्धतीचें चलन ह्यांचें समीकरणच असला पाहिजे. हें समीकरण जेव्हां साधतें, तेव्हां भाव स्थिर आहे असें समजण्यांत येतें. ' अशा तऱ्हेनें हुंडणावळीच्या भावासंबंधीं सांगून हिंदुस्थानसरकार नेहमीं हुंडणावळीच्या दराचा उपयोग इंग्लंडच्या फायद्याच्या दृष्टीनें करतें, हें त्यांनीं स्पष्ट केलें आहे. खरें सांगावयाचें म्हणजे श्री. तात्यासाहेबांनीं आपल्या अर्थशास्त्रविषयक ज्ञानाचा पुरापूर उपयोग ह्या सुवर्णचलनांवरील आपल्या असेंब्लींतील भाषणांत केला आहे व ते ह्या विषयाशीं पूर्ण परिचित असून त्याशीं ते तादात्म्यहि पावूं शकतात हें त्यांनीं सिद्ध केलें आहे. हें सबंच भाषण फार बहारीचें आहे, व इंग्रजी वाचकांनीं तें मुळांतूनच वाचावें म्हणजे सुवर्णचलन म्हणजे काय, व तें हिंदुस्थानांत सुरू करणें कां आवश्यक आहे, ह्या विषयाची त्यांना थोडक्यांत पण मुद्देसूद रीतीनें माहिती होईल.

ह्या भाषणानंतर श्री. तात्यासाहेबांचीं अर्थशास्त्रविषयक अशीं असेंब्लींतील आणखी दोन भाषणें आहेत; तीं येणेंप्रमाणें. १ करन्सी बिल व २ रिझर्व्ह बँक बिल. हीं दोनहि भाषणें राजकीय दृष्टया केलीं गेलीं आहेत; म्हणजे त्यांत अर्थशास्त्रदृष्टया विचार जरी केला आहे तरी विशेषतः हिंदुस्थानाला राजकीय दृष्टया ह्या दोनहि बिलांपासून फायदे होतील अगर तोटे होतील हें सप्रमाण दाखविण्याचा त्यांत प्रयत्न केला आहे. करन्सी बिलावरील भाषणांत मुख्यतः पुन्हां हुंडणावळीच्या भावाचीच चर्चा करण्यांत आली असून, रुपयाची सोन्याच्या भाषांत जी नवीन किंमत १० रुपयांस

१ पौंड ही ठरविली गेली, तिचा हिंदुस्थानांवर परिणाम काय होईल ह्या-विषयीं विचार केला आहे. ह्या बिलानें १ पौंडास दहा रुपये किंमत ठरविली, पण त्याप्रमाणें वागण्याचें नियंत्रण स्वतः सरकारवर कांहींच नाहीं. कोणीहि दहा रुपये घेऊन सरकारी खजिन्यांत पौंड मागावयास गेला, तर पौंड देण्यास सरकार कायद्यानें बांधलेलें नाहीं; मात्र पौंड घेऊन कोणी रुपये मागण्यास गेला, तर मात्र सरकार पौंडाचे दहा रुपये देण्यास केव्हांहि तयार. कारण त्या पौंडाची आंतील सोन्याच्या दृष्टीनें बाजारभावाची किंमत १३ रुपयांचेवर असते म्हणून. अर्थात् सरकारची जरी अशी इच्छा असली तरी असा प्रत्यक्ष व्यवहार करणारे भोळे व मूर्ख लोक सरकारला हिंदुस्थानांत सांपडत नाहींत ही गोष्ट निराळी. सरकारनें जरी ह्या बिलाचा उद्देश रुपयाच्या भावाचें स्थिरीकरण–विशेषतः परदेशाच्या व्यापाराचे दृष्टीनें, असा सांगितला आहे तरी, रुपयाची 'हम करेसो कायदा' ह्या पद्धतीनें सोन्याशीं किंमत निगडित न करतां, वस्तुतः सोन्याच्या खऱ्या बाजारभावाशीं किंमत ठरवून, म्हणजेच अंतर्बाह्य दृष्टीनें रुपयाची सोन्याशीं खरी किंमत ठरविली गेल्या-खेरीज रुपयाचें स्थिरीकरण करणें अशक्य आहे असें श्री. तात्यासाहेबांनीं आपल्या ह्या भाषणाच्या शेवटीं वजावलें आहे.

रिझर्व्ह बँक बिलावरील आपल्या भाषणांत श्री. तात्यासाहेबांनीं रिझर्व्ह बँकेची उपयुक्तता मान्य केली आहे; परन्तु ह्या बिलानें योजलेल्या रूपरेखे-प्रमाणें रिझर्व्ह बँक अस्तित्वांत आल्यास, हिंदुस्थानला तिचा विशेष उपयोग होणार नाहीं, असें दाखविलें आहे. हिंदुस्थानांत रिझर्व्ह बँक स्थापन करून, स्टेटसेक्रेटरीच्या आर्थिक हुकमतींतून हिंदुस्थानसरकारची मुक्तता थोडीफार होईल, परन्तु राष्ट्रीय दृष्ट्या असा विशेष फायदा हिंदुस्थानच्या पदरांत पडणार नाहीं; इतकेंच नव्हे तर हिंदी माणसांपैकींच कांहीं लोक ह्या बँकेचे डायरेक्टर म्हणून वगळेंत मारून गुप्त रीत्या सर्व तऱ्हेच्या आर्थिक व्यवहाराचीं सूत्रें ब्रिटिश साम्राज्याच्या हिताच्या दृष्टीनें हिंदुस्थानसरकार आपल्या फडणविसाच्या हस्तें चालविणार व आतांपर्यंत जें दोषाचें खापर [illegible] टरीच्या डोक्यावर फोडलें जात होतें, त्यापासून भारतमंत्र्याचा बचाव [illegible] णार व वरतीं आम्हीं हिंदुस्थानाला स्वतंत्र रिझर्व्ह बँक दिली म्हणून फुशा-रकी मारणार ! हिंदुस्थानसरकारचें हें रिझर्व्ह बँकरूपी अपत्य जन्मण्यापूर्वीच मेघनादा ( रावणपुत्र इंद्रजित ) प्रमाणें गर्जना करून उठलें. परन्तु मेघनादा-पेक्षांहि तें कमनशिबी ठरलें. कारण मेघनादाचा जन्म तरी झाला, व त्यानें

आपला प्रतापहि गाजविला, परन्तु हें अपत्य ज्या दाईच्या हातीं संगोपनार्थ जाणार होतें, त्या दाईनेंच मुळीं त्याला जन्माला येऊं दिलें नाहीं, व ज्या स्वरूपांत तें बालक जन्मणार होतें, त्या स्वरूपांत तें जन्माला आलें नाहीं, ह्या बद्दल हिंदी राष्ट्राला विषाद न वाटतां हायसें वाटलें असेल, व त्याप्रमाणें-च श्री. तात्यासाहेबांनीं ह्या भाषणाचा समारोप करतांना म्हटलें आहे. ते आपल्या भाषणांत म्हणतात:—

"रिझर्व्ह बँक ही हिंदुस्थानच्या फायद्याची आहे, अशी लोकांना खात्री पटून तिचें हिंदी जनतेनें स्वागत करावयास, ह्यापेक्षां अधिक खात्रीलायक पुरावा पुढें आला पाहिजे; व म्हणून सध्यांचा इंपीरिअल बँकेबरोबर झालेला करार संपण्यापूर्वी, सरकारनें हें बिल परत घेतलें किंवा कांहीं कारणानें सदरहू बँक अस्तित्वांत आली नाहीं, तर हिंदी राष्ट्रावर आपत्ति कोसळेल असें निदान मला वाटणार नाहीं, व दरम्यान आणखी अनुभव मिळून परिस्थितीचा नीट विचार करण्यास आम्हांस सवडाहि मिळेल." ह्या भाषणाशिवाय श्री. तात्यासाहेबांनीं केसरीमधून 'रिझर्व्ह बँक बिलाचें भांडण' हा लेख व 'रिझर्व्ह बँक अथवा गंगाजळी' या विषयावर एक लेखमाला लिहिली आहे. ह्या लेखमालेचा उल्लेख पुढें यथावकाश येईलच.

आतांपर्यंत श्री. तात्यासाहेबांनीं असेंब्लींत केलेल्या अर्थशास्त्रविषयक इंग्रजी भाषणाचाच फक्त विचार झाला; परंतु ह्यापेक्षां त्यांची खरी उपयुक्त कामगिरी, त्यांनीं लिहिलेल्या मराठी लेखांवरूनच कळून येणारी आहे. श्री. तात्यासाहेबांचे प्रमुख अर्थशास्त्रविषयक लेख पुढीलप्रमाणें आहेत—

१. आमच्या स्वदेशी पेढया ( लेखांक तीन ) सन १९१३.
२. स्वदेशी पेढ्यांची धांदल. १९१३.
३. दिवाळखोरीची खोटी व खरी मीमांसा. १९१४.
४. विलायती दिवाळखोरीचे मासले.
५. पतपेढया व स्वावलंबन.
६. हुंडणावळीचा घोटाळा ( लेखांक ५ )
७. रिझर्व्ह बँक अथवा गंगाजळी ( लेखांक ४ )

हे लेख श्री. तात्यासाहेबांचे अर्थशास्त्रविषयक असे प्रामुख्यानें दाखवितां येतील. ह्यांशिवाय किरकोळ लेख, भाषणें त्यांनीं पुष्कळच केलीं आहेत. परंतु सदरहू लेखांत त्यांचा अर्थशास्त्रविषयक सूक्ष्म व्यासंग व त्यांनीं केलेली मार्मिक चिकित्सा जितकी उठावदार रीतीनें प्रतीत होते, तितकी

त्यांनी केलेल्या नैमित्तिक भाषणांत अगर प्रसंगानुरोधानें लिहिलेल्या किरकोळ लेखांत दिसून येत नाहीं.

हिंदी पेढ्यांवरील त्यांचे लेख पाहिल्यास प्रथमतः पेढ्यांचा उगम किंवा आरंभ कसा होतो, हें त्यांनीं फारच सोप्या तऱ्हेनें दाखविलें आहे. ते म्हणतात, "निरुद्योगी धनिक मनुष्याजवळच तेवढी शिल्लक असते असें नाहीं; तर जवळचा पैसा उद्योगधंद्यांत किंवा व्यापारांत घालणाऱ्या मनुष्याचीहि शिल्लक पडते; कारण एका धंद्यांतून मोकळे झालेले पैसे दुसऱ्या धंद्यांत गुंतण्याच्या दरम्यान थोडाबहुत वेळ जातोच. उद्योगधंदे कांहीं आगगाडीच्या रुळांसारखे एकमेकांस चिकटून राहिलेले नसतात, कीं त्यांवरून किफायतशीर व्यवहार आगगाडीच्या एंजिनाप्रमाणें न अडखळतां व न थांबतां एकसारखे एकापुढें एक चालत राहतील! म्हणजे काय कीं, आळशी अशा धनिक मनुष्याची शिल्लक आणि उद्योगी अशा धनिक मनुष्याची शिल्लक कांहीं थोड्याबहुत मुदतीपर्यंत रिकामी पडतेच. ही शिल्लक ज्यानें त्यानें आपली आपल्याजवळच ठेवली तर समाजांत व्यापारधंदा चालून परस्पर उपयोग होणार नाहीं, हें तर झालेंच; पण मनुष्यमात्र इतक्या निरपेक्ष किंवा परोपकारबुद्धीनें थोडेंच पहातो! समाजाला फायदा असो या नसो, आपली शिल्लक आपल्याजवळ न ठेवतां दुसऱ्याजवळ ठेवावयास दिली तर दुसऱ्यास असलेल्या गरजेमुळें याला त्या पैशावर व्याज मिळून फायदा होतो. या स्वार्थी अनुभवावरून तरी त्याची शिल्लक वाऱ्याप्रमाणें चंचलवृत्ति स्वीकारून उड्या मारूं लागते! व यामुळेंच बँका किंवा पेढ्या अस्तित्वांत येतात." अशा तऱ्हेनें थोडक्यांत पेढ्यांची उत्पत्ति सांगून, पुढें पेढ्यांचा उपयोग काय व त्यांचीं कर्तव्यें कोणतीं ह्यांचा ऊहापोह केला आहे. बँका किती तऱ्हेच्या असूं शकतात, हेंहि सांगितलें आहे. १. सरकारी; २. खाजगी पण समाईक भांडवलानें काढलेल्या (Joint Stock Banks); ३. अगदीं खाजगी म्हणजे व्यक्तींच्या मालकीच्या; ४. व दलालीच्या पेढ्या (Exchange Banks). अशा चार तऱ्हेच्या पेढ्या असून, ह्या सर्व लेखांत समाईक भांडवलाच्या पेढ्यांचाच विचार केला आहे. त्यांत हिंदी पेढ्यांचा उपक्रम कसा झाला, पंजाब प्रांतानें त्यांत आघाडी कशी मारली, युरोपिअन बँकांनीं प्रथम येथलें क्षेत्र कसें आक्रमिलें, हिंदी उद्योगधंद्यांच्या वाढीच्या दृष्टीनें युरोपिअन बँका कसा पक्षपात करतात, कांहीं युरोपिअन बँकांनीं दिवाळें काढून हिंदी ठेवीदारांना कसें बुडविलें, व त्यामुळें हिंदी भांडवलानें

हिंदी लोकांच्या हुकमतीखालीं समाईक भांडवलाच्या बँका काढण्याची कल्पना वळावून तिला मूर्तस्वरूप कसें आलें, व प्रथमतः अगदीं लहान असणाऱ्या हिंदी बँकांच्या कार्यक्षेत्राचा विस्तार १९१२-१३ सालीं कशा प्रचंड स्वरूपांत फोंफावला वगैरे अत्यंत महत्त्वाची व उपयुक्त माहिती मोठ्या मनोरंजक तऱ्हेनें सांगितली आहे. विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे, बँकांच्या वाढीस अनुकूल अगर प्रतिकूल पद्धतीची व्यवस्था–पद्धति कोणती, हेंहि ओघानें सांगून नामधारी डायरेक्टरांच्या कमकुवतपणामुळें वाटेल त्या स्वरूपाचा कररारनामा करून घेऊन अनिष्ट वळणाच्या मॅनेजिंग एजन्सीच्या पद्धतीवर टीका केली आहे, व त्या पद्धतींत सुधारणा करावी असा इषाराहि देऊन ठेविला आहे. त्या टीकेस एक प्रकारचें विशेष महत्त्व आहे; व साधारणतः अर्थशास्त्रावरील ग्रंथांत बँकांच्या संबंधीं ऊहापोह करीत असतांनाहि त्या व्यवस्थापद्धतीकडे ग्रंथकारांचें लक्ष सहसा जात नाहीं. नुसत्या बँकांच्या शास्त्रीय विवरणांतच पानेंच्या पानें खलास होऊन, बँका सुदृढ कशा होतील, व कोणती व्यवस्था–पद्धति हितावह होईल, ह्या मुद्द्याकडे तादृश लक्ष दिलेलें नसतें; पण ह्या अत्यंत महत्त्वाच्या मुद्द्याकडे श्री. तात्यासाहेबांनीं वाचकांचें व अभ्यासकांचेंहि लक्ष वेधलें आहे, ही गोष्ट स्मरणीय आहे. पेढ्यांवरील सदरहू लेखांत बँका कशा बुडतात, व त्या बुडण्यास विशेष काय कारणें घडतात, ह्याचेंहि विवेचन केलें आहे. साधारणतः पेढ्यांच्या व्यवहाराबाबत जवळ जवळ सर्वांगीण चर्चा श्री. तात्यासाहेबांनीं आपल्या वर उल्लेखिलेल्या लेखांतून केली आहे. त्यानंतर बरेच दिवस सदरहू विषयावर त्यांनीं लिहिलें नाहीं. पुढें ते १९२४ व १९२७ मध्यें असेंब्लीमध्यें निवडून आले, व १९२७ मध्यें सरकारनें रिझर्व बँक बिल आणलें, त्यावेळीं त्यांनीं सदरहू बिलावर असेंब्लीमध्यें भाषणेंहि केलीं व केसरींतून लेखहि लिहिले. त्यांनीं सदरहू विषयांवर केलेल्या इंग्रजी भाषणाचा परामर्ष ह्या लेखाच्या प्रारंभीं घेण्यांत आला आहेच. आतां त्यांनीं 'रिझर्व बँक बिलाचें भांडण' व 'रिझर्व बँक अथवा गंगाजळी' ह्या नांवाखालीं लिहिलेले चार लेख यांचा थोडक्यांत विचार करूं. 'रिझर्व बँक बिलाचें भांडण' हा लेख सरकार व लोकप्रतिनिधि ह्यांमध्यें रिझर्व बँक कोणत्या तत्त्वावर स्थापावी व तिची घटना कोणत्या स्वरूपाची असावी, ह्याबाबत झालेल्या मतभेदाची चर्चा करणारा आहे, व म्हणून त्यास अर्थशास्त्रीय महत्त्व नाहीं. परंतु ज्या रिझर्व बँकेसंबंधीं सरकार व लोकमत ह्यांमध्यें एकप्रकारची कुस्ती लागली

होती, व कांहींहि होवो रिझर्व बँक स्थापन करावयाचीच असा चंग बांधून त्यावेळचे फडणवीस सर बेसिल ब्लॅकेट ह्यांनीं मुद्दाम विलायतची वारी करून तें बिल पास करून घेण्याचा अट्टाहास केला होता, व पुढें आपल्या म्हणण्या-प्रमाणें साधत नाहीं, म्हणून सबंध बिलच त्यांना परत घ्यावें लागलें, ती रिझर्व बँक म्हणजे काय त्याचें अत्यंत सुंदर, व शास्त्रीय विवेचन ह्या चार लेखांकांत श्री. तात्यासाहेबांनीं केलें आहे. रिझर्व बँक ह्या इंग्रजी शब्दा-ऐवजीं गंगाजळी पेढी हा सुटसुटीत व समानार्थक शब्द त्यांनीं उपयोजिला आहे. प्रथम रिझर्व बँकेची जरूरी काय, इंपीरिअल बँकेच्या व रिझर्व बँके-च्या कामामध्यें काय फरक रहाणार, ही बँक काढण्यांत सरकारचा हेतु काय, व ही बँक स्थापून साधल्यास स्टेटसेक्रेटरीच्या सासुरवासांतून स्वतःस मुक्त करून घेण्याचा सरकारचा हेतु कसा होता वगैरे गोष्टींची चर्चा केली आहे. त्यानंतर इंपीरिअल बँक व इतर समाईक भांडवलाच्या बँका ह्यांच्या व्यवहारांपेक्षां ह्या बँकेचे व्यवहार निराळे कसे रहातील ह्याचें विवेचन केलें आहे. रिझर्व बँक म्हणजे पेढीवाल्यांची पेढी ( Bankers' Bank ) असें तिचें स्वरूप राहील. ही गोष्ट ह्या बँकेला आपल्या नांवाच्या नोटा काढण्याचा अधिकार राहून, चलनाबाबतचे सर्व व्यवहार, म्हणजे बाजारांत नाणें किती चालू द्यावें, नाणें जास्त झालें असतां तें कमी कसें करावें, नोटा किती रकमेच्या पाडाव्या, सोन्याचें नाणें मागणी आली असतां कसें पुरवावें, व इतर बँकांनीं वटविलेल्या हुंड्या पुन्हां वटवून त्या बँकांना रोकडीचा पुरवठा कसा करावा, व इतर सर्व बँकांच्या आपापसांतील देण्याघेण्याचा निकाल वजा-वटीनें कसा करावा, वगैरे गोष्टींचा ऊहापोह करून स्पष्ट केली आहे. पुढें चलनाच्या बाबत सरकारला दरसाल फायदा कसा व किती होतो हें दाखवून रिझर्वचा म्हणजेच गंगाजळीचा उगम कसा होतो, हें दाखविलें आहे. गंगा-जळीचे दोन प्रकार आहेत. एक 'पेपर करन्सी रिझर्व' अथवा कागदी चलनी नोटांबाबतची गंगाजळी, व दुसरी 'गोल्ड स्टँडर्ड रिझर्व' किंवा सुवर्णमापनाची गंगाजळी. पेपर करन्सी रिझर्व, व गोल्ड स्टँडर्ड रिझर्व म्हणजे काय ह्याची सुशिक्षितांपैकीं शेंकडा वीसहि लोकांना माहिती नसते. ती माहिती करून घेण्याचा प्रयत्न एखाद्या इंग्रजी अगर मराठी अर्थशास्त्राच्या ग्रंथावरून केल्यास शास्त्रीय परिभाषेमुळें पुष्कळ वेळां गोंधळ उडतो. चांगले सुशिक्षित लोक सुद्धां 'कायहो, ह्या कागदांच्या नोटांना पांच पासून दहा हजार रुपयांपर्यंत किंमत कशी येते !' अशा तऱ्हेचा अडाणी प्रश्न विचारतांना दृष्टीस

पडतात. त्याचप्रमाणें एका रुपयाचे १६ पेन्स काय, २४ पेन्स काय व १८ पेन्स काय ही हि भानगड सामान्य लोकांना समजत नाहीं; व म्हणूनच अशा वाचकांसाठीं हे लेख लिहितांना श्री. तात्यासाहेबांनीं हे अवघड वाटणारे विषय अतिशय सुगम तऱ्हेनें वाचकांपुढें मांडले आहेत. हे लेख वाचून पेपरकरन्सी रिझर्व, व गोल्ड स्टँडर्ड रिझर्व म्हणजे काय हें न समजणारा वाचक विरळाच. सरकार ज्या नोटा काढतें, त्या नोटा सरकारी खजिन्यांत केव्हांहि परत नेऊन दिल्यास, त्या नोटांवर लिहिलेल्या रकमेचे रुपये देण्यास सरकार बांधलेलें आहे; व म्हणून अशा रकमा केव्हांहि मागणी आल्यास रोख चांदीच्या रुपयांत देण्यासाठीं म्हणून सरकार कांहीं एका विवक्षित प्रमाणांत चांदीचे रुपये गंगा-जळीच्या रूपानें ठेवतें, व ह्या काढून ठेवलेल्या रकमेसच पेपर करन्सी रिझर्व म्हणतात, हें सोदाहरण व आंकडेवार माहिती देऊन समजावून दिलें आहे. त्याचप्रमाणें लेखांक चारमध्यें चांदीच्या रुपयाची किंमत सोन्याचे नाण्यांत करावयाचा प्रसंग परदेशाशीं व्यापार करतांना कसा येतो, चांदीच्या रुपयाची कायदेशीर किंमत जरी १६ आणे असली तरी वस्तुतः त्यांत १०–१२ आण्यां-चीच चांदी कशी असते; परदेशी व्यापाऱ्यांना त्यांचे देशांत सोन्याचें नाणें चालू असल्यामुळें, व त्यांना सोन्याच्याच नाण्यांत त्यांची किंमत पटवावी लागत असल्यामुळें त्यांच्या रकमांची फेड, काय पद्धतीनें करावी लागते वगैरे माहिती देऊन, हिंदुस्थानांतील चांदीच्या रुपयाशीं सोन्याच्या किंमतीचें जें प्रमाण कायदेशीर रीतीनें बसविलें आहे, त्यांत सोन्याचांदीच्या भावाच्या चढ-उतारामुळें जर रुपयाची किंमत कमी झाली, तर त्यावेळीं ती तूट भरून येण्यासाठीं म्हणून एक स्वतंत्र निधि सरकारनें उत्पन्न केला आहे, व त्यासच गोल्ड स्टँडर्ड रिझर्व असें म्हणतात. चांदीचा रुपया हें सरकारनेंच कायदेशीर रीत्या ठेवलेलें चलन आहे, व त्या रुपयाची किंमत सोन्याच्या मापनानें कमी झाल्यास, ती कमी झालेली किंमत पूर्ण करून देण्यास सरकार बांधलेलें आहे, व म्हणून ज्या ज्या वेळीं असा प्रसंग येईल, त्या त्या वेळीं उपयोगी पडावा म्हणून एक निधि निर्माण करून त्यास सुवर्णमापन निधि असें नांव दिलें आहे. पेपर करन्सी रिझर्व्ह व गोल्ड स्टँडर्ड रिझर्व्ह अशा दोन्ही प्रकारचे निधि लंडन येथें ठेवण्यांत आले असून त्यांचा उपयोग हलक्या व्याजानें लंडनच्या व्यापाऱ्यांना रकमा कर्जाऊ देण्या-कडे होतो, व हिंदुस्थानच्या तिजोरींतून अशा तऱ्हेनें हे निर्माण केलेले निधि हिंदी व्यापाऱ्यांच्या उपयोगीं न पडतां इंग्रजी व्यापाऱ्यांच्या उपयोगीं पडतात

व त्यामुळें हिंदी व्यापाऱ्यांचें नुकसान होतें, अशी टीका करून हे लेखांक संपविले आहेत.

ज्याप्रमाणें रिझर्व्ह बँकेच्या वादविवादानिमित्त हे चार लेखांक लिहून ह्या विषयाची माहिती श्री. तात्यासाहेबांनीं सुगम केली आहे, त्याचप्रमाणें ज्या वेळीं सरकारनें हुंडणावळीचा भाव अठरा पेन्सांचा कायद्यानें ठरविला, त्यावेळींहि सरकार व लोकप्रतिनिधि ह्यांची खडाजंगी उडाली. लोकांचें म्हणणें हा भाव पूर्वीप्रमाणें सोळा पेन्स असावा व सरकारचें म्हणणें तो अठरा असावा, व अर्थात् सरकारनें आपला हट्ट तडीस नेला. त्या वादविवादाची धूळ बरेच दिवस उडत होती, व त्या वादाचें रूप लोकांस कळावें म्हणून त्यांचे बाबतींत बहुशः सार्थ असणाऱ्या ' आजन्म विद्यार्थी ' ह्या सहीनें ' हुंडणावळीचा घोंटाळा ' ह्या नांवाचे पांच लेखांक श्री. तात्यासाहेबांनीं लिहून, अत्यंत घरगुती व सोपे दाखले देऊन त्या विषयाची सजावट केली आहे. हुंडणावळीच्या घोंटाळ्याचीं कारणें त्यांनीं पुढीलप्रमाणें सांगितलीं आहेत. १. विलायतेंत सोन्याचें नाणें चालतें. २. हिंदुस्थानांत रुप्याचें नाणें चालतें. ३. विलायतेंत माल खरेदी केल्यास त्याची किंमत किंवा कोणाचें देणें असेल ती रक्कम सोन्याच्या पौंडांत द्यावी लागते. ४. हिंदुस्थानांत तीच चांदीच्या रुपयांत द्यावी लागते आणि ५. सोन्यारुप्याची परस्पर किंमत नेहमीं बदलत असते. ह्याप्रमाणें कारणमीमांसा करून, सरकार हेंच ह्या घोंटाळ्यास कारण कसें आहे, हें सरकारनें हिंदुस्थानांत सोन्याचें नाणें सुरू करण्याचें नाकारून, रुप्याची किंमत कृत्रिम तऱ्हेनें वाढवून, लहर लागेल तेव्हां नाण्याची विपुलता किंवा टंचाई करून, मालाच्या पैदाशींत विशेष वटघट नसतांहि कृत्रिम तऱ्हेनें भावांत चलविचल करून, हा गोंधळ कित्येक वर्षे सुरू ठेवला आहे हें दाखविलें आहे. पुढें राष्ट्राराष्ट्रांतील व्यापार कसा चालतो, निव्वळ ऐनजिनसी अदलाबदल शक्य नसल्यामुळें, देण्याघेण्याचा हिशोब निकालांत काढण्यासाठीं पैशाचें माध्यम कसें उपयोगीं पडतें, पण पैसा म्हणजे निरनिराळ्या राष्ट्रांत चालणारें निरनिराळें नाणें, हें परस्परांशीं कायमच्या प्रमाणांत निगडित नसल्यामुळें हुंडणावळीच्या चढउताराचा प्रश्न कसा उद्भूत होतो, व तो सर्वच राष्ट्रांना थोडयाबहुत प्रमाणांत कसा त्रास देतो, परंतु स्वतंत्र राष्ट्रांत, हा प्रश्न राष्ट्राच्या हिताच्या दृष्टीनें तेथील सरकार, जनता व धंदा कशा रीतीनें सोडवितात, पण तोच प्रश्न हिंदुस्थानच्या राजकीय परवशतेमुळें, कसा त्रासदायक बनतो; ह्या सर्व प्रकारांचें वर्णन

अगदीं सोप्या भाषेंत घरगुती उदाहरणें देऊन केलें आहे. अर्थशास्त्राच्या मूलभूत तत्त्वांची माहिती नसणाऱ्या कोणाहि वाचकानें हे लेख वाचले तर हुंडणावळ म्हणजे काय, तिच्या भावांत चढउतार कां व कसे होतात, त्यामुळें घोंटाळा कसा माजतो, व तो कसा दूर करतां येईल ह्या सर्व प्रश्नाचें यथातथ्य ज्ञान त्यास होईल.

येथपर्यंत श्री. तात्यासाहेबांच्या अर्थशास्त्रविषयक वाङ्मयाचा विचार झाला. आतां प्रात्यक्षिकाचा विचार करावयाचा.

पुणें येथें निघालेल्या 'पूना सेंट्रल को-ऑपरेटिव्ह बँके'चे ते उत्पादक, डायरेक्टर व चेअरमन होते. त्यांच्याच प्रोत्साहनानें व साहाय्यानें 'कॉसमॉस अर्बन-को-ऑपरेटिव्ह बँक' 'मर्चंट्स् को-ऑपरेटिव्ह बँक' ह्या बँकांचींहि कामें चालू आहेत. बहुशः ह्या सर्व ठिकाणीं डायरेक्टर म्हणून, सल्लागार म्हणून अगर अध्यक्ष म्हणून त्यांनीं कामें केलीं आहेत. सहकारी चळवळींत त्यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला होता व त्यांच्या या कामगिरीचें द्योतक म्हणून त्यांना सोलापूर येथें १० जुलै १९२९ रोजीं भरलेल्या सहकारी परिषदेचे अध्यक्ष निवडलें होतें. त्या वेळीं अध्यक्ष ह्या नात्यानें त्यांनीं केलेलें भाषण सहकारी चळवळीच्या दृष्टीनें मोठें उद्बोधक झालें आहे. शेतकऱ्यांच्या दृष्टीनें सहकारी चळवळ कशी फायदेशीर होईल याचा ऊहापोह त्यांनीं आपल्या भाषणांत केला आहे. सहकारी पतपेढ्यांसंबंधीं त्यांनीं एक 'पतपेढ्या व स्वावलंबन' म्हणून लेख लिहिला असून, त्यांत सहकारी पेढ्या स्वावलंबी कशा होतील, त्यांना भांडवलाचा पुरवठा कसा करतां येईल वगैरेबाबत उपयुक्त सूचना केल्या आहेत.

राष्ट्राच्या आर्थिक उन्नतीचे मुख्य घटकावयव म्हणजे बँका व विमा कंपन्या. त्यांपैकीं बँकांसंबंधीं श्री. तात्यासाहेबांनीं पुष्कळ लिहिलें, पुष्कळशी चर्चा केली, व प्रत्यक्ष कार्यहि डिस्ट्रिक्ट को-ऑपरेटिव्ह बँक वगैरे काढून केलें. पण विमा कंपन्यांबाबतचें त्यांनीं केलेलें कार्य लोकांना तितकें माहित नाहीं. विमा कंपन्यांसंबंधीं त्यांनीं लेख असे लिहिले नाहींतच. पुणें येथील सुप्रसिद्ध विमाशास्त्रज्ञ (Actuary) श्री.ग.स.मराठे, एम्.ए., ए.आय्.ए. ह्यांच्या मदतीनें १९१२ सालचा हिंदी विमा कंपन्यांबाबतचा कायदा सुधारण्याचा असेंब्लीमध्यें त्यांनीं एकदां प्रयत्न केला, व त्या वेळीं तो सफल झाला नाहीं, तरी पुढें सरकारास त्याप्रमाणें बिल आणून १९२८ सालीं थोडीबहुत कायद्यांत दुरुस्ती करावी लागली. ह्या नवीन सुधारणेनें, परदेशी विमा

कंपन्यांनीं हिंदुस्थानांत केलेल्या कामाची आंकडेवार माहिती मिळण्याची सोय झाली आहे, व त्यामुळें हिंदी व परदेशी कंपन्यांच्या कामाची तुलनात्मक अभ्यास करण्याची संधि प्राप्त झाली आहे. पुणें येथील कॉमनवेल्थविमा कंपनीचे ते डायरेक्टर व अध्यक्ष असून कंपनीची जी भरभराट होत आहे तिला त्यांचें नेतृत्व पुष्कळच उपयोगीं पडलें आहे.

आतांपर्यंत केलेल्या विवेचनावरून हें दिसून येईल कीं, श्री. तात्यासाहेबांचा अर्थशास्त्राशीं जरी एक अभ्यासक म्हणूनच संबंध आहे, तरीहि त्या विषयाचा त्यांचा व्यासंग वरवरचा नसून त्या शास्त्रांतील अत्यंत अवघड विषय त्यांनीं आत्मसात् केले असून त्यांच्या मूलग्राही पद्धतीनें त्यांनीं ' जें जें, आपणांसि ठावें । तें तें इतरांसि शिकवावें । शहाणें करून सोडावें । सकळजनां ।' ह्या रामदासांच्या उक्तीप्रमाणें अर्थशास्त्रांतील कांहीं राष्ट्रीय दृष्ट्या अत्यंत महत्त्वाचे व जिव्हाळ्याचे प्रश्न हातीं घेऊन मराठी वाचकांसाठीं अत्यंत सुगम पद्धतीनें त्या प्रश्नांचें शास्त्रीय व तात्त्विक दृष्ट्या विवेचन करून, त्यांनीं मराठी वाचकवर्गावर खरोखर मोठेच उपकार केले आहेत. श्री. तात्यासाहेबांनीं नुसते अर्थशास्त्रविषयक लेख लिहूनच अर्थशास्त्रविषयक कामगिरी बजावली, असें नसून त्यांचे हातून पुष्कळ प्रत्यक्ष कार्यहि झालें आहे.

असो. श्री. तात्यासाहेबांच्या अर्थशास्त्रविषयक लेखांचा व त्यांनीं प्रत्यक्ष केलेल्या अर्थशास्त्रविषयक कामगिरीचा अगदीं थोडक्यांत परामर्ष घेत असतां सुद्धां लेखविस्तार पुष्कळच झाला; परंतु त्यांच्या ह्या बाबतच्या कामगिरीचें स्थूल स्वरूप जरी ह्या लेखामुळें वाचकांना प्रतीत झालें, तरीहि लेखकाचा हेतु अंशतः सफल झाला असें समजून लेखकास आनंद वाटेल.

---

# १४. केळकर यांचें धार्मिक व सामाजिक धोरण

( प्रो. प्रभाकर वासुदेव बापट, एम्. ए., बी. टी., ग्वालेर. )

श्री. तात्यासाहेब केळकरांचें सामाजिक व धार्मिक बाबतींतील धोरण काय हें स्पष्ट व पुरतें कळून येण्याची सोय खुद्द त्यांचेच लेख देऊन अन्यत्र केली आहे ( उतारे पृष्ठें १२२–१८२ पहा ). तेव्हां त्यांत जो भाग आला नाहीं किंवा त्या लेखांतीलच अर्थ ज्या सूत्रामुळें अधिक सुगम होईल असें वाटतें त्याचेंच विवेचन पुढें करण्याचें योजिलें आहे.

हिंदुसमाजास बदलत्या काळास अनुसरून बदललें हें पाहिजेच. पण हें बदलत असतां तात्यासाहेबांचे मतें एक सूत्र आपण नेहमीं लक्षांत ठेवलें पाहिजे. तें म्हणजे सारासारविचार होय. या एका शब्दांत केळकरांचें सर्व समाजसुधारणाविषयक धोरण पूर्णपणें प्रतिबिम्बित झालेलें आहे. त्याचें तात्विक विवरण त्यांच्याच शब्दांत करणें चांगलें. " सारासारदृष्टि ही पक्षाभिमानाची नसून सारग्राहकत्वाची आहे. हर्बर्ट स्पेन्सर यानें सत्यान्वेषण करण्याची जी रीति सांगितली आहे ती कोणाहि विचारी मनुष्यास पसंत होण्यासारखी आहे. तो म्हणतो कोणत्याहि पक्षांत सत्य हें थोडेंबहुत असतेंच; तें सर्व एकाच पक्षांत केव्हांहि सांपडत नाहीं. याचें कारणच असें कीं, कोणत्याहि विषयासंबंधींचे सिद्धांत त्याजकडे ज्या दृष्टीनें पहावें त्या दृष्टीनें बदलतात. एकाद्या सुधारणेचा विचार शास्त्र, रूढि, समाज व व्यक्ति इतक्या निरनिराळ्या दृष्टींनीं करावयाचा असतो; व या प्रत्येक दृष्टीनें पाहूं गेलें असतां सत्य सिद्धांतहि थोडाबहुत निरानिराळा निघतो. सारासारविचार म्हणजे अशा अनेक बाजूंनीं निघणाऱ्या सत्य सिद्धांतांचा एकीकरणाचा प्रयत्न" अशा तऱ्हेचा विचार करण्यास खुद्द केळकरांची मनोरचनाहि फार अनुकूल आहे. किंबहुना उलट बाजूनें कोणत्याहि गोष्टीचा थोडा एकनिष्ठ विचार करून एकाद्या गोष्टीचें आग्रहपूर्वक व अट्टाहासानें प्रतिपादन करण्यास तात्यासाहेब असमर्थच आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्यांच्या राजकारणविषयक कामगिरीविषयीं त्यांचे मित्रहि कधीं कधीं या गुणांचा दोष म्हणून उच्चार करतात. खुद्द तात्यासाहेबांनाहि एकानें धिटाईनें हा प्रश्न केला असतां, 'एकाद्या विषयावर लिहावयाला बसलों असतां त्याची दुसरी बाजूच मला आधीं दिसते, त्याला मी काय करूं ! ' असें त्यांनीं अर्धवट विनोदानें उत्तर दिलें होतें; तेंच त्यांच्या मनोरचनेचें खरें द्योतक आहे. पण चढाईच्या

राजकारणांत प्रसंगविशेषीं जो दोष ठरेल तोच सामाजिक व धार्मिक सुधारणां-चा विचार कर्तव्य असतां अमोलिक असा सद्गुण ठरतो व याच कारणामुळें त्यांचे विचार समाजापुढील सध्याच्या बिकट परिस्थितींत त्याला मार्गदर्शक होणारे आहेत. म्हणूनच या सारासारविचाराच्या उपांगभूत तत्त्वांची येथें थोडी अधिक चर्चा करण्याचें योजलें आहे.

या सारासारविचारांतील पहिलें मोठें तत्त्व म्हणजे **स्वत्वरक्षण** होय. कोणतीहि सुधारणा घडवून आणावयाची, ती अशाच तऱ्हेनें घडवून आणली पाहिजे कीं, त्यायोगें समाजाच्या पायाखालींच खणलें न जावें. प्रत्येक समाजाचें व संस्कृतीचें स्वतंत्र असें वैशिष्ट्य असतेंच व तें जोंपर्यंत अस्तित्वांत आहे, तोंपर्यंत त्या समाजास कसलीच भीति नाहीं. पण तें ज्या दिवशीं नष्ट होईल त्या दिवशीं त्याचें जगांतलें कार्य संपलें असें होऊन तो समाज केव्हां नाश पावेल हें सांगतां येणार नाहीं. म्हणून कोणाहि विचारी समाजसुधारकानें हें वैशिष्ट्य दुखावलें जाणार नाहीं याची सदैव काळजी घेतली पाहिजे. कोणत्याहि समाजाला नियंत्रणासाठीं कांहीं बंधनें लागतातच व कालान्तरानें तीं जाचक होऊं लागल्यावर त्यांत फरकहि करावा लागतोच. पण तो करतांना नवीं बंधनें उत्पन्न करून तद्वारा जुनीं नाहींशीं करणें हाच मार्ग समाजाच्या हिताचे दृष्टीनें श्रेयस्कर. "कोणत्या म्हणून धर्माचाराचें कसलें बन्धन न मानतांहि समाजांत मनुष्य नांदूं शकतो; नाहीं असें नाहीं. पण हें वर्णन लागूं पडणाऱ्या व्यक्ति केव्हांहि फार थोड्याच असतात." नवीं बन्धनें समाजानें स्वीकारलीं म्हणजे जुनीं आपोआप सैल पडून कालान्तरानें नष्ट होतात. 'नवें जोडावें पण जुनें सोडूं नये' हा सामाजिक प्रगतीचा सर्वांत कमी धोक्याचा मार्ग आहे. या दृष्टीनें समाजाचें योग्य नियमन व्हावें म्हणून एकादी मध्यवर्ति धार्मिक संस्थाहि असणें जरूर आहे व याच दृष्टीनें शंकराचार्यांच्या पीठांचा विचार करतांना 'ऐहिक उपाधींचा संसर्ग तोडून धर्म व विद्या यांच्या केवळ परिपोषाकडे लक्ष घालणाऱ्या' धर्मपीठांची आवश्यकता केळकरांनीं प्रतिपादिली असून, तीं धर्मपीठें संभाळून ठेवणें व त्यांची परंपरा अखंड चालूं देणें हें समाजाचें कर्तव्य आहे, असें त्यांनीं म्हटलें आहे.

सामुदायिक सदसद्विवेकबुद्धि जागृत करणें हाच होय. या देवतेस लावलेला कौल कदापि व्यर्थ जाणार नाहीं. प्रो. कर्व्यांसारख्यांना समाजानें विलक्षण विरोध केला. तरी आज समाजाच्या विचारांत क्रांति होऊन त्यांचा गुण-गौरव तो करीत आहेच कीं नाहीं? बहुजनसमाज त्यांतहि हिंदुसमाज विशेष पुराणप्रवण असल्यामुळें सुधारकाला निराशेच्या वेदनाहि प्रसंगविशेषीं अनुभवाव्या लागतील; पण कालान्तरानें समाजावर परिणाम हा झालाच पाहिजे. उलट जितक्या प्रमाणांत सुधारणेची आवश्यकता जास्त, तितक्या लवकर समाज ती स्वीकारतो. सुधारणेच्या युक्तायुक्ततेची ही एकप्रकारें कसोटीच होय. म्हणून कोणतीहि सुधारणा घडवून आणतांना लोकमत आपले बाजूस घेण्याची खटपट केली पाहिजे. आपल्या सामाजिक व धार्मिक परंपरेस मूलत: विरोधी नसेल तर समाज तिचा खात्रीनें स्वीकार करील; तात्यासाहेबांनीं या बाबतींत न्यायमूर्ति रानड्यांचाच आधार घेतला आहे. न्यायमूर्ति रानडयांनीं एकदां मागें म्हटल्याप्रमाणें—

"The true reformer has not to write upon a clean slate. His work is more often to complete the half-written sentence. We cannot break with the past altogether. For, it is a rich inheritance and we have no reason to be ashamed of it. But while respecting the past, we must ever seek to correct the parasitical growths that have encrusted it." (1892)

कोणतीहि सुधारणा एकाद्या विरोधी तत्त्वांच्या स्वरूपांत समाजापुढें ठेवण्यानें कोणताच फायदा होत नाहीं. शुद्ध तत्त्वांच्या अनुरोधानें कोणताच समाज चालूं शकत नाहीं. तीं तत्त्वें व्यवहारांत उतरवितांना त्याला किती तरी ठिकाणीं मुरड घालावी लागते म्हणून कोणतीहि सुधारणा शुद्ध तात्त्विक स्वरूपांत न मांडता 'व्यवहाराच्या पोटांत मार्मिकपणें शिरून, व वादग्रस्त मुद्द्यांना हात घालून ते खेंचून बाहेर काढून व ते प्रश्नरूपानें लोकांपुढें मांडून, त्यांचीं योग्य उत्तरें देऊन तीं सर्वमान्य करण्याचा प्रयत्न झाला पाहिजे.' अशा तऱ्हेनें समाजाच्या अंतरगांत शिरून सुधारणा घडवून आणणाऱ्या सुधारकाचा आदर्श म्हणून पंडित मदनमोहनांचें चित्र तात्यासाहेबांनीं एके ठिकाणीं रेखाटलें आहे. " मतें तर उदार असावीं, पण कृतीहि अशी असावी, कीं तिजमुळें जनता आपल्यापासून उद्वेग वाटून फुटून जाऊं नये. अशा रीतीनें पुढाऱ्यानें एक एक पाऊल समाजाला आपल्या बरोबर

घेऊन प्रगतीच्या मार्गावर नेत रहावें हें जें समाजशास्त्रांतील एक महत्तत्त्व त्यांचा एक उत्कृष्ट नमुना पंडित मदनमोहन माळवीय यांचेमध्यें दिसून येतो." अशा तऱ्हेची व्यक्ति मिळाली, कीं समाजसुधारणेचें कार्य फार दुर्घट होत नाहीं. "सामाजिक सुधारणेचे शब्द ऐकू आल्यास कानांत तापलेलें शिसें ओतल्याप्रमाणें ज्यांना दुःख होतें, अशा वेताळ श्राडमुठ्या पंडितांची खिल्लारें वळवून नेण्याला पंडितजी हे एकटेच समर्थ ठरतात. याचें कारण हेंच कीं, स्वतः पंडितजी हे सामाजिक बाबतींत अत्याचारी नाहींत किंवा मिथ्याचारी नाहींत अशीच जनतेची खात्री असते." हिंदुसमाजांत आजपर्यंत फरक होत गेले ते अशा तऱ्हेच्या विद्वान्, द्वेषरहित सात्त्विक व विचारी अशा महाजनांच्या प्रयत्नानेंच. अशा तऱ्हेचे पुढारी मिळणें दैवाधीन मानलें तरीं प्रत्येकानें आपापल्या परीनें समाजाचा विश्वास संपादन करून सामाजिक आचारविचारांना उजळा देण्याचा प्रयत्न केला पाहिजे. ही जबाबदारी योग्य तऱ्हेनें न ओळखल्यामुळेंच आजची हीन स्थिति प्राप्त झाली. समाज हाच समाजाचा राजा; समाज हीच समाजाची प्रजा; समाज हेंच समाजाचें पार्लमेंट व समाज हेंच समाजाचें न्यायमंदिर; म्हणून त्याला जागृत करून इष्ट ती सुधारणा घडवून आणण्याचा प्रत्येकानें प्रयत्न करावा.

याच ठिकाणीं शास्त्रासंबंधीं तात्यासाहेबांचीं मतें पाहिल्यास वावगें होणार नाहीं. समाजसुधारणा करावयास निघालों कीं, पहिली मोठी अडचण उपस्थित होणार, ती धर्मशास्त्राच्या अनुज्ञेची. बहुजनसमाजाची भावना अशी कीं, जें शास्त्रांत नाहीं तें धर्मबाह्य होय. याकरितां नवसुधारणावाद्यांनीं आपापल्या सुधारणांना शास्त्रहि अनुकूल आहे असें दाखविण्याचा प्रयत्न केला. स्वतः टिळकांचा कलहि होता होईल तों शास्त्राधारेंच नवीन सुधारणांचा पुरस्कार करण्याकडे होता. शास्त्राची अनुमति नसली तरी, निदान त्यांचा प्रत्यक्ष निषेध नसला तरी, पुष्कळच मिळविलें असें मानण्याकडे त्यांची प्रवृत्ति होती. तात्यासाहेबांची भावना यापेक्षां निराळी आहे. त्यांच्या मतें शास्त्रार्थाची चर्चा करून सुधारणांची तड लागणार नाहीं. "श्रुति मूलाधार खरी, पण तिजमध्यें सर्व विषयांसंबंधानें व्यापक अशा धर्मचोदना नाहींत. श्रुतीच्याहि शाखा असल्यामुळें सर्वच श्रुति सारखी प्रमाणभूत मानली जात नाहीं. श्रुतीच्या खालोखाल स्मृति येतात; पण स्मृतिग्रंथ इतके आहेत कीं, त्यांची एकवाक्यता करणें कठिण आहे. यांतच टीकाग्रंथांची व पुराणांची भर पडली म्हणजे पाहायलाच नको! शास्त्र हा आपणास दोन अक्षरी लहानसा सुटसुटीत शब्द

वाटतो खरा, पण त्याची व्याप्ति व निश्चितार्थ ठरविणें अत्यंत दुर्घट काम होय. बरें, यांतूनहि वादविवाद करून निर्णय करण्याचें ठरविलें तरी दोन्ही पक्ष ऐकून घेऊन निर्णय करणारा कोण व तो निर्णय मान्य करावयास कसा लावावयाचा ही अडचण शिल्लक राहतेच; पण शास्त्रार्थाची अडचण आजच भासते असें नाहीं. पूर्वीहि भासली होती. ही अडचण नाहींशी करण्याचा उत्तम मार्ग म्हणजे शास्त्रविषयक प्रामाण्याची योग्य मर्यादा ओळखून शास्त्रार्थाचा फार कीस न काढतां, त्यांतील मूळ तत्त्व व धोरण होतां होईतों न सोडतां, प्रचलित काळाला अनुसरून व समाजाच्या सदसद्विवेकबुद्धीला पटेल अशा सुधारणा लोकमत अनुकूल करून घेऊन घडवून आणणें हाच होय. हिंदुधर्माच्या इतिहासांत अशा तऱ्हेनें सुधारणा घडून आल्याचीं उदाहरणें आहेत. व विद्वान्, द्वेषरहित, सात्त्विक व विचारी असे महाजन सांगतील तो धर्म पाळण्याला स्मृतींचीहि अनुमति आहे." समाधानकारक शास्त्रनिर्णय जर कठिण आहे तर मग मनुष्यानें वागावें तरी कसें ? असा प्रश्न अर्थातच उत्पन्न होतो. व त्याचें उत्तर आपल्यांच धर्मग्रंथांतून जें सांपडतें तें मात्र त्रिकालाबाधित असून सर्वमान्य होण्यासारखें आहे. हें उत्तर असें कीं, धर्मबुद्धीनें धर्माचा योग्य विचार करून मग मनुष्यास स्वतःच्या बुद्धीस योग्य दिसेल तसें वागावें; केवळ श्रम दुस्तर आहे म्हणून थांबून राहूं नये. "मनुष्याच्या मनाची श्रद्धा हेंच अखेर सर्वोत्कृष्ट प्रामाण्यसाधन" ठरतें. व या प्रमाणावरच जगाच्या सुधारणेची नेहमीं भिस्त असते. आपल्या धर्मग्रंथांतून जितकें शास्त्राला तितकेंच आचाराला, म्हणजे शिष्टाचाराला, महत्त्व दिलेलें आहे, ही गोष्ट कोणाहि चौकस माणसास सहज दिसून येईल व आचाराला महत्त्व देणें याचा अर्थच असा कीं, शास्त्र हें सुद्धां वेळोवेळीं बदलणें जरूर असतें आणि हे फेरबदल ज्या त्या काळचे बुद्धिमान्, विचारी, व नीतिमान् अशीं पुढारी मनुष्यें घडवून आणीत असतात. शास्त्र इतकें विविध व गहन असल्यामुळें व्यक्तीच्या सदसद्विवेकबुद्धीला महत्त्व किंबहुना अग्रस्थान देण्याशिवाय केव्हांहि गत्यंतर नव्हतें. व्यक्तिमतस्वातंत्र्याचें माहात्म्य पूर्वाचार्यांनीं मानलें असल्याविषयीं वचनें वाटेल तितकीं सांपडतात. नवें—जुनें व शास्त्र आणि रूढि यांच्या झगडयाचें केळकरांनीं मोठें मार्मिक वर्णन केलें आहे. तें सर्व येथें उतरणें शक्य नाहीं. केळकरांच्याच शब्दांत या विषयाचा समारोप करावयाचा म्हणजे "समाजाच्या आयुष्याचा प्रवाह नदीच्या प्रवाहासारखा आहे. त्यांत उभें राहणाराच्या पायाखालची वाळू नेहमीं वाहून जात असते

व नवी वाळू पायाखालीं येत असते व हा सर्व व्यक्तिमताच्या स्वातंत्र्याचा व लोकमतप्रवर्तनाचा परिणाम. नदीच्या उगमाप्रमाणें रूढीचें मूळ व्यक्तीच्या मनांत असतें व तिचें प्रवर्तन करणारास प्रथम त्रास पडतो हें खरें; पण शेवटीं '–भाषा जशी व्याकरणाहून तशी रूढि शास्त्राहून प्रबळ असते.' पूर्वी जशा आचारांना धरून नवीन नवीन स्मृति झाल्या, तशा यापुढेंहि होणार नाहींत कशावरून! धर्माचें चरित्र आज संपलें आहे असें कोण म्हणेल! नवीन स्मृतिकारास धर्माचें नवीन व्याकरण लिहिण्यास आज भरपूर साहित्य खचित तयार होत आहे. समाजाचें नशीब असेल तर स्मृतिकार होण्यासारखें ज्यांचें ज्ञानबळ, तपोबळ, शील, आचार वगैरे आहेत असे पुरुष कां न निर्माण होतील!"

या सारासार विचाराचें दुसरें महत्त्वाचें उपांग म्हणजे व्यक्तिस्वातंत्र्य आहे. जुनी रूढि असो किंवा नवीन सुधारणा असो, त्या योगानें एखाद्या व्यक्तीच्या किंवा समुदायाच्या न्याय्य हक्कावर गदा येत असेल तर तेवढ्यापुरती तिला मुरड ही घातलीच पाहिजे. तर धार्मिक दृष्टीनें धर्ममार्ग हा व्यक्तिनिष्ठ असावयाला पाहिजे व प्रत्येक व्यक्तीस आपणास आवडणाऱ्या मार्गानें आपलें आयुष्य क्रमण्याचा पूर्ण अधिकार आहे असें वर सांगितलेंच आहे, त्याचाच हा सामाजिक व्यवहारांतील पडसाद होय. नवसुधारणावाद्यांनीं एकाद्या व्यक्तिसमूहाला त्याचें न्याय्य स्वातंत्र्य त्याला प्राप्त करून देत असतां आपण दुसऱ्याचे स्वातंत्र्यावर गदा आणीत नाहीं ना इकडे काळजीपूर्वक लक्ष दिलें पाहिजे. सार्वजनिक जागीं एकाद्या व्यक्तीस येण्यास हरकत करणें जितकें अन्यायाचें तितकें उच्च तत्त्व साध्य करण्याकरितां सुद्धां खाजगी जागेंत त्याच्या इच्छेविरुद्ध दांडगाईनें घुसणें अन्यायाचेंच आहे. या बाबतींत सर्व प्रगति मतपरिवर्तनानेंच घडवून आणली पाहिजे. स्वतःच्या धर्मकल्पनांबद्दल आपण जितका आदर बाळगणार तितकाच दुसऱ्याला त्याच्या चुकीच्या कां होईना, पण प्रामाणिक मतांबद्दल आदर बाळगण्यास आपण सवड दिली पाहिजे. व म्हणूनच एकादी कितीहि इष्ट असणारी सुधारणा समाजावर दांडगाईनें किंवा कोणत्याहि दुसऱ्या जबरदस्तीच्या मार्गानें लादण्याचा प्रयत्न न करतां, समजुतीच्या मार्गानेंच पुढें ढकलली पाहिजे. म्हणून कोठेंहि पूर्वपरंपरा वगैरेंनीं प्राप्त झालेले कोणाचेहि न्याय्य हक्क वा प्रामाणिक धर्मसमजुती या बाबतींत स्वातंत्र्य हरण करण्यास तात्यासाहेबांचा पूर्ण विरोध असतो. उलट हेंहि लक्षांत ठेवलेंच पाहिजे की, नवीन मताच्या लोकांसहि

त्यांच्या तत्त्वानुसार वागण्याची सवड न ठेवणें हें अन्यायाचें होईल. म्हणून सामाजिक सुधारणा कायद्यानें,-सक्तीनें बहुजनसमाजावर लादण्यास जरी त्यांचा तात्त्विक विरोध असला तरी नवमतवादी लोकांना धर्मांत राहून आचार-स्वातंत्र्य देणाऱ्या अनुज्ञापक कायद्यांचा त्यांनीं पुरस्कारच केला आहे. अशा-तऱ्हेचें व्यक्तिस्वातंत्र्य देणें सर्वथैव इष्टच होय. वर सांगितल्याप्रमाणें अशा व्यक्तिमतस्वातंत्र्यांतूनच नवयुगांच्या रूढि जन्म पावत असतात. असो. सुधारणेचा हा समजुतीचा मार्ग स्वीकारल्यामुळें सुधारणा इष्ट तितक्या लवकर घडून येणार नाहींत असें कित्येकांस वाटेल; पण त्याचें समाधान इतकेंच कीं, समाजानें तरी इतकें व्यक्तींच्या लहरीप्रमाणें कां वागावें ? व शिवाय त्याच्या होणाऱ्या बऱ्या वाईट परिणामाचा धनी समाज होणार नाहीं काय ?

या सारासारविचाराचें तिसरें महत्त्वाचें उपांग व्यावहारिकपणा होय. वास्तविक वरील दोन्ही तत्त्वांत हें अनुस्यूत झालेलेंच आहे; पण त्याचा मुद्दाम नामनिर्देश करण्याइतकें तात्यासाहेबांच्या धार्मिक व सामाजिक धोरणांत त्याचें महत्त्वाचें स्थान आहे. कोणतीहि सुधारणा समाजापुढें ठेवावयाची ती त्याच्या बलाबलाकडे पाहून त्याला पचेल अशीच पाहिजे. स्वतःचें बलाबल न पाहून भलतेंच साहस करणारा मनुष्य जसा हास्यास्पद ठरतो, तशीच स्थिति समाजाच्या दृष्टीच्या पोंचेच्याहि पलीकडील ध्येयें समाजा-पुढें ठेवणाऱ्या ध्येयाभ्यासी सुधारकाची होते. आपलें ध्येय कितीहि उच्च असलें—व तसें तें असलेंच पाहिजे—तें तरी एकदम साध्य करण्याची हांव न धरतां, व्यवहारकोटींतील ध्येयें समाजापुढें ठेवून तीं हळुहळू साध्य करीत करीत मगच प्राप्त करून घेण्याची महत्त्वाकांक्षा विचारी समाजसुधारकानें ठेवली पाहिजे. वाङ्मयांतहि आपण हा विवेक नेहमीं बाळगिला पाहिजे असें तात्यासाहेबांचें आग्रहपूर्वक म्हणणें आहे. ' अटकेपार ' किंवा ' बंधनाच्या पलीकडे ' असलेलें एकादें ध्येय वाङ्मयांतून वाचकांच्या पुढें ठेवल्यास तें शेवटीं निःसंशय हानिकारकच ठरतें असें हरिभाऊंच्या पुण्यतिथीच्या एका प्रसंगीं त्यांनीं प्रतिपादिलें होतें. या दृष्टीनें हरिभाऊंची त्यांनीं स्तुति केली. तरुण भावनाप्रधान मनें अशा तऱ्हेनें वहावून जाऊन त्यांच्या जगांतील व्यवहाराच्या भूमीवरून त्यांचीं पावलें सुटूं लागतात, व कल्पनांच्या मनोराज्यांत विहरत असतां, वास्तव जगाशीं विरोध उत्पन्न होऊन शेवटीं निराशाच त्यांचे पदरीं पडते. अशी स्थिति सर्वतोपरि अनिष्ट आहे. फार मोठी उडी घेण्यांत समाजाचा विरोध उत्पन्न होण्याची जास्त भीति आहे. उलटपक्षीं व्यवहाराच्या

मर्यादांची जाणीव बाळगल्यानें एकाद्या कुशल सेनापतीप्रमाणें हळुहळु सुधारणांचें सर्व क्षेत्र आपणांस पादाक्रांत करतां येईल. जातीजातींतील परस्परसंबंध व अस्पृश्यांचा देवालयप्रवेश यांवरील त्यांचीं मतें या त्यांच्या भूमिकेचीं उत्तम निदर्शक आहेत.

सारासारविचाराचें चवथें सूत्र समाजहिताची दृष्टि. कोणतीहि सुधारणा करतांना, नुसतें त्या योगानें सामाजिक जीवन शुद्धतर व व्यवस्थित कसें होईल व व्यक्तीच्या स्वातंत्र्यास योग्य वाव कसा लाभेल एवढेंच पाहून चालणार नाहीं, तर त्यायोगें समाज इतर समाजांच्या बरोबरीनें वैभवास चढून सामर्थ्यसंपन्न कसा होईल इकडेहि लक्ष पोंचविलें पाहिजे. सध्याच्या भीषण जीवनकलहांत प्रत्येक समाज आपणास सुसंघटित करून वैभवाचा व ऐश्वर्याचा वांटा आपणाकडेच जास्त कसा येईल या प्रयत्नांत आहे. अशा वेळीं आपण स्वस्थ बसणें म्हणजे आपलें कधींहि भरून न येण्याजोगें नुकसान करून घेण्यासारखें आहे. इतर धर्म व समाज आपल्यावर आक्रमण करीत असतां हिंदुसमाजानेंहि आक्रमणशील बनलेंच पाहिजे, तरच त्याचा निभाव लागेल. निदान हिंदुधर्म आजवर स्वदेशांतच आसन मांडून बसला आहे, तें त्याचें स्थान कायम राहून तो स्थानभ्रष्ट न व्हावा एवढी तरी खबरदारी त्यानें घेतली पाहिजे. विद्यमान हिंदुधर्म बरा वाईट कसाहि असला तरी त्यांतील समाज संख्याबळाच्या दृष्टीनें घटूं नये एवढी तरी व्यवस्था केली पाहिजे. व आजच्या प्रसंगीं परिस्थितीमुळें हें फार निकडीचें कर्तव्य होऊन बसलें आहे. यावर संख्येचें महत्त्व काय घेऊन बसलां ! हिंदुधर्म आहे तो अधिक शुद्ध स्वरूपाचा कसा होईल ही काळजी खऱ्या धर्मसुधारकानें वाहिली पाहिजे असें कोणी म्हणतील तर तात्यासाहेबांनीं त्याला दिलेलें उत्तर मननीय आहे. "ज्याला शुद्ध धर्मसंशोधनांत संख्याबळाचें महत्त्व वाटत नसेल त्याची गोष्ट वेगळी. पण 'शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम्' हें वाक्य व्यक्तिदेहाप्रमाणें धर्मदेहासंबंधानेंहि खरें आहे. हिंदुधर्माचें श्रेष्ठत्व झालें तरी तें हिंदु

हा वेगळा व श्रेष्ठ आहे हें समजल्याशिवाय व उमजल्याशिवाय भावी जीवनकलहांत हिंदुसमाजाचा निभाव लागणार नाहीं, हें सर्व हिंदुधर्माभिमान्यांनीं लक्षांत ठेविलें पाहिजे." आजपर्यंत हिंदुसमाजानें इकडे लक्ष पोंचविलें नाहीं, व हीच त्याची घोर निद्रा व आपल्या बलहानीची उपेक्षा; ही परधर्मीयांच्या पथ्यावर पडून त्याचा त्यांनीं पुरेपूर फायदा घेतला आहे. ही निद्रा व उपेक्षा टाकून देऊन हिंदुसमाजानें स्वसंरक्षणाविषयीं सदैव जागृत असावयास पाहिजे, असें करणें राष्ट्रीय वृत्तीशीं विरोधी आहे, असेंहि म्हणतां यावयाचें नाहीं. कारण इतर अल्पसंख्याक समाजांच्या कोणत्याहि न्याय्य हक्काला विरोध करावयाचा नसून उलट राष्ट्रहिताकरितां स्वार्थत्याग करण्यासहि हिंदुसमाजानें मागें घेऊं नये. पण स्वार्थत्यागाच्या व उदारतेच्या भलत्या कल्पनांनीं वाहून जाऊन इतर समाजांचा आपल्यावर जुलूम मात्र कधींहि चालूं देतां कामा नये, म्हणूनच तात्यासाहेबांनीं हिंदुसंघटना व शुद्धि या चळवळींना सक्रिय पाठिंबा देऊन हिंदुसमाजानें आपल्यांतील शैथिल्य नाहींसें करावें व स्वतःच्या रक्षणाकरितां व उन्नतीकरितां सज्ज व्हावें याकरितां फार श्रम केले. यांत समानधर्मी सुशिक्षितांकडून संकुचित वृत्तीचा नसता आरोपहि त्यांना पत्करावा लागला. पण तोहि पत्करून स्वधर्मावर आलेलें संकट ओळखून टिळकांप्रमाणें ते त्याच्या रक्षणार्थ धावले यांतच त्यांचा थोरपणा. तात्यासाहेबांनीं उपदेशिलेल्या सारासारविचाराचें स्वरूप अशा प्रकारचें आहे. ही चतुःसूत्री आपण लक्षांत ठेवून सुधारणेचें प्रवर्तन केल्यास सामाजिक सुधारणेचा निर्भय राजमार्ग मिळाल्यासारखेंच होईल. तात्यासाहेबांची भूमिका एकान्तिक ध्येयवाद्यांपेक्षां मध्यममार्ग चोखाळणाऱ्या व्यवहारी मुत्सद्याची आहे. निरानिराळे नवविचारांचे प्रवर्तक आपल्या एकान्तिक विचारसरणीचा जोरानें पुरस्कार करीत असतां, त्यास विरोध करून त्यांच्या योग्य मर्यादा त्यांस दाखवून त्यांच्या सामाजिक चळवळींत विवेक उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला हेंच या क्षेत्रांतील केळकरांचें महत्कार्य होय. टिळकांच्या वेळीं केसरीचेंहि हेंच धोरण होतें. त्यांच्याप्रमाणें केळकरांनाहि एका बाजूस या एकान्तिक सुधारणावाद्यांना थोपवून दुसरीकडे समाजासहि नवीन कालाला अनुसरून आपल्या समाजरचनेंत फेरबदल करण्याची प्रेरणा द्यावयाची होती. त्यांनीं राजकारणालाच आपणांस पूर्णपणें वाहून घेतलें असल्यामुळें, सामाजिक चळवळीच्या धोरणाच्या विधायक स्वरूपाकडे त्यांनीं फार लक्ष पुरविलें नाहीं. पण केळकरांच्या वेळीं परिस्थितींत फार महत्वाचा

फरक घडून आल्यामुळें विधायक स्वरूपांत समाजसुधारणेची चळवळ त्यांना थोडयाफार अंशानें करावीच लागली. टिळकांचा झगडा समाजहिताकडे दुर्लक्ष करणाऱ्या स्वकीयांशींच होता, तर केळकरांना स्वकीयांप्रमाणेंच परकीयांशींहि हिंदुधर्म व संस्कृति यांच्या रक्षणाकरितां झगडावें लागलें. नवीन सुधारणांच्या पुरस्कर्त्यांना पुष्कळ वेळां विरोध करण्याचा प्रसंग आल्यामुळें टिळक–केळकरांवर सामाजिक बाबतींत प्रतिगामी असण्याचा कांहीं ठिकाणीं आरोप करण्यांत येतो, पण कांहीं काळानें सामाजिक सुधारणेचा इतिहास लिहिण्याचा प्रसंग आल्यावर त्यांच्या धोरणाची योग्यता आपणांस कळून येईल. नवीन ध्येयाच्या भरांत सुरू झालेल्या अविवेकी सुधारणेच्या लाटेला थोपवून धरून सामाजिक सुधारणेचा योग्य मार्ग त्यांनीं दाखवून दिला व हिंदुधर्म व संस्कृति यांचें रक्षण केलें हीच त्यांची महत्त्वाची कामगिरी होय, व याबद्दल त्यांना जितके धन्यवाद द्यावे तितके थोडेच होतील.



अॅ. सेटल्र,  पटेल,  दादाभाई,  केळकर.

इ. १९१५

कोणतीहि चळवळ नव्हती. कोणतेंहि वर्तमानपत्र राजकीय आकांक्षा उत्पन्न करणारें चालू नव्हतें. लोकशिक्षणाचीं साधनें म्हणजे सभा, व्याख्यानें, यांचा मागमूसहि नव्हता.

अशा स्थितींत महाराष्ट्राच्या बाबतींत तरी लोकजागृति करण्याचा मान केसरी पत्रासच प्रामुख्यानें दिला पाहिजे. राजकीय उन्नतीच्या दृष्टीनें अगदीं मागासलेल्या संस्थानांत ज्या वेळीं राजकीय चळवळींचा उपक्रम झाला, त्यावेळीं केसरीचे संपादक व महाराष्ट्राचे धुरंधर पुढारी केळकर हे होते. सामान्य जनता अज्ञानामुळें इकडे दुर्लक्ष करीत असे व समंजस लोक स्वार्थपरायणतेमुळें व संस्थानिकांचा रोष होईल व आपला योगक्षेम चालण्यास अडचण येईल या भावनांनीं या चळवळीपासून अलिप्त रहात. या कारणांमुळें राजकीय उन्नतीची चळवळ तिच्या अंगच्या गुणांमुळें संस्थानी प्रजेस प्रथमतः चित्ताकर्षक वाटली नाहीं. पण केसरीसारख्या वजनदारपत्राचे संपादक या चळवळीचे प्रमुख कार्यवाहक आहेत या योगानें या चळवळींच्या प्रारंभींचे विरोधी ढंग सर्वस्वीं नाहींसे झाले.

श्री. केळकर यांनीं संस्थानी प्रजेच्या उन्नतीच्याबाबत जो पुढाकार घेतला त्याचें स्वरूप समजून घेणें अवश्य आहे. श्री. केळकर यांनीं या बाबतींत १९२१ सालीं प्रसिद्ध केलेल्या एका लेखांत खालसांतील पुढारी व संस्थानांतील प्रजाजन यांनीं काय केलें पाहिजे याचें फार मार्मिक तऱ्हेनें विवेचन केलें आहे व तें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. " ब्रिटिश मुलखांत पाश्चात्य संस्कृतीखालीं तयार झालेली नोकरशाही, संस्थानी मुलखांतील वैयक्तिक राज्यपद्धतीच्या सान्निध्यानें आपलें पूर्वशिक्षण विसरून जाऊन 'काळयाजवळ बांधला पोंवळा, वाण नाहीं पण गुण लागला' अशी बनते. संस्थानांमध्यें एका काळीं अत्युत्कट स्थितींत असलेली वैयक्तिक भक्ति खालसाच्या संसर्गानें हीनतेज झाली आहे. हिंदी संस्कृतीनें 'अराधनाय लोकानां मुंचतो नास्ति मे व्यथा' अशी मनोभूमिका तयार झालेला आमचा भूपालवर्ग खालसांतील नोकरशाहीच्या संसर्गानें, शिक्षणानें, संस्थानांतून नामशेष होत चालला आहे. तिकडे नोकरीपेशामुळें प्रजाजनांवर पितृतुल्य प्रेम करण्याचें केव्हांच शिक्षण न मिळालेला नोकरशाहींतील नोकरवर्ग राजेरजवाड्यांच्या एकतंत्री राजसत्तेच्या उदाहरणानें तेव्हांचा 'अरेराव' बनत आहे. या अशा परस्परविरोधी संस्कृतीच्या सान्निध्यानें अधिकारसंपन्न असलेल्या व्यक्ति मनुष्यस्वभावानुरूप परस्परांचे गुण घेण्याऐवजीं दुसऱ्याचे अवगुण तेवढे चटकन घेऊन दोन्ही

संस्कृतीच्या अवगुणांनीं पूर्णपणें मंडित अशी मूर्ति बनतात. खालसा मुलखांत या मूर्तीचें अधिष्ठानस्थान, काल, वय यांनीं मर्यादित असल्यानें तेथील अधिकारापन्न व्यक्तींच्यामध्यें बदल होतो. व व्यक्तिभेदानें राज्यपद्धतींत बदल होतो. संस्थानांत ही परिस्थिति नाहीं; त्यामुळें त्या पद्धतींत बदल होण्याचा फार थोडा संभव असतो. तीच स्थिति संस्थानांतील गादीनशीन घराण्यांतील व्यक्तींची होते. वैयक्तिक राज्यपद्धतीच्या वातावरणांत जन्मास आलेले, त्यांत वाढलेले राजे, युवराजे, यांच्या मनोभूमिका योग्य विचाराच्या निपजेस अपात्र झाल्यास हा त्या व्यक्तींचा दोष नाहीं. या हीनतेज झालेल्या व्यक्तींवर ब्रिटिश राज्यछत्राची संरक्षक सावली सारखी पडत गेल्यानें संस्थानांतील राज्यपद्धति सदोष बनणें साहजिकच आहे. ब्रिटिशसरकारच्या अपरिमित सामर्थ्याचा संरक्षक पाठिंबा आपल्यास आहे अशी पक्की खात्री संस्थानिक व संस्थानी अधिकारी यांची असल्यानें त्यास लोकमताची चाड किंवा भीति राहण्याचें कारणच नाहीं. संस्थानी मुलखाचे संस्थानिक मालक आहेत, तेच ⅓ हिंदुस्थानाचे स्वयं–स्थापित प्रतिनिधि आहेत. या प्रदेशांतील मनुष्यप्राण्यांना स्वतंत्र आत्मा नाहीं; हीच विचारसरणी लावण्यांत आल्यानें हिंदुस्थानांतील ⅓ भागांतील लोक कर्तव्यज्ञाननष्ट असणें साहजिक आहे. अशा कर्तव्यमूढ समाजाचें लोढणें कितीहि द्रुत गतीच्या अन्य समाजाच्या गळ्यांत बांधलें तरी त्याची गति स्वाभाविकपणें कुंठित होणार ! यासंबंधानें विशेष खेदाची गोष्ट ही आहे कीं, या दोन्ही प्रदेशांत राहणाऱ्या समाजाच्या धुरीणांना या स्थितीची अंधुकहि जाणीव नाहीं. त्यास या दोन्ही भागांच्या पडलेल्या सांगडीची जाणीव न होतां ते आपापले जागीं आपण एकेकटेच दुसऱ्याच्या सहकार्याशिवाय द्रुतगति प्रगति करूं, असें कसें मानतात व त्यास दुसरा भाग आपल्या मार्गांत केवढी मोठी धोंड साहजिकपणें बनतो याबद्दल त्यांना गाढ अज्ञान कसें असतें याची कल्पना होत नाहीं. परंतु खालसा व संस्थानी मुलुख तसे अलग नाहींत. दोघांना एकाच ठिकाणीं जावयाचें असल्यास एकमेकांच्या मदतीनें पक्या गांठायाच्या निश्चयानें गेलें पाहिजे. हें खालसांतील पुढाऱ्यांनीं लक्षांत ठेविलें पाहिजे. संस्थानांतील प्रमुख लोक व खालसांतील संस्थानी प्रश्नाबद्दल आस्था असणारी मित्रमंडळी यांच्या सहकार्यानें इच्छित कार्य साध्य होण्यास सुलभता येणार आहे." वरील उताऱ्यावरून खालसांतील लोकांचें व संस्थानी प्रजेचें अंतिम ध्येय एकच आहे हें पूर्णपणें लक्षांत ठेवून उभयतांनीहि एकदिलानें, एकमतानें व

एक जुटीनें प्रयत्न करावा असा जो उपदेश श्री० केळकर यांनीं केला आहे त्याचाच उपक्रम संस्थानी प्रजापरिषदेच्या बाबतींत आजपर्यंत झाला आहे, ही समाधानाची गोष्ट आहे. व या बाबतींत श्री. केळकर यांनीं जें तत्त्व विस्तारानें वर्णन केलें आहे तें हिंदुस्थानांतील पुढाऱ्यांनीं सदैव लक्षांत ठेविलें पाहिजे.

श्री. केळकर यांनीं आजपर्यंत सुमारें सात संस्थानी प्रजापरिषदांचें अध्यक्षस्थान स्वीकारलें. यावरूनच निरनिराळ्या संस्थानांतील लोकांचा त्यांच्यावर किती विश्वास आहे हें दिसून येईल. यासंबंधीं एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे ती ही कीं, सन १९२२ सालीं भोरसंस्थान प्रजापरिषदेचा जो मान त्यांस मिळाला तो फार विलक्षण स्थितींत प्राप्त झाला. भोरसंस्थानांत त्यावेळीं सभाबंदीचा कायदा होता परवानगीशिवाय सभा भरवितां येत नसे व परवानगी मागितल्यास ती देण्यांत येत नसे. अशा तऱ्हेनें तेथील प्रजेची फार कुचंबणा होती. निरनिराळ्या तऱ्हेच्या करांनीं तेथील प्रजा अगदीं गांजली होती. म्हैस वाळगली तर तिच्यासाठीं दरसाल सव्वा रुपया म्हैस-पट्टी द्यावी लागे. लग्नावर कर होता. पाट किंवा म्होतूर लावल्यास कर द्यावा लागे. कुंडापट्टी म्हणून तपकिरीवर कर होता. घाण्यावर, पेंडीवर, शेंदूरावर, गंधक व बंदरी माल व सुकी मासळी यांवर कर होता. अशा नमुन्याचे बारा कर होते म्हणून सांगतात. याशिवाय वाळाचा खाऊ, नजराणा, दसरा-दिवाळीच्या सणाच्या वेळचे देकार, असे अनेक प्रकारचे कर लोकांवर असत. यामुळें विपन्न झालेल्या लोकांना आपलें दुःख वेशीवर टांगण्यास सुद्धां मुभा नव्हती! भोरची परिषद् भरविण्यास पंतसाहेबांनीं परवानगी दिली नाहीं; अनेक प्रकारच्या अटी सोसूनहि, कोणत्याहि तऱ्हेनें संस्थानिकांस न दुखवितां सभा भरविण्याचा हक्क स्थापित करण्याचा पुढाऱ्यांचा मानस होता. व याचसाठीं श्री. शेटये, श्री. केळकर, श्री. पटवर्धन, श्री. कोठारी, श्री. शिरोडकर, श्री. नारायणराव गुंजाळ वगैरे मंडळी भोरला गेली. सभा न भरविण्याची नोटीस न जुमानतां त्यांनीं सभा भरविली, त्यांनीं भाषणें केलीं, त्यांजवर सरकारी हुकूम मोडल्याबद्दल खटला करण्यांत आला. श्री. केळकर वगैरे पुढाऱ्यांना आरोपी म्हणून कोर्टापुढें नेण्यांत आलें. परंतु शेवटीं तारतम्य व सारासारविचाराचा प्रभाव भोर दरबारांत झाला व या सर्व पुढाऱ्यांचे शुद्ध हेतु लक्षांत घेऊन त्यांना दोषमुक्त करण्यांत आलें व त्याच भोर शहरांत या खटल्याच्या निकालानंतर अवघ्या दोन तासांत श्री. केळकर यांच्या अध्यक्षते-

संस्कृतीच्या अवगुणांनीं पूर्णपणें मंडित अशी मूर्ति बनतात. खालसा मुलखांत या मूर्तींचें अधिष्ठानस्थान, काल, वय यांनीं मर्यादित असल्यानें तेथील अधिकारापन्न व्यक्तींच्यामध्यें बदल होतो. व व्यक्तिभेदानें राज्यपद्धतींत बदल होतो. संस्थानांत ही परिस्थिति नाहीं; त्यामुळें त्या पद्धतींत बदल होण्याचा फार थोडा संभव असतो. तीच स्थिति संस्थानांतील गादीनशीन घराण्यांतील व्यक्तींची होते. वैयक्तिक राज्यपद्धतीच्या वातावरणांत जन्मास आलेले, त्यांत वाढलेले राजे, युवराजे, यांच्या मनोभूमिका योग्य विचाराच्या निपजेस अपात्र झाल्यास हा त्या व्यक्तींचा दोष नाहीं. या हीनतेज झालेल्या व्यक्तींवर ब्रिटिश राज्यछत्राची संरक्षक सावली सारखी पडत गेल्यानें संस्थानांतील राज्यपद्धति सदोष बनणें साहजिकच आहे. ब्रिटिशसरकारच्या अपरिमित सामर्थ्याचा संरक्षक पाठिंबा आपल्यास आहे अशी पक्की खात्री संस्थानिक व संस्थानी अधिकारी यांची असल्यानें त्यास लोकमताची चाड किंवा भीति राहण्याचें कारणच नाहीं. संस्थानी मुलखाचे संस्थानिक मालक आहेत, तेच ⅓ हिंदुस्थानाचे स्वयं-स्थापित प्रतिनिधि आहेत. या प्रदेशांतील मनुष्यप्राण्यांना स्वतंत्र आत्मा नाहीं; हीच विचारसरणी लावण्यांत आल्यानें हिंदुस्थानांतील ⅓ भागांतील लोक कर्तव्यज्ञाननष्ट असणें साहजिक आहे. अशा कर्तव्यमूढ समाजाचें लोढणें कितीहि द्रुत गतीच्या अन्य समाजाच्या गळ्यांत बांधलें तरी त्याची गति स्वाभाविकपणें कुंठित होणार! यासंबंधानें विशेष खेदाची गोष्ट ही आहे कीं, या दोन्ही प्रदेशांत राहणाऱ्या समाजाच्या धुरीणांना या स्थितीची अंधुकहि जाणीव नाहीं. त्यास या दोन्ही भागाच्या पडलेल्या सांगडीची जाणीव न होतां ते आपापले जागीं आपण एकेकटेच दुसऱ्याच्या सहकार्याशिवाय द्रुतगति प्रगति करूं, असें कसें मानतात व त्यास दुसरा भाग आपल्या मार्गांत केवढी मोठी धोंड साहजिकपणें बनतो याबद्दल त्यांना गाढ अज्ञान कसें असतें याची कल्पना होत नाहीं. परंतु खालसा व संस्थानी मुलुख तसे अलग नाहींत. दोघांना एकाच ठिकाणीं जावयाचें असल्यास एकमेकांच्या मदतीनें पल्ला गांठावयाच्या निश्चयानें गेलें पाहिजे. हें खालसांतील पुढाऱ्यांनीं लक्षांत ठेविलें पाहिजे. संस्थानांतील प्रमुख लोक व खालसांतील संस्थानी प्रश्नाबद्दल आस्था असणारी मित्रमंडळी यांच्या सहकार्यानें इष्टित कार्य साध्य होण्यास सुलभता येणार आहे." वरील उताऱ्यावरून खालसांतील लोकांचें व संस्थानी प्रजेचें अंतिम ध्येय एकच आहे हें पूर्णपणें लक्षांत ठेवून उभयतांनीहि एकदिलानें, एकमतानें व

एक जुटीनें प्रयत्न करावा असा जो उपदेश श्री० केळकर यांनीं केला आहे त्याचाच उपक्रम संस्थानी प्रजापरिषदेच्या बाबतींत आजपर्यंत झाला आहे, ही समाधानांची गोष्ट आहे. व या बाबतींत श्री. केळकर यांनीं जें तत्त्व विस्तारानें वर्णन केलें आहे तें हिंदुस्थानांतील पुढाऱ्यांनीं सदैव लक्षांत ठेविलें पाहिजे.

श्री. केळकर यांनीं आजपर्यंत सुमारें सात संस्थानी प्रजापरिषदांचें अध्यक्षस्थान स्वीकारलें. यावरूनच निरनिराळ्या संस्थानांतील लोकांचा त्यांच्यावर किती विश्वास आहे हें दिसून येईल. यासंबंधीं एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट घ्यानांत ठेवण्यासारखी आहे ती ही कीं, सन १९२२ सालीं भोरसंस्थान प्रजापरिषदेचा जो मान त्यांस मिळाला तो फार विलक्षण स्थितींत प्राप्त झाला. भोरसंस्थानांत त्यावेळीं सभाबंदीचा कायदा होता परवानगीशिवाय सभा भरवितां येत नसे व परवानगी मागितल्यास ती देण्यांत येत नसे. अशा तऱ्हेनें तेथील प्रजेची फार कुचंबणा होती. निरनिराळ्या तऱ्हेच्या करांनीं तेथील प्रजा अगदीं गांजली होती. म्हैस बाळगली तर तिच्यासाठीं दरसाल सव्वा रुपया म्हैस–पट्टी द्यावी लागे. लग्नावर कर होता. पाट किंवा म्होतूर लावल्यास कर द्यावा लागे. कुंडापट्टी म्हणून तपकिरीवर कर होता. घाण्यावर, पेंडीवर, शेंदूरावर, गंधक व बंदरी माल व सुकी मासळी यांवर कर होता. अशा नमुन्याचे बारा कर होते म्हणून सांगतात. याशिवाय बाळाचा खाऊ, नजराणा, दसरा–दिवाळीच्या सणाच्या वेळचे देकार, असे अनेक प्रकारचे कर लोकांवर असत. यामुळें विपन्न झालेल्या लोकांना आपलीं दुःखं वेशीवर टांगण्यास सुद्धां मुभा नव्हती ! भोरची परिषद् भरविण्यास पंतसाहेबांनीं परवानगी दिली नाहीं; अनेक प्रकारच्या अटी सोसूनहि, कोणत्याहि तऱ्हेनें संस्थानिकांस न दुखवितां सभा भरविण्याचा हक्क स्थापित करण्याचा पुढाऱ्यांचा मानस होता. व याचसाठीं श्री. शेटये, श्री. केळकर, श्री. पटवर्धन, श्री. कोठारी, श्री. शिरोडकर, श्री. नारायणराव गुंजाळ वगैरे मंडळी भोरला गेली. सभा न भरविण्याची नोटीस न जुमानतां त्यांनीं सभा भरविली, त्यांनीं भाषणें केलीं, त्यांजवर सरकारी हुकूम मोडल्याबद्दल खटला करण्यांत आला. श्री. केळकर वगैरे पुढाऱ्यांना आरोपी म्हणून कोर्टापुढें नेण्यांत आलें. परंतु शेवटीं तारतम्य व सारासारविचाराचा प्रभाव भोर दरबारांत झाला व या सर्व पुढाऱ्यांचे शुद्ध हेतु लक्षांत घेऊन त्यांना दोषमुक्त करण्यांत आलें व त्याच भोर शहरांत या खटल्याच्या निकालानंतर अवघ्या दोन तासांत श्री. केळकर यांच्या अध्यक्षते-

खालींच पहिली भोर–परिषद् भरविण्यांत आली. संस्थानांतील सनदशीर चळवळीचा हा पहिला विजय होय. व त्यास प्रारंभ कायदेभंगापासून झाला. ही गोष्ट संस्थानी राजकारणाच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखी आहे. सविनय कायदेभंगाच्या चळवळीच्या अग्रेसरत्वाचा मान श्री. केळकर यांस मिळाला आहे. श्री. केळकरांसारख्या सात्त्विक व समतोल वृत्तीच्या पुढाऱ्यांनासुद्धां कायदेभंग करण्याची स्फूर्ति व्हावी याहून अनियंत्रित सत्तेचा बेमुर्वतपणा शाबीत करण्यास दुसरा कोणता पुरावा पाहिजे !

कायदेभंगाच्या बाबतींत श्री. केळकर व त्यांचे स्नेही यांनीं ज्या पूर्वोपाय सनदशीर पद्धतीचें अवलंबन केलें व ज्या परिस्थितींत शेवटीं कायदेभंग केला तें सर्वांनीं लक्षांत ठेवण्यासारखें आहे. हा निर्वाणीचा मार्ग आहे. हा विशेष प्रसंगींच उपयोगांत आणावयाचा आहे. सात्त्विक क्षोभानेंच तो स्वीकारण्याचा आहे. प्रजेच्या सामान्य नैसर्गिक हक्कांबाबत त्याचा उपयोग करणेचा आहे. या गोष्टी नजरेआड करून चालणार नाहींत. भ्रामक इज्जतीच्या किंवा अरेरावीच्या कल्पनांस बळी पडून भोर सं० च्या माजी अधिपतींनीं या कायदेभंगाच्या चळवळीस निष्ठुर स्वरूप प्राप्त करून दिलें नाहीं व प्रकरणाचा शेवट गोड केला. याबद्दलहि ते सर्वस्वी स्तुतीस पात्र आहेत.

याच सुमारास एका मोठ्या संस्थानाधिपतींची व आमची गांठ पडली होती. श्री. केळकर–पटवर्धन वगैरे मंडळी आमचे स्नेही असल्यामुळें त्यांनीं मुद्दाम उपरोधानें आम्हांस म्हटलें कीं, " कांहो, तुमचे स्नेही आमच्या वृद्ध पंतसाहेबांस त्रास देत आहेत; त्यांना आमचेकडे या म्हणून कां सांगत नाहीं!" मीं सांगितलें कीं, "महाराज, आपल्याकडे येण्याचीच तयारी या रीतीनें प्रारंभिली आहे. आपलें संस्थान भोरपासून लांब आहे. तेव्हां क्रमानें ती आपणापर्यंत येईल." या विनोदांतच या उपरोधाचा निकाल लागला. स्वातंत्र्याचा हा लढा सुरू झाल्यानंतर अनेक संकटें आलीं, अनेक दुःखें सोसावीं लागलीं, अमानुष छळणूक झाली, तरी अखेर त्यांत विजयच होतो. अशी इतिहासाची शिकवणूक आहे. याच संकटपरंपरेंतून आज हिंदुस्थान जात आहे. कालाच्या पोटांतील गूढ आविष्करण करून सांगणें आज कठिण आहे. या कालानंतर थोडयाच अवधींत भोरमधील सभाबंदी नाहींशी झाली, जुलमी कर नाहींसे झाले, व सुराज्यास प्रारंभ झाला व कायदेभंगाचीं हीं गोड फळें भोरच्या प्रजेस आस्वादितां आलीं या सर्वांचें श्रेय श्री. केळकर यांसच दिलें पाहिजे.

सन १९२१ सालीं मे महिन्यांत जी पहिली द० सं० प्रजापरिषद् भरली, जिचे मुख्य कार्यवाहक व स्वागताध्यक्ष श्री. केळकर होते, त्याच परिषदेचें ध्येय दक्षिणेंतील हिंदी संस्थानांत त्या त्या संस्थानिकांच्या आधिपत्याखालीं जबाबदार राज्यपद्धति शांततेच्या व योग्य मार्गानें प्राप्त करून घेणें हेंच निश्चित करण्यांत आलें आहे व याचाच अनुवाद आज सतत सुमारें बारा वर्षे करण्यांत आला आहे व त्यांत यत्किंचितहि फरक झालेला नाहीं. या सर्व चळवळीचें धुरीणत्व श्री. तात्यासाहेब केळकर व त्यांचे सहकारी मित्र श्री. वामनराव पटवर्धन या उभयतांसच आहे. याच संबंधीं श्री. केळकर यांनीं, लोकांनीं ही चळवळ कशी चालवावी याबद्दल फार जबाबदारीचा उपदेश केला आहे. अवश्य असेल त्या ठिकाणीं निर्भीडपणानें परंतु शिष्टाचार न सोडतां संस्थानिकावर टीका केली पाहिजे; सौम्य शब्दांनीं जेथें उपयोग होण्यासारखा आहे अशा प्रसंगीं बेजबाबदार टीका करणें हेंहि गैरशिस्त आहे. परंतु कित्येक प्रसंगीं अपरिहार्य कारण घडल्यानंतर किंवा अक्षम्य असें दुर्वर्तन झाल्यानंतर संस्थानिकांचा मुलाजा ठेवणें किंवा भिडेनें त्यांचा पाठपुरावा करणें हें हल्लींच्या परिस्थितींत केव्हांहि योग्य आहे असें मात्र म्हणतां येणार नाहीं. यासंबंधीं एका बाबतींत मात्र श्री. केळकर यांनीं स्वीकारलेलें धोरण आम्हांस नापसंत आहे असें कष्टानें नमूद करणें भाग आहे. मुमताजबेगमच्या पायीं मुंबईस बावलांचा जो खून झाला तो सर्वांस मशहूर आहेच. पुष्कळ वर्षांच्या मुंबई हायकोर्टाच्या इतिहासांत असला खटला अश्रुतपूर्वच झाला असेंच म्हणावें लागेल. या बाबतींत सर्व पुराव्याचें बारकाईनें व कसून निरीक्षण केल्यानंतर न्या. मू. कॅंप यांनीं कोणी तरी अज्ञात कारस्थानी पुरुष या सर्व कटाचीं सूत्रें हालवीत होता व तो उघडकीस येणें अवश्य आहे असा अभिप्राय व्यक्त केला. या खटल्याची हकीकत ज्यांनीं निर्विकारपणें वाचली असेल त्या प्रत्येकाला न्यायमूर्तीचें हें मत पटण्यासारखें आहे. प्रिव्ही कौन्सिलपर्यंत अखेर निकाल झाल्यानंतर अशा तऱ्हेचा अज्ञात सूत्रधार कोण याचा छडा लागणें अत्यंत अवश्य होतें. ज्या खटल्यानें सात्त्विक क्षोभ उत्पन्न झाला, त्या योगानें या अज्ञात सूत्रधाराचें आविष्करण होणें क्रमशः प्राप्त झालें असें असून, प्रिव्हीकौन्सिलनें निकाल केला तरी या खटल्याचा शेवट झाला नसून अद्याप त्यांत चौकशी करण्यासारखा भाग आहे व त्या प्रकारचे प्रयत्न झाले पाहिजेत. ही मागणी वर्तमानपत्राच्या संपादकांनीं अवश्य करावयास पाहिजे होती. परंतु तशा तऱ्हेची वागणूक श्री. केळकर यांचेकडून झाली नाहीं.

इतर पुष्कळ लोकांनीं या बाबतींत अत्यंत हीन मनोवृत्तीनें महाराजांची तरफदारी केली हें महशूर आहे. केळकरांचा तसा मुळींच हेतु नव्हता हें उघड आहे. संस्थानांबद्दल वाटत असलेल्या जिव्हाळ्यामुळेंच श्री. केळकर यांनीं हें सहानुभूतीचें धोरण ठेविलें हेंहि आम्हांस मान्य आहे. अशाच एका प्रसंगास उद्देशून श्री. केळकर यांनीं आपलें धोरण नमूद केलें आहे. "महाराजांची (कोल्हापूरचे छत्रपति) कारकीर्द सुराज्यव्यवस्थापूर्ण नाहीं. हें जरी आम्हांस माहीत आहे तरी तो प्रश्न मुख्यतः त्यांच्या प्रजाजनांचा असून कॉंग्रेसच्या आजवरच्या धोरणाप्रमाणेंच आम्हां वर्तमानपत्रकारांचेंहि धोरण संस्थानच्या अंतर्गत कारभारांत फारसें लक्ष घावयाचें नाहीं असेंच चालत आलेलें आहे. आम्हांला सुराज्यव्यवस्थेची चाड असली तरी संस्थानिक आपल्या कारभारापुरते प्रायः स्वतंत्र आहेत, अथवा असावे असेंच आम्हांस वाटतें. त्यांच्या अंतर्गत कारभारावर टीका करणें हें न्यायाचें असलें तरी ही स्वकीय संस्थानिकाविरुद्ध परकीय इंग्रज सरकारकडे एक प्रकारें चहाडी केल्यासारखेंच होतें. असल्या सूक्ष्म भावनेनें आम्हीं आपली लेखणी पुष्कळ वेळां पुष्कळशी आवरून धरलेली आहे." इंदूर प्रकरणासंबंधीं श्री. केळकर यांचें धोरण वरील सूक्ष्म व नाजूक भावनेनें प्रेरित झालें होतें. असेंच कोणीहि म्हणेल; परंतु याचसंबंधीं महत्त्वाचा एक तत्त्वाचा प्रश्न आहे! त्याचा निर्देश करणें अप्रस्तुत होणार नाहीं. १८५७ पूर्वी इंग्रज सरकारचें सरकारचें धोरण संस्थानिकांना गिळंकृत करण्याचें होतें. एक ना अनेक कारणांनीं औरस संतति झाली नाहीं म्हणून डलहौसी साहेबांनीं पुष्कळ संस्थानें आपल्या गळ्याखालीं उतरविलीं व यामुळें उत्पन्न झालेल्या क्षोभाचें प्रायश्चित्त बंडाच्या योगानें महत्त्वाकांक्षी व स्वार्थानें अंध होऊन संमोह उत्पन्न झालेल्या इंग्रज सरकारास पूर्णपणें भोगावें लागलें या गोष्टीचा पस्तावा वाटून कोणत्याहि कारणाकरितां संस्थान खालसा करावयाचें नाहीं, हें धोरण हिंदुस्थान सरकारनें जाहीर केलें व त्यानंतरच्या कालांत तें अमलांतहि आणलेलें आहे. निदान अलीकडे २९ वर्षांच्या कालांत तरी यासंबंधीं शंका बाळगण्याचें कारण नाहीं. म्हणून दुर्वृत्त, मदांध, आपल्या प्रजेला अन्यायानें छळणारे व पिळणारे व बेबंदशाहीनें राज्यकारभार चालविणारे संस्थानिक जोराच्या निंदेस व उपहासास पात्र झाले पाहिजेत, त्यांची कोणतीहि कींव करून उपयोगी नाहीं. अनियंत्रित राज्यपद्धतीच्या दडपणाखालीं संस्थानी प्रजा अगदीं हतबळ झाली आहे. तिच्यामध्यें स्वाभिमानाची

अगदीं जाणीव नाहीं, स्वयंनिर्णयाचीहि कल्पना नाहीं, तिला वाचा नाहीं, अशा स्थितींत अनन्वित रीतीनें एखादा संस्थानिक धिंगाणा घालूं लागला तर पारिपत्यसामर्थ्य लोकाग्रणींच्या हातीं नसलें तरी त्याच्या जुलमाचा आविष्कार करून उघड रीतीनें त्याचा धिःकार करून तो लोकलज्जेस पात्र होईल, एवढें तरी प्रजेच्या पुढाऱ्यांचें कर्तव्य अवश्यमेव आहे असें आमचें मत आहे. असें करण्यानें इंग्रज सरकारला आयतें फावेल ही समजूत भ्रामक आहे. इंग्रज सरकार आम्ही समजतों त्यापेक्षां फार धूर्त व चाणाक्ष आहे. खुद्द संस्थानी प्रजेला, छळग्रस्त होत असलेल्या व्यक्तींना किंवा प्रजेच्या पुढाऱ्यांना संस्थानिकाच्या दुर्वर्तनाची जी माहिती मुळींच असत नाहीं ती माहिती इंग्रज सरकारचा चित्रगुप्त अहर्निश फार बारकाईनें टिपून ठेवीत आहे व त्याचीं शेंकडों दप्तरें पोलिटिकल खात्याच्या सेक्रेटरीच्या ऑफिसांत भरलेलीं आहेत ! परंतु विशिष्ट कारणाशिवाय आपण या गोष्टींकडे ढुंकूनहि पहात नाहीं असें हिं० सरकारचे जबाबदार पोलिटिकल सेक्रेटरी यांनीं संस्थानिकांच्या संरक्षणाच्या कायद्यासंबंधीं असेंब्लीमध्यें स्पष्टपणें बोलून दाखविलें. सरकाराला ज्यावेळीं आपला कावा साधावयाचा असेल किंवा आपले हितसंबंध राखावयाचे असतील, त्यावेळीं संस्थानिकास धाकदपटशाहा दाखविण्याकरितां व त्याची संमति मिळविण्याकरितां त्याच्या पातकांच्या यादीचा उपयोग सरकार करीत असतें. संस्थानी प्रजेच्या उमाळ्यानें किंवा न्याय करण्याचे बुद्धीनें किंवा सात्त्विक क्षोभानें किंवा उदात्त मनोवृत्तीच्या प्रेरणेनें सरकार संस्थानिकांच्या दुर्वर्तनाकडे मुळींच पहात नाहीं. स्वार्थ साधण्याच्या कामींच या साधनांचा सार्वभौम सरकार उपयोग करतें. अशा तऱ्हेचें कारस्थान १८५८ पासून आजपर्यंत इंग्रजसरकारानें संस्थानांच्या बाबत चालवलें आहे. सबब संस्थानिकांच्या दुर्वर्तनावर पांघरूण घालण्याचें प्रजेच्या पुढाऱ्यास मुळींच कारण नाहीं. आपलीं दुःखें वेशीवर टांगण्याचा जो एक नैसर्गिक हक्क असहाय प्रजेस आहे तो तरी प्रजेच्या पुढाऱ्यांनीं निःस्पृहपणानें, धैर्यानें कोणतीहि भीडभाड न ठेवतां बजावला पाहिजे असें आमचें मत आहे. १८५७ सालच्या सुमारास प्रचलित असलेलें यासंबंधींचें धोरण हिंदी पुढाऱ्यांनीं बदललेल्या मनूमध्यें आजमितीसहि चालू ठेवणें खास मुत्सद्देगिरीचें नाहीं अशी आमची समजूत आहे. शिवाय दुसरें एक असें कारण आहे कीं, हिंदुस्थानची राज्यव्यवस्था परकीय सत्तेच्या हातीं न राहतां ती हिंदी लोकांच्या स्वाधीन करण्यांत येणार आहे. जबाबदार राज्यपद्धतीची घोषणा बादशाही जाहीरनाम्यानें पंधरा वर्षांपूर्वीच

केली आहे व या घोषणेप्रमाणें हिंदुस्थानांत स्वराज्य स्थापन करण्याची खटपट चालू आहे, सामुदायिक घटनेची वाटाघाट सुरू आहे, स्वराज्याच्या घटनेमध्यें संस्थानें व खालसातींतील मुलुख या दोहोंचाहि समावेश व्हावयाचा आहे, सबब हल्लींच्या या स्थितींत संस्थानें खालसा होतील सबब संस्थानिकांच्या जुलमाचा किंवा त्यांच्या दुर्वर्तनाचा जाहीर रीतीनें निषेध करतांना या योगानें ब्रिटिशसरकारास अप्रत्यक्षपणें संस्थानें खालसा करण्यास मदत होईल ही भीति अगदीं अवास्तव आहे.

श्री. केळकर यांची अशी एक शिकवणूक आहे कीं, संस्थानिकांच्या बाबत शक्यतों अत्यंत सौम्य शब्दांचा उपयोग करावा. त्यांच्या मनाला टोंचेल किंवा झोंबेल अशा तऱ्हेची टीका केव्हांहि करूं नये. शिष्ट व संभावित मार्गानेंच उपदेशामृत संस्थानिकांना पाजण्यांत यावें असा त्यांचा पोक्त सल्ला आहे व तो योग्यहि आहे; याबद्दल दुमत असणें शक्य नाहीं. परंतु याहि बाबतींत एक महत्त्वाचा विचार लक्षांत ठेवणें अवश्य आहे. " शहाण्याला शब्दाचा मार व मूर्खाला लाठीचा प्रहार " अशी एक आपली जुनी म्हण आहे व संस्थानी राजकारणाच्या बाबतींत तरी या जुन्या सदुपदेशाप्रमाणें वागणें अत्यंत अवश्य आहे. जे संस्थानिक सुनीत, थोर मनाचे, उदारधी व उदात्त चारित्र्याचे आहेत त्यांच्या हातून राज्यकारभारांत एखादी चूक झाली, एकादा अन्याय झाला तर त्यांच्याबद्दल सौम्यशब्दानें त्यांचें चित्त वेधणें किंवा त्यांस उपदेश करणें न्याय्य होईल; पण अनियंत्रित सत्तेनें जे निढावलेले आहेत, अशा संस्थानिकांना सौम्य टीकेची चाड काय ? लोकनिंदेची ते पर्वाच करीत नाहींत. अनिरुद्ध सत्तेनें त्यांची मनोवृत्ति इतकी प्रतिनिविष्ट बनलेली असते कीं, अदबीनें कोणतीहि गोष्ट त्यांस सांगितली असतां ती त्यांच्या ध्यानींमनीहि येत नाहीं. अशा संस्थानिकांच्या बाबत फाजील शिष्टवृत्तीचा अवलंब न करतां स्पष्टपणें व तीव्र शब्दांनीं अशांची कानउघाडणी करणें जरूर आहे. अशा टीकेनें ते ताळ्यावर येतील किंवा त्यांची धुंदी उतरेल किंवा त्यांना पश्चात्ताप होईल असें मुळींच नाहीं; परंतु या टीकेचा उपयोग होऊन ते लोकांच्या तरी उपहासास पात्र होतील यांत मुळींच शंका नाहीं. एवढाच उपाय अनियंत्रित सत्तेखालीं दडपलेल्या व राजकीय दृष्टीनें अस्पृश्य मानलेल्या प्रजेस आजमितीस मोकळा आहे. तर त्याचें तरी अवलंबन कां करूं नये याचें कारण मुळींच दिसत नाहीं. अनियंत्रित सत्तेनें निरंकुश झालेल्या संस्थानिकांस, जुलमी राज्यधर्मास ताळ्यावर आणण्यास दोनच शक्ति समर्थ आहेत. एक सार्वभौम सर-

कारची अपरंपार सत्ता व प्रक्षुब्ध झालेल्या जनताजनार्दनाची सत्ता. एवढ्याच दोन सत्तांपुढें प्रत्येक संस्थानिकास मान वाकवावी लागेल. अनियंत्रित सत्तेवर जें नियंत्रण शास्त्रकारांनीं सांगितलें आहे ( External Limitation on Sovereignty ) तें प्रक्षुब्ध जनतेच्या विरोधाचें होय. परंतु ही सत्ता पूर्वकालीं जरी मूर्तिमंतपणें अस्तित्वांत होती व तिचा उपयोग सदैव होत असे, तथापि हल्लींच्या काळीं संस्थानिकांच्या बाबतींत सार्वभौम सरकारच्या संगिनींनी जनताजनार्दनाची किंवा प्रजेच्या नैसर्गिक हक्काची सत्ता आजमितीस निर्माल्यवत् झाली आहे. व यामुळेंच संस्थानिकांना सुवृत्त करण्याचें व संस्थानांत सुराज्य, समतेचें राज्य स्थापन करण्याचें जबाबदारीचें काम केवळ सार्वभौम सत्तेवरच अवलंबून आहे. ही सार्वभौम सत्ता आजमितीस अरेरावी स्वरूपाची ( Despotic ) असल्यामुळें संस्थानी प्रजाहि अगदीं अशरण झाली आहे. जबाबदार राज्यपद्धति हिंदुस्थानांत स्थापन झाल्यानंतर या सत्तेचें स्वरूप पालटेल व उद्दिष्ट हेतु साध्य होतील, तोंपर्यंत उघड टीकेनें संस्थानिकांच्या दुर्वर्तनाचा जोरानें निषेध करणें अवश्य आहे, अशी आमची प्रामाणिक समजूत आहे व अदबशीर, सौम्य टीकेच्या योगानें इष्टप्राप्ति होत नाहीं असाच कटु अनुभव पदोपदीं येत आहे.

खुद्द श्री. तात्यासाहेब यांचें उदाहरण घेतलें तरी त्यापासून हाच निष्कर्ष निघत आहे. १९३१ सालीं मिरजेच्या प्रजापरिषदेचे श्री. केळकर अध्यक्ष होते. संस्थानांत प्रातिनिधिक सभा स्थापन करा असें कळकळीनें त्यांनीं प्रतिपादन केलें. मोठ्या शिकस्तीनें कोणाच्या तरी मुर्वतीखातर अशा तऱ्हेची संस्था निर्माण केल्याचें मिरजेच्या अधिपतींनीं जाहीर केलें आहे. मिरजेचे अधिपति सदाचारी आहेत याबद्दल कोणाचाहि मतभेद नाहीं; परंतु मुत्सद्दीपणा, तारतम्य, सौजन्य व शिष्टाचार या दृष्टींनीं श्रीमंतांचें वर्तन पाहून कोणालाहि सखेद आश्चर्य वाटेल. मिरज येथील एका उद्‌घाटनसमारंभास केळकरांनीं हजर राहण्याबद्दल व श्री. केळकर यांच्या तोंडून प्रशंसेचे उद्गार ऐकण्याबद्दल आतुर असलेल्या मिरजेच्या श्रीमंतांस श्री. केळकर यांस त्या संस्थानच्या प्रातिनिधिक सभेचे सभासद नेमण्याची बुद्धि होऊं नये किंवा आवश्यकता वाटूं नये, याहून गैरमुत्सद्दीपणा तो कोणता ! व अशा तऱ्हेच्या असंमजसपणाचा तीव्र शब्दांनीं निषेध केल्यास त्यांत तरी वावगें कोणतें ! आम्हीं जो हा श्री. केळकर यांच्याबद्दल व्यक्तिविषयक उल्लेख केला आहे त्याचें मुख्य कारण उदात्त चारित्र्याच्या परंतु अनियंत्रित सत्तेनें दूषित झालेल्या

संस्थानिकांच्याकडूनहि शिष्टाचाराचा अतिक्रम कसा होतो हें दाखविणें हेंच होय. संस्थानिकांच्या अशा अयोग्य वर्तनाचा निषेध केल्याखेरीज केवळ मुग्ध राहण्यानें किंवा त्यांच्या मोहवतीखातर अप्रत्यक्ष व्यंजनेनें कोणतीहि फलश्रुति न होतां सत्कार्याच्या मार्गांत अडचणच येते असा अनुभव आहे. आमचें हें वैयक्तिक मत पुष्कळांस मान्यहि नाहीं. खुद्द श्री. तात्यासाहेबांचा गोड स्वभाव, त्यांची सामदामाची नैसर्गिक प्रवृत्ति संस्थानिकांबद्दल त्यांस वाटणारा आदर व सौम्य शब्दांचा उपयोग करण्याबद्दलचा त्यांचा आग्रह यांचा विचार करतां संस्थानी प्रजेपेक्षां संस्थानिकांचे ते पुढारी होण्यास सर्वस्वीं पात्र आहेत. संस्थानिक लोक जर त्यांच्यावर विश्वास ठेवतील तर संस्थानांतील स्वातंत्र्याच्या उदयास फारच निराळें स्वरूप प्राप्त होईल. त्यांच्यासारख्याच्या शिष्टाईनें संस्थानांतील सुराज्य फार लवकर स्थापन होईल. प्रजेचा असंतोष निःसंशयपणें कमी होईल. राजा व प्रजा या उभयतांमध्यें सलोखा नांदू लागेल व सुराज्याचें व स्वराज्याचें अंतिम ध्येय सनदशीर राज्याच्या छत्राखालीं प्रजेस उपभोगण्यास सांपडेल; परंतु श्री. तात्यासाहेबांच्या नैसर्गिक गुणांची पारख करण्याची पात्रता किंवा गुणग्राहकता हल्लींच्या संस्थानिकांमध्यें नाहीं हें त्यांचें दुर्दैव होय. यामुळें नुसत्या संस्थानिकांचेंच नव्हे किंवा संस्थानी प्रजेचेंच नव्हे तर संस्थानाचेंहि फार नुकसान होत आहे ही खेदाची गोष्ट आहे.

संस्थानी राजकारणासंबंधीं श्री. तात्यासाहेब केळकर यांनीं केलेली लोकोत्तर सेवा लक्षांत घेतां हिंदुस्थानांतील राजकारणी पुरुषांमध्यें त्यांचा दर्जा अत्यंत उच्चतम पदवीचा आहे, असें विनयोक्तपणें म्हणतां येईल. ब्रिटिश हिंदुस्थानांत पुष्कळ नामांकित पुढारी आहेत व श्री. तात्यासाहेबांच्यापेक्षांहि श्रेष्ठ आहेत हेंहि उघड आहे. परंतु या पुढाऱ्यांचे ठिकाणीं जी एकांगी वृत्ति आहे त्या योगानें त्यांचें धोरण एकांडे शिलेदाराप्रमाणें होतें व हल्लींच्या मनूस तें सर्वमान्य होण्यासारखें मुळींच नाहीं. त्याचप्रमाणें संस्थानी राजकारणांतहि अधिकाराच्या योगानें व इतर मुत्सद्दीपणाच्या वागण्यानें पुष्कळ पुढारी आहेत, परंतु त्यांना ब्रिटिश–हिंदुस्थानांतील फारसा अनुभव नसल्यामुळें व ब्रिटिश–हिंदुस्थानांतील राजकारणाची जबाबदारी त्यांनीं आपल्या शिरावर घेतली नसल्यामुळें त्यांचें हें धुरीणत्व पुष्कळ वेळां एकदेशीय होतें. सांप्रतचा मनु हिंदी हिंदुस्थान ( Indian India ) व ब्रिटिश–हिंदुस्थान ( British India ) अशीं दोन राज्यतंत्रें अलग ठेवण्याचा नसून या देशांत सामुदायिक (Federal) राज्यपद्धति अस्तित्वांत यावी अशी आज दोन वर्षें अहर्निश यातायात चालू आहे. हिंदुस्थानचे दोन विभाग किंवा दोन शकलें

अस्तित्वांत न राहतां या दोहोंचाहि संयोग होऊन तीं एकाच राज्यतंत्राखालीं यावींत व शक्य त्या मार्गानें तीं एकजीव व्हावींत म्हणजे ( United India ) अशी स्थिति प्राप्त व्हावी हें ध्येय ब्रिटिश मुत्सद्यांना, खालसातींतील मुत्सद्यांना व संस्थानी मुत्सद्यांना आजमितीस सर्वमान्य झालें आहे. तेव्हां या उच्च ध्येयाप्रमाणें प्रत्यक्ष घटना निर्माण होऊन ती अस्तित्वांत येण्यास व त्या तऱ्हेची राज्यव्यवस्था प्रस्थापित होण्यास दोन्ही राजकारणांचा उत्तम अनुभव असलेल्या मुत्सद्यांचीच अत्यंत आवश्यकता आहे व अशाच लोकाग्रणींना All India statesmen असें म्हणतां येईल. या दृष्टीनें राजकीय पुढाऱ्यांचा विचार केला असतां श्री. तात्यासाहेब केळकर यांचें स्थान अखिल हिंदुस्थानच्या राजकारणी पुरुषांमध्यें फार उच्च दर्जाचें आहे व त्याचें कारण त्यांस खालसातींतील व संस्थानांतील राजकारणांचा उत्तम अनुभव असून त्या दोहोंचीहि जबाबदारी त्यांनीं आपल्या शिरावर आपल्या मगदुराप्रमाणें घेतली आहे. त्यांनीं केलेली कामगिरी उभय ठिकाणच्या लोकांच्या आदरास संपूर्णपणें पात्र झाली आहे; व म्हणून श्री. तात्यासाहेब यांचेबद्दल आम्हांस अत्यंत अभिमान व आदर वाटत आहे. फेडरेशनच्या नवीन मनूंत अखिल-भारतीय राजकारणामध्यें त्यांनीं स्वतःच्या कर्तबगारीनें मिळविलेल्या श्रेष्ठ दर्जाबद्दल त्यांचें आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करतों. परमेश्वरानें त्यांना उदंड आयुष्य देऊन हिंदुस्थानच्या या दोन्ही भागांचें हित समवायानें त्यांच्या हातून दीर्घकालापर्यंत घडवून आणावें अशी अंतःकरणपूर्वक प्रार्थना करून आम्हीं हा लेख आटोपता घेतों.

पैकीं २२ उमेदयार प्रचंड बहुमतानें निवडून आले. यावरून कौन्सिलांत जाऊन घुसण्याला मतदारसंघाचा पाठिंबा स्वराज्यपक्षाला होता हें दिसून येईल.

श्री. न. चिं. केळकर असेंब्लीकरितां मध्यविभागातर्फे उभे राहिले होते. त्यांचे प्रतिपक्षी म्हणून, लोहोकरे, निंबाळकर, वागडे, कामत व पटवर्धन अशी मंडळी उभी होती. पण यांपैकीं, लिबरल पक्षांतील उमेदवारांचे उमेदवारीचे भरलेले पैसे बुडाले! व केळकरांना नऊ हजारांचे वर म्हणजे बाकीच्या सर्व उमेदवारांना पडलेल्या मतांच्या बेरजेपेक्षांहि २३०० मतें अधिक पडून प्रचंड बहुमतानें ते विजयी झाले. स्वराज्यपक्षाचा संपूर्ण विजय बंगाल व मध्यप्रांतांत झाला. व तेथें स्वराज्यपक्षानें हुकमी बहुमत प्रस्थापित केलें. दे. भ. चित्तरंजन दास व डॉ. मुंजे यांना तेथील प्रांताधिपतींनीं बोलावून घेऊन दिवाणगिरीचीं वस्त्रें देऊं केलीं. पण स्वराज्यपक्षाच्या त्या काळच्या स्थितीला अनुसरून त्यांनीं तीं वस्त्रें नाकारलीं. या दोन प्रांतांत द्विदल राज्यपद्धति किती फोल आहे हें स्वराज्यपक्षानें निदर्शनास आणून दिलें. महात्मा गांधी सुटून आल्यानंतर पुन्हां स्वराजिस्टांना कॉंग्रेसमधून हाकडून देण्याची कारवाई सुरू झाली. पण म. गांधींनींहि कबुली दिली कीं "स्वराजिस्ट हे शूर आहेत. त्यांनीं कोणाहिपुढें अद्यापि मान लवविली नाहीं. आपला पक्ष सत्पक्ष आहे या श्रद्धेच्या बळावर माझ्याशीं निर्वाणीच्या युद्धास तयार ते झाले. माझ्या सुटकेचें श्रेय कांहीं अंशीं स्वराजिस्टांकडेच आहे." अहमदाबादच्या ऑ. इं. कॉं. कमिटींत पं. मोतीलाल नेहरू यांनीं बहुमत करून घेईन असा विडा उचलून पाय आपटीत ते उठून गेले. पण पुढें अवघ्या चार महिन्यांतच फेरनाफेर पक्षांत समेट होऊन कौन्सिलवादाची खपली कोणीं काढली नाहीं.

बंगाल, मध्यप्रांत, मुंबई व इतर प्रांतांतील अधिकाऱ्यांनीं अशी कबुली दिली कीं, "स्वराज्यपक्ष हा एकटाच पक्ष शिस्तीनें वागणारा व ज्ञातिनिष्ठेला महत्त्व न देणारा आहे. व पुढच्या निवडणुकीस हुकमी बहुमतानें निवडून आला व दिवाणगिऱ्या त्यानें स्वीकारल्या तर लढ्याची तिसरी पायरी तो जिंकील."

पण योगायोग असा कीं, १९२४ सालीं सरोस विरोध करून बजेट व सरकारी बिलें फेटाळून लावण्याचें धोरण स्वराज्यपक्षानें स्वीकारलें. पण हळुहळु स्वराज्यपक्षीय सभासदांना बिलें ठराव आणण्याचीहि परवानगी देण्यांत

आली. व फ़ायनॅन्स कमिटी, पब्लिक अकौंट्स कामिटी, रेल्वे फिनॅन्स कमिटी व सिलेक्ट कमिटया यांवरहि लोक काम करूं लागले. लोकनियुक्त अध्यक्ष होण्याची वेळ आली तेव्हां स्वराज्यपक्षाचें बहुमत ज्या कायदेमंडळांत होतें तेथें त्यांनीं आपले उमेदवार निवडूनहि आणले. खुद्द पं. मोतीलाल नेहरू यांनीं स्कीन कमिटीवर सरकारी नेमणूकहि स्वीकारली ! पण या सर्वांला प्रतियोगी सहकारिता केली असें कोणीं म्हटलें, तर माल त्यांच्या नाकाला मिरच्या झोंबत.व अखेर ना.तांबे यांची नेमणूक एक्झिक्युटिव्ह कौन्सिलरचे जागीं झाली, तेव्हां केळकरांनीं त्यांचें अभिनंदन केलें म्हणून त्यांचेवर शिस्तीचा भंग केला म्हणून त्यांना पक्षातीत करण्याचा धाक पं. नेहरू यांनीं घातला. केळकरांनीं अभिनंदन केलें तें खाजगी स्वरूपाचें होतें. स्वराज्यपक्षाची त्यांनीं शिस्त मोडली याबद्दल रा. तांबे यांचा त्यांनीं निषेधच केला. पण खुद्द म. गांधी यांनीं श्री. विठ्ठलभाई पटेल हे ॲसेंब्लीचे अध्यक्ष निवडून आले, त्या वेळीं अभिनंदनाची तार पाठविली होती. तर मग केळकरांनीं वावगें तें काय केलें ? असो. हा वाद महाराष्ट्रीय वाचकांना माहीतच आहे. केळकरांनीं कानपूर कॉंग्रेसनंतर स्वराज्यपक्षाचा राजीनामा दिला व कौन्सिलांत हुकमी बहुमत असेल तर दिवाणगिऱ्या स्वीकाराव्या व प्रतियोगी सहकारिता करावी या तत्त्वावर प्रतिसहकारपक्ष काढला व १९२७ सालच्या निवडणुकीचे वेळीं त्यांनीं ठिकठिकाणीं प्रतिसहकारपक्षाचे उमेदवार उभे केले. मध्यप्रांतांत दिवाणगिऱ्याहि स्वीकारल्या. पण स्वतः केळकरांनीं दिवाणगिरीचा अभिलाष धरला नाहीं, व १९२३ सालाप्रमाणें १९२६ च्या निवडणुकींतहि ते प्रचंड बहुमतानें निवडून आले. यावेळींहि त्यांचे प्रतिपक्षी म्हणून बॅ. हाजी, शेठ रूपचंद, वागडे, शंभुसिंग, करंदीकर, खर्डेकर अशी मंडळी उभी होती. पण त्या सर्वांत अधिक मतें म्हणजे ८९१३ मतें केळकरांना मिळालीं व केळकर व बॅ. हाजी यांचे मतांत अदमासें ३५०० मतांचें अंतर पडलें.

आतां केळकरांनीं ले. असेंब्लीमध्यें १९२४ व १९२९ सालीं कोणती कामगिरी केली व त्यांना स्वराज्यपक्षांत कोणतें स्थान होतें याचा थोडासा विचार करूं.

१९२४ सालीं केळकर स्वराज्यपक्षातर्फे निवडून आले व स्वराज्य पक्षाचे ते आद्य घटक असल्याकारणानें असेंब्लींतहि त्यांना तितकेंच जबाबदारीचें काम करावें लागलें. सर्व प्रांतांतून मिळून स्वराज्यपक्षाचे ४६ सभासद निवडून आले होते. असेंब्लींतील स्वराज्यपक्षाची सभा होऊन पं. मोतीलाल

नेहरू यांना अध्यक्ष, श्री. विठ्ठलभाई पटेल यांना उपाध्यक्ष व श्री. न. चिं. केळकर यांना व्हिप ( प्रतोद ) निवडण्यांत आलें. असेंब्लीच्या सभासदांची संख्या १४४. त्यापैकीं १०० लोकनियुक्त सभासद असले तरी राज्यपक्षाला ४६ जागा मिळाल्या होत्या. व सरकारावर विजय मिळवावयाचा तर हमखास बहुमत मिळविण्याकरितां स्वतंत्र पक्षाच्या २०–२५ सभासदांची मदत नेहमीं लागावयाची आणि याकरितां दोन्ही पक्षांना संमत होईल अशाच तऱ्हेचा ठराव अगर उपसूचना आणणें भाग पडे. स्वतंत्र पक्षांत अडवणुकीच्या धोरणाला सरसकट संमति देणारे चार पांच सभासद होते. पण पं. मोतीलाल नेहरू यांनीं जबाबदारीच्या मागणीचा जो ठराव मांडला त्यांत दोन्ही पक्षांना पसंत पडेल अशा तऱ्हेची शब्दरचना व सौम्य मागणी करणें भाग पडलें. व या ठरावाचा मसुदा करण्याचे बाबतींत एक सहा सभासदांची कमिटी नेमली होती. त्या कमिटीवर रंगाचारीयर, जिना, पटेल, नेहरू, पुरुषोत्तमदास यांचे बरोबर केळकरांची नेमणूक झाली. व सर्वसंमत ठराव तयार करण्यांत आला. हा ठराव करण्यांत केळकरांची विशेष मदत झाली. या ठरावावर एकमत न होतें तर स्वतंत्रपक्ष व स्वराज्यपक्ष यांच्या सभासदांचा मिळून जो राष्ट्रीय पक्ष बनविण्यांत आला तो आला नसता. व स्वराज्यपक्षाला बजेट–नामंजुरीच्या बाबतींत जो विजय मिळत गेला तोहि मिळाला नसता. या विजयाचें श्रेय पक्षाच्या व्हिपकडेच असतें. आपल्या पक्षाचे सभासद दर एक वेळीं हजर राहण्याची खबरदारी घेणें व दुसऱ्या पक्षांतील सभासदांना आपल्या पक्षाच्या ठरावांना व सूचनांना मतें देण्यास लावणें हीं कामें व्हिपला करावीं लागतात. याकरितां व्हिपची निवड करितांना, आपल्यावरील जबाबदारी पूर्णपणें जाणणारा, करारी, उदारमतवादी व सर्व सभासदांच्या विश्वासास पात्र होईल अशा इसमाचीच निवड झाली पाहिजे आणि केळकरांचे बाबतींत ती निवड योग्य झाली हें स्वराज्यपक्षाला मिळालेल्या विजयावरून सिद्ध होतें. जबाबदारीच्या स्वराज्याच्या मागणीचा पं. मोतीलाल नेहरू यांचा ठराव ७८ विरुद्ध ४८ मतांनीं मंजूर झाला. बजेट–मंजुरीच्या मागणीपैकीं पहिली मागणी कस्टमखात्याच्या खर्चाची व तीहि ६३ विरुद्ध ५७ मतें पडून फेटाळली गेली. इन्कमटॅक्स खात्याचीहि तीच गत. ( ६१ विरुद्ध ६० ). मीठ–खात्याच्या खर्चाला अनकूल ५७ तर प्रतिकूल ६३ । सबंध बजेट असेंच नामंजूर करण्यांत आलें. व शेवटीं फिनॅन्स बिल–सुमारे ३० कोटी उत्पन्नाच्या कराच्या मागणीचें बिल–फेटाळून लावण्यास स्वतंत्र पक्षांतील जिना, सर पुरुषोत्तमदास, रंगाचारीयर

प्रभृति सभासद नाकबूल होते, तरीदेखील स्वतंत्र पक्षांतल्या १०-१२ सभासदांचीं मतें स्वराज्यपक्षाला मिळालीं व फिनॅन्स बिल ६० विरुद्ध ५७ मतांनीं फेटाळून लावण्यांत आलें. समितीचा कायदा रद्द करण्याचें बिल व किनाऱ्यावरील वाहतुकीचें बिल आणण्यास मंजुरी मिळण्याला स्वराज्यपक्षाच्या हुकमी मतांचाच उपयोग झाला. कमिशनचा रिपोर्ट ७१ विरुद्ध ३९ मतांनीं फेटाळला गेला! पं. मोतीलाल नेहरू ह्यांची कामगिरी उत्कृष्ट तर खरीच, पण स्वतंत्र पक्षाशीं सल्लामसलत करण्याचे बाबतींत केळकर अणे यांना खलबतांत घेतल्याखेरीज पं. मोतीलाल नेहरू यांचें पान हालत नसे. व ज्या केळकरांची कौन्सिल-बहिष्काराचे प्रश्नावर पं. मोतीलाल नेहरू यांनीं खरपूस तपासणी केली व एकदां तर महाराष्ट्राचें मत राष्ट्रीय-सभा मानणार काय असेंहि ते म्हणाले, त्या केळकरांशीं पं. मोतीलाल नेहरू यांचें इतकें सख्य पाहून कित्येकांना अचंबा वाटे. स्वतंत्र व स्वराज्य पक्षाला एके ठिकाणीं आणावयाचें म्हणजे आंवळ्यांची मोटच बांधावयांची कारण मोट बांधायला एक टोंक जवळ करावें तर दुसरें दुर्दू लागावें व कांहीं आवळे घसरून पडावे. पण केळकरांनीं युक्तीनें स्वतंत्र पक्षांतील आवळ्यांनाहि मोटेंत बांधलें.

सप्टेंबर १९२५ मध्यें असेंब्लीचा अध्यक्ष निवडण्याची वेळ आली, तेव्हां स्वराज्यपक्षातर्फे सहा व स्वतंत्रपक्षातर्फे सहा एकूण १२ सभासदांची एक कमिटी नेमली त्या कमिटीनें अध्यक्षांची निवड करावी असें ठरलें. स्वतंत्र पक्षानें दि. ब. रंगाचारीयर व स्वराज्यपक्षानें पटेल अशीं नांवें सुचविलीं. पण एकमत होईना. अखेर स्वराज्यपक्षातर्फे केळकरांचें नांव अध्यक्षांचे जागेकारितां सुचविण्यांत आलें, व पं. मोतीलाल नेहरू यांनींहि तुम्ही खटपट करा असें केळकरांना सांगितलें होतें. पण अखेर दोन्ही पक्षांत एकमत झालें नाहीं व स्वराज्यपक्षाचे उमेदवार म्हणून पटेल यांना निवडण्यांत आलें. पटेलांना ५८ मतें व रंगाचारियर यांना ५६ मतें पडलीं. ना. पटेल यांना एक मत केवळ केळकरांचे मोहवतीखातरच मिळालें होतें. पटेल अध्यक्ष झाल्यानंतर श्री. केळकर यांना स्वराज्यपक्षाचे डेप्युटी लीडर नेमण्यांत आलें. व त्यांनीं आपली कामगिरी उत्तम प्रकारें बजावलीहि; पण पुढें लवकरच पगारी जागा लोकपक्षाच्या सभासदानें स्वीकारावी कीं नाहीं, या प्रश्नावर पं. मोतीलाल नेहरू व केळकर यांचेमध्यें बेबनाव झाल्या कारणानें केळकरांना स्वराज्य-पक्षाचा राजीनामा द्यावा लागला.

केळकरांनीं १९२४ व १९२५ सालीं स्वतंत्र अशीं दोन बिलें आणलीं होतीं. एक सोसायटीज् रजिस्ट्रेशन ॲक्ट-दुरुस्तीचें व दुसरें पासपोर्ट मिळण्याच्या बाबतींत असलेल्या निर्बंधांचें. पहिल्या बिलाला मंजुरी मिळाली होती. पण दुसऱ्या बिलाला गव्हर्नर जनरल यांनीं मंजुरी देण्याचेंच नाकारलें. ता. २ । ९ । १९२५ रोजीं मद्यपानप्रतिबंधाचा ठराव हाजी वाजीद्दीन यांनीं असेंब्लीपुढें आणिला, त्यावेळीं त्या ठरावावरील आपली उपसूचना मांडतांना केळकर यांनीं विनोदप्रचुर असें भाषण केलें. केळकरांच्या उपसूचनेंत दोन मुख्य मुद्दे होते. पहिला मुद्दा असा कीं, सरकारनें दारूबंदीचें तत्त्व मान्य करावें व दुसरा मुद्दा म्हणजे ही बंदी पूर्ण होईपर्यंत कोणत्याहि मोहल्यांतील लोकांना तेथें दारूचें दुकान नको असें म्हणण्याचा अधिकार असावा. हा उपसूचनात्मक ठराव ६९ विरुद्ध ३९ मतें पडून मंजूर झाला. केळकरांनीं संमतिवयाचा कायदा व कोर्टाच्या बेअदबीचा कायदा यांमध्यें दुरुस्ती करण्याबाबत जीं बिलें सरकारनें आणलीं होतीं, त्यांवर विद्वत्ताप्रचुर व मुद्देसूद भाषणें केलीं.

संमतिवयाच्या बिलाचे बाबतींत केळकरांनीं बिलाला पुष्टि देतांना, सामाजिक प्रश्नाची कौन्सिलांत चर्चा होण्यास मुळींच हरकत नाहीं व अशा वेळीं जर एखादा प्रतिनिधि आपल्या मतदारसंघाशीं एखाद्या सामाजिक प्रश्नाचे बाबतींत अमुकच मत देईल, अशा तऱ्हेनें वचनबद्ध झाला नसेल तर त्यानें सामान्य परिस्थिति व विवेकबुद्धि वापरून प्रांजळ मत देण्यास मुळींच हरकत नाहीं असें सांगितलें, व विवाहित वधूचे बाबतींत १३ वर्षें व तद्व्यतिरिक्त बाबतींत १४ वर्षें हीं संमतिवयाची मर्यादा असावी असें प्रतिपादन केलें.

१९२६ च्या निवडणुकींत केळकर हे प्रतिसहकार पक्षातर्फे निवडून आले. व असेंब्लींत दे. भ. लाला लजपतराय यांच्या पुढारीपणाखालीं स्थापन झालेल्या राष्ट्रीय-पक्षाचे ते प्रमुख सभासद झाले. जयकर, डॉ. मुंजे, अणे व केळकर हे चौघे प्रतिसहकारवादी म्हणून याच पक्षांत विलीन झाले होते. केळकर हे १९२७–३१ पर्यंत राष्ट्रीय पक्षाच्या कार्यकारी मंडळांत होते. व त्यांच्या सल्ल्यानेंच कोणीं कोणत्या कमिटीवर जावें व पक्षातर्फे कोणता ठराव कोणीं मांडावा हें ठरत असे; पण केळकरांनीं स्वतः आपण होऊन कोणत्याहि कमिटीवर जाण्याचा अभिलाष धरला नाहीं. स्वराज्य–पक्ष व राष्ट्रीय–पक्ष यांचेमध्यें असेंब्लीचे कामांत नामाभिधानापलीकडे फरक असा कांहींच नव्हता. राष्ट्रीय–पक्ष 'प्रतिसहकारिता' आम्ही करितों असें स्पष्टपणें सांगत असे. व स्वराज्य–पक्ष अडवणूक करितों व आमचें पूर्वीचेंच

धोरण कायम आहे असें उच्चारी. पण आचार मात्र प्रतिसहकार पक्षाचा. प्रथम प्रथम स्वराज्य-पक्षाच्या सभासदांनीं सरकारी सभासदांच्या चहापाटर्यांना जाऊं नये असें फर्मान पं. नेहरू यांनीं काढलें; पण त्यांचा अधिकार न मानणारेच बरेचसे सभासद निघाले. शिस्तीचा धाक त्यांनींहि घातला. पण तो फारसा चालत नसे. रिझर्व्ह बँक बिल, करन्सी बिल, ट्रेड डिस्प्यूट्स बिल व इतर अनेक बिलांच्या सिलेक्ट कमिटयांवर स्वराज्य-पक्षाच्या सभासदांनीं कामें केलीं. रिझर्व्ह बँक बिल, सिलेक्ट कमिटी, संमतिवयाची कमिटी, यांसारख्या कमिटयांवरहि कामें करून त्यांनीं भत्याचे पैसे घेतले होते. नॅशनॅलिस्ट व स्वराजिस्ट यांमध्यें फरक इतकाच कीं, नॅशनॅलिस्ट पक्षानें आम्ही कमिटयांवर कामें करूं, असें मतदारांना सांगितलें व स्वराजिस्टांनीं हें धोरण जाहीर केलें नव्हतें इतकेंच. पण याहि खेपेला केळकरांचा असेंब्लींतील दर्जा पूर्वीइतकाच उच्च होता. त्यांच्या विद्वत्तेची छाप सर्वांवर पडत असे. त्यांचीं विनोदी व माहितीपूर्ण भाषणें सर्वांना आवडत. त्यांच्या निःस्पृहपणामुळें ते नवीन सभासदांना आदर्श झाले होते. ते कोणाचा द्वेष कधींच करीत नसत. असेंब्लींतील कोणत्याहि सभासदाला—मग तो स्वतंत्र, स्वराज्य-पक्ष, राष्ट्रीय-पक्ष व कांहीं कांहीं वेळेला युरोपिअन पक्ष यांपैकीं कोणत्याहि पक्षाचा असो—असें वाटे कीं, केळकरांचे भाषणांत तथ्यांश आहे. त्यांना भावनाप्रधान भाषणें करितां येत नव्हतीं. त्यांच्याजवळ लाला लजपतराय यांच्यासारखा आवेश अगर वक्तृत्व नव्हतें. बॅ. जिना यांच्यासारखी ऐट नव्हती. पं. मदनमोहन मालवीय यांच्याप्रमाणें त्यांचें भाषण पाल्हाळिक नसे. तरी पण त्यांच्या भाषणांत बुद्धिमत्तेची झाक, अभ्यासाची आवड, विनोदाचें गांभीर्य, राष्ट्रप्रेम व मताचा उदारपणा हे गुण प्रामुख्यानें दिसत. सहसा कोणत्याहि बिलावर अगर ठरावावर भाषण करण्यापूर्वी त्या विषयावरील पुस्तकें, हिंदी व परकी तज्ज्ञ लोकांचे अभिप्राय, इतर राष्ट्रांतील कायदे व पद्धति, त्या विषयाचा संपूर्ण अभ्यास करून त्यांनीं भाषणांचीं टिपणें केलीं नाहींत असें कधीं झालें नाहीं. करन्सी, रिझर्व्ह बँक यांसारख्या क्लिष्ट विषयांचा अभ्यास त्यांनीं असेंब्लीचे सभासद असतांना दिल्ली-सिमल्यांतच केला. बजेटाचीं पुस्तकें घेऊन व मागील १०-१२ वर्षांच्या आंकड्यांशीं तुलना करीत ते फारसे बसत नसत; पण फडणविसांचीं बजेटवरील भाषणें व त्यावरील स्पष्टीकरणाचे रिपोर्ट त्यांनीं काळजीपूर्वक वाचले नाहींत, असें कधीं झालें नाहीं. आपल्या भाषणाच्या पुष्टयर्थ ते दाखले देत,

ते बहुतांशीं इंग्लिश ग्रंथकारांच्या ग्रंथांतूनच घेत व प्रतिपक्षाला निरुत्तर करीत. लांबच्या लांब भाषणें करण्याची हौस त्यांना फारशी नसे. नाहीं म्हणावयाला करन्सी बिलावरील त्यांचें भाषण सुमोरें दीड दोन तास चाललें होतें. केळकर बोलावयास उठले कीं, त्यांचें प्रतिभाशाली व विनोदपूर्ण भाषण ऐकण्याकरितां बुद्धिप्रधान लोक आपल्या जागेवर येऊन बसत. सर डेनीस ब्रे हे परराष्ट्रीय खात्याचे चिटणीस, त्यांना असेंब्लींत फारसें काम नसे. व ते असेंब्लींत फारसे बसतहि नसत; पण तात्यासाहेबांच्या भाषणास ते आवर्जून येत. एकदां बजेटावर भाषण करितांना जबाबदार कार्यकारी मंडळ कसें असतें व इतर राष्ट्रांत राजकीय पक्षांत मतभेद झाला व एका पक्षाची सरशी झाली म्हणजे तो प्रधानमंडळ बनवून त्या पक्षाच्या धोरणानुसार राज्यकारभार कसा चालतो या संबंधानें केळकरांनीं तात्त्विक चर्चा केली. तेव्हां हल्लींचे फडणवीस सर जॉर्ज शुस्टर त्यांना डवचून म्हणाले, 'केळकर, हा कांहीं अर्थशास्त्र व राजकारण शिकविण्याचा वर्ग नव्हे' तेव्हां केळकर म्हणाले, 'वर्ग नाहीं हें मीहि जाणतों; पण तुम्ही माझे क्लासांत नांव घाला. मीं तुम्हांला तोहि विषय शिकवीन; कारण तो विषय तुम्हांला शिकविलाच पाहिजे!'

व्हायसरॉय साहेबांच्या बंगल्यावरील पेटींत Visiting Card टाकून कित्येक सभासद जेवणाचें आमंत्रण लावीत. त्यांच्या या लघळपणाचा तात्यांना अतिशय राग येत असे. सरकारी सभासदांना आपल्या घरीं जेवणाखाण्यास अगर चहापाण्याचें आदरातिथ्य करण्यांत त्यांनीं आपला वेळ कधीं फुकट दवडला नाहीं. आपण साहेबांशीं बोलावयास गेले व त्याचेपाशीं हस्तांदोलन केलें असें कधीं झालेंच नाहीं. असेंब्लीचें काम संपलें कीं, सुटीचा दिवस ते केसरी–मराठा पत्राकडेच खर्च करीत. दिल्ली–सिमल्याचीं वातमीपत्रें लिहीत, नवीन पुस्तकांवर अभिप्राय देत, व असेंब्लीच्या लायब्ररींतील नवीन पुस्तकें आणून केसरीच्या वाचकांना त्यांतील माहिती उपलब्ध करून देत. कौटिलीय अर्थशास्त्रावरील व शिवचरित्रप्रदीप यावरील अभिप्राय, शारदेची आकाशवाणी हे लेख, १६ पेन्स १८ पेन्साचा वाद वगैरे लेख त्यांनीं सिमला–दिल्लीसच लिहिले. टिळकचरित्रापैकींहि बराचसा भाग त्यांनीं तेथेंच लिहिला. त्यांचा उद्योगी स्वभाव त्यांना बसूंच देत नसे म्हटलें तरी चालेल; पण इतकेंहि करून दिल्ली व सिमला येथील स्थायिक महाराष्ट्रीय मंडळींच्या हाकेला त्यांनीं रुकार दिला नाहीं असें कधीं झालें नाहीं. दरवर्षी

सिमल्यास जातांना महाराष्ट्रक्लबांत गणपत्युत्सवाचे निमित्तानें ते व्याख्यान देत व महाराष्ट्र मंडळांतील स्नेहीमंडळींची विचारपूस करीत. रामदास-नवमीचा उत्सव तर त्यांचेच अध्यक्षतेखालीं साजरा होई. महाराष्ट्र, वऱ्हाड, नागपूरकडील मनुष्य दिल्लीस कांहीं कामानिमित्त आला तर आपली दाद केळकरांकडून लावून घेई. व "तुमचेंच काम करण्यास मी येथें बसलों आहें, तुम्ही तें करून घ्या" असें ते मोठ्या उदार मनानें सांगत. रेल्वेच्या मजूर संघाची पुढारी मंडळी संघाचें अगर इतर कामानिमित्त १०-१५ दिवस केळकरांकडे राहून गेली नाहींत असें कधीं झालें नाहीं. पोस्टटेलिग्राफ व करन्सी खात्याचें नोकरवर्गांतील तक्रारींचे वकीलपत्र त्यांनीं सतत कायमचेंच घेतलें होतें, असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्यांचेकडून दर वर्षी १००-१५० प्रश्न विचारण्याकरितां येत. त्यांत कमी जास्त दुरुस्ती करून ते विचारीत व मिळेल ती माहिती गोळा करून त्यांचेकडे पाठवीत. प्रत्यक्ष खात्याचे अधिकाऱ्याला भेटून योग्य असतील त्या अडचणी दूर करण्याची खबरदारी घेत; पण योग्य कारणाशिवाय सरकारी अधिकाऱ्यांची मनधरणी त्यांनीं केली नाहीं. त्यांची भेट घेण्याला वशिले लावावे लागत नसत अगर भेटण्याची वेळहि आधीं पत्र लिहूनच ठरविली पाहिजे असें नसे. अमक्यालाच भेटावयाचें तमक्यालाच भेटावयाचें नाहीं, असें कधीं झालें नाहीं. परप्रांतीय लोकांनाहि ते महाराष्ट्रीयाप्रमाणेंच वागवीत. इतर प्रांतांतील पुढारी मंडळीप्रमाणें आपले आप्तेष्ट अगर जातबांधव यांची वर्णी सरकारी खात्यांत लावण्याची खटपट त्यांनीं कधीं केली नाहीं. पण त्या बरोबरच अन्याय होत असेल अगर लायक इसम असतांना, वशिल्याचीं उंटें मध्यें येत असतील तर त्याची दाद लावून घेण्यास त्यांनीं कमी केलें नाहीं. असेंब्लींत त्यांनीं कोणत्या ठरावांवर व बिलांवर भाषणें केलीं व त्यांत कोणत्या विशेष मुद्याचें विवेचन केलें हें पुढें दिलेल्या जंत्रीवरून समजेलच. त्यावरून त्यांनीं कोणती कामगिरी केली हें दिसून येईल. पण निदान त्यांचे कार-कीर्दींत त्यांनीं पांच सहा नवीन बिलें आणलीं व त्यांपैकीं निदान एक बिल तरी मंजूर करून घेऊन राजकीय शिक्षणसंस्थांना रजिस्ट्रेशन ॲक्टाखालीं नोंदणीचा अधिकार प्राप्त करून दिला असें म्हणतां येईल. तसेंच हिंदु-स्थानचे भोंवतीं अफाट समुद्र असतांना मिठाचे बाबतींत परावलंबी राहावें लागतें, ही गोष्ट सरकारास लज्जास्पद आहे अशा अर्थाचा ठराव बजेट-मंजुरीचे वेळीं कपातीच्या रूपानें त्यांनीं आणला होता व तो मंजूर झाला. त्या

ठरावाला अनुसरून टॅरिफ बोर्डानें मिठाच्या धंद्याची चौकशी केली. व टॅरिफ बोर्डाच्या शिफारसीप्रमाणें देशी मिठाचे कारखानदारांना फूल नाहीं फुलाची पाकळी कांहीं तरी संरक्षण मिळालें. असेंब्लीच्या १०० सभासदां-पैकीं चार दोन सभासदांच्या वांट्यास तरी इतकें प्रत्यक्ष फल आलें असेल कीं नाहीं याची शंकाच आहे. पण अशा परिणाममापक यंत्रानें असेंब्लींतील कामगिरी मोजली जाणार नाहीं. कारण जबाबदार कार्यकारी मंडळ जोंपर्यंत प्रस्थापित झालें नाहीं, तोंपर्यंत कामगिरीचें दृश्य फल हातीं किती पडलें हें दिसूं शकणार नाहीं. तरी पण सरकारच्या आहारीं लोक-नियुक्त सभासद किती गेला हें त्याच्या आचरणावरून दिसून येऊं शके व त्याची मनोमन साक्ष मतदाराला पटून येईल. या दृष्टीनें पाहतां केळकरांची कामगिरी पहिल्या प्रतीची झाली यांत शंका नाहीं. शारदा बिलाला केळकरांचा पाठिंबा होता व वधूचे विवाहाची वयोमर्यादा १४ ठेवावी असेंच त्यांना वाटे. हें प्रगतिपर धोरण असेंब्लीनें मान्य करावें असें त्यांना वाटलें; पण कायद्याचा अंमल होणार तो एक वर्षानीं व्हावा व त्या मुदतींत खेड्यापाड्यांतून जाहीरनामे लावून, लोकांना या कायद्याचें महत्त्व समजावून सांगण्यांत यावें व कायदा मोडल्यास त्याचे परिणाम काय होतात हेंहि त्यांना कळावें अशी त्यांनीं सूचना केली होती; पण ती सूचना सरकारनें अमान्य केली, आणि खानदेश, नाशिक, सातारा इकडील मतदारां-कडून शारदा बिलाला विरोध करा अशा अर्थाचीं तारा व पत्रें त्यांना बरचेवर येऊं लागलीं. तेव्हां केळकरांनीं आपल्या मतापेक्षां मतदारांचें मतच ग्राह्य मानलें व शेवटीं बिलाला मंजूरी मागण्यांत आली, त्या वेळीं विरोधकांचे बरोबरच त्यांनीं आपलें मत दिलें. यावरून मतदारसंघाचे मताला ते किती किंमत देत होते, हें दिसून येईल.

एवढा लांबचा त्रासदायक प्रवास करणें व सिमल्याच्या कुंद हवेंत रहाणें प्रकृतीला हितावह नव्हतें. बैठक संपण्यास अवघा एक आठवडा होता तरी देखील त्यांनीं लाला लजपतराय यांची तार आल्याबरोबर ते कशाची परवा न करितां सिमल्यास उठून गेले व सरकारचे पब्लिक सेफ्टी बिलावर भाषण करून आपलें विरुद्ध मत त्यांनीं नोंदून घेतलें. यावरून मतदाराचे हिताकरितां ते किती जागत होते हें दिसून येतें.

याशिवाय असेंब्लीचे दसरीं दाखल नाहींत, पण असेंब्लीचे सभासद असतांना त्यांनीं चार दोन गोष्टींत जी कामगिरी केली तिचा थोडासा उल्लेख करून हा लेख पुरा करतों. त्या गोष्टी अशा:—

१९२३ सालीं प्रायव्हेट सी. जे. वॉकर याची नेमबाजी वडगांवच्या अर्जुना नांवाच्या शेतकऱ्यावर आली व तो प्राणास मुकला! प्रायव्हेट वॉकर याचेवर खटला होऊन तोहि निर्दोषी ठरला. पण पुढें केळकर असेंब्लींत आल्यानंतर त्यांनीं या प्रश्नाची दाद मागण्यास सुरवात केली. प्रथम एका सभासदाकडून मुंबई कायदे–कौन्सिलांत अर्जुनाचे कुटुंबास नुकसान–भरपाई देण्यांत आली काय व नसेल तर ती देण्यांत येईल काय अशी चौकशी केली; पण ठरल्याप्रमाणें मुंबईसरकारनें वाटाण्याच्या अक्षता लावल्या व मिलिटरीखात्याकडे बोट दाखवून बोळवण केली. केळकरांनीं या प्रश्नाचा छडा असेंब्लींत लावला व अर्जुनाचे कुटुंबास नुकसानभरपाई देण्यांत कां येऊं नये अशी पृच्छा केली. फडणवीस खात्याचे चिटणवीस यांनीं नुकसानभरपाई देतां येत नाहीं व लष्करी खात्यांत पैशाची टंचाईच आहे असें उत्तर दिलें. हें उत्तर त्यांनीं असेंब्लींत ऐकून घेतलें. पण घरीं आल्यावर वर्डन यांना खरमरीत पत्र लिहून विचारलें, "अहो पैसा नाहीं म्हणतां याचा अर्थ काय! निदान मीं केसरींत न्यायमूर्तीचे निकालावर टीका केली व कोर्टाची बेअदबी झाली म्हणून माझेकडून ९००० रुपये सरकारानें वसूल केले, ते तरी पैसे आहेत ना! मग ९ हजार रुपये तरी गरीब शेतकऱ्याच्या बायकापोरांना द्याल कीं नाहीं!" तेव्हां कोठें सरकार जागें झालें व पुढें चौकशी होऊन १५०० रुपये अर्जुनाचे कुटुंबास नुकसान–भरपाई मिळाली. हें काम होण्यास केळकरांचा उपयोग झाला हें सांगणें नकोच.

दुसरी एक बाब मसूर आश्रमांतील गोव्यास गेलेल्या प्रचारकांची. गोव्यास शुद्धिकार्याच्या प्रसाराकरितां गेलेल्या प्रचारकांनीं हिंदुधर्माचा प्रचार केला व खेडोंच्या खेडीं हिंदुधर्मांत परत येण्यास तयार झालीं. साह-

जिकच तेथील पाद्री लोकांत खळबळ झाली व गोवेसरकारनें त्यांना कैद करून मारहाण केली व त्यांना बाहेर घालवून देण्यास सुरवात केली. तेव्हां तेथील हिंदुधर्मीयांना सोसाव्या लागणाऱ्या छळाची हकीकत केळकरांचे कानांवर आली. तेव्हां केळकरांनीं असेंब्लींतील सभासदांच्या वतीनें एक जाहीर पत्र पोर्तुगीज गव्हर्नरकडे पाठविलें व धर्मस्वातंत्र्याचा डंका वाजविणाऱ्या पोर्तुगीज सरकारनें हिंदुधर्मीयांवर जुलूम-जबरदस्ती करणें इष्ट नाहीं, असें निदर्शनास आणलें व झालेल्या अत्याचारांबद्दल निषेध करून दाद मागितली. पण एवढयावरच ते स्वस्थ बसले नाहींत. छळाची वार्ता ऐकल्यापासून त्यांचें मन अस्थिर झालें होतें व सारखी त्यांचे मनाला तळमळ लागली होती. त्या रात्रीं त्यांना झोंपहि लागली नव्हती म्हटलें तरी चालेल. गोवाप्रांतांतील हिंदूंचे मदतीकरितां त्यांनीं एक जाहीर पत्रक काढलें व दुसरे दिवशीं उजाडतांच घराबाहेर पडले ते तडक बिरला, सर पुरुषोत्तमदास ठाकूरदास, श्रीनिवास आयंगार, पं. मालवीय व इतर सभासदांना भेटून सुमारें १००० रुपये वर्गणीचे आंकडे मिळविले. हिंदु-महासभेच्या कार्यकारी मंडळाकडेहि त्यांनीं मदत मागितली व दोन हजार रुपये मिळवून दिले.

तिसरी एक गोष्ट म्हणजे मिरतच्या कटांतील आरोपींच्या बचावाकरितां लागणाऱ्या खर्चाच्या तरतुदीची. कटाचा खटला आज ३-३॥ वर्षे चालूच आहे. खटला भरण्यांत आला तेव्हां एक 'डिफेन्स कमिटी' नेमण्यांत आली होती. त्या कमिटीचे केळकर हे एक सभासद होते. कमिटीनें ७-८ हजार रुपये जमवले व सुमारें वर्ष-सहामहिन्याच्या खर्चाची तरतूदहि केली. केळकरांनीं महाराष्ट्रांत जमलेली वर्गणी पाठविली होती. पण पुढें पैशाची तरतूद कशी करितां येईल, यासंबंधानें कमिटीची सभा झाली. बचाव करण्याकरितां १-२ वकील यावयाचे त्यांचाच खर्च दरमहा हजारभर रुपये येईल असें ठरलें. तेव्हां केळकरांनीं सूचना मांडली कीं, प्रत्येक प्रांतानें पांच हजार रुपये गोळा करून द्यावे. महाराष्ट्रातर्फे केळकरांनीं आपले अंगावर घेण्याचें कबूल केलें. पण पुढें पं. नेहरू, जवाहिरलाल नेहरू, डॉ. अनसारी वगैरे मंडळी म्हणूं लागली कीं, 'या खटल्याचे मदतीकरितां आमच्या प्रांतांत पैसा जमणार नाहीं. जमीनदार लोक म्हणजे कम्युनिस्ट लोकांचे शत्रु तेव्हां ते पैसे कसे देणार!' पं. मोतीलाल नेहरू म्हणाले, 'अहो केळकर, परवांच कलकत्यास माझ्या एका स्नेह्याकडून सार्वजनिक कामाकरितां १००० रुपयांचा चेक घेऊन आलों. पण मी घरीं पोंचलों तोंच मला निरोप आला कीं मिरत

येथील कटाचे खटल्याकरितां याचा विनियोग करूं नका.' तेव्हां पैसे जमा होणार नाहींत असें दिसून आलें. पं. जवाहिरलाल नेहरू यांनीं तर बचाव करूंच नये, असा सल्ला दिला म्हणतात. डॉ. अनसारी आधींच अंग झाडून मोकळे झाले होते. तेव्हां कमिटीची सभा भरल्याचा उपयोग फारसा झालाच नाहीं म्हटलें तरी चालेल. पण केळकर असेंब्लीचे कामाकरितां दिल्लीस गेले असतांना, मुद्दाम मिरतेस जाऊन, कॉमरेड डांगे, जोगळेकर, निमकर, घाटगे, अधिकारी, ठेंगडी, वगैरे मंडळींची भेट घेऊन त्यांची त्यांनीं विचारपूस केली नाहीं असें झालें नाहीं. बचावाला लागणारा सर्व खर्च करण्याची जबाबदारी एकट्या-वर घेणें त्यांना अशक्यच होतें. तेव्हां सर्वांनीं मिळून सरकारकडेच डिफेन्स देण्यास मदत मागावी असा सल्ला केळकरांनीं दिला. व महाराष्ट्रीय तरुण मंडळींना असें आश्वासन दिलें कीं, तुम्हांला लागणारी इतर कांहीं मदत मी देईन. डांगे वगैरे मंडळींना लागणारे सरकारी रिपोर्ट व इतर पुस्तकें हीं त्यांनीं विकत घेऊन पाठवून दिलीं. त्यांच्या तक्रारींची दाद असेंब्लींत मागितली व त्यांना थोडीफार पैशाची मदतहि त्यांनीं केली. या तरुण लोकांचा स्वार्थत्याग व हाल पाहून व त्यांना कम्युनिझमची मतें स्वीकारल्याबद्दल होणारी शिक्षा यांची कल्पना त्यांचे मनांत आली कीं, त्यांच्या मुखांतून " यांच्या स्वार्थत्यागाची किंमत लोक करीत नाहींत व यांचीलोक दाद घेत नाहींत " असे शब्द निघा-लेले प्रस्तुत लेखकानें अनेकदा ऐकले आहेत. असो. यापुढें १९२७ ते १९३० सालपर्यंत केळकरांनीं जीं कांहीं महत्त्वाचीं भाषणें केलीं, त्यांपैकीं कांहीं विशिष्ट प्रश्नांवरच्या भाषणांचा सारांश त्यांचीं मतें व्यक्त करण्याकरितां येथें देण्याचा आमचा विचार होता; पण स्थलसंकोचास्तव तीं देतां येत नाहींत, ही निरुपायाची गोष्ट आहे. रा. देशपांडे यांनीं केळकरांनीं आर्थिक प्रश्नांवर जीं भाषणें केलीं त्यांचा सारांश दुसरीकडे 'केळकर व अर्थशास्त्र' या लेखांत दिलाच आहे.

१९३० सालीं म० गांधींनीं कायदेभंगाची चळवळ सुरू केली व सर-कारनें लोकपक्षाला न जुमानतां 'ब्रिटिश प्रेफरन्स' चें तत्त्व असेंब्लीचे गळ्यांत अडकाविलें व पांच कोटींनीं रयतेवरील करांचें ओझें वाढविलें. याकरितां असेंब्लींतील स्वराज्यपक्षाच्या कांहीं सभासदांनीं आपल्या जागांचे राजिनामे दिले. राष्ट्रीय-पक्षांतील सभासदांपुढें तोच प्रश्न येऊन पडला. पं. मदन मोहन मालवीय, मुक्तारसिंग, पं. ठाकुरदास भार्गव, अणे वगैरेंनीं देशांत चळवळीचें वादळ उठलें असतांना अपमान सहन करून असेंब्लींत रहाणें योग्य नाहीं

असें आपलें मत दिलें. व राजिनामे देण्याची तयारी दाखविली. राष्ट्रीय पक्षाची सभा या प्रश्नाचा विचार करण्याकरितां भरली, त्यावेळीं केळकरांना हजर रहातां आलें नाहीं. पण पं. मदन मोहन मालवीय यांना पत्र लिहून त्यांनी आपलें मत कळविलें होतें कीं, 'राष्ट्रीय वृत्तीचे सभासद असेंब्लींतून उठूनच गेले तर त्यांपासून फायदा कांहींच न होतां नुकसान होईल. तसेंच राष्ट्रीय-वृत्तीच्या सभासदांनीं राजिनामे देऊन टॅरिफ बिल, राउंड टेबल कॉन्फरन्स व दडपशाही या गोष्टी सुधारणाऱ्या नाहींत!' पण दिल्लीहून पुण्यास परत आल्यावर त्यांनीं आपल्या जागेचा राजीनामा पाठवला व त्यांत सिंमल्यास हजर रहातां येणार नाहीं असें नमूद केलें. या राजिनाम्यांत केळकरांनीं सरकारी धोरणासंबंधानें व असेंब्लींतील सभासदांचें कर्तव्य या दृष्टीनें खालील समर्थन केलें आहे; तें त्यांच्याच शब्दांत देतों.

"आज पांच सहा वर्षें मी असेंब्लींत सरकारचें धोरण पहात आहें व त्याचा निषेध करावा तितका थोडाच होईल. बेजबाबदारीची सनद ज्यांना मिळाली व या सनदेनें जे स्वतःस धन्य मानतात, त्या अधिकारी मंडळानें अराष्ट्रीय किंवहुना उपमर्दकारक धोरण ठेवावें यांत काय आश्चर्य ! लोकांनीं आपलें धोरण असें ठेवावें कीं, हल्लींच्या राज्यघटनेंत लोकांना मतदारसंघाच्या द्वारें जी थोडीबहुत सत्ता मिळाली आहे तिचा उपयोग भरपूर करून घेऊन, नवीन हक्कांकरितां झुंजण्यासाठीं खंबीर व निश्चयी असे प्रतिनिधि निवडून दिले पाहिजेत, व त्यांच्या तोंडून शक्य तेवढा जोरदार निषेध अधिकारी मंडळाला प्रत्यक्ष कानांनीं ऐकविला पाहिजे, व इतर खटपटीनें नसलेलेहि हक्क मिळविले पाहिजेत. म्हणून जागा रिकाम्या टाकणें हें आत्मघातकीपणाचें होईल. कोणी वैतागानें किंवा इतर कशानें आपल्या जागा रिकाम्या टाकल्या तर सरकारचें आयतें बरेंच झालें त्यांच्या बेजबाबदारीच्या दुधांत ही साखरच पडली म्हणावयाची."

सारांश केळकरांची कौन्सिलांतील कामगिरी ही अगदीं भरीव, उज्ज्वल व त्यांच्या राष्ट्रीय बाण्याला अनुसरूनच होती असें म्हणण्यास बिलकुल प्रत्यवाय नाहीं. असहकारितेच्या ऐन अमदानींतहि त्यांनीं कौन्सिलबहिष्काराविरुद्ध आपलें मत प्रतिपादन केलें व कौन्सिलांत जाऊनहि राष्ट्रभक्ताला राष्ट्रसेवा करितां येते हें त्यांनीं प्रत्यक्ष आपल्या उदाहरणानें लोकांना पटवून दिलें. या त्यांच्या कामगिरीबद्दल टिळकांच्या महाराष्ट्रानें तरी त्यांचें सदैव ऋणी असलें पाहिजे.

केळकर वरिष्ठकायदेमंडळांत असतांना केळकरांनीं काय काय कार्यें केलीं हें वर दिलेंच आहे. पण त्यांची विनोद बुद्धि व इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व या दोन गुणांच्या संगमानें जी एक गोष्ट घडली ती मौजेची म्हणून देतों. कायदेमंडळांत एक सभासद अध्यक्षांच्या समोरच बसलेले असून त्यांचा धंदा उगाच कांहीं तरी मध्येंच बोलून एखाद्या सभासदाचा पाणउतारा करण्याचा असे; पण ते स्वतः इतके नादान असत कीं, या प्रयत्नांत नेहमीं त्यांचीच फजीती होई व ते स्वतःला इतकें हास्यास्पद करून घेत, कीं सर्व असेंब्लींत ती एक कायमची गम्मतच होऊन बसली होती. असेंब्लींत काम चालूं असतांना कंटाळा आला म्हणजे दिवाण चमनलाल, केळकर वगैरे मंडळी चार ओळींचे सहा ओळींचे विनोदी चुटके कवितारूपानें लिहून एकमेकांना धाडीत व त्या त्या बाकावर हंशा पिके. त्याला अनुसरून पण विशेष मोठी म्हणजे सुमारें साठपासष्ट ओळींची एक इंग्रजी कविता केळकरांनीं या उपद्व्यापी सभासदावर केली व त्याच्या छापील प्रति खासगी रीतीनें असेंब्लींत गमतीनें वांटण्यांतहि आल्या. ती कविता इंग्रजी भाषेच्या दृष्टीनें इतकी; चांगली साधली आहे कीं, कलकत्याच्या 'स्टेट्समन' पत्राचे एक सहसंपादक मि. आर्थर मूर हे त्यावेळीं असेंब्लींत सभासद होते. त्यांनीं ती लिहिली असली पाहिजे, एरवीं इतकें चांगलें इंग्रजी व त्यांतूनहि कविता कोण लिहिणार असे पुष्कळ सभासदांनीं उद्गार काढले ! शेवटीं इतकेंच सांगावयाचें कीं, कवितेंतील नायक रूपानें व गुणानें खरोखरच इतका हास्यास्पद होता कीं, कवितेंतील वर्णन त्याला तंतोतंत लागण्यासारखें होतें; अर्थात् काव्यदृष्टीनें ! ती कविता अशी—

## WHO'S WHO?

Dedicated To Diwan Chaman Lal, M. L. A.



Our wonderful Assembly
Is a good fancy-fair;
For one sees there daily
Exhibits *galore*
And yet so very rare.

Placed in front of Chair
One such is—guess who!
He shows his antics bare
Like a monkey in the Zoo.

His whole figure a tunnel
His nose a war-ship funnel.
Mis-shapen, Vulcan-hewn
His head an ashy dune,
His hair a swarming shoal,
His mask a mass of coal.

With not the thinnest shred
Of wooly brain in head
Smeared with slimy hue,
He shows an antique face
That reminds me and you
Of stone-age human race.

Cross-bred of ass and ox,
He is jack-in-the-box,
Made more to vex than fright,
Popping up his head
Like a *bullet of lead*,
When he would be wise
In misleading human guise
In his seat to sit tight.

Question supplementary
Tempts him like a berry
To vagabondish urchin
Ransacking a dust-bin.
To get in and out of seat
For him acrobatic feat.

First few words he mumbles;
For others vainly fumbles,
Sentence ever unended
With rebuke unfended,

Midst his senseless quib
Like ever-smoking squib
See him *so collapse*
After a sorry lapse !

The *foolish* laugh he raised
Came always back on head
Like a boomerang stone
By unskilful hand thrown.
For jokes to himself fateful
He makes you ever grateful.

*Gives rousing refresher*
To every worried doser,
This nature's own buffoon
To the Assembly is a boon.

The T. A. is his ration,
Interruption his profession.
My anger often boils
When wickedly he spoils
The charm of fine oration.
"He overdoes his job,"
Would tempt the patient Job.

But this for him enough;
Let him wallow in his trough.
For, why waste a *limerick*
On him who deserves a kick ?

---

# १७. केळकर व राजकारण

( प्रो. लक्ष्मण बळवंत भोपटकर, एम्. ए., एल्एल्. बी., पुणें )

देशभक्त नरसिंह चिंतामण ऊर्फ तात्यासाहेब केळकर यांचा जन्म शके १७९४ श्रावण वद्य ६ म्हणजे ता. २४ ऑगस्ट सन १८७२ रोजीं झाला. एल्. एल्. बी. ची परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर सन १८९५ च्या जून महिन्यांत त्यांनीं साताऱ्यास वकिलीच्या धंद्यास सुरुवात केली. लोकमान्य टिळकांच्या आग्रहाच्या निमंत्रणावरून वकिलीचा शांततेचा व किफायतशीर धंदा सोडून देऊन तात्यासाहेबांनीं ता. १७ मार्च १८९६ रोजीं " केसरी " व " मराठा " संस्थेशीं संबंध जोडून धोक्याचा व गरिबीचा पेशा पतकरला ! अशा प्रकारें सातारा शहर एका भावी नामांकित कायदेपंडितास व धनाढ्य नागरिकास मुकलें खरें; पण त्यानें हिंदुस्थानास एक चतुर लेखक, तेजस्वी देशभक्त, आणि थोर राजकारणी पुरुष पैदा करून दिला, यांत तिळप्राय संशय नाहीं !

२. तो काळच असा होता कीं, तात्यासाहेबांसारख्या बुद्धिवान् तरुणानें केसरी–मराठासारख्या वर्तमानपत्रांच्या संपादकवर्गांत सामील होण्याऐवजीं त्यांपासून चार हात फटकूनच वागावें. परंतु महाराष्ट्राचें, किंबहुना हिंदुस्थानचें महद्भाग्यच कीं, तात्यासाहेबांना तशी बुद्धि न सुचून, लोकमान्यांच्या हांकेबरोबर त्यांनीं ओ द्यावी, आणि कालेंकरून वरील दोन पत्रांना वर्तमानपत्रांच्या क्षेत्रांत अत्यंत उच्च स्थान प्राप्त करून देण्यास बव्हंशीं कारणीभूत व्हावें ! हिंदुस्थानच्या इतिहासांत त्या कालास अतिशय महत्त्व द्यावें लागेल. सन १८९१ सालीं लोकमान्य केसरीचे संपादक झाले. १८९१ तें १८९३ पर्यंत त्यांना आपली बुद्धिमत्ता बहुशः स्थानिक, सामाजिक वा धार्मिक वादग्रस्त विषयांना योग्य वळण लावण्यांतच खर्च करावी लागली. परंतु १८९३ पासून लोकमान्यांच्या टीकेचें तोंड आस्ते आस्ते सरकाराकडे वळून त्याचे चटके त्यांस बसूं लागले. हिंदु–मुसलमानांचे दंगे, मुंबईचे त्या वेळचे गव्हर्नर लॉर्ड हॅरिस यांची जुलमी व विक्षिप्तपणाची कारकीर्द, दुष्काळ–निवारणाची चळवळ, प्लेगाचा प्रादुर्भाव व प्लेग–प्रतिबंधक उपायांची विशेषतः पुणें शहरांत चाललेली कडक अंमल–बजावणी, इत्यादि विषयांवर केसरींत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांमुळें सरकारची अशी बालंबाल खात्री होत चालली कीं, टिळक हा पुरुष आपणास एक बलाढ्य शत्रु निर्माण होत चालला असून,

करण्यांत आलें. त्याची प्राथमिक चौकशी होऊन तो सेशनकमिट करण्यांत आला. ता. ८ सप्टेंबर रोजीं तो न्या. स्ट्रॅची यांच्यापुढें चौकशीस निघाला. आणि ता. १४ सप्टेंबर रोजीं लोकमान्यांना अठरा महिन्यांची सक्त मजुरीची सजा ठोठावण्यांत आली ! या खटल्यामुळे महाराष्ट्रच नव्हे तर सर्व हिंदुस्थान हादरून गेलेला होता. ब्रिटिश अमदानींतील हा जरी राजद्रोहाचा दुसरा खटला होता, तरी तो लढतांना टिळकांचें धैर्य व परिणामविषयींचा बेगुमानपणा इतका चमकला कीं, साऱ्या हिंदुस्थानचे डोळे टिळक, त्यांचीं केसरी–मराठा हीं पत्रें, त्यांचे मदतनीस दे. भ. तात्यासाहेब केळकर व दे. भ. कृष्णाजीपंत खाडिलकर यांच्या हालचालींकडे लागून राहिलेले होते. या खटल्यांत न्या. स्ट्रॅचींनीं टिळकांना जरी शिक्षा ठोठावली, तरी नैतिक विजय टिळकांच्या पक्षालाच प्राप्त झालेला होता ! सरकार नुसत्या टिळकांवरच खटला करून थांबलें नाहीं, तर प्रतोद, मोदवृत्त व पुणेंवैभव या तीन वर्तमानपत्रांच्या संपादकांवरहि त्यानें खटले भरले. सारांश, या खटल्यांमुळें महाराष्ट्रांत एका नवीन मनोवृत्तीचा व दृष्टिकोनाचा जन्म होऊन त्यांची छाप पुढें हिंदी राजकारणावर दिवसेंदिवस पडूं लागली !

५. एखादा बावरलेला मनुष्य ज्याप्रमाणें मागलापुढला विचार न करतां मल्यावुन्या गोष्टी करीत सुटतो, त्याचप्रमाणें रँडसाहेबांच्या खुनानें बावरलेल्या सरकारनें पुढें कांहीं दिवस महाराष्ट्रांत नुसता धुमाकूळ उडवून दिलेला होता! कोणावर केव्हां सरकारची झडप पडेल याचा मुळींच नेम राहिलेला नसल्यामुळें, सार्वजनिक चळवळींत भाग घेणाऱ्या इसमांचें जीवित व स्वातंत्र्य क्षणभंगुर झालेलें होतें ! त्यांतल्या त्यांत केसरी–मराठा पत्रांच्या संपादकांचें स्वातंत्र्य तर अत्यंत क्षणैकास्थिर असें झालेलें होतें ! अशा परिस्थितींत तात्यासाहेबांसारख्या केवळ पंचविशीच्या आंतबाहेर असलेल्या तरुणानें छातीठोकपणानें त्या पत्रांचें संपादकत्व स्वीकारावें, व तीं पत्रें लोकमान्यांच्याच तडफेनें व धडाडीनें चालवावींत, हें खरोखर त्यांच्या थोर स्वभावाचें व निधड्या छातीचें द्योतक होतें ! ता. १४ सप्टेंबर रोजीं टिळकांना शिक्षा झाल्यावर, केसरी व मराठा पत्रांच्या संपादकांचें डिक्लेरेशन करून ता. १९ सप्टेंबरपासून मराठा पत्र व ता. २१ सप्टेंबरपासून केसरी पत्र तात्यासाहेबांच्या नांवावर निघूं लागलीं ! राजकीय क्षेत्रांतील तात्यासाहेबांचा हा खरोखरच प्रथमचा पदन्यास होय, असें म्हटल्यास खचित अवास्तव होणार नाहीं !

६. केसरी–मराठा पत्रांचें संपादकत्व पत्करून तात्यासाहेब एकीकडे

त्याचे आपले दोन हात लवकरच झाल्याशिवाय खास राहणार नाहींत. लोकमान्य केसरींतून जों जों सरकारी धोरणाचे व डावपेचांचे वाभाडे काढून त्यांचें यथार्थ आविष्करण करूं लागले, तों तों सरकारचें लक्ष त्यांच्याकडे अधिकाधिक वेधलें जाऊन सरकारी धोरणाचे पाश त्यांच्याभोंवतीं पडूं लागले. अशा बिकट परिस्थितींत लोकमान्यांनीं आपणांस येऊन मिळण्याविषयीं तात्यासाहेबांना एक प्रकारें आव्हान करावें, आणि तें त्यांनीं मोठ्या आनंदानें स्वीकारून लोकमान्यांच्या सुखदुःखांचे सहभागी व्हावें, हें दृश्य मनोहर व कौतुकास्पद नव्हे, असें कोण म्हणेल ?

३. तात्यासाहेब लोकमान्यांना येऊन मिळाले, त्यानंतर लवकरच लोकमान्यांनीं दुष्काळासंबंधानें अशी कडाक्याची मोहिम केली कीं, तिजमध्येंच त्यांच्यावर खटला होऊन त्यांत त्यांचा बळी पडावयाचा. परंतु कारण काय असेल तें असो, परंतु त्यांच्या मदतानिसांवरच खटले होऊन त्या प्रसंगांतून लोकमान्य वचावले. दुष्काळबद्दलची मोहीम जरा कोठें ओसरते तोंच लोकमान्यांनीं ता. १।६।१८९७ च्या केसरीच्या अंकांत विभूतिपूजा या विषयावर एक लेख लिहून श्रीशिवाजीमहाराजांच्या स्मारकाच्या कल्पनेस चालना दिली, व त्या वर्षी ता. १२ जून रोजीं येथील लकडीपुला-जवळील श्रीविठ्ठलमंदिरांत राज्याभिषेकोत्सव अत्यंत थाटानें साजरा केला. त्या प्रसंगीं कै. प्रो. शिवरामपंत परांजपे यांचें झालेलें प्रवचन आणि प्रो. भानू व जिनसीवाले यांचीं झालेलीं व्याख्यानें तीं ऐकलेल्यांच्या कानांत अद्याप खास घुमत असतील. ता. १५ जूनच्या केसरीच्या अंकांत कांहीं कविता प्रसिद्ध होऊन त्यांमध्यें शिवाजीच्या वेळचीं राजकीय दुःखें व अन्याय यांचें दिग्दर्शन केलेलें होतें. या सर्व गोष्टींमुळें चिडून जाऊन "जस्टिस" या टोपण नांवाखालीं एकानें मुंबईच्या टाईम्समध्यें लेख लिहून सरकारास इषारा दिलेला होता. अशा प्रकारें लोकमान्य व त्यांचा केसरी यांच्याभोंवतीं सर-कारी रोषाचें दारूचें कोठार जमत जाऊन त्यावर ठिणगी पडण्याचाच काय तो अवकाश राहिलेला होता ! ती ठिणगी लवकरच म्हणजे ता. २२ जून रोजीं झालेल्या रँडसाहेबांच्या खुनानें पडली !

४. रँडसाहेबांच्या खुनामुळें माथें फिरून जाऊन सरकारनें जे थेरथेर उडवून दिले त्यांचें सविस्तर वर्णन करण्याचें हें स्थळ व प्रसंगहि नव्हे. एवढें मात्र खरें कीं, तो खून टिळकांना चांगलाच भोंवला ! ता. २७ जुलै रोजीं त्यांच्यावर राजद्रोहाचा खटला करण्यांत येऊन त्यांना मुंबईस गिरफदार

करण्यांत आलें. त्याची प्राथमिक चौकशी होऊन तो सेशनकमिट करण्यांत आला. ता. ८ सप्टेंबर रोजीं तो न्या. स्ट्रॅची यांच्यापुढें चौकशीस निघाला. आणि ता. १४ सप्टेंबर रोजीं लोकमान्यांना अठरा महिन्यांची सक्त मजुरीची सजा ठोठावण्यांत आली ! या खटल्यामुळें महाराष्ट्रच नव्हे तर सर्व हिंदुस्थान हादरून गेलेला होता. ब्रिटिश अमदानींतील हा जरी राजद्रोहाचा दुसरा खटला होता, तरी तो लढतांना टिळकांचें धैर्य व परिणामविषयींचा बेगुमानपणा इतका चमकला कीं, साऱ्या हिंदुस्थानचे डोळे टिळक, त्यांचीं केसरी-मराठा हीं पत्रें, त्यांचे मदतनीस दे. भ. तात्यासाहेब केळकर व दे. भ. कृष्णाजीपंत खाडिलकर यांच्या हालचालींकडे लागून राहिलेले होते. या खटल्यांत न्या. स्ट्रॅचींनीं टिळकांना जरी शिक्षा ठोठावली, तरी नैतिक विजय टिळकांच्या पक्षालाच प्राप्त झालेला होता ! सरकार नुसत्या टिळकांवरच खटला करून थांबलें नाहीं, तर प्रतोद, मोदवृत्त व पुणेंवैभव या तीन वर्तमानपत्रांच्या संपादकांवरहि त्यानें खटले भरले. सारांश, या खटल्यांमुळें महाराष्ट्रांत एका नवीन मनोवृत्तीचा व दृष्टिकोनाचा जन्म होऊन त्यांची छाप पुढें हिंदी राजकारणावर दिवसेंदिवस पडूं लागली !

५. एखादा बावरलेला मनुष्य ज्याप्रमाणें मागलापुढला विचार न करतां भल्याबुऱ्या गोष्टी करीत सुटतो, त्याचप्रमाणें रँडसाहेबांच्या खुनानें बावरलेल्या सरकारनें पुढें कांहीं दिवस महाराष्ट्रांत नुसता धुमाकूळ उडवून दिलेला होता! कोणावर केव्हां सरकारची झडप पडेल याचा मुळींच नेम राहिलेला नसल्यामुळें, सार्वजनिक चळवळींत भाग घेणाऱ्या इसमांचें जीवित व स्वातंत्र्य क्षणभंगुर झालेलें होतें ! त्यांतल्या त्यांत केसरी-मराठा पत्रांच्या संपादकांचें स्वातंत्र्य तर अत्यंत क्षणैकस्थिर असें झालेलें होतें ! अशा परिस्थितींत तात्यासाहेबांसारख्या केवळ पंचविशीच्या आंतबाहेर असलेल्या तरुणानें छातीठोकपणानें त्या पत्रांचें संपादकत्व स्वीकारावें, व तीं पत्रें लोकमान्यांच्याच तडफेनें व धडाडीनें चालवावींत, हें खरोखर त्यांच्या थोर स्वभावाचें व निधड्या छातीचें द्योतक होतें ! ता. १४ सप्टेंबर रोजीं टिळकांना शिक्षा झाल्यावर, केसरी व मराठा पत्रांच्या संपादकांचें डिक्लेरेशन करून ता. १९ सप्टेंबरपासून मराठा पत्र व ता. २१ सप्टेंबरपासून केसरी पत्र तात्यासाहेबांच्या नांवावर निघूं लागलीं ! राजकीय क्षेत्रांतील तात्यासाहेबांचा हा खरोखरच प्रथमचा पदन्यास होय, असें म्हटल्यास खचित अवास्तव होणार नाहीं !

६. केसरी-मराठा पत्रांचें संपादकत्व पत्करून तात्यासाहेब एकीकडे

सरकारशीं दोन हात करण्यास राजकीय रणांगणांत सज्ज उभे ठाकले खरे, परंतु दुसरीकडे तीं पत्रें छापण्याच्या व प्रसिद्ध करण्याच्या बाबतींत अनेक खेंगटीं उपस्थित झालीं. तेव्हांचें केसरी–मराठ्याचें वैभव म्हणजे कर्जाचा बुजबुजाट, व विंचुरकरांच्या वाड्यांतील टिळकांच्या राहत्या घराच्या पडवींत मांडलेलीं दोन देवदारी खोकीं, अशा स्वरूपाचें होतें ! तरुण वय, संपादकाच्या धंद्याचा अननुभव, प्रक्षुब्ध वातावरण, सांपत्तिक दृष्टीनें पत्रांची हलाखीची स्थिति, अशा बिकट परिस्थितींत दुसऱ्या एखाद्या कच्च्या दिलाच्या तरुणानें चहूंदिशीं पत्रांशीं असलेला आपला संबंध तोडून टाकून पुन्हां आपल्या वकिलीच्या धंद्यास सुरुवात केली असती. परंतु महाराष्ट्रास एक साहित्यसम्राट् व हिंदुस्थानास एक थोर देशभक्त लाभावयाचा होता, म्हणूनच तात्यासाहेबांना तशी कुबुद्धि सुचली नाहीं ! आणि आलेल्या व येणाऱ्या सर्व संकटांना व अडचणींना धिम्मेपणानें तोंड देऊन तात्यासाहेब, कृष्णाजीपंत व धोंडोपंत विद्वांस यांनीं तीं दोन पत्रें, टिळकांचा तो अमूल्य ठेवा, नुसतीं चालविलींच नाहींत, तर ता. ६ सप्टेंबर १८९८ रोजीं लोकमान्य सुटून परत येईपर्यंत तीं चांगल्या रंगारूपास व भरभराटीस आणलीं ! ९१ आठवड्यांच्या तुरुंगवासानंतर लोकमान्य सुटून बाहेर आले, तों आपलीं दोन आवडतीं पत्रें बाळसेदार बनलेलीं पाहून त्यांना किती तरी धन्यता वाटली ! लोकमान्य सुटून आले तरी ता. ४ जुलै १८९९च्या केसरीच्या अंकापर्यंत केसरी तात्यासाहेबांच्याच नांवावर प्रसिद्ध होत होता. ता. ४ जुलैच्या अंकापासून लोकमान्यांनीं केसरी पुन्हां जो आपल्या हातीं घेतला, तो ता. २२ जुलै १९०८ च्या अंकापर्यंत त्यांच्याच नांवावर होता. ता. १७–३–१८९६ ते ता. ४ जुलै १८९९ पर्यंतचा काल हा तात्यासाहेबांच्या राजकीय आयुष्यांतील प्रथम कालखंड होय ! या कालांत त्यांच्या ठायीं असलेल्या अनेक सद्गुणांचे अंकुर वृद्धिंगत होऊन ते तेजस्वी व तजेलदार बनत चालले !

७. सन १८९९ ते १९०४ पर्यंतच्या काळांत विशेषशा राजकीय घडामोडी झालेल्या नाहींत. तथापि, या काळांत केसरीच्या द्वारें लोकमान्य व मराठ्याच्या द्वारें तात्यासाहेब लोकजागृतीचें कार्य अविरतपणें करीत राहून, हिंदी राजकारणाला नवीन दृष्टि, नवीन ध्येय व तें साध्य करून घेण्याचीं नवीन साधनें प्राप्त करून देण्याचा खटाटोप करीत होते ! व त्या त्यांच्या खटाटोपाला महाराष्ट्र बगळल्यास त्याच्या खालोखाल बंगाल्यांतें विशेष यश संपादन होत होतें. केसरी–मराठ्यांतील निर्भय विचारसरणी व त्रिनतोड

युक्तिवाद यांमुळें तरुण अंतःकरणें या गुरुशिष्याच्या जोडीकडे आकर्षली जात होतीं ! तुफानापूर्वी वरून शांतता धारण करणाऱ्या, परंतु आंतून गद-गदलेल्या, समुद्राप्रमाणें हिंदी राजकारणाची स्थिति या अल्पशा कालांत झालेली होती; व याबद्दलच्या श्रेयाचा मोठासा वांटा कोणाहि निःपक्षपाती इतिहासकारास टिळक-केळकर या जोडीसच वास्तविकपणें द्यावा लागेल.

८. हिंदी राजकारणांत आज ना उद्यां परंतु लवकरच प्रचंड वादळ होणार खास, या लोकांच्या अटकळीप्रमाणें तें १९०४ सालीं वंगभंगाच्या रूपानें झालेंच. वंगभंगामुळें बंगाल्यांतील सर्व राजकीय पक्षोपपक्ष चिरडीस जाऊन त्याविरुद्ध त्यांनीं 'न भूतो न भविष्यति' अशी चळवळ सुरू केली. तिचे आद्य नेते बाबु सुरेंद्रनाथ बानर्जी असून, बाबु बिपिनचंद्र पाल, अरविंद घोष इत्यादि देशभक्त त्यांना हरएक प्रकारें मनःपूर्वक साहाय्य करीत होते. त्यावेळीं मद्रासच्या समुद्रकिनाऱ्यावर बिपिनचंद्र पाल यांनीं दिलेलीं व्याख्यानें इंग्रजी भाषेचा व वक्तृत्वाचाच नव्हे, तर राजकीय तत्त्वज्ञानाचा एक उत्कृष्ट मासला म्हणून जतन करून ठेवण्यासारखीं आहेत. बंगाल्यांतील चळवळीचा पाठपुरावा लोकमान्यांनीं महाराष्ट्रांत व लाला लजपतराय यांनीं पंजाबांत अत्यंत धडाक्यानें केला. या कामीं लोकमान्यांना ज्या त्यांच्या अनुयायांची साथ मिळाली, त्यांमध्यें तात्यासाहेबांची गणना प्रमुखत्वानें करावयास हवी. त्या वेळेस "लाल-बाल-पाल" ही त्रयी सर्वतोमुखीं झालेली होती! या चळवळींतूनच एकीकडे त्या सुप्रसिद्ध चतुःसूत्रीचा व दुसरीकडे बॉम्बगोळ्याचा प्रादुर्भाव झाला! वरील त्रयीपैकीं लाला लजपतराय यांना गिरफदार करून त्यांची मंडालेच्या तुरुंगांत रवानगी करण्यांत आली होती. बिपिनचंद्र पाल, अरविंद घोष वगैरेंनीं चालविलेल्या "वंदे मातरम्" पत्रावर बंगालसरकारची वक्रदृष्टि झालेली होती. राहतां राहिले लोकमान्य. परंतु तेहि आतां फार दिवस बाहेर राहात नाहींत, असा अंदाज लोक बांधूं लागलेले होते. नवीन स्थापन झालेल्या जहाल पक्षाचें पुढारीपण लोकमान्यांकडे येऊन, जहाल व मवाळ यांच्यामध्यें चांगलीच खडाजंगी माजून राहिलेली होती, व तिचें पर्यवसान १९०७ची सुरतेची राष्ट्रीय सभा उधळण्यांत झालें! या कालांत तात्यासाहेब केसरी व मराठा पत्रांतून नूतन पक्षाच्या तत्त्वांचा प्रचार इतक्या समर्पक पद्धतीनें करीत होते कीं, या नूतन पक्षांत लोकमान्यांच्या खालोखाल त्या स्यांच्या पट्टशिष्यालाच मान दिला जात असे!

९. एकीकडे सरकाराशीं व दुसरीकडे नेमस्तांशीं असलेले संबंध ताणले

गेलेले असतांना, सन १९०८च्या एप्रिल महिन्यांत बंगाल्यांत मुझफरपूर येथें पहिला बॉंबगोळा उडाला! व त्याबरोबरच चोहोंकडे हाहाःकारहि उडाला! केसरीमधून याबद्दल व एकंदर राजकीय परिस्थितीबद्दल जे लेख प्रसिद्ध होत होते, त्यांपैकीं १२ मेच्या अंकांतील लेखाबद्दल लोकमान्यांवर राजद्रोहाचा खटला भरण्यांत येऊन त्यांना ता. २४ जून १९०८ रोजीं मुंबईच्या सरदारगृहांत गिरफदार करण्यांत आलें. खटल्याची प्राथमिक चौकशी मुंबईचे चीफ प्रे. मॅ. मि. ॲस्टन यांच्या-पुढें होऊन तो सेशनकमिट करण्यांत आला. ता. १३ जुलै रोजीं सेशन-मध्यें तो न्या. दावर यांच्या पुढें सुनावणीस निघाला. बुधवारच्या चार वाजे-पर्यंत फिर्यादी पक्षाचा पुरावा खलास झाला. नंतर लोकमान्यांनीं आपल्या बचावाच्या भाषणास सुरुवात केली. त्यांचें भाषण पुढील बुधवारपर्यंत झालें. त्याला सरकारी वकील ॲ. ब्रॅन्सन यांनीं उत्तर दिलें. न्या. दावर यांनीं पंचांपुढें खटल्याचा समारोप केल्यानंतर रात्रीं नऊ वाजून वीस मिनिटांनीं पंचांनीं आपला निकाल जाहीर केला. न्यायमूर्तींनीं लोक-मान्यांना सहा वर्षांची शिक्षा ठोठावली, व ती ठोठावतांना न्यायासनास न शोभतीलशीं मुक्ताफळें बाहेर काढलीं! परंतु गांठ लोकमान्यांशीं होती, एखाद्या लेच्यापेच्याशीं नव्हती, हें दावरसाहेब विसरले होतेसें दिसतें. न्याय-मूर्तींच्या तोंडून तीं मुक्ताफळें बाहेर पडतांच लोकमान्य ताडकन् आपल्या जागेवर उभे राहून त्यांनीं त्यांना असें खणखणीत उत्तर दिलें कीं, तें खरोखरच सोनेरी अक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखें आहे! जगाच्या इतिहासांत संकट-समयीं स्वयंस्फूर्तीनें देशभक्तांच्या तोंडून निघालेल्या वचनांपैकीं तें एक वचन निःसंशय आहे, व हिंदुस्थानचा भावी इतिहासकार त्या वचनाचा अत्यंत अभिमानानें व गौरवानें उल्लेख केल्यावांचून खात्रीनें रहाणार नाहीं.

१०. लोकमान्यांवरील या दुसऱ्या राजद्रोहाच्या खटल्यामुळें केसरी-मराठ्यावर मोठेंच गंडांतर आलें होतें. बॉंबगोळ्यामुळें सरकारची मनोवृत्ति भ्रमिष्टाप्रमाणें झाल्याकारणानें बंगाल्यांतील "युगांतर" पत्राप्रमाणें संपादका-मागें संपादक तुरुंगांत डांबून "केसरी"चीहि तीच गत होणार, असा सुमार उघड दिसत होता. त्यावेळीं सर्वांच्या तोंडीं याशिवाय दुसरा विषयच सहसा नसे. व आतां तात्यासाहेब करतात काय इकडे सर्वांचे डोळे लागून राहिलेले होते. व तात्यासाहेबांनींहि त्या वेळीं जें करावयाचें तेंच केलें. परंतु सरकार त्यांना स्वस्थ कोठचें बसूं देणार! टिळकांवरील खटल्यासंबंधानें मराठापत्रा-च्या ता. २६ जुलैच्या अंकांत तात्यासाहेबांनीं लेख लिहून त्यांत जी टीका

केली ती कोर्टाची बदनामी करणारी आहे, अशा आरोपावरून त्यांच्यावर खटला भरण्यांत आला. त्याची सुनावणी सर न्यायाधीश न्या. स्कॉट व न्या. बॅचलर यांच्यापुढें होऊन त्यांत त्यांना हजार रुपये दंड, दोनशें रुपये खर्चाचे, चौदा दिवसांची सजा, व पुढें कोर्टाची माफी मागेपर्यंत तुरुंगवास, अशी शिक्षा करण्यांत आली! तात्यासाहेबांच्या राजकीय चारित्र्यांतील सन १८९९ ते १९०८ हा कालावधि द्वितीय कालखंड होय!

११. सन १९०८ सालीं लोकमान्यांना शिक्षा होऊन त्यांची मंडालेला रवानगी झाली तेयपासून तों १९१४ सालीं ते सुटून परत येईपर्यंतच्या कालांत केसरी-मराठा पत्रांच्या संपादकत्वाच्या जबाबदाऱ्या अनेक पटींनी वाढलेल्या होत्या. राष्ट्रांत स्थापन झालेला नूतन पक्ष अद्याप प्रबळ न झालेला, राष्ट्रीय सभेचीं सूत्रें नेमस्तांच्या हातीं, सरकारनें धारण केलेला नारसिंह अवतार, लोकमान्यांच्या गैरहजिरींत त्यांचीं पत्रें व त्यांचा पक्ष अस्तित्वांत ठेवण्याची आवश्यकता, अशा परिस्थितींत संपादकत्वाची कामगिरी म्हणजे एकप्रकारें तारेवरचा नाचच होता! परंतु ती कामगिरी तात्यासाहेबांनीं व त्यांच्या मदतनिसांनीं अत्यंत उत्तम रीतीनें पार पाडली. या कालांत जहाल पक्ष राष्ट्रीय सभेपासून जरी फटकून राहिलेला होता, तरी तो दिवसेंदिवस वृद्धिंगतच होत होता. या कालांत तो पक्ष वरकांती जरी स्वस्थ बसलेला दिसत होता, तरी राष्ट्रीय सभेचीं सूत्रें आगेमागें आपल्या हातीं घेण्याचें कार्य त्यानें आंतून चालविलेलेंच होतें. टिळक परत येईपर्यंत त्यांच्या मतांचा प्रसार करावयाचा, नेमस्त वा इतर पक्ष यांच्याशीं टिळकांना जाचक होईलसा समेट करावयाचा नाहीं, टिळक परत आले कीं सर्व मैदान त्यांच्या हालचालींसाठीं खुलें ठेवावयाचें, हें तात्यासाहेबांनीं अंगीकारिलेलें धोरण यथायोग्य व हितकारक होतें, हें कोणासहि कबूल करावें लागेल. या कालांत तात्यासाहेबांच्या लेखणींतून उतरलेले कांहीं लेख सुवर्णाक्षरांत वसवून ठेवण्याच्या किंमतीचे आहेत. तात्यासाहेबांच्या राजकीय चारित्र्यांतील हा तृतीय कालखंड होय!

१२. मंडालेच्या तुरुंगांतून लोकमान्य सुटून आल्यापासून तों सन १९२० सालीं लोकमान्य दिवंगत होईपर्यंतचा काळ हिंदुस्थानच्या अर्वाचीन इतिहासांत अत्यंत महत्त्वाचा असा गणला पाहिजे. एखाद्या विजयी वीराप्रमाणें त्यांचा सर्वत्र व सर्वत्रांकडून जयजयकार होत असे. राजकारणांत त्यांचा शब्द वेदतुल्य असा मानला जात असे. या कालांत लोकमान्यांनीं अनेकविध

चळवळींची प्रेरणा राष्ट्रांत निर्माण केली. परंतु त्यांना सुसंघटित स्वरूप तात्यासाहेबांनींच प्राप्त करून दिलें. लोकमान्यांनीं जागजागीं राष्ट्रीय स्फूर्तीचे स्फुलिंग पेरावेत, व तात्यासाहेबांनीं त्यायोगें व्यवस्थितपणें तरुण अंतःकरणें चेतवून सोडावींत, असा जणूं काय एक क्रमच पडलेला होता! मवाळ पक्षाशीं झालेला समेट, किंवा राष्ट्रीय सभा काबीज करण्याविषयीं केलेले प्रयत्न, किंवा स्वराज्यसंघाची स्थापना व प्रसार, डेमोक्रॅटिक पार्टीची स्थापना व प्रसार, इंग्लंडांत गेलेलें राष्ट्रीय सभेचें शिष्टमंडळ वगैरे वगैरे अनेक चळवळींपैकीं कोणतीहि चळवळ घेतल्यास ती यशस्वी करण्यांत तात्यासाहेब हे लोकमान्यांचे केवळ उजवा हात होते! तात्यासाहेबांच्या साहाय्यावांचून त्या चळवळींना झाली इतकी यशःप्राप्ति झाली असती किंवा नाहीं, याबद्दल शंकाच वाटते. तात्यासाहेबांची ही योग्यता व कामगिरी ओळखूनच सन १९२०च्या सोलापूर येथील विसाव्या प्रांतिक परिषदेचें अध्यक्षस्थान त्यांना देण्यांत आलें. त्या स्थानावरून त्यांनीं संस्मरणीय असें अध्यक्षीय भाषण केलें! तात्यासाहेबांच्या राजकीय चारित्र्यांतील हा चतुर्थ कालखंड होय!

१३. सन १८९६ सालीं तात्यासाहेब लोकमान्यांना येऊन मिळाल्यापासून तों तहत लोकमान्य दिवंगत होईपर्यंत ते एका विशिष्ट विचारसरणीच्या वातावरणांत तयार होत होत एक कसलेले वीर बनलेले होते; आणि लोकमान्यांची आयुर्मर्यादा जर आणखी कांहीं वर्षे लांबली असती, तर हिंदी राजकारणाला निःसंशय निराळेंच वळण लागलें असतें. परंतु प्रभूच्या मनांतच जर तसें व्हावयाचें नव्हतें, तर त्याला कोण काय करणार! ता. १ ऑगस्ट १९२० रोजीं लोकमान्यांचा अंत झाला, व त्यामुळें त्यांनीं वाढविलेल्या पक्षावर एक प्रकारचा वज्राघातच झाला! पंजाबांतील सरकारी अत्याचारांमुळें लोकांचीं मनें अगोदरच संतप्त झालेलीं होतीं, आणि त्यांतच खिलाफतीचा प्रश्न उद्भवून सर्व मुसलमान समाज खवळल्यामुळें तुफानलेल्या समुद्राप्रमाणें हिंदी जनता उसळून गेलेली होती! अशा वेळेस कलकत्त्यास भरलेल्या राष्ट्रीय सभेच्या खास अधिवेशनांत महात्मा गांधींचा कार्यक्रम राष्ट्रीय सभेनें बहुमतानें मान्य केला. त्या कार्यक्रमांतील कांहीं बाबी जरी लोकमान्यांच्या परंपरेस व कार्यक्रमास अनुसरून होत्या, तरी कांहीं बाबी त्यास विरोधक किंबहुना मारक अशाहि होत्या. महात्माजींच्या कार्यक्रमांतील सकृद्दर्शनीं नवीन वाटणाऱ्या बाबी राजकारणांत नवीनच शिरलेल्या लोकांना जरी नवीनशा वाटत होत्या, तरी त्या वस्तुतः जुन्याच असून त्यांच्या बव्यावाईटपणा-

चा अनुभव लोकमान्यांच्या परंपरेतील कार्यकर्त्यांना आलेला असून त्या त्यांना शिळ्याच दिसत असल्यामुळें त्यांच्या मनावर महात्माजींच्या एकंदर कार्यक्रमाचा परिणाम विशेषसा झाला नाहीं !

१४. महात्माजी व त्यांचे अनुयायी झाले काय, किंवा लोकमान्य व त्यांचे अनुयायी झाले काय, दोघांच्या मनोवृत्तींमध्यें, ध्येयांमध्यें किंवा साधनांमध्यें विशेषसा फरक नव्हता व नाहीं. फरक जो कांहीं होता व आहे, तो कांहींशा तपशीलांमध्येंच. परंतु या तपशीलासंबंधानेंच महात्माजी व त्यांचे अनुयायी यांनीं दुराग्रह धरल्यामुळें, सन १९२१ सालीं जरी स्पष्टपणानें नव्हे, तरी १९२२ सालापासून मात्र उघडपणानें, राष्ट्रीय सभेमध्येंच दोन तट पडत चाललेले स्वच्छ दिसूं लागले. विशेषतः खादीचें अवास्तव स्तोम, कायदेमंडळें व शिक्षणसंस्था यांवरील बहिष्कार, आणि वकीलवर्गाची नाहक चालविलेली टवाळकी, यांवरून उभय पक्षांमध्यें अनेकदां रणें माजून राहिलीं. लोकमान्यांच्या शिकवणुकीत वाढलेल्या महाराष्ट्रांत व बंगाल्यांत महात्माजींचा कार्यक्रम कांहीं केल्या मूळ धरीना. महात्माजींच्या अनुयायांनीं तात्यासाहेब व त्यांचे स्नेही यांची नालस्ती करण्याची शिकस्त केली, व तात्यासाहेबांचा पक्ष हाणून पाडण्यासाठीं नाना क्लृप्त्या योजिल्या, परंतु व्यर्थ. राष्ट्रीय सभेनें नेमिलेल्या सिव्हिल डिसओबीडियन्स कमिटीपुढें झालेल्या साक्षींत तात्यासाहेबांनीं अत्यंत निर्भीडपणानें महात्माजींच्या कार्यक्रमांतील दोष व व्यंगें कमिटीपुढें मांडलीं. तीं मांडण्यांतील त्यांचा हेतु महात्माजींच्या सबंध कार्यक्रमास विरोध करण्याचा बिलकुल नसून, तो केवळ सर्वांगपूर्ण व सर्वांगसुंदर करण्याचाच होता ! तथापि, यावरोबर हेंहि लक्षांत धरावयास पाहिजे कीं, तात्यासाहेबांनीं एरवीं शांततेच्या काळीं आपले कितीहि मतभेद प्रदर्शित केलेले असले, किंबहुना प्रसंगीं महात्माजींस प्रत्यक्ष विरोधहि केलेला असला, तरी महात्माजी अगर राष्ट्रीय-सभा यांच्यावर एखादा प्रसंग गुदरल्याबरोबर किंवा महात्माजी व सरकार यांची लढत जुंपल्याबरोबर, तात्यासाहेब आपले सर्व मतभेद व विरोध बाजूस सारून महात्माजींच्या मदतीसाठीं तीराप्रमाणें धांवून गेलेले होते !

१५. सन १९२२ च्या डिसेंबरांत स्थापन झालेल्या स्वराज्य-पक्षाचें जनकत्व वास्तविकपणें तात्यासाहेबांनाच दिलें पाहिजे ! कै. पंडित मोतीलाल नेहरु, सी. आर. दास, इत्यादि पुढारी या कल्पनेस मागाहूनच येऊन मिळाले. पुढें स्वराज्य-पक्षानें सर्व हिंदुस्थानभर निवडणुकी लढवून त्यांमध्यें यश संपादन

पडलें. या अंतःकलहाचा परिणाम मात्र असा झाला कीं, लोकमान्यांच्या प्रतिसहकार–पक्षाचें पुनरुज्जीवन करण्यांत येऊन त्याच्यातर्फे ठिकठिकाणीं निवडणुकी लढविण्यांत आल्या. निवडणुकीचे वेळीं प्रतिसहकार–पक्षाच्या नांवाखालीं कांहीं स्वार्थलोलुप नादानांनीं आपला डाव साधून घेतला, हा त्या पक्षाचा अगर त्याच्या तत्त्वांचा दोष नसून तो निव्वळ त्या वेळच्या परिस्थितीचाच दोष होता! तात्यासाहेब पुन्हां असेंब्लीसाठीं उभे राहून त्यांत ते प्रचंड बहुमतानें निवडून आले.

१९. यानंतरच्या काळांत हिंदी राजकारणाचा वेग व आवेश अतिशय झपाट्याचा होऊं लागला. सायमन–कमिशनच्या बाबतींत ब्रिटिश सरकारनें हिंदी लोकांवर बहिष्कार घातल्यामुळें हिंदी लोकांनींहि सायमन–कमिशनवर बहिष्कार घालून टोल्यास टोला देण्याचें ठरविलें! या कामीं अर्थात् राष्ट्रीय सभेनें पुढाकार घेतलेला होता. सर्व मराठी प्रांतांतून हा बहिष्कार पूर्णपणें यशस्वी करण्याचें श्रेय राष्ट्रीय सभेंतील इतर पक्षांप्रमाणें प्रतिसहकार–पक्षाकडेहि होतें. या बहिष्काराच्या बाबतींत महाराष्ट्राचें पुढारीपण अर्थात् तात्यासाहेबांनीं स्वीकारिलेलें होतें.

२०. सन १९२८च्या कलकत्याच्या राष्ट्रीय सभेंत महात्माजी व बाबु सुभाषचंद्र बोस यांच्यामध्यें पूर्ण स्वातंत्र्याच्या ठरावासंबंधानें खडाजंगी माजून अखेर समेट झाला. महात्माजींच्या मागण्या कबूल करण्यासाठीं सरकारास एक वर्षाची मुदत देण्यांत आलेली होती. त्या मुदतींत सरकारनें त्या मान्य न केल्यामुळें लाहोरच्या राष्ट्रीय सभेंत पूर्ण स्वातंत्र्याचा ठराव पसार होऊन सार्वत्रिक सत्याग्रहाची मोहिम सुरू करण्याचें राष्ट्रीय सभेनें निश्चित केलें. त्याप्रमाणें महात्माजींनीं लवकरच मिठाचा सत्याग्रह सुरू केला. स्वातंत्र्यासाठीं सुरू केलेल्या या युद्धांत सामील होणें आपलें कर्तव्य होय असें जाणून तात्यासाहेबांनीं असेंब्लींतील आपल्या जागेचा राजीनामा तावडतोब पाठवून दिला, व लगेच पुण्यास येऊन सत्याग्रहासाठीं म्हणून आपल्या पक्षाची घटना केली. सन १९३० च्या एप्रिलच्या १९ तारखेस तात्यासाहेब, प्रस्तुत लेखक व दे. भ. बाबुराव गोखले असे तिघेजण तीन ठिकाणीं सत्याग्रह करण्यासाठीं पुण्याहून निघाले. तात्यासाहेबांनीं पेण येथें अतिशय मोठ्या प्रमाणावर मिठाचा सत्याग्रह केला; एवढेंच नव्हे तर त्यापुढें अनेक ठिकाणीं अनेक प्रकारचा सत्याग्रह केला. मरी त्यांच्यावर खटला करण्यांत आला नाहीं, हा कांहीं त्यांचा दोष नव्हे. परंतु तात्यासाहेबांवर खटला करण्यांत आला नाहीं, हें एकार्थी बरेंच

झालें, नाहींतर मराठी प्रांतांतून जंगल सत्याग्रहाला जो एवढा जोर चढला कीं, ज्यामुळें सर्व प्रांतांच्या अगोदर महाराष्ट्रप्रांतांतील राजकीय संस्था बेकायदेशीर ठरविणें सरकाराला भाग पडलें, तो खात्रीनें चढला नसता. आंदरकी बात ही होती. ती सर्वांना माहित नाहीं, त्याला तात्यासाहेब काय किंवा दुसरा तरी काय करणार ! तात्यासाहेबांच्या अनुयायांनीं सत्याग्रहाच्या मोहिमेंत अशा धडाक्यानें उडी घेतली कीं, त्यांपैकीं बहुतेक सर्वांना बरेच दिवस सरकारचा पाहुणचार खात बसावें लागलें ! कांहींजणांना तर छाती फाटून जाण्याइतक्या जबर शिक्षा मारण्यांत आल्या ! सन १९३० सालांतील तात्यासाहेबांची विशेष नजरेंत भरण्यासारखी आणखी कामीगरी म्हणजे सोलापूर येथील लष्करी कायद्याच्या अंमलबजावणीचें केसरींतून केलेलें आविष्करण, ही होय ! याबद्दलचे केसरींतील लेख म्हणजे तात्यांच्या सात्त्विक संतापाचें निव्वळ प्रतिबिंबच होतें ! त्या लेखांबद्दल त्यांच्यावर राजद्रोहाचा खटला खास होणार, असें प्रत्येकास वाटत होतें. परंतु अखेरीस तो अंदाज चुकीचा ठरला. परंतु याहिपेक्षां तात्यासाहेबांची अत्यंत महत्त्वाची कामगिरी म्हटली म्हणजे ता. १ ऑगस्ट १९३० रोजीं म्हणजे लोकमान्यांच्या पुण्यतिथीच्या दिवशीं त्यांनीं केलेला तीन लाखांचा ट्रस्ट ही होय ! चिरोलकेसच्या पायीं लोकमान्य सर्वस्वीं नागवलेले होते. त्या केसचा निकाल लोकमान्यांविरुद्ध झाल्यावर त्यांच्या चहात्यांनी व भक्तांनीं सुमारें तीन लाखांची थैली त्यांना अर्पण करून ऋणमुक्त केलें. ही रक्कम देणारांनीं लोकमान्यांना ती स्वतःसाठीं दिलेली असल्यामुळें ती परत करण्यांत येईल अशी त्यांची केव्हांहि अपेक्षा नव्हती. लोकमान्यांनीं तिचा जरी तात्पुरता स्वीकार केलेला होता, तरी ती केव्हांतरी परत करावी असा त्यांचा मनापासूनचा हेतु होता. परंतु थोड्याच अवधींत त्यांना मृत्यूनें गांठल्यामुळें तो त्यांना स्वतःला सिद्धीस नेतां आला नाहीं. परंतु त्यांच्यामागें तो सिद्धीस नेऊन लोकमान्यांना ऋणमुक्त केल्याशिवाय रहावयाचें नाहीं, असा तात्यासाहेबांनीं आपल्या मनाचा पक्का निर्धार करून तो त्यांनीं वरील ट्रस्टच्या रूपानें दहा वर्षांच्या अल्पशा काळांत तडीस नेला ! आपले पट्टशिष्य म्हणून समजले जाणारे बरेच सद्गृहस्थ भराभर आपल्यांशीं व आपल्या परंपरेशीं बेइमान होत चाललेले असतांना त्यांच्यापैकीं एक पट्टशिष्य तात्यासाहेब तरी क्षणिक मोहास किंवा लौकिकास बळी न पडतां आपली परंपरा अखंड व उज्ज्वल रीतीनें राखीत आहे हें अवलोकन करून लोकमान्यांचा आत्मा वर स्वर्गांत खास आनंदित झालेला असेल !

परंतु त्या पट्टशिष्यानें याहिपुढें मजल मारून आपणांस ऋणमुक्त केलें असल्याचें पाहून तर त्यांच्या आत्म्यानें खचित आनंदाश्रु ढाळले असतील! तात्यासाहेबांच्या ..तून आजवर अनेक सत्कृत्यें झालेलीं आहेत; परंतु हा तीन लाखांचा ट्रस्ट करून आपल्या गुरूला ऋणमुक्त केल्याचें हें सत्कृत्य कांहीं और आहे, यांत बिलकुल शंका नाहीं! असो. लोकमान्यांच्या निधनापासून तात्यासाहेबांच्या राजकीय आयुष्यांतील पांचव्या कालखंडास सुरुवात झाली आहे. देव करो, व तो संपण्यापूर्वी अशींच अनेक वर्षे लोटोत!

२१. सन १८९६ सालीं तात्यासाहेब केसरी–मराठा संस्थेस येऊन मिळाले तेव्हांपासून तों आतांपर्यंत ते मराठा पत्राचे वीस वर्षे व केसरीचे सतरा वर्षें संपादक होते; व दोन्ही पत्रांचे संपादक असे नऊ वर्षे होते. एक लोकमान्य वगळल्यास या संस्थेची कामगिरी इतक्या सोज्ज्वलपणानें व एकनिष्ठतेनें दुसऱ्या कोणत्याहि संपादकाच्या हातून झालेली नाहीं. किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं, इंग्लिश व देशी भाषा यांतून चाललेल्या वर्तमानपत्रांची सेवा एकसमयावच्छेदेंकरून केलेला दुसरा संपादक सऱ्या हिंदुस्थानांत आढळून येणें मुष्कीलीचें होईल! ता. १ जानेवारी १९३१ पासून तात्यासाहेबांनीं केसरीवरून जरी आपलें नांव काढून घेतलेलें असलें, तरीपण केसरी–मराठा संस्थेचे संचालक या नात्यानें केसरी–मराठा पत्रांवर त्यांची देखरेख सतत चालूच आहे, व त्यांचें मार्गदर्शकत्व त्या पत्रांच्या प्रस्तुत संपादकांना हरघडी अत्यंत हितकर व उपयुक्त होत असतें! संपादकत्वाच्या क्षेत्रांत तात्यासाहेब म्हणजे एक सव्यसाची वीर आहेत! इंग्रजी भाषेवरील त्यांचें प्रभुत्व सर्वप्रसिद्धच आहे; आणि मराठी भाषेवरील प्रभुत्वाविषयीं तर बोलावयासच नको! मराठी भाषेचे तर ते एक अनभिषिक्त सम्राटच आहेत!

२२. गेल्या तीस पस्तीस वर्षांत तात्यासाहेबांनीं केलेल्या राजकारणामधील फक्त कांहीं ठळक गोष्टींचाच निर्देश या लेखांत केलेला आहे, व स्थलसंकोचास्तव तसें करण्याशिवाय गत्यंतरच नव्हतें. त्यांवरून हें उघड दिसून येईल कीं, हिंदी राजकारणाच्या भिन्न भिन्न अवस्थांतून गेलेले, व प्रत्येक अवस्थेमध्यें विनीवर लढत असलेले, असले त्यांच्यासारखे राजकारणी पुरुष साऱ्या हिंदुस्थानांत हाताच्या बोटांवर मोजण्याइतके सांपडतील कीं नाहीं, याची वानवाच आहे. त्यांच्या अंगचे विशिष्ट गुण कीं, जे त्यांच्या सांनिध्यांत असलेल्या त्यांच्या स्नेहीसोबत्यांचीं मनें व अंतःकरणें काबीज करून टाकल्याशिवाय राहत नाहींत, तेच राजकारणांत त्यांना अनेकदां मारक झालेले आहेत. त्यांपैकीं एक गुण म्हणजे त्यांचा जाज्वल्य स्वाभिमान होय! हाच त्यांचा स्वाभिमान कितीदां तरी त्यांच्या कीर्तीच्या आड आलेला आहे! जेथें

तात्यासाहेबांनीं आपला स्वाभिमान खुद्द लोकमान्यांपुढेंहि रतिमात्र ढळूं दिला नाहीं, तेथें इतरांची कथा ती काय ? सन १९२० च्या पुढील कालांत जर त्यांनीं आपला स्वाभिमान थोड्या अंशानें एका बाजूस ठेविला असता, तर ते केव्हांच राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष झाले असते ! त्यांच्यापेक्षां किती तरी कमी दर्जाच्या परंतु धोरणी स्वभावाच्या इसमांनीं घटकाभर आपली बुद्धि व सदसद्विवेक दुसऱ्याकडे गहाण टाकून तो मान उपटला आहे ! व त्यानंतर सांधीकोंपऱ्यांत जाऊन पडलेले आहेत ! तात्यासाहेबांचा दुसरा गुण म्हणजे त्यांचा सारासार विचार होय ! राजकारणांत प्रवेश केल्यापासून तों आजतागाईत त्यांनीं स्वतःस करतां येत नाहीं अशी कोणतीहि गोष्ट करण्यास दुसऱ्यास उपदेशिलें नाहीं. गेल्या पस्तीस वर्षांच्या राजकारणांत वेळोवेळीं अनेक "द्वितीयपुरुषी देशभक्त" निर्माण होऊन कांहीं काल त्यांनीं आपल्या नांवाचा गाजावाजा केलेला होता. परंतु तात्यासाहेबांनीं मात्र तात्कालिक कीर्तीस हपापून असलें पातक कधींहि आपल्या हातून घडूं दिलें नाहीं, किंबहुना तसा त्यांचा स्वभावच नाहीं. तात्यासाहेब हे खरेखुरे "प्रथमपुरुषी देशभक्त" आहेत ! त्यांनीं आतांपर्यंत तेंच प्रतिपादिलें आहे कीं, जें ते स्वतः करूं शकले व शकतात ! तिसरा त्यांचा गुण म्हणजे त्यांची निर्भय वृत्ति ! परिणामाविषयीं बेफिकीर राहून सरकारवर जशी त्यांनीं निर्भय वृत्तीनें आजवर कडक टीका केलेली आहे, तशीच लोकपक्षीय पुढाऱ्यांवर करण्यासहि त्यांनीं मागें घेतलेलें नाहीं. तात्यासाहेबांच्या राजकारणांत मेघांचा गडगडाट व विजांचा चमचमाट कदाचित् नसेल; परंतु त्यांत गंगौघाचा गंभीर घोष व शुक्राच्या चांदणीचा तेजस्वीपणा निःसंशय होता व आहे ! सारांश, सर्व दृष्टींनीं विचार करतां, गेल्या शंभर वर्षांत महाराष्ट्रांत जे थोर पुरुष जन्मास आले, त्यांमध्यें तात्यासाहेबांची गणना अवश्य केली जाईल ! कित्येक थोर पुरुष असे आढळून येतात कीं, जे जिवंतपणीं लोकप्रियतेच्या शिखरावर पोहोंचून मरणोत्तर मात्र कालाच्या उदरांत गडप होऊन जातात ! परंतु तात्यासाहेब मात्र असे एक थोर पुरुष आहेत कीं, ज्यांच्या कीर्तीला कधीं ओहोटी म्हणून लागणार नाहीं, आणि ज्यांचें चारित्र्य भावि पिढ्यांना अत्यंत बोधप्रद व स्फूर्तिदायक असें बनेल ! अशा या थोर पुरुषाच्या वयाला साठ वर्षें पुरीं होऊन एकसष्टावें वर्ष लागलें म्हणून महाराष्ट्राला आनंद वाटून तो त्यानें परोपरीनें प्रदर्शित करावा, हें अगदीं साहजिक आहे. त्या जगन्नियंत्या परमेश्वरानें या थोर पुरुषाला उदंड आयुरारोग्य द्यावें अशी त्याच्या चरणांजवळ प्रार्थना करून हा बराच लांबलेला लेख आटोपता घेतों.

---

# १८. संपादक केळकर.

( श्री. श्रीपाद महादेव माटे, एम्. ए., पुणें. )

वर्तमानपत्रें आपल्या नांवाप्रमाणें केवळ वर्तमानेंच देत राहिलीं असतीं तर 'वर्तमानपत्रें' या संस्थेचा आज जो एवढा महिमा गाजत आहे, तो कधींहि गाजला नसता. बातम्या प्रसिद्ध करतां करतां आपलीं मतें त्यांच्याद्वारां फैलावण्याची कल्पना अगदीं मुळांत ज्या संपादकास पहिल्यानें सुचली, त्याचें नांव कोलंबसाहून जास्त प्रसिद्ध व्हावयास हवें होतें. 'न्यूजपेपर' हा 'व्ह्यूज-पेपर' ज्या दिवशीं झाला त्या दिवशीं आपली मनोमय साक्ष दुसऱ्याला नेऊन पोहोचविण्याची फार सुगम कला माणसाच्या जातीला प्राप्त झाली. आज जर अशी कल्पना केली कीं, वर्तमानपत्रांनीं केवळ बातम्याच छापावयाच्या, तर सर्व देशांतील सर्व समाज केवळ आंधळ्यासारखे बनून राहतील. आपण म्हणतों कीं, लोकमत असें आहे, लोकमत तसें आहे; पण यांतील निम्मा भाग खरा असतो व निम्मा खोटा असतो. वास्तविक पहातां आपणास जें घडवून आणावयास हवें असेल त्याचा प्रेरक व पोषक विचार कोणीतरी कांहीं काळपर्यंत कां होईना पण तटस्थपणानें, वर्तमानपत्राच्या द्वारां जन-मनांत पेरत रहातो; कांहीं दिवसांनीं तेंच लोकमत होतें. अर्थात् हेंहि खरें आहे कीं, लोकमत सामान्यतःकरून काय असेल त्याची परिस्फुटता सुद्धां संपादकलोक आपल्या पत्राच्याच द्वारां करतात. पण 'वर्तमानपत्रें' या संस्थेचा उपयोग केवळ लोकमत काय आहे हें व्यक्त करण्यापुरताच राहिला असता, तर त्याला आजचें वैभव प्राप्त झालें नसतें. त्याला जें वैभव प्राप्त झालें आहे तें जसें बातमी प्रसिद्ध करण्यामुळें नव्हे, तसेंच लोकमत व्यक्त करण्या-मुळेंहि नव्हे; तर मतप्रसार करण्याकडे त्याचा जो उपयोग होत आहे, त्यामुळें होय. हें प्रसार्य मत मात्र कांहीं थोड्या शहाण्यांचेंच असतें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे लोकांच्या भावना सांगणें म्हणजे लोकमत व्यक्त करणें होय व लोकांना शहाणपण शिकविणें म्हणजे मतप्रसार होय. हें उत्तरोक्त काम वर्तमानपत्रें करतात व म्हणून त्यांस आजचें वैभव प्राप्त झालें आहे. ज्या देशांत राजा व प्रजा यांच्यांत बेबनाव असतो तेथें 'वर्तमानपत्रें' या संस्थेच्या जीवितहेतूच्या या ज्या दोन शाखा त्यांची अदलाबदल राजा व प्रजा, यादोघांच्या वेळीं, आपापल्या सोयीस अनुसरून मोठ्या गमतीनें करीत असतात. लोकांच्या मनांत राजविरुद्ध जें चेतवावयाचें असेल तें एकादा

संपादक आपल्या पत्रांत बेलाशक सांगूं लागतो व राजांच्या अवकृपेची घोरपड गळ्यांत येऊं लागली म्हणजे जोरजोरानें सांगतो कीं, "यांत माझें स्वतःचें काय आहे ? हें केवळ लोकमत आहे; सरकारास जर लोकमत दडपून टाकावयाचें असेल तर त्यानें खुशाल टाकावें." अशी वर्तमानपत्रांच्या किंचित् केलेल्या हेतुविपर्यासावर रचलेली शापवाणी तो उद्गारतो ! उलटपक्षीं सरकारास जेव्हां खरोखरीचें लोकमत काय आहे हेंहि प्रकट झालेलें ऐकावयास नको असतें त्या वेळेस सरसकट जनसमूहाचें हेंच मत आहे हें माहीत असून सुद्धां सरकार संपादकाच्या अंगीं लावतें कीं, "हीं भुतें तूंच उठवतो आहेस. लोकांचें मत असें नाहीं; तूंच त्यांच्या चित्तांत विकल्प उत्पन्न करतोस." याहि कामीं वर उल्लेखिलेल्या हेतुविपर्यासावरच सरकारची दरडावणी आधारलेली असते. बरें, परस्परांस या परस्परांच्या हिकमती माहीत नसतात असें नाहीं; आणि म्हणून आंतली खूण दोघांनाहि पटलेली असल्यामुळें उभयतांहि प्रसंगविशेषीं उंच तत्त्वज्ञानांचा आश्रय घेतात व आपापली बाजू कशी सत्वभावावर रचलेली आहे हें सिद्ध करून देतात. हें सर्व जरी खरें असलें तरी राजपक्ष हा नेहमीं अधिकारप्रिय असल्यामुळें आणि प्रजापक्ष हा हरतऱ्हेच्या स्वातंत्र्याचा हव्यासी असल्यामुळें बहुधा असें दिसून येतें कीं, प्रजापक्षाच्या अंगास न्यायाचा कांटा जास्त झुकलेला असतो. अर्थात् ज्या देशांत नवें मत सांगावयास हवें असेल, जेथील लोकांना आपल्या जीविताच्या हीनत्वाची ओळख करून द्यावयाची असेल, म्हणजे लोकमतांत कांहीं नवीन चैतन्याचा उद्भव करणें असेल तेथें 'वर्तमानपत्रें' या संस्थेचा केवढा त्वरित उपाय होतो, हें देशोदेशींच्या इतिहासावरून आजवर स्पष्ट झालेलें आहे. हें जें उदयोन्मुख अशा युरोपांतील देशांत घडून आलेलें होतें तेंच हिंदुस्थानांत गेल्या शतकांत सुरू झालें. प्रांतोप्रांतीं, कांहीं गूढस्थ अभिप्राय ज्या वरकरणी तटस्थ वृत्तीच्या माणसांच्या मनांत देशभर फैलवून द्यावयाचे होते, त्यांनीं वर्तमानपत्र हें शस्त्र हातीं घेतलें आणि तें इतक्या कुशलतेनें चालविलें कीं, त्याच्या धारेचा तिखटपणा सहजासहजी ध्यानांतच येऊं नये. असे जे कोणी मोठे मसलतबाज, हुन्नरी, साहसी पण दूरान्देशी गृहस्थ अव्वल इंग्रजींत या देशांत जन्मले त्यांत कै. लोकमान्य बाळ गंगाधर टिळक हे केवळ अग्रगण्य होत. त्यांच्यासंबंधीचा सविस्तर विचार या ठिकाणीं कर्तव्य नाहीं; परंतु त्यांनीं चालू केलेली जी नवीन विचारांची प्रणालि ती या महाराष्ट्रदेशांत 'केसरी' च्या द्वारां अशा वेगानें वाहूं लागली कीं, लोक केवळ

हरखूनच गेले. लोकमताचें प्रदर्शन करणें व लोकांच्या मनावर नवीन विचार आरूढ करणें हीं दोनहि कामें इतक्या ईर्षेनें चालूं झालीं कीं, लोक म्हणजेच 'केसरी' व 'केसरी' म्हणजेच लोक, अशी साक्ष परस्परांनीं परस्परांस द्यावी. याबरोबरच विद्या, कलाकौशल्य, शास्त्र, संशोधन इत्यादि गंभीर विषयांचें विवेचनहि 'केसरी' च्या पाटांतून वहात राहूं लागलें. यामुळें गतवैभवानें शून्यमन झालेल्या भावड्या लोकांपासून, नवीन विचारांचे अंकुर ज्यांच्या मनांत उद्भवत आहेत, त्यांच्या अंगावरून तों तहत विद्याभिलाषी व केवळ शास्त्रनिरत अशा पंडितांपर्यंत सुद्धां 'केसरी' पत्राची भूमिका रुंदावत गेली. हें वैभव 'केसरी' ला प्राप्त झाल्यामुळें जीं विविध वृत्तीचीं लक्षावधि माणसें 'केसरी' कडे आकृष्ट झालीं त्यांत बहुतेक वाचक म्हणून, कांहीं थोडे लेखक म्हणून व दोन हुशार व तरतरीत पदवीधर 'केसरी' चें आत्मीयत्व मानावयास तयार म्हणून. हे दोघे म्हणजे रा. नरसिंह चिंतामण केळकर व रा. कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर हे होत. 'केसरी' चें आत्मीयत्व मानावयाचें हा कांहीं सुखाचा सवदा नव्हता. आज तरुण विद्यार्थी तुरुंगांत धडाधड उड्या टाकतांना पाहून जनतेला त्यांच्या संबंधानें ज्याप्रमाणें आदर व प्रीति उत्पन्न होते, त्याचप्रमाणें त्याहि वेळीं या उमेदवार पदवीधरांसंबंधानें जनमनांत ती उत्पन्न झाली असेल. "पुष्कळ लिहावयास व वाचावयास सांपडावें म्हणून मी केसरी-संस्थेंत प्रविष्ट झालों" असें एक केळकरांचें वाक्य बरेंच चलन पावलें आहे. पण संभाषणांत सहजासहजीं प्रकट झालेलें एकादें वचन परमार्थानें घेणें ही घडलेल्या गोष्टींचे अर्थ लावावयास बसलेल्या माणसांच्या दृष्टीनें तरी, चूकच आहे. पुष्कळ लिहावयास सांपडेल व आपली हौस तृप्त होईल हें जेव्हां केळकर यांस वाटलें तेव्हांच सरकारी अवकृपेचा, कोपऱ्यांत झांकून ठेवलेला वडगा त्यांस कल्पनेनें दिसला नसेल असें म्हणवत नाहीं. असो. एकदां या संस्थेंत प्रविष्ट झाल्यावर केळकर यांच्या मनाचा व्याप पुष्कळच वाढूं लागला. *थोरांची संगत खरी, पण थोरांच्या संगतींत वागणारे अनेक मृत्पिंड आपल्याला* आजवर माहीत झाले आहेत. थोरांच्या संगतीला ज्यांना जात्र देतां येत नाहीं किंवा तिच्या प्रकाशांत वावरत आहेत तोंपर्यंतच जे प्रकाशमान, असे शेंकडों लोक राजकीय रणक्षेत्रांत विखुरलेले सर्वत्र दिसतात. पण केळकरांचें खरें बळ टिळकांपासून घेतलेल्या उसनवारींत नव्हतें. स्वतंत्रपणें पुष्कळ वाटणें, पुष्कळ कळणें आणि कळत असलेलें दुसऱ्यास कळवून देण्याची स्वतंत्र धमक वाळगणें या गोष्टी केळकरांच्या स्वतःच्या होत आणि म्हणूनच टिळकांसारख्यांच्या

धामधुमीस, हुन्नरांस आणि नित्याच्या धबडग्यास केळकर पुरून उरले. केवळ सांगकाम्या माणूस धन्याला अपुरा वाटतो. हें लिहीं म्हटलें म्हणजे तें लिहावयाचें व कदाचित् चांगलेंहि लिहावयाचें, असलें सांगकामें वळण पत्करून वर्तमानपत्राचा घाणा फिरविण्याचें काम टिळकांनींच म्हटल्याप्रमाणें अनेक 'लेखणीबहाद्दरां'नीं आजवर केलेलें आहे. पण गुरूनें एक तऱ्हेनें सांगितलें असतां तेंच प्रमेय जो शिष्य तीन तऱ्हांनीं वठवून दाखवितो, कदाचित् गुरूच्या मनावकाशांत न आलेला असाहि एखादा मनोज्ञ विचार प्रतिपादनासाठीं आणून उभा करतो, त्या शिष्याबद्दल गुरूला केवढी आवड उत्पन्न होईल व कदाचित् मनांत आदरसुद्धां वाटूं लागेल हें सहज ओळखतां येण्यासारखें आहे. कांहीं लोकांना, कीं जे मनांतून केळकर यांना अवहेलितात व ज्यांना मागील इतिहास पाहण्याची दगदग नको असते, त्यांना असा एक प्रश्न पडतो कीं, लोकमान्यांनीं आपला वारसा केळकर यांजकडे कां द्यावा! हा प्रश्न त्यांच्या मनांत उपस्थित होतो यावरून दोन गोष्टींचा खुलासा होतो. एक त्यांना केळकरांच्या चरित्राची पुरी ओळख झाली नाहीं व दुसरी म्हणजे त्यांना टिळक यांचीहि पुरती ओळख झाली नाहीं. या लोकांनीं असा शेरा देणें म्हणजे खुद्द टिळकांच्यावरच तारतम्यशून्यतेबद्दल हात उगारणें होय. असो. प्रस्तुत ठिकाणीं केळकरांचा चरित्रक्रम न्याहळत न्याहळत पुढें जावयाचें योजिलेलें नाहीं, म्हणून खंडशः त्यांच्या संपादकत्वाची पहाणीहि व्हावयाची नाहीं. पण त्यांच्या संपादकीय चारित्र्यांत जे कांहीं ठळक विशेष दिसतात किंवा उद्भवलेले प्रसंग नजरेस येतात, त्यांविषयीं मात्र थोडें थोडें लिहावयाचें आहे.

लोकाला देशभक्त बनविणारा मनुष्य जसा स्वतः देशभक्त असावा लागतो, तसा लोकाला शहाणें करावयास सिद्ध झालेला मनुष्य स्वतः शहाणा म्हणजे ज्ञानशील असावा लागतो. त्याला ज्ञानाची लालसा उपजतच असावी लागते. लोकांसाठीं आपण मुद्दाम ज्ञानें पैदा करावयास हवीं व मग तीं त्याजपुढें पसरून मांडावयाचे कष्ट करावयास हवे, असा पेशा ज्यानें मनांतून पत्करिला त्याच्यानें हा ज्ञानदानाचा उद्योग उरकावयाचा नाहीं. ती एक वेठ आहे, असें त्यास वाटूं लागेल; मग तो हळूं हळूं कुचराई करूं लागेल; व शेवटीं मधुकरवृत्तीनें जमा केलेलें ज्ञान वाचकांपुढें मांडावयाच्या ऐवजीं केवळ आपलेंच चार कल्पितें तो त्यांजपुढें मांडील व कांहीं वेळ आपण मोठे. स्वतंत्र विचार प्रसवणारे आहों अशी खोटीच ऐट भोगील. परंतु ही गोष्ट कधीं यशाला जावयाची नाहीं. म्हणून

संपादकाला ज्ञानार्जनाची हौस जवळजवळ दुर्निवार्यच असावयास हवी, व हें ज्ञानार्जन करीत असतां जमा केलेलीं ज्ञानें आपल्या प्रतिभेंत मिसळून तीं वाचकांपुढें मांडण्याची हौसहि त्याला तितकीच बलवत्तर असली पाहिजे. नित्यशः हजारों विषय उपस्थित होत आहेत. छापण्याची कला व बातमी पोहोंचविण्याचीं साधनें यांच्या झपाट्यानें होत असलेल्या प्रसारामुळें पृथ्वीच्या पाठीवर जें कांहीं होत असेल तें रोजच्या रोज पोतीं भरभरून पोष्टाचा शिपाई वर्तमानपत्राच्या कचेरींत आणून ओतीत असतो. हें सगळें वाचून•पाहून आत्मसात् करून केवळ त्यांतच दंग न रहातां त्यांतील चांगले चांगले भाग आपल्या वाचकांना पोहोंचविले पाहिजेत ही ईर्षा संपादकाला अवश्य हवी. आवडत्या शिष्यांपुढें जसें शिक्षकाला आपलें ज्ञान कधीं चोरून ठेवावेंसें वाटत नाहीं किंवा मांडीवर घेतलेल्या मुलापासून आई ज्याप्रमाणें आपला पान्हा चोरीत नाहीं त्याप्रमाणेंच आपलें कर्तव्य जाणणाऱ्या संपादकाला ज्ञान कधींहि दडवून ठेवतां येत नाहीं. अर्जन व दान ही जोडी फोडून चालावयाचें नाहीं. श्रीमंत झालेला कवडीचुंबक जसा एक पैशावर जिवंतपणींच बसलेला भुजंग बनतो, तसाच विद्वान् सुद्धां दातृत्वाच्या अभावीं स्वंय करीत बसलेल्या ऐदी जनावराप्रमाणें असतो. म्हणून संपादकाच्या अंगीं वरील दोनही गुण अवश्य असावयास हवेत. हें लिहिणें सामान्यतः संपादकांविषयीं लिहिलें आहे खरें, पण केळकरांचें उदाहरणच मनांत बाळगून हें लिहिलें आहे हें वाचकांच्या सहज ध्यानांत येईल. ' शहाणें करून सोडावें, सकल जनां ' हें जें संपादकाचें काम त्याचा केळकर हे सर्वोत्तम नमुना आहेत, असें म्हणावयास कांहींच हरकत नाहीं. प्रायः असा एकहि विषय नसेल कीं जो सार्वजनिक स्वरूपांत आला आहे आणि ज्याची चर्चा 'केसरी'च्या रकान्यांत केळकरांनीं मोठ्या विदग्धपणें केली नाहीं. मागें एकदां 'केसरी'च्या कामगिरीविषयीं लिहिण्याचा प्रसंग आलेला होता. तेव्हां 'केसरी'तील मजकुराचें विविधत्व व त्यांतील प्रतिपादनाचा अधिकार यांविषयीं लिहिलेंच आहे. परंतु त्यांतील निम्याहून अधिक भाग केळकर यांच्या ज्ञानार्जनाच्या कष्टामुळें व ज्ञानदानाच्या हौसेमुळें 'केसरी'स प्राप्त झाला असें म्हणावयास कांहींच हरकत नाहीं. कोणाहि चोकस वाचकानें 'केसरी'चीं फायलें किंवा तात्यासाहेब यांच्या लेखांचीं नुसतीं शीर्षकेंच वाचून पहावीं. म्हणजे त्याच्या ध्यानांत येईल कीं, केळकरांच्या अभिरुचीला न रुचेल असें सहसा कांहींच असत नाहीं व त्यांच्या बुद्धीच्या पल्ल्याला गांठवत नाहीं असेंहि सहसा कांहींच असत नाहीं. यामुळें असें झालें कीं,

वर्तमानपत्र असावें तर 'केसरी' सारखें असावें असें ठरून गेलें. पुष्कळांना असें वाटतें कीं, केवळ टिळकांच्या आवेशयुक्त प्रतिपादनामुळें आणि चढाईच्या धोरणामुळें 'केसरी'ला हें सर्व वैभव प्राप्त झालें; पण हें खरें नाहीं. प्राप्तीचा म्हणजे श्रेयाचा अर्धा वांटा केळकरांच्या ज्ञानलालसेस व ज्ञानदानाच्या हौसेस अवश्य दिला पाहिजे. आपण शहाणे केलेले वाचक नेहमीं आपलीच परीक्षा करूं लागतात, हेंहि संपादकाला हळूंहळूं दिसूं लागतें आणि म्हणून ज्यांची भूक आपण जागी करून ठेवितो व अमुक एका खुराकाची संवय लावतो त्यांच्या पुढें योग्य तो तो मजकूर ठेवण्याची जबाबदारी दिवसानुदिवस वाढतच जाते. ही जबाबदारी जर पार पाडतां येईना तर लोक म्हणतात, "पहिल्यापहिल्यानें यानें थोडी दुरटूर केली, थोडें अंगहि हालविलें, पण आतां प्रकरण थोडें आळसावल्यासारखें दिसतें." मौज अशी आहे कीं, वाचकांच्या ठिकाणीं क्षुद्बोध उत्पन्न करणें व त्यास अमुक एक तऱ्हेचा खुराक मला देतां येतो हें दाखविणें हीं कामें केळकर यांनीं आपल्या ऐन पंचविशींत जीं चालू केलीं तीं ते सतत ३६ वर्षें उत्तम रीतीनें बजावीत आहेत; इतकेंच नव्हे तर वाचकवर्ग जों जों अधिकाधिक हव्यासी व अधिकाधिक चौकस बनत चालला आहे तों तों केळकरांच्या शक्तिहि प्रगल्भतर होत चालल्या आहेत. आणि त्यांच्याशीं ज्यांचा अल्पहि परिचय आहे त्यांना हें चांगलें माहीत आहे कीं, नवीन नवीन उत्पन्न होणाऱ्या प्रश्नांची माहिती करून घेण्याच्या कामीं ते विलक्षण तत्परता दाखवितात. पुष्कळदां असें होतें कीं, संपादकाच्या आवडी नावडी वयानुरूप अगदीं आळून जातात. नव्यानव्या प्रश्नांविषयीं त्याला सहानुभूतीचा पाझरच फुटत नाहीं. इतकेंच नव्हे तर त्यांबद्दल तिरस्कार उत्पन्न होऊं लागतो. एकाद्या गवयाच्या ठराविक तानांप्रमाणें त्याच्या विचारांना ठराविक वळण लागते व नित्याच्या धबडग्यामुळें तो इतका किटून व आंबून जातो कीं, शेवटीं त्याचा स्वभाव कोंझा व मन कुढें होऊं लागतें; व थोडींशीं वर्षें कुस्तींत गेल्यावर जसा एकादा चाळका वस्ताद फडाच्या कांठावर बसूं लागतो, तसा हा संपादक आपण केलें सवरलेलें असें वैभव भोगीत होतकरू लेखकांकडे तिरस्कारानें पहात समाजांत वावरूं लागतो. पण आज साठ वर्षांच्या वयाला सुद्धां, तात्यासाहेब यांच्या अंगांत नवीन ज्ञानराशि लुटण्याची आणि ती आपल्या वाचकांना पोहोंचविण्याची जी तरतरी व उमेद दिसून येते ती पाहून उमेदवार संपादकांनीं सुद्धां मनांत खजील व्हावें असें आहे. पुष्कळदां मुख्य संपादकलोक फैलावयाच्या विषयांचें श्रमविभागाच्या तत्त्वावर वर्गी-

दोन साधनांचा अवलंब करणाऱ्या लेखकांची होय. आपणच रडून किंवा आपण हसून दुसऱ्यास रडविण्याची व हसविण्याची विद्या पुष्कळांनीं संपादलेली असते. त्यांतलाच हा प्रकार आहे. या दोन साधनांचा उपयोग आपल्या लेखनाच्या यशासाठीं केळकरांनीं मुद्दाम करावयाचा म्हणून केलेला नाहीं. जेथें यदृच्छेनें झाला तेथें होऊं दिला. पण त्यांनीं आपलें लिहिणें वाचकाला जें एवढें प्रिय बनविलें आहे तें इतर निराळ्या साधनांनीं. पैकीं विचारसौष्ठव हें एक अत्यंत प्रबळ साधन होय. केळकर यांची प्रतिभा अत्यंत उज्ज्वल असल्यामुळें तापलेल्या जमिनीवर पर्जन्य सुरू झाला म्हणजे जसे लक्षावधि नवेनवे कोंब भूमींतून बाहेर येतात, तसे अनेक सुंदर विचार व सुंदर कल्पना लेखनाच्या वेळीं त्यांना भराभर सुचत जातात असें दिसतें. वाचतांना थोडया थोडया अवकाशानंतर नवीन नवीन विचार वाटेनें भेटले तर वाचकाला मोठा आल्हाद होतो आणि त्याला वाचन मोठें सुखाचें वाटूं लागतें. तात्यासाहेब यांचें कोणतेंहि लिखाण घ्या. मनाला आल्हाद देणारे असे विचार एकामागून एक किती तरी भेटतात. विचार नुसते नवीन असून चालत नाहीं. ते मनोज्ञ असावे लागतात; तरच आल्हाद उत्पन्न होतो. बेसूर आणि आक्राळविक्राळ रूपाचे, वाचकाला दचकविणारे असे विचार सुद्धां पुष्कळदा नवेच असतात. पण त्यांनीं वाचक हैराण होतो. केळकर यांच्या लिहिण्यांत तसा प्रकार बिलकुल नाहीं. याचें कारण तरी असें आहे कीं, भडक किंवा एकांतिकपणामुळें मनाला जाचणी उत्पन्न करणारे असे विचार त्यांना सुचतच नसतील असें नव्हे. तर ते सुचल्याबरोबर त्यांची जी सूक्ष्म विवेकशक्ति तिच्या कह्यांत हे विचार ते आणून सोडतात. आणि मग त्यांना योग्य तें रूप देऊन ते वाचकांपुढें मांडतात. विचारांतील अतिशयोक्तीनें आपली प्रतिभा उज्ज्वल असल्याचा आणि कल्पनाशक्ति बेछूट असल्याचा गौरव प्राप्त करून घेणें ही गोष्ट पुष्कळांना साधण्यासारखी असते. पण माणसाचें खरें बळ आपल्या कल्पनेची वावटळ बनविण्यांत नाहीं; किंवा स्वतंत्रपण सिद्ध करण्यासाठीं विचारांत पाखंड उत्पन्न करण्यात नाहीं; तर उच्छृंखल कल्पना आणि पाखंडी विचार हे तारतम्य-कसोटीस लावून समाजापुढें मांडण्यांत आहे. असें केल्यानें विचाराचा नवीनपणा नष्ट होतो किंवा कल्पनेचा खेळकरपणा जातो असें मानावयाचें मुळींच कारण नाहीं.

आतां तात्यासाहेब यांनीं आपल्या वाङ्मयांत केवळ स्वतःचेच विचार सांगितले आहेत असेंहि नाहीं; आणि कोणाहि लेखकाला केवळ स्वतः-

करण करतात व हाताखालील माणसांना तीं तीं कामें वांटून देऊन आपण केवळ देखरेखनविसाची भूमिका पत्करून रहातात. केळकर यांनीं हेंहि केलें नाहीं. कोणी तीं तीं कामें केलीं तर ठीकच आहे नाहींतर केळकर हे नवीन उमेदीनें त्या त्या विषयाचा फन्ना पाडावयास तत्परच असतात. फार काय सांगावें 'केसरी'च्या संपादकत्वाचा गंभीर दर्जा त्यांना प्राप्त झाल्यावरहि एकाद्या महत्त्वाच्या प्रसंगीं केवळ बातमीदाराचा पेशा पत्करूनहि बातमीदार लोकांत बसून टिपणें घेत असतांना त्यांना लोकांनीं पाहिलेलें आहे ! 'माझें हें पत्र अपुरें तर पडणार नाहीं ना !—' ही विवंचना चित्तांत अखंड वागत असल्याशिवाय वरील प्रकारचीं कामें कोणाच्याहि हातून व्हावयाचीं नाहींत. हें सर्व शिक्षण त्यांनीं आपलें आपणच घेतलें आहे. आणि ' मीचि मज व्यालों, पोटा आपुलिया आलों ' हा परमार्थविवेकांतील तुकारामबोवांचा अनुभव, तात्यासाहेबांनीं, आपल्या अंगीकारलेल्या पेशाच्या बाबतींत, प्राप्त करून घेतला आहे. म्हणूनच, " मला आपल्या हाताखालीं संपादकत्वाचें शिक्षण द्याल काय ! " असें कोणीं गृहस्थानें टिळक यांस विचारलें असतां, केळकरांचा उल्लेख करून ते म्हणाले, "आमच्या तात्यांना कोणीं शिकविलें आहे ? ते आपले आपणच तयार होत गेले आहेत. " गुरूनें खुषीनें द्यावा व शिष्यानें आवडीनें पत्करावा, असाच हा अभिप्राय आहे. असेंच कोणासहि वाटेल.

दान खरें पण तें जर रोडावलेल्या आणि रक्तक्षय झालेल्या हातानें झालें तर घेणारासहि कसेंसेंच वाटतें. केळकर यांची दानपद्धति अत्यंत भरदार, गोंडस आणि रसरशीत अशी असते. कडू गोळ्या साखरेंतून देणें किंवा विषारी द्रव्यें मारून देणें अशासारखे कांहीं अलंकार प्रतिपादनाच्या वर्णनांत करण्याची वहिवाट आहे. पण त्यांचेंहि येथें कारण नाहीं. केळकर यांच्या लिहिण्याची सर्व भूमिका स्वदेशप्रेम व आपल्या संस्कृतीची आवड यांवर स्थिर असल्यामुळें त्यांच्या लिहिण्याला आपोआपच स्वीकार्यता प्राप्त होते. अर्थात् हा तोडगा अनेकांनीं करून पाहिला आहे व त्याच्या बळावर आपल्या लिहिण्याचीं खंडोगणती पानें वाचकांना चारलीं आहेत. पण केवळ याच बळावर जो लेखक विश्वसतो, तो लेखनकौशल्यांतील अगदीं शेवटच्या साधनांचा अवलंब करतो असें म्हणावेंसें वाटतें. एकादें नाटक जसें रामकृष्णावरच रचावें आणि मग तें प्रेक्षकांना आवडल्याचें श्रेय नाटककर्त्यानें उपटावें किंवा हरदासबुवांनीं जशी हरिश्चंद्राची कथा लावावी आणि आपली वाणी म्हणजे करुणरसाची मोठी उतारपेठ आहे अशी अहंता भोगावी, तशीच गत वरील

दोन साधनांचा अवलंब करणाऱ्या लेखकांची होय. आपणच रडून किंवा आपण हंसून दुसऱ्यास रडविण्याची व हंसविण्याची विद्या पुष्कळांनीं संपादलेली असते. त्यांतलाच हा प्रकार आहे. या दोन साधनांचा उपयोग आपल्या लेखनाच्या यशासाठीं केळकरांनीं मुद्दाम करावयाचा म्हणून केलेला नाहीं. जेथें यदृच्छेनें झाला तेथें होऊं दिला. पण त्यांनीं आपलें लिहिणें वाचकाला जें एवढें प्रिय बनविलें आहे तें इतर निराळ्या साधनांनीं. पैकीं विचारसौष्ठव हें एक अत्यंत प्रबळ साधन होय. केळकर यांची प्रतिमा अत्यंत उज्ज्वल असल्यामुळें तापलेल्या जमिनीवर पर्जन्य सुरू झाला म्हणजे जसे लक्षावधि नवेनवे कोंब भूमींतून बाहेर येतात, तसे अनेक सुंदर विचार व सुंदर कल्पना लेखनाच्या वेळीं त्यांना भराभर सुचत जातात असें दिसतें. वाचतांना थोड्या थोड्या अवकाशानंतर नवीन नवीन विचार वाटेनें भेटले तर वाचकाला मोठा आल्हाद होतो आणि त्याला वाचन मोठें सुखाचें वाटूं लागतें. तात्यासाहेब यांचें कोणतेंहि लिखाण घ्या. मनाला आल्हाद देणारे असे विचार एकामागून एक किती तरी भेटतात. विचार नुसते नवीन असून चालत नाहीं. ते मनोज्ञ असावे लागतात; तरच आल्हाद उत्पन्न होतो. भेसूर आणि आक्राळ विक्राळ रूपाचे, वाचकाला दचकविणारे असे विचार सुद्धां पुष्कळदा नवेच असतात. पण त्यांनीं वाचक हैराण होतो. केळकर यांच्या लिहिण्यांत तसा प्रकार बिलकुल नाहीं. याचें कारण तरी असें आहे कीं, भडक किंवा एकांतिकपणामुळें मनाला जाचणी उत्पन्न करणारे असे विचार त्यांना सुचतच नसतील असें नव्हे. तर ते सुचल्याबरोबर त्यांची जी सूक्ष्म विवेकशक्ति तिच्या कक्षांत हे विचार ते आणून सोडतात. आणि मग त्यांना योग्य तें रूप देऊन ते वाचकांपुढें मांडतात. विचारांतील अतिशयोक्तीनें आपली प्रतिभा उज्ज्वल असल्याचा आणि कल्पनाशक्ति बेछूट असल्याचा गौरव प्राप्त करून घेणें ही गोष्ट पुष्कळांना साधण्यासारखी असते. पण माणसाचें खरें बळ आपल्या कल्पनेची वावटळ बनविण्यांत नाहीं; किंवा स्वतंत्रपण सिद्ध करण्यासाठीं विचारांत पाखंड उत्पन्न करण्यात नाहीं; तर उच्छृंखल कल्पना आणि पाखंडी विचार हे तारतम्य-कसोटीस लावून समाजापुढें मांडण्यांत आहे. असें केल्यानें विचाराचा नवीनपणा नष्ट होतो किंवा कल्पनेचा खेळकरपणा जातो असें मानावयाचें मुळींच कारण नाहीं.

आतां तात्यासाहेब यांनीं आपल्या वाङ्मयांत केवळ स्वतःचेच विचार सांगितले आहेत असेंहि नाहीं; आणि कोणाहि लेखकाला केवळ स्वतः-

ग्या विचारांचेंच लेखन करणें हेंहि शक्य होईल असें वाटत नाहीं. पूर्वी वाङ्मयांत येऊन गेलेला कोणताहि विचार पुन्हां बोलावयाचा नाहीं असें जर लेखकांनीं ठरविलें तर अवघ्या पृथ्वीवरील सध्याच्या लेखकांपैकीं दहापांच माणसांनीं प्रत्येकीं चार-दोन पानें लिहिलीं तर पुरेसें होईल! पण हा समजच अगदीं चुकीचा आहे. विचाराला सामान्यपणा इतका असतो कीं, उसनवारी ही, विचार असामान्य असला, तरच दिसून येते, एरव्हीं जगताचा व्यवहार आपल्या प्रतिभेवरच चाललेला असतो. पण लेखकाचें वाचन जों जों जास्त व ग्रंथांच्या द्वारा विद्यमान व गतकालीन ग्रंथ-कर्त्यांशीं ज्याची ओळख मोठी त्याच्या लिहिण्यांत अर्थात्‌च विचारांचें वैविध्य जास्त दिसून येतें. एकादा प्रश्न उद्भवला असतां त्याच्या साधकबाधक बाजू पाहणें आणि तारतम्यानें त्यांना समधात बनवून त्या वाचकांपुढें मांडणें, यांत लेखकाचें कौशल्य दिसतेंच दिसतें व लेखनाच्या या अंगाचा विचार करतां तात्यासाहेब यांचा हात धरणारा मराठी भाषेंत आजवर कोणी झाला आहे असें वाटत नाहीं. इंदोरचे राजे श्री. तुकोजीराव होळकर यांच्यावर गुदरलेल्या प्रसंगाच्या वेळीं त्यांनीं जो लेख लिहिला तो त्यांच्या या समतोल लेखनाचा सर्वोत्कृष्ट नमुना म्हणून वाङ्मयांत चिरंतन राहील. पण प्रस्तुत विचार जो कीं, लेखक हा विविध ठिकाणांहून विचार उचलून घेतो व आपल्या तऱ्हेनें वाचकांपुढें मांडतो तो केळकर यांस लावून पाहतां असें दिसतें कीं, त्यांनीं जे शेकडों ग्रंथ मननपूर्वक वाचले आहेत त्यांतील उत्तमोत्तम विचार ते भरा-भर उचलून आणून वाचकांपुढें मांडतात. पण हाहि जर एक उद्योगच बनविला तर याहि कामांत केवळ कॅटलागीपणा उत्पन्न होईल; आणि प्रसंगांतून समानार्थांच्या विचारांच्या याद्या ग्रंथकर्त्यानें दिल्या आहेत असें वाचकांस वाटल्यावांचून राहणार नाहीं. केळकरांच्या लिहिण्यांत हा दोष कोठेंहि शिरलेला नाहीं. ग्रंथांचें वाचन मनसोक्त होऊन तें स्मृतींत कायमचें जिरलेलें असल्यामुळें त्यांच्या वर्तमानपत्राच्या धंद्यांत जसजसे नवनवे प्रसंग उत्पन्न होतील तसतशा त्यांच्या त्या वाचनांतील आठवणी जाग्या होतात आणि जो एक साधा प्रसंग किंवा जें एक साधें कलम त्यांस वर्णावयाचें असेल त्याच्या भोंवतीं इतिहास व वाङ्मय यांतील अत्यंत मनोरम आणि आकर्षक प्रसंग व कल्पना समोर येऊन उभ्या राहतात व अशा रीतीनें तो प्रसंग किंवा तो विचार हा केवळ मुंडा न वाटतां कांहीं, एका गमतीदार परिवेषांत तो उभा आहे असें पाहून वाचकास आनंद होतो. या प्रकारचा केळकर यांच्या वाङ्म-

यांतील सर्वोत्कृष्ट नमुना म्हणजे त्यांचा 'ज्ञानाचीं सदावर्तें' हा लेख होय. वास्तविक पाहतां यांतील सर्व कल्पना केळकरांच्याच आहेत असें निदान इंग्रजी वाङ्मयाचा कोणीहि वाचक म्हणणार नाहीं; पण त्याबरोबरच हेंहि म्हटलें पाहिजे कीं, "गायकवाडींत ग्रंथालयें स्थापन होणार" हा आनंद-दायक विचार मनांत घणघणूं लागल्याबरोबर मागें केव्हां तरी वाचलेले व वर्षानुवर्ष प्रसुप्त राहिलेले गमतीचे शेंकडों विचार, ज्ञानाचे चमकणारे कण आणि रंगीबेरंगी पोशाख केलेल्या कल्पना भराभर उठून उभ्या राहिल्या आणि त्यांच्या झुंडीच्या झुंडी मध्यवर्ती कल्पनेभोंवतीं पिंगा घालूं लागल्या! यामुळें "बडोद्यांत महाराजसरकारच्या हुकुमानें अनेक लायब्ररी स्थापन होणार आहेत असें कळतें. स्तुत्य उपक्रम." एवढ्याबाबतीच जी बातमी निकालांत निघावयाची ती नानाप्रकारच्या रूपांनीं पुन्हां पुन्हां नटून, देशोदेशींचे वेष घालून, भूतकाल आणि वर्तमान यांतील सजावटी एकत्र आणून वाचकांपुढें कितीवेळ तरी मोठें मनोहर नर्तन करीत उभी राहिल्यासारखें वाटतें. आठ-वणी जाग्या होणें हीहि प्रतिभाच होय. चांगल्या उपमा म्हणजे काय अस-तात हें पाहिलें तर दिसून येईल कीं, त्या सुंदर सादृश्यांच्या आठवणीच होत. जशीं सादृश्यें आठवावयाचीं तसेंच विचारहि केवळ सुचावयाचे नव्हे तर आठवावयाचेहि. असें घडलें तर लेखकाच्या अंगांत मोठी प्रतिभा आहे असेंच म्हणावयास हवें. सुचणें व आठवणें ही उभयविध प्रतिभा केळकर यांच्या लेखनांत ठळकपणें दिसून येते. तसेंच हे सर्व विचार, या सर्व आठवणी केवळ ठोकळ रूपानें केळकर सहसा मांडीत नाहींत. एकाद्या फुलाच्या पोटांत जो एक नाजुक आणि सुवासिक परमाणूंचा कणीदार पुंज असतो तो लांबून पाहतां एकरूप असा दिसतो. पण सूक्ष्मदर्शकयंत्रानें पाहतां त्या पुंजापैकीं प्रत्येक परमाणूचें सौंदर्य पाहणारास प्रतीत होतें. त्याप्रमाणेंच प्रत्येक ठोकळ विचाराच्या पोटांत जे बारीक विचारकण असतात तेहि सूक्ष्मपणानें पाहून वाचकांपुढें मोठे बनवून मांडण्याची कला त्यांना उत्तमच साधली आहे. हें जसें विचारांच्या बाबतींत तसेंच एकाद्या वर्ण्य विषयाच्या बाबतींतहि ते कर-तात. घडलेला प्रसंग किंवा पाहिलेली परिस्थिति यांचे सर्व तपशील जसेच्या तसे लेखनांत उठवून देण्याची त्यांची हातोटी अजबच आहे. यामुळें तीं तीं वर्णनें वाचतांना तो प्रसंग किंवा ती परिस्थिति हीं आपापल्या रसासह डोळ्यां-पुढें प्रत्यक्ष उभीं राहतात. पण हीं सर्व साधनें त्यांना वश असून सुद्धां उपमा, दृष्टांत आणि सर्वांच्याहि वर विनोदाची मधूनमधून उठणारी लकेर

हीं जर त्यांना साध्य नसतीं तर त्यांच्या लेखनांत उद्बोधकपणा असूनसुद्धां नीरसपणा उत्पन्न झाला असता; आणि वर उल्लेखिलेली ज्ञानदानाची त्यांची हौस व त्यांचीं सुभाषितें हीं वाचकांच्या अभावीं त्यांच्याच अंगीं " जीर्ण " झालीं असतीं. विनोद किंवा लेखनाची घाटणी इत्यादींविषयीं इतरांनीं विवेचन केलेलेंच आहे. तरी त्यांची प्रतिभा व लेखनाची ऐट यांचें एकत्र वर्णन होण्यासारखें आहे. अंकामागें अंक आणि वर्षामागें वर्षे असें ते जें आजपर्यंत मुबलक लिहिणें लिहीत आले आहेत तें पाहिलें म्हणजे पुष्ट आचळांच्या विलायती गाईची आठवण होते. चाळीस चाळीस, पन्नास पन्नास शेर दूध ही गाय महिनोमहिने देत राहते. पण त्यांच्या प्रतिभेचा हा गुण जरी या उपमेनें व्यक्त होत असला तरी त्यांच्या लेखनाच्या घाटणीचें वर्णन करण्यास ती अपुरी पडते. या गाईची पाठ सरळ असून तिचा चेहरा कांहींसा बावळा असतो. पण केळकर यांची लेखनकला पाठीवर योडेंसें वशिंड वाढलेली आणि कुरणांतील गवत खातां खातां मधेंच थांबून वाटसरूंकडे पाहणाऱ्या कपिला गाईप्रमाणें मोठी देखणी आणि साभिप्राय पाहणारी अशी वाटते.

तसेंच त्यांच्या सर्वच प्रतिपादनांत नियमितपणा हा एक विशेष गुण आहे. आकरताळें, ओक्साबोक्शीं रडणारें, आततायी, धुंद व बेहोप असें कांहीं वाचावयास सांपडावें अशी ज्यांची इच्छा असेल त्यांनीं केळकर यांचें वाङ्मय वाचूं नये; कारण वर उल्लेखिलेले त्यांचे मित्र त्यांना कोठेंहि भेटणार नाहींत. जटा आपटणारे रुद्रावतार, आणि पाठीवर आसूड मारून घेणाऱ्या कडकलक्ष्म्या यांची गांठ पडावयास हवी असेल तर त्यांनीं कोठें जावें हें सांगण्याचें हें स्थल नव्हे; पण केळकरांचें लेखन हें तें स्थल नव्हे इतकें मात्र खरें. ह्या नियमितपणाचा किंवा आटोपशीरपणाचा वापर विनोदाच्या कामींहि त्यांनीं पुष्कळच केला आहे. घरांतील लहान मुलें एकमेकांकडे पाहून जशीं नुसतींच खिदळत असतात किंवा पाय मोकळे करावयास गेलेले चार वृद्ध पेन्शनर झाडाखालीं बसून आपल्या नोकरींतल्या आठवणी उकरून काढून, जसे नुसतेच हंसत बसतात व आराम पावतात तसा कांहींहि प्रकार त्यांच्या विनोदांत दिसत नाहीं. तो प्रतिपाद्याच्या अनुषंगानें योग्य त्या तालावर ठेका धरून साथ करीत करीत बरोबर चाललेला असतो. कित्येकदां तर असें घडतें कीं, प्रतिपाद्य विषयाच्या विवेचनांतील शब्दांतच हास्योत्पादक रूपकांची योजना झाली असल्यामुळें त्याचें निराळें रूपसुद्धां वाचकाला प्रतीत होत नाहीं, इतकी त्याच्या मुताची नरम मादी सणंगाच्या न्यायार विणकरीत एकरूप झालेली असते. तसेंच त्यांच्या

प्रतिपादनांतील सोपेपणा हा तर वाचकाला आपल्या मित्राप्रमाणें वाटतो. सोपा विचार सुद्धां अवघड करून सांगण्याचें कसब पुष्कळ लेखकांना साधलेलें असतें! याचें कारण इतकेंच आहे कीं, ते जो विचार सांगतात तो त्यांना नुकताच सुचलेला असतो, पुरता ओळखीचा झालेला नसतो, त्याला नांव काय द्यावें हें त्यांना ठाऊक झालेलें नसतें; किंवा कदाचित् असेंहि झालेलें असतें कीं, आपला हा विचार कांहीं मुलुखानिराळा किंवा कोणास माहीत नसलेला असा असावा अशा अवडंबरानें प्रतिपादक प्रेरित झालेला असतो. कदाचित् असेंहि होतें कीं, प्रेषितपणाचें अवसान आपल्या अंगांत शिरलें आहे असा अभिनिवेश त्याला बाधलेला असतो; आणि म्हणून अगदीं सोप्या गोष्टी हे लोक मोठ्या निबिड बनवून वाचकांना सांगतात व जर कां वाचक भोळे असले तर हे लोक तत्त्ववेत्त्याची भूमिकाहि बळकावून बसतात. केळकर यांचें सर्व प्रतिपादन याच्या साफ उलट असतें. त्यांत कोठेंहि तत्त्ववेत्त्याचा अभिनिवेश, सामान्य सिद्धांत प्रतिपादणारांचा हट्ट, किंवा आपल्यालाच न उलगडलेले विचारगुल्म कोठेंहि नसतात. आपण जणों काय एकादी साधी गोष्ट सांगत आहों अशा समजुतीनें लेखक लिहीत आहे असें दिसतें व वाचकालाहि आपण कोठें गिरिकुहरांत खेचले जात आहों असें कधींहि वाटत नाहीं. नुकताच प्रसिद्ध झालेला अश्लील वाङ्मयावरील त्यांचा लेख या गुणाचा उत्तम निदर्शक आहे.

हे जे गुण सांगितले त्याबरोबरच विशेषतः वर्तमानपत्राच्या संपादकांना जरूर असलेला निर्भयता हा गुण त्यांनीं नेहमींच दाखविला आहे. कोल्हापुरचीं पत्रें प्रसिद्ध करून त्यांनीं संस्थानिकांना दरडाविलें; दिल्लीच्या रुधिरप्रिय देवतेविषयीं व सोलापुरच्या दडपशाहीविषयीं लिहून त्यांनीं सरकारास आव्हान केलें; आणि संमतिवय व अस्पृश्यता याविषयीं लिहून पुराणमतवाद्यांस धुत्कारिलें. तसेंच कांहीं कांहीं दुय्यम प्रकारचे गुणहि ते मधून मधून जरूरीप्रमाणें उपयोजितात. छद्मवेध, उपहास, प्रसंगीं प्रतिक्रिया म्हणून करावयाची टवाळी हींहि त्यांस अगदींच अनवगत आहेत असें नाहीं. पण यांचा उपयोग केवळ आपद्धर्म म्हणून ते करतात. आणखी एकदोन विशेषांचा उल्लेख केल्याशिवाय हें प्रकरण संपवितां येत नाहीं. खुबी कोणती व प्रांजलपणा कोणता याचें कांहीं एक बेमालूम मिश्रण करण्याची लोकोत्तर हातोटी महात्मा गांधींना साधलेली आहे. तोच कांहींसा प्रकार तात्यासाहेब यांच्या लेखनांत व भाषणांत दिसून येतो. समजेल त्यांना खुबी, नाहीं तर तिऱ्हाइतांना—भोळ्यांना प्रांजलपणा,

असें हें एक कांहीं मिश्रणाचें कसब आहे. साधल्यास गंभीर विचार, नाहींतर थट्टा अशा प्रकारचें जसें दुहेरी धोरण कांहीं लोक संभाषणांत ठेवतात- तसाच प्रकार प्रांजलपण व लागून बोलणें यांच्या चमत्कारिक मिश्रणांत महात्मा गांधी व केळकर यांनीं मधून मधून केलेला दिसतो. पण या गुणांचीं या उभयतांच्या लेखांतील उदाहरणें येथें न देतां चतुर वाचकांच्या रसिकतेवरच तीं हुडकून काढण्याचें काम सोंपवितो. तसेंच, हा आटोपशीरपणा मतभेद-निदर्शनाच्या कामींहि केळकर फार मर्यादेनें दाखवितात. अर्थात् प्रतिस्पर्धी कोण आहे यावर या मर्यादेची मर्यादा अवलंबून असते हें उघडच आहे. त्यांतहि पुन्हां असें आहे कीं, जेवढ्यापुरता मतभेद तेवढ्यापुरताच बखेडा उत्पन्न व्हावा अशी त्यांची इच्छा असते. शेपटीचा जर एक केस ओढला तर उग्र श्वापदें आपला क्रूर मोहोरा सर्वंवच्या सर्वंच या क्षुद्र अपराध्याकडे वळ-वितात. पण गाईच्या पाठीला जर बोटानें स्पर्श केला तर ओंवतीं भोंवतीं तसूंभर जागेंत ती आपली त्वचा थरथरविते व उगाच अंगाची काहील करून न घेतां मतभेद दर्शवून मोकळी होते. हाच प्रकार केळकरांच्या मतभेददर्शनांत दृष्टीस पडतो.

कांहीं थोड्या वर्तमानपत्रांना जीवितहेतु असतो व म्हणून त्यांच्या पाठीशीं एखादें मोठें व्यक्तिमत्त्व म्हणजे personality उभी असते. 'केसरी' वर्तमानपत्राचें भाग्य हें कीं आतांपर्यंत तरी या पत्राच्या पाठीशीं कांहीं विशेष प्रकारचें व्यक्तिमत्त्व उभे असत आलें आहे. केवळ भोंवतालच्या परिस्थितीची नव्हे किंवा वर्तमानपत्रांतील धंद्याच्या धोरणाची नव्हे तर या व्यक्तींची छाया त्यांजवर पडत राहिली आहे. चिपळूणकरांपासून केळकरां-पर्यंत जे संपादक झाले ते अमूर्त संपादकी करणारे लोक नव्हत. हे सर्व एकाच दर्जाचे, एकाच लायकीचे किंवा एकाच उंचीचे होते, असेंही मुळींच म्हणावयाचें नाहीं. पण प्रत्येकाचें कांहीं वैशिष्ट्य होतें व या व्यक्तिगत वैशि-ष्ट्यानें अंकित झालेला मार्ग 'केसरी'स अनुसरावा लागला आहे. बहुतेक वर्तमानपत्रें म्हणजे कंपन्यांसारखीं असतात. कोणी श्रीमंत माणूस कदाचित तें सगळेंच्या सगळें विकतसुद्धां घेतो व संपादकाच्या मेंदूपासून तों चाकाच्या दांड्यांपर्यंत त्याचे सर्व अवयव आपल्या दिमतीला लावून घेतो. किंवा असें ही होतें कीं, संपादक लोक आपल्या कचेरीच्या गच्चीवर एक हवेचा कावळा लावून ठेवितात व कचेरीच्या तावदानांतून मधूनमधून त्याजकडे पाहून लिखाणाचें धोरण ठरवितात. त्यांचें स्वतःचें असें ठाशीव व आग्रहाचें धोरण

असें कांहींच नसतें. म्हणून अशा वर्तमानपत्रांत वर्तमानपत्राच्या मालकाच्या हेतूचें किंवा फार तर पार्टीच्या मुख्यकडून आलेल्या हुकुमाचें प्रतिबिंब दिसत असतें. खुद्द संपादक हा रोवून उभा आहे व निर्भय नजरेनें समोर पाहून योजनेस अनुसरून कांहीं आग्रहाचें बोलणें बोलत आहे असें दिसत नाहीं. पण 'केसरी'चे असें झालेलें नाहीं. केळकर यांनीं 'केसरी'ची व्यक्तिमत्त्व दाखविण्याची परंपरा अबाधित ठेविली. केसरी'चे संपादक म्हणून प्रसिद्ध होणें व आपल्या गुणसमुच्चयामुळें 'केसरी'ला महत्त्व प्राप्त करून देणें या दोन स्वतंत्र गोष्टी आहेत. 'केसरी'त अमुक यावयास हवें म्हणून तसें लिहिणें आणि अमुक म्हणायचें आहे म्हणून 'केसरी'कडून तें गर्जविणें याहि दोन स्वतंत्र गोष्टी आहेत. वर 'व्यक्तिमत्त्व, व्यक्तिमत्त्व' जें म्हटलें आहे, त्याचा अर्थ हाच कीं, पहिली व्यक्ति व दुसरें साधन. या साधनाच्या वापरांत व्यक्तिमत्त्वाची लपेट कोणाच्या हातीं कशी दिसेल, कोणाच्या हातीं कशी दिसेल; पण ती लपेट दिसत आली आहे हें मात्र खरें आहे. केळकर यांचें व्यक्तिमत्त्व दिसण्याचे प्रसंग दोन; व ते म्हणजे टिळकांना शिक्षा झाल्यापासून ते चवदा सालीं परत येईपर्यंतचीं सहा वर्षे व टिळकांच्या मरणोत्तरचीं दहा वर्षे हे होत. टिळक प्रत्यक्ष संपादक असतां किंवा ते संपादक नसले तरी 'केसरी'च्या धोरणाचा कबजा त्यांच्याकडे असत. केळकर यांचें व्यक्तिमत्त्व संपादकाच्या कचेरींत किती प्रभावी होत होतें हें कळण्यास तिऱ्हाइतांना फारसा मार्ग नाहीं. पण एवढें खास म्हणतां येईल कीं, केळकर यांजकडे दुय्यमपणा जरी असला तरी दुय्यमाच्या ठिकाणचा केवळ सांगकामेपणा त्यांनीं कधींच पत्करिला नाहीं. जवळ केलेल्या "मित्राची" योग्यता ओळखून टिळकांनीं त्यास "बोजा उठाव" असा हुकूम केव्हांच केला नाहीं. व केला असता तर तो मान खाली घालून व आपण केवळ धंदेवाले, उरफाट्या गोष्टी बोलून आपणांस काय करावयाचें आहे, असलें नोकरपेशा बोलणें मनाशीं पुटपुटून, केळकर यांनीं तो केव्हांहि मान्य केला नसता हें स्पष्ट आहे. हें स्पष्ट आहे असें म्हणण्याचें कारण तरी इतकेंच कीं, "बोजा उठविणें" हें तर दूरच राहो पण धोरणविषयक सुद्धां कोणताहि प्रश्न उपस्थित झाला तरी खुद्द गुरूशीं बरोबरीच्या नात्यानें त्यांनीं चर्चेची खडाजंगी अनेकदां उडविली व गुरूनेंहि हें शिष्याचें कसब पाहून त्याच्या बोलण्याचा अंतर्भाव आपल्या हेतूंत करून घेतला हें जुन्या माहीतगारांना ठाऊक आहे. केळकर हे दोनतीनदां राजीनामा धावयास सुद्धां तयार झाले होते, असें सांगून त्यांचे निंदक त्यांचा पाणउतारा करूं पाहतात

पण या खऱ्या इतिहासाचा ते असा खोटा अर्थ लावतात हें वाईट आहे. राजीनामा द्यावयास निघाले ही गोष्ट तर खरीच; यांतच त्यांचें व्यक्तिमत्त्व दिसून आलें व त्याबरोबरच टिळकांनीं त्यांना जाऊं दिलें नाहीं यांत जसा टिळकांच्या बुद्धीचा "अनाग्रह" दिसून आला, तशीच त्यांना झालेली केळकरांच्या योग्यतेची प्रतीतिहि दिसून आली. आपल्या या "मित्रा"स सुद्धां कांहीं स्वतःचें म्हणून म्हणावयाचें असतें व तें म्हणून दाखविण्यास लागणारी निर्भयता व कुशलता याजपाशीं भरपूर आहे हेंच टिळकांनीं ओळखलें आणि म्हणून 'केसरी'च्या जबाबदारीची शिरजोळ त्यांनीं त्यांच्याच खांद्यावर ठेविली. आपआपणास हवी तेवढ्या पल्ल्याची राजकारणांतील साहसवृत्ति व सरकारवर तुटून पडण्याचा आवेश हीं केळकर यांच्या अंगीं नाहींत हें टिळकांनीं ओळखलेंच होतें; फार काय सांगावें, आपण स्वतःच या गुणांत कमी आहों कीं काय असें सुद्धां त्यांस एकादे वेळेस वाटत असावें असें दिसतें. कारण ते एकदां म्हणाले, "आमच्याहूनहि कोणी एकादा कर्तबगार माणूस भेटला तर तो मला हवा आहे; पण कोणी भेटतच नाहीं." पण हें जरी खरें असलें तरी आपल्या झाडून सर्व विद्यमान मित्रांत व अनुयायांत राजकारणांतील अचूक दृष्टि, धोरण आंखावयास लागणारें बुद्धिमत्त्व, प्रतिपादनाचें कौशल्य व कामाचा उरक या गुणांत "आपल्या तात्यांची" बरोबरी इतर कोणासहि करतां येत नाहीं हा विचार त्यांच्या मनांत कायम झालेला होता. केळकर यांनीं टिळकांच्या हातीं वागतांनासुद्धां आपल्या व्यक्तिमत्त्वाचे दाखले दिले होते, याचा उल्लेख वर आलेलाच आहे. टिळकांच्या बरोबरीच्या मित्रांत सुद्धां जेव्हां वादाचा गोंधळ माजावा, मसुदा तयार करावयाच्या कामीं ओढाताण सुरू व्हावी तेव्हां सर्वांचें म्हणणें शांतपणें ऐकून घेऊन सर्वांना पसंत पडेल अशासारखें एकादें सूत्र तात्यांनीं सुचवावें व झटकन् बोलतां बोलतां मसुदा तयार करून पुढें टाकावा असें कित्येकदां झालेलें होतें. यामुळें खुद्द टिळकांच्या मनावरहि केळकर यांच्या सामर्थ्याचा कांहीं विशेष परिणाम व्हावा हें साहजिक होतें. दुय्यम खरा पण बुद्धिस्वातंत्र्य आणि आचारस्वातंत्र्य गमावलेला नोकर मी नव्हे हा आपला बाणाहि सोलापूरच्या कॉन्फरन्सच्या वेळीं भर कॉन्फरन्समध्यें आपल्या गुरूलाच त्यांनीं दाखविला होता, हें तेव्हांच्या आठवणी असणारांना आठवत असेलच. सांगण्याचा मुद्दा इतकाच कीं, वर जें व्यक्तिमत्त्व म्हणून लिहिलें आहे त्याचा थोडा उलगडा व्हावा.

पण ज्या गुणांबद्दल टिळकांनीं केळकर यांचा संग्रहच केला आणि प्रसंगविशेषीं विचाराची थोडी जाचणी झाली तरी त्यांच्या ज्या गुणांसाठीं टिळकांनीं गम खाल्ली ते गुण टिळकांच्या हयातीनंतर, ज्या थोर देशभक्ताकडे राष्ट्राचें पुढारीपण गेलें त्याच्या संगतींत, केळकर यांना नडूं लागले. केळकर यांना नडूं लागले, याचा अर्थ असा कीं, ते महात्मा गांधींना नडूं लागले. येथून पुढें चालू विषयांत कांहीं लोकांना कदाचित् न आवडणारा असा भाग येणें हें अपरिहार्य आहे. गेल्या दहाबारा वर्षांत तात्यासाहेब यांना गैर-समजण्याची जितकी चाल पडली आहे, तितकी त्यांना समजून घेण्याची पडली नाहीं हें, राजकारणाकडे दुरून पाहणारांच्या तरी, ध्यानांत येऊन चुकलें आहे. त्याच रंगणांत जे कोणी आवेशानें उतरलेले आहेत, त्यांना रागलोभातीत होऊन एकाद्या बाबीकडे संथपणें पाहण्याची संधि अजूनहि मिळाली असेल असें वांटत नाहीं; आणि म्हणून कदाचित् एकाद्या माणसाचें स्वरूप अस्तिबुद्धीनें समजून घेण्याची मनाची तयारी त्यांच्या ठिकाणीं असणें हेंहि कठिणच आहे. प्रस्तुत ठिकाणीं तात्यासाहेब यांची भूमिका अस्तिबाजूनें जितकी समजून घेतां येईल तितकी घेण्याचा थोडका यत्न केला आहे. महात्मा गांधी या लोकोत्तर पुरुषाचा कडक राजकारणांतील प्रवेश हा टिळकांच्या मृत्यूनंतर सर्व लोकांना, आकाशांतून देवाच्या कृपाप्रसादाचा जसा वर्षाव व्हावा तसा वाटला; व अजूनहि हिंदुस्थानचें भवितव्य याच महापुरुषाच्या हातीं आहे, अशी जनमनाची समजूत आहे. टिळक मेल्यानंतर सरकारास आव्हान देणारा असा महात्मा गांधीसारखा कोणी लोकाग्रणी पुढें आला नसता तर शिगेस पोंचत चाललेलें राजकारण मध्येंच थबकल्यासारखें झालें असतें आणि जनता निर्नायक बनून गोंधळून गेली असती. परंतु आज रात्रीं टिळकांनीं जावें आणि उद्यां सकाळीं गांधींनीं त्वेशानें पुढें यावें अशी, नाटकांत सुद्धां जी असंभाव्य दिसेल ती, घटना जुळून आली. त्यांत विशेष हें होतें कीं, म. गांधींचें त्या वेळेपर्यंतचें सामदामाचें धोरण, गुरुपरंपरेची घोषणा इत्यादि लक्षांत घेतां, हा त्यांचा नवीन आवेश लोकांस अद्भुतच वाटला. प्रांतोप्रांतींच्या आणि अखिल भारतीय पुढाऱ्यांनीं मिळून ठरविलेला जो कांहीं राजकारणाचा नकाशा होता तो म. गांधींनीं साफ बदलला; आणि त्यांनीं स्वतः जो तयार केला त्यांत त्यांनीं भरलेले रंग हे परमार्थप्रवण अशा हिंदुस्थानांतील जनतेला अत्यंत आकर्षक वाटले. मूळांत आत्मशुद्धीचीच आवश्यकता अत्यंत आहे, ती झाल्याविना राजकारण यशास जावयाचें नाहीं असा गुरूपदेश त्यांनीं चालू केला; राष्ट्रीय

सभा ही अत्याचाराचें समर्थन कधींच करीत नव्हती, तरी आपण अनत्याचारी आहों, आपण अनत्याचारी आहों, असें कोणीं विचारलें नसतांहि, तिनें आपण होऊनच पुन्हां पुन्हां सांगावें असा आग्रह त्यांनीं धरला; सर्व देशभर अनुक्रमानें पाडावयाचा मोठा संप त्यांनीं पुकारला; देशांतील शिक्षणसंस्था या कुचकामाच्या आहेत, अराष्ट्रीय आहेत इ. त्यांच्या वचनांचें "हे दारूचे पिंठे आहेत" असें आपल्या भाषेंत त्यांचें भाषांतर करून घेऊन त्यांचे अनुयायी सर्वत्र गर्जूं लागले; कौन्सिलें हीं सरकारचें मायाजाल आहे, असें काव्य. त्यांच्या कवि अनुयायांनीं गावयास सुरुवात केली; सरकारचें राज्य खालीं बसवावयाचें तर कोर्टावर अविश्वास दाखवावयास हवा आणि कोर्टावर अविश्वास दाखवावयाचा तर भांडखोरांनीं कोर्टांत जावयास नको हेंच ओघानें यावयास हवें होतें; पण त्यांच्यावर एवढीशी शिस्त न धरतां कोर्टें बसविण्यासाठीं वकिलांनीच कोर्टांत जाऊं नये या "जवळच्या रस्त्या"चा शोध लावण्यांत आला; आणि जर वकील ऐकेनात, तर हे अनीतीच्या मार्गानें पैसे मिळविणारे व समाजाचा घात करणारे लोक आहेत असा निषेधाचा सोटा त्यांच्यावर उगारण्यांत आला; बहिष्कार-कल्पनेंत द्वेषभाव आहे आणि आत्मशुद्धीच्या दृष्टीनें द्वेषभावाचा तर नष्टांश व्हावयास हवा म्हणून बहिष्कार हा तामस मार्ग म्हणून या "सद्गुणसंवर्धकमंडळा"नें केवळ त्याज्य ठरविला; परदेशांतील चळवळ ही विनाकारण पैसे खाते, आपल्याला जगांतल्या लोकांपुढें तोंड वेंगाडून काय करावयाचें आहे, तिकडील मतप्रसार आपण थांबविलाच पाहिजे असा अतीव स्वावलंबनाचा मार्ग चोखाळावयाचें ठरलें; अस्पृश्यता ही हिंदुधर्मावर कलंक आहे आणि ती जर गेली नाहीं तर आपण स्वराज्याला अपात्र आहों हेंहि आत्मशुद्धीच्या दृष्टीनें ओघानेंच प्राप्त झालें; मुसलमान हे आपले दाईज नसून प्रेमळ बंधु आहेत आणि म्हणून त्यांच्याशीं वागावयाचीं आपलीं आजपर्यंतचीं धोरणें सफा चुकलीं आहेत असा मुसलमानांच्या वृत्तीसंबंधींचा नवीन शोध लोकांपुढें आला; हिंदुधर्माचें बळ आम्ही वाढवितों असा हक्क सांगणारा आर्यसमाजिस्टांचा पंथ हा विनाकारण वखेडे माजविणारा आहे, त्यांच्या धर्मग्रंथांतील वचनें व त्यांचे महंत हीं सत्त्वभावप्रेरित नाहींत, अतएव त्याज्य आहेत असा डेरा मारण्यांत आला; अनत्याचार म्हणजे, क्रियेंत, शब्दांत इतकेंच काय पण मनांत सुद्धां अत्याचाराची किंवा हिंसेची कल्पना येतां कामा नये असें ठरलें; तामस व पशुवृत्तीच्या विरोधकांना सुद्धां आत्मिक बळानें जिंकावयाचें असें मुक्रर झालें; केवळ सुतानें स्वराज्यप्राप्ति होण्यासारखी आहे, असा

हा सौतिकाचा सिद्धांत प्रस्थापित झाला; पोशाखाच्या साधेपणाची मजल ही एक लंगोटी व वर कापडाचा त्रिकोण येथपर्यंत खालावली; हिंदुमहासभा ही एक राष्ट्रविद्वेषी व राष्ट्राच्या एकीकरणास बाधा करणारी संस्था आहे असाहि बोभाटा चालू झाला; चार चौघांना विचारून करावें या विचारांतील जो लोकशाही-चा रोख आहे व ज्याचा अवलंब या वेळेपर्यंत भारतीय पुढारी करीत आले होते तो हिणकस ठरला; व "सर्वाधिकारीपण" हें एक नवीन उपपद काँग्रेसच्या दरबारीं चालू झालें; ज्या प्रांतांत की चळवळ चालू राहण्याचा यत्किंचित्‌हि संभव नाहीं तेथें सुद्धां ती चाललीच पाहिजे असा सक्तीचा दंडक घालण्यांत आला; थोड्यांत बोलावयाचें म्हणजे काँग्रेसचें अधिकारी मंडळ म्हणजे मध्यस्थित महंत व भोंवतालीं भाविकांचा मेळा असा संच बनून आपल्या गुरूच्या ठायीं प्रत्येक बाबींत प्रमादराहित्यच अवतरलें आहे असें शिष्यवृंदास वाटूं लागलें; सर्व राष्ट्र श्रद्धावान झालें पाहिजे अशी निकड चालू झाली; 'सत्यापरता नाहीं धर्म, सत्य तेंचि परब्रह्म' हें सनातन तत्त्व रोजच्या प्रत्येक बारीकसारीक व्यवहारालासुद्धां निष्ठुरपणें लाविलें पाहिजे असा दंडक घालण्यांत आला; बाहेर, कधींहि न होणारा संप; आंत, कधींहि न साधणारी आत्मशुद्धि, आणि सरसकट वागणुकीचें धोरण म्हणजे काँग्रेसनें जो अत्याचारीपणा कधींहि पत्करलेला नव्हता तो चूक आहे, चूक आहे, असें म्हणत बसणें, असा हा त्रिविध आखाडा पडला. हें सर्व साध्य झाल्यानंतर मग सरकारवर चढाई करून जाण्याचें सविनय कायदेभंगाचें जें काम तें सुरूं व्हावयाचें असें ठरलें.

वरील सर्व बाबी यथानुक्रम दिल्या आहेत असें समजावयाचें नाहीं; पण खऱ्याखुऱ्या राजकीय चळवळीपर्यंत म्हणजे सविनय कायदेभंगापर्यंत म० *गांधीहे ठास येऊन पोहोंचेपर्यंत जी एक मोठी थोरली योजना, आराखडे, नकाशे,* धोरणें, सिद्धांत, उपसिद्धांत इत्यादींची प्रणालि उत्पन्न झाली तिची सामग्र्यानें कल्पना यावी व यांतूनच केळकरांचा मनोनिग्रह आणि त्यांजवर लोकांची झालेली कांहींशी गैरमर्जी ही कशी दिसून आली हें वाचकांस कळावें म्हणून वरील मोजदाद केलेली आहे. आतां यांपैकीं प्रत्येक बाबीसंबंधानें केळकर यांचा म० गांधी यांच्याशीं कांहीं ना कांहीं मतविरोध होता. आत्मशुद्धि खरी, पण आजपर्यंत राष्ट्र पापात्म्यांनींच भरलेलें होतें असें खरोखर म्हणतां येण्यासारखें नव्हतें. अत्याचार हा काँग्रेसनें निषिद्धच मनाला असतां तिनें पुन्हांपुन्हां 'मी अनत्याचारी आहे' असें सांगण्यांत कदाचित् कांहीं धोर-

णाचा भाग येऊं शकतो हें निःसंशय आहे. पण हिंदुस्थानांतल्या प्रत्येक माणसानें काया, वाचा इतकेंच नव्हे तर मनेंकरून सुद्धां अत्याचाराचा विचार दूर ठेवावयाचा हें माणसाच्या जातीला कधींतरी शक्य होण्यासारखें होतें काय ? राष्ट्रानें श्रद्धावान् झालें पाहिजे खरें; पण महाराष्ट्रांत श्रद्धा नाहीं, महाराष्ट्रांत श्रद्धा नाहीं ही अभद्र वाणी पुन्हा पुन्हा उच्चारल्यानें वास्तविक पाहतां काय साधण्यासारखें होतें ? त्यांतूनहि श्रद्धा कशावर ठेवावयाची, तर महात्माजींच्या मुखांतून जीं बोधवचनें बाहेर पडतील त्यांवर ठेवावयाची ! आपला चोकसपणा सांडून महाराष्ट्रदेशानें हें तरी काय म्हणून करावें ? कौन्सिलचा बहिष्कार हा एक वर्षापुरता आहे, एवढी मुदत संपली म्हणजे फेर विचारास आम्ही मोकळे आहों, या करून घेतलेल्या कबुलीचा पुढें केव्हांच उपयोग होऊं नये अशी तरी इच्छा कां असावी ? मुसलमान हें प्रकरण काय हें इतिहासांत हजारदां सिद्ध झालें असतां मागीलांचा अनुभव वाऱ्यावर सोडून देण्यापासून काय फायदा होणार होता ? " एक वर्षांत स्वराज्य " असें जरी गांधी म्हणाले तरी तें त्यांचें बोलणें परमार्थानें मानूं नये, त्याचा अर्थ फार लवकर इतकाच समजावा असें केळकरांनीं म्हटलें, तर त्याचा इनकार करणें हें जरूरच होतें काय ? मुसलमानांना खूष करण्यासाठीं शूर आर्यसमाजिस्टांना निखाऱ्यावरून ओढणें अवश्यच होतें काय ? ज्या देशांत लोकशाही उत्पन्न व्हावयाची, तेथील निदान पुढाऱ्यांत तरी ती ठेवावयास हवी अशी वांछा कोणी तर ती अस्थानीं होती काय ? एक ना दोन, किती गोष्टी विचाराव्या ? प्रत्येक बाबीसंबंधानें हुजत सुरू झाली. कांहीं दिवसपर्यंत म्हणजे म० गांधी यांच्या नेतृत्वाची आस्थायीच जोंपर्यंत गाइली जात होती तोंपर्यंत केळकर यांनीं जमतें घेऊन चळवळीची धुरा पूर्वीच्याच उमेदीनें उचलली. परंतु एकदां आंतरा सुरू झाल्यानंतर मग मात्र, आपली बुद्धि डोक्यांतून काढून खिशांत ठेवून द्यावयाची आणि गांधी महाराज म्हणतील त्याला होय म्हणावयाचें हा धंदा आपल्याला साधेल असें त्यांस वाटेना. वरें, म० गांधी काय म्हणत होते याची कलमवार यादी वर दिलेलीच आहे. ज्यानें त्यानें आतां ८।१० वर्षांच्या अवधीनंतर पुन्हां एकदां लक्ष देऊन तारतम्यभावानें या कलमांच्या व्यवहार्यतेचा विचार करावा. म्हणजे प्रत्येकाला आपल्या ठिकाणींच खजीलपणा उत्पन्न होऊन 'या बोलण्यांत कांहीं मतलब नव्हता' असें खास वाटेल. खुद्द तात्यासाहेब यांनीं कांहीं दिवस तरी गम खाल्ली; पण त्यांचे मदतनीस रा० अण्णासाहेब

अस्पष्ट उल्लेख व सांकेतिक शब्द यांचा अर्थ बराच समजतो. रा॰ खरे यांच्या विस्तृत इतिहासज्ञानाचा उपयोग वाचकांस कितपत होतो हें पहाणें असेल तर कांहीं पत्रें टीपा न पाहतां वाचावीं म्हणजे समजून येईल.

ऐ. ले. संग्रहासंबंधानें दुसरी एक गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे ती ही कीं, यामध्यें कांहीं कांहीं माहिती अशी प्रसिद्ध होत आहे कीं, ती खरोखर आजपर्यंत अगदीं अनुपलब्ध होती. आजमितीस माहीत असलेल्या ऐतिहासिक प्रसंगांसंबंधानें या लेखसंग्रहांत नवीन वर्णन व निरनिराळ्या हकीकती सांपडतात. इतकेंच नव्हे, परंतु आजपर्यंत फारसे माहीत नसलेले असे ऐतिहासिक प्रसंगहि क्वचित् नवीन सांपडतात. माधवराव पेशव्यांच्या कारकीर्दीच्या पहिल्या दोन तीन वर्षांचा इतिहास ग्रँटडफसाहेबांनीं फक्त सहासात पृष्ठांत सांगितला आहे. त्याच इतिहासाची हकीकत ज्यामध्यें आहे अशी पत्रें छापण्यास रा॰ खरे यांच्या पुस्तकाचीं पांचशें पानें खर्च झालीं आहेत. तसेंच श्री॰ माधवराव पेशवे यांच्या कारकीर्दीत झालेली देशस्थ व कोंकणस्थ मुत्सद्दी यांजमधील भांडणें व त्यांच्यापासून निजामअलीनें करून घेतलेला फायदा, यासंबंधानें आजपर्यंत कोणत्याच इंग्रजी अगर मराठी इतिहासांत माहिती आलेली नाहीं, ती ऐ. ले. संग्रहांत सांपडते. म्हैसुरावर मराठ्यांनीं ज्या स्वाऱ्या केल्या त्यांची सविस्तर व विश्वसनीय अशी माहिती आजपर्यंत मिळाली नव्हती; ग्रँटडफनें कर्नल विल्कस यांचे इतिहासावरून दिलेली माहिती थोडी आहे व गैरविश्वसनीय दिसते. त्यासंबंधानें बरीच माहिती ऐ. ले. संग्रहांत मिळेल. तसेंच इ. स. १७७५ पासून १७८० पर्यंत मराठ्यांचें व इंग्रजांचें युद्ध सुरू होतें. त्या वेळची इंग्रजांच्या बाजूची हकीकत फॉरेस्टसाहेबांनीं प्रसिद्ध केली आहे, त्यांत मराठ्यांची बाजू दाखविली गेलेली नाहीं. त्याही संबंधानें मेळ व फरक पहाण्यास लागणारी माहिती ऐ. ले. संग्रहांत बरीच मिळेल. खर्ड्याची लढाई व बाजीरावशाहींतील धामधूम यांचीहि हकीकत या मासिकपुस्तकांत बरीच सांपडणार आहे. चौदाव्या अंकापुढें येणाऱ्या हकीकतींत नवी अशी माहिती कोणती येणार असें आम्हीं रा॰ खरे यांस विचारल्यावरून त्यांनीं वरील माहिती आम्हांस कळविली आहे. एकंदरीनें पाहतां निदान एक गोष्ट स्पष्ट दिसून येते ती ही कीं, मराठ्यांच्या इतिहासांत प्रमुखत्वास आलेल्या दुय्यम प्रतीच्या पुष्कळ वीरमुत्सद्द्यांची माहिती ग्रँटडफ किंवा इतर कोठें फारशी मिळत नाहीं ती, ऐ. ले. संग्रहांत मिळणार आहे व पत्रव्यवहारांत ती गोंविली गेली असल्याकारणानें ती अस्सल असून विशेष चटकदार लागण्याचा फार संभव आहे. तात्पर्य, ऐ. ले. संग्रहाचे योगानें जुन्या माहितीवर नवीन ज्ञानाचा प्रकाश पडेल एवढेंच नव्हे, तर नवीन अशीहि पुष्कळ मिळेलसें दिसतें.

—इतिहासविहार पृ. ८४–९०

## दिल्लीचा ऐतिहासिक चित्रपट

ता. १२ डिसेंबर १९११ हा दिवस हिंदुस्थानच्या इतिहासांतील अत्यंत महत्त्वाच्या दिवसांपैकीं एक मानिला जाईल. कारण या देशांत गेलीं तीन शतकें उदयास येत असलेल्या एकछत्री राजसत्तेच्या प्रतिनिधीचा सिंहासनाधिष्ठानसमारंभ आजच्या दिल्लीदरबारानें होणार आहे. इतिहास आणि काळ यांची समव्याप्ति असल्यामुळें इतिहास प्रतिक्षणीं एक एक पाऊल पुढें टाकीतच असतो. पण रस्त्यानें होणारा प्रवास मोजायला जसे मैलांचे दगड, जप मोजायला जसे माळेचे मणी, किंवा काळ मोजायला जसे घड्याळाच्या तबकडीवरील अंक, तसे इतिहासगणनेला लोकोत्तर राष्ट्रीय प्रसंग उपयोगी असतात. या दृष्टीनें पहातां सन १८५८ सालीं हिंदुस्थानचा राज्यकारभार इंग्रजी पार्लमेंटानें आपणाकडे घेतल्याचा कायदा आणि राणीचा जाहीरनामा हा या शतकांतील असला पहिला आणि आजचा दरबार हा दुसरा लोकोत्तर प्रसंग होय. १७५७ ची प्लासीची लढाई ही जशी लष्करी दृष्टीनें, १८५८ चा कायदा हा जसा राज्यघटनेच्या दृष्टीनें, तसाच १९११ चा दिल्ली-दरबार हा राजा आणि प्रजा यांच्या दरम्यानच्या खास नात्याच्या दृष्टीनें इतिहासकारांच्या ताम्रपटावर खोदून ठेवण्यासारखा प्रसंग होय. प्लासीस जें बीज १७५७ सालीं पेरलें गेलें, त्याला १८५८ सालीं अंकुर फुटले; आणि आजच्या दरबारानें त्या अंकुरापासून झालेल्या वृक्षाला फुलें आलीं. यापुढची पायरी म्हणजे ब्रिटिश साम्राज्यांतील इतर भागांप्रमाणें हिंदुस्थानला स्वराज्य मिळून त्याच वृक्षाला फळ येणें ही होय. हें फळ हिंदुस्थाननें चाखण्याच्या वेळेपर्यंत जगण्याइतकें दीर्घ आयुर्दाय आज जिवंत असलेल्या कोणाहि मनुष्यास मिळणें हें ईश्वरी नियमाप्रमाणें बहुधा अशक्यच आहे. भीष्म जसे उत्तरायणाची वाट पहात शरपंजरीं पडले होते, त्याप्रमाणें स्वदेशाच्या राष्ट्रीय स्वातंत्र्याचा उदय पाहण्याकरितां घोटाळणारा जीव-तो भीष्माचार्यांप्रमाणें इच्छामरणी नसल्यानें-ती प्रिय गोष्ट घडून येईपर्यंत धरून राहणें कोणाहि देशाभिमानी मनुष्यास शक्य नाहीं. म्हणून त्याला त्या भावी गोष्टीची मनानें नुसती कल्पना करून समाधान मानणें प्राप्त आहे. पण मागील पिढीच्या वैभवाच्या आठवणीइतकीच भावी पिढींच्या वैभवाची आकांक्षा मनुष्यमात्रास प्रिय असते. जॉर्ज बादशहांची हिंदुस्थानच्या भावी वैभवाची कल्पना कदाचित् आमच्या कल्पनेसारखीच संतोषंत नसेल; परंतु ज्या सहानुभूतीचें मर्यादाक्षेत्र अधिकाधिक वाढत जावें असें राजपुत्र या नात्यानें त्यांनीं १९०६ सालीं बोलून दाखविलें व ज्या वाढत्या अंगाच्या सहानुभूतीचा उल्लेख त्यांनीं राजा व बादशहा या नात्यानें परवां मुंबईस फिरून एकवार केला, त्या सहानुभूतीची अंतिम परिणति आम्ही प्रजाजन म्हणतों त्या प्रकारच्या राष्ट्रीय स्वातंत्र्यांत झालीच पाहिजे, हें थोडयाशा विचाराअंतीं राजेसाहेबांसहि कबूल येण्यासारखें आहे. आणि हें राष्ट्रीय स्वातंत्र्य हिंदुस्थानास मिळालेलें त्यांना स्वतःला दिसणें शक्य नसलें तरी, राजांच्या पिढीना साधा खाजगी व्यक्तीपेक्षांहि अधिक बेमालूम जडत असल्यामुळें आज ज्या सहानुभूतीनें त्यांचें अंतःकरण इतकें व्यापलें आहे तिचें अंतिम कार्य त्यांना, त्या वेळीं इंग्लंडच्या गादीवर असलेल्या वंशजाच्या द्वारें अनुभवावयास सांपडेल यांत

संशय नाहीं. येवढी प्रस्तावना करून बादशाही दिल्ली शहराच्या ऐतिहासिक चित्रपटाकडे आपण क्षणभर नजर टाकूं. ... ... ... ... ... ...

## दिल्लीची रुधिरप्रिय देवता

'दिल्ली' हें नांव उच्चारल्याबरोबर जशी अनेक ऐतिहासिक गोष्टींची आठवण होऊन मनांत कालवाकालव होते, तशी दुसऱ्या कोणत्याहि शहराच्या नांवानें होत नाहीं. कारण या शहरानें जितकें सुख व ऐश्वर्य पाहिलें तितकेंच दुःखहि पाहिलें. पण सुख तेवढें विसरून जाऊन दुःखाची तेवढी आठवण अधिक राहाण्याची मनुष्याच्या मनाची प्रवृत्ति असते. यामुळें दिल्ली हें नांव उच्चारतांच इतिहासज्ञांना दुःखदायक गोष्टीच अधिक आठवतात. दिल्ली अथवा इंद्रप्रस्थ हें नगर प्रथम वसविण्यांत आलें तें खांडववन जाळून, हें वर सांगण्यांत आलेंच आहे. या प्रसंगीं नाग म्हणजे रूपकदृष्ट्या सर्प, पण वस्तुतः नाग नांवाचे लोक यांची जी कत्तल झाली असें मानितां येईल, त्याच कत्तलीची दिल्लीच्या पुढील इतिहासांत अनेकवार पुनरुक्ति झाल्याचें आढळतें. इंद्रप्रस्थ नगरीच्या वास्तुदेवतेस रक्तप्राशनाची कांहीं अनिवार्य हाव असली पाहिजे; कारण असें एकहि शतक किंवा अर्धशतक लोटलें नसेल कीं, ज्या अवधींत दिल्लीस एखादी प्रचंड कत्तल होऊन नगर-भूमीवर रक्ताचा सडा शिंपडला गेला नाहीं! सन १३३९ सालीं महमद तघलखानें आपली राजधानी दौलताबादेस नेण्याचा विचार केला, तो दिल्लीच्या नागरिकांस पसंत नव्हता; व तो सक्तीनें अमलांत आणण्याचे कामीं हजारों लोक मारले गेल्याचें सांगतात. सन १३९८ सालीं तैमूरलंगानें दिल्ली घेतल्यावर त्याचे शिपाई लोक एकसारखी पांच दिवसपर्यंत दिल्लीच्या नागरिकांची कत्तल करीत होते! "रस्त्यांतून जाण्यास मार्ग नाहीं इतक्या प्रेतांच्या राशी सर्व शहरभर पसरल्या. हिरे, माणकें, सोनें, चांदी, वगैरे लूट तर किती जमा झाली याची गणतीच नाहीं! पकड, लूट व मारहाण यांशिवाय कोणास कांहीं सुचेना. प्रत्येक शिपायानें निदान पंचवीस गुलाम पकडून आणिले व सर्व दिल्लीशहर ओस पडलें." नादीरशहानें १७३९ सालीं दिल्लीस केलेली कत्तल प्रसिद्धच आहे. पुन्हां एक वेळ इतिहासकाराच्या शब्दांनीं बोलावयाचें तर "त्या वेळीं जे अनर्थ त्या राजधानीवर कोसळले ते ऐकूनहि अंगावर रोमांच उभे राहतात. इराणी लोकांनीं सर्व शहर जाळून लुटून फस्त केलें. प्रेतांचे ढीग व रक्ताचे पाट यांनीं सर्व रस्ते भरून गेले. तीस हजारांहून जास्त माणसें प्राणांस मुकलीं!" शिवाय व्यक्तिविषयक महत्त्वाकांक्षेनें दिल्लीच्या एकंदर इतिहासांत किती राजवंशांची उलथापालथ झाली व त्या उलथापालथींच्या अनुषंगानें किती कत्तली झाल्या, याची गणती करणें कठिण आहे. राजकारणानें घडून येणारा असा कोणताहि गुन्हा नसेल की जो दिल्लीस घडून आला नाहीं! हल्लींच्या दिल्लीच्या आसपास कमींत कमी उध्वस्त अशीं सात जुनीं गांवठाणें दिसतात; आणि जेथें एकहि जिवंत मनुष्य दिसत नाहीं अशा ठिकाणीं मोकळया ओसाड किंवा पडक्या इमारती व गवत उगवलेलीं आणि किड्यामुंग्यांनीं घरें केलेलीं जोतीं, पाये वगैरे

पाहणाराचें मन उदास झाल्याशिवाय रहात नाहीं. त्यांतूनहि मृत मनुष्यांस पुरून त्यांच्या थडग्यांवर इमारती बांधण्याची मुसलमान लोकांची चाल असल्यामुळें हुमायुनाच्या कबरस्थानासारख्या प्रचंड इमारती शिल्पकला या दृष्टीनें नेत्रांस जरी आल्हाद देतात, तरी मृत्यूची आठवण करून देऊन मनास उद्विग्न करितात. कलकत्त्यास जसें "सिटि ऑफ पॅलेसेस" (प्रासादनगर) म्हणतात तसेंच दिल्लीस "सिटि ऑफ टूम्ज" (स्मशाननगरी) हें नांव आहे. कर्मधर्मसंयोगानें दिल्लीइतके जयस्तंभहि दुसऱ्या कोठें एकत्र पहावयास मिळत नाहींत. म्हणून वर सांगितल्याप्रमाणें थडगीं, जयस्तंभ, मनोरे, कत्तली, राजे लोकांनीं भोगलेलें ऐश्वर्य व आपत्ति या सर्व गोष्टी 'दिल्ली' या नांवाचा उच्चार होतांच आठवून मनुष्याच्या मनांत कालवाकालव झाल्याशिवाय रहात नाहीं !

## दरबार दिल्लीसच कां ?

संसारांत मनुष्याचें आयुष्य नेहमींच्या सरासरीपेक्षां अधिक लांबलें तर दुःख पाहिल्याशिवाय डोळे मिटणें त्याला दुरापास्तच असतें. तशीच कांहीं स्थिति जुन्या पुराण्या दिल्लीची झालेली आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. अशा तऱ्हेचें हें शहर दरबारास इंग्रज सरकारानें तीन वेळां पसंत केलें, याचें सकृद्दर्शनी कोणासहि आश्चर्य वाटेल. पण एकतर जुन्या राजपरंपरेच्या इतिहासानें दिल्ली शहरास लोकोत्तर राजकीय महत्त्व येत आहे—हिंदु व मुसलमान सम्राटांनीं ज्या राजधानींत अनेक शतकें राज्य केलें त्या शहरास हल्लींहि निरंतर मुख्य राजधानीचा मान देणें शक्य आहे किंवा नाहीं हा एक वादच आहे; व हा वाद हल्लीं 'पायोनिअर' पत्रानें जोरानें लोकांपुढें आणिला आहे—परंतु कायमच्या राजधानीसहि जो मान मिळत नाहीं तो दरबारचा मान दिल्लीस मिळण्याचें कारण उघडच असें आहे कीं, पूर्वीं या देशांत हिंदु व मुसलमान सम्राट् ज्या स्थानावर होते त्याच स्थानावर इंग्रज प्रभु आज आहेत, असें सर्व जगाच्या निदर्शनास विशेष रीतीनें यावें. आठवण हा मनाचा खेळ आहे; आणि जुन्याच्या जागी नवें येईल तेव्हांच जुन्याची आठवण नाहींशी होते असा मनाचा धर्म असल्यामुळें, जें कार्य कायद्याच्या दृष्टीनें १८५८ सालीं तमसा नदीच्या कांठीं असणाऱ्या पार्लमेंटच्या सभागृहांत घडून आलें, तेंच कार्य मानवी मनाच्या दृष्टीनें घडवून आणण्यास दिल्लीस दरबार भरविणें हेंच योग्य आहे हें कोणीहि कबूल करील. दिल्ली शहराशीं आपला संबंध कायमचा जोडण्याकरितां इंग्रजांनीं तेथें अद्यापि प्रचंड इमारती बांधल्या नाहींत-किंबहुना इंग्रज केवळ काव्यमय, रम्य, पण पोकळ अशा गोष्टींचे भुकेलेले नसून, व्यवहारपटुत्व हाच त्यांचा मुख्य गुण आहे; यामुळें पुढेंमागें ते दिल्लीस अशा इमारती बांधतील किंवा नाहीं याचीहि शंकाच आहे. हिंदुस्थानांत पूर्वीचे राजे लोक राज्यारोहणाच्या प्रसंगी आपापल्या ऐपतीप्रमाणें हिरेमोत्यांची ताटें उधळीत व रस्त्यांतून दोन्ही दोन्ही हातांनीं चलनी नाण्यांची हत्तीवरून खैरात करीत; हा होपेचा पण फाजील

उघळेपणाचा प्रकार इंग्रज राजे इंग्लंडांत किंवा खुद्द दिल्लींतहि करीत नाहींत. परंतु अशा नीरस पण व्यवहारदक्ष इंग्रजांनाहि परंपरेचें दास्यत्व सर्वस्वीं झिडकारून अलिप्त राहतां येत नाहीं. खुद्द इंग्लंडांतहि नव्या राजाचा १९११ सालीं झालेला मुकुटधारण-समारंभ ज्या विधींनीं व ज्या शब्दोचारांनीं करण्यांत आला, तेच विधि व तेच शब्दोचार सन ७९५ सालच्या–म्हणजे सुमारें अकराशें वर्षांपूर्वीं झालेल्या–राज्यारोहणाच्या वेळीं उपयोगांत आणिलेले होते, असा दाखला निघतो! एरवींच्या प्रसंगीं इंग्रज राजाचा पोषाखपेहराव इतका साधा असतो कीं, तो हलकारे लक्कारे बरोबर न घेतां चार लोकांत मिसळेल तर तुम्हांआम्हांस ओळखितांहि येणार नाहीं. पण इतक्या सुसंस्कृत मनाच्या राजास व प्रजेस मुकुटधारणविधीचा अगदीं जुनाट व फाटकातुटका कित्ता गिरविल्याशिवाय समाधान वाटत नाहीं! देशी नाटकांतल्या इंद्रसभेंतील सोंगासारखा पोषाख आणि बुडकुलींतून पवित्र तेल चमच्यानें घेऊन ठराविक रीतीनें डोक्याखांद्यावर काढलेलीं स्वस्तिकें वगैरे गोष्टी एरवींच्या प्रसंगीं पाहून कोणासहि कदाचित् हंसूंच येईल. पण त्याच गोष्टी राज्यारोहणाच्या प्रसंगीं केल्यानें त्यांपासून गहन गांभीर्य उत्पन्न होऊं शकतें. अशाच कांहींशा मनोवृत्तीनें दरबार भरविण्याचेहि समारंभ केले जातात; व म्हणून कलकत्ता मुंबईसारखीं प्रचंड व धनाढ्य राजधानीचीं शहरें सोडून दिल्लीसारख्या मागसलेल्या व एका बाजूच्या शहरीं मुद्दाम जाऊन दरबार भरविण्यांत येतात हें अगदीं उघड आहे, व या दृष्टीनें पाहतां तें योग्यहि आहे. वास्तविक इंग्रजांसारख्या दर्यावर्दी व समुद्रावर स्वामित्व गाजविणाऱ्या व्यापारी योद्ध्यांस मुंबई किंवा कलकत्ता हींच शहरें दरबार भरविण्यास योग्य दिसावीं. तथापि दिल्ली शहर हें जुन्या ऐतिहासिक उपाधींनीं वेष्टिलेलें असल्यामुळें, हिंदुस्थानांतील इंग्रज राजाचा दरबार इंग्रजांनीं स्वतः वसविलेल्या व अभिमानास्पद अशा कलकत्ता व मुंबई शहरीं न भरवितां, जेथें पूर्वींच्या हिंदु-मुसलमान राजांच्या मोडक्यातोडक्या किंवा रिकाम्या इमारती–व अद्यापि गाडले गेलें नसल्यास–त्या इमारतींतून संचारणारें दिल्लीच्या रुधिरप्रिय वास्तुदेवतेचें भूत–याशिवाय जुन्या ऐतिहासिक साम्राज्याची आठवण करून देणारें किंवा सांधा जोडणारें दुसरें कांहीं एक अवशिष्ट नाहीं, अशा ठिकाणीं दरबार भरविल्याशिवाय इंग्रज राज्यकर्त्यांचें समाधान होऊं नये, यांतहि कांहीं आश्चर्य नाहीं. विसाव्या शतकांतील सुधारणा देखील, इंग्रजांसारख्या केवळ व्यवहारदक्ष अशा लोकांच्याहि मनांतील राजकीय भावनेवर किंवा श्रद्धाळूपणावर हरताळाचा बोळा फिरवूं शकत नाहीं. दिल्लीस दरबार भरविणें हें मेलेल्या हिंदुमुसलमान सम्राटांच्या नाकांवर टिचण्यासारखें उन्मत्तपणाचें कृत्य नसलें तरी, ज्या स्थळीं पूर्वीचे ऐश्वर्यसंपन्न सम्राट् होऊन गेले त्या वास्तूवरच दरबार भरविण्यांत विशेष औचित्य आहे, असें मानणें हें भोळेपणाचें किंवा श्रद्धाळूपणाचें लक्षण होय यांत शंका नाहीं. पण इंग्रज हे सुधारलेले असले तरी जोंपर्यंत त्यांनीं मनुष्य-स्वभाव सोडला नाहीं तोंपर्यंत, दिल्लीस दरबार भरविल्यानें हिंदी प्रजेच्या मनावर साम्राज्याची विशेष छाप बसेल, असें प्रामाणिकपणानें मानण्याइतका भोळेपणा त्यांचे

अंगीं मधून मधून चमकल्यास त्यांत आश्चर्य वाटण्यासारखेंहि कांहीं नाहीं. आतां दिल्लीस दरबार भरविण्याचें औचित्य पहावयाचेंच झालें तर तें एका दृष्टीनें दिसेल. म्हणजे सर विल्यम ल्हीवॉर्नर यांनीं नुकेंच एके ठिकाणीं लिहिल्याप्रमाणें इंग्रज सरकारच्या राज्यांत मिळालेल्या शांततेचें खरें चीज, घातपात व रक्तस्राव यांचेंच निरंतर साहचर्य असणाऱ्या दिल्लीसारख्या शहराचें उदाहरण लक्षांत घेतलें असतांच होणार आहे.

—केसरी १९११ डिसेंबर १२

## उमाजी नाइकाचे चरित्र

कुलास अनुलक्षून त्याच्या मर्मावर घाव घातला, तेव्हां, कर्णाच्या अंगीं असलेल्या खऱ्या क्षात्रतेजास साजेल अशा प्रकारचें ओजस्वी वाक्य त्याच्या तोंडास आलें व 'सूतो वा सूतपुत्रो वा यो वा को वा भवाम्यहं। दैवायत्तं कुले जन्म मदायत्तं तु पौरुषं' असें तो अश्वत्थाम्यास म्हणाला, असें वर्णन या प्रतिभासंपन्न नाटककारानें केलें आहे. परंतु वरील वाक्य वास्तविक पाहतां कर्णास मुळींच लागू पडत नाहीं. कारण तो खरोखर कुंतीचा पुत्र व अस्सल क्षत्रियच होता. आमच्या मतें हें वाक्य उमाजी रामोशासारख्या हीनकुलोत्पन्न शूर पुरुषासच अधिक यथार्थतेनें लागू पडेल. आज जवळजवळ शंभर वर्षें झालीं–त्या काळीं पेशवाई जाऊन इंग्रज सरकारचा अंमल महाराष्ट्रांत पूर्णपणें स्थापित झाला असतां, केवळ रामोशासारख्या कुलांत असा एक पुरुष होऊन गेला कीं, त्यानें कांहीं काळपर्यंत पुणें व सातारा जिल्ह्यांत पुरुषास बायका करून सोडल्या होत्या; आणि खुद्द इंग्रज सरकारच्या पदरीं एवढें मोठें लष्कर असतां प्रजेच्या सुरक्षितपणाविषयीं त्यांना रात्रंदिवस काळजी उत्पन्न करून सोडली होती. हा पुरुष म्हणजे उमाजी नाईक रामोशी हा होय. उमाजीनें आपल्या समकालीन युरोपियन लोकांवर अंगच्या शौर्यादि गुणांनीं इतकी छाप बसविली होती कीं, त्याजबरोबर युद्ध करून त्यास जिंकणाऱ्या कॅप्टन मॅकिंटॉश नांवाच्या सरदारास त्याचे चरित्र आपल्या हातानें लिहून ठेवावेंसें वाटलें. मग एतद्देशीय लोकांत त्याचे पोवाडे गाइले गेले व तो दरोडेखोर होता हें क्षणभर विसरून ते पोवाडे गाणारे व ऐकणारे हे वीररसपरिपूर्ण अशा त्याच्या चरित्रवर्णनांत आणि श्रवणांत तल्लीन होऊन गेले यांत नवल नाहीं. आजपर्यंत हें चरित्र मराठी वाचकांस केवळ पोवाड्यांतच उपलब्ध होतें; परंतु इतिहाससंशोधनाची जी लाट महाराष्ट्रामध्यें उठली आहे तिच्या योगानें उमाजी नाईक 'रामोशी'हि उदयास यावा, ही गोष्ट साहजिकच आहे. कारण इतिहासप्रसिद्धीला फक्त गुणोत्कर्षाचीच अपेक्षा असते. वय व लिंग यांप्रमाणें जातिहि इतिहास लक्षांत घेत नाहीं. एवढेंच नव्हे तर दुर्दैवानें सद्गुणांप्रमाणें उत्कृष्ट अवगुणांचाहि परामर्ष इतिहास घेतो. इतिहासलेखक'कडून वर्णन होण्यास सद्गुण काय किंवा दुर्गुण काय दोन्हींही लोकोत्तर असावे लागतात. ऐतिहासिक दृष्टीला सज्जनांइतकेच दुर्जनहि संग्राह्य वाटतात. पण ते दुर्जन झाले तरी असे असावे लागतात कीं, त्यांच्या योगानें समाजावर त्यांची म्हणून कांहीं वेळ छाप पडलेली असली पाहिजे.

इतिहास म्हणजे केवळ ' संतलीलामृत ' असतें किंवा असावें अशी ज्याची कल्पना असेल त्यास ऐतिहासिक विज्ञानाचें इंद्रियच नाहीं, त्याला इतिहासाचें खरें मर्मच कळलें नाहीं, असें खुशाल म्हणावें.

इंग्रजी भाषेंत सुप्रसिद्ध ' बारा बदमाषांचीं चरित्रें ' या नांवाचा एक ग्रंथ आहे; पण आजपर्यंत इंग्लंडांत हेच काय ते व एवढे बाराच बदमाष निर्माण झाले होते, असें त्यापासून अनुमान न काढतां, हे बारा लोक बदमाष होऊन गेले खरे, पण त्यांनीं आपलें नांव अजरामर केलें, असें अनुमान वरील ग्रंथाच्या नांवावरून काढणें अधिक योग्य होईल हें उघड आहे. प्रसिद्धि व चांगुलपणा या शब्दांची समव्याप्ति असावी, पण दुर्दैवानें ती तशी नाहीं. प्रसिद्धि व ऐतिहासिक महत्त्व यांची मात्र व्याप्ति समान आहे जगांत अनेक सज्जन जन्मास येतात व मरून जातात, असें नित्य घडत असेल; परंतु ' ऐतिहासिक दृष्टीनें ' पाहतां ' महत्त्व ' हाच काय तो एक खरा गुण दिसतो. नुसतें सज्जन होऊन भागत नाहीं. मनुष्य महत्त्वाचा असून वरतीं सज्जनहि असला तर अर्थात् दुधांत साखर पडल्यासारखेंच झालें. पण इतिहासास सौजन्य नसलें तरी हरकत नाहीं; त्यास दौर्जन्यहि चालेल; पण तें तरी जगास तोंडांत बोट घालावयास लावणारें पाहिजे !

उमाजीनें खून, दरोडे वगैरे जे अनेक भयंकर अत्याचार केले त्याबद्दल त्याला या लोकीं शासन तर झालेंच, पण त्याला परलोकींहि अधोगतिच मिळणें योग्य व त्याप्रमाणें त्यास ती मिळालीहि असेल यांत शंका नाहीं. परंतु आम्ही प्रारंभीं सांगितल्याप्रमाणें उमाजीच्या अवगुणांबरोबरच त्याच्या अंगीं शौर्य, साहस इत्यादि गुणहि असे विलक्षण होते कीं, त्यामुळें त्याच्या शत्रूसहि त्याचें चरित्र लिहावेंसें वाटलें. उमाजी हा निर्व्यसनी, परोपकारी व श्रद्धाळु असा होता. त्यानें श्रीमंतांस त्रास दिला तरी गरीबांवर दयाच केली. त्याच्यासंबंधानें कॅ॰ मॅकिंटॉशसाहेबांनीं असें लिहून ठेवलें आहे कीं, ' काळाच्या प्रतिकूलतेमुळें, तो मराठी राज्यांत एखादा शूर सरदार झाला असता पण लुटारूपणाचा धंदा पत्करल्यानें दरोडेखोर व बंडखोर झाला. ' सरदार होण्यासारख्या गुणाच्या मनुष्यास दरोडेखोरी आठवावी, यासारखी शोचनीय दुसरी कोणतीच गोष्ट नाहीं ! परंतु या बाबतींत उमाजीचा काळ व त्याचा आनुवंशिक संस्कार हींच कारणीभूत होत, यांत शंका नाहीं. तसेंच बंडखोरी करूं लागण्यापूर्वी कांहीं वतनी हक्कासंबंधानें उमाजीची भोरकर पंतसचिवांविरुद्ध तक्रार व गाऱ्हाणें होतें व त्या तक्रारींची दाद त्याचे समजुतीप्रमाणें यथान्याय न लागल्यामुळें बेदादीचें उट्टें त्यानें बेबंदशाहीनें काढण्याचा प्रयत्न केला, ही गोष्ट चरित्रकारांनी नमूद केलेली आहे. तथापि कारण कोणतेंहि असो, उमाजीसारख्या सद्गुणी बुद्धिमान् व पराक्रमी पुरुषाची प्रवृत्ति दरोडे व खून यांसारख्या उपद्रवी व घातक कृत्यांकडे झाली ही गोष्ट अत्यंत शोचनीय होय यांत शंका नाहीं. ग्रीक बादशहा अलेक्झांडर याची व एका दरोडेखोराची गांठ पडली असतां ' माझें फसलें मी सांपडलों, म्हणून मी दरोडेखोर ठरलों; तुमें साधलें म्हणून तुला राज्यपद मिळालें, एरवीं तूं व मी

सारखेच ' असा युक्तिवाद करून अलेक्झांडर यास सदरहू दरोडेखोरानें निरुत्तर केल्याचें आपण इंग्रजी पुस्तकांतून वाचतों. परंतु एका दरोडेखोरानें दुसऱ्यास निरुत्तर केल्यानें कोणच्याहि दरोड्याचें समर्थन झालें, असें मात्र नाहीं. दरोडेखोरीच्या गुणावगुणासंबंधाचा निवाडा वादी व प्रतिवादी यांच्या परस्परकोटिक्रमावरून लावावयाचा नसतो, तर न्याय-नीतीच्या सनातन कायदेकानूंवरूनच लावावयाचा असतो. जें वाईट तें वाईटच.

व्यक्तिशः उमाजी नाइकाच्या गुणावगुणांचा येथवर विचार झाला. तथापि त्याचाच पोवाडा आजवर लोकांनी कां म्हणावा ? इतर दरोडेखोर काय थोडे झाले ? त्यांचा पोवाडा कां झाला नाहीं ? या प्रश्नाचें उत्तर असें आहे कीं, आम्हीं प्रारंभीं सांगितल्या-प्रमाणें, या दरोडेखोरांच्या शौर्याची व कर्तृत्वाची त्याच्या समकालीन लोकांच्या मनांवर फार विलक्षण छाप पडलेली असली पाहिजे. कालांतरानें या छापेचा परिणाम असा होतो कीं, दुष्कृत्यें विसरलीं जातात; व मनुष्यमात्रांत साधारणतः शौर्यादि गुणांचा उत्कर्ष कमी असल्यानें, हे गुण ज्यांच्यामध्यें आहेत असल्या व्यक्तींबद्दल त्यांचा आदर मात्र शिल्लक राहून त्यांचे पोवाडे बनतात. असले पोवाडे सर्व देशांत आढळून येतात.

उमाजी रामोशाचा आत्मा आपल्या दुष्कृत्यांचा झाडा यमदरबारांत देत असतां, मृत्युलोकीं त्याचे पोवाडे व्हावे व त्याचीं चरित्रें लिहिलीं जावीं, हेंहि वरील चमत्कारिक मनुष्यस्वभावास अनुसरून आहे, एवढेच म्हणतां येईल.

—केसरी १९१० एप्रिल ५

## इंग्रजांची मदत घेणें ही चूक केली काय ?

इंग्रजांना आपल्या राज्यांत व्यापार करण्याची परवानगी दिली हीच मराठ्यांची पहिली घोडचूक झाली, या समजुतीइतकीच प्रबळ अशी दुसरी एक समजूत आहे; व ती ही कीं, मराठ्यांनीं इंग्रजांची मदत घेऊन त्यांचा हात आपल्या राजकारणांत शिरूं दिला ही त्यांची मोठी चूक झाली. पहिली समजूत बरोबर नाहीं हें आम्हीं पूर्वी सिद्ध केलेंच आहे; पण दुसऱ्या समजुतीबद्दल तसें म्हणतां येत नाहीं. त्या समजुतींत सत्याचा अंश बराच आहे. तथापि, इंग्रजांची मदत घेण्याचें मराठ्यांना त्या स्थितींत सर्वस्वीं टाळतां आलें असतें कीं नाहीं हा प्रश्नच आहे. आपलें भांडण आपण भांडावयाचें, दुसऱ्यास त्यांत हात घालूं द्यावयाचा नाहीं, ही भावना खऱ्या स्वाभिमानबुद्धीची असून शिवाय तिनें अखेर आपलें हितच होतें. स्वावलंबन हें नेहमीं सुखपर्यवसायी असतें. पण शत्रूचा प्रतिकार करावयाचा किंवा स्वहित बेसुमार चोकाळूं द्यावयाचें अशी, म्हणजे सूडाची किंवा अप्पलपोटेपणाची बुद्धि मनुष्याच्या मनांत उत्पन्न झाली म्हणजे हातीं लागेल त्या साधनाचा उपयोग करण्यास संपन्न मनुष्यहि प्रवृत्त होतो. मग संकटांत सांपडलेला व आत्मसंरक्षण करूं पाहाणारा मनुष्यहि तसें करील तर नवल काय! गोऱ्या गोऱ्या लोकांच्या युद्धांत काळेपणाची किंचित्हि छटा असलेल्या लोकांची मुळीच मदत घ्यावयाची नाहीं हा इंग्रजांचा बाणा, कोअर लोकांशीं युद्ध होतें तोंपर्यंत टिकला; पण

प्रस्तुतच्या युद्धामुळें प्राणसंकट उपस्थित झालें तेव्हां पूर्वीचे स्वावलंबनाचे इंग्रजांचे विचार टिकले नाहींत. आतां तर त्यांना निमेपिशांहि दसपट काळा आदमी मिळाला तरी त्याची मदत ते घेतील; तो बंदुक धरण्यास समर्थ असला म्हणजे झालें! प्रस्तुतच्या युद्धांत फ्रान्सनें मोरोक्कन लोकांच्या व इंग्रजांनीं हिंदी लोकांच्या पलटणींचा उपयोग आपल्या युरोपिअन गोऱ्या शत्रूविरुद्ध केला हें प्रसिद्धच आहे. त्यांचा तो स्वावलंबनाचा बाणा व वर्णभेद संकटानें जिरविला.

पण मराठ्यांनीं आपल्या भांडणांत इंग्रजांची मदत घेतली ती केवळ प्राणसंकटाच्या प्रसंगींच घेतली असें मात्र म्हणतां येत नाहीं; तर वैरबुद्धि किंवा स्वार्थबुद्धि यांच्या प्रशमनार्थ घेतली. —मराठे व इंग्रज, उत्तरार्ध पृ. १२-१३

## दुसऱ्याची मदत ही केव्हां साधक व केव्हां बाधक ?

हिंदी लोक परदेशांत असेच गेले असते तर तेहि कदाचित् परस्परांविरुद्ध लढले नसते; पण स्वदेशांत असतां ही त्यांची बुद्धि जागृत राहिली नाहीं एवढी मात्र गोष्ट खरी; कारण आपापसांत भांडून आपल्या भांडणांत परक्याची मदत घेतल्यामुळेंच हिंदी लोकांचें स्वातंत्र्य नष्ट झालें. या बाबतींत लागणारा दूरदर्शीपणा एकाहि हिंदी मुत्सद्द्याच्या आंगीं दिसून आला नाहीं. थोरल्या बाजीरावानें व नानासाहेबानें आंग्र्याविरुद्ध इंग्रजांची मदत घेतली. रघुनाथरावानें नानाफडनविसाविरुद्ध घेतली; नानाफडनविसानें होळकराविरुद्ध घेतली; बाजीरावानें शिंद्याविरुद्ध घेतली; नागपूरकर भोसल्यानें पेशव्यांविरुद्ध घेतली; मुसलमानांनीं इंग्रजांची मदत आपापसांविरुद्ध व पेशव्यांविरुद्ध घेतली. दिल्ली, बंगाल, औध, हैदराबाद व कर्नाटक या ठिकाणीं सर्व राजकारणी उलाढाली इंग्रज व फ्रेंच यांची मदत घेऊन झाल्या. नाहीं म्हणावयास युद्धांत इंग्रजांची मदत घेतली नाहीं अशी शिंदे, होळकर, आंग्रे आणि विशेषतः हैदर व टिपू यांनीं; पण टिपूनें इंग्रजांची मदत न घेतली तर फ्रेंचांची घेतली-मिळून घेतलीच! आतां या सर्व गोष्टींवरून या सर्वांना अदूरदर्शी मुत्सद्दी म्हणण्यापेक्षां, अशी मदत घेणें हेंच परिस्थितीच्या मानानें योग्य होतें असें तरी कां म्हणूं नये हाहि एक प्रश्नच आहे. राजकारणांत सर्वांना सर्वांची मदत घ्यावीच लागते. इंग्रजांचें देखील टिपूविरुद्ध मराठे व निजाम यांची मदत घेतल्याशिवाय कोठें चाललें ? पण दोष असेल. तर तो इतकाच कीं, कित्येकांना मदत घेण्याचें कारण संपल्याबरोबर मदतनिसाला झाडून दूर टाकतां आलें नाहीं. स्वतःच्या पायांत थोडाबहुत खंबीरी असल्यावर दुसऱ्याची मदत घेतल्यास ती फारशी बाधक होत नाहीं; पण ज्यांची भिस्त सर्वस्वीं दुसऱ्यावरच, त्यांना स्वतः मदतनिसांनीच खाऊन टाकावें यांत आश्चर्य नाहीं. आंग्र्यांच्या प्रकरणीं मराठ्यांनीं इंग्रजांची मदत घेतली किंवा टिपूच्या प्रकरणीं इंग्रजांनीं मराठ्यांची मदत घेतली तरी पण उभयतांचा समाइक कार्यभाग होताच दोघेहि पूर्वीप्रमाणेच स्वतंत्र झाले; त्या मदतीपासून अप्रत्यक्ष परिणाम कांहीं होवो, पण प्रत्यक्ष स्वातंत्र्यनाश असा कोणाचाच झाला नाहीं. पण याच्या अगदीं उलट

उदाहरणें म्हटलीं म्हणजे राघोबा, बाजीराव (दुसरा), निजाम, कर्नाटकचे नवाब यांचीं होत. या प्रत्येकानें इंग्रजांची मदत घ्यावयास जातांना स्वतःचे हातपाय इतके जखडून घेतले कीं, मदतीचा कार्यभाग झाल्यावर त्याला मदतनिसास झाडून दूर टाकतां आलें नाहीं. घोड्यानें आपल्या शत्रूचा नाश करण्याकरितां मनुष्यास पाठीवर बसूं दिलें; पण शत्रूचा नाश झाल्याबरोबर घोड्याला कांहीं मनुष्यास पाठीवरून फेकून देतां आलें नाहीं; या इसापनीतींतील गोष्टीचें रहस्य हिंदुस्थानचे हिंदु-मुसलमान राजेरजवाडे यांच्या आणि इंग्रजांच्या संबंधांत पदोपदीं अनुभवास येतें. —मराठे व इंग्रज, उत्त० पृ. १६-१७.

## सवता सुभा

इंग्रजांना आपल्या राज्यांत व्यापार करण्याची परवानगी दिल्यानें किंवा केवळ प्रसंगविशेषीं त्यांची मदत घेतल्यानेंच मराठ्यांचें राज्य गेलें असें म्हणवत नाहीं. या दोन गोष्टी करून देखील राज्य राहिलें असतें; पण राज्य जाण्याचीं खरीं कारणें आमच्या मतें मुख्य अशीं दोनच आहेत. पहिलें, मराठ्यांमधील सवत्या सुभ्याची आवड आणि दुहीचा, शिस्तीचा व राष्ट्राभिमानाचा अभाव; आणि दुसरें, कवाइती लष्कर आणि सुधारलेली युद्धसामग्री यांचा अभाव. पहिल्या कारणासंबंधानें इतकेंच सांगितलें असतां पुरें होईल कीं, रघुनाथराव किंवा गाइकवाड यांनीं घरच्या भांडणांत इंग्रजांचा हात शिरूं दिल्यानंतरहि जरी मराठे उमजते व एक होते तरी इंग्रजांचें कांहीं चाललें नसतें; पण एकजुटीनें व एकदिलानें काम करण्याची मराठ्यांना संवयच नव्हती असें म्हटलें तरी चालेल. इंग्रजांशीं लढला नाहीं असा वास्तविक एकहि मराठा सरदार नाहीं; पण ते सर्व मराठे सरदार मिळून—फार काय? दोघे दोघे तिघे तिघे असे मिळून देखील—एकदम इंग्रजांविरुद्ध लढले नाहींत; व याच गोष्टीचा इंग्रजांस सर्वांत फायदा झाला. राघोबाच्या कलहाच्या वेळीं पेशवे, शिंदे, होळकर हे सर्व एकजुटीनें वागले म्हणून इंग्रजांचें त्यांच्याविरुद्ध कांहीं चाललें नाहीं. वडगांवास त्यांना मराठ्यांस शरण येऊन अपमानास्पद तह करावा लागला; व तो तह अपमानास्पद म्हणून मोडून फिरून जरी त्यांनीं युद्धाला आरंभ केला तरी शेवटीं त्यांना हार खावी लागलीच; आणि 'जो इंग्रजांना शरण येऊन पाठीस पडला त्याला अभय देणें हेंच इंग्रजांचें ब्रीद' अशी जी अभिमानाची भाषा प्रथम ते बोलत होते ती सोडून देऊन रघुनाथरावाला त्यांना अखेर नाना फडणविसाच्या स्वाधीन करावेंच लागलें. तसेंच ज्या निजामाचें मराठ्यांपासून संरक्षण करण्याचा विडा इंग्रजांनीं उचलला होता व ज्याच्या साहाय्यामुळें त्यांना टिपूचा पाडाव करितां आला, त्या निजामावर मराठ्यांनीं १७९६ त स्वारी केली; तेव्हां इंग्रजांना हालचाल न करितां निमूटपणें बसावें लागलें. याचें कारण, सर्व मराठे तेव्हां एक होते, त्यांच्यांत फाटाफूट झाली नव्हती हेंच होय! पुढें बाजीराव गादीवर बसण्याचा प्रश्न निघाला तेव्हांहि शिंदे व होळकर एकविचारानें वागते तर बाजीरावाची इंग्रजांकडे जाण्याची छाती झाली नसती. ते म्हणतील त्याला ते गादीवर बसविते. कारण, नाना

फडणविसाजवळ शहाणपण असलें तरी लष्करी सामर्थ्य नव्हतें; आणि बाजीरावास पदच्युत केल्यानें तो जरी इंग्रजांकडे गेला असता तरी वसईचा तह होताना. इंग्रजांना रघुनाथरावाचा पक्ष धरल्याचा परिणाम माहीत होता, म्हणून त्यांनीं बाजीरावास पाठीशीं घातलाच नसता; व घातला असता तरी शिंदेहोळकरांच्या एकजुटीपुढें त्यांचें कांहीं एक चाललें नसतें. बरें, वसईचा तह नापसंत पडून, व आपल्या हातचा पेशवा इंग्रजांनीं स्वतःच्या हाताखालीं घातला या रागावर शिंदे-होळकर हे दोघेहि इंग्रजांशीं लढले. त्यांचें इतर भांडण कांहींहि असो, पण वसईचा तह फिरवून पेशवा मराठ्यांच्या हातीं ठेवावयाचा इतक्यापुरती तरी त्यांची एकवाक्यता होती. अर्थात् दोघेहि मिळून इंग्रजांशीं लढते तर वसईचा तह दुरुस्त झाला असता; पण आधीं शिंदा लढून पुरा पराभूत झाल्यावर मग होळकरास लढण्याची हौस आली. अर्थात् एकेकट्याशीं निरनिराळें लढायला सांपडल्यानें इंग्रजांची सोयच झाली. शिंद्याचा पराभव कसा होतो ही मौज पहात होळकर बसला होता. बरें, शिंद्याचा पराभव झालेला पाहून बोध घेऊन गप्प बसावें, तेंहि नाहीं! एकट्यानेंच लढाईस सुरवात करून त्यानें विनाकारण आपला नाश मात्र करून घेतला. हीच संधि फिरून १८१७-१८ सालीं आली होती. इंग्रजांनीं आपल्यावर इतके उपकार केले, सर्वांनीं आपला पक्ष सोडला असतांहि त्यांनीं आपणास पाठीशीं घालून राज्यावर बसविलें, आपल्या बापाला न कां मिळेना पण आपणाला तरी इंग्रजांनी गादी दिली, व अशा ना अशा रीतीनें आपला पूर्वीचा शब्द खरा केला, ही गोष्ट लक्षांत ठेवून बाजीरावानें इंग्रजांविरुद्ध लढण्यास तयार होऊं नव्हतें; पण वसईच्या तहाची लाज किंवा इंग्रजांचा जाच वाटून तो लढाईस तयार झाला. तेव्हां शिंदेहोळकरांच्या दृष्टीनें फिरून १८०२ ची स्थिति प्राप्त झाली. तेव्हां तरी त्यांनीं पुढें जोडीनें घेऊन बाजीरावास साहाय्य करावयाचें होतें; पण तेंहि केलें नाहीं. व बाजीराव शरण आल्यावर होळकरानें एकट्यानेंच फिरून हातपाय हालवून ते अधिक जखडून मात्र घेतले! पण इंग्रजांचें वर्चस्व मराठी राज्यांतून कमी व्हावें अशी शिंदे, होळकर व भोसले यांच्या मनांतून इच्छा असली तरी तींत बरीचशी भेसळ होती. इंग्रजांबरोबरच आपणांखेरीज इतर मराठे सरदारांचें वर्चस्व कमी झालें तर हवें-इंग्रजांच्या हातून तें घडून आल्यानें इंग्रज मधल्यामध्यें प्रबळ झाले तरी तें चालेल-अशी प्रत्येकाच्या मनांत गुप्त भावना असल्यानें कोणाचें कांहींच साधलें नाहीं. इतरांचा तर नाश झालाच; पण अखेर त्यांचा स्वतःचाहि नाश झाल्याशिवाय राहिला नाहीं!

## येगिस्त

मराठ्यांतील दूरदर्शी मुत्सद्द्यांना इंग्रजांचें धोरण दिसत नव्हतें किंवा त्यांच्या मुत्सद्दीगिरीचे डावपेंच कळत नव्हते असें नाहीं; पण त्यांना त्यांच्याशीं टक्कर देतां आली नाहीं हीच गोष्ट खरी. मोंगलांची पातशाही औरंगजेबाच्या मरणाबरोबरच ढासळली आणि साम्राज्यसत्तेच्या बुद्धिबळाचा डाव हिंदुस्थानच्या प्रचंड पटावर एका बाजूनें इंग्रज

व दुसऱ्या बाजूनें मराठे खेळावयास बसले होते. दोघांची मोहरी प्रथम सारखीच व त्या मोहऱ्यांची पर्गेहि सारखींच होती. दोघांनाहि आपल्या मोहऱ्यांकडून सर्व पट आक्रमावयाचा होता व दुसऱ्याचीं मोहरीं होतील तितकीं निकामी करून डावांतून कांढून टाकावयाचीं होतीं. डावांत कोण कोणतें मोहरें कोणत्या हेतूनें पुढें टाकतो याची कल्पना एकमेकांस अगदींच नसते असें नाहीं; पण सुरवातीस उभयपक्षीं खेळणारे गडी समबल असतांहि दुसरा पाहात असतां त्याच्या बुद्धीस आकलन न होणारे, किंवा आकलन करितां येत असूनहि प्रतिकार करितां न येण्यासारखे डाव टाकणें यांतच काय तें 'बुद्धिबल' असतें. जेथें हें बुद्धिबल एकापेक्षां दुसऱ्यास अधिक असतें तेथेंच कांहीं तरी प्यादी-मातेसारखा डाव होतो. साम्राज्यपटावरचा डाव मराठ्यांना खेळावयास मुळींच येत नव्हता असें नाहीं. इंग्रज दक्षिण हिंदुस्थानांत जितके घुसले त्यापेक्षां पुष्कळच अधिक मराठे उत्तर हिंदुस्थानांत घुसले होते. पण नाक्याचीं घरें घेऊन बसण्यांत इंग्रजांनीं अधिक शहाणपणा दाखविला; व शेवटीं मोहऱ्यांच्या गर्दी-मारामारीची वेळ आली तेव्हां मराठ्यांचीं मोहरीं बिनजोरीं सांपडून मारलीं गेलीं !

इंग्रज व्यापारांतून निघून राजकारणांत पडले ही गोष्ट मराठ्यांना १७६५ च्या सुमारासच दिसून आली होती.तसेंच त्यांचा प्रयत्न हिंदी राजेरजवाड्यांच्या भांडणांत पडून आपला फायदा करून घ्यावयाचा आहे हेंहि त्यांना लवकरच दिसून आलें. पण उतरणी-वर उभें असतां भरला गाडा अंगावर आलेला जसा सांवरून धरतां येत नाहीं, तसेंच मराठ्यांचें इंग्रजांसंबंधीं झालें. इंग्रजांना इमानी असें कोणींच मानलें नाहीं. सर्व मराठे त्यांना बेमान समजत. "इंग्रजांचें मानस आहे कीं, हैदरखान, श्रीमंत व नबाब तिघां-च्याहि दौलता घ्याव्या. त्यास कोणेहि प्रकारें एकाशीं शकटभेद करून एकास खालीं पाडावें, असें करतां एक राहील त्यास आपण शेवटीं गुंडाळावें." असलें हें इंग्रजांचें धोरण पुण्याच्या दरबारास विदित होतें; पण असें असतांहि पेशव्यांनीं टिपूविरुद्ध इंग्रजांस मदत दिलीच कीं नाहीं ? —मराठे व इंग्रज, उत्तरार्ध पृ. १७-२०

## राष्ट्राभिमानाचा अभाव

'बळी तो कान पिळी' हीच दृष्टि ठेवली तर मराठेशाहीचा शेवट इंग्रजांचे हातून झाला याबद्दल त्यांना दोष लाविता येत नाहीं. इंग्रज हिंदुस्थानांत कांहीं मोक्षसाधनाकरितां आले नव्हते. त्यांना व्यापार करून संपत्ति मिळवावयाची होती, आणि व्यापार करतां करतां त्यांना जर राज्यहि मिळालें तर तें त्यांनीं कां घेऊं नये ? राजसत्तेच्या बळावर व्यापार वृद्धिंगत करतां येतो हा नियमच आहे. शिवाय राज्य म्हणून मिळालेल्या मुलखा-पासून प्रत्यक्ष वसूल मिळतो तो वेगळाच. या दृष्टीनें पाहतां ज्यांनीं आपला हात चालवून नवें राज्य मिळविलें त्यांना दोष न देतां, ज्यांनीं हातीं असलेलें राज्य गमावलें त्यांनाच दोष दिला पाहिजे. एकदां राज्य मिळविण्याच्या मागें मनुष्य लागला म्हणजे मग न्यायान्यायाचा सूक्ष्म विवेक तो करीत बसत नाहीं. मराठ्यांना तरी उत्तर हिंदुस्थानां-

स राज्य संपादण्याचा काय हक्क होता? त्यांनी दक्षिणेंत मोंगलांच्या हातून जुनें स्वराज्य परत मिळविलें येथपर्यंत न्यायाची बाजू ठीक होती. पण साम्राज्यसत्ता स्थापण्याच्या नादीं लागून जेव्हां त्यांनी उत्तर हिंदुस्थानांत धुमाकूळ माजविला, तेव्हां न्याय कोठें राहिला होता? मोंगलाकडून सनद मिळाल्यानें मराठयांना रजपुतांवर तरवार चालविण्यास जितका न्याय्य हक्क प्राप्त झाला असेल तितकाच मोंगलांचे दिवाण म्हणून साधेल त्या प्रयत्नानें दक्षिणेंतील मराठी राज्यें जिंकण्याचें मोंगलांचें उरलेलें काम पुरें करण्याचा हक्क इंग्रजांनाहि मिळाला होता, असा युक्तिवाद कोणीं लढविला तर त्याला उत्तर देणें कठिण जाईल. केवळ सामर्थ्य व महत्त्वाकांक्षा यांच्या दृष्टीनें बोलावयाचें तर मराठयांचें राज्य इंग्रजांनीं घेतल्या-बद्दल त्यांचा राग न येतां हातचें राज्य गमावण्याचा जो नादानपणा मराठयांनीं दाखविला त्याचा मात्र राग येतो खरा!

## परधार्जिणपणा

इंग्रजांच्या फौजेंत शेंकडा विसांहून अधिक इंग्रज शिपाई केव्हांहि नव्हते; शेंकडा ऐंशीं हिंदीच होते. इंग्रजांना एकमेकांविषयीं आपलेपणा वाटत होता तसा हिंदी लोकां-विषयीं हिंदी लोकांना, निदान हिंदूंविषयीं हिंदूंना, त्यांतूनहि निदान मराठयांविषयीं तरी मराठयांना, कां वाटूं नये? पण सर्वांत महत्त्वाची गोष्ट ही कीं, मराठयांच्या भांडणांत जर मराठयांनीं आपण होऊन इंग्रजांना घेतलें नसतें तर नसतें भांडण उकरून काढून, किंवा विनाकारण म्हणजे केवळ विजिगीषेनें मराठयांच्या राज्यावर स्वारी करून त्यांचें राज्य जिंकण्यास इंग्रजांना आणखी तीनचारशें वर्षेंहि कदाचित् पुरलीं नसतीं! उत्तरहिंदु-स्थान मोंगलांनीं वेडेपणामुळें इंग्रजांना दिलें असें जरी घेऊन चाललें तरी अठराव्या शतकाच्या अखेरपर्यंत यमुनानदीच्या दक्षिणेस इंग्रजांचा एक वीतभर देखील मुलूख नव्हता. येऊन जाऊन पश्चिमकिनाऱ्यावर एक मुंबई, सुरत वगैरे ठाणीं आणि पूर्वकिनाऱ्यावर थोडाथा मुलूख इतकाच काय तो त्यांच्या हातीं होता. असें असतां डिपूविरुद्ध मदत करून इंग्रजां-ना शेंकडों मैलांचा मुलूख कोणीं मिळवून दिला? मराठयांनींच ना? निजाम व मद्रास इलाख्यांतील मुसलमान यांनीं इंग्रजांस घरांत घेतल्याचें आपण एक वेळ सोडून देऊं; पण उत्तरेस यमुना नदी, ईशान्येस कटक संबळपूर, पूर्वेस पूर्वसमुद्र, आग्नेयीस कावेरी नदी, दक्षिणेस म्हैसूर, नैर्ऋत्येस मलबार, पश्चिमेस पश्चिमसमुद्र, व वायव्येस राजपुताना एवढ्या प्रचंड क्षेत्रांत अगदीं अठराव्या शतकाच्या मध्यभागापर्यंत इंग्रजांना पाय ठेवण्यास तरी जागा काय होती? अशी स्थिति असतां त्यांना आपल्या भांडणांत न्यायाधीश किंवा मदतनीस म्हणून मराठयांनीं कां घेतलें?

मराठे जर एकमतानें वागते तर इंग्रजांचें नुसतें टपालहि या मुलखांतून फिरूं शकलें नसतें. ते एकमतानें वागते तर इंग्रजांना मुळीं सैन्यच मिळालें नसतें; त्यांनी परक्या लोकांचें सैन्य जमविलें असतें तरी त्याचा प्रवेश मराठी मुलखांत झाला नसता; प्रवेश झाला असता तरी त्याला रसद मिळाली नसती व छापे पडून सैन्य कापून निघालें

आणि ही स्थित्यंतरें कशी घडून आली? मोंगलांशीं लढावयाचें असतां जातिभेद आडवा आला नाहीं व इंग्रजांशीं लढावयाचें असतां मात्र तो आडवा आला याची उपपत्ति काय सांगतां येणार?

मोंगलांच्या वेळीं जे मराठे व ब्राह्मण खांद्याला खांदा लावून लढत होते ते मनानें किंवा कृतीनें आजच्या दृष्टीचे समाजसुधारक होते असें म्हणतां येईल काय? शिवाजीनें ज्या वेळीं महाराष्ट्रमंडळांत एकी करून मुसलमानांपासून देशाचें संरक्षण करावयाचें योजिलें त्या वेळीं त्यानें जातिभेदाविरुद्ध व्याख्यानें दिलेलीं आढळत नाहींत! त्यानें आपल्या राज्यांत केवळ गुणांकडे पाहून कर्ते पुरुष जवळ ओढले व ज्यांच्या अंगीं कर्तृत्व नव्हतें त्यांस दूर लोटलें ही गोष्ट प्रसिद्ध आहे. त्यानें अमुक म्हणजे मराठा व अमुक म्हणजे ब्राह्मण असा भेदाभेद केला नाहीं असें दिसतें. पण इकडे पहावें तर शिवाजी देखील सनातन पद्धतीप्रमाणें जातिभेद मानणाराच होता. वर दर्शविल्याप्रमाणें त्यानें केवळ सद्गुणनिष्ठ आवडनिवड दाखविली तो तो समाजसुधारक किंवा जातिभेदाचा द्वेष्टा होता म्हणून खास नव्हे. तसेंच पेशव्यांच्याहि वेळीं सनातन जातिभेद मान्य होता म्हणून कांहीं प्रत्यक्ष राजकारणांत जातिनिष्ठ आवडनिवड दाखविली गेली नाहीं, तर दौलतीच्या कल्याणाच्या दृष्टीनेंच ती दाखविली गेली. बाळाजी विश्वनाथ पेशवा झाल्यानंतर जीं घराणीं उदयास आलीं त्यांतील शेंकडा पाऊणशें घराणीं तरी ब्राह्मणेतर होतीं. त्या वेळची सरंजामी यादी जर काढून पाहिली तर भारी सरंजामदार ब्राह्मणेतर असलेलेच आढळतील. पेशव्यांनीं कोंकणस्थ ब्राह्मणांचें कल्याण केलें असाहि एक विशिष्ट आरोप त्यांतल्या त्यांत त्यांच्यावर लादण्यांत येतो. पण त्यालाहि फारसा आधार नाहीं. मेहेंदळे फडके रास्ते पटवर्धन मेहेंदळे-आणखी फार तर आम्हांस माहित नसेल असा एखाददुसरा-याशिवाय कोंकणस्थ सरदार तरी असे कोण होते? पेशव्यांशिवाय बाकीचे सर्व प्रधान, तसेंच विंचूरकर पानशे पुरंदरे मुजुमदार हिंगणे वगैरे सरदार मंडळी देशस्थ होती. गोविंदपंत बुंदेल्यासारखे कऱ्हाडे सरदारहि अनेक होते. येऊन जाऊन कारकुनी फडांत काय कोंकणस्थ मंडळी असतील ती.

—मराठे व इंग्रज, उत्तरार्ध, पृ. ३६, ३७

## मध्यवर्ती सत्तेचा अभाव

शिवाजीच्या स्वराज्यस्थापनेच्या वेळीं राजा व अष्टप्रधान एवढींच राज्याचीं अंगें होतीं. राज्य एकसत्तात्मक असून अष्टप्रधान हे सल्ला देणारे, पण जबाबदार कामगार होते. शाहूच्या कारकीर्दींत सरंजामी सरदार प्रथम उत्पन्न झाले. या सरदारांकडे आपापल्या प्रांतांतील दिवाणी, मुलकी व लष्करी व्यवस्था असे. ही व्यवस्था करून उरलेली, पण आगाऊ जमाबंदीनें ठरलेली रकम त्यांनीं छत्रपतीला द्यावयाची असे. सरंजामी सरदार उत्पन्न व्हावयाला व मराठ्यांची सत्ता स्वराज्याबाहेर पसरण्याला एकच गांठ पडली, असें कोणी इतिहासज्ञ म्हणतात. पण आधीं सरंजामी सरदार उत्पन्न

सूत्रें फडणविसांच्या हातीं आली तेव्हां मध्यवर्ती सत्तेची आणखी एका पायरीनें अवनति झाली. जी स्वामिनिष्ठेची भावना शाहूसंबंधानें होती ती माधवरावासंबंधानें उरली नाहीं; व जी माधवरावसंबंधानें होती ती नानाफडणविसासंबंधानें उरली नाहीं; मग कोंकणस्थ भानू नांवाच्या फडणविसाऐवजीं देशस्थ बोकील नांवाचा फडणवीस किंवा कारभारी असता तरी तीच स्थिति व्हावयाची. अशा रीतीनें घड्याळांतील मुख्य स्प्रिंग किंवा कमान शिथिल व निर्जीव झाल्यामुळें छत्रपतींची सत्ता सरंजामी सरदारांपर्यंत वाटवाटून विभागली गेली; व मराठेशाहीला संयुक्त साम्राज्याचें स्वरूप न रहातां केवळ एका तात्पुरत्या संघाचें स्वरूप आलें. खरें संयुक्त स्वराज्य म्हणजे फेडरेशन व संघ म्हणजे कॉन्फिडरसी. फेडरेशन व कॉनफिडरसी यांतील भेद फार महत्त्वाचा आहे. दोन्ही घटना अनेक अवयवांच्या मिळून बनलेल्या असतात; पण फेडरेशनमध्यें हे अनेक अवयव अनेक अंगांनीं एकत्र जखडले गेलेले असतात व एकजीव झालेले असतात. याच्या उलट कॉन्फिडरसीमध्यें हे अनेक अवयव फक्त एका अंगानें कोठें तरी एका बिंदूशीं एकमेकांना चिकटलेले असतात; म्हणून फेडरेशनपेक्षां कॉन्फिडरसी ही थोड्याशा धक्क्यानें मोडूं शकते. एकतंत्री राज्यपद्धतींत जें काम राजनिष्ठेच्या भावनेनें होतें तेंच फेडरेशनमध्यें ( संयुक्त स्वराज्यांत ) सामुदायिक प्रेमाच्या भावनेनें घडून येतें. अनेक हे एकजीव झाले म्हणजे एकच होत. संघ किंवा कॉन्फिडरसी यांत नैष्ठिक प्रेम असत नाहीं. तात्पुरता स्वार्थ हेंच काय तें संयोगकारण असतें; पण हा स्वार्थ सात्त्विक किंवा मोठ्या दृष्टीचा नसल्यामुळें तो वाटेल तेव्हां थोड्या कारणानें आपलें रूप बदलूं शकतो. मराठेशाहींत सरंजामी सरदारमंडळाच्या पुढच्या पुढच्या दिवसांत प्रत्येक सरदार अधिक अधिक जड बुडाचा होऊं लागला. अर्थात् पेशव्यांच्या फडणविसाची बुद्धि किंवा त्याचा मानीव अधिकार अशा नाजुक मध्यवर्ती आधारावर लोंबत राहाणारें हें सरंजामी सरदारमंडळाचें ओझें फार दिवस कसें लोंबत राहाणार? मराठ्यांचें राज्य शिवाजीच्या वेळच्या स्वराज्याच्या मर्यादेबाहेर मुळीं गेलेंच नसतें, तर हा सगळा घोटाळा झाला नसता, असें या बाबतींत कित्येकांस वाटतें; पण त्यावर आमचें म्हणणें इतकेंच की, अशा प्रकारची अंगठीवरील खड्यासारखीं लहानशीं राज्यें हिंदुस्थानांत दुसरीं पुष्कळ होतीं, पण तीं तरी अमर कोठें टिकलीं? खरी गोष्ट हीच कीं, मराठेशाही विस्तार पावली यांत तिची कांहीं चूक नव्हती, तर त्या विस्ताराबरोबरच तिजमध्यें अंतःस्थ सुदृढता यावयास पाहिजे होती ती आली नाहीं. ही सुदृढता केव्हांहि एक मध्यवर्ती प्रबळ राजसत्ता किंवा सर्वव्यापी प्रबळ लोकसत्ता यांपैकीं कोणत्या तरी एका सत्तेनें येऊं शकते. मराठेशाहीच्या अखेरच्या दिवसांत यांपैकीं एकहि सत्ता प्रबळ नव्हती; या गोष्टीचा दोष जितका मानून पेशव्यांकडे, तितकाच सरंजामी मराठे सरदारांकडेहि येतो. पेशव्यांनीं केलेली चूक मराठे सरदारांनीं दुरुस्त करण्यास काय हरकत होती? त्यांनीं वाटेल तर राज्यक्रांति करून पेशवाई पालथी पाडून हवें तर मराठे मंत्रिमंडळ स्थापावयाचें होतें; पण मराठेशाही मोडूं द्यावयाची नव्हती. तें त्यांनीं तरी कोठें केलें?

—मराठे व इंग्रज, उत्तरार्ध पृ.२५–२६

होऊन मग राज्याचा विस्तार बाहेर वाढण्यास सुरवात झाली असें नसून, बाहेर राज्य-विस्तार होण्यास सुरवात झाल्यामुळेंच सरंजामी सरदारकीची सुरवात झाली हें म्हणणें अधिक सयुक्तिक वाटतें. शाहूच्या सनदेची वाट न पाहतां दाभाडे, बांडे, भोसले, आंग्रे वगैरे सरदारांनी मोंगली राज्याचे लचके तोडण्यास आधींच सुरवात केली होती; व जिंकलेल्या मुलखांत ते स्वतंत्रपणें कारभारहि करूं लागले होते. अशा सरदारांना आपल्या पदरीं ठेवण्यांत छत्रपतीचा फायदाच होता, व हे सरदारहि छोटे असल्यामुळें त्यांना छत्रपतीच्या सत्तेचें रक्षण हवें होतें. यामुळें सरंजामी सरदारांचें मांडलिक-मंडळ तयार झालें. अशा वेळीं स्वतः शिवाजी असता तरी त्याला सरंजामी पद्धति अंगीकारण्या-चें टाळतां आलें असतें कीं नाहीं याची शंकाच वाटते. युरोपांतील 'फ्यूडल सिस्टीम' या उपयोगहि असाच झालेला होता. मराठ्यांमध्यें आनुवंशिक असे दोन गुण—किंवा वाटेल तर दोष म्हणा—होते. एक स्वातंत्र्यप्रियता, व दुसरा वतनाची आवड. युरोपां-तहि प्रथम फ्यूडल पद्धति सुरूं होण्यास हेच दोन मनोधर्म कारणीभूत झाले. फ्यूडल पद्धतीचा नायनाट होण्यास युरोपांत कित्येक शतकें लागलीं, व महाराष्ट्रांतहि इतर कोणाचा संबंध न येतां मराठ्यांची राज्यघटना स्वतंत्रपणें उत्क्रांत होण्यास शतकांचा अवसर मिळता तर, इकडेहि कालांतरानें ही पद्धति नष्ट होऊन एकतंत्री राज्यसत्ता प्रस्थापित झाली असती. पण हा उत्क्रांतीचा प्रयोग निर्वेधपणें शेवटास गेला नाहीं. अष्टप्रधानांवर पेशवा नेमणें ही या उत्क्रांतीचीच एक पायरी होती. आणि प्रबळ छत्र-पति व प्रबळ पेशवा अशांची जोडी पुरेच दिवस लाभती तर, सरंजामी पद्धतीस कदा-चित् लवकरच आळा पडला असता. पेशव्यांनी घराबाहेर अंगीकारिलेल्या उद्योगाच्या वेळीं परी छत्रपतीच्या एकतंत्री व जोरकस सत्तेचा त्यांना आधार मिळता तर नवे जुने सरदार आपला नोकरपेशा इतक्या लवकर विसरले नसते. पेशव्यांना मुख्य आधार आपल्या कर्तृत्वाचा असल्यामुळें त्यांनी हातची पेशवाई जाऊं दिली नाहीं, हीच मोठी गोष्ट केली म्हणावयाची. स्वतः राजा तरतरीत, कर्तृत्ववान्, स्वाभिमानी असता तर त्याला सरंजामी सरदारांच्या सत्तेला व अधिकारातिक्रमणाला आळा घालणें अधिक सोपें झालें असतें. किंबहुना, पेशवेहि झाले इतके स्वतंत्र झाले नसते. खुद्द मुख्य प्रधानालाच जर स्वातंत्र्य नाहीं, तर दुसऱ्या सरदारांना तें कसें मिळणार ?

—मराठे व इंग्रज, उत्तरार्ध, पृ. २३—२४

कोणतीहि गोष्ट पेशव्यांनीं सुचवावी व ती सरदारांनीं अंमलांत आणावी तर तें त्यांचें भाग्य ! त्यांना हुकूम करण्याचा पेशव्यांना अधिकार नव्हता. अर्थात् हुकूम करण्या-चा अधिकार नाहीं तर हुकूम अमान्य केल्यावर शिक्षा देण्याचा तरी अधिकार कोठून येणार ? पेशव्यांचा हुकूम अमान्य झाल्याचीं उदाहरणें सांपडतील; पण एखाद्या सरदारा-च्या हयातींत त्याला पदच्युत केल्याचें उदाहरण क्वचितच् सांपडेल. स्वतः पेशवे हे जोंपर्यंत सेनापति होते, व फौज घेऊन स्वारीवर जाऊन पराक्रम करीत, तोंपर्यंत त्यांचा अधिकार थोडा तरी चाले; पण थोरल्या माधवरावांच्या पश्चात् हा प्रकार संपून सत्तेचीं

सूत्रें फडणविसांच्या हातीं आलीं तेव्हां मध्यवर्ती सत्तेची आणखी एका पायरीनें अवनति झाली. जी स्वामिनिष्ठेची भावना शाहूसंबंधानें होती ती माधवरावासंबंधानें उरली नाहीं; व जी माधवरावसंबंधानें होती ती नानाफडणविससंबंधानें उरली नाहीं; मग कोंकणस्थ भानू नांवाच्या फडणविसाऐवजीं देशस्थ बोकील नांवाचा फडणवीस किंवा कारभारी असता तरी तीच स्थिति व्हावयाची. अशा रीतीनें घड्याळांतील मुख्य स्प्रिंग किंवा कमान शिथिल व निर्जीव झाल्यामुळें छत्रपतींची सत्ता सरंजामी सरदारांपर्यंत वाटवाटून विभागली गेली; व मराठेशाहीला संयुक्त साम्राज्याचें स्वरूप न रहातां केवळ एका तात्पुरत्या संघाचें स्वरूप आलें. खरें संयुक्त स्वराज्य म्हणजे फेडरेशन व संघ म्हणजे कॉन्फिडरसी. फेडरेशन व कॉनफिडरसी यांतील भेद फार महत्त्वाचा आहे. दोन्ही घटना अनेक अवयवांच्या मिळून बनलेल्या असतात; पण फेडरेशनमध्यें हे अनेक अवयव अनेक अंगांनीं एकत्र जखडले गेलेले असतात व एकजीव झालेले असतात. याच्या उलट कॉन्फिडरसीमध्यें हे अनेक अवयव फक्त एका अंगानें कोठें तरी एका बिंदूशीं एकमेकांना चिकटलेले असतात; म्हणून फेडरेशनपेक्षां कॉन्फिडरसी ही थोड्याशा धक्क्यानें मोडूं शकते. एकतंत्री राज्यपद्धतींत जें काम राजनिष्ठेच्या भावनेनें होतें तेंच फेडरेशनमध्यें ( संयुक्त स्वराज्यांत ) सामुदायिक प्रेमाच्या भावनेनें घडून येतें. अनेक हे एकजीव झाले म्हणजे एकच होत. संघ किंवा कॉन्फिडरसी यांत नैष्ठिक प्रेम असत नाहीं. तात्पुरता स्वार्थ हेंच काय तें संयोगकारण असतें; पण हा स्वार्थ सात्त्विक किंवा मोठ्या दृष्टीचा नसल्यामुळें तो वाटेल तेव्हा थोड्या कारणानें आपलें रूप बदलूं शकतो. मराठेशाहींत सरंजामी सरदारमंडळाच्या पुढच्या पुढच्या दिवसांत प्रत्येक सरदार अधिक अधिक जड बुडाचा होऊं लागला. अर्थात् पेशव्यांच्या फडणविसाची बुद्धि किंवा त्याचा मानीव अधिकार अशा नाजुक मध्यवर्ती आधारावर लोंबत राहाणारें हें सरंजामी सरदारमंडळाचें ओझें फार दिवस कसें लोंबत राहाणार ? मराठ्यांचें राज्य शिवाजीच्या वेळच्या स्वराज्याच्या मर्यादेबाहेर मुळीं गेलेंच नसतें, तर हा सगळा घोटाळा झाला नसता, असें या बाबतींत कित्येकांस वाटतें; पण त्यावर आमचें म्हणणें इतकेंच कीं, अशा प्रकारची अंगठीवरील खड्यासारखीं लहानशीं राज्यें हिंदुस्थानांत दुसरीं पुष्कळ होतीं, पण तीं तरी अखेर कोठें टिकलीं ? खरी गोष्ट हीच कीं, मराठेशाही विस्तार पावली यांत तिची खरी चूक नव्हती, तर त्या विस्ताराबरोबरच तिजमध्यें अंतःस्थ सुदृढता यावयास पाहिजे होती ती आली नाहीं. ही सुदृढता केव्हांहि एक मध्यवर्ती प्रबळ राजसत्ता किंवा सर्वव्यापी प्रबळ लोकसत्ता यांपैकीं कोणत्या तरी एका सत्तेनें येऊं शकते. मराठेशाहीच्या अखेरच्या दिवसांत यांपैकीं एकहि सत्ता प्रबळ नव्हती; या गोष्टीचा दोष जितका ब्राह्मण पेशव्यांकडे, तितकाच सरंजामी मराठे सरदारांकडेहि येतो. पेशव्यांनीं केलेली चूक मराठे सरदारांनीं दुरुस्त करण्यास काय हरकत होती ? त्यांनीं वाटेल तर राज्यक्रांति करून पेशवाई पालथी घालून हवें तर मराठे मंत्रिमंडळ स्थापावयाचें होतें; पण मराठेशाही मोडूं यावयाची नव्हती. तें त्यांनीं तरी कोठें केलें ?

—मराठे व इंग्रज, उत्तरार्ध पृ.२५-२६

## इंग्रजांनीं राज्य कसें मिळविलें

इंग्रजांनीं लष्करी सत्तेच्या जोरावर राज्य मिळविलें नाहीं व आजवर टिकविलेंहि नाहीं, हें प्रमेय सिद्ध करण्यास मदत मिळत नाहीं. महाराष्ट्रांतील लोकांना पेशवे व मराठे राजे यांच्या कारभाराविषयीं तिरस्कार उत्पन्न झाला होता, व इंग्रजांची शिस्त व त्यांची टापटीप, त्यांची व्यवस्था, त्यांचें शहाणपण फार आवडलें होतें हें कांहीं अंशीं खरें मानलें तरी, इंग्रजांनीं बाजीरावाकडून राज्य घेतलें नसतें तर महाराष्ट्राच्या लोकांनीं आपण होऊन अर्ज करून तें इंग्रजांच्या स्वाधीन केलें असतें असें वाटत नाहीं.

कारभाराची परंपरा पुण्यांत पेशव्यांच्या कचेरींत शाहूच्या वेळेपासून चालत आली होती; आणि शाहूच्या वेळेपासून—विशेषतः त्याच्या नंतर महाराजमंडळी आळसांत अगर व्यसनांत आपला सारा काळ घालवीत व कारभाराची फिकीर स्वतः करीत नसत, यामुळें पुण्याच्या कचेरींत कारभार होण्याची परंपरा वळावत गेली ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. परंतु एकादा महाराजास आपला कारभारी वरचढ व शिरजोर झाला असें वाटून त्यानें स्वाभिमानपूर्वक उचल खाल्ल्याचा पुरावा कोठेंहि आढळत नाहीं. शिंदे, होळकर, व नागपूरकर भोसले यांच्याकडे गुप्त रीतीनें पत्रव्यवहार करून, त्यांची सहानुभूति मिळवून, पेशव्यांच्या जाचांतून महाराजमंडळींना आपली सुटका करून घेता आली असती. पेशव्यांनीं महाराजांस खरोखरच बंदिवासांत ठेवलें असतें तर मराठे सरदारांस मूळ गादीचा व आपल्या जातीचा अभिमान वाटून त्यांनीं त्यांची सुटका खरीच केली असती; व ती केली नाहीं याचा अर्थ उघडच असा होतो कीं, सर्व गोष्टी—म्हणजे महाराजव्यक्तीचा नादानपणा, पेशव्यांनीं पाऊणशें वर्षेपर्यंत दौलतीस जोडलेलें वैभव व पुण्यास केल्या जाणाऱ्या कारभाराची सुव्यवस्था—लक्षांत घेतां, आहे ही स्थिति फारशी गैर नाहीं, निदान ही पालटण्याकरितां हातांत हत्यारच घेऊन उठलें पाहिजे असें नाहीं, असेंच या मराठे सरदारांस वाटलें असलें पाहिजे. तें कसेंहि असलें तरी, निदान इंग्रजांना सातारकर महाराजांचा धनीपणा मान्य व पेशव्यांना ते नोकर असेंच मानीत होते; पेशव्यांच्या वागणुकीस ‘ अधिकाराचें अतिक्रमण ’ हें नांव जर ते देत होते तर, बाजीरावाच्या हातून निघून सातारकर महाराज इंग्रजांच्या गोटांत उपकृत स्नेही म्हणून गेले त्या अर्थी त्यांनीं तरी महाराजांना स्वतंत्र राजे असें मानावयास काय हरकत होती ? पण सातारकर स्वतंत्र मानले असते तर दप्तराची सबब लावून राज्य कसें खालसा करण्यांत आलें असतें ? अल्फिन्स्टननें १८१७ सालीं जाहीरनामा प्रसिद्ध केला त्यांत खालील शब्द आहेतः—

The Raja of Satara who is now a prisoner in Bajirao's hands will be released and placed at the head of an independent sovereignty of such an extent as may mentain the Raja and his family in comfort and dignity.

वरील शब्दांत सर्वच मराठी दौलत सातारकर महाराजांच्या स्वाधीन होणार नाहीं, कांहीं खालसा होईल, असा ध्वनि उघड निघतो; परंतु "Independent sovereignty" हे शब्द खरे करावयाचे तर पुढें महाराजांशीं झालेल्या तहांत, त्यांच्या स्वातंत्र्यास बाध येण्यासारख्या कोणत्याहि अटी त्यांनीं घालणें योग्य नव्हतें. निदान जुन्या अनुभवावरून, परराज्याशीं पत्रव्यवहारसंबंध इंग्रजामार्फतच करावा व आपल्या जहागीरदार–सरदारांची व्यवस्था इंग्रजांमार्फत लावावी अशा तऱ्हेचीं कलमें घालणें आवश्यक मानलें तरी त्याच्या योगानें दत्तकाच्या परवानगीचा ससेमिरा महाराजांचे मागें कायमचा लावण्याचें कारण नव्हतें. दौलत देतांनाच थोडी दिली. कारण ४ कोटी दौलतीपैकीं १५ लक्षांची दौलत म्हणजे कांहीं फार नव्हे. शिवाय फंदफितुरी न करण्या-बद्दल बांधूनहि घेतलें होतें, असा बंदोबस्त झाल्यावर हें १५ लक्षांचें उत्पन्न औरस संततीनें खालें किंवा दत्तक संततीनें खालें तर इंग्रजांस विषाद कां वाटावा? पण जाहीरनाम्यांतले 'स्वतंत्र राजे' हे शब्द जाहीरनाम्यांतच राहिले! तहानें महाराजांना "Subordinate Ally" असा गौण दर्जा आणला व पुढें दत्तकाच्या बाबतींत "Dependent Ally" म्हणजे परदरचे संस्थानिक असें त्यांस वागविलें. व सर्वांत मौज ही की, राज्य खालसा करण्याची संधि आली तेव्हां, पेशव्यांनीं महाराजांवर लाद-लेली मानीव कैद किंवा परतंत्रता हो खरोखरीची राजभ्रष्टता मानून, "पेशव्यांच्या वेळींच तुम्ही स्वतंत्र राजे नव्हतां, तर आमच्या अमलाखालीं तुम्ही स्वतंत्र कचे?" असा युक्तिवाद आरंभिला. —मराठे व इंग्रज–उत्तरार्ध पृ. २८, ३२–३३

## इतिहास व इतिहास–संशोधन

"मी स्वतः कोणी मोठा इतिहासकार किंवा इतिहासंशोधक नाहीं. तथापि या विषयाची मला विशेष आवड आहे. ज्या संस्थेच्या वाढदिवसानिमित्त आजचें व्याख्यान आहे तिचा जन्म १० वर्षांपूर्वी झाला. त्याहिपूर्वी ३०।३५ वर्षे इतिहास–संशोधनास सुरुवात झालेली असून या अवधींत या विषयाची जी मेहनत–मशागत झाली तिचेंच फळ प्रस्तुत संस्था हें होय. इतिहास–संशोधनावर पुष्कळांचे पुष्कळ आक्षेप आहेत. एक म्हणतो नवा इतिहास बनवितां येत नसला म्हणजे जुन्याची आठवण होते! पण शनवारचा वाडा बांधतां आला नाहीं म्हणून त्याचे पाये उकरून जुनी मांडणी-मोडणी दाखविणें हेंहि एक कामच आहे. हल्लींहि इतिहास बनत नाहीं असें म्हणतां येणार नाहीं. आज घडत असलेल्या इतिहासाचेंहि पन्नास वर्षांनीं चीज होईल. सरकारी पब्लिकवर्क्स-खात्याप्रमाणें एकीकडे नवी इमारत बांधणें व दुसरीकडे जुन्या इमारतींची रिपेरी करणें हीं दोनहि कामें बरोबर चाललीं पाहिजेत. ऐश्वर्यसंपन्न जिवंत राष्ट्रेंहि आपल्या जुन्या इतिहासाचें संशोधन करितात. जगांत आज आपल्या डोळ्यां-देखत नवा इतिहास कर्तेपणानें घडविण्याचें श्रेय इंग्लंडइतकें दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्रास लाभत नाहीं. तथापि इंग्लंडचे लोक अद्यापि इंग्रजी इतिहासाचें संशोधन करितात.

ब्रिटिश म्युझियममधील जुनीं पुराणीं हजारों हस्तलिखितें, सनदा, शिक्के वगैरे पाहिले म्हणजे मनुष्य थक्क होऊन जातो. नेबूरनें रोमन इतिहासाचें संशोधन व मॅक्सम्युल्लर प्रभृतींनीं वैदिक इतिहासाचें संशोधन केलें; त्याला स्वदेशाचा अभिमान हेंहि कारण नव्हतें. आणि खरोखरच हा निःस्वार्थी आनंद आहे. संशोधकाला हर्ष, अमर्ष, खेद हे मुळींच नसतात. त्याला पानपतच्या पराभवाचीं पत्रें सांपडोत, नारायणरावाच्या वधाचीं सांपडोत किंवा सवाई माधवरावाच्या रंगपंचमीच्या विलासाचीं सांपडोत त्याला तीं सर्वच सारखींच प्रिय असतात. संशोधक हा मोठा 'रोमँटिक' प्राणी आहे. कित्येक इतिहास-संशोधक स्वतःस या उत्साहभरांत हास्यास्पदहि करून घेतात, नाहीं असें नाहीं. याचें उत्कृष्ट वर्णन 'पिक्विक पेपर्स' नामक इंग्रजी कादंबरींत आहे. एका खुळ्यानें एक शिलालेख आणला, त्याचीं सतरा संशोधकांनीं सतरा पाठांतरें बनविलीं तरी त्यांतून कांहींच अर्थ निघेना. तेव्हां पन्नास विद्वान् सभासदांकडून त्यावर पन्नास निबंध लिहिले जाऊन तुंबळ रणें माजलीं, व शेवटीं अकल्पित रीतीनें असें उघडकीस आलें कीं यांतील दगड तेवढा फार प्राचीन–सर्वच दगड प्राचीन असतात–पण त्यावरील लेख मात्र अगदीं ताजा. मला वाटतें विश्वगुणादर्शकाराच्या हातीं 'संशोधक' सांपडता तर त्यानें खालच्या दोन श्लोकांतल्याप्रमाणें त्याची स्तुतिगर्भनिंदा केली असती.

" उद्ध्वस्तवर्णरुचिचित्रकलापहर्म्यैः विच्छिन्नलेखनपुराणशिलासनस्थः ।
दुष्कीटभुक्तशतपत्रपटोत्तरीयः निर्मूल्यनाणकगणः परिपूर्णकोशः ।
नष्टाधिकारपरिहासितगर्वमुद्रः संदेहयुक्तिवशबृंहणयंत्रदृष्टिः
श्रद्धावितर्कपरिवारकवेष्टितांगः संशोधकः खलु प्रशास्ति विशून्यराज्यम् ॥ "

यांत वर्णन केल्याप्रमाणें या संशोधक महाराजांचा वाडा रंग उडून गेलेल्या चित्रांनीं भूषित असतो; त्यांचें सिंहासन म्हणजे पुसट लेख असलेला जुना दगड; त्यांचीं राजवस्त्रें म्हणजे कसरीनें खाल्लेले जुनाट कागदपत्र ! त्यांच्याहि खजिन्यांत नाणीं भरलेलीं असतात, पण बाजारांत एकहि चालत नाहीं. मन संशयानें ग्रासल्यामुळें डोळ्याला नेहमीं Magnifying glass लागून राहिलेला. आसपास अंधश्रद्धा व तर्कवितर्क यांचा गराडा. अशा शून्यराज्यांत राज्य करणाऱ्या या राजाची मुद्रा म्हणजे शिक्कामोर्तबहि आहे. पण त्याच्या आज्ञापत्रानें वीतभर जमीनहि कुणाला दिली घेतली जात नाहीं. आणि सैन्यदळच काय पण एखाद्या झाडाचें दळ म्हणजे पानहि तो हालवूं शकत नाहीं. मार्क ट्वेनच्या Prince and Pauper या कथानकांतील तोतया राजपुत्राला वाड्यांतल्या जड शिक्कामोर्तबाचा उपयोग बदाम फोडून खाण्याला तरी झाला. आमच्या संशोधकाला मिळालेल्या शिक्क्यानें आज्ञापत्र चालत नाहीं व त्यानें तो बदामहि फोडणार नाहीं. हा सर्व विनोद झाला पण तो स्तुत्यर्थ आहे. अर्थात् जी त्याची दशा म्हणून दिसते ती सर्व निःस्वार्थी व शुद्ध ज्ञानाभिलाषी इतिहाससंशोधकाची निर्मळ स्तुतिच आहे. संशोधक हा एक कृमि आहे. पण तो भक्षक कृमि नसून रक्षक कृमि आहे.–संशोधक



डावीकडून उजवीकडे खुर्चीवरील मंडळी—
न. चिं. केळकर, रंगा अय्यर, चित्तरंजन दास, श्री. म. टिळक. इ. १९२२

हा काळाचा शत्रू होय. काळ मोकळा सोडला तर तो क्षणशः व कणशः सर्वनाश करीत असतो. पण संशोधक हे काळाच्या चाळणीचीं भोकें शक्य तितकीं निरुंद करीत असतात. इतिहास-संशोधनानें राष्ट्रस्मृतीचा तंतु अखंड राहातो व स्मृतिपरंपरा ही आनंद उत्पन्न करणारी असून व्यवहाराला उपयोगी असते. संशोधन करून इतिहास रचण्याचा फायदा कित्येकांस समजत नाहीं. इतिहासाचा तरी उपयोग काय? तो वाचून मनुष्य शहाणा होतो या म्हणण्यांत फारसा अर्थ नाहीं. Knowledge comes but Wisdom lingers ( ज्ञान धावतें पण शहाणपण रांगतें ) हीच म्हण खरी. इतिहासज्ञानानें खरोखरच मनुष्य शहाणा होता तर History repeats itself ( इतिहासाची पुनरावृत्तिच होते ) ही म्हण पडली नसती. पुनरावृत्ति होते याचा अर्थ पूर्वी ज्या स्थितींत मनुष्य जसा वागला त्या स्थितींत तो तसाच फिरून वागणार; मग इतिहास वाचून तरी काय करावयाचें? एका अर्थानें हें खरें आहे. पण इतिहासाला व्यावहारिक ( Applied ) ज्ञान न म्हणतां शुद्ध ( Pure ) ज्ञान म्हटलें तरी त्याचें संशोधन अनिर्वाह्यच ठरतें. संशोधनाच्या परिसानें जुनें व नवें यांचें क्षणांत मधुर मीलन होतें. ययातीप्रमाणें जुना काळ हा नव्या काळापासून तारुण्य घेतो, व पुरुप्रमाणें नवी पिढी आपल्या गत इतिहासापासून वार्धक्याचें ऐश्वर्य मिळविते. संशोधन हें कधींहि फुकट जात नाही. त्याच्या आधारानें बनविलेले सिद्धान्त पुढें मागें खोटे ठरोत; परंतु पुराव्याचें साधन या दृष्टीनें संशोधित द्रव्य नित्य आहे. शेवटीं संशोधकांना एकच सूचना करावयाची ती ही कीं, त्यांनीं निर्विकार मनानें सत्यान्वेषणाचीच दृष्टि ठेवली पाहिजे व साधनें मिळवितांनाहि महत्त्वाची कोणती व टाकाऊ कोणती, दुर्मिळ कोणची व सुलभ कोणची याचा विवेक ठेवला पाहिजे. Archaeology आणि Architecture किंवा Antiquity व Art या जोड्या केवळ समानार्थक शब्दांच्या असें मानलें जाऊं नये. कालानें होणारा नाश टाळणें हें जसें अवश्य तसेंच क्षुद्र गोष्टीचा नित्य नाश करीत रहाणें हेंहि अवश्य आहे. मृतांनींच जर जगाची सर्व जागा अडविली तर जित्यांनीं जावें कोठें?'

—केसरी १९२० जुलै २०

---

# उतारे-साहित्य

## मराठी संप्रदाय व म्हणी

मनुष्यव्यक्तीप्रमाणें मानवी भाषेलाहि मनोरचना म्हणून असते, व ही मनोरचना तिच्यांतील संप्रदाय, वाक्प्रचार वगैरेंच्या योगानें व्यक्त होते. व्याकरणाला भाषेच्या शरीरांतील स्नायूंची उपमा दिली, तर संप्रदाय वगैरेंना तिच्या ज्ञानतंतूंची उपमा शोभेल. मानवी मनाची रचना व त्याचा विलास हा जसा शरीरांतील ज्ञानतंतूंच्या द्वारें व्यक्त होतो, त्याचप्रमाणें भाषेच्या मनांतील त्रिगुणांचें मिश्रण, गुणदोष, खुब्या, खांचाखोंचा, क्रीडा व विलास हे सर्व संप्रदाय म्हणी वगैरेंवरून बिनचूक ओळखतां येतात. मृतभाषेच्या मनाची क्रिया थांबलेली असते, यामुळें तिच्या वाङ्मयांत नवीन म्हणी किंवा वाक्प्रचार पैदा होत नाहींत; पण सजीव भाषेच्या मनाची स्फुरणक्रिया सदा चालू असल्यामुळें तिच्या वाङ्मयांत या वस्तूंचा संग्रह दिवसेंदिवस वाढतच जातो. सजीव भाषेंतहि झालें तरी व्याकरणाची ओढ मागें असते; व्याकरण हें भाषेस अवश्य असलें तरी तें एकंदरीनें निवृत्तिगुणच आहे; व भाषेला व्याकरणापासून जो उपयोग होतो, त्यापेक्षां निग्रह व विरोधच अधिक सोसावा लागतो. वाक्प्रचार व म्हणी हे प्रवृत्तिगुण असल्यामुळें त्यांचा ओढा पुढें असतो; व व्याकरणाच्या योगानें निगडित झालेल्या भाषेस बाहेर पडून मोकळेपणानें वावरतां यावें आणि स्वतंत्रपणें संचार करून तिला आपलें प्राबल्य मिळवितां यावें, या कामीं त्यांचा फार उपयोग होतो. भाषण व व्यवहार यांजमधील संबंध नित्य व निकट आहे. आपलें नांव, आपली कीर्ति मागें राहावी—स्मरणरूपानें तरी आपण अमर व्हावें—अशी ज्या समाजाची इच्छा असते, त्याचा अविनाशी असा इतर सर्व साधनांपेक्षां भाषेवरच अधिक दृढ भरंवसा असतो. भाषा हा इतिहासाचा आरसाच म्हणतां येईल. पण इतिहासाचें प्रतिबिंब पाडण्याची ही शक्ति भाषेंत जर कशाच्या योगानें येते असा प्रश्न विचारला, तर म्हणी व वाक्प्रचार हेंच उत्तर यावें लागेल.

संप्रदाय व वाक्प्रचार यांच्या योगानें भाषेची स्वातंत्र्यबुद्धि, प्रसरणशीलता व अर्थ व्यक्त करण्याच्या कामीं तिजकडून योजण्यांत येणाऱ्या हरतऱ्हेच्या युक्त्या या तर दिसून येतातच; परंतु कित्येकांच्या अर्थांमध्यें इतिहासाचें बीज संग्रहीत झालें असल्यानें त्यांजवरून ती भाषा बोलणाऱ्या लोकांचा इतिहास कळण्यासहि मदत होते......

ही गोष्ट उदाहरणें देऊनच व्यक्त करावयास पाहिजे असें नाहीं. ती सर्वांच्या अनुभवास येणारीच आहे. जगांत असें कोणतेंहि राष्ट्र नाहीं अगर भाषा नाहीं, कीं जीमध्यें म्हणी बनलेल्या नाहींत. कित्येक भाषेंत तर जवळ जवळ जितके शब्द तितक्या म्हणी असतील की काय असें वाटतें ! स्पॅनिश भाषेंत वीस हजार व जर्मन भाषेंत सुमारें एक लक्ष म्हणी आहेत असें म्हणतात. निवळ मराठी अशा म्हणी सुमारें पांच हजारांवर

सांपडतील कीं नाहीं याची शंका वाटते; परंतु त्याचें एक कारण, वर एके ठिकाणीं दर्शविल्याप्रमाणें, संस्कृताची मराठी भाषेवर असलेली छाप हें होय. संस्कृतापासून मराठी भाषा अगदीं वेगळी झाल्यास आज सों कांहीं शतकें लोटलीं, त्यांपैकीं बऱ्याच काळांत गद्यमय मराठी वाङ्मयाचा प्रायशः अभावच होता, असें म्हणण्यास हरकत नाहीं. आणि वाङ्मय पद्यमय असलें म्हणजे त्यांत म्हणी अगर संप्रदाय यांचा उपयोग सहसा करतां येत नाहीं व केल्यास थोडाबहुत वाईटच दिसतो गेल्या पांच सहा शतकांतील मराठी कविता मुख्यतः धर्मविषयपर असून तिचा मूलाधार म्हटला म्हणजे वेदान्त वगैरे गहन विषयपर संस्कृत ग्रंथ व पुराण इतिहास असल्यामुळें निवळ मराठीस धरून असलेले वाक्प्रचार अगर म्हणी यांची वाढ होण्यास पहिल्या दर्जाच्या ग्रंथकारांकडून, कां मदत झाली नाहीं याचें कारण कळून येण्यासारखें आहे. उलटपक्षीं, जेथें संस्कृत ग्रंथाचा अगर वेदांतासारख्या विषयांचा निकट संबंध सुटून कवितेस अधिक सार्वजनिक असें रूप आलें तेथें-म्हणजे रामदास, तुकाराम, अनंतफंदी, व रामजोशी यांच्या कवितेंत संप्रदाय व म्हणी यांचा अधिक उपयोग केलेला आढळून येतो. मात्र मराठी म्हणींच्या जोडीला संस्कृतांतील लौकिक न्याय व सुभाषितें हींहि आमचींच असल्यामुळें त्यांचाहि आम्हांस मराठी भाषेंत सररास उपयोग करतां येत असे, व अजूनहि येतो; यामुळें केवळ मराठी म्हणी व संप्रदाय यांचा तुटवडा आम्हांस फारसा भासत नाहीं.

असो. म्हणी, संप्रदाय व वाक्प्रचार यांचा सकृद्दर्शनीं एकाच ग्रंथांत समावेश केलेला आढळतो व कित्येक प्रसंगीं त्यांतील परस्पर भेद खरोखर इतका सूक्ष्म असतो कीं, विवक्षित शब्दसमूहास म्हण हें नांव द्यावें, किंवा त्यांस संप्रदायाच्या सदराखालीं घालावें, अथवा वाक्प्रचाराखालीं त्याचा समावेश करावा, हें बिनतोड सांगणें फार कठीण असतें. परंतु एवढ्या गोष्टीवरून त्यांच्या दरम्यान मुळीं स्वरूपतः कांहीं भेदच नाहीं असें मात्र नाहीं. उदाहरणार्थ, संप्रदाय व वाक्प्रचार हे दोन शब्द रा. आपटे व रा. भिडे यांनीं एकाच वस्तूकरितां व जवळ जवळ एकाच अर्थानें घातलेले आहेत. पैकीं संप्रदाय हा शब्द सुटसुटीत व एकावयवी असल्यामुळें लोकांच्या तोंडांत अधिक बसण्याचा संभव आहे. उलटपक्षीं संप्रदाय हा शब्द चाल किंवा प्रघात या अर्थी भाषेप्रमाणें इतर व्यवहारासहि लावतां येत असल्यानें, ज्या मानानें त्याचा विस्तार जास्त, त्या मानानें त्याचें व्यवच्छेदकत्व, म्हणजे विशिष्ट अर्थ व्यक्त करण्याची पात्रता कमी असणार हें उघड आहे. व या दृष्टीनें पाहतां वाक्प्रचार हा शब्द प्रस्तुत प्रकरणीं अधिक समर्पक आहे असें आम्हांस वाटतें. परंतु हे दोनहि शब्द इंग्रजीतील 'Idiom' या शब्दाचें भाषांतर करण्याच्या विशिष्ट हेतूनें बनविले आहेत हें उघड आहे. संस्कृतांत तद्वाचक शब्द असेल, पण निदान आम्हांस तरी तो माहीत नाहीं. संप्रदाय किंवा वाक्प्रचार हे दोन्हीहि एका अर्थानें अपवादात्मक होत; म्हणजे व्याकरण किंवा शब्दार्थ किंवा वाक्यरचना किंवा वाक्यार्थ यांजविषयीं असलेल्या सनातन नियमांचें उल्लंघन करून जाणारे परंतु रूढि किंवा पुनरुक्ति यांच्यामुळें सर्वसंमत झालेले असे विशिष्ट प्रकार होत.

असले इतर विशिष्ट प्रकार दाखविणारे दोन पारिभाषिक शब्द अपवाद व निपातन हे संस्कृतांत आहेत व त्यांतल्या त्यांत पाहिलें तर अपवादापेक्षां निपातन हाच शब्द आम्हांस प्रस्तुत विषयांत अधिक उपयोगी पडण्यासारखा आहे. अपवाद व नियम हे परस्परपूर्णता आणणारे अन्योन्यावलंबी आहेत. परंतु निपातन हें स्वतंत्र व यदृच्छेनें बनलेले असतात. अपवादांचें वर्गीकरण करतां येतें, व अपवाद हा जरी नियमांचें उल्लंघन करणारा असतो तरी अपवाद हे सुद्धां स्वतः नियमबद्ध असतात. किंबहुना मूळ नियम व अपवाद हे दोनहि मिळून तिसरा एक स्वतंत्र नियम बनवितां येतो. अपवादास पोटनियम म्हटलें तरी चालेल. परंतु निपातन हे अनियमित असून त्यास कारण सांगतां येत नाहीं. किंवा एका निपातनासारखें दुसरें एखादें निपातन हटकून आढळेल असेंहि नाहीं. या दृष्टीनें पाहतां वाक्प्रचार व संप्रदाय हे निपातनाजवळजवळ येतील.

संप्रदाय हे भाषेच्या सर्व अंगांशीं व उपांगांशीं इतके जखडून गेलेले असतात कीं, शब्दार्थ, शब्दरचना, वाक्यरचना, वाक्यार्थ व व्याकरणाचे नियम यांपैकीं प्रत्येकाचें उल्लंघन संप्रदायानें केलेलें आढळतें; व हें उल्लंघन करण्यास सर्व प्रकारच्या शब्दशक्ति म्हणजे अभिधा, लक्षणा व व्यंजना, आणि रूपक, उपमा,[1] अतिशयोक्ति आदिकरून सर्व प्रकारचे अलंकार यांची मदत त्यांनीं घेतलेली आढळते. प्रत्येक भाषेचा स्वभाव इतर भाषांच्या स्वभावाहून वेगळा असतोच. परंतु सर्वसाधारण व्याकरणशास्त्राला अपवादभूत असे जे भाषेचे गुण अथवा वैलक्षण्य याचा आपल्यास प्रस्तुत विचार कर्तव्य नाहीं. तर एखाद्या भाषेच्या पोटांत कित्येक प्रसंगीं तिचे नियम संभाळून व कित्येक प्रसंगीं जरूर तर तिचे नियम उल्लंघून अर्थाचा फैलाव अथवा त्याची गहनता अधिक करण्याकरितां निपातनरूपी जे विशिष्ट प्रकार रूढ होतात, त्यांचाच समावेश संप्रदाय व वाक्प्रचार हे शब्द रूढ झाले असतां त्यांच्या खालीं करण्यांत येईल. म्हण या शब्दासंबंधानें मात्र अशा प्रकारची अर्थनिर्णयाची अडचण पडत नाहीं. म्हण या मराठी शब्दाला आभाणक असा संस्कृत प्रतिशब्द सांपडतो. तथापि आभाणक हा शब्द फारसा प्रचलित नाहीं, व म्हण हा शब्द मराठींत फार दिवसांपासून चालत आलेला असून सर्व दर्जाचे लोक त्याचा सारखाच उपयोग करतात. संप्रदायांत जसें वैलक्षण्य असतें, तसें म्हणींमध्यें असत नाहीं.

संप्रदाय अथवा वाक्प्रचार व म्हणी यांमध्यें एक समान गुण आहे; तो हा कीं, या दोहोंस रूढीची जरूरी असते. म्हणजे असें कीं, त्या दोहोंचाहि बहुजनसमूहानें स्वीकार केलेला असावा लागतो. असा स्वीकार झालेला असला तरच तो वाक्प्रचार किंवा ती म्हण त्याचा त्या त्या प्रसंगीं व त्या त्या अर्थानें उपयोग होऊं शकतो. वाक्प्रचार आणि म्हण या दोहोंत आणखीहि एका बाबतींत साम्य आहे. ती बाबत ही कीं, त्या दोहोंतहि परिवृत्त्यक्षमत्व असतें, म्हणजे त्यांत कोणत्याहि प्रकारचा फेरबदल करणें शक्य नसतें. एका शब्दाबद्दल दुसरा त्याच अर्थाचा शब्द किंवा एका प्रत्ययाबद्दल त्याच अर्थाचा दुसरा प्रत्यय घालणें अशक्य असतें. इतकेंच नव्हे, तर त्यांतील शब्दांची स्थानें बदलणें

देखील शक्य नसतें. उदाहरणार्थ, ' पाठीस लागणें ' ह्याचा अर्थ अभिनिवेशपूर्वक धरणें किंवा अनुसरणें असा होतो. परंतु पाठीला लागणें ह्याचा अर्थ शरीराचा जो पृष्ठभाग त्याशीं संलग्न होऊन राहणें असा होतो. तसेंच ' पांचांमुखीं परमेश्वर ' किंवा ' पिंडीं तें ब्रम्हांडीं ', किंवा ' जनीं जनार्दन ' ही म्हण घेतली तर तींत यत्किंचित् फेरबदल करणें शक्य नाहीं असें आपणास दिसून येईल. वाक्प्रचार आणि म्हणी ह्यांची रूढीमध्यें प्राग-प्रतिष्ठा असते, व त्या दोहोंचेहि ठायीं परिवृत्यक्षमत्व असतें. ह्या दोन बाबतींत त्यांच्यांत साम्य आहे. परंतु त्यांच्यांत साम्यापेक्षां भेदाच्या बाबती ज्यास्ती आहेत. पहिला भेद असा कीं, वाक्प्रचार हा एखादा तुटक शब्द किंवा शब्दसमूह असतो; अर्थात् तें संपूर्ण वाक्य नसतें. म्हण ही नेहमीं वाक्यात्मक असते. कित्येक म्हणींत जरी प्रत्यक्ष क्रियापद उक्त नसतें तरी तें गृहीत धेतल्यासारखें असून तें कोणतें याविषयीं शंका असण्याचा संभव नसतो. अर्थात्, वाक्प्रचार हा जरी स्वतः एका दृष्टीनें बंदिस्त असला, तरी त्याचें तोंड खुलें व उपयोग करणाराचे हातीं असतें. उलटपक्षीं, म्हणीचें तोंड बांधलेलें असून एखाद्या मोठीव चिऱ्याप्रमाणें ती अखंड म्हणजे जशीची तशीच उपयोगांत आणण्याची असते. एक भेद असा दाखवितां येईल कीं, संप्रदाय व वाक्प्रचार यांजमध्यें अवयवीभूत शब्द प्रायः लाक्ष-णिक अर्थानें योजलेले असतात. अथवा मागें सांगितल्याप्रमाणें त्यांच्या पोटांत एखादा ना एखादा तरी अर्थालंकार असतो. परंतु, म्हणींतील शब्द केवळ त्यांच्या यौगिक अर्थां-नेंच उपयोगांत आणलेले असतात, त्यांत लक्षणेचा प्रकार असत नाहीं; व असें होण्याचें कारण आमच्या मतें असें आहे कीं, अर्थविस्तार करण्याच्या अवश्यकतेमुळें शब्दांचे अर्थ बदलावे लागून अथवा निपातांचा अंगीकार करून गरज भागवून घ्यावी लागते; यांत्रतां येत नाहीं. केवळ यौगिक अर्थानेंच शब्द वापरून व व्याकरणाचे नियम न उल्लंघितां लिहिण्या-ची किंवा बोलण्याची इच्छा करणारास आपला नियम मोडल्याशिवाय दहा पांच वाक्यें तरी लिहितां बोलतां येतील किंवा नाहीं, याची शंकाच आहे. अरुंद पायवाटेवर एका पायावर चालण्याइतकें तें अवघड आहे. दिल खुला करून, कल्पना पल्लवित होऊं देऊन, अर्थविस्तार करून ज्याला बोलावयाचें असेल, त्याला लक्षणा या शब्दशक्तीचा आणि बीजभूत अलंकाराचा फायदा करून घेतल्याशिवाय, म्हणजे संप्रदायांचा उपयोग केल्या-शिवाय, मुळींच चालावयाचें नाहीं. म्हणीचें तसें नाहीं. म्हणींचा उपयोग लिहिण्याबोल-ण्यांत करणें किंवा न करणें, हें सर्वस्वीं ऐच्छिक असतें. म्हणी या गरम मसाल्याप्रमाणें आहेत. त्यांचा उपयोग केल्याशिवाय भाषेस रुचकरपणा किंवा स्वादिष्टपणा येणारच नाहीं असें नाहीं; परंतु, जे जिह्वालोलुप असतात, चमचमीत, गोड, किंवा फोडणीचे पदार्थ खाल्ल्याशिवाय ज्यांचें पोट भरत नाहीं, अशांच्याच ह्या मसाल्या विशेष उपयोगी असतो. पण सात्विक अन्न खाणाऱ्या मनुष्यानें हा मसाला केवळ निषिद्धच न मानला तरी, तो त्याचें सेवन विशेष प्रसंगीं व नियमितपणें करितो. लक्षणामूल व अलंकारमूल वाक्प्रचार हे उत्कृष्ट लेखकांच्या किंवा वक्त्यांच्या लेखांत भरपूर सांपडतात. कारण, त्यांशिवाय निर्वाह नसून ते शिष्टसंमत असतात, आणि त्यांच्या उपयोगानें भाषेच्या गंभीरपणाला

किंवा उदात्तस्वरूपाला सहसा बांध येत नाहीं; पण म्हणींचा उपयोग ऐच्छिक असून टाळतां
येण्यासारखा असतो; उठल्यासुटल्या म्हणींचा उपयोग करणारास लोक ग्राम्यच म्हणतील.
नाटकांत प्राकृत भाषा ज्याप्रमाणें स्त्रियांच्या तोंडीं किंवा बोवडे बोल मुलांच्या तोंडीं शोभ-
तात, त्याचप्रमाणें म्हणी ह्या केवळ मध्यम प्रतीच्या व केवळ अशिक्षित नाहीं तरी निम-
शिक्षित मनुष्याच्या तोंडीं आढळतात. सर्वच म्हणी म्हणजे ग्राम्य असतात असें नाहीं.
उदाहरणार्थ, ' दैव देतें आणि कर्म नेतें, ' ' परदुःख शीतल, ' अशा म्हणींत ग्राम्यता
मुळींच नाहीं. परंतु ' चोराच्या हातची लंगोटी, ' ' गांवढ्या गांवांत गाढवी सवाष्ण, '
' चांभाराच्या देवाला खेटराची पूजा, ' ' बिगाराच्या घोड्याला तरवडाचा फोंक, ' ' मागून
पुढून बापच नवरा, ' ' मुंगीला मुताचा पूर, ' असल्या म्हणी तिखट व गुणकारी असल्या
तरी ग्राम्य होत, व म्हणून शिष्ट संभावित लोक त्यांचा उपयोग भाषणांत फारसा करीत
नाहींत. ही गोष्ट मराठीप्रमाणें इंग्रजी वगैरे भाषांसहि लागू आहे. ' लॉर्ड चेस्टरफील्डचीं
आपल्या मुलांस पत्रें, ' या नांवाचा ' शिष्टसंप्रदाय ' या विषयावरील ग्रंथ प्रसिद्ध आहे.
त्यांत म्हणींचा उपयोग भाषणांत करणें हें संभावितपणाचें लक्षण नाहीं, असें म्हटलें आहे.
व इंग्रजींतील चांगल्या वक्त्यांच्या किंवा लेखकांच्या भाषणांत अगर लेखांत ज्यास आपण
म्हणी म्हणतों अशांचा उपयोग केलेला आढळणार नाहीं. याहून आणखी एक भेद म्हणी
व वाक्प्रचार यांजमध्यें आहे; तो हा कीं, म्हणींमध्यें कित्येक वेळां यमक साधलेलें असतें.
परंतु वाक्प्रचारामध्यें केवळ एकेरी कल्पना असल्यामुळें यमक असत नाहीं. व्यवच्छेदक-
त्वाचा हा मुद्दा अर्थात् विशेष महत्वाचा नाहीं. कारण, म्हणीस यमक हें केवळ आगंतुक
आहे व त्यापासून अर्थांत बदल होतो असें नाहीं.

कित्येक वाक्प्रचारांत शब्दरचनेचा विशिष्ट अनुक्रमच रूढ असतो, व यामुळें तो
अनुक्रम बदलला कीं संप्रदाय बिघडतो, व क्वचित् अर्थहि विपरीत होतो. उदाहरणार्थ,
' रामभाऊंच्या डोक्यांत एकदां जें शिरलें तें काढून टाकणें महा कर्म कठिण आहे. '
ह्या वाक्यांत महा कठिण कर्म असा अनुक्रम वाक्प्रचाराच्या उलट आहे. तसेंच, ' पोट
पाठीस लागलें आहे ' या शब्दांचा अर्थ व ' पाठीस पोट लागलें आहे ' या शब्दांचा
अर्थ, या दोहोंचा अर्थाअर्थी कांहींच संबंध नाहीं. कारण, पहिल्यांत पाठीस या शब्दाचा
उपयोग लाक्षणिक असल्यामुळें पोटास मिळविण्याकरितां उद्योग करण्याची आवश्यकता
आहे असा अर्थ होतो; व दुसऱ्या शब्दसमूहांत शब्दांचा अर्थ यौगिक असल्यामुळें
रोडलेल्या शरीरस्थितीचें तें वर्णन होतें. तसेंच, जोड शब्दांतहि सांप्रदायिक अनुक्रम
राखावा लागतो. कानाकोपरा असें आपण म्हणतों; परंतु कोपरा काना म्हटलें तर चूक
होईल. त्याचप्रमाणें ताळमेळ, चीजवस्त, दिवाबत्ती, चूकभूल, गुरेंढोरें वगैरे जोड्यांच्या
ऐवजीं मेळताळ, वस्तचीज, बत्तीदिवा, भूलचूक, ढोरेंगुरें, असें म्हणणें चूक होईल.
तसेंच, " पायांत जोडा घालणें " व " जोड्यांत पाय घालणें, " " घोटांत अंगठी
घालणें " व " अंगठींत घोट घालणें, " या निरनिराळ्या शब्दसमूहांच्या अर्थांमध्यें भेदा-
ची जी सूक्ष्म छटा आहे, ती तज्ज्ञ मनुष्यास तेव्हांच कळते. हा प्रकार अर्थात् इंग्रजींतहि

आहे. उदाहरणार्थ, इंग्रजींत बोलणारानें He and I असें म्हणावें, I and he असें म्हणूं नये. Afoot असें म्हणावें, On the foot असें म्हणूं नये, रद्द झालेल्या कायद्याला Dead letter म्हणावें, पण अमलांत असलेल्या कायद्याला Living letter म्हणूं नये; Stare one in the face असें म्हणावें, Stare in one's face असें म्हणूं नये; अशी रूढीनें निर्यंत्रणा लावून दिली आहे. कोणत्याहि भाषेंत झालें तरी काय, असे जुलमी संप्रदाय असण्याचें कारण रूढी ही वेदाप्रमाणें स्वतःप्रमाण आहे, परतःप्रमाण नाहीं, हेंच होय. इंग्रजीमध्यें संप्रदायास Idiotism असा एक शब्द आहे; व वाक्प्रचारांस त्यांचा जुलमी स्वभाव, अविवेकशीलता व दुर्विनीतत्व हे गुण लक्षांत आणूनच हें नांव दिलेलें असावें असें वाटतें.

आतां म्हणींसंबंधानें दोन शब्द सांगून हें विवेचन संपवूं. म्हण हा शब्द स्वतः इतका सोपा आहे कीं, त्याची व्याख्या करणें हेंच अविचाराचें होईल. म्हणी एकवाक्यात्मक, द्विवाक्यात्मक किंवा अनेकवाक्यात्मकहि असतात. उदाहरणार्थ, ‘एका हातानें टाळी वाजत नाहीं,’ ही एकवाक्यात्मक, ‘गाढवापुढें वाचली गीता, कालचा गोंधळ बरा होता,’ ही द्विवाक्यात्मक आणि ‘खिळ्यासाठीं नाल गेला, नालासाठीं घोडा गेला, घोड्यासाठीं स्वार गेला,’ ही अनेकवाक्यात्मक म्हण होय. म्हणीस वाक्प्रचाराप्रमाणें रूढीचाच आधार असतो. जी अनेक वेळां म्हटली तीच म्हण. स्पॅनिश भाषेमध्यें ‘Refrans’ असा म्हण या अर्थी शब्द आहे. तो व इंग्रजी Refrain हा शब्द एकच धातूपासून निघालेला असून त्या मूळ धातूचा अर्थ पुनः पुनः उच्चार करणें असा आहे. डॉ. जॉन्सन यानें Proverb या शब्दाची व्याख्याहि ‘Sentences frequently repeated by people’ अशीच दिलेली आहे. पण यावर असा प्रश्न स्वाभाविकपणेंच उत्पन्न होतो कीं, कांहीं विशिष्ट वाक्येंच लोक पुनः पुनः कां म्हणतात? त्यांचा लोकांना इतका मोह पडावा, इतकें प्रेम वाटावें, असे त्यांच्यांत गुण कोणते? याचें उत्तर सोपें आहे. कोणत्याही म्हणीच्या अंगीं दोन चार मुख्य गुण असतात. एक तर म्हणीमध्यें कांहीं तरी बोधपर, ज्ञान देणारा, असा अर्थ असावा लागतो. कारण, निरर्थक शब्दसमूह कोण लक्षांत ठेवील? पण एखादा शब्दसमूह केवळ ज्ञानप्रद असल्यानें तो म्हणीचा मान पावत नाहीं. कारण, ज्ञान झालें तरी तें वेड्यावांकड्या, लांबलचक व बेसूर शब्दांत सांठविलें असलें तर तें लोकांच्या आदरास तितकें पात्र होत नाहीं. म्हणून तेंच ज्ञान थोडक्या शब्दांत सांगितलेलें असावें लागतें. सूत्रें जशीं पाठ करण्यास सोपीं, तशा म्हणी तोंडांत राहण्यास सोप्या असतात. परंतु बोधप्रद असा शब्दसमूह नुसता सुटसुटीत असून भागत नाहीं, त्यांत कांहीं तरी चमत्कारिक अर्थ किंवा साधाच अर्थ परंतु तो चमत्कारिक रीतीनें मांडलेला असावा लागतो.

म्हणींच्या अंगीं अवश्य असावयास पाहिजेत म्हणून जे गुण आम्हीं वर सांगितले, तेच थोडक्यांत सांगावयाचे तर आम्ही असें म्हणूं कीं, म्हण हें चिमुकलें, चतुरपणाचें, चटकदार वचन. ह्या चकारांनीं उपलक्षित असल्याशिवाय कोणतेंहि वचन म्हण ह्या संज्ञेस पात्र व्हावयाचें नाहीं.

वर निर्दिष्ट केलेल्या आवश्यक गुणांशिवाय म्हणींचे ठायीं पुष्कळ आगंतुक गुणहि असतात. म्हणींना जर यमक, अनुप्रास वगैरेंची जोड मिळेल, तर मग काय दुधांत साखर टाकल्याप्रमाणेंच होतें. कारण, यमक व अनुप्रास हे जरी निवळ शब्दालंकार असले, तरी स्मरणशक्तीला त्यांचा फार उपयोग आहे. एवढेंच नव्हे, तर त्याच त्या वर्णांचा पुनरुच्चार झाल्यामुळें सुरेलपणा येतो, व तो ऐकून मन एकाग्रताप्रवण होतें. अशा निरनिराळ्या गुणांनीं मंडित असलेल्या चटकदार शब्दसमूहांत प्रत्येक देशांतील लोकांचें व्यवहारिक शहाणपण, संस्कृति, धर्मविचार, नीतिविचार वगैरे सांठविलेले असतात. एकाद्या समाजाची पारख करणें झाल्यास त्या समाजांत रूढ असलेल्या म्हणीं-वरून ती जितकी बिनचूक करतां येईल, तितकी इतर कशानेंहि करतां येणार नाहीं. मराठी म्हणींपैकीं आकारानें अत्यंत लहान अशा फक्त दहा पांचच म्हणी जरी उदाहरणा-दाखल घेतल्या, तरी वरील विधानाची सत्यता कळून येईल. ' दृष्टीआड सृष्टि ' व ' जनीं जनार्दन ' ह्या म्हणी तर दोन दोनच शब्दांनीं बनलेल्या आहेत. तथापि ओजस्वी मंत्रा-प्रमाणें त्या प्रत्येकींत इतकीं उदात्त तत्त्वें व इतके गहन विचार ठेंचून भरलेले आहेत कीं, त्यांपैकीं प्रत्येकीवर एक एक स्वतंत्र निबंधचसा काय, पण एक एक स्वतंत्र ग्रंथहि होईल. ' अर्मंत्रमक्षरं नास्ति ' हें संस्कृत सुभाषित म्हणीस बरोबर लागतें. कारण; म्हणींच्या प्रत्येक अक्षरांत मनुष्यमात्राच्या मनांत व अंतःकरणांत अगदीं खोल वावरत असणारीं विचाररूपी भुतें वेळविणारे महामंत्र सांठविलेले असतात. तात्पर्य, अशा रीतीनें सजीव भावेवा शास्त्रीय विचार करितांना वाक्प्रचार व म्हणी यांजकडे संशोधका-चें लक्ष वेधल्याशिवाय राहात नाहीं, व म्हणींचा हल्लीं कित्येक विद्वानांकडून होत अस-लेला सोपपत्तिक अभ्यास असाच वृद्धिंगत होईल, अशी आम्हांस उमेद वाटते.

—महाराष्ट्र साहित्य पत्रिका व० ३, अं. १-२

## कोटी व विनोदवचन

ज्या ठिकाणीं बोलणाराच्या वचनांत अर्थचमत्कृति असते व ती अर्थचमत्कृति केवळ आत्मगुणानेंच हास्योत्पादक होते, अशा वचनास कोटी किंवा चतुरालाप असें म्हणतात. विनोदवचनामध्यें व कोटीमध्यें हा मुख्य फरक आहे कीं, विनोदवचनांत जें हास्य उत्पन्न होतें, तें केवळ अर्थचमत्कृतीच्या आत्मगुणानें होत नाहीं, तर तदंतर्गत जे पदार्थ त्यांच्या परस्पर असंबद्धतेनें उत्पन्न होतें. कोटी व विनोदवचन यांमध्यें दुसरा एक फरक आहे, तो हा कीं, कोटी ही होता होईतों फार थोड्या शब्दांत ग्रथित असते, Brevity is the soul of wit. (Shakespeare) किंबहुना ती जितक्या थोड्या शब्दांत ग्रथित असेल, तितकी तिची बहार अधिक, असा नियम आहे. विनोदाचें तसें नाहीं. विनोद बहुधा एकाद्या दुसऱ्या वचनांत किंवा वाक्यांत संपूर्ण किंवा पक्व असा क्वचितच होतो. व तो परिस्थितिजन्य असंबद्धतेवर जेव्हां अवलंबून असतो तेव्हां तर जितक्या विस्तृत वचनांत ग्रथित असेल तितका तो अधिक बहारदार असतो. हा भेद अन्य रीतीं-

नींहि व्यक्त करितां येईल. कोटीचा संबंध बहुधा बुद्धि व कल्पना यांशीं असतो. विनोदाचा संबंध मनोभावांशीं विशेष असतो. कोटींत बुद्धितेज चमकतें व विनोदांत मनोभावांची जागृति होऊन तद्द्वारा अर्थ हृदयांत शिरतो. दुसऱ्या एका दृष्टीनें असें म्हणतां येईल कीं, कोटीचें स्वारस्य तिच्या चापल्यांत असतें. एखाद्या सुरुंगाप्रमाणें तिचा बार इतक्या अनपेक्षित रीतीनें उडून जातो कीं, होऊन गेल्यावर ऐकणारा डोळे चोळून आपणावर म्हणजे आपल्या बुद्धीवर हा एकदम कसा घाला पडला, असें आश्चर्य करीत राहातो, व क्षणांत दृश्य होऊन फिरून अदृश्य झालेल्या विद्युत्तेजाप्रमाणें कोटी ही बुद्धीस चकविते. जी गोष्ट आपण एरवी कबूल करण्यास पुष्कळ आढेवेढे घेतले असते, तीच गोष्ट कदाचित् कोटीचें द्वारानें आपल्या मनांत प्रविष्ट झाली असतां आपल्यास चटदिशीं पटते. कोटीचा आदि व तिचा अंत हीं दोन्हीं एका क्षणांतच होतात व तसें होणें जरूरहि असतें. कोटी करावयाची म्हणून होत नसते, तिला क्वचित् प्रसंग मिळावा लागतो. व हा प्रसंग जाणून बुजून आणतां येत नाहीं, तर बोलण्यांत किंवा लिहिण्यांत अगदीं ओघानेंच यावा लागतो. कोट्या करण्यांत अगदीं प्रवीण किंवा हातखंडा असा जो फ्रेंच प्रहसनकार मॉलिअर, त्यानें असें म्हटलें आहे कीं Impromptu is precisely the touch-stone of wit. म्हणजे 'प्रत्युत्पन्नमतित्व हाच खऱ्या कोटीचा कस होय.' तरळबुद्धीच्या मनुष्यासच कोट्या करितां येणें शक्य आहे. वेळ निघून गेल्यावर जर कोटी सुचली तर वरातीमागून आणाऱ्या घोड्याप्रमाणें ती हास्योत्पादक न होतां हास्यास्पदच होते. विनोदवचनांची गोष्ट तशी नाहीं. विनोदाचें ज्ञान संपूर्ण रीतीनें एका क्षणांत होत नाहीं. तर तें हळूहळू होत जातें; व जसजसें विनोदी परिस्थितीचें वर्णन वाढत जातें, तसतसा विनोदास भर येत जातो. एकाद्या दिव्याच्या ज्योतींत जितकी उष्णता आहे तितकीच एका तपेलीभर पाण्यांत सांठविलेली आहे असें कल्पिलें, तर कोटींतील हास्यशक्ति ज्योतींतील उष्णतेप्रमाणें एकवटलेली व विनोदवचनांतील हास्यशक्ति तांब्याभर पाण्यांत सांठविलेल्या उष्णतेप्रमाणें प्रसृत असते असें म्हणतां येईल.

कोटी व विनोद यांतील भेद सांगतांना विनोदाचा संबंध मनोभावांशीं विशेष असतो असें सांगण्यांत आलेलेंच आहे. व या विधानाचा खुलासा केला असतां विनोदाच्या स्वरूपाचाहि खुलासा आपोआप होईल. विनोद या शब्दाचा धात्वर्थ जर पाहिला तर तो " घालवून देणारा " असा होतो. अर्थात्, शब्द बनविणाराचें मनांत 'काळजी घालवून देऊन आनंदमय भावाची जागृति करणें' हा जो विनोदपदार्थाचा गुण तो आला होता असें दिसतें. काळजीस मनांतून घालवून देण्याचें काम मनोभावाकडून जितकें होतें, तितकें तें बुद्धीकडून होऊं शकत नाहीं.

संस्कृत विनोद किंवा इंग्रजी Humour यांचा बुद्धीपेक्षां स्वभावाशीं म्हणजे मनोभावाशीं निकट संबंध येतो. विनोदाचा जर मनोभावांशीं संबंध आहे तर मग त्याची घटना एक किंवा अनेक भावांनीं होते? व तो एक किंवा ते अनेक मनोभाव कोणते? याचें उत्तर केवळ तर्कानें बनवितां येण्यासारखें नाहीं, तर विनोदाचा परिणाम जें हास्य

त्याच्या स्वरूपावरून व विनोद-वचन-व्यवहाराचें प्रत्यक्ष अनुभवावरून ठरविलें पाहिजे. प्रथम एक गोष्ट सांगितली पाहिजे ती ही कीं, विनोदानें येणारें हास्य आणि लहान मुलें अगर रानटी लोक, किंवा सुधारलेल्या समाजांतीलच पण अज्ञ लोक यांचें हास्य, हीं भिन्न असतात. पहिल्यामध्यें मनःसंस्कृतीचा परिणाम दिसून येतो. दुसऱ्यांत तो दिसून येत नाहीं. हास्यध्वनि हा एक प्रकारचा गायनध्वनि आहे असें मानलें, तर विनोदी हास्य-ध्वनीची जाति कोमळ ठरेल, तीव्र ठरणार नाहीं; म्हणजे मनोभावांचा परिणाम विनोदी हास्य हा होय. त्या मनोभावांत कोमलता असते, तीव्रता नसते. ही गोष्ट लक्षांत घेतली असतां विनोदी मनोभावांत नवरसांपैकीं कोणत्या रसांच्या स्थायी भावांचा समावेश होऊं शकेल व कोणते त्यामध्यें येऊं शकणार नाहींत, हें तेव्हांच कळून येईल. उदाहरणार्थ, ज्यांच्या मनांत खरोखर क्रोधरूपी मनोविकारांचा प्रादुर्भाव झाला असेल, त्याला विनोद सुचणार नाहीं; व रागावलेली मनुष्यें जरी कित्येक वेळां हंसतात, तरी त्यांतील भयंकरपणा-वरून, तें हास्य विनोदी नसून क्रोधजन्य आहे, असें तेव्हांच कळून येतें. तसेंच मत्सर-ग्रस्त, असूयाग्रस्त, लोभग्रस्त, दंभग्रस्त, इत्यादि प्रकारच्या मनुष्यांचे हातून खरा विनोद होणें शक्य नाहीं; व त्यांच्या हांसण्याच्या मुळाशीं असणाऱ्या 'तीव्र' मनोभावांची ओळख ऐकणारास तेव्हांच पटल्याशिवाय राहणार नाहीं.

* * * *

या सर्वांहूनहि विशेषतः सांगण्यासारखी एक गोष्ट आहे. ती ही कीं, विनोदी मनुष्य हा खरा परोपकारकर्ता होय; व त्याच्या परोपकार-कृतीची मौज अशी आहे कीं, तो स्वतः जरी एखादे वेळीं दुःखी, कष्टी अगर उदासवाणा असला, तरी तो आपलें च दुःख उगाळीत न बसतां आपल्या विनोदशक्तीनें दुसऱ्यावर उपकार करतो. त्याच्या स्वतःच्या हेतूंचा आवेश व गंभीरता हीं दुसऱ्यावर होणाऱ्या उपकाराच्या मार्गांत आडवी येत नाहींत. आजपर्यंत जगांत होऊन गेलेले पुष्कळ प्रसिद्ध विनोदी लेखक व भाषणकार हे स्वतः पोक्त, विचारी, गंभीरवृत्तीचे व आवेशयुक्त असे असतांहि त्यांनीं जगांतील असंबद्ध गोष्टींच्या हास्योत्पादक अंगाकडेच लक्ष देऊन त्याजविषयीं आपल्या लेखांनीं व भाषणांनीं सहानुभूतिच उत्पन्न केली. प्रख्यात विनोदी फ्रेंच गृहस्थ रॅबेले, डॉन क्विक्झोट या अद्भुत व हास्यकारक कादंबरीचा कर्ता सर्व्हेंटीस, प्रख्यात प्रहसनकार मोलियर, तसेच शेरिडन गोल्डस्मिथ हे इंग्लिश विनोदी ग्रंथकार वरील सत्यसिद्धांताचीच उदाहरणें होत. कै० विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं आपल्या विनोदमहदाख्यायिकेंत एक गोष्ट दिली आहे तीहि वरील सिद्धांताचेंच समर्थन करिते.

हास्यरसाचा परामर्ष संस्कृत साहित्य-शास्त्रांत घेतलेला आहे तथापि इतर रसांच्या मानानें पाहतां या रसास कमी महत्त्व दिलेलें आहे. संस्कृत वाङ्मयांत सर्व भर बहुधा शृंगार रसावर व जुन्या मराठी वाङ्मयांत सर्व भर शांतरसावर. संस्कृतांत काव्य आणि शृंगार यांची बहुधा समव्याप्ति आहे, असेंच म्हटलें तरी चालेल. नव-रसांच्या अनुक्रमांत शृंगार हा प्रथम पदीं विराजमान झालेला आहे, व साहित्य-शास्त्रांत

दिलेला सर्व रसांचा अनुक्रम केवळ महत्त्वाचे दृष्टीनेंच दिलेला आहे असें म्हणण्यास जरी सबळ आधार नाहीं, तरी पण हें जें शृंगाररसास प्रथमपद मिळालेलें आहे तें केवळ यदृच्छेनेंच मिळालें असेल असें नाहीं.

नऊ किंवा दहा रसांत जर खरोखरच महत्त्वाचे दृष्टीनें अनुक्रम लावावयाचा असेल, तर हास्य व करुण हे रस प्रथम येतील; त्यानंतर वीररस येईल, नंतर वत्सलरस, त्यानंतर शृंगार व त्यानंतर अद्भुत, रौद्र, बीभत्स, भयानक वगैरे येतील. मनुष्यमात्राचें जीवित-क्रमांत येणाऱ्या भाव जागृतीचे प्रसंगांचे दृष्टीनें पहा, किंवा त्याला होणाऱ्या आनंदाचे किंवा उपभोगाचे दृष्टीनें पहा, हास्य, करुण, व वीर या तीनहि रसांस शृंगारापेक्षां अधिक महत्त्व येईल.

हास्यरसाची मीमांसा करितांना त्या रसाचे विभावांविषयींची चर्चा केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. विभाव या शब्दाचा अर्थ 'कारण' असा स्थूलमानानें करितां येईल. परंतु हें कारण म्हणजे उत्पत्तिकारण किंवा उद्दीपनपर प्रसंग. मूल मानसिक कारण एकच असतां प्रसंग अगर वस्तुस्थिति या स्वरूपाचीं दुय्यम कारणें अनेक असतात; व या दुय्यम कारणांसच विभाव असें आपण म्हणूं. विभाव या शब्दाची व्याख्या रस-गंगाधरांत, "स्थायिभावानां लोके सत्तनायकतानां यानि आलम्बनतया उद्दीपनतया वा कारणत्वेन प्रसिद्धानि तान्यन्येषु काव्यनाट्ययोः व्यंज्यमानेषु विभावशब्देन व्यपदि-श्यंते" अशी केलेली आहे. अर्थचमत्कृतीचे व वस्तुस्थितीचे जे अनंत प्रकार किंवा प्रसंग हास्यरसास उद्दीपक होतात, त्यांस हास्यरसाचे 'विभाव' असें म्हणतां येईल. पदार्थ अगणित आहेत व यदृच्छेनें त्यांच्या जशा अगणित घटना होऊं शकतात, त्याच-प्रमाणें मनुष्यास कल्पनाबलानेंहि अगणित घटना बनवितां येतात. मनुष्यांच्या उत्पत्ती-पासून आजपर्यंत तीं हांसत आलीं आहेत; तरी जी पदार्थघटना त्यांच्या हास्याचें उद्दीपनकारण काल झाली तीच तंतोतंत आज होईल, किंवा आज ज्या पदार्थघटने-मुळें मनुष्यास हंसें आलें, तीच तंतोतंत त्याच्या हास्याचें उद्दीपनकारण उद्यां होईलच, असें संभवत नाहीं. अर्थात् हीं कारणें प्रत्यहीं व प्रतिक्षणीं भिन्न असणार; व म्हणूनच आम्ही त्यास अगणित म्हणतों. तथापि या पदार्थघटना जरी अगणित आहेत, तरी निरनिराळ्या विभावांत जो सारखेपणा दिसून येतो, त्यामुळें त्यांच्या जाति किंवा त्यांचे गण हे ठरवितां येतात. मागें हास्यरसाचा विचार करतांना विकृतांगवेश, विकृत चेष्टा, परचेष्टानुकरण, असंबद्धप्रलाप, पौरोभाग्य वगैरे त्याचे विभाव म्हणून सांगण्यांत आलेच आहेत; अर्थात् हे विभावांचे वर्ग किंवा गण होत व ते तेथें केवळ उपलक्षण म्हणून सांगित-लेले आहेत.

## हास्याची उत्पत्ति

प्राणिमात्रामध्यें हास्याची उत्पत्ति केव्हां झाली असेल या विषयींचा विचार निःसंशय मनोवेधक आहे. मनुष्याची व्याख्या हसणारा प्राणी अशा शब्दांनीं कित्येक तत्ववेत्ते करितात. कोणत्याहि पदार्थाचें लक्षण करण्याचा एक प्रकार, इतर पदार्थांपासून व्यवच्छे-

-रूक अशा त्याच्या गुणांचा निर्देश करणें असा आहे; व या दृष्टीनें पाहतां, मनुष्य हा हसणारा प्राणी आहे असें ज्या वेळीं आपण म्हणतों त्या वेळीं इतर प्राण्यांच्या जातींना मनुष्याप्रमाणें हंसता येत नसून ती देणगी ईश्वरानें फक्त मनुष्यासच दिली आहे असा आपल्या बोलण्याचा अर्थ होत असतो. या बाबतींत प्राणिशास्त्रवेत्त्यांनीं आजपर्यंत जे शोध केलेले आहेत, त्यावरून पाहतां हंसण्याची देणगी ईश्वरानें फक्त मनुष्यासच दिली आहे अशा तऱ्हेचा गर्व मात्र मनुष्यास यथार्थ रीतीनें वाहतां येणार नाहीं. उत्क्रमवादांतील एक सर्वमान्य सिद्धांताप्रमाणें पाहतां मनुष्य हा माकडापासून झाला आहे; व माकडाहूनहि अधिक रानटी स्थितींतील त्याचे कांहीं पूर्वज हंसूं शकत होते हें जर खरें मानलें तर हास्य-रूपी मिळकत मनुष्याची वडिलार्जित आहे, स्वसंपादित नव्हे, असें म्हणावें लागेल. आतां मनुष्य प्राण्यामध्यें हास्याचा विकास व पूर्णता जितकी झालेली आहे तितकी अर्थात् पूर्वी झालेली नव्हती व यामुळेंच मनुष्य हा हंसणारा प्राणी आहे अशा तऱ्हेची व्याख्या कर-ण्यास कांहीं बाध येत नाहीं. प्राणिशास्त्रवेत्त्यांचे शोध म्हणून जें वर सांगितलें त्यांत वस्तु-स्थिति-निरीक्षणाचा जितका भाग आहे तितकाच पण निव्वळ तर्काचाहि आहे. तथापि या दोहोंच्या मिश्रणानें त्यांनीं जे सिद्धांत ठरविले आहेत ते अगदींच टाकाऊ आहेत असें नाहीं.

आनंदानें खदखदा हांसणें, दिलचैनींत असला म्हणजे मोकळ्या मनानें हांसणें, वस्तु-जातींतील असंबद्धता पाहून हांसणें, वगैरे हास्याचे जे श्रेष्ठ प्रकार आहेत ते फक्त मनुष्य प्राण्यांत दिसून येतात यांत शंका नाहीं. परंतु हास्याचे जे कनिष्ठ प्रकार आहेत, ते इतर प्राण्यांतहि दिसून येतात. हे प्राणि ज्या वेळीं राग, लोभ वगैरे तीक्ष्ण मनोविकारांचे आधीन नसतात व आपापसांत, अगर ते माणसाळलेले असल्यास मनुष्य प्राण्याशीं, खेळत वगैरे असतात तेव्हां त्यांच्या चेहऱ्यावरील स्नायूंमध्यें ज्या हालचाली होतात, त्यांत कित्येक अशा असतात कीं त्यास हास्यक्रिया म्हटलें असतां फारसें वावगें होणार नाहीं.

खुद्द मनुष्य प्राण्यासंबंधानें हास्य हें अगदीं प्रथम कोणत्या वयांत उत्पन्न हो[illegible] हाहि विचार मोठ्या मौजेचा आहे व हें ठरविण्याकरितां कित्येक इंग्लिश प्राणिशास्त्र-वेत्त्यांनीं प्रयोग करून पाहिलेले आहेत. या प्रयोगामध्यें लहान मुलांस तीं अगदीं उप-जल्यापासून एकलकोंडीं ठेवून त्यांच्या मध्यें स्मित, हास्य, विनोद, वगैरे गोष्टी अगदीं प्रथम केव्हां व कशा प्रादुर्भूत झाल्या, याविषयीं निरीक्षणपूर्वक त्यांनीं दिन-चर्या मांडून ठेविल्या होत्या. या निरीक्षणावरून त्यांनीं असें ठरविलें कीं, हास्यक्रिया ही मनुष्यामध्यें केवळ आनुवंशिक आहे व ती केवळ अनुकरणानेंच त्याचें अंगीं आलेली आहे असें नाहीं. दूध पिऊन पोट भरलें असतां जी एक प्रकारची सहजानंद स्थिति तान्हया मुलामध्यें उत्पन्न होते त्यावेळीं त्याचे चेहऱ्यावर एक प्रकारचें स्मित पसरतें; व अर्थात् ही क्रिया जन्मापासून अगदीं थोड्या काळांतच घडून येण्यासारखी आहे. तथापि ज्यास स्मित अशी संज्ञा अगदीं यथार्थ लावितां येईल अशी मुखविकृति मुलाचा जन्म झाल्या-नंतर त्याच्या दुसऱ्या महिन्यांत प्रथम दिसून येते व पुढें थोड्या काळांत ध्वनि उमटण्या-

सारखें हास्य त्यास येतें. हें स्मित व हास्य अर्थातच प्रथमतः सुखजन्य व आनंदजन्य असतें. यानंतर गुदगुल्या वगैरे केल्या असतां उत्पन्न होणारें हास्य त्याचे अंगीं येतें. व सुमारें तिसऱ्या महिन्याचे शेवटीं त्याजकडे पाहून हांसलें असतां व गाल चिमटींत धरून हालविलें असतां हास्य येण्यास तें पात्र होतें; भूक लागली असतां होणाऱ्या आनंदानें उत्पन्न होणारें व गुदगुल्या केल्या असतां उत्पन्न होणारें या दोहोंप्रकारच्या हंसण्याच्या कारणासंबंधाची उत्पत्ति प्राणि-शास्त्र-वेत्त्यांनीं मनुष्याच्या फार जुन्या काळच्या वंशजांच्या स्थितीशीं नेऊन भिडविली आहे.

हास्य, विनोद व शहाणपण यांमध्यें कांहीं तरी संबंध आहे काय ? कोटी किंवा चतुरालाप व विनोदवचन यांनीं हंसें येतें हें कबूल आहे. परंतु त्यांच्या योगानें कांहीं तरी शहाणपण मिळतें काय ? हा प्रश्न फार महत्त्वाचा आहे. ज्या वचनानें हंसें येतें ती गोष्ट अगदीं असत्य आहे असा जर आपला समज झाला, तर आपणास बहुधा हंसावयास येणार नाहीं. अर्थात कोटींत किंवा विनोदवचनांत सत्याचा कांहीं तरी अंश आहे, असें आपल्या मनास वाटावें लागतें. मग तो अंश किती कां थोडा असेना । जें थोडें सत्य आहे तें उघड अतिशयोक्तीनें सांगितलें असेल, म्हणजे फार फुगवून सांगितलें असेल, इतकेंच फायतें. परंतु अतिशयोक्ति व असत्य यांत पुष्कळच फरक आहे, हें विसरतां कामा नये. कोटी व विनोदवचन याचें तळांत सत्य असतेंच; व हें सत्य कळणें म्हणजे एक प्रकारचें शहाणपण शिकण्यासारखेंच आहे. मात्र कोटी व विनोदवचन यांचे द्वारें जें शहाणपण दिलें जातें त्यांत, व सरळ शब्दांनीं म्हणजे उदाहरणार्थ नीतिवचनाचे द्वारें दिलेल्या ज्ञानांत किंवा शहाणपणांत फरक आहे; तो असा कीं, पहिलें थोड्या प्रमाणावर असतें व त्याचें सरूपांतर झालेलें असतें. परंतु प्रमाण थोडें असलें तरी उपयुक्ततेला पहिल्या प्रकारचें ज्ञान किंवा शहाणपण अधिक भरतें.

हास्य-विनोद हा चांगला खरा. तथापि त्याचा उपयोग व्यवहारांत मिठासारखा किंवा साखरेसारखाच करावयाचा असतो. अन्नासारखा करावयाचा नसतो. मीठ किंवा साखर हे पदार्थ अन्नाला रुचि येण्याकरितां व फक्त रुचि येण्यास आवश्यक तितकेच उपयोगांत आणावयाचे असतात. गोड आंब्याच्या रसांत व आंबटआंब्याच्या लोणच्यांत दोन्हींतहि रुचि येण्याकरितां मीठ घालतात. परंतु तें जास्त झालें असतां ते दोन्ही पदार्थ निरनिराळ्या रुचींचे असूनहि फुकट जातात. पक्वान्नांतहि साखर प्रमाणाबाहेर पडली असतां त्याचा नाश होतो. हेंच उदाहरण सुभाषिताच्या किंवा विनोदाच्या उपयोगाकडेहि लागतें. भगवच्चिंतन हें असें येतां जातां, बसतां उठतां व आहारनिद्रादि सर्व व्यवहार करितांना विहित म्हणून सांगितलें आहे, तसा विनोद हा सर्वच काळीं विहित होत नाहीं. याचें पहिलें कारण असें कीं, व्यवहारांत आपणास शेंकडों माणसांशीं प्रसंग असतो व शेंकडों माणसें निरनिराळ्या स्वभावाचीं असतात, इतकेंच नव्हे तर सर्व काळ सर्वांची मनोवृत्ति एकसारखीच म्हणजे हास्य विनोद करण्याच प्रवण अशी नसते. दुसरें असें कीं, प्रतिध्वनी करसल व दिक्संमत असा सुभाषिताचा व विनोदाचा व्यवहार

सुख नाहीं असा—हे दोन्ही प्रकारचे मनुष्य जगांत विरळा. या विधानाचा अर्थ उघडच आहे. मनुष्य कितीहि भाग्यशाली असूं द्या, त्याला कितीहि संतति संपत्ति व सुख असूं द्या, त्याचें म्हणून समाधान व्हावयाचेंच नाहीं. परंतु मनुष्याची कोटी कितीहि अनुचित किंवा पाचचट अगर नीरस असूं द्या तिचें त्याला " वः, आपण काय सुरेख बोललों " असें कौतुकच वाटत असतें. तात्पर्य, अशा रीतीनें निसर्गसिद्ध मनुष्यमात्रास प्रिय व आदरणीय जो हास्य-विनोद त्याची खरी योग्यता ओळखून त्याचा योग्य प्रसार होईल, असा प्रयत्न करणें हें प्रत्येक प्रगतिप्रिय मनुष्याचें कर्तव्य होय......

वरील अनेक कारणांमुळें हास्यरसात्मक लेखांचे प्रसारास थोडेसें चलन मिळावें, या हेतूनें हा विषय हातीं घेतला होता. पण या विषयाचें जें विवेचन आम्ही केलें आहे तें, ज्या लोकांचे मनोरंजनाकरितां व तद्द्वारां शिक्षणाकरितां हास्यरसात्मक लेखांची प्रवृत्ति करावयाची आहे त्या जनसमूहास उद्देशून केलेलें नसून, ज्यांचें कर्तव्य अगर ज्यांचा अधिकार अशा प्रकारचें लेख लिहिण्याचा आहे त्यांसच उद्देशून केलेलें आहे हें उघड दिसून येईल.

## हास्यरसाचा व्यावहारिक उपयोग

येथवर झालेल्या विवेचनावरून व आमच्या एकंदर लिहिण्याच्या रोखावरून, आम्हा वर एक जबरदस्त आरोप येण्याचा संभव आहे, हें आम्ही पूर्णपणें जाणून आहों. तो आरोप असा की, हास्यरसास आम्ही वाजवीपेक्षां अधिक महत्त्व देतों. आमच्या आक्षेपकांच्या मतें आम्ही हास्यरसास मूर्धाभिषिक्त करून त्याला रस-वर्गांत राजपदावर स्थापिलें आहे; व असें झालें म्हणजे प्रौढ व गंभीर विचार, किंवा रसभरित सुंदर काव्यें यांस या दुनियेंत अनाथ व निराधार करून टाकल्यासारखें होणार ! कोणी म्हणतील की, हास्यरसास फाजील महत्त्व देऊन आम्ही चेष्टेखोरपणाचा नवा बाजारच भरवूं पहात आहों; व हा बाजार उघडल्यानें सभ्यपणास व गंभीरपणास कायमचीच रजा मिळेल. कोणी विचारतील— " काय हो, हें आयुष्य केवळ थट्टामस्करी करून घालविण्याकरितांच आम्हांस मिळालेलें आहे की काय, की तें आम्हीं हंसण्या खिदळण्यांतच घालवावें ? विनोदाची संवय लागली की आवेश, गांभीर्य, भक्ति, इत्यादि सद्गुणांस आम्हांस पारखें व्हावें लागणार, व ज्याच्या योगानें जगांत प्रगति संभवते ते हे वरील गुण नाहींसे झाल्यावर मग जग कसें चालणार ? " आक्षेप विचार करण्यासारखा आहे, तेव्हां त्याचा आपण शांतपणें विचार करूं.

' सत्यं ब्रूयात् प्रियं ब्रूयात् न ब्रूयात् सत्यमप्रियम् '—हें नीतिवचन कोणास संमत नाहीं ? खरें बोलावयाचें झालें तरी तें दुसऱ्यास रुचेल किंवा गोड लागेल अशाच रीतीनें बोलावें हें तर ठीकच आहे. परंतु वचन सत्य असून, रुचेल असें बोलून परती जर तें हास्योत्पादकहि असेल तर दुधांत साखर पडल्यासारखें होणार नाहीं काय ? परंतु हें तत्त्व जितकें सयुक्तिक भासतें तितकें तें व्यवहारांत आलेलें आढळून येत नाहीं.

कारण जगांत हास्याविरुद्ध युक्तिवाद व आचरण करणारे लोक पुष्कळ आढळून येतात. प्रथमतः निरनिराळ्या मनुष्यव्यक्तींची मुखचर्या कशी असते हें साधारणतः सूक्ष्म दृष्टीनें पाहणारास असें दिसून येईल कीं, कित्येकांची चर्याच मुळीं हास्यरसास प्रतिकूल असते. अशा लोकांचे नुसत्या चेहऱ्याकडेच पाहून खुशाल एकदम सांगावें कीं, या लोकांचा व हंसण्याचा नेहमीं बारावा बृहस्पति आहे. आपल्यांत एक म्हणच अशी आहे कीं, " मिया रोते क्यौं ? " तर म्हणाले " सुरतही वैसी. " अंतरंग व मुखचर्या यांमध्यें कधीं काळीं मेळ किंवा मुकाबला पडणार नाहीं, हें संभवनीय आहे. तथापि साधारण नियम असा आहे कीं, मनुष्यांत स्वभावाच्या व अंतरंगांतील विचारसरणीच्या भांडाराची किल्ली मुखचर्येंत सांपडावयाचीच व या किल्लीचे साहाय्यानें जगांतील हास्यशत्रु निमिशिमि तेव्हांच ओळखून काढितां येतात. अशी मुखचर्या असणारांची दुसरी एक मौज अशी आहे कीं, यदाकदाचित् हिंवाळ्यांत पालवी फुटल्याप्रमाणें त्यांच्या रुक्ष मनांत हास्यरसाची क्वचित् उत्पत्ति झालीच तर त्याचे योगानें त्यांचे चेहऱ्यास मोहकता किंवा सौम्यता न येऊन उलट तो अधिकच भेसूर व कठोर असा वाटूं लागतो. अशा लोकांशीं गांठ पडणें म्हणजे एक प्रकारचें दुर्भाग्यच होय. दुसरे कित्येक लोक असे असतात कीं, ते चेहऱ्यावरून सौम्य व आनंदी दिसतात व केवळ विनोदाचे ते शत्रुच असतील असें सकृद्दर्शनीं वाटत नाहीं, परंतु हास्यविनोदाचें त्यांस वस्तुतः वावडें असतें. म्हणजे स्वतः ते बहुधा कधीं हास्यविनोदाच्या भानगडींत पडत नाहींत, इतकेंच नव्हे, तर यदाकदाचित् त्यांच्या कर्णपुटावर हास्याचा यत्किंचित ध्वनि आला कीं लहान मुलाच्या कानीं क्वचित् मेघगर्जना पडल्याप्रमाणें ते कावरेबावरे होतात. त्यांच्या अंतःकरणांतील सौजन्यक्षीरांत हा विनोद म्हणजे एकाद्या मिठाच्या खड्याप्रमाणें पडून तें नासून जाऊन त्याची कालवाकालव होते. चार चौघा मंडळींत हंसणें, खिदळणें झालेलें पाहून त्यांना पंचमहापातकांत भर पडल्यासारखी भीति वाटते. व जगांतील सर्व चातुर्य, सर्व विचारीपणा, सर्व तत्त्वज्ञान हें ज्यावरील रेषा कधींहि पालटावयाची नाहीं अशा गंभीर व निश्चल चेहऱ्यांतच सांठविलें आहे, अशी त्यांची समजूत असते. यामुळें उत्तम प्रकारच्या हास्यरसाच्या सुखाची जोड करून देणारा एखादा विनोदाचा प्रकार त्यांचे दृष्टीस पडला तरी, शिकारीवर सोडलेल्या कुत्र्यांचे कानाप्रमाणें त्यांची मनोवृत्ति ताठच राहते. दुसरे कित्येक असे असतात कीं, त्यांस करुणरसच हास्यरसाचे ठिकाणीं वाटतो. अशा लोकांचे अंगीं, नुकतेंच वर वर्णन केलेल्या लोकांचे अंगीं नसणारा एक गुण असतो. तो सहृदयता हा होय. म्हणजे ही तिसऱ्या प्रतीची माणसें अंतःकरणानें प्रेमळ असतात, परंतु त्यांचें प्रेम सर्व करुणरसासच अर्पण केलेलें असतें. यांच्या समजुतीनें हें सर्व जग दुःखमयच असतें. करुणरसात्मक वस्तुघटना हा यांच्या मतें सृष्टि-नियम असून आनंदस्थानें हीं ते अपवादादाखल मानितात. हास्यविनोद करणें म्हणजे सृष्टिनियमांचे विरुद्ध जाणें असा त्यांचा ग्रह झालेला असतो. कामधंद्यामध्यें विनोदास जागा मिळूं शकत नाहीं, व कामधंदा करणें हा तर जीविताचा मुख्य हेतु होय.

यास्तव थट्टामस्करी करणें तो केवळ पोरांबाळांनी करावी असें त्यांचें मत असावें. मन मोकळें करून हंसणें हें तर ते बहुधा अर्धवेडया किंवा पूर्णवेडया लोकांवरच सोपवितात. थट्टा व अक्कल या दोन जणूं काय सख्ख्या बहिणी आहेत, व म्हणून त्या उभयतांशीं एकाच वेळीं विवाहसंबंध ठेवणें म्हणजे अनीतिमय होय असें त्यांस वाटतें. शहाणपणाचा एकवेळ स्वीकार केला म्हणजे मग त्याजवरील प्रीति कायम रहावी याकरितां ते विनोदास मार्गांतून हांकून देतात. व त्याचप्रमाणें विनोदावर प्रीति करणारा कोणी दिसल्यास त्यास शहाणपणाची ओळखहि नसलीच पाहिजे असा सिद्धांत ते ठोकून देतात. तुम्ही वाटेल तें करा, त्यांचे हातून विनोद म्हणून घडणेंच नाहीं. दुसरे कित्येक असा युक्तिवाद करितात की, हास्याची उत्पत्ति ज्याअर्थी असंबद्धतेपासून आहे व असंबद्धता हा गुण नसून तिरस्करणीय दोषच आहे, त्याअर्थी विनोदास उत्तेजन देणें म्हणजे बुद्धिवैकल्यास उत्तेजन दिल्यासारखेंच होय.

आतां वर जे इतके विनोदशत्रूंचे निरनिराळे प्रकार सांगितले, त्यांपैकी कांहीं कांहीं प्रकारच्या शत्रूंच्या मावडांची आवड करण्यास आम्ही असमर्थ आहों हें प्रांजलपणें कबूल केलें पाहिजे. कारण महादेवच मुळीं ज्यावर कोपला त्यास मनुष्यानें साहाय्य कोठवर करावें ? ज्यास ईश्वरानें घ्राणेंद्रिय दिलें नाहीं त्याची जरी कींव आली तरी त्यास सुवासाचें सुख कोण कसें प्राप्त करून देईल ? ज्याप्रमाणें सुगंधाचें इंद्रिय नाक आहे, त्याचप्रमाणें विनोदाचें इंद्रिय मन आहे. विनोदग्रहणाची शक्ति ज्याची नाहींशी झाली असेल त्याच्यापुढें प्रत्यक्ष मूर्तिमंत विनोद जरी येऊन अवतरला तरी काय होणार ? परंतु जे दुसऱ्या एका प्रकारचे विनोदशत्रू वर सांगितले आहेत, म्हणजे ज्यांचें विनोदग्रहणाचें इंद्रिय शाबूद आहे, परंतु बुद्धीच्या बाजूनें पाहतां ज्यांस विनोद हा दोषमय दिसतो, अशांना मात्र थोडेंबहुत साहाय्य करितां येणें शक्य आहे. वर जी असंबद्धता म्हणून सांगितली ती वास्तविक नेहमीं दोषरूपच असते असें नाहीं. प्रचारांत 'असंबद्धता' या शब्दास थोडीशी गौणता आहे हें खरें. परंतु कोणत्याहि प्रकारचे अपवादास्पद विचार मनांत न घेतां केवळ गमतीनें असंबद्धतेशीं व्यवहार करितां येणें शक्य आहे. एवढेंच नव्हे, तर आम्हांस असेंहि म्हणतां येईल कीं, असा व्यवहार करणें ही बुद्धीच्या एका भागाची किंवा प्रकाराची अवश्य करमणूकच होय. जगांतील वस्तुजातांत जेथें असेल नसेल तेथून संबद्धता संवादित्व हुडकून काढणें हें जसें बुद्धीस भूषणावह आहे, त्याचप्रमाणें ज्या ज्या ठिकाणीं असंबद्धता किंवा विसंवादित्व दिसेल, त्या त्या ठिकाणीं तें हुडकून काढणें हें बुद्धिसामर्थ्य तितकेंच भूषणावह आहे. संवादित्व असणें हा जसा वस्तुजातीचा गुण आहे, बुद्धीचा नाहीं, त्याचप्रमाणें विसंवादित्व हा फार झाला तर वस्तुजातीचा दोष आहे असें म्हणतां येईल. तो बुद्धीचा दोष नव्हे. ज्या ठिकाणीं हें विसंवादित्व किंवा ही असंबद्धता असूनहि तेथें अभिज्ञान करण्यानें शारीरिक किंवा मानसिक दुःख होत नाहीं, किंवा एखाद्या मनुष्याबद्दल तिटकारा उत्पन्न होत नाहीं, किंवा आपल्या नीति-बुद्धीस धक्का पोहोंचत नाहीं, अशा ठिकाणीं असं-

बद्धतेचें ज्ञान हें निःसंशय आनंददायक झालेंच पाहिजे. शाई हा पदार्थ स्वच्छ नाहीं हें खरें आहे; परंतु तिचा उपयोग लिहिण्याकडे करणें हें जसें दोषास्पद होत नाहीं, त्याचप्रमाणें असंबद्धताहि स्वतः सदोष असली तरी तिला व्यवहार्य करणें हेंहि तसेंच दोषास्पद होऊं शकत नाहीं. म्हणजे असंबद्धतेच्या गुणदोषांचा विचार फक्त योजकाचा हेतु किंवा त्या योजनेपासून होणारे परिणाम हे लक्षांत घेऊनच करावयास पाहिजे.

आतां ही गोष्ट खरी आहे कीं, नेहमींच कोट्या, थट्टामस्करी किंवा विनोद करण्याची संवय असणें हें चांगलें नव्हे. कारण तिचे योगानें स्वभावास एकदेशीयता येते व एकदेशीयता हा दोष असून शिवाय असाहि आहे कीं, तो ज्या ज्या गुणांशीं संबद्ध असेल त्यांची माती करितो. व विनोद हा गुण झाला तरी तोहि या नियमास अनुसरूनच असणार. मनुष्यस्वभावांत भारदस्तपणा व आवेश हे दोन्हीहि मुख्यांशीं असले पाहिजेत ही गोष्ट निर्विवाद आहे. विनोदाचें बेसुमार सेवन केल्यानें या दोहोंस धक्का बसण्याचा संभव असतो. जी जी वस्तु म्हणून सांपडेल तिची चेष्टाच करीत गेलें तर सर्वच थट्टा होणार. विनोद असो वा नसो, आपलें मुख्य लक्ष जगांतील उदात्त व शुद्ध अशाच गोष्टींकडे रोखलेलें पाहिजे. तसेंच थट्टामस्करी केल्याबद्दल किंवा विनोदाबद्दल जरी आपणास तिरस्कार वाटला नाहीं, तरी केवळ तिरस्करणार्ह अशाच कांहीं गोष्टी जगांत आहेत; त्यांचे संबंधानें मनांत नेहमीं तिरस्कारच बाळगला पाहिजे. जगांत असंबद्धतेचेहि प्रकार असे पुष्कळ आहेत कीं, ते पाहून हंसें कधींच येणार नाहीं, तर फक्त वाईटच वाटेल. अर्थात् अशा गोष्टींच्या संबंधांत विनोदास अवकाश नसून अविश व भारदस्तपणा याच गुणांचा तेथें आश्रय करावा लागेल. जे लोक विनोदी म्हणून आपल्यास दिसतात त्यांपैकीं कित्येक असे असतात कीं, त्यांस जगांतील प्रत्येक गोष्ट तुच्छ वाटते व यांत काय आहे, त्यांत काय आहे, असें ते करीत सुटतात. अशा लोकांना जगांत वंद्य किंवा पवित्र असें कांहींच नसतें. परंतु अशा लोकांनीं केलेल्या विनोदास विनोद ही संज्ञाच देतां येत नाहीं. अशांच्या विनोदापासून एखाद्या रोगाप्रमाणें दूर राहण्याचा प्रयत्न केला पाहिजे. एखाद्या दरबारांत ज्याप्रमाणें खुषमस्कऱ्या चतुर भाषण बोलत असतांहि मुख्य स्थानावर राजा आरूढ असतो व इतर लोक आपआपल्या दर्जाप्रमाणें अदबीनें बसलेले असतात, त्याचप्रमाणें विनोदाचें काम चालू असतांहि मनुष्याच्या मानसिक दरबारांत उदात्तपणा, विचारीपणा किंवा सत्यप्रियता यांपैकीं एक ना एक तरी सद्गुण मनःप्रवृत्तीवर आपला अम्मल चालवीत असला पाहिजे. व्यवहारांत आढळून येणारे कित्येक विनोदी लोक स्वभावतः पाहिले तर केव्हां मूर्ख तर केव्हां दुष्ट, केव्हां द्वेषखोर तर केव्हां पोकळडौली असे असतात. अशा लोकांकडे पाहिलें म्हणजे असें वाटतें कीं, एका विनोदाच्या पायीं जर इतके वर सांगितलेले दुर्गुण आपल्यावर हक्क सांगूं लागतील तर तो विनोदच नको. कारण विनोद ही चीज जरी इष्ट व प्रिय आहे, तरी तिला किती किंमत द्यावी याविषयीं कांहीं तरी सीमा असलीच पाहिजे. परंतु वरील सर्व कारणांमुळें जितकी सूट पाळावयास पाहिजे तितकी पाळूनहि शेवटीं विनोदाचें

मूल्य म्हणून कांहीं थोडें तरी शिलक राहतेंच. कारण ज्या कांहीं विवक्षित गोष्टींत विनोद आपल्यास नको आहे अशा गोष्टी एकंदरीनें थोड्या असून ज्या गोष्टींत आपल्यास विनोद हवा आहे अशा गोष्टी अधिक भरतील. या संबंधानें ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, विनोदाची गणमैत्री पुष्कळ गोष्टींशीं जुळते; जुळत नाहीं अशी फार थोड्याशीच. सद्गुणांशीं विनोदाचा सहवास होईल तेथें तर दुधांत साखर पडल्याप्रमाणें त्यास गोडी येईल, किंवा स्फटिकावर सूर्यकिरण पडल्याप्रमाणें त्यांच्या जोडीस उज्ज्वलता अगर देदीप्यता येईल. शहाणा तत्त्ववेत्ता, शूर वीर, सहृदय विद्वान्, व्यवहारचतुर पंडित, सदसद्विवेकी, इत्यादि प्रकारच्या लोकांबद्दल आपल्या मनामध्यें आदर तर असतोच; परंतु वरील लोकांपैकीं प्रत्येकाचे अंगीं जर सुदैवानें विनोदीपणाचीहि भर पडलेली असली तर आमच्या आदरबुद्धींत एक प्रकारच्या गोड प्रेमाचीहि भर पडते. म्हणजे नुसती आदरबुद्धि असल्यानें जे लोक आपणास केवळ परके किंवा दूरतःसेव्य असे वाटतात, तेच वरील प्रेम उत्पन्न झालें असतां आपणांशीं एकजीव होऊन त्यांचे सद्गुण आपणांमध्यें संक्रमित होतात.

हास्य व विनोद यांच्या उपयोगाचा दोन तऱ्हेनें विचार करितां येईल. एक समाजदृष्ट्या व दुसरा व्यक्तिदृष्ट्या. पैकीं समाजासंबंधानें पाहतां ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे कीं, समाज ही कोणी एक व्यक्ति असून तिला मन आहे असें नाहीं. परंतु ज्याप्रमाणें व्यक्तीच्या बुद्धीला व नैतिक कल्पनांना वाढ आहे, त्याचप्रमाणें एकंदर समाजाच्या बुद्धीला व नैतिक कल्पनांनाहि वाढ असते. अर्थात् ज्यांच्या योगानें या दोनहि बाबतींत समाज अधिक सुशिक्षित होईल, त्या गोष्टींनीं समाजास फायदा होईल. हास्यविनोद वगैरेंचा उपयोग व्यक्तीपेक्षां कदाचित् समाजासच कांहीं बाबतींत अधिक आहे. एका व्यक्तीच्या मनाचा कल बहुधा एकाच विशिष्ट बाजूचा असतो. त्याला शिक्षण बहुधा एकाच दिशेचें असतें व त्याचे विचारहि बहुधा एकांगी असतात. समाजाची गोष्ट तशी नाहीं, म्हणजे समाजाची वाढ अनेक अंगांनीं व्हावयाची असते. म्हणून त्यास शिक्षणहि अनेक अंगांनीं मिळावें लागतें. हें अनेकांगी शिक्षण मिळण्यास समाजाच्या हास्यविनोदप्रियतेचा मोठाच उपयोग होतो. एखादें सुभाषित एखाद्या व्यक्तीनें एकट्यानेंच वाचलें किंवा ऐकिलें तर त्यापासून होणाऱ्या फायद्यापेक्षां तेंच दहा लोकांनीं एकत्र वाचलें किंवा ऐकिलें असतां जो फायदा यथाप्रमाण व्हावा त्यापेक्षांहि तो अधिक होतो. व्यक्तीस नुसतें शिक्षण मिळतें, परंतु दहा व्यक्तींनीं मिळून तोच सुभाषितास्वाद घेतला तर प्रत्येक व्यक्तीस मिळावयाचें तें शिक्षण मिळून वरतो दहा लोकांच्या मनाचा तात्पुरता का होईना परंतु मिलाफ होऊन संघशक्तिहि उत्पन्न होते. म्हणून कोणतेंहि सुभाषित कसें काय आहे याचा विचार कर्तव्य असतां व्यक्तीच्या मनावर त्याचा काय परिणाम होईल हें पाहण्यापेक्षां समाजाचे मनावर त्याचा काय परिणाम होईल हें आधीं पाहिलें पाहिजे. हास्यविनोदशीलता हा एक सामाजिक गुण आहे; संपर्कानें एकापासून दुसऱ्यापर्यंत व दुसऱ्यापासून तिसऱ्यापर्यंत असा त्याचा प्रसार होतो. सामाजिक हास्यविनोदापासून सामाजिक सुखभाव, सामाजिक सद्गुण, व समाजहितदृष्टि यांच्या वृद्धीस मदत होते.

पण त्याचें कारण समाजांतील वाहतुकीचीं साधनें, दळणवळण ही पुष्कळ वाढून, मत-प्रसाराच्या क्षेत्रांत पूर्वीहून पुष्कळच अधिक लोकसंख्या येऊं लागली. ग्रीसच्या पहिल्या काळांत एकेक नगर हेंच एकेक राष्ट्र होतें, तेव्हां मनुष्याचा आवाज पोंचेल इतक्या लहान टापूंत उपदेशाचें, मतप्रसाराचें, अनुशयाचें, न्यायदानाचें किंवा राज्यकारभारांत जय मिळविण्याचें काम होत असे व संपत असे. अशा वेळीं छापखान्याचें किंवा लेखनाचें काय काम? पहाडी आवाज, सरस वक्तृत्व, व चित्ताकर्षक अंगविक्षेप येवढ्यानेंच कार्य होई. मात्र अशा वेळीं गद्याला जागा नसून पद्यालाच असला तर अवसर असे. डेमॉस्थेनिस, पेरिक्लिस हे गद्य लेखक म्हणून प्रसिद्ध नाहींत तर वक्ते म्हणून. पण त्यांचें वक्तृत्व गद्यापेक्षां काव्यालाच अधिक जवळ असे. कारण त्यांत भावना पुष्कळ. जुन्या-काळीं भाट, चारण, शाहीर हेच वाङ्मयाचे आधारस्तंभ असत. परंतु आज विद्या, शिक्षण, राजकारण, व्यापार, उद्योग, शास्त्रसंशोधन, या सर्वांत शुद्ध तर्कबुद्धि, विवेचकता, हिशेबीपणा यांजवर पुष्कळशी भिस्त येऊन पडली असून, भाषाव्यवहार रेखीव, कातीव, सुटसुटीत, स्पष्टार्थबोधक असा व्हावा लागतो. त्यामुळें गद्य प्रकारच अधिक उपयोगी पडतो आणि त्यामुळें लेखन व त्यामुळें छपाई ही वाढलीं आहेत.

तथापि आजहि वाङ्मयापैकीं ललित वाङ्मय हा प्रकार बुडाला नाहीं, इतकेंच नाहीं तर, काव्याचें प्राचीन महत्त्व आजहि शिलक असून पद्याबरोबर इतर अनेक प्रकारांनींहि तें वाङ्मय क्षेत्रांत अवतरलें आहे. जें ग्रीस वगैरे तिकडच्या राष्ट्रांत झालें, तेंच भरत-वर्षांतहि झालें.........

आतां प्राचीन काळ हा काव्यप्रधान कां, व अर्वाचीन हा गद्यप्रधान कीं याचा दुसऱ्या रीतीनेंहि खुलासा करितां येतो.मेकॉलेप्रभृति कांहीं लेखकांचें म्हणणें असें कीं, प्राचीन काळीं मनुष्य समाज हा मनानेंच अधिक अद्भुतरसप्रेमी व सहृदय होता म्हणून त्या वेळीं त्यांच्या हातून अर्वाचीन काळापेक्षां अधिक सरस काव्य निर्माण झालें. पण मेकॉलेचें हें मत चुकीचें आहे. तो जर असें म्हणता कीं, "प्राचीन काळीं विचारांच्या व भावनेच्या उद्गारांना स्वाभाविकपणेंच गद्यापेक्षां पद्याचें रूप अधिक येई" तर त्याचें विधान मार्मिक व वस्तुदर्शक ठरलें असतें. पण केवळ विरोधाभास साधण्याच्या भरांत त्यानें Poetry declines as civilisation advances असें वाक्य लिहिलें. वास्तविकपणें जुन्या काळचें काव्य झालें म्हणून तें सर्वच आधुनिक काव्यापेक्षां अधिक सरस होतें असें म्हणतां येत नाहीं. तसेंच, आधुनिक काव्य जुन्यापेक्षां कमी कमी होत होत नसून, अधिकाधिक सरसच निर्माण होत आहे. फरक इतकाच कीं, पूर्वी एकंदर वाङ्मयाशीं काव्याचें प्रमाण पुष्कळच अधिक पडे, तर हल्लीं तें प्रमाण पुष्कळच कमी झालें आहे. पूर्वी जर पद्य हा नियम व गद्य हा अपवाद होता असें म्हटलें, तर आज त्याच्या उलट गद्य हा नियम व पद्य हा अपवाद असें त्यांचें प्रमाण बनतें. मेकॉलेला खरोखर जें म्हणावयाचें होतें तें हें कीं, पूर्वी समाजाची संस्कृति आधिदैविक असून, शिवाय भाषेची वाढ प्राथमिक स्थितींत असल्यामुळें रूपकाच्या द्वारें लोकांना आपल्या कल्पना मांडाव्या लागत;

म्हणजे संग्रहीं असलेल्या थोड्याशा शब्दावर पुष्कळ शब्दांचें काम त्यांना भागवून घ्यावें लागे. असें करण्यांत लक्षणेचा उपयोग अवश्य असतो, व लाक्षणिक भाषेला अलंकारिक पद्याचें स्वरूप सहजच येतें.........

एकीकडे कविता सोपी व प्रासादिक करण्याकडे कांहीं लोकांचा इतका कटाक्ष असतां, दुसरीकडे याच्या अगदीं उलट अशी प्रवृत्ति दिसून येत आहे. या ( दुसऱ्या ) प्रकारच्या कवींचा अमेरिकेंत एक नवा संप्रदायच बनूं पहात आहे, व त्याच्या संप्रदायाला The cult of the unintelligible असें नांव कांहींनीं दिलें आहे. त्यांचा उद्योगच असा कीं कविता लिहावयाची ती दुसऱ्या कोणास बहुधा समजणार नाहीं अशीच लिहावयाची ! या कवींना अशी इच्छा असते कीं आपली कविता लोकांनीं वाचावी, पण त्याबरोबर अशीहि अपेक्षा असते कीं, ती त्यांना समजावयाची नाहीं. म्हणजे न समजतां त्यांनीं वाचावी, व त्या न समजण्याच्या कारणानेंच त्यांनीं आनंदमग्न व्हावें असें त्यांचें तत्त्व असतें. मग या कवितेला नांव तरी काय द्यावयाचें ? व अशा कवित्वाची मीमांसा तरी कशी करावयाची ? ही मीमांसा त्यांचे कांहीं पक्षपाती टीकाकार कशी करतात हें पहा. एक म्हणतो, त्यांचें कवित्व हा अंतरंगाच्या गिरिकुहरांत पेटलेल्या ज्वालामुखांतील रस असतो म्हणून तें लोकांना कळण्यासारखें नाहीं. दुसरा म्हणतो या कवींचें मन विचार करूं लागण्यापूर्वीच त्यांच्या तोंडून उद्गारांची वाफ निघून जाते, मग त्यांचा अर्थ कोण कसा लावणार ? कोणी म्हणतो, अर्थ समजण्याला तर्काची कांहीं तरी मदत लागते; पण तर्क हा काव्याचा विध्वंसक म्हणून हे कवि आपल्या काव्यांत तर्काचा मागमूसहि ठेवूं देत नाहींत. एक म्हणतो, स्थल व काल यांचीं बंधनें मानणारा तो कवि कसला ! व दुसरा म्हणतो कीं, अतिरिक्त मद्यप्राशन केलें असतां मनुष्याची जी स्थिति होते ती ज्याची होईल तोच खरा कवि...............

पण ही मीमांसा सोडून दिली असतां, आत्मगुंजन किंवा अश्रुतगुंजन करणाऱ्या या कवींच्या काव्याची दुसऱ्याहि एक प्रकारची मीमांसा देणारे कांहीं टीकाकार आहेत. मानसशास्त्रांतील प्रयोगांचा आधार घेऊन ते म्हणतात कीं, हे कवि म्हणजे अगदीं बाल्यावस्थेंतील मुलें होत......आपल्या इकडे हल्लीं अशा प्रकारचे आत्मगुंजक कवि थोडे आहेत. ......म्हणून या दोन टोंकांचे कवि, हे दोनहि त्याज्य समजावेत; आणि खरे कवि तेच म्हणावे कीं जे स्वतः गुंजन करून त्यांत रमतात, आपण होऊन आपलें गुंजन मुद्दाम लोकांना ऐकवीत नाहींत, पण ज्यांचीं कवनें हातीं घेऊन सहृदय वाचक स्वतंत्र रीतीनें तीं वाचूं शकतात, समजूं शकतात, व त्यांच्या अर्थाचा आनंद लुटूं शकतात......भौतिक शास्त्रज्ञान हें काव्याला विरोधक होत नाहीं; उलट खरा कवि तेंच ज्ञान रुक्ष शास्त्रीय भाषेच्या ऐवजी वाङ्मयमय भाषेंत लोकांना पटवूं शकेल आणि यानंतर कवि भौतिक तत्त्वज्ञानाच्या द्वारें आध्यात्मिक तत्त्वज्ञानांत शिरला म्हणजे मग काव्याच्या वातावरणांत त्याला हवें तितकें उंच व दूरवर हिंडतां फिरतां येतें. भौतिकशास्त्र हें धर्माशीं विरोधी आहे अशी जुनी समजूत होती ती आतां नष्ट झाली आहे. त्याचप्रमाणें भौतिकशास्त्र हें काव्या-

विरोधी आहे असें अजून कांहीं थोड्या असंस्कृत मनांना वाटतें, पण ती समजूतहि लव-करच निघून जाईल.

—मध्यभारतीय कविसंमेलन, उज्जयिनी १९३१ अध्यक्षीय भाषण.

## प्रस्तावनांतील स्फुट विचार

विनोदी लेख झाला म्हणून त्यांतील वर्णनानें प्रत्यक्ष किळस येऊं नये, याविषयीं जपलेंच पाहिजे. शिवाय लेखकानें सर्व कांहीं अतिशयोक्तिपूर्ण भाषेनें स्पष्ट लिहिल्यानें वाचकाच्या कल्पना-शक्तीला कांहींच काम उरत नाहीं; ही साहित्यशास्त्र दृष्टयाहि मोठीच चूक आहे, असें मला वाटतें.........

बाकीचे लोक आपण लेखनव्यवसायी नाहीं म्हणून किंवा लिहिण्याचा कंटाळा करून मुळींच कांहीं लिहीत नाहींत; पण त्यामुळें वाङ्मयाची फार हानि होते, रोजच्या व्यवहारांत व संभाषण–प्रसंगांत किती तरी विनोद निर्माण होत असतो; पण त्याला लेखाचें स्वरूप येत नसल्यानें त्याला विस्तृत क्षेत्र मिळत नाहीं व तो फुकट जातो. म्हणून मनुष्य कोणताहि विशेष धंदा करीत असला तरी थोडाबहुत लेखनव्यवसाय करणें हा आपला निसर्गसिद्ध हक्क आहे असें मानून त्यानें तो बजावल्यास वाङ्मय हें, अनेकांगी व बहुगुणी होईल हें सांगावयास नकोच. —कै. लिमयेकृत विनोदी लेख.

× × × ×

निदान इतकें तरी खरें कीं, खुद्द हिंदुस्थानांत केवळ हिंदी लोकांकडूनच कीर्ति वाढावयाची झाली तर तिला जितका वेळ लागेल त्याच्या एक दशांश वेळहि त्या कीर्तीस युरोपियन विद्वानांचा आश्रय मिळाला असतां लागत नाहीं. आतां हा सर्व केवळ नुसता-च कालमहिमा आहे असें नव्हे; तर यांत थोडा कार्यकारण भावहि आहे. हिंदुस्थानां-तील लोकांच्या कानांत हिंदी मनुष्याच्या कीर्तीचा मोठा आवाज होण्यास युरोपांतील कर्ण्याला तोंड लावून फुंकलें पाहिजे हें खरें आहे,; पण त्याचें कारण असें कीं, खरोखरच आजकाल हिंदुस्थानापेक्षां युरोपांत कोणत्याहि बाबतींतील विद्वत्ता अधिक आहे; व अशी गोष्ट असल्यामुळें हिंदी लोकांच्या कीर्तीला असा 'द्राविडी' म्हणजे 'युरोपियनी' प्राणा-याम करावा लागतो.........

कोणास आश्चर्य वाटेल, पण खरोखरच हजारीं पांच सुशिक्षित लोक दुसऱ्या एखाद्या देशी भाषेशीं परिचय असलेले सांपडत नाहींत. अर्थात् एका देशी भाषेंतील ग्रंथाचें दुसऱ्या देशी भाषेंत भाषांतर होण्याचें प्रमाण याच्याहूनहि कमीच भरणार. हिंदु-स्थानांतील राष्ट्रीयत्वाच्या दृष्टीनें ही गोष्ट उणेपणाची नाहीं असें कोण म्हणेल ? वास्त-विक बहुतेक देशी भाषा परस्परांना इतक्या जवळ आहेत कीं, कोणत्याहि दुसऱ्या देशी भाषेचा अभ्यास कोणाहि हिंदी मनुष्यास सुमारें एक वर्षांत चांगला करितां येईल. असली तर कानडीचीच गोष्ट थोडी वेगळी ठरेल; कारण कानडी ही अवघड भाषा असून त्यांतल्या त्यांत जुनें कानडी, म्हणजे ग्रंथलेखनाचें कानडी, बरेंच अवघड असतें. पण

हिंदी, बंगाली, मराठी व गुजराथी, म्हणजे सुमारें १३–१४ कोटी लोकांच्या मिळून या चार भाषा, परस्परांना इतक्या निकट आहेत, कीं, त्यांतील कोणतीहि भाषा, तीतील ग्रंथाचें भाषांतर करण्याइतकी शिकण्यास एक वर्षाहून अधिक वेळ लागणार नाहीं. या चारी भाषा संस्कृतभाषारूपी एकाच जननीचीं लेंकरें असल्यामुळें त्यांच्या चेहऱ्यांत साम्य असल्यास नवल नाहीं. फार काय, पण सुसंस्कृत ग्रंथलेखनाचे सरसकट नमुने घेतले तर त्यांत या चारी भाषांना साधारण असे शेंकडा ८० शब्द सांपडतील. अर्थात्, केवळ व्याकरणानें, फार काय पण भाषेच्या मोडणीनें व वाक्प्रचारानें(Idiom)हि वाचकांस अडवून धरिलें तरी फारसें अडवून धरतां येणार नाहीं. मुख्यार्थ-दर्शक परिचित शब्दरूपी मोठमोठे दगड परभाषेच्या प्रवाहांत एकापुढें एक टाकलेले असल्यामुळें व्याकरणाच्या पाण्यांत फारसा पाय न भिजवितां मनुष्यास वरच्या तात्पर्याचें परतीर गांठतां येतें. पण आधीं ग्रंथलेखनाचीच हौस आपणांस कमी, मग इतकें थोडे श्रम घेऊन कां होईना, पण देशी भाषेंतील ग्रंथांचें भाषांतर करण्याची हौस कोठून येणार ?

—पतिपत्नीप्रेम कादंबरी.

× × × ×

......प्रस्तुत आठवणींच्या या ग्रंथांतहि सामान्य व असामान्य यांचें प्रमाण जवळ जवळ वर सांगितल्यासारखेंच पडेल असें कदाचित् कोणी म्हणतीलहि. वाळल्यापरोबर ओलें जळतें म्हणतात; तसाच थोरांबरोबर लहानाचाहि सहज सत्कार होतो, पण त्याबद्दल कोणी नाक मुरडीत नाहीं. परंतु थोरांच्या लहानसहान गोष्टी नुसत्या खपून जातात असेंच केवळ नसून त्या आदरणीयहि कां ठरतात ? याचें उत्तर असें कीं, त्यांच्यामुळें थोर विभूतींचे स्मरण-प्रसंग वाढतात म्हणून. थोरांचें स्मरण हें स्फूर्तिदायक असल्यामुळें तें नित्य किंवा निदान जितका अधिक वेळ घडेल तितकें घडावें असें वाटणें स्वभाविक आहे. ......सगुणपूजेचें तत्त्वच आठवणींच्या ग्रंथांच्या मुळाशीं असलेलें दिसून येतें. देव-पूजेंतील सामुग्री सामान्य किंमतीचीच असते. परंतु देव-पूजेची भावना उत्पन्न करून देणारें अभिषेकपात्र चार आण्यांचें असलें तरी आंघोळीचें पाणी तापविण्याच्या बंबापेक्षां तें अधिक पवित्र व जपून ठेवावेंसें वाटतें ! देव पुसल्यावर पुसण्याच्या वस्त्राला एक पैसाहि पडत नाहीं. पण त्याचें धार्मिक महत्त्व स्वतः मालकानें नेसलेल्या जरतारी पीतांबरापेक्षांहि अधिक ठरतें !

मानसिक शास्त्राचा असा नियमच आहे कीं, आपणांस कोणाचेंहि स्मरण होतें तें तत्संबंधीं सगुण रूपाच्या कोणत्या तरी एक किंवा अनेक अंगानींच होतें. निर्गुण अशी आठवण होऊंच शकत नाहीं. कारण आठवण ही ज्या मूळ ज्ञानसंवेदनेची पुनरावृत्ति असते तें ज्ञानहि सगुण म्हणजे बाह्यसृष्टीच्या साधनानें किंवा आधारानेंच झालेलें असतें. .........

—लो॰ आठवणी व आख्या॰ भाग १

# उतारे–टीका

## खोडसाळ टीकेस उत्तर

पुणें येथील कन्याशाळेच्या वार्षिक समारंभासंबंधानें 'ज्ञानप्रकाश 'कारांनीं ता. २७ एप्रिल व ता. १ मेच्या अंकांत जी हलकटपणाची व्यक्तिविषयक टीका केली आहे तिजवरून 'ज्ञानप्रकाश'कारांचा सहजच मत्सर व्यक्त होतो. पुणें शहरांतील समारंभांना अध्यक्ष नेमण्याची पात्रता स्वतः ज्ञानप्रकाशकार अगर त्यांच्या कंपूंतले इष्टमित्र यांच्या अंगीं नसल्यास, त्यांना बेकारपणामुळें लाभलेली अखंड फुरसत तरी काय उपयोगी पडणार ? एखाद्या गाडवाला देखील आपणाला कोणी कोतवाली घोडा म्हणून सजवील का, अशी आकांक्षा मनांतून उत्पन्न होत असेल, पण तिचा काय उपयोग ? पुण्यांत कोणीं कोणत्या प्रसंगीं कोण अध्यक्ष नेमावे याचाहि उपदेश लोकांना ज्ञानप्रकाशकार करूं लागलेले पाहून मत्सरानें त्यांचा मेंदू बिघडला याविषयीं कोणासहि शंका उरणार नाहीं. मात्र स्वतः केळकरांनाच ज्ञानप्रकाशकारांची कींव येऊन, चार ठिकाणीं अध्यक्षस्थान स्वीकारण्याची विनंति झाली असतां प्रकाशकारांच्या मत्सराची आग पेटते म्हणूनच मी तें स्वीकारीत नाहीं, असें त्यांनीं जाहीर केल्यास प्रकाशकारांच्या बिघडलेल्या मेंदूला किंचित् विश्रांति मिळण्याचा संभव आहे. केळकरांना निमंत्रणें करणारांनीहि ही गोष्ट लक्षांत ठेवून कांहीं प्रसंगीं गय खाल्ली तर ज्ञानप्रकाशकारांवर ती दयाच होईल. पहावें, ज्ञानप्रकाशकारांच्या या दोन लेखांतील कळणालापाचा कांहींतरी उपयोग होतो का !

येथील हुजूरपागेंतील शिक्षण असावें तितकें लोकसंमत नाहीं, व त्याला कॉस्मॉपॉलिटन म्हणजे बकाली स्वरूप आहे, अशी विधानें केळकर यांनी कन्याशाळेच्या बक्षिससमारंभाचे दिवशीं अध्यक्ष या नात्यानें केलीं, म्हणून ज्ञानप्रकाशकारांनीं केळकरांवर आग पाखडली आहे. या बाबतींत केळकरांच्या भाषणाचा रोख विद्यमान स्थितीपेक्षांहि फीमेल-हायस्कूलच्या पूर्वइतिहासावर विशेष होता ही गोष्ट खुद्द ज्ञानप्रकाशांतच केळकरांच्या भाषणाचा जो रिपोर्ट आला आहे त्यावरून उघड दिसून येणारी आहे. हायस्कूलच्या व्यवस्थेसंबंधाचा वाद नवा नसून तीसपस्तीस वर्षांपासूनच तो चालत आलेला आहे. नांवाला सेक्रेटरी म्हणून पुण्यांतील कोणी कोणी खासगी गृहस्थ या संस्थेचे ऋणानुबंधी वेळोवेळीं असले तरी, मुख्य अध्यापिकाबाई या कोणी खास युरोपियन किंवा तत्सम किंवा तद्भव असतात, व त्यांच्या देखरेखीखालीं चालणारें शिक्षण हिंदुधर्माच्या दृष्टीनें बकाली स्वरूपाचें असावें यांत आश्चर्य नाहीं. कोणीहि मुख्याध्यापक झाला तरी तो आपणाला प्रिय अशा संस्कृतीचेंच घोडें पुढें दामटणार. पण उलट लोकांचेंहि पाहणें असेंच असणार कीं, स्त्रीशिक्षणाला झालें तरी राष्ट्रीय म्हणून कांहीं दिशा आहे, व या दिशेनें आंखलें गेलेलें शिक्षण इतर शिक्षणापेक्षां अधिक चांगलें. खुद्द मुंबई युनिव्हर्सिटींतील

हिंदी, बंगाली, मराठी व गुजराथी, म्हणजे सुमारें १२–१४ कोटी लोकांच्या मिळून या चार भाषा, परस्परांना इतक्या निकट आहेत, कीं, त्यांतील कोणतीहि भाषा, तींतील ग्रंथांचें भाषांतर करण्याइतकी शिकण्यास एक वर्षाहून अधिक वेळ लागणार नाहीं. या चारी भाषा संस्कृतभाषारूपी एकाच जननीचीं लेंकरें असल्यामुळें त्यांच्या चेहऱ्यांत साम्य असल्यास नवल नाहीं. फार काय, पण सुसंस्कृत ग्रंथलेखनाचे सरसकट नमुने घेतले तर त्यांत या चारी भाषांना साधारण असे शेंकडा ८० शब्द सांपडतील, अर्थात्, केवळ व्याकरणानें, फार काय पण भाषेच्या मोडणीनें व वाक्प्रचारानें(Idiom)हि वाचकांस अडवून धरिलें तरी फारसें अडवून धरतां येणार नाहीं. मुख्यार्थ-दर्शक परिचित शब्दरूपी मोठमोठे दगड परभाषेच्या प्रवाहांत एकापुढें एक टाकलेले असल्यामुळें व्याकरणाच्या पाण्यांत फारसा पाय न भिजवितां मनुष्यास वरच्या तात्पर्याचें परतीर गांठतां येतें. पण आधीं ग्रंथलेखनाचीच हौस आपणांस कमी, मग इतके थोडे श्रम घेऊन कां होईना, पण देशी भाषेंतील ग्रंथांचें भाषांतर करण्याची हौस कोठून येणार !

—पतिपत्नीप्रेम कादंबरी.

× × × ×

......प्रस्तुत आठवणींच्या या ग्रंथांतहि सामान्य व असामान्य यांचें प्रमाण जवळ जवळ वर सांगितल्यासारखेंच पडेल असें कदाचित् कोणी म्हणतीलहि. वाळल्याबरोबर ओलें जळतें म्हणतात; तसाच थोरांबरोबर लहानांचाहि सहज सत्कार होतो, पण त्याबद्दल कोणी नाक मुरडीत नाहीं. परंतु थोरांच्या लहानसहान गोष्टी नुसत्या खपून जातात असेंच केवळ नसून त्या आदरणीयहि कां ठरतात ? याचें उत्तर असें कीं, त्यांच्यामुळें थोर विभूतींचे स्मरण-प्रसंग वाढतात म्हणून. थोरांचें स्मरण हें स्फूर्तिदायक असल्यामुळें तें नित्य किंवा निदान जितका अधिक वेळ घडेल तितकें घडावें असें वाटणें स्वाभाविक आहे. ......सगुणपूजेचें तत्त्वच आठवणींच्या ग्रंथांच्या मुळाशीं असलेलें दिसून येतें. देव-पूजेंतील सामुग्री सामान्य किंमतीचीच असते. परंतु देव-पूजेची भावना उत्पन्न करून देणारें अभिषेकपात्र चार आण्यांचें असलें तरी आंघोळीचें पाणी तापविण्याच्या बंबापेक्षां तें अधिक पवित्र व जपून ठेवावेंसें वाटतें ! देव घुतल्यावर पुसण्याच्या वस्त्राला एक पैसाहि पडत नाहीं. पण त्याचें धार्मिक महत्त्व स्वतः मालकानें नेसलेल्या जरतारी पीतांबरापेक्षांहि अधिक ठरतें !

मानसिक शास्त्राचा असा नियमच आहे कीं, आपणांस कोणाचेंहि स्मरण होतें तें तत्संबंधीं सगुण रूपाच्या कोणत्या तरी एक किंवा अनेक अंगांनींच होतें. निर्गुण अशी आठवण होऊंच शकत नाहीं. कारण आठवण ही ज्या मूळ ज्ञानसंवेदनेची पुनरुक्ति असते तें ज्ञानहि सगुण म्हणजे बाह्यसृष्टीच्या साधनानें किंवा आधारानेंच झालेलें असतें. ........

—लो॰ आठवणी व आख्या॰ भाग १

सदर विद्यापीठानें स्वतःचे निराळे पंधरा लक्ष रुपये तरी जमवावे, किंवा विद्यापीठाला सरकारकडून मान्यता तरी मिळवावी, म्हणजे पंधरा लाखांवरचें नुसतें व्याज देत न बसतां ऐनजिनसी देणगीचे पंधरा लाख रुपये आपण विद्यापीठाच्या स्वाधीन एकदमच करूं. यावरून सरकारच्या मान्यतेच्या एका नुसत्या शब्दाला आज पंधरा लाख रुपयांची किंमत आहे, असें समीकरण सिद्ध होत नाहीं काय ? व तीच नक्की गोष्ट, सरकारी मान्यतेच्या जुलमाविषयीं तक्रार करतांना, मुद्याची म्हणून केळकरांनीं सांगितली, यांत ठाकरसी यांच्याविषयी अवमान्यतेचा ध्वनि देखील नाहीं. पण केळकरांना कोणीकडून तरी नांवें ठेवण्याच्या भरांत ज्ञानप्रकाशकारांच्या डोळ्यांना हें कसें दिसावें ? खुद्द ठाकरसी यांनाहि सरकारी मान्यतेचा उपयोग दिसत असला तरी हुजूरपागेंतील शिक्षण व भारत महिला-विद्यापीठांतील शिक्षण यांपैकीं त्यांना मनांतून कोणतें अधिक मान्य होतें, हें त्यांच्या देणगीवरूनच सिद्ध होतें. पण एक वेळ ठाकरसीसारखा गुजराथी गृहस्थ महिलाविद्यापीठाच्या सेनेट सभेवर विश्वास टाकील, पण मुंबई युनिव्हर्सिटीच्या व सरकारी मान्यतेच्या मोहास बळी पडणारे आमचे कित्येक महाराष्ट्रीयच या राष्ट्रीय स्त्रीशिक्षणाला नाराज होतात हें दुर्भाग्य होय. लोकमताच्या गोष्टी केळकरांनीं कशाला बोलाव्या, अशीहि एक खोंच ज्ञानप्रकाशकारांनीं मारली आहे. पण त्यांनीं हें ध्यानांत ठेवावें कीं, लोकमताशीं एकदोन बाबतींत केळकरांना आज झगडावें लागत असलें तरी ते पायावर खडे उभे आहेत, व एकदोन बाबतींत प्रतिकूल असलेलें लोकमत फिरून खेंचून आपल्याकडे आणूं अशी त्यांना उमेद आहे. बिचारे ज्ञानप्रकाशकार व तत्सदृश मवाळ यांची व लोकमताची फारकत कधींच होऊन त्यांना इल्लींच्या मार्गानें डोकें वर काढण्याचा मुळींच संभव नाहीं !

—केसरी, ता. ४ मे १९२३.

शिक्षण घेतलें तरी त्यांतहि हा वकालीपणा दिसून येतो. परकी भाषेला फाजील महत्त्व व विदेशी संस्कृतीच्या ध्येयाचा जुलूम या गोष्टींनीं मुंबई युनिव्हर्सिटीचें शिक्षण पूर्वी तर दूषित होतेंच; पण अद्यापिहि तें पुष्कळ तसेंच आहे. न्या० रानडे, कै० मोडक प्रभृतींपासून परवां प्रो० हरिभाऊ लिमयांपर्यंत मातृभाषेच्या प्रगतीच्या प्रयत्नास मुंबई युनिव्हर्सिटीच्या सेनेटमध्यें जो अडथळा झाला त्याचें कारण सेनेटमधील वकालीपणा हें तर आहेच, पण शिवाय त्याच्या जोडीला युनिव्हर्सिटीची शेंडी मुंबईसरकारच्या हातीं असणें हेंहि एक कारण आहे. अशा परतंत्र व वकाली युनिव्हर्सिटीच्या परीक्षांना मुली तयार करण्याचें काम हुजूरपागेंतील शाळा करते. म्हणून निदान ज्या अंशानें मुंबई युनिव्हर्सिटी लोकमतानुवर्ती नाहीं, त्याच अंशानें हुजूरपागेंतील शाळाहि लोकमतानुवर्ती नाहीं हें म्हणावयास चोरी कसली ? शिवाय स्त्रियांकरितां म्हणून कांहीं वेगळ्या प्रकारचें शिक्षण असावें ही गोष्ट मुंबई युनिव्हर्सिटीच्या डोक्यांतहि अद्यापि येत नाहीं.

मौज ही कीं, खुद्द विलायतेंत स्त्रीशिक्षणाचा इतका प्रसार असतां तेथें देखील शाळांतून स्त्रिया व पुरुष यांचें शिक्षण एकत्र होऊं नये व उभयतांचा अभ्यासक्रमहि वेगवेगळा असावा ही गोष्ट मान्य होऊन चुकलेली आहे. केवळ सरकारी नंबरी विटांशिवाय स्त्रीशिक्षणाची इमारत इतर कशानेंहि बांधली जाऊं नये हेंच मत खरें व सर्वमान्य असतें तर, एका इंग्लंड-स्कॉटलंडांत स्त्रीशिक्षणाचीं अठरा वेगवेगळीं युनिव्हर्सिटीपंजा कॉलेजें, वेगळ्या पदव्या, वेगळे डिप्लोमे, वेगळीं सर्टिफिकिटें अमलांत आलीं नसतीं. पण आमच्या इकडे पाहावें तों विलायतेवरहि ताण ! आमच्यापैकीं कांहीं स्त्रीशिक्षणेच्छु लोकांना पाहावें तों स्त्रीविद्यार्थ्यांना अगदीं शंभर नंबरी इंग्रजी भाषा आली पाहिजे, त्याशिवाय चालत नाहीं. आणि जीं पुस्तकें, जो अभ्यासक्रम, पुरुषांना तोच स्त्रियांनाहि लागू करावा असा त्यांचा आग्रह असतो. कां तर त्यांत यत्किंचित् फेरबदल केला तर स्त्रियांना कमीपणा देऊन त्यांचा उपमर्द केल्याचा गुन्हा घडेल ! पुण्यांतील लोक अद्यापि आपल्या मुली हुजूरपागेंतील शाळेंत पाठवितात, एवढ्यावरून तेथील शिस्त व शिक्षण पूर्णपणें लोकसंमत आहे, त्यांत सुधारण्यास जागा नाहीं, असें त्याच्या कोणा कट्या भगतास म्हणावयाचें असेल तर त्यानें खुशाल म्हणावें; पण राष्ट्रीय शिक्षणाच्या एका विशिष्ट नमुन्यावर रचलेल्या, हिंगणें युनिव्हर्सिटीला जोडलेल्या, कन्याशाळेच्या समारंभप्रसंगीं त्या संस्थेंतील विद्यार्थिनींची संख्या वाढावी, व ही वाढ होण्याला हुजूरपागेंतील विद्यार्थिनींची संख्या कमी व्हावी लागली तरी त्यांत विषाद मानण्याचें कारण नाहीं, असले उद्गार कोणीं काढल्यास त्यानें औचित्याचा भंग न होतां औचित्यांत भरच पडली, असें कोणासहि म्हणावें लागेल. मग मत्सरानें वेडावलेले ज्ञानप्रकाशकार कांहींहि म्हणोत.

याच समारंभांत बोलतांना केळकरांनीं सर विठ्ठलदास ठाकरसी यांची टवाळी केली असा एक आरोप ज्ञानप्रकाशकारांनीं केला आहे. परंतु तो सर्वस्वी खोटा व द्वेषमूलक आहे. केळकर यांनीं इतकेंच दर्शविलें होतें कीं, ठाकरसी यांनीं भारतमहिला-विद्यापीठाला पंधरा लाख रुपयांची देणगी देऊं करतांना अशी एक अट घातली आहे कीं,

सदर विद्यापीठानें स्वतःचे निराळे पंधरा लक्ष रुपये तरी जमवावे, किंवा विद्यापीठाला सरकारकडून मान्यता तरी मिळवावी, म्हणजे पंधरा लाखांवरचें नुसतें व्याज देत न बसतां ऐनजिनसी देणगीचे पंधरा लाख रुपये आपण विद्यापीठाच्या स्वाधीन एकदमच करूं. यावरून सरकारच्या मान्यतेच्या एका नुसत्या शब्दाला आज पंधरा लाख रुपयांची किंमत आहे, असें समीकरण सिद्ध होत नाहीं काय ? व तीच नक्की गोष्ट, सरकारी मान्यतेच्या जुलमाविषयीं तक्रार करतांना, मुद्याची म्हणून केळकरांनीं सांगितली, यांत ठाकरसी यांच्याविषयीं अवमान्यतेचा ध्वनि देखील नाहीं. पण केळकरांना कोणीकडून तरी नांवें ठेवण्याच्या भरांत ज्ञानप्रकाशकारांच्या डोळ्यांना हें कसें दिसावें ? खुद्द ठाकरसी यांनाहि सरकारी मान्यतेचा उपयोग दिसत असला तरी हुजूरपागेंतील शिक्षण व भारत महिला-विद्यापीठांतील शिक्षण यांपैकीं त्यांना मनांतून कोणतें अधिक मान्य होतें, हें त्यांच्या देणगीवरूनच सिद्ध होतें. पण एक वेळ ठाकरसीसारखा गुजराथी गृहस्थ महिलाविद्यापीठाच्या सेनेट सभेवर विश्वास टाकील, पण मुंबई युनिव्हर्सिटीच्या व सरकारी मान्यतेच्या मोहास बळी पडणारे आमचे कित्येक महाराष्ट्रीयच या राष्ट्रीय स्त्रीशिक्षणाला नाराज होतात हें दुर्भाग्य होय. लोकमताच्या गोष्टी केळकरांनीं कशाला बोलाव्या, अशीहि एक खोंच ज्ञानप्रकाशकारांनीं मारली आहे. पण त्यांनीं हें ध्यानांत ठेवावें कीं, लोकमताशीं एकदोन बाबतींत केळकरांना आज झगडावें लागत असलें तरी ते पायावर खडे उभे आहेत, व एकदोन बाबतींत प्रतिकूल असलेलें लोकमत फिरून खेंचून आपल्याकडे आणूं अशी त्यांना उमेद आहे. बिचारे ज्ञानप्रकाशकार व तत्पक्षीय मवाळ यांची व लोकमताची फारकत कधींच होऊन त्यांना हत्तींच्या मार्गानें डोकें वर काढण्याचा मुळींच संभव नाहीं !

—केसरी, ता. ४ मे १९२३.

## गीताराव

त्रिगुणाचे रंग तीन म्हणून निळ्या, तांबड्या व काळ्या रंगांशिवाय दुसऱ्या कोणत्याहि रंगाचा कपडा गीताराव कधींहि वापरीत नसे. त्याच्या थोरल्या मुलाचें नांव भगवान् व धाकट्याचें केशव असें होतें. दोघांच्यामध्यें एक मुलगी होती. तिचें नांव गीता होतें, हें सांगावयास नकोच. मुलांना हांका मारणें झाल्यास 'भगवद्गीते' अशा जोडशब्दानें तो हांका मारी. या एका शब्दांत दोन नांवें आल्यामुळें एकाऐवजीं दोन मुलें हांकेसरशीं त्याजपुढें येत ! धाकटा मुलगा केशव हा आत्य असे. परंतु गूळ फार खाणारा केशव, म्हणून 'गुडाकेश,' शेजाऱ्यांस ताप देणारा केशव म्हणून 'परंतप' अशा तऱ्हेचे गीतेंतील व्यक्तिवाचक शब्द आठवल्यामुळें तो सात्त्विकपणानें मुलांच्या खोड्यांचें चीजच करीत असे. मुलें फार ओरडूं लागलीं म्हणजे राग आलाच तर पहिल्या आध्यायांतील १२, १४ किंवा १८ या श्लोकांचें स्मरण होऊन 'शंखं दध्मौ प्रतापवान्' 'दिव्यौ शंखौ प्रदध्मतुः' किंवा 'शंखान् दध्मौ पृथक् पृथक्' असें म्हणतांच गीतेच्या स्मरणानें त्याचा राग शांत होत असे. एकदां त्यानें 'आपणास रेशमी मुकट्यापेक्षां तागी

मुकटाच अधिक आवडतो ' असें मला सांगितलें; व कारण विचारतांच तो म्हणाला की, ' तागी ' मुकटा उलटा करून नेसूं लागलों म्हणजे अक्षरांचें परिवर्तनहि मनांत आपोआप होऊन ' गीता ' या शब्दाची आठवण अनायासें होते.

योग हा शब्द तो वहुधा बसतां उठतां ' लाथाडीत ' असे. असें म्हणण्यांत किंचित् विपरीतत्व वाटतें, परंतु तात्पर्यार्थानें तशी गोष्ट होत असे यांत शंका नाहीं. एखाद्या गोष्टी बद्दल नुसतें ' वाईट वाटतें ' असें म्हणण्याऐवजीं मला ' विषादयोग ' प्राप्त झाला आहे असें तो म्हणे. ' करतों ' या साध्या क्रियापदाऐवजीं ' कर्मयोगाला आरंभ करतों, ' असेच शब्द यावयाचे. कुळानें आणून दिलेले रुपये मोजणें हा ' सांख्ययोग '. विडी ओढीत असतां आरामखुर्चीवर पाय ताणून डोळे मिटून पडणें हा ' ध्यानयोग '. एखाद्या सरकारी कागदाविषयीं माहिती विचारली असतां, ' ते कॉन्फिडेन्शल आहेत म्हणून सांगतां येत नाहीं, ' असें सांगण्याऐवजीं ' तो राजगुह्य योगापैकीं ' प्रकार आहे असें म्हणून पृच्छकाची तो संभावितपणें संभावना करी. इतर लोक स्वतःस ' राजनिष्ठ ' म्हणवून घेवोत; परंतु ' मी राजनिष्ठ आहें ' असें म्हणण्याऐवजीं ' मी ' भक्तियोगी ' आहें असें म्हटलें तरी चालावें; अशी त्यानें सरकारकडे परवानगी मागून ठेविली होती व ती त्यास मिळाली होती. एक दिवस हपीसचे साहेब फार रागावले तेव्हां ' You need not be angry Sir, ' असें म्हणण्याऐवजीं गीतारावास भान न राहून ' Why do you practise विश्वरूपदर्शनयोग, Sir ? ' असे शब्द गीतारावाच्या तोंडांतून निघून गेले. पण साहेबास त्या शब्दांचा अर्थ न कळल्यामुळें लगेच तेवढ्या वेळांत त्यानें ' Beg your pardon ' असें म्हणून रीतीप्रमाणें नीट इंग्रजी बोलण्यास सुरुवात केली. ' श्मश्रू करण्यास बसतों ' असें म्हणण्याऐवजीं, तोच अर्थ ' संन्यास-योग ' हे शब्द घालून तो सुचवीत असे. याशिवाय गीतेतील इतर अनेक शब्दहि प्रसंगोपात्त त्याच्या तोंडून येत. पण यथान्याय बोलावयाचें म्हणजे ती सर्व क्रिया त्याचे हातून न कळत आपोआप होत असे. इतकें त्याचें मनच गीतेंत खरोखर गढून गेलें होतें. ' यस्य निश्वसितं वेदाः ' हें जसें ईश्वराचें यथार्थ वर्णन होऊं शकतें, तसेंच ' अस्य निश्वसितं गीता ' हें वर्णनहि माझ्या मिश्रास बरोबर लागूं पडण्यासारखें आहे.........

—चित्तमयजगत्

## कुलकर्णी—लीलामृत

......सत्यशोधक समाजाच्या ' डिस्टिलरींत ' ( दारूघरांत ) बनलेली ही गोड व मसालेदार महाद्रेपाची दारू श्री शाहूमहाराजांच्या विशेष कृपेनें अवघ्या तीन आण्यास एक बाटली या स्वस्त दरानें विकत मिळते; व इतकेहि पैसे कोणाजवळ नसल्यास छत्रपतींच्या महनीय आश्रयाच्या पाणपोईंत त्याला ती बहुधा फुकटहि मिळेल ! तरी बाटेल त्या मराठ्यानें विशेषतः पाटलानें ती पिण्यास कमी करूं नये. विकाऊ मालाची अशी ही फुकट जाहिरात आणि तीहि अग्रलेखांत आम्ही सहसा देत नसतों. पण वतनदार कुलकर्णीरूपी दैत्यकुळानें गांजलेल्या या महाराष्ट्रभूमीचें संरक्षण करण्याकरितां या अव-

साराच्या स्वागताची पूर्वतयारी प्रत्येकानें करणें अवश्य आहे ! आणि मुकुंदराव पाटला-पासून छत्रपति शाहूमहाराजांपर्यंत या अवताराचा पूर्वरंग सिद्ध करण्याकरितां लहान थोर लोकांनीं कंबरा कसल्या, त्या अर्थी 'फूल नाहीं फुलाची पाकळी' या पवित्र कार्यास मदत करणें हें आमचेंहि पवित्र कर्तव्य आहे. ग्रंथप्रस्तावनेंत ग्रंथहेतु रा॰ सा॰ जाधव यांनीं इतक्या खुलासेवार रीतीनें वर्णन केला आहे कीं, तीं वाचणारास निराळें असें कांहींच सांगावें लागत नाहीं. कुलकर्णी हा सर्व गुन्ह्यांचा गड्डा आहे, तो ग्रामसंस्थेच्या हृदयांत सलणारा मुख्य कांटा आहे, तो काढून टाकल्याशिवाय ग्रामसंस्थेची सुधारणा होणार नाहीं, असें या ग्रंथाचें मुख्य तात्पर्य आहे, हें रा॰ सा॰ जाधव यांनीं प्रस्तावनेंत अगदीं मोकळ्या मनानें कबूल केलें आहे. पण प्रस्तावनेंत नसलेली एकच गोष्ट सांगणें जरूर आहे. ती ही कीं, हल्लीं वतनदार कुलकर्णी लोकांचीं वतनें नष्ट करण्याची कारवाई सुरू आहे, व त्याच वेळीं 'कुलकर्णी–लीलामृत' ग्रंथ प्रसिद्ध होत आहे, हा योगायोग विशेष लक्षांत ठेवण्यासारखा होय. महाराष्ट्रांतील वतनदारीच्या वृक्षाची कुलकर्णपणाची डहाळी किडून जाऊन आपल्या आपणच मोडून पडावयास तयार झाली असेल हें खरें; तरी पण करवीरकर छत्रपतींच्या भरींव मदतीनें खूब जड झालेल्या 'सत्यशोधक' समाजाचा कावळा त्या डहाळीवर बसला होता, इतकें तरी इतिहासांत नमूद होऊन राहील -च राहील. ... ... ... श्रीधर कर्त्यांच्या काव्य–ग्रंथाचें विकृतानुकरण (Parody) या नात्यानें हा ग्रंथ चांगलाच साधला आहे....... पण दुर्दैवानें अशा ग्रंथाकडे केवळ वाङ्मयाच्या निर्विकार दृष्टीनें पाहूनच स्तब्ध बसतां येत नाहीं. त्याचा हेतु व त्याचा परिणाम यांजकडेहि लौकिक दृष्टीनें पाहिलें पाहिजे. एखादा विंचू नांगीचा आंकडा पाठीवर वळवून तरतर धावत आहे हा देखावा चित्रकलेच्या दृष्टीनें चांगला दिसेल, पण तो घरांत निघाला असतां, कोणताहि मार्मिक चितारी हातांत पादत्राण घेतल्याशिवाय गप्प बसणार नाही. तीच गोष्ट सदर ग्रंथाची......कारण प्रेम जसें मनुष्याच्या तोंडून काव्य वदवितें तसेंच द्वेष हाहि एकादे वेळीं वदवूं शकेल; म्हणून द्वेषनिर्मित काव्याला कोणीहि प्रेमनिर्मित किंवा भक्तिनिर्मित काव्याची योग्यता देणार नाहीं. अशा तऱ्हेचीं गौण काव्यें इतर भाषेंतहि आढळतात, नाहीं असें नाहीं; पण त्यांनाहि कोणी बरें म्हणत नाहीं. पोपचें 'डनशियड' हें काव्य असेंच चटकदार आहे पण तें एक निवळ अपशब्दांचें विचित्र भांडार किंवा शब्दविषाचा मूर्तिमंत रांजण इतकीच त्यास मान्यता आहे. बटलरचें 'ह्युडिब्रास' हेंहि काव्य असेंच आहे....... ज्यांच्या तर्फेनें हें काव्य लिहिलें गेलें त्या पाटलांनाहि हें काव्य रुचेल, असें आम्हांस वाटत नाहीं; व अशा रीतीनें ग्रंथकारांचा हेतु बहुधा फसेल असेंच आम्हांस तरी वाटतें. कारण पाटलांचें सर्वस्वी समर्थन करून व त्यांचे गुण दाखवून जर त्याच्याच बरोबर कुलकर्ण्यांची निंदा ग्रंथकारास करितां आली असती तर त्याचा हेतु साधला असता. पण जी कुलकर्ण्यांची एका अर्थानें निंदा तीच पाटलाचीहि दुसऱ्या अर्थानें निंदा झाल्या-मुळें या द्वेषरसायनाची भट्टी फुकट गेली असेंच म्हणावें लागतें. कां कीं, कुलकर्णीलीला

गृतांत कुळकर्णी वर्गाच्या धूर्तपणाच्या वर्णनाइतकेंच पाटलांच्या मूर्खपणाचें वर्णन आहे ! वंचक–वंचनाविलास हा केवळ दूर राहून तटस्थ वृत्तीनें पाहणारास चित्ताकर्षक होतो खरा; पण वंचकविलासवर्णन हें एक दुधारी शस्त्र आहे, आणि ग्रंथकर्त्या पाटील-बुवांनीं हें शस्त्र हातीं घेऊन एका धारेनें कुळकर्णीवर्गाची मान कापण्याचा प्रयत्न करितांना दुसऱ्या धारेनें न कळत त्यांची स्वतःचीं बोटेंहि कापून रक्तबंबाळ झालीं आहेत. फार काय पण कित्येक कुळकर्ण्यांना हें लीलावर्णन वाचून कदाचित् अभिमानहि वाटेल.........एकाचें अकलेचें भांडें वाहून जात आहे असें दाखावितां आलें, तरी दुसऱ्याचें अकलेचें भांडें मूळचेंच कोरडें ठणठणीत असलें तर त्याची भरती कशानें होणार ? अकलेचा झाला तरी कोरड्या दुष्काळपेक्षांहि ओला दुष्काळच कोणीहि पत्करील. धूर्त म्हटल्यानें निंदा होत असली तरी मूर्ख म्हटल्यानें कांहीं कोणाची स्तुति होत नाही, ही गोष्ट सदर ग्रंथकार अगदींच विसरला ! परनिंदेला हात घालण्याच्या भरांत स्वतःच्या बुडाखालचें योग्य स्वाभिमानाचें अधिष्ठान ढांसळलें याची दखलगिरी आमच्या मुकुंदराव पाटलांना राहिली नाहींसें दिसतें. कुळकर्णी हे धूर्त दरवेशी असले तरी दोन पायावर चालतात; पण पाटलांवर नाकांत वेसण घालून घेऊन चार पायावर चालणारें अस्वल होण्याचा प्रसंग ग्रंथकार पाटीलबंधूंनीं आणिला, यांत त्यांनीं काय साधलें ? .........त्यांतील निंदा इतकी उघड व बेलगामी आहे कीं, जातीजातींत वैमनस्य उत्पन्न करणें हा परिणाम या पुस्तकापासून होण्यासारखा असल्यामुळें, ' आंग्ल-नृपेंकरून निर्विघ्नश्रवण घडो ' असा आशीर्वाद सदर ग्रंथाला ग्रंथकर्त्यांनें सरकारकडून मागितला आहे.......

—केसरी सप्टेंबर, आक्टोबर १९१३

## माधवराव बोडसांचें बोडण !

ह्लींच्या वादांत लो. टिळकांचें नांव होतो होईतों आणावयाचें नाहीं असें आम्हीं प्रथमपासून मनाशी ठरविलें व त्याप्रमाणें आजवर आम्ही वागतहि आलों आहों. कारण टिळकांच्या नुसत्या नामनिर्देशानें कोणत्याहि मताचें खंडन काय किंवा मंडन काय सयुक्तिकपणें होऊं शकत नाहीं. टिळकांच्या नांवाचा ' प्रकाशक ' मागें धरून एकाद्या मतावर कोणी मुद्दाम झगझगीत प्रकाश पाडला तर, त्याच्या योगानें पाहणाराचे डोळे दिपण्यापेक्षां त्या मतरूपी वस्तूचे उच्चनीच भाग व गुणदोष हेच अधिक स्पष्ट दिसूं लागावयाचे ! पण या वादांत टिळकांचें नांव आणावयाचें नाहीं असें आम्हीं योजिलें असतां प्रतियोगी सहकारितेचे प्रतिपक्षीच ती गोष्ट आपल्या फायद्याकरितां करीत आहेत; यामुळें टिळक व प्रतियोगी सहकारिता यांच्या संबंधाचा थोडाबहुत उल्लेख केव्हां केव्हां करणें आम्हांलाहि प्राप्त होत असतें.

आजचा प्रसंगहि तसलाच एक आहे. कारण 'चित्रमय जगत' च्या ताज्या अंकांत आमचे एक मुंबईकर प्रतिपक्षी, किंवा अकारण शत्रु किंवा निंदाप्रेमी गृहस्थ श्री-माधवराव बोडस यांनीं प्रस्तुत विषयावर लेख लिहिला आहे.

## बोडस यांना कां वगळलें ?

बोडस हे पूर्वी एक वेळ विद्यार्थिदशेंत केसरी-मराठ्याच्या उपसंपादक वर्गांत होते, व जुने संबंधी म्हणून टिळकांशी त्यांचें भाषणसंभाषण, कामकाज पुढेंहि कांहीं वर्षे चालत असे हें खरें. पण टिळक पहिल्या कैदेंतून मुक्त होऊन परत आले व ताईमहाराजांचा खटला सुरू झाला तेव्हांपासून अगदीं अखेरपर्यंत टिळकांच्या सार्वजनिक किंवा खासगी कामकाजांत बोडस हे सतत वगळले गेले होते ही गोष्ट पुण्यामुंबईंत जवळजवळ सर्वांनाच माहित आहे. चित्रमयजगतांतील लेखांत स्वतः बोडसच लिहितात कीं " जगन्नाथ महाराजांचा खटला, चिरोल केस, सुरतेची कॉंग्रेस, लखनौची कॉंग्रेस, विलायतचें डेप्युटेशन या प्रत्येक प्रसंगीं (टिळकांच्या) अनुयायांचे मताविरुद्ध या लेखकानें (बोडसांनीं) मत दिल्यामुळें तटस्थ राहणें इष्ट वाटलें व त्यामुळें अनेक अपवाद......सोसावे लागले." सन १९०१ पासून सन १९२० पर्यंत टिळकांच्या सार्वजनिक व खासगी आयुष्यांतील मुख्य गोष्टींची किंवा प्रकरणांची जंत्रीच एक प्रकारें स्वतः बोडसांच्या शब्दांत वर दिली गेली आहे. ती लक्षांत घेतां टिळक पहिल्या कैदेंतून सुटून आल्यापासून अखेरपर्यंत बोडसांवर कोणतेंहि कार्य सोंपवीत नव्हते, किंवा त्यांना आपल्या विश्वासांतील कार्यकर्ते मानीत नव्हते, हें आपोआपच सिद्ध होत आहे. टिळकांनीं जें जें करावयाचें पुढें काढावें त्यांत बोडसांनीं आपली म्हणून आव्यतेनें कांहीं शकल अकल लढविण्याचा किंवा उपदेशिण्याचा क्रम टिळकांनीं मुळींच चालू दिला नसेल हें टिळकांचा स्वभाव माहीत असणारा कोणीहि सांगेल.......

## भाग्यहीन करंटा कोण ?

टिळकांच्या परिवारांतील ज्या लोकांविषयीं बोडस इतक्या तुच्छतेनें लिहितात त्यांना टिळकांनीं जवळ करावें, सतत पंचवीस तीस वर्षे जवळ ठेवावें, आणि पूर्वी संबंध आला असतांहि टिळकांपासून बोडस हे फुटून निघावेत व त्यांना दुरावावे याचा खरा अर्थ काय हें वाचकांस सांगण्याचें कारणच नाहीं. बोडस लिहितात कीं टिळक हे हिमालयासारखे असून या हिमालयावर " चरणाऱ्या बकऱ्या-मेंढ्यांना त्या पर्वताचे पोटांत काय होतें तें थोडेंच कळणार ! त्यांनीं वरचा चारा खावा; अंतर्गत धन शोधून काढण्यास समानधर्मा आणि तादात्म्य पावणारा मनुष्य लागतो. टिळक मंडालेहून परत आल्यानंतर त्यांच्या परिवारांत असा एकहि मनुष्य नव्हता !" पण बोडसांना हें कळत नाहीं कीं, पर्वतावर चरणाऱ्या बकऱ्या-मेंढ्या चारतां चरतां का होईना पण पर्वताच्या गुहेंत केव्हां केव्हां प्रवेश करून त्याचें अंतरंग पाहूं तरी शकत्या असतील. पण ज्या कलहप्रिय अशा कुत्सित घमंडानंदन पशूचें दर्शन झाल्याबरोबर तटस्थपणाचें, मौनव्रताचें किंवा सावधगिरीचें बर्फ पडून गुहांचीं तोंडें बंदच व्हावयाचीं, त्याला गुहांतून दुरून डोकावण्यास मिळणें देखील अशक्य. बोडसांनीं देखील आपल्याकडून टिळकांच्या

"अंतर्गत धना"चा शोध कांहीं थोडयाथोडक्या केला नाहीं. येवढेंच काय. पण त्यांच्या मृत्यूनंतरहि इतरांना हातीं धरून तो शोध त्यांनीं परिश्रमपूर्वक चालू ठेवला होता. पण तें " अंतर्गत धन " लाभणें त्यांच्या नशिबांतच नव्हतें. त्याला कोणी काय करावें ! आणि तें अंतर्गत धन लाभलें नाहीं म्हणूनच तर बोडसांचा हा जळफळाट !... ...

## ईश्वर इतका कां वेडा असेल ?

बोडसांचा शोक पहावा तर असा कीं कदाचित् केळकर खाडिलकर गोखले प्रभृति आपल्या सगळ्या संपादक वर्गाचा आणि महाराष्ट्र, कर्नाटक, वऱ्हाड-नागपूर वगैरे प्रांतांतील सर्व अनुयायी वर्गाचा व सहकारी मित्रांचा, त्यांच्या नेमस्त वृत्तीबद्दल तिटकारा येऊन टिळक त्या सर्वांना एकदम 'डिसमिस' किंवा बडतर्फ करणार होते ! व हा गैरसोयीचा सर्व गोतावळा झाडून टाकून आपल्या एकट्या आवडत्या बोडसांना तेवढें घेऊन दोन माणसांची प्रचंड पार्टी (कित्येक वेळां महात्मा गांधी आपणास आपल्या विधायक कार्याला पुरेशी म्हणतात त्याप्रमाणें) स्थापून 'नवी विटी नवें राज्य' याप्रमाणें हिंदुस्थानाचें राजकारण एकाद्या अकल्पित अद्भुत रीतीनें सुरू करणार होते ! पण बोडसांच्याच शब्दानें बोलावयाचें तर " ती वेळ यावी अशी परमेश्वराची इच्छा नव्हती !" खरेंच आहे. इच्छा असेल कशी ? ईश्वर कसाहि असला तरी इतका का वेडा असेल ? ज्या बोडसांना दुरून पाहतांच माझें चालणारें सार्वजनिक कार्य हटकून बिघडेल असें वाटून लोकांनीं तोंड फिरवावें, ज्यानें हातांत लेखणी घेतली कीं दादाभाईसारख्या निरपवाद माणसावरहि निंदेचे शितोडे उडावेत, ज्याच्या स्वयंमन्यतेचा दर्प व मनाच्या कुजकेपणाची घाण येतांच नाकाला पदर लावून विनयशील माणसानें चार हात दूर जावें, एकादें कार्य मला हटकून बिघडवावयाचें असेल तेथें योजना करण्यासारखा सजजवळ एक मनुष्य ठेवणींतला आहे असें ज्याच्या विषयीं टिळकांनीं विनोदानें म्हणावें, एकाद्या संस्थेंत प्रवेश झाल्याबरोबर ज्याच्या मुत्सद्देगिरीचा परिणाम तेथें हटकून भांडणें उपस्थित होण्यांत व्हावा, ज्यानें विधायक किंवा विध्वंसक असें एकहि कार्य स्वतःचें म्हणून किंवा स्वतःच्या सामर्थ्यावर तीस वर्षांत केलें नाहीं, ज्याला आपल्या वकिलीच्या साध्या धंद्यांतहि भरपूर यश मिळवितां आलें नाहीं, टिळकांना कज्जेदलाल म्हणतां म्हणतां स्वतः ज्याच्या कोर्टांतील वादी-प्रतिवादी नात्याच्या फेऱ्या क्षुद्र कामांतहि चुकल्या नाहींत, ज्याला लोकमतानुनयकारकच असें काय पण स्वार्थहि समाधानतुल्य साधलें नाहीं, आणि वडिलार्जित तशीच स्वसंपादित विद्वत्ता पदरीं चांगली असतां ज्याच्या हातून नांव घेण्याजोगी फुकाची वाङ्मयसेवा देखील झाली नाहीं अशा या सार्वजनिक दोषांचें माहेरघर बनलेल्या दृष्टी व लोकविलक्षण मताच्या व्यक्तीला हातीं धरून आपलें सुकर काम टिळक मुद्दाम होऊन दुष्कर करतील इतके टिळक बेअकली नव्हते ! व ईश्वरहि असली अघटित घटना घडून आणण्याइतका मूर्ख नव्हता !... ...

## खुशाल मनगटें चावा

टिळकांच्या वीस वर्षांच्या सार्वजनिक चारित्र्यासंबंधानें कोणाकोणाचा प्रामाणिक मतभेद असूं शकेल व आहेहि. परंतु टिळकांना अयुक्तिक रीतीनें मवाळ ठरवून एका विषबिंदुमात्रानें बोडसांनीं टिळकांची जी असमंजसपणानें या व इतर लेखांत बेअब्रू केली आहे, ती त्यांनीं इतर रीतीनें टिळकांच्या स्तुतीचे हौद भरल्यानेंहि भरून येणारी नाहीं. टिळकांचें राजकारण, त्यांचीं वर्तमानपत्रें व संस्था, यांची व्यवस्था टिळकांनीं आपल्या ह्यातींत हातानें हवी तशी व जाणून बुजून केली होती, त्यांत कोणताहि घातपात झालेला नाहीं, किंवा धोरणाचा फरक झालेला नाहीं. अर्थात् टिळकांऐवजीं स्वतः पश्चात्ताप करून ऊर बडवीत बसण्याचें बोडसांना खरोखर कांहीं एक कारण नाहीं. बोडस ज्यांची निंदा करतात तेच जिंकून गेले. आतां बोडसांनीं जन्मभर खुशाल मनगटें चावीत 'विविधज्ञानविस्तारां'त आणि 'चित्रमयजगतां'त कुत्सित लेख लिहित बसावें ! ...

## हा बेशरमपणा नव्हे काय ?

बोडस यांनीं टिळकांना 'सुशिक्षित मेंढरूं' म्हटलें आहे. कारण काय तर त्यांनीं प्रतियोगी सहकारितेचा मार्ग उपदेशिला. पण टिळक जर सुशिक्षित मेंढरूं ठरले तर, स्वतः बोडस यांचा क्रमप्राप्त दर्जा प्राणिश्रेणीमध्यें किती खालीं असेल याची कल्पनाच करावयास पाहिजे. चावणें, दुगाण्या झाडणें, भुंकणें अशा त्यांच्या अनेकविध गुणांवरून बोडसांच्या स्थानाचा कोठें तरी सुगावा लागेल. राजकारणांत बोडस हे कर्दमभक्षी सरपटणाऱ्या प्राण्यांमध्यें सांपडतील. राष्ट्रीय पक्षाची कर्तबगारी स्वतंत्र व तपश्चर्या खडतर असावी लागते. पण बोडस यांनीं स्वतःला राष्ट्रीय म्हणविण्यासारखी कोणती कर्तबगारी दाखविली आहे किंवा तपश्चर्या केली आहे ? बोडस हे प्रस्तुत लेखांत महात्मा गांधींच्या सर्वांगीण असहकारितेची तळी उचलूं पाहतात, व ही गांधींची असहकारिता राष्ट्रीय पक्षाचे मूलतत्त्वांना अनुसरून असल्यानें लोकांना लोच पटली, असें म्हणतात. पण जी पटली ती गांधींची गांधींनींच परत घेतली त्याची वाट काय ? हठयोगी तपस्वी योगभ्रष्ट झाल्यास त्याला जें शासन द्यावें असें बोडस म्हणतात तें आधीं 'असहकारितेचा उपदेश करून तो परत घेतलेल्या गांधींना द्यावयाचें कीं मूळ कलकत्त्यास राष्ट्रीय सभेपासून ज्यांनीं तिला विरोध केला त्यांना द्यावयाचें ? पण विरोध करणारे व ज्यांना विरोध केला ते दोघे काँग्रेसमध्यें होते व राहिले, त्यांनीं शक्य तो चळवळ केली व बनेना तेव्हां भांडले तंडले. तें एक असो. पण या सर्व चळवळीच्या काळांत स्वतः बोडस हे कोठें दडून बसले होते ? किंवा प्रगट असल्यास त्यांनीं कोणत्या पक्षाचें कोणतें कार्य केलें ? किंवा ज्याला सार्वजनिक म्हणतां येईल असें तरी कार्य कोणतें केलें ? ज्याची त्याची कुचेष्टा व निंदा करणें यालाच जर सार्वजनिक कार्य म्हणावयाचें तर तें मात्र त्यांनीं भरपूर केलें.

## बोडसांचा राष्ट्रीय पक्ष कोणता ?

टिळकांचीं व त्यांचीं मतें किती जुळत होतीं हें त्यांचें त्यांनींच सांगितलें आहे. आणि गांधींच्या तर ते वाऱ्यालाहि उभे राहिले नाहींत. त्यांनीं वकिली सोडली नाहीं, खादी वापरली नाही, विधायक कार्यक्रमाचें काम केलें नाहीं, शुद्ध राजकीय चळवळ केली नाही, व कायदेभंग तर केला नाहींच नाहीं. पण ते कायदेभंग कसा करणार? कारण ते प्रस्तुत लेखांतच म्हणतात, " सरकाराविषयीं आमची राजनिष्ठा कायदे पाळण्यापुरती आहे." उलट ज्यांना बोडस नांवें ठेवतात त्यांनीं स्वतः कायदेभंग केला आहे, तुरुंग पाहिला आहे, व ही मर्यादित राजनिष्ठाहि कर्तव्यांत गणली नाहीं. बरें, राष्ट्रीय पक्षाच्या मुळाला गांधींच्या असहकारितेचें मूळ हे बोडस नेऊन भिडवितात तर, ते ज्याला जुना राष्ट्रीय पक्ष मानतात त्या पक्षाच्या कोणत्याहि ( एकाद्या प्रांतांतील ) लोकांच्या जाहीर लेखांत अगर भाषणांत गांधींच्या बहिष्कारत्रयीचा अंधुक असा माग-मूस तरी त्यांनी काढून दाखवावा! जो राष्ट्रीय पक्ष बोडसांच्या आचरणावरून कळून येत नाहीं, जो टिळकांच्या लेखांवरून, भाषणांवरून किंवा चळवळींवरून सिद्ध होत नाहीं आणि ज्याच्या गणगोत्राशीं गांधींचा कार्यक्रम जुळत नाहीं असा तो राष्ट्रीय पक्ष तरी कोणता ? किंवा बोडस हेच त्या पक्षाचे आद्य संस्थापक व शेवटचे अनुयायी असले पाहिजेत. टिळकांनीं स्वतःच्या राष्ट्रीय पक्षाची व्याख्या व त्याच्या तत्त्वांची चर्चा १९०७-८ सालीं, म्हणजे बोडसांच्या मताप्रमाणें ऐनतेजस्वितेचा काळ त्यांत, किंवा टिळक विलायतेहून परत आल्यानंतर, म्हणजे बोडसांच्या मतें टिळक मवाळ बनल्या-नंतर, केली आहे ती दोनाहि प्रकारची पाहणारास प्रतियोगी सहकारिता ही प्रत्यक्ष कार्याच्या दृष्टीनें त्याहून फारशी वेगळी नाहीं असेंच आढळून येईल......

## एक निराधार विधान

प्रतियोगी सहकारिता या शब्दाचा इतिहास देतांना बोडस एके ठिकाणीं म्हणतात की, 'बॅ. बॅप्टिस्टा यांनीं सुचविलेल्या शब्दाची टिळकांना गंमत वाटली व मौज म्हणून त्यांनीं तो शब्द स्वीकारला.' पण तेच स्वतः पुढें १०-२० ओळींनंतर म्हणतात कीं " असले संदिग्ध व निरर्थक शब्द टिळक उगीच वापरतील हें संभवत नाहीं." या त्यांच्या परस्परविरोधामुळें आमचे उत्तर देण्याचे श्रम आयतेच वांचले. टिळकांच्या रेस्पॉन्सिव्ह कोऑपरेशनमध्यें दिवाणगिऱ्या वगैरे नाहींत असें एक विधान बोडस यांनी केलें आहे. तसेंच "-मिळेल तें खिशांत टाकावें व आणखी मिळविण्याकरितां धडपडावें असें एक महत्तत्त्व अलीकडेच टिळकांचे गळ्यांत बांधण्यांत येत आहे" अशीहि कुचेष्टा बोडसांनी केली आहे....जाहिरनाम्यांतील मजकूर टिळकांना पसंत नव्हता असें बोडस लिहितात त्याला आधार काय ? बरें, त्यांच्यावर हा मजकूर कोणीं लादला ? तर त्याचें उत्तर बोडस असें देतात की " टिळकांचे भोंवतीं होमरूल लीगच्या नांवानें गोळा झालेल्या 'अर्धनेमस्त-अर्धप्रग नेमस्तांचा तो निष्कर्ष अथवा लघुतम होता म्हटलें

तरी चालेल." पण स्वतः बोडस हे आपल्या अंगच्या गुणामुळें उत्तमांतले लघु किंवा लघूंतले उत्तम कांहींहि होऊं शकले नाहींत. त्यांचा जन्म दिवाभीताप्रमाणें अंधारांत बसून अभद्र कुजबुजीनें दुसऱ्यांना अपशकुन करण्यांतच गेला !......

## तुंबड्या लावण्याचा उद्योग

कानपूरच्या राष्ट्रीय सभेच्या ठरावाचा अर्थ म्हणून बोडस असें भाष्य करतात कीं, "राष्ट्रीय पक्षाच्या कसोटीनें कानपूरच्या ठरावांतील सिद्धान्तच कायम होतो. कारण राष्ट्रीय पक्षाचें मुख्य ब्रीद म्हणजे तटस्थ वृत्ति" ! बोडसांनीं हा गहन सिद्धान्त कोठून काढला देव जाणे ! या तटस्थ वृत्तींचीं उदाहरणें प्रत्यक्ष राजकारणाला लावून त्यांनीं तें विशद केलें असतें तर त्यांचे वाचकांवर फार उपकार झाले असते. आम्हांला ते कांहींहि म्हणोत, पण पंडित नेहरू यांचें धोरण तरी त्यांना तंतोतंत मान्य आहे कीं काय हें बोडसांनीं सांगितलें तरी ते उपकारच करतील. पण संदिग्धपणा हेंच ज्यांच्या शहाणपणाचें भांडवल, व सरसकट सर्वांवर लाथा झाडणें हीच ज्यांची मुत्सद्देगिरी, त्यांनीं जर कधीं स्पष्ट विधान केलें तर त्यांचा धंदा बुडेल त्याची वाट काय ? गांधींनीं टिळकानंतर राष्ट्रीय पक्षाची अब्रू बचावली असें एक विधान बोडसांनीं एके ठिकाणीं केलें आहे. पण असहकारितावाद हा पोरकट म्हणून त्यांनीं लेखाच्या शेवटीं म्हटलेंच आहे. शिवाय गांधींचें झालें तरी अमुक वेळचें आचरण तंतोतंत बरोबर असेंहि बोडसांनीं कोठें लिहिल्या-म्हटल्याचें आम्हांस आठवत नाहीं. —केसरी १९२६ फेब्रुवारी ९

## पिसाळलेल्या कुत्र्याचा दंश

" वि. वि. आजपासून चाळीस दिवसांनीं तुमचा मृत्यु आहे असें समजून तुम्ही आतां काय करावें याच्या तरतुदीस लागावें अशी तुम्हांस माझी सूचना आहे. तुम्हांस मी हें स्नेहबुद्धीनें लिहीत आहें. मला पिसाळलेलें कुत्रें चावलें तेव्हां आपणास कदाचित् लवकर इहलोक सोडावा लागेल असें वाटलें. त्याचा मनावर फार इष्ट परिणाम झाला. कोणतेंहि शत्रुत्व वाढविण्यांत अर्थ नाहीं असें वाटूं लागलें. प्रेम व द्वेष या दोनहि गोष्टींचा फोलपणा अशा वेळीं वाटूं लागतो व निराळी दृष्टि उत्पन्न होते. सांगितलेला विचार लक्षांत घ्यावा हे विज्ञापना.

आपला

श्री. व्यं. केतकर

ता. क. " आपल्या तडजोडीच्या प्रयत्नांस यश येवो आणि आपली अप्रियता न वाढो. आम्हीं तुमच्यावर खुषीनें हल्ला केला नाहीं. आपली तडजोड झाली म्हणजे राजकारण अधिक स्वस्थ चित्तानें करतां येईल व आम्हांहि आपणांस मदत करूं "

या जगांत आचरट रिकामटेकडे लोक 'अव्यापारेषु व्यापार' कसा करीत असतात याचें हें एक उत्तम उदाहरण नाहीं काय ? दुसऱ्याला सदुपदेश करणारानें स्वतःची उप-

देशक होण्याची पात्रता कांहीं थोडी तरी पाहिली पाहिजे. केळकर यांचें राजकारण डॉ. केतकर यांच्या मदतीच्या अभावामुळें कधींच खोळंबलेलें नव्हतें. ट्रस्ट संबंधाच्या वादाची आग भडकविण्याचें श्रेय केळकर यांच्याकडे किती आहे याची अंतःस्थ माहिती ज्याला असेल त्याला डॉक्टर साहेबांनीं केळकरांना केलेल्या या पत्रांतील उपदेशाच्या मायावीपणाची खरोखर किळसच वाटेल. डॉक्टर साहेबांना पिसाळलेलें कुत्रें कधीं चावलें याची तारीख त्यांनी लिहिली नाहीं; ती ठरविणें अवश्य आहे. कारण त्यांना श्वानदंशाची बाधा होऊन पुष्कळ पावसाळे लोटले असले पाहिजेत असाच त्यांचे अनेक लेख व ग्रंथ पाहून पुष्कळ वाचकांचा समज झालेला आहे. डॉक्टरसाहेबांना 'स्मशानवैराग्य' ऐवजीं 'श्वानवैराग्य' उत्पन्न झाल्याचा उल्लेख या पत्रांत आहे व त्यांना प्रेम व द्वेष दोनहि व्यर्थ वाटूं लागल्याचें ते लिहितात. पैकीं प्रेमाचें वैयर्थ्य त्यांना वाटूं लागलें असल्यास तें कधींपासून व कशामुळें याची माहिती आम्हांस नाहीं. पण द्वेषाचें वैयर्थ्य ते तोंडानें बोलून दाखवीत असले तरी तो द्वेष अजूनहि त्यांच्या मनांत जळत आहे हें त्यांच्या पत्रावरूनच दिसून येण्यासारखें आहे. केळकरांच्या भावी मृत्यूसंबंधीं डॉक्टर केतकर यांनीं आपल्या पत्रांत नक्की भविष्य केलें आहे; त्या बाबतींत आम्हांस इतकेंच म्हणावयाचें कीं, डॉक्टर साहेबांच्या घरांत भुताटकीची विद्या निर्माण झाल्याचें टाइम्स वगैरे पत्रांतून पूर्वीं जगजाहीर झालें आहे. पण या विद्येबरोबरच जारण-मारण-उच्चाटन आणि भविष्य वर्तविण्यासारखी योग-विद्या त्यांच्या घरीं प्रगट झाल्याचें कोणास माहीत नाहीं. केळकर यांच्या मुदतबंद मृत्यूच्या भविष्याबरोबरच त्या मृत्यूचा प्रकार व प्रसंग यांचें भविष्यहि त्यांनीं आपल्या पत्रांत लिहिलें असतें तर ते केसरी ट्रस्टच्या वादांत आणि समेटाच्या प्रयत्नांत किती सत्य व कोणत्या बाजूनें लक्ष घालतात हेंहि लोकांना समजलें असतें !

—केसरी १९२८ आक्टोबर ९

## 'काव्यालोचन'–( श्री. द. के. केळकर )–ग्रंथपरीक्षण

काव्यतत्त्वाचें आलोचन करतांना प्रथमच कविप्रतिभेचा विचार करावा लागतो. कवि व त्याची प्रतिमा हें नेहमींच एक मोठें प्रश्न होऊन बसलेलें असतें. प्रतिभा ही एक अस्सल दिव्य ईश्वरी देणगी असून, तिचें तेजोवलयावगुंठित पार्सल थेट ईश्वराच्या हातून मोहोरबंद होऊन सुटतें, तें अदृश्य रूपानें कवीच्या हृदयांत खोललें जातें, अशी कित्येक भाविकांची समजूत असते. आधुनिक काळांत स्वच्छतेचें प्रस्थ माजविणारे कांहीं कारखानदार आपल्या कारखानदारीच्या पदार्थाचें वर्णन हस्तस्पर्शरहित (Untouched by hand) असें करीत असतात. म्हणजे यंत्रसाहाय्यानें कारखान्यांत माल तयार होऊन तो परस्पर बाटलींत भरला जावयाचा, गिऱ्हाइकानें चिमट्यानेंच बूच काढून टाकावयाचें व पदार्थ तोंडांत वरचेवर ओतून प्यावयाचा ! त्याप्रमाणें 'मानवी हस्तस्पर्श' न होतां किंवा पार्थिव उपाधीचा संपर्क न लागतां प्रतिभा ही, विजेच्या गोळ्याप्रमाणें, स्वर्गांतून निघते ती थेट कवीच्या हृदयांत शिरते ! ! या कल्पनेमुळें कवि म्हटला कीं त्याच्याकडे भाविक माणसें मोठ्या कुतूहल दृष्टीनें पाहूं लागतात. मनुष्यमात्राचा हा ईश्वरानें दिलेला बगार

तसेंच प्रतिभेला कोणी कोणी वेडेपणाची लहर असें म्हणतात, आणि केवळ आपण अलौकिक आहों असें दाखविण्याकरितां कित्येक छांदिष्ट कविहि आपल्या पोषाख-पेहेरावांत, वागणुकींत व बोलण्या-चालण्यांत लहरीपणाची, विक्षिप्तपणाची किंबहुना वेडसरपणाची झांक जाणूनबुजून आणतात ! यांत ते स्वतःचा गौरव करीत नसून स्वतःला व्यर्थ दूषण मात्र आणतात.

" काव्यदेवीचें वाहन अनादिकालापासून कोणतें मानण्यांत येतें यावरून या प्रश्नाचा निकाल होतो. तें वाहन गरुड नव्हे, मूषक नव्हे, वृषभ नव्हे तर हंस हें तिचें वाहन आहे. व हंसाचें हंसत्व नीरक्षीरविवेकांतच असतें. " अर्थात् नीर म्हणजे असत्य किंवा टाकाऊ तत्त्वें व क्षीर म्हणजे सत् किंवा ग्राह्य तत्त्वें. कविप्रतिभा ही मुळांत थोडीशी असली तरी चांगल्या कवीच्या ठिकाणीं ती परिश्रमानें अधिक तेजस्वी झालेली आढळेल व या परिश्रमांना तपस्या हें उदात्त नांव दिलें असतां सहजच मोठें कार्य होतें. या तपस्येमध्ये बुद्धीचा कसून उपयोग, तसेंच विद्वत्ता, व्युत्पन्नता, बहुश्रुतता, बाह्यसृष्टि-निरीक्षण व तिचें मनन, साहित्यशास्त्रपरिचय इत्यादि अनेक गोष्टी येतात; व या अनेक गोष्टी मिळून होणारी तपस्या बहुधा प्रत्येक महाकवीनें केलेली आहे असेंच आढळेल.

## कवीचा अभ्यास

अगदीं कोन्या करकरीत मनाचा कवि बहुधा अशक्य होय. सर्वांत कमी विद्वान् असा कवि तुकाराम घेतला तरी त्यानेंहि " कांहीं पाठ केलीं संतांचीं उत्तरें, विश्वासें आदरें धरोनिया " असें स्वतःविषयीं सांगितलें आहे. त्याचें मर्म उघड आहे. ज्यानें जुन्या कवींचा किंवा काव्यमय वाङ्मयाचा अभ्यास केला नाहीं, किंवा ज्यानें सृष्टी-निरीक्षण केलें नाहीं, असा कवि महाकवि होऊं शकतच नाहीं. आणि जे कवि केवळ स्फूर्तीच्या-प्रतिभेच्या जोरावरच कवि झाले असें वाटतें, त्यांच्या काव्याची छाननी केली असतां त्यांच्या प्रतिमारूपी आरशांत स्वतः त्यांच्या आत्म्याबरोबर इतर किती तरी आत्मे किंवा सृष्टपदार्थ यांचीं प्रतिबिंबें पडलेलीं दिसतील ! पाठक किंवा बहुश्रुत कवि हा कदाचित् लोकांच्या उष्टया कल्पना रंगविणारा असतो अशी शंका येणें साहजिक आहे पण " There is nothing new, under the Sun " किंवा " All knowledge is but remembrance " या इंग्रजी म्हणी लक्षांत घेतल्या असतां वरील शंकेचा परिहार होतो. प्लेटोच्या ज्ञानविस्ताराचें वर्णन करण्याकरितां असें म्हणण्याची रीत आहे की, प्लेटोनंतरच्या सगळ्या तत्त्वज्ञान्यांनीं त्याचेंच ज्ञानोच्छिष्ट भक्षण केलें आहे. आपल्या इकडे 'व्यासोच्छिष्टं जगत् सर्वम्' अशी त्याच अर्थाची म्हण आहे. व्यास कवि हे महाकवि होऊन गेले हें खरें; परंतु त्यांच्या मागून आलेल्या कवींनी जसें त्यांचें उच्छिष्ट भक्षिलें तसेंच स्वतः व्यासांनींहि कितीतरी पूर्वकालीन कवींचें उच्छिष्ट भक्षिलें असेल याची सहज कल्पना करतां येते. असो.

बहुश्रुतपणाप्रमाणें बुद्धीवादि उपयोग प्रतिभेला फार असतो. चांगला कवि कवि

बुद्धिवान् नम्रता ही गोष्टच असंभाव्य. किंबहुना अशीच आढळेल की ज्या कवींनी आपली प्रतिमा बुद्धीच्या सहाणेवर कसून घासली ते कवि आपल्या कल्पना निर्बुद्ध कवीं-पेक्षां अधिक चांगल्या रंगवूं शकले. पुण्याच्या किर्लोस्कर थिएटरांत रंगभूमीच्या दर्शनी मंडपावर एका आधुनिकानें रचलेला श्लोक लिहून ठेवलेला आहे; त्यांत 'प्रज्ञाविघृष्टप्रतिभा-मणिदीपप्रकाशितं ' असें म्हटलें आहे. तें यथार्थ असल्याचें कबूल करावें लागेल. तेज झळकविण्याचा प्रतिभा-रत्नाचा धर्म आहे, पण हें रत्न जितकें अधिक ठिकाणीं प्रज्ञेच्या निकषावर घासलेलें असेल तितके अधिक तेजःकिरण त्यांतून निघूं शकतील. सृष्टिज्ञाना-संबंधानें अशीच गोष्ट आहे. निदान अलंकार ही काव्याची बाजू लक्षांत घेतली असतां कवीचें सृष्टिज्ञान जितकें अधिक तितक्या अधिक उपमा-रूपकें त्याला सुचतात, ही गोष्ट भौतिक शास्त्रें उदयास येण्याच्या पूर्वीचे कवि व त्यानंतरचे कवि यांच्या काव्याची तुलना केली असतां सहज सिद्ध करतां येते. —केसरी १९१३ आगष्ट २२

## काव्यानंदाचे प्रकार

काव्यानंदाची मीमांसा करतांना ग्रंथकर्त्यानें लौकिक व अलौकिक आनंद असे प्रथम दोन भेद केले आहेत. हे भेददर्शक शब्द अचूक असावे तसे नाहीत. पण पुढें त्यांचे जे मुख्य दोन प्रकार वर्णिले आहेत ते बरोबर आहेत. एक इंद्रियजन्य अशी अनुकूल संवेदना व दुसरा आकांक्षा-परिपूर्ति. नृत्यगीतादि ललितकलांचा आनंद हा ग्रंथकारानें पहिल्या प्रकारांत घातला आहे. पण या बाबतींत आमचा त्यांच्याशीं थोडा मतभेद आहे. कान नसतील तर कोणालाहि गाणें ऐकूं येणार नाहीं हें खरें. पण कान असणाऱ्या अनेक मनुष्यांना एकच गाणें ऐकून अनेक प्रकारचा आनंद होऊं शकतो, व त्या आनंदांत मानसिक किंबहुना आध्यात्मिक आनंदाचाहि अंश असूं शकतो. कालिदासानें शाकुंतलांत मधुर शब्द ऐकल्यानें आनंद होतो त्याचें कारण "तच्चेतसा स्मरति नूनमबोधपूर्वम् भावस्थिराणि जननांतरसौहृदानि " असें दिलें आहे. अन्य जन्मींचें स्मरण होणें हा मधुर शब्द ऐकल्याचा परिणाम खरोखर होत असेल तर तो केवळ इंद्रियजन्य परिणाम म्हणतां येत नाहीं. कर्णेंद्रियें हें एक साधन असेल, पण समाधान झालें तें आत्म्याचें झालें. जें मधुर शब्दाविषयीं तेंच कदाचित् सुंदर चित्राच्या दर्शना-विषयींहि म्हणतां येईल.

अशा रीतीनें ललितकलांचा आनंद हा आध्यात्मिकहि म्हणावा लागेल. अपेक्षा-पूर्तीनें आनंद होतो तो तितका उच्च प्रतीचा आनंद नव्हे. तथापि तो इंद्रियजन्य नव्हे हें मात्र खरें आहे. काव्यानंद हा ग्रंथकाराच्या मताप्रमाणें केवळ कल्पनेचा आनंद होय. त्यांत इंद्रियांचें समाधान नाहीं किंवा स्वार्थी अपेक्षेची पूर्ति नाहीं. तो आनंद केवळ आध्यात्मिक असून त्याला 'ब्रह्मास्वादसहोदर ' असें साहित्याचार्यांनीं म्हटलें आहे, तसलेंच कांहींसें वर्णन करून स्वस्थ बसणें भाग आहे. फरक इतकाच की, ब्रह्मानंद हा निर्विकल्प समाधीच्या स्वरूपाचा असतो व काव्यानंद हा सविकल्प समाधि उत्पन्न

करतो. ब्रह्मानंदांत तल्लीनता असते व काव्यानंदांतहि तल्लीनता असते. पण खरा ब्रह्मानंद अद्वैत-सिद्धीपासूनच होतो. यामुळें एकाहून अधिक ज्ञानसंवेदना त्या समाधींत असत नाहींत. पण काव्यानंदांत द्वैताची जाणीव खपूं शकते, इतकेंच नव्हे तर ब्रह्मानंदासमान असला तरी त्यापासून वस्तुतः वेगळ्या असणाऱ्या काव्यानंदांत ही द्वैताची जाणीव हेंच आनंदाचें खरें अधिष्ठान आहे.

## काव्यानंदाचीं कारणें

काव्यवाचनानें योगसमाधि लावल्याप्रमाणें एकदम ब्रह्मानंदच प्राप्त झाला तर फारच चांगलें. पण काव्यानंद हा दुय्यम प्रतीचा असल्यामुळें त्यांत द्वैतभाव व सविकल्प समाधि हींच आनंदाचीं कारणें होऊं शकतात. काव्य वाचून ब्रह्मानंदीं टाळी लागणारा मनुष्य क्वचित. परंतु काव्यामध्यें इतकी मात्र शक्ति आहे कीं, आत्म्यानें स्वतःची भूमिका न सोडतां क्षणमात्र त्याला दुसऱ्याची भूमिका घेतल्याचा आभास लावूं शकतो व हा आभासहि स्वप्नसृष्टींतील नव्हे, तर अगदीं जागेपणीं. ' डोळा घालितां अंगुळी, एकाचीं तीं दोन झालीं ' या तुकारामाच्या दाखल्याप्रमाणें काव्याची अंगुलि मनश्चक्षूंत घालतांच, आपलेपणाची भूमिका शिल्लक राहूनहि कविकल्पनेनें उत्पन्न केलेल्या प्रसंगांत (तो प्रसंग आत्मसंबंधी आहे अशा भावनेनें) त्या दुसऱ्या भूमिकेवर आत्म्याला जाऊन उभें राहतां येतें, किंबहुना आवडतेंहि.

शंकराचार्यांनी वादामध्यें एके प्रसंगीं उत्तरें देण्याला मुदत मागून घेऊन परकायाप्रवेश केला, व त्या परकायेच्या आश्रयानें अन्य प्रकारचें ज्ञान मिळण्यासारखें होतें तें घेऊन फिरून स्वकायेंत प्रवेश केला. या उदाहरणांत दोन काया एकाच आत्म्याला एकाच वेळीं होत्या असें दिसतें; व त्या एका आत्म्याचा त्या दोन कायांशी इतका जिव्हाळ्याचा संबंध होता कीं, आचार्यांची पहिली काया शिष्यांना संरक्षण करून संभाळून ठेवावी लागली होती. याच दाखल्याप्रमाणें सहृदय काव्यवाचक काव्य वाचीत असतां एक प्रकारचा परकायाप्रवेशच करीत असतो.

## स्वायत्त व सविकल्पक समाधि

काव्याच्या उत्तमत्वांतले जितके घटक, तीं सर्व काव्यानंद उत्पन्न करून देण्याचीं साधनेंच होत. संस्कृत साहित्य-ग्रंथकारांनीं या संबंधानें केलेलें विवेचन आंग्ल पाश्चात्य साहित्यशास्त्रापेक्षां अधिक खोल व समर्पक आहे असें आम्हांला वाटतें व आमच्या साहित्याचार्यांनीं तादात्म्याची उपपत्ति काव्यानंदाचे बाबतींत जशी योजून लावून दाखविली आहे तशी पाश्चात्यांनीं लावलेली नाहीं. तादात्म्य उत्पन्न करण्याच्या शक्तीच्या दृष्टीनें जी उपपत्ति एका रसाला तीच नऊ किंवा अनेक रसांना लागू पडते. तादात्म्य हेंच, परंतु प्रस्तुत ग्रंथकाराच्या मतें तें तादात्म्य सविकल्प म्हणण्यापेक्षां स्वायत्त म्हणणें हें अधिक योग्य आहे. कदाचित् असेंहि म्हणतां येईल कीं, या तादात्म्यामध्यें स्वायत्तपणा व सविकल्पकता हे दोनहि घटक अवश्य असल्यामुळें, " स्वायत्त व सविकल्प

अशी समाधि हें काव्यानंदाचें कारण होय" असें म्हणून विरोधपरिहार करण्यासारखा आहे.

## काव्याचें ध्येय

यापुढें, काव्याचें ध्येय काय? हा विषय उपस्थित करून त्यांत नीतिवाद, आल्हादवाद, उपदेशवाद वगैरे जे अनेक वाद येतात त्यांचा विचार करून ग्रंथकर्त्यानें आपलें असें मत दिलें आहे कीं, आल्हाद व उपदेश ही दोनच काव्याचीं मुख्य ध्येयें ठरतात. आमच्या मतें या दोहोंत आल्हादवाद हाच अधिक खरा आहे. कारण आल्हाद उत्पन्न होण्याला सत्य, सौंदर्य, प्रमाणबद्धता, औचित्य इत्यादि बंधनें जर अवश्य आहेत, व तीं अवश्य आहेत असें आम्हीहि मानतों, तर उपदेश किंवा नीति या दोन दृष्टींतून उत्पन्न होणाऱ्या इतर अनेक गोष्टी चांगल्या काव्यांतून सहज निष्पन्न होणाऱ्या आहेत. सदभिरुचीचा आल्हाद काव्यांत निर्माण झाला तर उपदेश हा त्यांतून आपोआपच निष्पन्न होतो. तो उपदेश या नात्यानें वेगळा मुद्दाम स्पष्ट सांगावा लागत नाहीं. 'काव्यांत आल्हादक्षमता आणि तत्त्वप्रतिपादन हीं दोनहि असलीं तरी या दोहोंपैकीं, जें नष्ट झालें असतां काव्याचें काव्यत्व नष्ट होईल तेंच त्याचें अनन्य कारण व ध्येय मानलें पाहिजे आणि हें वैशिष्ट्य आल्हादक्षमता होय' हें जें ग्रंथकर्त्याचें मत तेंच आम्हांलाहि मान्य आहे.

## अश्लीलता

दोवटचा मुद्दा काव्याच्या जबाबदारीसंबंधानें. काव्य आनंददायक होण्याला बहुतांशीं निर्दोष असलें पाहिजे हें कोणीहि कबूल करील. ढोबळ दोष हे आल्हाद-विघातक असतात. आतां काव्याच्या जबाबदारीचा विचार करतांना अश्लीलता वगैरेंचा विचार काव्यालोचनकारांनीं केलेला आहे व ती टाळणें अवश्य आहे. वास्तविक अश्लीलता ही सहृदय मनुष्याच्या सुसंस्कृत मनाचा रसभंग करणारी असल्यामुळें, उद्वेग उत्पन्न करणारी असल्यामुळें, अश्लीलता काव्यदोषाच्या सदरांतच पडेल. तें विशिष्ट प्रकारचें अनौचित्य होय. असें असतां काव्यालोचनकारांनीं या विषयाची स्वतंत्र चर्चा करण्याचें कारण असें कीं, अलीकडे काव्यनाटकादिकांतून अश्लीलता ही इतकी उजळ माथ्यानें वावरूं लागली आहे कीं, तिचा वेळींच योग्य निषेध न झाल्यास तिला दोषाचें स्वरूपच नाहीं असें परप्रत्ययनेयबुद्धि लोक म्हणूं लागण्याचा संभव आहे. म्हणून वेळींच ही खबरदारी घ्यावी लागते या बाबतींत कित्येक जुने संस्कृत कविहि दोषास्पद ठरतात. नीतितत्त्वाचा उपदेश करणें हें काव्याचें ध्येय नसेल,—म्हणजे असण्याचें कारण नाहीं. पण कांहीं एका मर्यादेपलीकडे अश्लीलता काव्यांत न येऊं देणें हें मात्र कवीचें कर्तव्य ठरतें. जुन्या काळच्या फौजदारी कायद्यांतील शिक्षा जशा आजच्याहून अधिक कडक होत्या तशीच अश्लील कल्पना किंवा शब्दप्रयोग यांच्या संबंधाचीं बंधनें आजच्याहून जुन्या काळीं अधिक दिलीं होतीं. अश्लीलता व अनीति हीं सर्वस्वीं समानार्थक नाहींत. अश्लील शब्द तोंडांतून कधींहि न उच्चारणारे

लोक अनीतिमान् असूं शकतील, व अश्लील शब्द तोंडांतून काढणारे लोक आचरणांत नीतिमान् असलेलेहि आढळतील. काव्यचर्चेत अनैतिक आचरणाचा संबंध येत नाहीं. अश्लील म्हटल्या जाणाऱ्या शब्दांचा व त्यावरून सुचणाऱ्या कल्पनांचा संबंध येतो. पण अशा प्रकारची केवळ शब्दगत किंवा कल्पनागत अश्लीलता ही प्रत्यक्ष अनीति नसली तरी सदभिरुचीला ती विरोधी आहे यांत शंका नाहीं. —केसरी १९३१ आगष्ट २९

## खाडिलकरांचें मेनका नाटक

श्री. खाडिलकर नाटक लिहिण्यास सरसावले म्हणजे चालू राजकारण व पक्षभेद त्यांच्या डोळ्यांपुढें उभे राहतात. ते त्यांना कधींहि दृष्टिआड करितां येत नाहींत. तसेंच विनोदाकरितां प्रतिपक्षाची निंदा व टवाळी करण्याची त्यांना अनिवार बुद्धि होते; आणि ती टवाळीहि ते इतक्या विकृत आणि ओंगळ स्वरूपांत करितात कीं, त्यांत ग्राम्यपणा व संस्कृतांतील अर्थानें बीभत्सपणा बेसुमार उत्पन्न होतो. नाटकांत त्यांनीं विश्वामित्राच्या शिष्यांचें चित्र असेंच बीभत्स रंगविलें आहे. आणि कोणतें पात्र कोणाकरितां त्यांनीं मनांत योजिलें असावें हें ध्यानांत आणिलें म्हणजे नेहरू, पटेल व जम्नादास यांपैकीं कोणाला कुत्रा, कोणाला पाणक्या, कोणाला स्त्रियांचीं लुगडीं काखेंत किंवा अंगावर घेणारा असें बनविलें आहे असें दिसतें. आणि हें कां, तर त्यांनीं कौन्सिलांत जाण्याचा हट्ट व लोभ धरून महात्मा गांधी यांचा बहिष्कारयोग व्यर्थ केला म्हणून. अप्सरांच्या पायीं पडणाऱ्या शिष्यांची कोण ती विटंबना !

श्री. खाडिलकर लेखांत काय किंवा नाटकांत काय, एकाद्याची अभद्रपणें टवाळी करूं लागले म्हणजे त्यांना सुमार कसा तो राहात नाहीं. कित्येक शिवराळ पत्रांप्रमाणें श्री. खाडिलकरांच्या 'नव्या काळा'त प्रत्यक्ष व्यक्तिविषयक गालिप्रदान नसतें खरें; तरी त्यांनीं त्या उपोषणाचें पारणें या नाटकांत फेडून घेऊन सगळा पचपा काढला आहे. आणि नाट्यप्रयोग साध्या वर्तमानपत्री लेखापेक्षां जितका अधिक चित्ताकर्षक, तितकी ती टवाळी अधिक भेसूर व मनाला बोचण्यासारखी व्हावी यांत काय आश्चर्य ? बटूंनीं काखेंत अप्सरांचीं लुगडीं घेणें, त्यांच्या पादत्राणजोड्यांचा स्वतःकरितां लोभ धरणें त्यांच्या पायांवर लोळण घेणें, त्यांच्यापुढें स्वतःच्या तोंडांत मारून घेणें, इंद्रसभेंत शिरून तेथील मुगुट डोक्यावर घालून येण्याचा क्षुद्र लोभ दाखविणें—अशा कितीतरी निंदाव्यंजक व मनाला चीड येण्यासारख्या गोष्टी श्री. खाडिलकरांनीं या नाटकांत चालू राजकारणाला उद्देशून घातल्या आहेत. मग त्यांचा रोख स्वराजिस्टांवर असो, किंवा प्रतिसहकाऱ्यांवर असो. प्रत्यक्ष चित्र न काढतांहि राजकीय प्रतिपक्षीयांना रेडा, मेंढी, बाहुल्या, लुगडीपुष्या, दध्या, ओझीं वाहणारा व राबणारा गाढव असलीं नांवें ठेवून तसली नाट्यकृति रंगविणें ही गोष्ट सचित्र वर्तमानपत्रांत अशा देखाव्यांचीं प्रत्यक्ष चित्रें काढण्याहून कमी अधमपणाची ठरत नाहीं. बिचाऱ्या कागदावरील चित्रांत नाटकांतील बोलक्या पात्रांचा जिवंतपणा व रसरशीतपणा तरी नसतो !

आणि श्री. खाडिलकर यांनी हें असें तोंडसुख स्वराजिस्ट व प्रतिसहकारी यांजवर कां घ्यावयाचें, तर ते स्वतः या कोणत्याहि वर्गांत आज सामील नाहींत म्हणून. पण १९२० च्या पहिल्या सहामाहींत श्री. खाडिलकर हे जेव्हां स्वतः कायदेकौन्सिलच्या निवडणुकींत उमेदवार म्हणून उभे होते, तेव्हां हीं सगळीं विरूप वर्णनें त्यांना स्वतःला व त्यांच्या इतर कित्येक जिवलग दोस्तांना लागू पडत नव्हतीं काय ? श्री. खाडिलकर हे आपलें पूर्ववृत्त थोडें तरी स्मरतील तर बरें होईल. तेव्हांचे श्री. खाडिलकर कौन्सिलरूपी इंद्रसभेंत जावयास एका पायावर तयार झाले होते, तेव्हांचे खाडिलकर सुधारणारूपी अप्सरांचे शालू काखेंत मारीत होते, लुगडीं धूत होते व कुलंगी कुभ्यासारखे त्यांचे पाय चाटीत होते, असें वर्णन करणें हें सुसंस्कृत अभिरुचीला सोडून असलें तरी यथार्थ होणार नाहीं काय ? पण श्री. खाडिलकरांना एक माहीत आहे कीं, योग, मंत्र, तंत्र, तप, अनुष्ठान व गुरुशिष्य असले पोकळ तत्त्वज्ञानाचे शब्द नाटकांत घातले, आणि कोणत्याहि पात्राच्या बापाला न समजण्यासारख्या अर्थाचीं तत्त्वज्ञानाच्या फाल्गुनी बडबडीचीं, बोजड वाक्यें नाटकांत पेरलीं म्हणजे सगळ्या जगाची निंदा करण्याचा अधिकार आपणाला बिनहरकत लाभतो.

विश्वामित्राचे बटुशिष्य अप्सरांशीं नाचरंग करण्यांत दंग असतां विश्वामित्र प्रगट होतो तेव्हां " गुरुजी आले म्हणून इतकें भ्यावयाचें काय कारण ? त्यांचा सन्मान करण्याकरितां त्यांना नाच दाखवा " असें एक अप्सरा म्हणते, व बटुशिष्य ती सूचना उचलतात, असें श्री. खाडिलकरांनीं नाटकाच्या दुसऱ्या अंकांत दाखविलें आहे. आणि हें सर्व पाहून दुःखी विश्वामित्र निराश होऊन विचारतो, " हें फल काय मम तपाला ? " पण हाच प्रश्न श्री. खाडिलकरांच्या नव्याजुन्या दोन्ही श्रीगुरुंना स्वतः खाडिलकरांसच विचारण्याचा प्रसंग आला होता व आहे. १९१४ सालीं टिळक मंडालेहून परत आल्यावर श्री. खाडिलकर यांनीं, त्यांच्या पश्चात् केलेली आपली कामगिरी म्हणून संगीत नाटकांचा एक सेट सुंदर बाइंडिंग करून टिळकांना नजर केला व त्यांना आपलीं नाटकें पाहावयास नेलें असें म्हणतात. तेव्हां टिळकांच्या तोंडून काय उद्गार बाहेर पडले असतील याची कल्पना कोणीहि करावी. आपल्या पुढच्या ' खारका ' खाणाऱ्या शिष्याला त्या ' गुरुमाउली ' नें " हें फल काय मम तपाला ! " अशाच अर्थाचा प्रश्न उघड किंवा निदान मनांत तरी केला असावा.

बरें, आतां श्री. खाडिलकरांची नवी गुरुमाउली घ्या. तिचें तरी शिष्यत्व श्री. खाडिलकरांनीं कितीसें एकनिष्ठेनें केलें ? विधायक कार्यक्रम स्वतः त्यांनीं कितीसा आचरिला ? असत्याचारी असहकारिता त्यांच्या मनांत कितीशी खरी भिनलेली आहे ? त्यांच्या एका आठवड्याच्या वर्तमानपत्राला दोरेहि त्यांनीं काढलेल्या हातसुताचे पुरणार नाहींत. आणि महात्मा गांधींना स्वतः कौन्सिलांत जावयाचें नसलें तरी, आणि मेनका नाटकांत कौन्सिलवाल्यांची निंदा असली तरी, श्री. खाडिलकरांचा हा रंगीत-संगीत विधायक कार्यक्रम महात्मा गांधींना कितीसा पटणार आहे ? खाडिलकरांची ही नवी गुरुमाउली देखील

" हें फल काय मम तपाला ? " असा प्रश्न या आपल्या संगीत शिष्यवराला विचारणार नाहीं काय ? नवें नाटक सजविण्यांत खादीला कितीसें उत्तेजन आहे ? त्यांतील स्त्रीपुरुषविषयक चर्चा हें राष्ट्रीय शिक्षणाचें कोणतें अंग होय ? इकडे गांधींनी पोषाकाच्या साधेपणाचें नवें योगशास्त्र किंवा तत्त्वज्ञान निर्माण करून उदाहरण घातलें, आणि तिकडे एकाद्या त्यांच्या शिष्यानें नाटकपात्रांचे शालू, शालजोड्या, पोषाक सीनसीनरी यांच्या हौसेखातर हजारों रुपये खर्च करवून स्त्रीपात्रांची पदरपट्टी साफ बसली न बसली याच्या विचारांत लक्ष व वेळ ही खर्च केली, तर " हें फल काय मम तपाला ? " असा सवाल गुरूनें शिष्याला विचारण्याचा प्रसंग प्राप्त झालाच की नाहीं ?

तपस्वी गुरूच्या मंत्रांच्या नांवावर निष्क्रिय शिष्यांनीं प्रतिपक्षांची ग्राम्य निंदा करण्याच्या तोडीला बसविण्याहूनहि सरस अशी एक गोष्ट आम्हीं ऐकली आहे. ती गोष्ट कदाचित् प्रस्तुत नाटककारास माहित असेलहि ! एका तपस्वी गुरुमाउलीच्या मृत्यूच्या तिसऱ्या दिवशीं तिचे मंत्रोच्चारबल असे एक शिष्य, आपलें नवीन नाटक लवकर बसविण्याच्या हौसेनें, आपल्या राज्यांतील—नाटककंपनी—प्रजेवर तालिमीस बसण्याचा जुलूम करूं लागले. पण बिचाऱ्या नटांनाच लाज वाटून, व दुखवट्याच्या सभेला जाण्याची त्यांना अनिवार इच्छा झाली म्हणून, या नाटकांतील श्रद्धानंदाचें त्यांनीं अनुकरण केलें; आणि " आतां कांहीं आम्ही गुरुजींना तितके भीत नाहीं, तशी वेळ आली तर तोंडावर सांगूं, ऐकत नाहीं म्हणून, " असे उद्गार काढले; व ते ऐकल्यामुळें नाट्यगुरुजींचा नाइलाज झाला तेव्हांहि ' हें फल काय मम तपाला ? ' असा प्रश्न विचारण्याला योग्य असाच प्रसंग होता.

असो; वास्तविक हल्लीं मराठी रंगभूमीवर चाललेल्या एकंदर दोषास्पद प्रकारासंबंधानें विचारी लोक जशी नुसती तुच्छतादर्शक उपेक्षा करतात, तशीच श्री. खाडिलकरांच्या या नाटकांतील प्रकाराचीहि झाली असती. पण कोणी कांदा खाऊन एकादशी मोडावी त्याप्रमाणें बाष्कळ ग्राम्य विनोदांत प्रचलित राजकारणांतील व्यक्तिद्वेष घुसडून देऊन, श्री. खाडिलकरांनीं आपला अपराध द्विगुणित केला आहे. यामुळें आम्हीं केली याहून अधिक कडक टीका त्यांच्यावर कोणीं केली असती तरी तें क्षम्यच झालें असतें. नाटकांतील वटुशिष्यांच्या रूपांनीं ओळखल्या जाणाऱ्या व्यक्ति राजकारणांतील अप्सरांचे शालू कदाचित् लाक्षणिक अर्थानेंच कांखेंत घेत असतील. पण खाडिलकरांना आपल्या या नाटकाच्या विधायक कार्यक्रमांत तो प्रसंग अपरोक्ष प्रत्यक्षच कितीदां तरी आला असेल. कारण एरवीं नाटक चांगलें वठतें कसें ? ज्ञानेश्वरांनीं रेड्याच्या तोंडून वेद वदविले तसें बालगंधर्व खाडिलकरांचे हातून वचमय पदें लिहविणार ते लिहवोत. तितक्यानेंच श्री. खाडिलकरांचें समाधान झालें असतें तर आम्हीं या विषयांत लक्षच घातलें नसतें. परंतु या नाटकाला सर्वस्वी राजकारणाचें स्वरूप असल्यामुळें आम्ही तें नाटक असें मानीतच नाहीं. तर एका प्रतिपक्षीयाचें राजकीय व्याख्यान किंवा लेख असेंच मानतों. आणि एवढ्याचकरितां आज लेखणीला हे अप्रिय श्रम घ्यावे लागले. —केसरी १९२६ जून १५

## ' छन्दोरचना '-(प्रो. मा. त्रि. पटवर्धनकृत )-ग्रंथपरीक्षण

या विषयावर स्वतंत्र नवें पुस्तक एकदमच लिहावयास बसल्यानें जशी एकसूत्रता आली असती तशी पूर्वी लिहिलेले निबंध एकच केल्यानें आलेली नाहीं. तथापि ' कांहीं साहित्यविषयक विचार ' असें ह्या ग्रंथाचें संग्राहक नांव मानिलें असतां वरील उणीव भासत नाहीं. पटवर्धन यांची प्रसिद्धि आतांपर्यंत कवि या नात्याचीच होती. पण ह्यांच्या पुस्तकानें हें निखालस सिद्ध केलें आहे कीं, कवि झाला म्हणजे त्याला चिकित्सक बुद्धि नसावी किंवा नसते असें नाहीं. पटवर्धन यांनी या ग्रंथांत चिकित्सक बुद्धि कसून चालविली आहे इतकेंच नव्हे, तर छन्दःशास्त्राचा विषय अत्यन्त परिश्रमपूर्वक तळापासून ढवळून काढला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्यांचा ग्रन्थ जसा विवेचक तसा सुरसहि झाला आहे. ग्रन्थाच्या नांवाप्रमाणें त्यांत छन्दःशास्त्राचा विशेष विचार करूनहि शिवाय त्यांनीं सातव्या व आठव्या प्रकरणांत; पद्यांतील व्याकरणविशेष व पद्यभाषा हीं जीं दोन प्रकरणें लिहिलीं आहेत, तीं तर आमच्या दृष्टीनें फारच मौल्यवान् असून त्याच्या योगानें साहित्यविचाराला सर्वसाधारण रीत्या मार्गदर्शक पद्धतीची विशेष मदत होणार आहे.

## वृत्त, छंद व जाति

प्रथम यमक, गण व अक्षर यांचा विचार करून नंतर त्यांनीं वृत्तविचार व छन्दोविचार केला असून, स्वतः त्यांनीं म्हटल्याप्रमाणें छन्द व जाति यांच्या विस्ताराची जी रचना केली ती खरोखरच स्वतंत्र व शास्त्रीय अशी कामगिरी होय. वृत्त, छन्द व जाति असे तीन वेगळे प्रकार त्यांनीं मानले आहेत. परंतु यासंबंधानें आमचें मत असें आहे कीं, हें वर्गीकरण फारसें समर्पक नाहीं. स्वतः त्यांनीं म्हटल्याप्रमाणें ताल हा पद्याला अवश्य आहे, असें मानलें असतां ह्या तिहींनाहि एकच नांव व कदाचित् वृत्त हेंच नांव पुरेल असें वाटतें.

कोणताहि एक ताल घेतला असतां त्याला अनुसरून पद्यकार स्वतःकरितां एक ठराविक किंवा नवा स्वतंत्र सांचा बनवितो. आणि तो सांचा अक्षरगणयुक्त किंवा मात्रागणयुक्त अशा शब्दसमूहानें भरून काढतो. ज्याला ताल नाहीं अशा पद्याचा विचार पटवर्धन यांना कर्तव्य आहे असें दिसत नाहीं. पण तालात्मक अशा पद्यांचा त्यांना विचार करावयाचा आहे असें म्हटलें तर मग कोणताहि सांचा हें एक वृत्त असें मानलें म्हणजे कार्यभाग होईल. पद्यांत किती चरण असावेत, किंवा ध्रुपद व अंश मिळून त्याचे किती व कसे तुकडे पाडावेत, हें पद्यकारांच्या इच्छेवर अवलंबून राहील. मात्र गृहीत केलेल्या तालाला अनुसरून एक किंवा अनेक आवर्तनांनी सम साधली म्हणजे झालें. समावर्तन साधलें म्हणजे मग त्या समेंत बसणारा सर्व शब्दसमूह मिळून एक संपूर्ण सांचा, किंवा पद्यकोटींतील अनु किंवा इंग्रजींत ज्याला यूनिट ( unit ) म्हणतात तो तयार होतो. मग फरक राहिला तो फार थोडा. फक्त अक्षरगणांचें बंधन

किंवा मात्रागणांचें बंधन कवि स्वतःला घालून घेतो इतकाच विचार उरतो. आणि तोहि पद्यकाराच्या इच्छेवरच अवलंबून राहील. अर्धी किंवा दिडकी अक्षरें जोंपर्यंत मान्य झालेली नाहींत व जोंपर्यंत अशा अक्षरांना वेगळ्या खुणा मिळालेल्या नाहींत, तोंपर्यंत अक्षर म्हटलें की, ऱ्हस्व किंवा दीर्घ असेल तसेंच उच्चारिलें किंवा लिहिलें पाहिजे हा निर्बंध टळत नाहीं. आणि हा निर्बंध राहील तोंपर्यंत ऱ्हस्व अक्षरांचा उच्चार सोईकरितां दीर्घ व दीर्घाचा ऱ्हस्व केला तरी ती चूकच मानली पाहिजे; मग ती चूक विद्वानहि करो; चुकीला चूक म्हणूनच तिचा निर्देश केला पाहिजे. जुन्या गद्यांत किंवा नवीन कवितेंतहि अशा सवलती पद्यकार घेत आले आहेत. म्हणून त्या चुकारूपी अपवादांना नियमांचें स्वरूप देणें बरोबर होणार नाहीं. लघु किंवा गुरु अक्षरें हीं जशीं लिहिली जातात तसाच त्यांचा उच्चार करणें हें शुद्ध व विहित मानलें तर अक्षरगण किंवा मात्रागण यांच्याशिवाय तिसरा गण संभवत नाहीं. आणि या दोन गणांपैकीं कोणताहि स्वीकारून, कोणत्याहि एका स्वीकृत तालांत समेपासून समेपर्यंत जो पद्यात्मक शब्दप्रबंध केला तें वृत्त असें म्हटल्यानें कार्यभाग होऊं शकतो. तथापि आधुनिक कवितांना जाति या सदराखालीं घालून त्यांचेहि सनियम सनिर्बंध असे सांचे बनविता येतात. ही जी नवीन दृष्टि पटवर्धन यांनीं वाचकांना दिली ती अभिनंदनीय होय.

जातिविस्तार प्रकरणांत निरनिराळीं पदें घेऊन किंवा निरनिराळे आधुनिक पद्यप्रबंध व नाटकांतील वगैरे पदें घेऊन त्यांना मात्रांच्या संख्येनें नियमबद्धता आणलेली असते. निरनिराळ्या चालींचीं पद्यें किंवा पदें घेतलीं असतां, त्यांचा थोड्याफार फरकानें विनिमय होण्याजोगा असतो. विविधांमध्यें साम्य हुडकून काढतां येतें व एकाचें रूपांतर फार थोड्या फरकानें दुसऱ्यांत करतां येतें, हें उदाहरणें घेऊन दाखविण्याचा पटवर्धन यांनीं जो प्रयत्न केला आहे तो विशेष अभिनंदनीय होय व त्यांत त्यांची चौकसबुद्धि विशेष दिसून येते. पुष्कळ वेळां तितक्याच गणसंख्येचीं पद्यें असतांहि केवळ चाल वेगळी म्हणून वेगळीं वाटतात. पण चाल या शब्दांत नुसता ताल नसून संगीत स्वररचनाहि असते. यामुळें वेगळेपणा दिसतो. पण तो खरा नव्हे. एकच अभंग निरनिराळ्या रागांत म्हटला असतां तीं निरनिराळीं वृत्तें असल्याचा चुकून भास होतो. पण तो आभासच असतो. मात्र रागदारीच्या म्हणण्यांत आलापाची भर पडल्यानें मात्रांची संख्या बदलते तेथें मात्र तो सांचा किंवा तें वृत्त खरोखरच वेगळें ठरतें. पण पद्यरचना करतांना पद्यकार कोणत्याहि एका रागदारींत आपल्याशीं गुणगुणत असला तरी, तें पद्य हा विशिष्ट मात्रागणसंख्येचा किंवा अक्षरगणसंख्येचा एक संपूर्ण सांचा किंवा यूनिट ( Unit ) होय इतकीच प्रतीति अपरिचित वाचकाला होते. पटवर्धन यांच्या विवेचनांतून इतकाच बोध घ्यावयाचा की, पद्यकाराला आपल्या इच्छेप्रमाणें किंवा आवडीप्रमाणें किंवा सोईप्रमाणें वाटेल तो सांचा घेऊन त्याला त्यांत पद्य बसवितां येईल, मात्र त्यानें स्वीकारलेलें गणबंधन बरोबर पाळलें पाहिजे. मग म्हणणारा तें कोणत्याहि रागांत म्हणो.

या नवीन हुडकून काढलेल्या जातींना नांवें हवींत म्हणून पटवर्धनांनीं तीं प्रचलित

पद्यांतील प्रमुख शब्दांचीं नांवें घेऊन एक नवीनच वृत्तमाला तयार केली आहे. पण हा प्रयत्न पुष्कळसा फुकट जाईल असें आम्हांला कष्टानें म्हणावें लागतें. कारण पटवर्धनांनीं उदाहरणाकरितां कविता घेतल्या त्या सर्व आधीं लोकांच्या तोंडीं आहेतच असें नाहीं. यामुळें वृत्तदर्पणांतल्या थोड्याशा कविता पाठ करून वृत्तांचीं नांवें व चाली हीं जशीं ध्यानांत राहतात तशीं पटवर्धन यांनीं बनविलेलीं वृत्तें किंवा जाति लक्षांत राहतील असें वाटत नाहीं. जुन्या वृत्तकारांनीं इच्छेला येतील तींच नांवें दिलीं आहेत. त्या दृष्टीनें पाहतां पटवर्धनांनीं नवीन वृत्तें हुडकून दाखवून दिल्यावर त्यांनींहि आपल्या आवडीचीं नांवें कां देऊं नयेत ? पण फिरून असें म्हणावेंसें वाटतें कीं, या सर्व प्रयत्नापेक्षां, तालांचीं मूलतत्त्वें ( व तींहि फार थोडीं आहेत ) समजावून देण्याचा प्रयत्न कोणीं तालज्ञानें केला आणि ती समजून घेण्याचे परिश्रम पद्यकारांनीं केले तर पटवर्धनांचीं जातिनामें लक्षांत ठेवण्यापेक्षां आपली आपणच तालाचीं कोष्टकें मांडून पद्यकारांनीं पद्यें रचल्यास त्यांचें काम अधिक सुलभ होईल; व पद्य म्हटलें कीं तें तालांत बसलें पाहिजे, हा जो निर्बंध तोहि आपोआप पाळतां येईल.

पटवर्धनांच्या होशी सृष्टिनिर्मितीनें कसे प्रकार घडतात हें दोनतीन उदाहरणांवरून कळून येईल. ' माझा भरत देखिला काय, कुणि तरि सांगा हो ' हें पद आणि त्याची चाल प्रसिद्ध आहे. आणि लघुगुरु हे भेद ओळखणाराला त्याचें धृपद व अंत्रा मिळून किती मात्रांचा सांचा तयार होतो हें सहज ठरवितां येईल. या पदाच्या 'जाती'ला पटवर्धनांनीं 'भरत' हें नांव दिलें आहे. पण ही जाति कशी सिद्ध होते तें पाहा. " उपचंद्रकान्ताच्या परंतु साधारणतः दीर्घस्वराङ्कित संहत अक्षरांत अशा तीन पंक्ति व चौथी उपचंद्रकान्त मिळून कडवें होतें. धृपद उपचन्द्रकान्त व विचन्द्रकान्त मिळून होतें. " ( पृष्ठ १८६ ). आतां हें वर्णन कोणाला कसें समजणार, व कोण किती लक्षांत ठेवणार ? त्याच्या ऐवजीं ' माझा भरत देखिला काय, कुणि तरि सांगा हो ' हें पद दोनतीन वेळां ऐकणारालाहि, मात्रा वगैरेंचा प्रपंच न कळला तरी तें लक्षांत ठेवतां येईल, व त्याबरहुकूम पद्यरचना करतां येईल व त्यांतल्या मात्रा मोजून घेतल्या तर कामच झालें. दुसरें उदाहरण; ' मुद्रिका ' ही ' जाति ' बायकांच्या तोंडांतील ' मुद्रिका ' या गाण्यावरून पटवर्धनांनीं घेतली आहे. पण त्याचा खुलासा पटवर्धनांच्या भाषेनें असा कीं, " मञ्जरी, उदय आणि प्रविसूर्यकान्त या तीन पंक्ति मिळून ही जाति होते. दुसरी व तिसरी पंक्ति मिळून एक समजून एका रेषेंत लिहितात. तसें समजल्यास ती जोडपंक्ति द्वितीय पर्यात द्विमात्रिक विराम असलेली प्रसूर्यकान्त मात्रावलि होईल. " ( पृष्ठ १८८ ).

तिसरें उदाहरणः- ' कृतान्तपुरद्या भग्न होशी निष्ठुर तूं बा कसा. ' ही होय. ही पुष्कळांच्या तोंडीं असेल. पण या 'जाती' चें पटवर्धनांचें नांव ' मनी ' कीं ! तर "गुणी आणि अवगुणी अशी ही । द्वाड आमुची । मनी." अशी एक ओळ ' अज्ञातनाद ' नामक पद्यसंग्रहांत यांना आढळली आहे. पण सामान्यतः या 'मनी'पेक्षां हा ' कृतान्तपुरद ' च लोकांच्या अधिक परिचयाचा असतो; म्हणून या जातीला ' कृतान्त ' हें

नांव दिलें असतें तर अधिक बरें झालें नसतें काय ! बरें, ह्या साध्याभोळ्या मनीचें वर्णन किती बिकट आहे पाहा; " पादाकुलकाच्या दोन व तीन पंक्ति आणि सूर्यकान्त व सूर्यकला या विसूर्यकान्त मिळून ही जाति सिद्ध होते. " निरनिराळ्या जातींमध्यें विनिमय कसा होऊं शकेल व त्यांत मूलभूत सारखेपणा कसा असतो हें दाखविण्याच्या शास्त्रीय दृष्टीनेंच हा सर्व अपरिचित व्याख्यांचा प्रपंच पटवर्धनांनी केला आहे ही गोष्ट कोणीहि कबूल करील. पण या चर्चेपासून विधायक असें साहाय्य फारसें कोणास होणार नाहीं इतकीच आमची तक्रार आहे. नवीन शास्त्र शिकावयाचें झालें तर त्यांतील पारिभाषिक शब्द तरी होतां होईतों सोपे व परिचित असावेत असा नियम आहे. पण सिद्धान्त नवा आणि परिभाषाहि सगळीच्या सगळी अपरिचित व नवसंघटित असें झाल्यास बोध कसा व्हावा ! खेंचराची जाति माहित नसणाराला " घोडा व गाढव मिळून खेंचर बनतें " असें सांगितलें तर कांहीं तरी कळेल. कारण त्याला खेंचराची कल्पना नसली तरी गाढव व घोडा यांच्या स्वरूपाचीच असते. पण पटवर्धनांच्या या विवेचनांत मूळ घटकहि अपरिचित.

असो. टीकास्पद हा विषय इतकाच सोडून देऊं. परंतु यानंतर 'पद्याची भाषा' व 'पद्यांतील व्याकरणविशेष' या दोन प्रकरणांत पटवर्धन यांनीं जे नियम किंवा सिद्धान्त दिले आहेत ते आम्हांला एकंदरीनें फारच पसंत वाटतात, हें आम्ही मोठ्या आनंदानें नमूद करतों. या प्रकरणांतील चर्चा फारच मार्मिक झालेली आहे, संस्कृत शब्द पद्यकारांनीं कितपत व कसे वापरावेत, मराठी भाषेंतील जुन्या शब्दभांडाराचें मूल्य पुष्कळ असतां त्याची आपण हयगय किती करतों, परभाषेंतील शब्द कोठपर्यंत टाळावेत व कोठपर्यंत घ्यावेत, याविषयीं पटवर्धन यांचें विवेचन फारच समर्पक आहे. ते स्वतः आपल्या कवितेंत उर्दू, पर्शियन वगैरे शब्द फार घालतात असा त्यांच्यावर आक्षेप आहे. तो खरा असला तरी निदान त्यांचें 'श्रेयस्' हें त्यांच्या 'प्रेयसा'हून वेगळें आहे यांत शंका नाहीं. पृष्ठ २१७-१८ वर भाऊसाहेबांच्या बखरींतील एक उतारा देऊन त्यांतील अनेक परकी शब्दांऐवजीं संस्कृत किंवा मराठी शब्द घातले तरी हानि कशी होत नाहीं हें त्यांनीं दाखविलें, याबद्दल सावरकरांप्रमाणें आम्हीहि त्यांचे आभारी आहों. पण याहिपुढें जाऊन पृष्ठ २१८ च्या शेवटीं जीं ५-७ वाक्यें लिहिलीं आहेत तीं आम्हांला फारच आवडलीं. तो उतारा नसून तीं त्यांचीं स्वतःचीं वाक्यें आहेत आणि पटवर्धन हे इच्छा असल्यास फारसी शब्द वगळून व जुने मराठी शब्द घालून उत्कृष्ट गद्य कसें लिहूं शकतात याचा तो एक उत्तम मासला म्हणून देण्यासारखा आहे. यावनी शब्दांमधील दांडगेपणाच्या अर्थाचा सहवास आमच्या फार दिवसांच्या परिचयाचा झाल्यामुळें केवळ यावनी शब्दांबाहेर आवेश नाहीं अशी आमची समजूत होऊन गेली. पण ही चूक आहे. आवेश हा शब्द-स्वरूपापेक्षां शब्दार्थांत अधिक असतो आणि अर्थाच्या दृष्टीनें संस्कृत किंवा मराठी भाषेंतील शब्द कमी आवेशयुक्त नाहींत. फक्त ते आवेशाच्या अर्थानें ऐकण्याची आपली संवय गेली इतकाच त्याचा अर्थ. पर्शियन शब्दांच्या या कोशकारांनीं, यावनी शब्दांची रेलचेल आपल्या कवितेंत करणाऱ्या या कवीनें, मराठी भाषेला दिलेली ही योग्य विशेष

अभिनंदनीय होय. पटवर्धनांच्या ग्रंथांत विनोदाला एरवीं जागा नव्हती. पण आपल्या पर्शियन भाषेच्या ज्ञानामुळें राजवाड्यांच्या ज्या चुका त्यांनीं पृष्ठ २०० वर दाखवून दिल्या आहेत त्या वाचल्या म्हणजे फार मौज वाटते.

एका वाक्यांत अपपरामर्ष करावयाचा तर आम्ही असें म्हणूं कीं, साहित्यशास्त्रा-संबंधानें मराठींत जे कांहीं ग्रंथ उपलब्ध आहेत त्यांत या ग्रंथानें मौल्यवान् भर घातलेली असून, विद्यापीठाच्या अभ्यासक्रमांत चालू करण्यासारखें पुस्तक मराठींत नाहीं असें म्हण-णाऱ्यांना पटवर्धन यांनीं या ग्रंथानें सक्रिय असें उत्तर दिलें आहे. पटवर्धन यांच्या काव्या-प्रमाणें त्यांचे गद्य ग्रंथांहि असेच आणखी निर्माण होवोत. —केसरी १९२७ सप्टेंबर १३

## 'खरा देशभक्त'–( श्री. वा. कृ. भावे लिखित )

• ग्रंथकारानें या कादंबरीचा काळ तीस पस्तीस वर्षांपूर्वीचा असें स्वतःच दिग्दर्शित केलेलें असल्यामुळें हें उघडच दिसतें कीं, त्याच्या बाळपणच्या भावना तेव्हां बीजरूपानें ज्या रुजत पडल्या त्या मध्यंतरीं त्याच्या स्वतःच्या कृतीच्या रूपानें थोड्याशा अंकुरल्या असल्या किंवा नसल्या तरी, या कादंबरीच्या रूपानें मात्र त्या पूर्ण फळाला आल्या आहेत यांत शंका नाहीं. कादंबरीच्या नांवाच्या अनुषंगानें निघालेल्या या विषयांची पूर्तता करण्याकरितां इतकेंच सांगतों कीं, कादंबरीचें कथानक जसें रम्य असावें तसें या खऱ्या देशभक्ताचें कथानक रंगविण्यांत कुशलता प्रकट झालेली नाहीं; तर त्यांत पुष्कळसा ढोबळपणाच दिसून येतो. कायदेभंग, शिक्षा, काळेंपाणी व बादशाही जाहिरनाम्यामुळें सुटका, या चार स्थूल आणि एकामागून एक लवकर घडलेल्या म्हणजे निदान फार थोड्या पृष्ठांत वर्णन केलेल्या बळणांनीं हें कथानक उकललें जातें. पण सरस कादंबरींतील रम्य-त्वाची ठिणगी पडावयाची तर ती, लोहार घणाच्या चारदोन ठोक्यांत पाडतो तशी पडून उपयोगी नाहीं; तर यज्ञकर्मांत अग्निसिद्धीला प्रवृत्त झालेले याज्ञिक समिधांवर समिधा घालून धामाधूम होऊन शेवटीं पाडतात तशी पडली पाहिजे.

सुंदर स्वभाववर्णन व संभाषणाचे खटके इतस्ततः या ग्रंथांत इतके विखुरले आहेत कीं, भुलभुलाईंतून बाहेर पडूं इच्छिणाऱ्या उतावळ्या प्रवाशाप्रमाणें या कादंबरींतील कथा-नकाच्या सूत्रावर ओझरता हात ठेवून वाचक बाहेर पडण्याला धावूं इच्छीत नाहीं. तर न जाणों एखादी मौज किंवा गंमत सुटून जाईल या भीतीनें, डाळतांदूळ निवडणाऱ्या धिम्या स्त्रीप्रमाणें एकेक ओळ निवडून–पारखून तो वाचीत जातो....... सूक्ष्म व गंभीर विनोद तर कादंबरीला आंतून अस्तरासारखाच शिवला आहे. हे संदर्भ वाचून पाहणाराला दिसून येईल कीं, रा. भावे हे डाव्या व उजव्या दोनाहे हातांनीं तडाखे देण्यांत सराईत आहेत. त्यांना चारदोन वाक्यांत एखादी कल्पना मूर्तिमंत उभी करून दाखवितां येते; त्याचप्रमाणें एखादें नैसर्गिक स्थळ, प्रसंग किंवा संभाषण सांगोपांग वळणावळणांनीं किंवा पाल्हाळांनीहि रंगवितां येतें.

ग्रंथकार हे बोलूनचालून पुराणमतवादी असल्यामुळें त्यांनीं नव्या चालीरीतींचें

स्वरूप होईल तितकें विकृत करून दाखविलें आहे. तसें करण्यांत त्यांनीं एका वर्गाला पुष्कळच अन्याय केला आहे; व तो टाळण्याकरितां त्यांनीं नवीन मतवादी लोकांतहि जीं सच्छील व विचारी माणसें आढळतात त्यांतील एखाददुसरें पात्र, 'विद्या' या पात्रापेक्षां अधिक, कथेंत गोवलें असतें तर छाया व प्रकाश यांच्या साहाय्यानें चित्र खुलतें तशी ही कादंबरी अधिक खुलली असती. तसेंच कादंबरीच्या शेवटीं न्यायमुनसफीचा व कोर्टकायद्याचा जो प्रसंग आणला आहे त्यांत कायद्याचें अज्ञान प्रकट करून ग्रंथकारानें स्वत:चें थोडेसें हंसें करून घेतलें आहे असें म्हणतां येईल. तथापि एकंदरीनें ही कादंबरी वाङ्मयदृष्ट्या फारच सरस आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

—केसरी २८।६।१०

---

# उतारे–वर्णन.

## भविष्यकथन

...प्रत्येकाच्या इच्छेप्रमाणें समाजस्थिति एकेक दिवस तरी रहावी असें, समजा—जर ईश्वराकडून ठरविण्यांत आलें, तर वर्षभर रोज एक एक नवाच रंग कसा होईल तो पहा! एक दिवस, पाळण्यांतल्या पोरांना बाशिंगें बांधतां येत नाहींत म्हणून पाळण्यालाच बाशिंगें बांधून झालेले बालविवाह दृष्टीस पडतील; तर दुसरे दिवशीं, 'म्हातारपणीं झालें तरी तांब्याभर पाणी द्यायला कोणी सतेचें मनुष्य नको काय?' अशी सबब सांगून, नववधूसंपादनाची लालसा धरणारे थेरडे, अंगावर लपविलेली सुपारी हुडकून काढण्याचा खेळ आपल्या नवोढांशीं खेळताहेत असें दिसेल! आपल्या मृतपतीची धडधड पेटणारी चिता हाच आपला खरा मोक्षमार्ग असें मानून तिजमध्यें आनंदानें प्रवेश करणाऱ्या साध्वी, किंवा जिवंतपणीं अनेक सुखोपचारसहित आपला हात ज्यावर फिरला तो प्रियपतीचा मृदुदेह निष्ठुर अग्नि भाजीत आहे, असें पाहून त्याजवर आपली कोमल देहलता पसरून ज्वाळा थामवूं पाहणाऱ्या प्रेमशूर सतीच जिकडे तिकडे देहसार्थक करीत आहेत, असें आज दिसेल; आणि उद्यां पहावें तों, साठीच्या जवळ आल्यानें नाठी बुद्धि झालेल्या प्रौढ कामिनी, स्वैर पुनर्विवाहप्रसंगीं विड्या सोडण्याकरितां नव्या करकरीत अशा दांतांच्या कवळ्या जबड्यांत बसवूं पहात आहेत, किंवा आपल्या कोमल-तरुण मतिमुखाच्या लावण्यश्रीची छटा नीट दिसावी म्हणून, सावधान म्हणण्याच्या वेळीं नाकावर चष्मा चढविण्याची सावधगिरी ठेवीत आहेत, असें दिसेल! आज पहावें तों, मृगचर्मावर बसून पवित्र धमण्यानें वेदिमुखांत गोरस ओतून श्रौताग्नि किंवा स्मार्ताग्नि प्रदीप्त करणाऱ्या अग्निहोत्र्यांच्या वषट्काराचा किंवा स्वाहाकाराचा गंभीर ध्वनि जिकडे तिकडे ऐकूं येईल, तर उद्यां मृगचर्माचे बूट पायांत चढवून, वेत्रासनाधिष्ठित होऊन, आधीं स्फटिक धमण्यांतून आधुनिक सोमरसाचें पान झाल्यामुळें प्रदीप्त झालेला जठराग्नि पुढें

लागलीच दुसऱ्या एका प्रकारच्या गोरसाचा स्वाहाकार करून शमवीत आहेत, आणि त्या प्रमाद-प्रमोदाच्या भरांत नोकर लोकांवर झेलल्या अपशब्दांचा किंवा स्वतः एक-मेकांवर लादल्या उपनामांचा वर्षाव करीत असल्याचा गोंगाट ऐकूं येईल! आज पहावें तों, पहिल्या तारखेस झडणाऱ्या चांदरातीनें स्वर्ग लाभल्याचें सुख मानणाऱ्या खर्डे घाशांच्या आनंदाच्या खाकी रंगांत सर्व हिंदुस्थानचा नकाशा रंगलेला दिसेल; तर उद्यां अर्धोज्ज्वल स्वराज्यवाद्यांच्या हेतूप्रमाणें युनियन जॅक आणि जरीपटका यांच्या चिन्हांनीं त्याच नकाशाचा सर्व भूमिकापट निर्मित केला आहे, व त्यावर सर्वत्र भगव्या रंगाची छटा पसरली आहे असें आढळून येईल. आज निर्जनवनांत गाईच्या शेणानें सारविलेल्या साध्या गवताच्या झोपडींत आसनावर बसून व मांडीवर भूर्जे किंवा तमालपत्र घेऊन शिरल्यांतील लाक्षा शाईनें धर्मसिंधूच्या पोथ्या लिहिणारे दरिद्री विद्वान् चहूंकडे दिसतील; तर उद्यां गजबजलेल्या शहरांत लोहप्रासादाच्या दहाव्या मजल्यावर बसून शेंकडों मैल दूर असणाऱ्या आपल्या कारखान्याच्या सुपरिंटेंडेंटला टेलिफोननें दैनंदिन आज्ञा सोडणारे लाखोपति, किंवा हजारों मैलांवर परदेशांतील आपल्या मुनिमाला सोन्याचांदीचीं बाजारचा बाजार खरेदी करण्याची इशारत बिनतारी तारायंत्रानें देणारे नवकोटनारायण चहूंकडे डोळ्यांला दिसूं लागतील! पण या सर्व कल्पना झाल्या. यांतील एकहि सर्वस्वीं खरी ठरण्याचा संभव नाहीं.

आपल्या मनांत असतें एक आणि होत असतें भलतेंच, असा सगळ्या जगाचा सर्वकालचा अनुभव असतो. आतां असें आहे म्हणून मनुष्यमात्रानें इच्छा करण्याचें किंवा मनोरथ बांधण्याचें सोडावें असें नाहीं. भावितव्यतेच्या बाजारांत आपण उभें असतां सर्वांत अधिक उंची माल सर्वांत कमी किंमतीस मागण्याला आपणास हरकत नाहीं; किंबहुना तसा तो मागण्याचा आपणांस हक्कच असतो. तथापि, भारी पदार्थ हलक्या किंमतीस मागण्याचा हक्क जरी आपणांस असला तरी दुकानदार कोणता पदार्थ अखेर किती किंमतीपर्यंत सोडील याचाहि संभव आपणास अजमावतां यावयास पाहिजे. नाहींतर एकहि सौदा न पटतां धिक्कार भरलेल्या बाजारांतून रिकाम्या हातानें, पण निष्फळ इच्छेचें जड ओझें मात्र मनांत बांधून, आपणांस घरीं परत यावें लागेल! शक्याशक्यतेचा व संभवासंभवाचा विचार ह्याच जगाच्या व्यवहारांत खरा उपयोगी असतो. उज्ज्वल इच्छा आपण मनांत बाळगूं नये असें नाहीं. हिंदुस्थानांत शेंकडों वर्षांपूर्वी आलेल्या पारशांनीं इराणांतून आणलेला आपला पवित्र अग्नि जसा अग्यारींतून अद्यापि एकसारखा कधींहि विझूं न देतां प्रज्वलित ठेवलेला आहे, तसेंच मनुष्यमात्रानें ध्येयरूप, आपल्या आकांक्षेचें अग्निहोत्र कधींहि विझूं देऊं नये. तथापि, रोजच्या भाजीचे बटाटे अग्यारींतल्या किंवा अग्निहोत्राच्या विस्तवावरच भाजून घेण्याच्या आग्रहाला मूर्खपणाचें स्वरूप येतें हेंहि विसरतां कामा नये. समुद्रावर होकायंत्र जवळ नसतां नावेंतून प्रवास करणाऱ्या खलाशाला रात्रीं दर्शन देणाऱ्या दिव्य तेजोराशीचा उपयोग मार्गदर्शनापुरता झाला तरी तो कांहीं थोडा नाहीं. त्याला मातपिठलें करून सकाळ-संध्या-

काळची भूक भागवावयाची असेल तर नावेवर फोट्या किंवा कोळसे यांचा परसा पेटवून त्यानें आपलें काम भागवून घेतलें पाहिजे.

तात्पर्य, मनुष्यानें भविष्यकथनाच्या उद्योगांत पडावें, पण तें बालिश आनंदानें पडूं नये. म्हणजे, कोणत्याहि भावी गोष्टीचें ज्ञान अनुमानपरंपरेनेंच सिद्ध करतां येईल असें समजावें व तसें करण्यास शिकावें. दिव्य किंवा अद्भुत चमत्कारांच्या भानगडींत न पडतां, केवळ मनुष्यासहि लोकोत्तर असें बरेंच करण्याची शक्ति असते; आणि केवळ मनुष्यपणाचा अभिमान धरला तरीहि मनुष्यास तो पुरेसा आहे; ईश्वराच्या सिंहासनाच्या खुरालाच त्याला हात घालावयाला पाहिजे असें नाहीं. असला विचार भविष्यकथनाचें कल्पनारम्यत्व कदाचित् नाहींसें करील, पण भविष्यकथनाचा कस तरी त्यामुळें सत्याच्या कसोटीवर अधिक लागेल !

—चित्रमयजगत् १९१४ जानेवारी.

## सिमला वर्णन

दिल्ली आणि सिमला यांतील अंतर अस्मानअस्मानाचें म्हणण्यास हरकत नाहीं. दिल्ली समुद्राच्या सपाटीपासून सुमारें तीनशें फूट उंच असेल, तर सिमला सात हजार फूट उंच भरेल. सिमल्यावर चढलेल्याला झालें तरी आकाश ठेंगणें होतें असें थोडेंच आहे. पण हिमालय म्हटला म्हणजे पृथ्वीवरच्या कोणाहि मनुष्याला जरा आदरानेंच बोलावें लागतें. समुद्राच्या सपाटीपासून तडक एकदम सात हजार फूट उंच चढणें हें आधुनिक वैमानिकालाहि थोडें अवघडच जाईल. 'सिमल्याची टेकडी' हें 'नगाधिराज हिमालया'चें एक लहानसें बछडें आहे; तथापि, हें बछडें आपल्या वडिलांचें नांव कोहीं अगदींच घालविणारें नाहीं. कारण येथें हिंवाळ्यांत तर बर्फ पडतेंच, पण ऐन उन्हाळ्यांत देखील येथून जवळच बर्फाच्छादित शिखरें दिसतात. हल्लीं सिमल्यास हवा फारशी गार नाहीं. सिंहगड किंवा महाबळेश्वर येथली हवा देखील कदाचित् थोडी अधिक गार ठरेल. पण आठपंधरा दिवसांपूर्वीच येथें थंडीचा कडाका पडून लिंबाएवढ्या गारांचा पाऊस कोसळला होता असें आमच्यापूर्वी येऊन राहिलेले लोक सांगतात. उंच दर्जाच्या माणसाच्या स्वभावाप्रमाणें उंच जागेचें हवामान लहरी नसेल तरच आश्चर्य !

हिमालय पर्वतांत एकाहून एक उंच अशा शिखरांच्या रांगा एकामागें एक लागलेल्या असतात असें म्हणतात. त्याचा मासला सिमल्यास येतांना पाहावयास सांपडला. कालका येथें चढण्यास प्रारंभ केला, तेव्हां वाटे हा डोंगर चढून गेलों म्हणजे सिमला दिसेल. पण सिमला नुसता दिसण्याला देखील, त्याच्या सात हजार फूट उंचीतले सहा हजार फूट खर्ची घालावे लागले. आणि हें करतांना आगगाडीला वळसे इतके घ्यावे लागले कीं, आम्ही जिच्याकडे तोंड करून चाललों नव्हतों अशी एकहि दिशा उरली नाहीं. खुद्द सिमलाच पाठीशीं घालून पुढें चाललों की काय असाहि कित्येक ठिकाणीं भास झाला ! वळणें घेण्याला सापाच्या गतीची उपमा देतात. पण आमच्या पूर्ण चक्राकार गतीनें ही म्हण साफ खोटी पाडली ! वळणांची एक रांग संपली कीं, पहिली दरी पुरून नवी दरी व नवें खोरें दिसूं लागे, यामुळें जमिनीपासून बोळयाला उंची

फारशी भासत नसे. पण नवीं संकटें उद्भवलीं म्हणजे जुन्यांचा विसर पडावा त्यांतलेंच हें आहे! अगणित दऱ्याखोऱ्यांचीं पुडांत पुडें बसवून हिमालयाची बनावट एखाद्या गेंदेदार दीपमाळीप्रमाणें किंवा पाकळीदार फुलाच्या माळेप्रमाणें केलेली आहे. सिमल्याचा पर्वत हें या एकंदर माळेंतील शेंकडों फुलांपैकीं फक्त एक फूल आहे. या प्रत्येक फुलाच्या वांट्याला एकेक उंच गिरिशिखर आलेलें आहे. प्रायः हीं सर्व शिखरें श्रीशंकराच्या नांवानें पवित्र झालेलीं असावीं. आमच्या समोर दिसतें त्या शिखराला 'चुडेश्वर' म्हणतात; व या 'जटाधारी' योगीश्वराच्या विरागी ऐश्वर्याची आठवण करून देणारा पवित्र भस्मराशिच की काय असा तो त्या शिखरावरील बर्फाचा विस्कटलेला ढीग दिसतो. येथून केदार, कैलास, कांचनगंगा–धवलगिरी वगैरे शंकरजींच्या इतर आवडत्या निवासस्थानांची आठवण सहजच होते. आणि 'एवरेस्ट'वर चढण्याच्या 'प्रयत्ना'ची हकीकत आजच्याच वर्तमानपत्रांत वाचली, त्यावरून अजून 'साहेब शिवला नाहीं' अशी देवतानिवासाची एक तरी जागा शिल्लक उरली आहे या विचारानें खरोखरच जरा बरें वाटलें!......

हिमालयांत अनेक जातींचे पहाडी लोक आहेत. त्यांचीं पूर्वी लहान लहान संस्थानें होतीं. १८०३ सालीं दिल्ली हस्तगत झाल्यावर इंग्रजांचा प्रवेश पंजाबच्या या कोपऱ्याकडे झाला. पहाडी संस्थानिकांना लढवय्ये व निर्दय गुरखे लोकांचा त्रास होऊं लागला. तो टाळावा म्हणून त्यांनीं इंग्रजांची मदत मागितली. इंग्रजांनीं नेपाळच्या युद्धांत गुरख्यांना आपल्या हद्दींत पिटाळून लावलें. हें कार्य झाल्यावर इंग्रजांनीं पहाडी संस्थानिकांना त्यांचा बहुतेक मुलूख परत दिला. पण लष्करी दृष्टीनें कांहीं नाक्याच्या जागा म्हणून आपल्या ताब्यांत ठेवल्या. तात्पर्य, इसापनीतींतील 'मनुष्य आणि घोडा' या गोष्टीची येथें पुनरावृत्ति होऊन साहेब जो एकदां सिमल्याच्या पहाडावर चढला तो कोठें केव्हां खालीं उतरलाच नाहीं! परत दिलेल्या जागांत देखील उंच उंच हवाशीर पठारें पाहून तेथें दुखणाईत लोकांकरितां झोपड्या व घरें बांधण्याची परवानगी त्यानें मिळविली; व अखेर हीं लष्करी ठाणीं व हीं पठारें मिळून सिमल्याची वस्ती बनली. सिमल्याच्या सात टेंकड्यांवर मिळून आज सुमारें नव्वद हजार वस्ती आहे व सगळ्या हिंदुस्थानचा कारभार बाराहीं सात महिने या पहाडावरून चालतो!

हल्लीं सिमल्यावर चढून येण्याला मोटारी चालण्यासारखा रस्ता व प्रत्यक्ष आगगाडीहि झाल्यामुळें दळणवळणाची कांहीं अडचण वाटत नाहीं. पण पहिले जे इंग्रज येथें आले त्यांना अमेरिकन वसाहतवाल्यांप्रमाणें धैर्य, काटकपणा व स्वावलंबन या गुणांचा फार उपयोग करावा लागला. १८१९ सालीं सिमल्यावर साहेबाची पहिली झोंपडी बांधली गेली. तेथपासून पुढें उन्हाळ्यांत चार दिवस व्हाइसरॉय व सेनापति यांनीं सुखानें हवेखातर येथें येऊन रहावें असा प्रघात पडला. १८२७ मध्यें लॉर्ड आमहर्स्ट हे आपली खास कचेरी घेऊन सर्व उन्हाळाभर येथें राहिले. अखेर १८६४ सालीं ग. ज. लॉर्ड लॉरेन्स यांनीं सिमला ही कायमची राजधानी बनविली. या नंतर वर्षांत सरकारी

रील्या या ठिकाणावर किती कोटि रुपये खर्च झाले असतील याची कोणासहि सहज कल्पना करतां येईल. या राजधानींत सरकारच्या सर्व खात्यांच्या कचेऱ्या, दप्तर, छापखाना, लष्करी छावणी, बिनतारी व साधीं तारायंत्रें, लष्करी विमानें वगैरे सर्व कारखाने एप्रिलच्या प्रारंभापासून नोव्हेंबराच्या प्रारंभापर्यंत जोरांत चालू असतात. उरल्या पांच महिन्यांत सिमला योगनिद्रा घेतो.

एवढ्या सगळ्या हिंदुस्थानची राजधानी व ती एकाद्या पर्वतशिखरासारख्या अडचणीच्या जागेंत कां असा प्रश्न सहजच सुचतो. पण त्याचें उत्तर पूर्वीच्या इतिहासांत व परंपरेंत आहे. कंपनी–सरकारचा राज्यसंपादनाचा उद्योग प्रथमतः उत्तर हिंदुस्थानांत झाला; व कलकत्याहून राजधानी बदलून दिल्लीस आली तरी वरील कारणांत कांहीं फरक झाला नाहीं. उलट कलकत्त्यापेक्षां दिल्लीला सिमला फारच जवळ, यामुळें ही सकारणता बळावली. नव्या दिल्लीची रचना व इमारती झाल्यापासून मात्र सिमल्याचें महत्त्व सरकारच्या मनांतून थोडें कमी झालें आहे. सर्व कचेऱ्या सात महिने येथें असतात त्या उठून बाराहि महिने दिल्लीस राहाव्या, व मुख्य मुलकी–लष्करी अधिकारी यांनीच वाटेल तर आपले खास नोकर व हस्तक बरोबर घेऊन उन्हाळ्यांत सिमल्यास राहावें अशी नवी योजनाहि पुढेंमागें होण्याचा संभव आहे, नाहीं असें नाहीं; पण आज तरी सात हजार मैल समुद्रापलीकडचा साहेब हिंदुस्थानांत येऊन सात हजार फूट उंचीच्या पहाडावर बसून राज्य करतो अशी विपरीत वस्तुस्थिति आहे खरी! हवाखोरीची आवड, एकतंत्री राजसत्ता, परक्या लोकांचा मुबलक पैसा इतके गुणदोष एकत्र झाल्यावर पर्वतावर तर पर्वतावर पण सुखाला लागेल अशी राजधानी इंग्रजांनीं कां न करावी!........

पण इंग्रजांनीं सिमल्यास राजधानी केली तिला वरच्या पैकीं कोणतेंच कारण लागू पडत नाहीं. सुरक्षितपणा म्हणावा तर सिमल्यास तटबंदी कोठेंच नाहीं, उलट विरुद्ध जागांतून वर सहज जातां यावें म्हणून वाटा सडका किती तरी केल्या आहेत. एकांतप्रियता म्हणावी तर कलकत्ता–मुंबई येथील सरकारी बंगल्यांना जितकी गर्दी दूर तितकी येथें नाहीं. मुख्य सडक अशी एकच म्हणजे मॉलरोड. आणि संध्याकाळीं किंवा दुपारी पाहावें तो रावांबरोबर रंकाहि येथें खांद्याला खांदा लावून हिंडलेले दिसतात. मुंबई–कलकत्ता येथें गाड्या मोटारी असल्यामुळें गर्दीत देखील श्रीमंत त्या संपर्क लागत नाहीं. येथें पहावें तों सगळ्या सिमल्यावर मुलकी लाट (व्हाइसरॉय), जंगी लाट (सेनापति), पतियाळाचे महाराज व भोपाळच्या बेगम साहेब या चौघांखेरीज इतर कोणालाहि मोटार किंवा घोडागाडी वापरण्याची परवानगी नाहीं! यामुळें मॉलवरील अरुंद रस्त्यांत सगळ्या बड्या अधिकाऱ्यांना पायानेंच चालावें लागतें. एखाद दुसरा घोड्यावरून जातो. कांहीं थोडे रिक्शामधून जातात, पण बहुतेक पायीं जातात, यामुळें खांद्याला खांदा सहजच भिडतो. बरें, पवित्रपणा म्हणावा तर इंग्रजांनीं येथें देव-देवळांची भानगड फारशी ठेवलेली नाहीं. आणि सामाजिक व्यवहारांत पाहावें तर शहरांपेक्षांहि येथें हयालीखुशाली व तदनुषंगिक गोंधळ अधिक माजतो म्हणतात.

सिमल्याचा विस्तार सात टेंकड्या मिळून सहा मैल लांबीचा आहे. त्या मानानें रुंदी फारच कमी भरेल. कोठें कोठें पर्वताच्या माथ्याचा सपाट भाग शंभर फूट देखील रुंद नाहीं. या सहा टेंकड्यांना आधारभूत असलेला मुख्य पर्वत घोडनालाच्या आकाराचा आहे. त्याच्या मध्यमार्गीं दाट वस्ती असून इतर वस्ती टेंकड्यांवर पसरलेली आहे. मुख्य वस्ती एकाच्या माथ्यावर एक, म्हणजे एकानें आपल्या पडवींत बसून दुसऱ्याच्या धुराड्यांतून खालीं पहावें असी वसल्यासारखी दिसते. काळ्या लोकांची वस्ती ही बाजारपेठ व त्याखालीं लागलेली वीस मजली घरांची उतरंड यांत सांठविलेली असून, सरकारी व युरोपियन लोकांचे खासगी मालकीचे बंगले बाजूच्या टेंकड्यांवर पसरलेले आहेत. तथापि बाजूस झालें तरी महाबळेश्वराप्रमाणें येथें बंगल्यांना विस्तीर्ण कंपाउंड किंवा आवार नसतें. कारण माथ्यावर सपाटी अशी फार कमी. स्वाभाविक मैदानी जागा नसल्यानें घर-बंगला बांधणाराला प्रत्येक ठिकाणीं झाडें तोडून डोंगराची कड खोदून जागा साफ करून घ्यावी लागली आहे. कोणत्याहि एका घरांतून दुसऱ्या घरांत जावयाचें असल्यास चढलें तरी पाहिजे किंवा उतरलें तरी पाहिजे. अशा स्थितींत दळणवळण किती अवघड होत असेल याची कल्पना सहजच करतां येईल. लांब पल्ल्याला चौघांच्या खांद्यावरून जावें लागतें ! पण मोठे गाडीरस्ते नसले तरी लहान सडका व पाऊल वाटा यांचा जणूं काहीं नागमोडी मोकररटच पर्वताच्या सर्व अंगभर आंखल्यासारखा दिसतो. सिमल्याची इतकी वस्ती, पण कोणीहि कोणाजवळ असा राहत नाहीं असें यथार्थतेनें म्हणतां येईल. कोणत्याहि वस्तीला पाण्याची सोय मुख्य लागते. ती सिमल्यास असावी तितकी नाहीं. या पहाडांत पाण्याचा सांठा फार होत नसावा असें वाटतें. कारण डोंगरकपारींतून निघालेला जिवंत वाहता झरा असा येथें सहसा दिसत नाहीं. येथील म्युनिसिपालिटीनें दुरून पाण्याचे नळ आणले आहेत. पण कित्येक बंगल्यांना पाणी बरेंच लांबून आणावें लागतें.

विजेची रोषनाई मात्र सिमल्याला भरपूर आहे. दुरून रात्रीं बड्या सिमल्याकडे पाहिलें म्हणजे हिरेमोत्यांची तारेच्या तारें भरून ती लीलेनें वर उधळून द्यावी असा दाट विखुरलेल्या विजेच्या दिव्यांचा लखलखाट दिसतो. आणि दूर बाजूच्या टेंकड्यांवर पसरलेले तुरळक दिवे पाहिले, म्हणजे आपण एखाद्या मोठ्या बंदरांत उभे असून, समोर रात्रीच्या वेळीं समुद्रांत नांगरलेल्या शेंकडों आगबोटींचा काफिला पहात आहों असा भास होतो. तारायंत्री तारांच्या जाळ्यांचा विस्तार पाहिला म्हणजे बिनवापराच्या जागेंत कोळ्यांनीं केलेल्या विणकामाची आठवण होते. एखादे वेळीं एखादें लष्करी विमानहि पहाडावर घिरट्या घालतें; तेव्हां खालच्या दरींतील चीड, देवदार वगैरे वृक्षांच्या झाडींत नव्या फुटीवर मधाकरितां घोंगावणाऱ्या भुंग्यांच्या गुंजारवाचा प्रतिध्वनिच आपण आकाशांत ऐकत आहों की काय असें वाटतें. तथापि अजूनहि सिमला सगळाच कांहीं नवाळला नाहीं ! त्याच्या जुनाट परंपरेचा धागा अजूनहि शिल्लक आहे. कारण पहाटेच्या वेळीं ' कार्टरोड ' वरून लमाणी खेचरांचे तांडे वर घाट चढून येतात, तेव्हां त्यांच्या गळ्यांतील घंटा, आपल्या गोड आवाजानें जुनी परिचित रागदारी गाऊन, साखरझोंप

घेणाऱ्या आळशी मनुष्याला जागें करून उषःकालाची वर्दी देत असतात. अजूनहि माल देऊन माल विकत घेणारे म्हणजे अडाणी तिबेटी लोक हिमालयांतून येऊन आश्चर्यचकित मुद्रेनें सिमल्याच्या बाजाराकडे पाहत उभे राहतात. अजूनहि आपलें सगळें अंग नख-शिखांत झांकून घेणाऱ्या पहाडी स्त्रिया, अर्धे वक्षःस्थळ उघडें टाकून फिरणाऱ्या गोऱ्या युरोपियन बायांकडे भित्र्या दृष्टीनें पण तिरस्कारयुक्त मुद्रेनें पाहत जात असतात. अजून हि एखादा जंगली गुराखी पहाडाच्या माथ्यावर बसून जुन्या पद्धतीनें अलगुज वाजवून खालचें दरीखोरें मधुर आवाजानें भारून टाकतो.

सिमल्यास सुमारें नव्वद हजार वस्ती आहे म्हणून सांगितलें. पण ती उन्हाळी वस्ती होय. ऐन हिंवाळयांत जेव्हां सरकारी कचेऱ्या येथून खालीं जातात व चोहोंकडे बर्फ पडतें तेव्हां ही वस्ती चवथ्या हिश्शाची राहते, बाकीची खाली निघून जाते. घरधन्या-पेक्षां पाहुण्यांचीच गर्दी अधिक, असा तऱ्हा येथील कायम वस्तीचा प्रकार आहे. आणि उन्हाळी वस्तींत देखील उद्योगी मधमाशीपेक्षां गुलहौशी फुलपांखरेंच अधिक ! सरकारी पेट्या, कागदाचीं पुडकीं, पट्टेवाल्यांची गर्दी हें सर्व पाहून येथें चालणाऱ्या कामकाजाची कल्पना येते ती कांहीं अगदींच खोटी नसते. पण रस्त्यांत भेटणाऱ्यांपैकीं खऱ्या कामांत गढलेल्या अशा एका माणसागणिक दोन माणसें ख्यालीखुशालीच्या ढंगांत असतात असें म्हटल्यास फारशी चूक होणार नाहीं. सरकारी कचेऱ्या येथून हलल्या म्हणजे मग येथील कायम राहिवाशी पहाडी लोक व नेपाळ– तिबेटाकडून येणारे फेरीवाले यांच्या स्वाधीन सगळा सिमला होतो. या दोन जातींचे लोक पाहतांच, वेगळे म्हणून ओळखतां येतात. पहाडी मनुष्य हा अर्धशुभ्र, नाकाडोळयांनीं तरतरीत, व ठेवणीनें किंचित् छलकारा असा असतो. आणि तिबेटी वगैरे प्रायः नकटे, खुजे, कुरूप, घाणेरडे पण मोठे बळकट असे असतात. हातगाड्या वगैरे ओढण्याचें काम पहाडी लोक करतात. पण पल्लेदार मजली-वरचें किंवा भारी ओझें वाहण्याचें काम हे दुसऱ्या प्रकारचे लोक करतात. आमचे घाटी लोक खंबीर खरे, पण हे तिबेटी मोठीं ओझीं पाठीवर घेऊन उंचवट्यावरून खुशाल चढून गेलेले पाहिले म्हणजे आश्चर्य वाटल्याशिवाय राहात नाहीं. या कायम राहिवाश्यांच्या यादींत सिमल्यावरील माकडांचाहि समावेश केल्यास चूक होणार नाहीं ! कारण त्यांची वस्ती तशीच जुनाट व कायम आहे. माणसाबरोबर माकडांचा उल्लेख केल्यास मनुष्यजातीचा अपमान केलासा वाटेल, पण तसें वाटण्याचें कारण नाहीं. किपलिंगनें आपल्या एका कवितेंत सिमल्यावरील माकडांना विशिष्ट प्रकारच्या युरोपियन लोकांपेक्षा अधिक मान दिला आहे. या कवितेचे दोन चरण असे आहेत.

" Artful Bunder, who, never in his life,
Flirted at Peliti's with another's wife. "

या कवितेमध्यें ' पेलिटी ' नांवच्या श्रीमंती थाटाच्या हॉटेलांत फॅशनेबल व सोट लोकांकडून चालत्या जाणाऱ्या गोंधळावर कवीनें कोरडा उडविला आहे. . .

सिमल्यावर सरकारनें हिंदी प्रजेचे कोट्यवधि रुपये पाण्यासारखे नासले व वर्षांतून सात महिने सगळ्या सरकारी कारभाराचा आखाडा सिमल्यावर ठेवला; यामुळें दरवर्षी लक्षावधि रुपयांचा व्यय चुराडा होतो हें तर झालेंच. पण इंग्रज लोकांच्या दृष्टीनेंहि पाहतां त्यांना सिमल्याची कीर्ति फारशी प्रिय नाहीं. येथील समाजरचनेला असेंच कांहीं फाजील. कृत्रिम स्वरूप आलेलें आहे कीं, तें सुजाण इंग्रजांना फारसें पसंत पडत नाहीं. ‘रोग्यांना प्रकृति सुधारण्याची जागा’ असें जोंपर्यंत सिमल्याला स्वरूप होतें तोंपर्यंत सर्वांना तें पसंत होतें. पण सगळा कारभारच्या कारभारच उचलून पर्वतावर नेण्यांत आला, तेव्हां खुद्द इंग्रजांनींहि त्याबद्दल तक्रार केली. १८५१ सालच्या ‘दिल्ली स्केचबुक’ नामक विनोदी पत्रांत या विषयावर फार चुरचुरीत टीका आलेली आढळली. ती अशी–“पंजाबचा अंतःस्थ मुलूख पाहण्याकरितां मुलकी लाट सिमल्याला गेला. मुलकी लाट गेल्यावर त्याच्या संरक्षणाला जंगी लाटला जावेंच आलें! येवढे वरिष्ठ गेल्यावर कनिष्ठाचें कर्तव्य म्हणून लेफ्टनंट गव्हर्नर गेला. कमिशनर म्हणाला, पर्वतावर जायचें म्हणजे कोण त्रास? पण कर्तव्य हें केलेंच पाहिजे म्हणून तो गेला. इतके अधिकारी वर गेल्यावर त्यांच्या टपालाची व्यवस्था करण्यास पोस्टमास्तर जनरलला जावेंच लागलें. मग कोणी या सर्वांचा बंदोबस्त ठेवण्याला म्हणून गेले. कोणी सरकारी काम ठरवून काढून गेले. कोणी बढती मागण्याला म्हणून गेले. कोणी रजेचा रिकामपणा म्हणून गेले. कोणी आजाराचें निमित्त करून गेले. कोणी दुसऱ्या आजार वांचवावा म्हणून गेले. कोणी स्वतःच्या करमणुकीला गेले. कोणी दुसऱ्याच्या करमणुकीला गेले. कोणी सुंदर बायका लग्नाला मिळवावयाला गेले. कोणी आपल्या सुंदर बायका लोकांना दिमाखानें दाखवायला गेले. मुलें असलेल्या बायका मुलांच्या प्रकृतीकरितां गेल्या. मुलें नसलेल्या बायका रिकाम्या म्हणून गेल्या. आणि कित्येक आपल्या नवऱ्यांच्या बढतीच्या किंवा बदलीच्या खटपटीकरितां म्हणून गेल्या. मिळून सगळे गेले. ज्यांना यांपैकीं कांहींच निमित्त मिळेना तेवढे मात्र राहिले!”

लंडन टाईम्सचा बातमीदार डॉ॰ रसेल सिमल्यास १८५८ त आला होता. तो लिहितो “मला आजारांत बरीच करमणूक आहे. येथें माकडेंशानरें पुष्कळ आहेत. त्यांच्याकडे पाहून कंटाळा आला म्हणजे सहल करण्यास जाणाऱ्या इंग्रज स्त्रीपुरुषांकडे पाहतों. दोघांच्याहि चेष्टा पाहण्यासारख्या असतात; आणि करमणूक सारखीच होते.” इतर कित्येकांनीं येथें चालणाऱ्या बेसुमार जुगारांचें वर्णन केलेलें आढळतें. येथें मुलकी अधिकाऱ्यांना कांहीं तरी काम असतें. पण लष्करी अधिकारी रिकामटेकडे असून फारच गोंधळ घालतात. नाच, वनभोजनें, शर्यती यांची मोठी गर्दी उडते. १८७२ सालीं अँड्र्यू विल्सन नामक ग्रंथकार लिहितो, “सिमल्याचें इतकें बदनाम झालें आहे कीं, एखादा स्टेटसेक्रेटरी हें ठाणें येथून हलवील तर फार बरें.” जागा लहान, लोक पुष्कळ जमतात. बरेचसे रिकामे असतात, आणि वर्तमानपत्रांत प्रसिद्ध करण्याला येथें सामाजिक ख्याली-खुशालीशिवाय दुसरें फारसें कांहीं नसतें. यामुळें हें बदनाम होतें हीहि गोष्ट कांहीं खोटी नाहीं. लॉर्ड लिटन यांच्या वेळीं सिमल्याच्या या अपकीर्तीचा कळस झाला होता असें म्हणतात.

रुंद व गिरनिराळ्या उपप्रवाहांनीं विस्तारलेला आहे कीं, कोठें कोठें तिला आखात व उपसमुद्र यांचें स्वरूप प्राप्त झालेलें आहे. एकंदर बंगाल्यांत तळीं व डबकीं हीं इतकीं पसरलेलीं आहेत कीं कोठें कोठें जमीन अधिक कीं पाणी अधिक असा भ्रम पडतो. पण पूर्व बंगाल्यांत नद्यांमधून प्रवास करणाराला वस्तुतः समुद्रापासून शेकडों मैल दूर असतांहि आपण समुद्रकांठावरच आहों असा भास होतो..............

नदीच्या दोनहि किनाऱ्यांवर वस्ती एकसारखी पसरलेली दिसते. याचें कारण देशावरच्या प्रमाणें शेतकऱ्याची राहणी गांवांत व शेती शेतांत असा प्रकार येथें नाहीं; तर शेतकरी आपल्या शेतांत बारमासच राहतो. ज्या तागाच्या लागवडीकरितां बंगाल प्रांत प्रसिद्ध आहे त्याचे मळे इकडे दुतर्फा लागून राहिले आहेत. हें पीक फारसें उंच नसतें. त्याची उंची पुरुष दीड पुरुष म्हणजे फार झाली. त्याला पानें किंवा फांद्या यांचा विस्तार फारसा नसतो. झाड बोरूसारखें एकदांडी सरळ वाढतें व त्याच्या अंगाला धरून एकेरी दुहेरी पानांचें वेष्टन असतें. हें तागाचें पीक कापल्यावर तें कित्येक दिवस पाण्यांत कुजेपर्यंत बुडवून ठेवावें लागतें व कुजलें म्हणजे मग काढून सोलून त्याचे भारे बांधण्यांत येतात. व हें सर्व शेतकाम नदीच्या कांठींच करावें लागत असल्यामुळें शेतकरी किनारा सोडून आंत राहूं शकत नाहीं. इकडच्या शेतकऱ्याचें दुसरें पीक म्हणजे भात—शेती. कोंकणांतील खाजणी शेतीप्रमाणें ही शेती पाणथळींत करतात. व पाणी गोडें असल्यामुळें भात चांगलें पिकतेंहि. या भात—शेतीला धोका म्हटला म्हणजे तो फक्त पूर येण्याचा; व गंगेला असे पूर मधून मधून येतातहि. पण ते जसे लवकर येतात तसे लवकर ओसरतातहि. शिवाय पूर आला म्हणजे पाण्याची उंची फार वाढते असें नाहीं. कारण आपल्या इकडील नद्यांप्रमाणें या इकडल्या नद्यांचीं पात्रें डोंगर व खडक यांनीं बंदिस्त झालेलीं नसतात. म्हणून पूर आला तरी पाणी फार दूरवर पसरतें, पण उथळच राहतें. यामुळें या पुरांना शेतकरी लोक फारशी भीक घालीत नाहीत. किंबहुना त्यांचीं घरें इतकीं पाण्यालगत बांधलेलीं असतात कीं, केव्हां होडी हें जसें त्यांचें घर तसें घरहि कित्येक वेळां होडी बनतें. मात्र ती नांगरलेली होडी इतकें म्हटलें असतां चालेल. कारण घराची रचनाच अशी असते कीं, खालीं उभे डांब उभारावयाचे, व सुमारें दोन फूट उंचीवर आडवे वांस चौफेर बांधावयाचे आणि वर व बाजूला चटईचें आच्छादन करावयाचें. असल्या घरांत हे लोक राहतात. यामुळें नदीला पूर येऊन पाणी पसरलें म्हणजे तें या घराखालून खुशाल वाहतें. आणि या वाहत्या पाण्यावर हे लोक आपला सर्व चरितार्थ चालवितात. असल्या घरांवर लोखंडी पत्रा सहसा आढळत नाहीं. व जेथें तो आढळतो तेथें सहजच असें समजावें कीं, येथें आपल्याला गंगामाई त्रास देणार नाहीं; इतका त्यांचा तिच्यावर सामान्यतः विश्वास असतो. पण प्रेमळ आईचा हात जसा एखादे वेळीं रागानें बसतो त्याप्रमाणें या विश्वासाचा गैरविश्वास होऊन शेतकऱ्याला तरंगावें लागतें. व कित्येक ठिकाणीं अशा झोंपड्या दिसल्याहि कीं, आंतील घर वाहून गेलें व उभे डांब व पत्रे येवढेच शिल्लक राहिले. पण ही सगळी परिस्थिति गिळून व पचनीं पाडून शेतकरी नदीच्या कांठावर नांदत असतो.

इकडे प्रायः आधीं उन्हाळी हवा म्हणून अंगांत कांहीं नको व त्यांतूनहि उठल्या बसल्या पाण्यांत व्यवहार म्हणून अंगावर कांहीं नको. अशी स्थिति असल्यानें शेतकऱ्यांचें नागवें दारिद्र्य आयतेंच गरजेनें भागून जातें. पण त्यांचें अंग मात्र झांकलें जात नाहीं! रोज पाण्यांतील मासे धरून खाणाऱ्या या बंगाली शेतकऱ्यांनीं जवळ जवळ स्वतः माशाचीच राहणी पत्करलेली आहे! घरें म्हणजे हीं खोपटीं व हीं चार पांच झालीं कीं त्या ठिकाणीं तो गांव संपला. यामुळें आपल्या राहणीला पाहून इतर कोणी हंसेल किंवा इतर कोणाला पाहून आपण लाजावें अशी स्थितिच येथें नाहीं. स्त्री हो वा पुरुष हो, जितके व्यवहार या झोंपडींतल्या तराफ्यावर बसून होतात तितकेच खालीं पाण्यांत होतात. कारण बहिर्दिशा, दंतधावन, स्नान हीं वगैरे काय पण भुकेकरितां मासे धरणें व धंदा म्हणून ताग–भाताची शेती करणें हीं कामेंहि बहुधा पाण्यांतच चालतात. यामुळें पाण्यांतल्यापेक्षां पाण्याबाहेरच कमी वेळ जातो असें म्हणतां येईल. झोंपड्यांच्या जागा आखून देण्याला सिटिसर्व्हे ऑफिसराचें काम नाहीं! गंगामाईच्या उदार प्रवाहांत कोणी कितीहि जागा आखून घेतली तरी कोणी विचारता नाहीं! मौज हीं कीं, या कित्येक पाणझोंपड्यांनीं कोंकणांतील अंगणाप्रमाणें आपल्या भोंवतीं अंगणहि राखून ठेवलेलें असतें. झोंपडीच्या बाहेरच्या बाजूस ओळीनें कांब उभे करून त्याला अंगणाचा आकार दिलेला असतो व बांबूच्या पिंजऱ्यांतून बाहेर पडण्याला एक फाटक ठेवलेलें असतें. अशा रीतीनें घरांत राहणें, अंगणांत वावरणें व रस्त्यावर येणें हे सर्व व्यवहार एका पाण्यांतल्या पाण्यांतच होतात असें म्हणण्यास हरकत नाहीं.

शेतीकरितां भांडेंकुंडें, अगर कणगी-मुडे, यांचें कारण नाहीं. कारण तागाच्या पिकाची सर्व मशागत पाण्यांत; व तो सोलून झाला कीं, त्यानें कलकत्त्याचा रस्ता धरलाच. तसेंच भात पिकेपर्यंत मात्र शेतांत, पिकलें कीं जमीनदाराच्या घराची वाट चालूं लागलेंच! भूक भागण्याला मासे हवेत. ते ताजेच्या ताजे केव्हांहि मिळवितां येतातच. येऊन जाऊन असेल तेथें एखादें नारळाचें झाड किंवा केळीचें झाड येवढीच काय ती त्यांची स्थायिक मिळकत व उत्पन्न. आपल्या इकडचा शेतकरी म्हटला म्हणजे त्याच्या घरीं पांच चार जनावरें असावयाचींच. पण इकडचा हा शेतकरी श्रीमंत असला तर एकाऐवजी तीन होडगीं ठेवील व त्याहून श्रीमंत झाला तर खंडी दोन खंडी माल मावेल एवढी एखादी नाव ठेवील! या छोट्या होड्या–नावांचें वर्णन करणेंच कठिण. चार फुटक्या सांधलेल्या फळ्या, चार बांबू, फळीचें लावलेलें एखादें दुसरें वल्हें, सुकाणूं नाहीं व असलीच तर एखाद दुसरी चटई! आपल्या इकडचा गांवढळ शेतकरी एखादे वेळीं रंगीबेरंगी फडका घालून चैन किंवा मिजास करतो, तशी इकडच्या जलचर शेतकऱ्याची मिजास म्हटली तर निरनिराळ्या दोन–तीन रंगांच्या फटकुरांचें शीड थोडा अनुकूल वारा सुटला व शीड वाऱ्यानें भरल्यामुळें वल्हें हलविण्याचे श्रम वांचले कीं त्याला राजासारखें सौख्यपदस्थ वाटतें. मात्र वाऱ्याचा पूर्ण फायदा मिळावा म्हणून केळीं वंपरेचें पटकूर सोडूनहि तो शीड म्हणून लावील! —केसरी १९२९ ऑक्टोबर १०

## विलायतची बातमीपत्रें

ता. १ मे—आज दोन प्रहरीं बारा वाजेपर्यंत दोन दिवसांत आम्हीं एकंदर ५५० मैल प्रवास केला. या दोन दिवसांत समुद्रांत शिडांच्या दोन होडयांशिवाय दुसरें कांहीं एक दिसलें नाहीं. वर आकाश, खालीं पाणी. समुद्र अनंत अपार खरा, पण भोंवतीं ठराविक परिघाचें वर्तुळ म्हणजे २०१२५ चौ. मैलांचें आवार पडत असल्यानें एकाद्या प्रचंड सरोवरांत आहों इतकेंच वाटतें. समुद्र अत्यंत शांत असल्यानें सरोवराची कल्पना दृढच होते. समुद्र हा प्रवाशांना लहरी बापासारखा वागवितो. तो शांत असला म्हणजे मुलांना मांडीवर वाटेल त्या रीतीनें खेळूं देतो, पण तोच रागावला म्हणजे लाटांचे तडाखे देऊन त्यांचे हालहाल करतो. लिहावयाच्या खोलींत बसलों असतां आपण चल नसून स्थिर आहों की काय असा एखादे वेळीं भास होतो. करमणुकीकरितां म्हणून समुद्राकडे पहात बसल्यास या शांततेचा कंटाळाहि येतो. खरोखर शांतताप्रिय मनुष्याच्याहि मनाचा पांग फेडण्यासारखा हा प्रवास आहे. एकच देखावा एकच सहचर मंडळ, एकच नियमित व्यवसाय! पण मला या प्रवासांत अधिक आवडणारी गोष्ट ही कीं, वाचावयास वर्तमानपत्रें नाहींत! वाटतें, बरी पीडा टळली! यामुळें चित्ताला व्यग्रता मुळींच नाहीं. मन समुद्राला व समुद्र मनाला काय गोष्टी सांगेल तेवढ्याच!

आमच्या बोटीचें नांव मॅनोरा. नांवाप्रमाणें हा एक पांच सहा मजली मनोरा आहे. जहाजाच्या कडेवर उभें राहिलें म्हणजे तर त्या प्रचंड लांकडी लोखंडी द्रोणाचें कौतुक वाटतें. त्याच्या बाजूला पहात गेलें म्हणजे ओळीनें खालील देखावे दिसतात. प्रथम फेसाळलेला प्रचंड डोह; या डोहावर लाटा उठून फुटतात, तेव्हां निळ्या मखमलीच्या रुजाम्याचा कोणी राक्षस चोळामोळा करून टाकीत आहे व त्यांतून सागरसुंदरीच्या गळ्यांतील अनेक लहान मोठ्या मोत्यांचे हार तुटून मोतीं घळघळून खालीं येत आहेत कीं काय असा अद्भुत रम्य देखावा दृष्टीस पडतो. आगबोटीच्या धारेनें तुटणाऱ्या लाटांचे तुषार क्वचित् अंगावरहि येतात; व त्यांवर तिरपे सूर्यकिरण पडले म्हणजे धावत्या इंद्रधनुष्यांची शर्यत पहावयास सांपडते. या उच्छृंखल फेसाळलेल्या डोहा पलीकडे पाहिलें म्हणजे प्रथम निळ्या स्फटिकानें बनविलेलें एक विस्तीर्ण आंगण, त्याच्या पलीकडे मंद मंद उठणाऱ्या प्रसन्न पण चंचल तरंगांची परंपरा, त्याच्या पलीकडे जवळ जवळ निश्चल, अशी काळी क्षितिजापर्यंत पसरलेली बैठक, त्या पलीकडे आकाश व पाणी यांचा क्षितिजावर झालेला संयोग किंवा मधुरमीलन, व त्याच्या पलीकडे भ्रामक मिथ्या पर्वतांची एक आंखीव रांग. या पलीकडेहि जाऊन पहावेसें डोळ्यांना वाटतें पण दिसत नाहीं म्हणून निराशेनें परतावें लागतें. समुद्राच्या पोटांत पृथ्वीसारख्याच दऱ्या आहेत. पण सागरपृष्ठाच्या समरसतेंत हा सर्व उच्च–नीच भाव नाहींसा होतो. सागराच्या पोटांत पृथ्वीपेक्षांहि अधिक विचित्र प्राणी व वनस्पति आहेत असें म्हणतात. पण एखाद्या कृपण धनिकाप्रमाणें त्यानें त्या सर्व दडवून ठेविल्या आहेत. हा दिसतांना एक मार्गी एकरूप

असा दिसतो. पण वातावरणाच्या सर्व लहरींचें उगमस्थान याच्यामध्येंच असतें हें खरं पाहणारास काय कळणार ? असो; याच्या मुठीत असून आणखी २२।२३ दिवस काढावयाचे आहेत तेव्हां त्याला इतक्यांतच बराभाईट न म्हटलेलें बरें !

जहाजावर वेळ जाण्याला समुद्राकडे पाहण्याव्यतिरिक्त उपाय म्हटला म्हणजे हिंदी मित्रमंडळींशीं संभाषण व युरोपियन सहचरांकडे कुतूहल दृष्टीनें पाहणें हा होय.... ..........हे युरोपियन लोक मात्र आपापल्यांत खूप खेळतात व करमणूक करितात. करमणुकींत थोर लहानांचें व लहान थोरांचें अनुकरण करितात. वृद्धांनीं लगोर्‍या खेळाव्या, आणि दोन वर्षांच्या मुलींनी आपल्या आकारा एवढ्या बाहुल्या हातगाडींत घालून एखाद्या पोक्त आजीबाईप्रमाणें सहल करण्यास न्याव्या याहून अधिक मनोरंजक करमणूक कोणती ?........

× × × ×

ता. २१—आज सर्व दिवसभर पोर्तुगालचा किनारा दिसत होता. रात्रीं एक दोन दीपगृहें आढळलीं. जवळपास एखादें मोठें बंदर असावें असें वाटलें; पण अंधारामुळें दिसलें नाहीं भूमध्य समुद्र सोडल्यापासून आगबोट हालण्यास सुरवात झाली. वारा-वादळ नाहीं. पण हा समुद्र स्वभावत:च उच्छृंखळ आहे. बोटींत सरळ उभें राहतांच येत नाहीं. सामानहि मधून पडतें. जेवणांच्या मेजावरची भांडीं वगैरे पडूं नयेत म्हणून लांकडी चौकटी मेजा भोंवती आणून लावल्या आहेत. भोजनगृहांतली गर्दी थोडी कमी झाली आहे. बोट इतकी हालते कीं, एका क्षणांत ४५ अंशावरचे तारे दिसतात न दिसतात तों लागलीच पायांखालच्या पाण्यांतले मासे दिसतात. बिस्केचा उपसागर याहून कठिण म्हणतात. असो. आतां प्रवास चार दिवसांवर आला ! काल सकाळीं एकदम धुकें इतकें लोटलें कीं, २५ हातावरचा पदार्थ दिसेना. बोटीचा वेग थोडा कमी करण्यांत आला, व वाफेचा कर्णा वरचेवर वाजूं लागला. धुकें पडलें म्हणजे इतर बोटीस इशारा मिळावा, एकमेकींचें अंतर कळावें, म्हणून हा कर्णा मधून मधून वाजवीत असतात.

ता. २२–२३—आज म्हणण्या सारखें कांहीं घडलें नाहीं. फक्त एक दोन वेळां मोठे व्हेल मासे आढळले. व्हेल मासा पाण्याच्या पृष्ठभागाकडे येऊं लागला म्हणजे तोंडांत पाणी घेऊन टाळूंतून वर सोडतो, त्या योगानें मोठा कारंजा उडत असतो. तो बराच दुरून दिसतो. या कारंजाचे रोखानें पाहिलें तेव्हां माशाचा निमा भाग पाण्यावर आलेला दिसला.

कालपर्यंत बोट बेसुमार हालत होती. आज हालणें कमी झालें. बे आफ बिस्केची बोट हलण्याबद्दल फार ख्याति आहे. पण आम्हांस त्यापेक्षा अटलांटिक महासागरानेंच अधिक त्राय दिला. इतर समुद्रापेक्षा येथें थोडा निराळा प्रकार आढळतो. तो असा कीं, इतरत्र लाटांची लांबी लहान असून त्या फुटतात व फेस येतो, तो क्षितिजापर्यंत दिसत असतो; व या योगानें दिसण्यांत खळबळ फार दिसते. या महासागरांत लाटांची लांबी फार असून त्या कोठेंहि फुटलेल्या आढळत नाहींत, फेस मुळींच दिसत नाहीं व बाह्य



ना. पटेल, पं. मालवीय, दि. ब. माधवराव, दे. भ. केळकर.

इ. १९१९

बळहि ऐकूं येत नाहीं, पण लांबून लाट येतां येतां समुद्राचा पृष्ठभाग इतका उंच होतो कीं, डोंगर वर उठल्यासारखा वाटतो. व त्याबरोबर जहाजावरची कड पाण्याला लागते. हें पाहून वाटतें कीं, खरोखरच समुद्राचें ऊर भरून आलें ! इतर समुद्रांच्या खळखळीस स्त्रियांच्या दुःखभराची उपमा साजली तर या महासागराच्या या भरतीस पुरुषांच्या दुःखाची उपमा साजेल !

आज सकाळीं आम्ही बे ऑफ बिस्के सोडून इंग्लिश चॅनलमध्यें प्रवेश केला असें जाहाजाच्या रोखावरून दिसूं लागलें. इंग्लिश चॅनल आल्यावरोबर इंग्रजांना घर आलेंसें सहजच वाटूं लागलें. इंग्लंडचा किनारा दिसत नाहीं, पण डाव्या हातास कांहीं मैलांवर तो जवळ आहे असें मनास वाटतें ना ! रात्रीं झोंपेंत आईचा हात मुलाच्या अंगावर नसला तरी ती शेजारीं आहे या कल्पनेनें मुलास आईची सोबत पुरी होते तसेंच हें आहे. आम्ही मात्र हौसेनें इंग्लंडास जात आहों खरें; तरी पण इंग्लंड जवळ आलें या कल्पनेपेक्षां हिंदुस्थान तितकें दूर गेलें या कल्पनेचा पगडाच मनावर अधिक बसतो ! सूर्ये आम्हांला आगबोट हेंच घर वाटत आहे खरें.

× × × ×

...पार्लमेंटचा हा मद्दड घोडा हिंदुस्थानांतील दंगेधोपे वगैरेंची चर्चा असली म्हणजे मात्र कान टवकारतो. सरहद्दीवरील लढाईच्या बातमीच्या औषधाच्या एका घोटानें पार्लमेंटला दुष्काळी भूक लागते. मग सभासद सभागृहांत भेजवानीला हजर ! जॉइल्स साहेबांना टिळकांनीं एकदां असें म्हटलें होतें कीं, हिंदुस्थानच्या कारभारासंबंधानें इंग्लंड निरंतर झोंपी गेलेला असतो, व तो दचकून खडबडून जागा होण्यासारखें कांहीं घडतें तेव्हांच त्याची झोंप जाते, साध्या हाकेनें तो जागा होत नाहीं. याचा अर्थ उघड व सरळ आहे. या वाक्याचा अर्थ विपरीत घेऊन त्यांनीं तेवढ्या आधारावर त्यांच्याविरुद्ध साक्ष दिली. वरील वाक्याचा अर्थ लोकांनीं दंगे करावे असा होत नाहीं; पण दंगे झाले म्हणजे त्याचा परिणाम असा होत असतो ही गोष्ट कोणा प्रामाणिक इंग्रजाला नाकबूल करितां येईल ? ग्लॅडस्टन साहेब कांहीं आयर्लंडांत दंगेधोप्यांना उत्तेजन देणारे नव्हते, पण एका तुरुंगाला सुरुंगवत्ती लावून आयरिश बंडखोरांनीं अत्याचार केला तेव्हां ते म्हणाले कीं, या आवाजानें आयर्लंडची लोकस्थिति इंग्लंडला जितकी कळून आली तितकी इतर कोणत्याहि जोरडीनें कळून आली नाहीं.

एका अर्थानें सर्व हिंदी राष्ट्राचे डोळे राजकीय सुधारणांकडे लागलेले आहेतच. पण त्यांतल्या त्यांत मुसलमानांचें लक्ष याच वेळीं दुसऱ्या एका गोष्टीकडे इतकें वेधून राहिलें आहे कीं, त्यापुढें राजकीय सुधारणा ही बाब त्यांना तूर्त क्षुल्लक वाटते. जर्मनी—आस्ट्रिया यांची वाट लागली कीं, पारीस येथील 'बडी चौकडी' टर्कीला पुढें आणणार. आजच्या रोंकावरून ही चौकडी मुसलमानी साम्राज्याची शकलें करून सुलतान व मुसलमानी खलिफत यांची फूट पाडणार अशी धास्ती वाटूं लागली आहे. सर्व जगांतील मुसलमानांना ही गोष्ट अप्रिय असून त्यांचा राग अतिशय भडकला आहे. जे हिंदी

मुसलमान पूर्वी इंग्रज सरकारला केवळ मायबाप मानीत होते तेच आतां त्यांच्यावर एवढाले डोळे करूं लागले आहेत. राजकीय सुधारणांच्या बाबतींत चळवळ करण्याला इतर शिष्टमंडळें इतकी आलीं असतां मुसलमानातर्फे फक्त एकच गृहस्थ इंग्लंडला आले आहेत; पण त्यांचाहि येथें मुख्य उद्योग तहाच्या वाटाघाटींत टर्कीचें काय होणार या संबंधाचा आहे ही गोष्ट ध्यानांत ठेवली पाहिजे. त्यांही कॉंग्रेसप्रमाणें इंग्रज लोकांच्या पाठीस पडून काम न करितां स्वतःच्या नांवावर काम चालविलें आहे. ना. आगाखान वगैरे मंडळी राजकीय सुधारणांच्या बाबतींत फारसें बोलत नाहींत, पण हिंदुस्थानपेक्षां टर्कीच्या सुलतानाची चिंता त्यांना अधिक असून ते या दुसऱ्या विषयाची चर्चा उघड करितात. गेल्या सोमवारीं लंडन येथील सेंट्रल मॉस्लेज असोसिएशनच्या वतीनें सेक्रेटरी प्रि. इस्पहानी यांनीं आम्हा सर्व शिष्टमंडळांना चहास बोलाविलें होतें. त्या वेळीं मुसल्मान गृहस्थांनीं याच विषयावर भाषणें केलीं. येत्या शनिवारीं बाबू सुरेंद्रनाथ बानर्जी यांच्या अध्यक्षतेखालीं मि. याकूब हसन यांचें या विषयावर 'एसेक्स' हॉल-मध्यें भाषण होणार आहे. मि. मॉंटेग्यु हे मुसलमानांचा पक्ष घेऊन प्रधान मंडळांत भांडत असतात असें म्हणतात. पण याचा मोबदला म्हणून मुसलमानांकडून राजकीय सुधारणांच्या वादांत तटस्थ व अल्प संतुष्ट राहण्याचें वचन मागून न घेवोत म्हणजे झालें.

—केसरी १९१९ जुलै २२

× × × ×

"मॉंटेग्यु चेम्सफर्ड योजना मान्य आहे. तरी पण त्यांत न दिलेली अशी वरिष्ठ सरकारच्या कारभारांत आम्हाला थोडीशी जबाबदारी हवी; स्वतः मुंबई सरकारनें जमीन बाबीसुद्धां बहुतेक खाती तोडून देण्याची शिफारस केली असतां फिथॅम-कमिटीनें त्यांतहि कृपणपणा केला. सर्व जमाखर्चावर कायदे कौन्सिलाची सत्ता चालली पाहिजे, वरिष्ठ सरकारांत थोडीशी जबाबदारी न मिळेल तर लोक नाखुष होतील, चांगली माणसें वरच्या कौन्सिलांत जाणार नाहींत, देशांत अशी भयंकर चळवळ होईल कीं कल्पना करवणार नाहीं व ती पाहून सरकार थक्क होईल ( There will be an agitation that will stagger imagination). मी क्रू कमिटीपुढें साक्ष दिली त्यांतील बऱ्याच सूचना कमिटीनें मान्य केल्या आहेत" वगैरे गोष्टी समर्थांनी सांगितल्या. सरतपासणींत व उलट तपासणींत समर्थ बरेच वाहवत जात; तेव्हां अध्यक्षांना 'मुद्यावर असणाऱ्या' या साक्षीदारास मुद्यावर आणून आतां पुरें करा असें अनेक वेळां सांगावें लागलें.

समर्थांचा आविर्भाव पाहून कमिटीच्या कांहीं सभासदांस आश्चर्य वाटलें असावेंसें दिसलें. उलटतपासणींत मि. बेनेट त्यांना म्हणाले, "समर्थ, तुम्ही तर आपलें शब्द तोलून मापून बोलणारे म्हणवितां, मग जगाला थक्क करून टाकणाऱ्या चळवळीबद्दल शब्द तोंडांतून काढलेत ते जरा बेसुमार किंवा फाजीलच ( Extravagant ) नाहींत काय ! पण समर्थ आपले शब्द मागें घेणार नव्हत. ते म्हणाले, " ते शब्द मी जरूर पुरुषच उच्चारले आहेत. रौलेट ॲक्टाविषयीं झालेल्या चळवळीवरून सरकारनें, बोध घ्यावा

असें माझें म्हणणें आहे." पण या उत्तरानें कमिटीचें समाधान झालेलें दिसलें नाहीं. "मॉ.-चे.-योजना जर समाधानकारक आहे, तर मग तींत मुद्दाम न दिलेला वरिष्ठ राज्यकारभारांतला अधिकार गाजवायला कां मागतां? बरें, लगेच ती कांहीं आमची आग्रहाची मागणी नाहीं, त्याशिवायहि योजना आम्हांस मान्य आहे असेंहि म्हणतां, आणि मग जगाला धक्क करून सोडणाऱ्या चळवळीचा धाक कां घालतां?" या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर कमिटीला त्यांच्या कडून मिळालें नाहीं. लॉर्ड सिंह यांनी त्यांचें उत्तर सुधारून घेण्याचा प्रयत्न केला. वरिष्ठसरकारांत अधिकार मिळाल्यास आधींच मान्य असणारी योजना अधिक मान्य होईल इतकेंच ना तुमचें म्हणणें? अशा सूचक प्रश्न त्यांनी समर्थास विचारला, पण वकील हा अडाण्याला सुधारून घेऊं शकतो, वकीलाची चूक सुधारूं शकत नाहीं या गोष्टीचा अनुभव या ठिकाणीं आला. लॉर्ड सिडनहॅम यांनी तर समर्थ यांस एक फारच नाजुक प्रश्न विचारला. ते म्हणाले, "तुमची नेमस्तपणाची मागणी अमान्य झाल्यास प्रचंड चळवळ होण्याचा धाक तुम्ही घालतां, पण या जगाला थक्क करून सोडणाऱ्या चळवळींत तुम्ही स्वतः कांहीं भाग घेणार कीं नाहीं?" समर्थांना आड व विहीर असें झालें. अशा भयंकर चळवळींत आपण पडणार म्हणावें तर जहालांत आणि आपणांत फरक काय राहिला? बरें पडणार नाहीं म्हणावें तर परस्पर तिऱ्हाइतांनीं चळवळ करावी आणि आपण फक्त तिचा हवाला द्यावा यांत पुरुषार्थ कोणता? तेव्हां समर्थ क्षणभर घोटाळून व हंसून म्हणाले "हो-हो-हो, तशी वेळ येऊन ठेपली तर—तसा प्रसंगच आला तर—तर पाहतां येईल, मींहि चळवळींत कदाचित् सामील होईन!" तेव्हां सर्वजण हंसूं लागले. तात्पर्य, जगाला थक्क करून सोडणाऱ्या चळवळीच्या धाकाचा अशा रीतीनें हास्यरसांत शेवट झाला! —केसरी १९१९ सप्टेंबर ९

... आम्हां नेमस्तांचीं भाषणें झाल्यावर एक दोन स्थानिक वक्त्यांचीं भाषणें झालीं, पण आम्हांस अधिक थांबण्यास वेळ नव्हता. मध्यरात्रीच्या आंत परत लंडनला पोंचणें जरूर होतें त्याप्रमाणें आम्ही घाईनें आलों. कारण मध्यरात्रीपासून आगगाड्यांवरील प्रचंड संपास सुरवात व्हावयाची होती व त्याप्रमाणें ती झालीहि!

नाटकांत ट्रॅन्स्फर सीन करतात त्याप्रमाणें हा संपाचा घाला अचानक पडला. शुक्रवारीं सकाळीं संप होणार अशी बातमी पत्रांतून वाचली व रात्रीं संप सुरू झाला. त्याच्याहि आधीं एक दिवस गुप्त खलबतें चालू होतीं म्हणतात. पण सरकार व रेल्वेचे लोक यांच्या दरम्यानच्या भांडणाचा कडेलोट, निर्वाणीचा खलिता व युद्धाचा पुकारा ही सर्व चोवीस तासांत घडून आलीं! रात्रीं दहा व बारा यांच्या दरम्यान रेल्वेचे लोक आपल्या कामांत शिथिलता करूं लागले व बाराच्या सुमारास सर्व इंग्लंड व स्कॉटलंडभर रेल्वेकामगार काम टाकून घरोघर चालते झाले. स्टेशनास कुलुपें पडलीं. शनिवारीं सकाळीं ट्रॅम व बस सुरू होतां त्यांवरच कामधंद्यास जाणाऱ्या सर्व लोकांची धाड पडली. शेंकडों लोकांच्या रांगा या वाहनांची वाट पहात तास-तास उभ्या होत्या. रात्रीच्या सुमारास ही गर्दी दोडी कमी झाली; कारण अनेकीं शहरांच्या कामाशिवाय बाहेर पडून

मैल-मैल विनाकारण चालत येण्याचें साहस कोण करणार ? शनिवार व रविवार दोनहि दिवस जवळ जवळ बिनकामाचे असल्यामुळें कसें तरी भागलें. पण फिरून सोमवारपासून दंगल उडाली. विजेच्या चमकेप्रमाणें झालेला हा संप विजेच्या चमकेप्रमाणें संपेल ही आशा नष्ट होतांच सरकार व लोक आपापली सोय करण्याच्या मार्गास लागले. त्यांतल्या त्यांत सरकारवर वाहनांची सोय करून देण्याची जबाबदारी अधिक, यामुळें सरकारनें जाहीरनामा काढून लोकांस धीर दिला व आपलीं सर्व साधनें सज्ज केलीं.

खाजगी लोकांनींहि आपल्या साधनांची शिकस्त केली; मात्र ती संप मोडण्याच्या हेतूनें नव्हे, तर स्वतःच्या सोईकरितां. लोकांस खरोखर एकीकडे आड व एकीकडे विहीर असें झालें. मनांतून संपवाल्यांशीं सहानुभूति पण संप सिद्धीस जावा म्हणून स्वतःची गैरसोय कोण किती सोसणार ? बरें, संपवाल्यांचीहि खरी इच्छा लोकांची गैरसोय व्हावी ही नसून आपली मजुरी वाढावी इतकीच आहे. तात्पर्य दोघांचा कटाक्ष एकमेकांवर नसून सरकारवरच आहे. सरकार व रेल्वे-नोकर यांची जंगी कुस्ती पाहण्याची लोकांस हौस आहे. पण पेहेलवानांची कुस्ती पाहतांना आपल्या अंगावर त्यांचीं धुडें कोसळूं नयेत किंवा त्यांनी उडवलेली माती पडूं नये याविषयीं प्रेक्षक जितकी खबरदारी घेतात तितकी खबरदारी येथील लोक घेत आहेत इतकेंच काय ते. असो. लोकांनीं आपल्या केलेल्या सोयी तजविजींमुळें शहरांत खूप गडबड उडून राहिली असून नवीन देखावे दिसूं लागले. रस्ते मोटारगाडयांनीं फुलून गेले. श्रीमंतांच्या मोटारींतून पूर्वी एखादुसरा मनुष्य तणावून बसलेला दिसावयाचा तेथें स्त्रीपुरुषांची खेंच झाली. ठेवणींतल्या सर्व शोभिवंत चार-चाकी गाडया व उमदे घोडे बाहेर निघाले असून दोहोंचाहि बैठा शीण लांब मजलांनीं निघून जाऊं लागला. सर्व हरप्रकारच्या वाहनांतून निर्जीव मालाच्या जोडीला सजीव मालहि शीग लागेपर्यंत भरला गेला. बाहेरून लांबून येणाऱ्या भाजीपाल्याच्या गाडयांतून उत्तम उंची पोपाख केलेले लोकहि बागवानाच्या नोकरासारखे उंच आरूढ झालेले असे रोज सकाळीं गांवांत येतांना पाहून शहरचे लोक त्यांच्याकडे व ते लोकांकडे पाहून हंसण्याची रेलमेल उडाली. भाडयाच्या मोटारी तर भिंगऱ्यासारख्या फिरत होत्या. साध्या बायसिकली लंडनच्या रस्त्यांनी पूर्वी क्वचित् दिसत, पण आतां त्यांची अखंड रांग लागून राहिली, येवढेंच नव्हे तर एकानें सायकल चालवावी व त्याच्या मागें दोघांतिघांनीं एकमेकांच्या आंगाखांद्यावर बसावें असे सर्कशीचे खेळ फुकट पहावयास सांपडूं लागले ! पायाला पाय फुटल्याप्रमाणें हजारों स्त्रीपुरुष तुडतुडु चालतांना दिसत. पायांनीं कोणीं किती मजल मारली याविषयीं चढाओढ सुरू झाली. बाहेर प्रांतांत कित्येक लोकांनीं जरूरीच्या कामाकरितां पन्नास-पन्नास मैल प्रवास केल्याच्या बातम्या प्रसिद्ध झाल्या आहेत. अखेर गाडयांच्या गाडयांतून बसण्यापर्यंत पाळी आली. एका विनोदी पत्रांत चितारलेल्या गाडवाला बाबा फुटली असून तें म्हणतें " बाबांनो पाथरूं नका. मी गाडय जिवंत असेतोंपर्यंत तुम्हाला काळजी नको !" बायबलांतल्या एका शहाण्या ' गाडवाला ' अशीच वाचा फुटली होती।

प्रत्यक्षापेक्षा अप्रत्यक्ष हेतुच या संपांत मुख्य व महत्त्वाचे आहेत. पार्लमेंटांत

आपलें चालत नाहीं म्हणून सरकारास वठणीला आणण्याचा भोपट मार्ग म्हणून मजूर पक्षानें त्यावर भिस्त ठेविली आहे. संपाचा हेतु बराचसा राजकीय आहे असें जाणून सरकार–पक्षाचीं वर्तमानपत्रें संपवाल्यांना जहाल, अराजक, अत्याचारी, क्रांतिकारक, बोलशेविक असलीं शेलकीं विशेषणें लावीत आहेत. सुदैवानें जर्मनी या वेळीं आपल्या पराभवामुळें बचावला. नाहीं तर इंग्लंडांत पैसा पेरून त्याच्या प्रभावानें संप घडवून आणल्याचा आरोप त्याच्यावरहि आला असता !

मजूरपक्षाची मंडळी खूप आहेत; अजून डगमगली नाहींत. संपाच्याच रात्रीं व दुसऱ्या रात्रीं त्यांचा एक बडा नाच होवून येथील एका समागृहामध्यें झाला. हा आधींपासून॰ चा बेत किंवा काकतालीयन्याय कळत नाहीं. पण नाचणाऱ्या मंडळीला संपामुळें अधिक स्फुरण आलें होतें खास. या नाचाच्या प्रसंगीं पुढाऱ्यांचीं भाषणें व्हावयाचीं होती. ...

...आम्ही कांहीं मंडळी हीं भाषणें ऐकावयास गेलों होतों; पण भाषणें ऐकण्याऐवजीं नाच मात्र पहावयास सांपडला. एका अर्थी त्या भाषणांपेक्षां त्या नाचामध्येंच मजूरपक्षाच्या स्त्रीपुरुषांचें खरें मनोगत अधिक व्यक्त होत होतें. कोण तो त्यांचा उल्हास ! व या उल्हासा॰ चें कारण काय तर राजकीय उत्कर्षाची जाणिव ! सुमारें एक हजार स्त्रीपुरुष बँडच्या सुरांत सुसता धुडगूस घालीत होते. या प्रसंगाचें–म्हणजे येथील गर्दी, स्त्रीपुरुषसंमर्द, न दमतां नाचण्याची हौस, हास्यविनोद यांचें–वर्णन देणें कठीण आहे. थोडीशी कल्पना हवी तर एखाद्या संस्थानिकाच्या लग्नाच्या पहिल्या वर्षी राजवाड्यांत झालेल्या महालक्ष्मीच्या समारंभाची कल्पना करावी ! महालक्ष्मीच्या नाचांत दोघीचौघींच्याच अंगांत फार तर येतें. या नाचांत सुमारें पांचशें स्त्रियांच्या अंगांत वारें भरलें होतें असें वाटलें !...आलबर्ट हॉलनंतर संपवाल्यांची दुसरी प्रचंड सभा सोमवारीं टॉवरहिलवर झाली. टॉवरहिलची टेंकडी व मैदान लंडन–टॉवरला लागून आहे. टॉवर हा सर्वांत जुनापुराणा किल्ला पुष्कळ वर्षेपर्यंत तुरुंगासारखा वापरला जात असे. या किल्ल्यांत ठेवलेल्या राजकीय कैद्यांचा जाहीर शिरच्छेद करण्याची जागा म्हणजे टॉवरहिल. या दृष्टीनें राजकीय सत्तेला तुच्छ लेखणाऱ्या नव्या जनतेची जाहीर सभा येथें भरावी हें योग्यच होतें. सभेस सुमारें पन्नास हजार तरी लोक असावे. अनेक व्यासपीठांवरून भाषणें होत होतीं.

—केसरी ४।११।१९१९

## माझा सरहद्दीवरील दौरा

उपसंहारः—...आम्ही सरहद्दीच्या मुलखांतून सुमारें चारपांचशें मैलांचा प्रवास केला. या टापूंत सुलेमान पर्वताच्या पायथ्याच्या टेकड्याच बहुधा आहेत. मुख्य पर्वताचीं शिखरें बारमास बर्फाच्छादित असतात व त्याचा नमुना आम्हांला एक दोन ठिकाणीं पहा॰ वयास सांपडला. या मार्गांत सर्वांत उंच ठिकाण १४००० फूट आहे. त्याला तख्त–इ–सुलेमान म्हणतात. सुलेमान म्हणजे सॉलोमन. ज्यू लोकांचा हा राजा पूर्वी इकडे येऊन येथें हिंदुस्थानांतील एका कुमारिकेशीं विवाह केला. आपल्या गालिचाच्या विमानांत

वसून तो परत स्वदेशी जात असतांना, या हिंदी कन्यकेला आपल्या मलुखाचें शेवटचें दर्शन घ्यावेंसें वाटलें. म्हणून तिच्या विनंतीवरून सालोमन यानें आपलें गालिचाचें विमान या ठिकाणीं डोंगरमाथ्यावर थांबविलें. पण मग येथून तें हलेंचना अशी दंतकथा आहे. तिचा बोध इतकाच कीं, अफगाणिस्तानच्या व त्याच्याहि पलीकडील मुलखांतील येरझारा या आसपासच्या पर्वतावरून हिंदुस्थानांत पूर्वी होत असे. आमच्या दौऱ्याच्या मुलुखांत सिंधु, जंडोला, टोची, खुरम्, काबूल व स्वात इतक्या नद्यांचा प्रवाह व खोरीं पहावयास सांपडली. या सर्वांत स्वात नदीचें खोरें फार प्रेक्षणीय आहे. या मुलुखांतील लोकांना पठाण हें जरी नांव सर्वसामान्य आहे तरी त्यांच्या मध्यें पुष्कळ जाती आहेत. खाली डेराइस्माईलखानच्या बाजूला मासूद, वर वाझेरी, त्याच्याहिवर आफ्रिडी, त्याच्या पलीकडे मोहमंड असें या लोकांचें मुख्य वर्गीकरण असून या प्रत्येक वर्गांत पोटभेद आहेत. व त्यांना स्थलपरत्वें नांवें मिळालीं आहेत. उदाहरणार्थ, शेराणी, घाविंडा, उस्तराण, खेरखेल, झाकाखेल, बहादूरखेल, युसफजाई वगैरे. अफगाणिस्थान तर पठाणमयच आहे म्हणा. पण या सरहद्दीच्या मुलुखाअलीकडेहि पंजाबच्या पश्चिमेकडच्या व उत्तरेकडच्या जिल्ह्यांतूनहि पठाण लोकांची बरीच वस्ति आहे. यामुळें नकाशा काढतांना रंग कसाहि दिला किंवा सरहद्दीच्या रेषा कशाहि मारलेल्या आढळल्या तरी, खालपासून वरपर्यंत एकच धर्म, एकच जात व एकाच भावनेचे लोक एकला एक लागून पसरलेले आहेत. यामुळें रस्त्याच्या एका टोंकाच्या इमारतीला आग लागली असतां वाऱ्यानें ती जशी दुसऱ्या टोंकापर्यंत सहज पसरते, त्याप्रमाणें धर्मवेडानें थोडी कुठें चलबिचल झाली असतां ती या पठाणी मुलुखांत दक्षिणोत्तर पूर्वपश्चिम अशा हजारों मैलांच्या प्रांतावर हा हा म्हणतां पसरते. जसा कांहीं रानांतील वणवाच म्हणाना. घाटांची नाकेबंदी करण्याचा उद्योग इंग्रजांनीं आरंभिला तो पठाण लोकांना आवडत नाहीं. पण तो त्यांच्या हातून थांबविला जाऊं शकत नाहीं. तथापि त्यामुळें त्यांचें कांहीं अडलेलें नाहीं. शिवाय मनांतून ते या नाकेबंदीला हंसतात. कारण चोरानें घरांत येऊन मग दरवाजा लावून घेण्याचा हास्यास्पद खटाटोप करावा तसा इंग्रजांचा हा प्रयत्न त्यांना वाटतो. अफगाणिस्थान, पठाणिस्थान, ( हें नांव चालू नाहीं, पण तें मुद्दाम या सरहद्दीच्या मुलुखाला मी देत आहें ) व पंजाब या तिन्ही मुलुखांतील पठाणांचा अनिरुद्ध संचारहि इंग्रजांना थांबवितां येत नाहीं. किंबहुना कलकत्ता, मुंबई येथपर्यंत पठाण लोकांचा प्रवेश व सुळसुळाट कसा झाला आहे, त्याच्यापासून लोकांना उपद्रव कसा होतो व सरकारला तो कसा थांबवितां येत नाहीं, या गोष्टींची माहिती वाचकांना आहेच.

तथापि इंग्रजांनीं या बाबतींत आशा सोडलेली नाहीं. सिंधु नदी व काबूलची सरहद्द यांमधील लांब चिंचोळ्या टापूंतील पठाणांना आज नाहीं उद्यां, पण केव्हां तरी आपण आपले प्रजाजन बनवूं अशी इंग्रजांना उमेद आहे. तिला अनुसरून त्यांचे रोज एकेक पाऊल पुढें पडत आहे. डेरा इस्माइलखान, बन्नू, कोहाट, पेशावर, मरदान, हजारा येथपर्यंत बरेच स्थिरस्थावर झालेलें असून या जिल्ह्यांना Settled म्हणजे

सुस्थित जिल्हे असें म्हणतात. याचे पश्चिमोत्तर भागांना Unsettled असुस्थित असें म्हणतात. पण असुस्थितपणा म्हणजे स्वातंत्र्य असा अर्थांश घेतला असतां, तोच शब्द चांगल्या अर्थीहि समजतां येईल. आणि खरोखरच या लहानशा टापूचें दर्शन म्हणजे एखाद्या जिवंत स्वतंत्र राष्ट्राचें दर्शन होय! काबूलच्या अमीराला यांना आपल्या राज्यांत समाविष्ट करितां आलें नाहीं व इंग्रजांच्या हातूनहि ती गोष्ट अद्याप घडली नाहीं. यामुळें या पठाणीस्थानांत राजा कोणीच नसून राज्य आहे, संपन्नता नसून स्वातंत्र्य आहे, अधिकार नसून कदर आहे, अशी स्थिति पहावयास सांपडते. हे पठाण लोक हजारों वर्षांपूर्वी होते तसेच अजूनहि आहेत. त्यांची बात किंवा जमात हेंच त्यांचें राज्य किंवा राष्ट्र. पूर्वपरंपरा हाच त्यांचा कायदा, जिरगा किंवा पंचायत हेंच त्यांचें न्यायकोर्ट. हातांतील बंदूक हेच त्यांचे पोलीस. आणि जमाती-जमातींत असेल त्याप्रमाणें स्नेहसंबंध किंवा वैर हेंच त्यांचें आंतरराष्ट्रीय राजकारण. आम्ही या बाजूला फिरत होतों त्या चारपांच दिवसांत असें आढळून आलें कीं, सुस्थित जिल्ह्याच्या हद्दीच्या बाहेर पाऊल टाकलें कीं जो म्हणून पठाण भेटेल तो हटकून सशस्त्र असावयाचा. आपण जशी हातांत काठी घेतों तशी त्यांची बंदूक. याचा अर्थ तें आत्मसंरक्षणाचें जसें साधन तशीच ती चैनीची किंवा मिजासखोरीचीहि खूण समजावी. १६-१८ वर्षांच्या मुलाच्या हातांतहि बंदूक. या चार दिवसांत चालत्या बोलत्या माणसांच्या खांद्यावर जितक्या बंदुका आम्हीं पाहिल्या तितक्या साऱ्या जन्मात मिळून आम्हांला पहावयास सांपडल्या नाहींत. यांत अतिशयोक्तीचें एक अक्षरहि नाहीं. मोलमजुरी करण्याला आलेल्या पठाणांच्या हातींहि क्वचित् बंदुका आढळल्या. याचें कारण त्यांचा शिकारी पेशा अद्यापि जारी आहे. मोलधंदा करून घरीं जातांना सहज एखादा पक्षी किंवा ससा आढळला तर दुसऱ्या दिवशींच्या न्याहारीला तितकीच मदत. ज्याची स्वतःची बंदूक नाहीं त्याचें लग्नहि नाहीं. याचें कारण असें कीं, लग्न करावयाचें तर बायकोची अब्रू संभाळण्याची जबाबदारी आली व ती स्वतःची बंदूक असल्याशिवाय पार पडणें शक्य नाहीं. या पठाणिस्थानांतील दूरच्या भागांत राहो, परंतु सुस्थित जिल्ह्यांच्या दरम्यान प्रविष्ट होणाऱ्या भागांतहि इंग्रजांचा अंमल नाहीं. यामुळें हत्याराचा कायदाच नाहीं. 'या मुलुखांपासून इतका उपद्रव होतो तरी त्यांना हत्याराचा कायदा कां लावीत नाहीं?' असा प्रश्न आम्हांला सहज सुचला, पण तो विचारणें हें अधमपणाचेंच वाटेल म्हणून कोणीं विचारला नाहीं. आम्ही इकडे हत्यारें या म्हणतों आणि या स्वतंत्र लोकांची आहेत तीं काय म्हणून काढून घ्यावयाचीं? हत्यारांचा कायदा राहोच पण इंग्रजी अमलांतील समन्स किंवा हुकूमनामाहि तिकडे लागत नाहीं. इकडला गुन्हेगार पाऊल टाकून पठाणिस्थानांत गेला म्हणजे तो सुरक्षित झाला! मग गुन्ह्याचा विशेष प्रकार पाहून अगर न्यायबुद्धि प्रगट होऊन शेजारच्या मुलुखांतील पठाणांनी गुन्हेगार धरून स्वाधीन केला तर गोष्ट निराळी! या लोकांना इतक्या बंदुका मिळतात कशा हा प्रश्न सहजच सुचतो. पण त्याचें एक उत्तर पूर्वी खैबरघाटांतील बंदुकांच्या कारखान्याच्या वर्णनानें मी दिलेंच आहे. पण बंदुकीचा खरा पुर-

यंदा वरून अफगाणिस्थानांतून व काबूल इराणच्या आखातांतून होतो. आणि हा पुरवठा बंद करण्याचा घाट इंग्रजांनी कांहीं वर्षांपूर्वी घातला, त्यामुळें पठाणिस्थानांत बंद झालें म्हणतात. अशा लोकांना गुन्हेगारीचा विधिनिषेध फारसा नसावा यांत आश्चर्य नाहीं. शेती किंवा स्थिर उत्पन्न फारच कमी यामुळें ऋतुमानाप्रमाणें स्थलांतर करून किंवा लूटमार करून यांची उपजीविका चालते. या मुलुखांत एक राजा नसल्यानें इंग्रजांना पठाणाच्या प्रत्येक जातीशीं वेगवेगळा तह करावा लागलेला आहे. पण पठाणिस्थानचें हें स्वातंत्र्य पांच पंचवीस वर्षांनंतर टिकेल असें मात्र वाटत नाहीं !

इंग्रजी राज्यांत सुधारणा म्हणजे स्वातंत्र्यनाश म्हणजे अधोगति हें समीकरण पुष्कळ ठिकाणीं अनुभवाला येतें तसें हें पठाणिस्थानांतहि येऊं लागलें आहे. पठाण लोक स्वातंत्र्याचा उपयोग ज्या मार्गांनीं करीत त्यांतील कित्येक आक्षेपार्ह व निंद्य होत यांत शंका नाहीं. पण तें स्वातंत्र्य जाऊन त्यांची सुधारणा होऊं लागल्यानें जी स्थिति निर्माण होत आहे तीहि कांहीं चांगलीशी नाहीं. पठाण लोकांच्या मिळकतीचे अव्वादास्वद मार्ग बंद केल्यामुळें त्यांचा चरितार्थ चालण्यासारखें कांहीं साधन त्यांना देणें हें इंग्रजांचें कामच आहे. व सरहद्दीच्या मुलुखांतून बांधलेले कालवे, रस्ते, पूल, इमारती इत्यादींच्या कामावर मजूर म्हणून, किंवा कंत्राटदार म्हणून, किंवा रस्त्याची रखवाली करणारे खासेदार म्हणून, किंवा अंतःशांतता ठेवणारे पोलीस म्हणून, किंवा पठाण लोकांच्या टोळीचे नाईक मुकादम म्हणून त्यांना जिकडून जितके अधिक पैसे देतां येतील तितके देऊन त्यांना वश करण्याचे इंग्रजांचे प्रयत्न एकसारखे सुरू आहेत. आणि हे पैसे देण्यांत इतका सढळ हात असतो कीं, त्याला लांचलुचपत हें नांवहि शोभेल. पण कांहीं अधिकारी ही गोष्ट प्रांजलपणें कबूल करीत असले तरी कांहीं ती कबूल न करितां इतर रीतींनीं त्याचें समर्थन करूं पाहतात असें आम्हांला आढळलें. पठाणिस्थानांत एक राजा तर नाहींच, पण निरनिराळ्या जातींचे वंशपरंपरागत हाडवैर असतें. यामुळें जातीजातींत नेहमीं युद्ध माजतें व अंतःकलहांत परक्याची मदत घेण्याचा मोह कोणालाहि सहज पटतो तसेंच पठाणांचेंहि होत आहे.

तें कसेंहि असो. शांततेच्या मार्गाला लागून सुधारलेल्या पठाणांचें जें वर्णन ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं केलें आहे तें वाचलें म्हणजे स्वातंत्र्याच्या स्वातंत्र्य जाऊन बहुती या लोकांची अधोगति होत आहे हें पाहून वाईट वाटल्याशिवाय रहात नाहीं. एक अधिकारी लिहितोः—

"The Pathan of the settled districts has undergone a modification, natural consequence of the greater degree of Civilisation and still further mixture of descent. He is inclined in youth to substitute for the rifle, cartridge, bullet and dagger, of which British people deprive him, a gaudy waist-coat, embroidered shoes, gambling and other expensive

luxuries, while later in life he is excessively prone to litigation."

उलटपक्षी स्वातंत्र्याचा कांहीं अंशीं दुरुपयोग करणाऱ्या रानटी पठाणांचें त्यांनींच दिलेलें हें वर्णन पाहाः—

"This man (Pathan) may be a swash-buckling braggart, he may be cruel, treacherous, fanatical; he may have other vices, but he bends to none save to him who can uphold his right to be obeyed. To set against his vices, the Pathan is brave, sober-religious according to his lights, and on the whole clean living. He has a ready sense of humour and great traditions of hospitalily. He is a lover of sport and athletic out-door games, and when his self-respect and esteem have been won, he is capable of great devotion. Such is the elemental Pathan.

असो. पठाणिस्थानांतील पठाणांचें पुढें काय व्हावयाचें हा प्रश्न भवितव्यतेवर सोपवून अखेरचे दोन शब्द लिहितों. अफगाणिस्थान हा मुलूख आम्हांला परकी वाटण्यासारखी आज स्थिति आहे यांत शंका नाहीं. या मुलुखांतील लोकांच्या धर्मांतरामुळें व गतकालीन इतिहासामुळें तशी गोष्ट होऊन राहिली आहे. तथापि इतर दृष्टीनें पाहतां, हा मुलुखहि आम्हांला आमचा आहे असें वाटावेणारीं कांहीं कारणें आहेत. ज्या वाटेनें ज्या मुलखांत पठाण वगैरे आले त्याच वाटेनें त्याच मुलुखांत आर्यांचे पूर्वज येऊन त्यांनी वस्ती केली. व धर्मांतर केलेल्या या पठाणांत आपले जातभाई जुने आर्य-वंशोत्पन्न किती तरी असतील याची सूक्ष्म कल्पना केल्यास मौज वाटते. किंबहुना भारतकालीन योध्यांचीं व वीरांचीं वर्णनें वाचलीं म्हणजे त्यांची आठवण करून देण्याला मध्य व दक्षिण प्रांतांतील हिंदु मनुष्यापेक्षां, ह्या उत्तरेकडील मुलुखांतील पंजाबी व पठाण हेच अधिक उपयोगी पडतील. या मुलुखांतील जुनीं देवळें मुसलमानांनीं जमीनदोस्त केलीं आहेत. तथापि या मुलखांत हिंदु व बौद्ध धर्माच्या आठवणी करून देणाऱ्या खुणा अगणित आहेत. पेशावरांतील गोर खत्रि नांवाची वास्तु जी पूर्वी मुसलमानांच्या व त्या-नंतर शिखांच्या ताब्यांत होती तें हिंदु लोकांच्या यात्रेचें पवित्र स्थान होतें असें १६ व्या शतकांत बाबर यानें स्वतः लिहून ठेविलेलें आहे. या मुलुखाला गांधार देश ही संज्ञा होती. पुष्कलावतीसारखीं नगरें येथें होतीं. पोरस राजाची राजधानी याच मुलखांत होती. बुद्धधर्मीयांनी बांधलेले स्तूप खैबर घाटांत प्रत्यक्ष दिसले. तख्त-ई-बोही म्हणून मर्दानजवळ एक डोंगरी ठिकाण आहे तेथें तर बुद्धाच्या प्रतिमेचें पेवच होतें असें म्हणतात. शहाबाजगढी हें जें ठिकाण होतिमर्दानजवळ आहे तेथें अशोकाचे शिलालेख आढळतात व तक्षशिलेसंबंधानें वर उल्लेख करण्यांत आलेलाच आहे. संस्कृत वाङ्मयाचा

पूर्वापार इतिहास लक्षांत आणणाऱ्याला, कल्पना दृष्टीनें कदाचित् असें पाहतां येईल कीं, आपल्या वैदिक वाङ्मयापैकीं अमुक एक प्रकारचें वाङ्मय या प्रांतांत निर्माण झालें! तात्पर्य, इतिहासाला आपण जुना म्हणतों. पण इतिहासापेक्षाहि जुन्या अशा आमच्या आठवणी या सरहद्दीच्या प्रांताशीं संलग्न आहेत. याच दृष्टीनें सरहद्दीच्या प्रांतांतील आमचा हा दौरा म्हणजे एका दृष्टीनें आर्यसंस्कृतीच्या जुन्या क्षेत्राकडे काढलेली यात्राच होती असें कां न म्हणावें?

—रत्नाकर १९२८ मे

---

# उतारे–धार्मिक, सामाजिक

---

## भौतिक शास्त्राचें महत्त्व

...भरतखंडांत अध्यात्मज्ञानाचा अभ्यास फार पुरातन कालापासून चालत आला आहे. आणि या ज्ञानांत आम्हा हिंदुस्थानवासी लोकांची प्रगति इतर लोकांहून पुष्कळच अधिक झाली होती असें आमचें आम्ही तर मानतोंच, पण परराष्ट्रीय विद्वानहि पुष्कळ अंशीं कबूल करतात. म्हणून त्याचें भूषण आपल्याला मानण्याला कांहींच हरकत नाहीं. पण दुर्दैवानें दुसरे पक्षीं, आमचें भौतिकशास्त्राचें ज्ञान व अभ्यास हीं इतकीं कमी आहेत कीं, त्या बाबतींत आम्ही युरोपियन राष्ट्रांच्या पासंगालाहि पुरणार नाहीं. वास्तविक आमच्या अध्यात्मज्ञानाच्या श्रेष्ठपणाचें भूषण मानणारांमध्येंच, आमचें हें भौतिकशास्त्रज्ञानासंबंधीं अज्ञानाचें दूषण मान्य करण्याइतका प्रांजलपणा असावा. हीं दोन्हीहि करील तोच मनुष्य न्यायबुद्धीचा म्हणतां येईल. परंतु दुर्दैवांत दुर्दैवाची भर अशी कीं, भौतिकशास्त्रासंबंधीं हिंदी लोकांचें अज्ञान अतिशय गाढ आहे हें कबूल करण्याचें बाजूसच राहून, या अज्ञानाचा प्रश्न निघाला असतां, ही अध्यात्मज्ञानाची श्रेष्ठता पुढें आणून वेळ मारून नेण्याची व वरती प्रौढी मिरविण्याची संवय पुष्कळ विद्वानांमध्येंदेखील दिसून येते ही गोष्ट फार वाईट आहे. या संवयीचा दुष्परिणाम असा होतो कीं, आमच्या भौतिकशास्त्रविषयक अज्ञानाचा खेद वाटून तें दूर करण्याच्या प्रयत्नास लागण्याची जी बुद्धि एरव्हीं झाली असती तीहि होत नाहीं.

वास्तविक अध्यात्मज्ञान किंवा Metaphysics आणि भौतिकशास्त्रज्ञान अथवा natural Science चें ज्ञान या गोष्टी अगदीं स्वतंत्र असून त्यांतील एक दुसऱ्याची जागा केव्हांहि घेऊं शकत नाहीं. भगवद्गीतेनें व उपनिषदादि ग्रंथांनीं ज्ञान व विज्ञान या दोन गोष्टी स्वतंत्र मानल्या आहेत. गीतेच्या १८व्या अध्यायांत ज्ञानाची व्याख्या अशी केली आहे–'सृष्टींतील अनेक व्यक्त पदार्थांत एकच अव्यक्त मूळ द्रव्य आहे हें ज्यानें समजतें तें ज्ञान.'

सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते ।
अविभक्तं विभक्तेषु तत् ज्ञानं विद्धि सात्त्विकम् ॥

तसेंच गीतेंत विज्ञानाची व्याख्या अशी केली आहे—'एकाच मूलभूत अव्यक्त द्रव्यापासून भिन्न भिन्न अनेक व्यक्त पदार्थ प्रत्येकीं कसकसे निर्माण झाले हें ज्यानें समजतें तें विज्ञान होय.'

यदा भूतपृथग्भावं एकस्थमनुपश्यति ।
तत एव च विस्तारं ब्रह्म संपद्यते तदा ॥

अशा रीतीनें अनेकत्व व एकत्व या दोन तत्त्वांचा परस्पर संबंध दोन रीतींनीं प्रस्थापित होतो व जाणावा लागतो. आधार तोच, पण मनाचे व्यापार दोन प्रकारचे. एक, अनेकत्वांतून एकत्व पहाणें; व दुसरें, एकत्वांतून अनेकत्व पहाणें किंवा एकत्वापासून अनेकत्व कसें निर्माण झालें हें जाणणें. ...

......ज्ञान म्हणजे अध्यात्मज्ञान आणि विज्ञान म्हणजे वस्तुविषयक ज्ञान हीं दोन्ही परस्परांचीं पूरक आहेत, अनुबंधी आहेत, व या दोहोंनाहि एकंदर सृष्टि हेंच साधन होय. जग पाहूनच विश्वाची उभारणी कशी होतें याविषयीं चढती मांडणी लावून अनेकत्वांतून एकत्व सिद्ध करावयाचें, व उलट उतरती मांडणी लावून सृष्टिज्ञानानेंच एकत्वांतून अनेकत्व सिद्ध करावयाचें—म्हणजे तें सिद्ध कसें आहे याची प्रचीति घ्यावयाची. अर्थात् उभारणीशिवाय संहारणी हा शब्द व्यर्थ व संहारणीशिवाय उभारणी हा शब्द व्यर्थ होईल.

ही फोड जाणते लोक आपल्या मनाशी करूं शकतात. पण दुसरे एक प्रकारचे लोक असे आहेत कीं, विज्ञानाच्या बाबतींतलें आपलें न्यून झांकून टाकण्याकरितां तात्त्विक म्हणजे अध्यात्मज्ञानाची स्तुति ते वेळीं अवेळीं करीत बसतात. व ही गोष्ट इतक्या थरापर्यंत जाऊन पोंचते कीं, "आत्मा तेवढा खरा म्हणून आत्मज्ञान हेंच काय तें खरें ज्ञान; आणि जग, सृष्टि ही निवळ माया, आभास, मृगजळ अर्थात् त्याचें ज्ञान हें मिथ्या ज्ञान म्हणून विज्ञान हें टाकाऊ, वृथा शीण देणारें," असा वहाणा ते करितात. पण असें करण्याचें कारण नाहीं. का कीं, अध्यात्मज्ञानाची किंवा Metaphysics ची महती कोणीच नाकबूल करीत नाहीं. कारण अंतिम स्वरूपांत सत्य काय आहे हें जर बरोबर—निदान सर्वसंमत रीतीनें—कळलें तर तें इष्टच आहे. पण हें सत्य हुडकून काढण्याला विज्ञान हें प्रतिबंध न करितां उलट मदतच करील. आज भौतिक तत्त्वज्ञान किंवा शास्त्र यांचा प्रयत्न इतकाच आहे कीं, वस्तुज्ञानाच्या स्वरूपांत पृथक्करणाच्या रीतीनें अधिकाधिक खोल शिरावयाचें, अधिकांत अधिक वस्तूंचे अधिकांत अधिक गुणधर्म प्रयोगांनीं किंवा अनुभवांचीं नोंदणी व वर्गीकरण करून समजून घ्यावयाचे, आणि या निरनिराळ्या वस्तुधर्मांच्या ज्ञानानें, तात्पुरते कां होईना, जे सिद्धान्त सुचतात किंवा सिद्ध झालेसे वाटतात ते परस्परांना लावून ताडून पाहून हें एकंदर ज्ञान कितपत सुसंगत किंवा कितपत विसंगत आहे हें अजमावयाचें इतकीच भौतिक शास्त्राची महत्त्वाकांक्षा आहे.

अध्यात्मज्ञानाला पदच्युत करण्याची त्याला महत्त्वाकांक्षा नाहीं. होय; जग हें मिथ्या असेल किंवा मायामय किंवा स्वप्नवत् असेल ! म्हणजे ज्याला आपण सृष्टि म्हणून म्हणतों तो केवळ आभास असून त्याचें अधिष्ठान कांहीं वेगळेंच असेल. पण "यथा यक्षः तथा बलिः" या न्यायानें या खोट्या मानलेल्या जगांतले जे अंतर्गत व्यवहार ते परस्परांपुरते तरी खरे आहेत असें मानून त्यांची प्रचीति पाहूं गेल्यास ती मोठीशी चूक होणार नाहीं.

स्वप्नांत सावकारीचा व्यवहार केला तरी तें स्वप्न म्हणून कांहीं दोन आणि दोन हे चार होण्याऐवजीं पांच होऊं शकत नाहीत. ऐन्स्टिन यानें सिद्धान्तरूपानें हल्लीं मांडलेली रिलेटिव्हिटी ( Relativity ) खरी ठरेल तर ठरो. त्यानें आपलें कांहींच बिघडत नाहीं. परंतु ज्या जगांत आपण वावरतों त्या जगांतील वस्तूंची Relativity किंवा परस्पर-सापेक्षता, जी आज आपणाला दिसते ती, व्यवहारापुरती तशी घेऊन चाललेंच पाहिजे. या दृष्टीनें पाहतां भौतिकशास्त्रांतील संशोधनाचे प्रयत्न व्यर्थ ठरत नाहींत. जग हें मिथ्या आहे असें तोंडानें म्हणत म्हणत इतर रीतीनें सांगोपांग संसार करण्याला जर कांहीं कमी पडत नाही, तर संसाराइतकीच जिची महती. त्या विद्येची गोष्ट घेतली असतां एक प्रकारची विद्या आम्हा हिंदी लोकांत कमी आहे—भौतिकशास्त्रज्ञानांत आम्ही फार मागासलेले आहों—असें कोणीं म्हटलें तर ती खरी गोष्ट सरळ कबूल न करितां, आमच्या अध्यात्मज्ञानाच्या श्रेष्ठतेचें घोडें पुढें आणणें ही केवळ आत्मवंचना होय. होय ! जग मिथ्या आहे ! त्रिगुणात्मक आहे ! तरी पण प्रकृतीपासून निर्माण झालेली व्यक्त स्वरूपाची सृष्टि, बुद्धि, अहंकार, ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें, पंचतन्मात्रें व पंचमहाभूतें हीं सर्व खरीं असल्यासारखीं मानूनच सर्व व्यवहार आपण करितों ना ? व ब्रह्मज्ञान किंवा अध्यात्मज्ञान, म्हणजे आत्मस्वरूपाच्या अंतिम स्थितीचें सात्त्विक ज्ञान, हाच जरी मोक्ष असें आपण मानिलें—व त्या मोक्षामुळें पुढील जन्ममरणाची उपाधि जरी टळण्यासारखी असली—तरी लोकसंग्रहाकरितां कां होईना, ज्ञानी पुरुष जें कर्म अवश्य म्हणून किंवा आपाततः करीत रहातात, तें कर्म सत्यःसत्य मानून चाललेल्या जगांत किंवा सृष्टीतच घडावयाचें असतें. म्हणून त्या सृष्टीचें यथार्थ विज्ञान अवश्यच ठरतें. अद्वैती, द्वैती, विशिष्टाद्वैती, सांख्य, मीमांसक, वैशेषिक, योगी व भक्त हीं सर्व जोंपर्यंत मनुष्यें आहेत तोंपर्यंत ( त्यांच्या तात्त्विक विचारसरणींत फरक पडला तरी ) त्यांच्या देहरचनेंत व देहधर्मांत फरक पडूं शकत नाहीं. हे सर्व लोक पायानें चालतात, डोळ्यांनीं बघतात, जिभेनें रस घेतात, बुद्धीनें व भावनेनें मिळून कर्तव्याकर्तव्याचा विवेक करितात, सुखाचा स्वीकार करितात, दुःख टाळण्याचा प्रयत्न करितात, त्या अर्थी अध्यात्मवादी व विज्ञानवादी यांना सृष्टि ही सारखीच उपयुक्त ठरते. अर्थात् तिच्यासंबंधीं त्यांचे प्रकट किंवा गूढ विचार व व्यवहार एकाच स्वरूपाचे असणार. या दृष्टीनें पहातां भौतिकशास्त्रानें वरील सर्वांना सारखें च लेखून निःपक्षपातबुद्धीनें त्यांची सारखीच सेवा केली आहे. आणि वरती आत्मज्ञानसंशोधनाला मदतच केली आहे !

सुधारलेला काळ घ्या किंवा तत्पूर्वीचा रानटी स्थितीचा काळ घ्या. मनुष्याचें वर्तन एकच प्रकारचें होतें. म्हणजे तो एकीकडे वस्तुसृष्टि आहे तशी खरी घेऊन चालत असतां, व त्या भावनेनें सर्व व्यवहार करीत असतां, दुसरीकडे जगाकडे तो आश्चर्यभावनेनें पहात होता; व या सर्वांच्या मुळाशी काय आहे, किंवा या सर्वांचें स्वरूप दिसतें त्याहून खरोखरच कांहीं भिन्न आहे कीं काय, हें हुडकून काढण्याचा प्रयत्न तो करीत आला आहे. जेव्हां पदार्थविज्ञान मागसलेलें होतें तेव्हां मनुष्याच्या उपपत्त्या वेगळ्या होत्या, व आज तें विज्ञान वाढीला लागल्यामुळें त्याच्या उपपत्त्या वेगळ्या झाल्या आहेत इतकेंच. परंतु उपपत्ति व सिद्धान्त मांडून सृष्टिप्रपंचाचा अर्थ व अन्वय लावण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा एकाच स्वरूपाची होती. पूर्वी तो पौराणिकपद्धतीनें किंवा अलंकारिक पद्धतीनें आपली उपपत्ति मांडीत असेल, तर आज वस्तुज्ञानाच्या आधारावर प्रयोगनिष्ठवेनें तो आपली उपपत्ति भौतिक पद्धतीनें मांडतो. पूर्वी ढगांतून पाऊस पडलेला पाहून तो म्हणाला असेल की, ' इंद्र आपल्या गोठ्यांतील गाईंच्या धारा काढतो आहे. ' ही उपपत्ति काय, आणि मेघांच्या गडगडाटाविषयीं ' आभाळांत एक म्हातारी आहे ती हरभरे भरडते ' ही मुलांची उपपत्ति काय, सारखीच. पण त्याऐवजीं आजचा शास्त्रज्ञ हा अंतराळांतील वातचक्रांचे नियम, शीतोष्णादि सृष्टिगुणांचे परिणाम, इत्यादिकांच्या आधारानें ढगांची उपपत्ति कांहीं वेगळीच सांगतो. आतां कोणी म्हणेल कीं विज्ञानाच्या शाळेंत वरच्या वर्गांत मनुष्य गेला असें यावरून ठरलें तरी त्याला सृष्टीचें अंतिम सत्य कळलें कशावरून ? अर्थात् ही शंका व हा प्रश्न रास्त आहे. परंतु असल्या अंतिम स्वरूपाच्या प्रश्नामुळें विज्ञानाच्या प्रगतीला थांबण्याचें कारण नाहीं, व त्या प्रगतीची किंमत कमी ठरत नाहीं. उलट तिची किंमत अधिक वाढते हें कबूलच करावें लागतें. कारण विज्ञानाची बैठक कल्पनेवर नसून अनुभवावर आहे. इतकेंच नव्हे तर, विशिष्ट परिस्थितींत तोच तो अनुभव स्वतःला घेण्याची व दुसऱ्याला प्राप्त करून देण्याची पात्रता आधुनिक शास्त्रज्ञांना आलेली आहे. आत्मप्रतीति ही ज्याची त्याची वेगळी असेल, पण भौतिक प्रतीति ही सर्वांना एकच असली पाहिजे, व ती तशी असेल तरच शास्त्रज्ञ तें सिद्ध किंवा सत्य मानतात.

भौतिकशास्त्राच्या सर्व प्रकारें फायदा जीविताला व सुखसोयीला घेऊन वरतीं विज्ञान हें तुच्छ बुद्धीनें लेखणें ही कृतघ्नतेची परमावधि होय. गेल्या दीडशें वर्षांत भौतिकशास्त्रांत जे शेंकडों शोध लागले त्यांनीं मनुष्याच्या दिनचर्येत, रहाणींत, ध्येयांत, जमीन-अस्मानची तफावत पाडली आहे. सर्व सुख भोगल्यानंतरहि ' ततः किम् ' असा प्रश्न तत्त्वज्ञानाच्या ऐटीनें वाटेल तर विचारावा. पण मिळेल त्या भौतिक सुखाचा स्वीकार करून उपभोग घेण्यांत मनुष्यमात्र जी लोभबुद्धि, उत्सुकता व हावरेपणा दाखवितो त्यांतूनच वरील प्रकारचा प्रश्न विचारणाराला परस्पर उत्तर मिळण्यासारखें आहे. ' ततः किम् ' म्हणजे 'त्यानंतर काय ?' किंवा 'तरी काय झालें !' याच्याच जोडीचा प्रश्न 'तेवपर्यंत काय झालें !' हा आहे. समाधान हें ध्येय किंवा इष्टसाध्य मानलें तर विज्ञानबुद्धीनें त्याला बाध

येतो असें म्हणतां येणार नाहीं. सुखसोयी वाढल्या म्हणून समाधान कमी होण्याचें कारण नाहीं. तर खरोखरी उलट समाधान वाढलें पाहिजे. निदान जुन्या काळीं, म्हणजे भौतिक शास्त्राची वाढ झाली नव्हती तेव्हां, मनुष्य जी शारीरिक दुःखें सोशीत होता तीं आतां पुष्कळ कमी झाली आहेत कीं नाहींत? याचीं उदाहरणें देत बसण्याचें कारण नाहीं. कारण सर्वांना तीं माहीत आहेत. म्हणून वरील सिद्धान्तहि त्यांना मान्यच करावा लागेल. म्हणून म्हणणें इतकेंच कीं, भौतिक शास्त्राचें ज्ञान म्हणजे विज्ञान हेंहि अध्यात्मज्ञानाइतकेंच श्रेष्ठ व उपयुक्त आहे अशी भावना ठेवून, तें वाढविण्याचा उपक्रम, ज्याच्या अंगीं ती पात्रता असेल त्यांनीं, अवश्य केला पाहिजे. माझ्या टेबलावरचे 'सृष्टिज्ञाना'चे अंक मी चाळूं लागलों तेव्हां मला किती तरी नवीन गोष्टी कळल्या. वास्तविक त्या इतक्या साध्या होत्या कीं त्यादेखील मला यापूर्वी माहीत नसाव्या याची मनानें लाजच वाटली. पण त्याबरोबर आनंद असा वाटला कीं तरुणपणीं ज्या गोष्टी मला प्रथम समजल्या त्या हातीं पडून, बालपणींच समजाव्या त्या गोष्टी समजण्याची सोय सृष्टिज्ञान मासिक पुस्तकानें करून दिली. म्हणून या मासिक पुस्तकाच्या संपादक मंडळाचें मी मनःपूर्वक अभिनंदन करितों. इंग्रजी भाषेंत शास्त्रज्ञान भरपूर सांठविलेलें आहे. पण मराठी भाषेंत शास्त्रीय ज्ञानाचे मुळींच ग्रंथ नाहींत म्हटलें तरी चालेल. ती उणीव, हें मासिक पुस्तक टिकून सतत चाललें तर अंशतः दूर होईलच. पण त्याहूनहि विशेष आशा ही वाटते कीं, विद्वान् मंडळीच्या पिढीचें तोंड ज्या अर्थी मराठींतून ज्ञानदान करण्याकडे आतां वळलें आहे, त्याअर्थी महाराष्ट्र विद्यापीठ होण्याविषयीं तें जसें एक शुभचिन्ह आहे तसेंच, तें पीठ निघाल्यास यशस्वी होण्याचीहि आशा त्यांतच आहे.

—सृष्टिज्ञान व० ४ अं. २

## धर्मशिक्षण विश्वविद्यालयानें द्यावें काय ?

माझें मत असें आहे कीं, धार्मिक शिक्षण देण्याचें कार्य कोणत्याहि विद्यापीठाच्या कार्यक्षेत्रांत अवश्यमेव अंतर्भूत होतें. कोणत्याहि धर्मपंथाचें मन न दुखवितां तें देण्याची व्यवस्था करितां येणें शक्य आहे. इतर विद्यापीठांच्या मार्गांत उभ्या नाहींत अशा विशेष प्रकारच्या अडचणी मुंबई विद्यापीठाच्या मार्गांत आहेत असें मला वाटत नाहीं.

पण हा प्रश्न विद्यापीठांनीं मागें टाकला याचें कारण असें कीं, [१] एक तर धर्मशिक्षणाबद्दल कोणाला विशेष आस्था नाहीं. व [२] निरनिराळ्या धर्मांचीं मुलें एकत्र शिकत असल्यामुळें, धर्म–शिक्षण दिल्यानें कोणत्याना कोणत्यातरी पंथाच्या मनोभावना दुःखविल्या जातील अशी कांहीं लोकांच्या मनानें विनाकारण धास्ती घेतलेली दिसते. पहिलें कारण हें जर एकंदर जमाच्या स्थितीला धरून आहे असें म्हटलें तर, दुसरें कारण हिंदुस्थानच्या विशिष्ट व विपरीत अशा स्थितीला धरून आहे असें म्हणावें लागतें. धर्मशिक्षणाविषयीं वाटती अनास्था असण्याचें कारण मनुष्यसमाज दिवसेंदिवस अधिकाधिक भौतिक शास्त्रांतील चमत्कार व सत्यश्रेयें यांना मोहून जाऊं लागलेला आहे. वास्तविक भौतिक शास्त्राचा जितका अधिक परिचय होतो तितका आधिक्य विचार

ईश्वराच्या आस्तित्वावर बसावा. अर्थात् ईश्वर म्हणजे जगाची उत्पत्ति व त्याचें नियमन करणारी अशी कोणीतरी मध्यवर्ति व सर्वंकष शक्ति. किंवा सर्व शक्तींची बेरीज ! इतक्या स्थूल रूपानेंदेखील आस्तिक्यबुद्धि माझी नाहीं असें म्हणणारा मनुष्य क्वचितच आढळेल असें वाटतें. बेकननें म्हटल्याप्रमाणें जगांतील दुय्यमशक्ति व कार्यकारणें यांची जर चिकित्सा आपण करितों तर वर सांगितलेली जी आद्यशक्ति, जें आद्यकारण, त्याची चिकित्सा करणें किंवा त्याजबद्दल विचार करणें हें ओघानेंच प्राप्त होत नाहीं काय ? व्यक्तिस्वातंत्र्याचा बहाणा समाज दिवसेंदिवस अधिक करीत असल्यामुळें धर्मविचार हा फक्त व्यक्तीच्या प्रयत्नाचा किंवा आवडीचा एक विषय आहे असें मानण्याची रीत पडूं लागली आहे. पण या दिवसांत झालें तरी व्यक्तिस्वातंत्र्य अधिक प्रभावी कीं समाजशासन अधिक प्रभावी आहे हा वादाचाच प्रश्न आहे. शिवाय आचारविचाराच्या बाबतींत व्यक्तीला स्वातंत्र्य असलें तरी तें मर्यादितच आहे; व व्यक्तीची सुस्थिति आणि प्रगति यांच्यासंबंधानें उपकारक अशा गोष्टी करणें हें समाजाचें व सरकारचें एक कर्तव्य मानलें जातें. या दृष्टीनें पाहतां एकंदर समाजाचा प्रत्येक कालांतील आधार म्हणजे जी नवी पिढी तिला सर्वांत श्रेष्ठ असें शिक्षण देणारी अशी जी विद्यापीठ-संस्था त्या ठिकाणीं धर्मशिक्षणाला मज्जाव व्हावा ही गोष्ट विपरीत वाटते.

ईश्वरावर असा बहिष्कार घालण्यासारखा त्यानें कांहीं गुन्हा केला आहे असें खरोखरच वाटत नाहीं. निरनिराळ्या धर्मांची मुलें एकत्र शिकतात म्हणून कसल्याहि प्रकारचें धर्मशिक्षणच नको असें म्हणणें हें हिंदुस्थानांत अनेक जाती आहेत म्हणून हिंदुस्थानाला स्वराज्यच नको असें म्हणण्यासारखें आहे. किंवा हिंदुस्थानांत अनेक निरनिराळ्या लिपी आहेत व भाषा आहेत म्हणून सगळ्यांकरितां रोमन ही लिपी व इंग्रजी हीच भाषा असावी असें म्हणण्यासारखेंच आहे ! तीच विचारसरणी अनुसरली तर कॉलेजांत एका रंगाचे व एका शिलाईचे झगे तर घालावयाला लावावेच; पण निरनिराळ्या प्रकारचे पोशाख असणें हें संस्कृतीच्या भांडणाला कारण होईल म्हणून झग्याखालचा पोषाखहि मुलांचा एक करावा ! किंवा मी थोडें चुकलों-पोषाख ही विकृति म्हणून मुलांना पोषाखच नसावा असें म्हणण्यासारखें आहे ! वास्तविक विद्यापीठांत धर्मशिक्षण द्यावयाचें म्हणजे प्रत्यक्ष आचारधर्म शिकवावयाचा नाहीं, किंवा विशिष्ट धर्मांचे विधि शाळांतून व कॉलेजांतून मुलांकडून करवून घ्यावयाचे नाहींत, तर तात्विक रीत्या धर्माचें शिक्षण द्यावयाचें इतकाच अर्थ कोणीहि समजावा. धर्माची मुख्य तीन अंगें आहेतः—

[ १ ] ईश्वरस्वरूपाचा विचार,
[ २ ] व्यक्ति, जीव किंवा जीवात्मा यांचा विचार,
[ ३ ] या उभयतांच्या परस्परसंबंधाचा विचार.

मग या तिहींत असा कोणती गोष्ट आहे की, जिचें शिक्षण वेदमोंच्या व्याख्यान-पद्धतीनें किंवा चर्चात्मक रीतीनें वर्गांत शिक्षकांनीं मुलांना दिलें असतां त्या योगानें मुलांत लगेच तंटेबखेडे किंवा मारामाऱ्या होतील ?

धर्मशिक्षण देणें म्हणजे मुसलमानांनीं ईदच्या प्रसंगीं गाईची कुरबानी कशी करावी किंवा हिंदूंनीं यज्ञविधि करितांना चमचा पालथा धरावा कीं उलथा धरावा असल्या गोष्टी शिकविणें हें नव्हे. तर धर्माचें तत्त्वज्ञान शिकविणें हें होय. इतर रीत्या सामान्यपणें हल्लीं देखील ' तत्त्वज्ञान ' हा विषय कॉलेजांतून शिकवितातच कीं नाहीं ? याही पुढें जाऊन असें म्हणतां येईल कीं, एम्. ए. च्या परीक्षेला हिंदु वेदान्तशास्त्र किंवा ' पूर्वमीमांसा ' व ' उत्तर मीमांसा ' हे विषय विद्यापीठाच्या शिक्षणक्रमांत येऊं दिले जातातच कीं नाहीं! तसेंच गोल्डन ट्रेझरीतील वर्डस्वर्थचें ओड टु इम्मॉरटॅलिटी ( Ode to Immortality) ही कविता शिकवितांना—

" And trailing clouds of glory do we come from God who is our home "

या ओळीचें मर्म शिकवावयाचें झालें असतां, हिंदु तत्वज्ञानांतील कित्येक सिद्धान्तांची साधकबाधक चर्चा अप्रत्यक्ष रीत्या करावी लागेल कीं नाहीं ? Butler's Analogy हें पुस्तक कॉलेजांत शिकवितातच कीं नाहीं? पण कोणी म्हणेल कीं, " हें प्रत्यक्ष धर्मशिक्षण नव्हे. शिवाय हा विषय ऐच्छिक होतो. मुख्य वादग्रस्त प्रश्न असा कीं, धर्मशिक्षण हा विषय अवश्य विषयांमध्यें समाविष्ट करावा कीं नाहीं ? " ह्याचें एक उत्तर विल्सन किंवा झेव्हियर कॉलेज यांच्या दाखल्यावरून एकदमच देण्यासारखें आहे. या कॉलेजांना सरकारी ग्रँट व सरकारी विद्यापीठांची मान्यता असतां, तेथें बायबलच्या शिक्षणाची एकप्रकारें सक्ति होते. ती कां व कशी होऊं दिली जाते ? पण या प्रश्नाचीं उत्तरें देत बसण्यापेक्षां दुसऱ्या टोकाचें एक उदाहरण दिलें म्हणजे पुरें होईल. तें बनारस हिंदु युनिव्हर्सिटीचें. या युनिव्हर्सिटीची घटना वरिष्ठ कायदे मंडळाच्या १९१५च्या १६व्या ॲक्टान्वयें झाली आहे. त्यांतील कलम ४ यांत असें लिहिलें आहे कीं, " हें हिंदु विद्यापीठ असलें तरी तें सर्व जातींच्या व धर्मांच्या विद्यार्थ्यांना खुलें राहिलें पाहिजे. त्यांना तेथें मज्जाव होऊं नये. पण फक्त हिंदुधर्म शिक्षणाची तेवढीच सोय या विद्यापीठांत केली जावी. इतकेंच नव्हे तर हिंदु विद्यार्थ्यांना सदर युनिव्हर्सिटीनें नियमान्वयें देऊं केलेलें धर्मशिक्षण घेतलेंच पाहिजे अशी त्यांच्यावर सक्ति करितां येईल. "

अलीगड युनिव्हर्सिटीचा ॲक्ट आज माझ्या हातीं नाहीं. त्यामध्येंहि अशाच प्रकारची अर्थात् मुसलमानी धर्मशिक्षणासंबंधींची व्यवस्था आहे असें मला स्मरतें.

ढाका येथील युनिव्हर्सिटी ही मुख्यतः मुसलमानांकरितांच आहे. तिच्या घटनेंतील कलम ५ यांत असें सांगितलें आहे कीं, विद्यापीठानें पसंत केलेल्या शिक्षणाच्या द्वारें धर्मशिक्षणाची व्यवस्था झाल्यास तशी करण्याला कायद्यानें हरकत नाहीं. मात्र ज्याची इच्छा नसेल अशा विद्यार्थ्यांवर धर्मशिक्षणाची सक्ति केली जाऊं नये. ही विद्यापीठें सोडलीं म्हणजे बाकीच्या विद्यापीठांच्या कायद्यांत धर्मशिक्षणाचा उल्लेख कोठें आढळतो, तर कोठें आढळत नाहीं. उदा०—मुंबई विद्यापीठाचा कायदा सन १९२८ चा घ्यावा. यांतील कलम ६ यांत इतकेंच सांगितलें आहे कीं, मनुष्य कोणत्या धर्माचा किंवा जातीचा असल्यामुळें

त्याला शिक्षक विद्यार्थी यांसंबंधाची सोय किंवा इक्क यांचा उपयोग घेण्याला मनाई नसावी. पण धार्मिक शिक्षण देण्याच्या व्यवस्थेसंबंधानें त्यांत कांहींच उल्लेख नाहीं. तथापि कांहीं दिवसांपूर्वी सेनेटमध्यें प्रिन्सिपॉल गोखले यांच्या सूचनेवरून ठराव झाला त्यामुळें धार्मिक शिक्षणाचा हा प्रश्न इक्षीं चर्चेला निघालेला आहे. किंबहुना 'रत्नाकरा'नें प्रश्नावलि पाठवून अभिप्राय मागविण्याचा उपक्रम केला आहे तो यावरूनच कदाचित् सुचला असावा.

आंध्र युनिव्हर्सिटीच्या मद्रास कायदे-मंडळाचा कायदा सन १९२६ चा २. यांतील कलम ५ यांत असें म्हटलें आहे कीं, धर्मशिक्षणाची कोणावर सक्ति होऊं नये; पण त्याची व्यवस्था कांहीं नियमानुसार विद्यापीठानें केल्यास त्याला हरकत नाहीं.

आग्रा युनिव्हर्सिटीचा ॲक्ट १९२६ चा ८. यांतील कलम ५ मध्यें असें लिहिलें आहे कीं, विद्यापीठाला जोडून घेतलेलीं कॉलेजें किंवा वसतिगृहें यांमध्यें शिक्षक किंवा इतर कोणी अध्यापक यांचेकडून धर्मशिक्षण देण्याची व्यवस्था केल्यास कायद्यानें त्याला हरकत घेतां येणार नाहीं. मात्र या शिक्षणाची सक्ति विद्यार्थ्यांवर केली जाऊं नये.

नागपूर युनिव्हर्सिटीचा १९२३ चा कायदा ५ यांतील कलम ५ हेंहि वरील-प्रमाणेंच आहे.

अलाहाबाद युनिव्हर्सिटीचा १९२३ चा कायदा ३ यांतील कलम ६ मध्यें वरील अर्थाचाच मजकूर आहे.

रंगून युनिव्हर्सिटीचा कायदा सन १९२६ व १९२४ चा मिळून. यांतील कलम ५ मध्यें धर्मशिक्षणाचा उल्लेख असा किंवा तसा अजीबात टाळलेला आहे. त्यांत फक्त इतकी-च तजवीज आहे कीं, विद्यापीठाला एखाद्या गृहस्थानें एखादी देणगी दिली व ती विद्यापीठानें स्वीकारली, आणि त्या देणगीबरोबर जातिविषयक व धर्मविषयक निर्बंधाची एखादी अट असली तर ती फक्त पाळली जाण्याला कायद्याची हरकत नाहीं. याचा अर्थ असा होईल कीं, देणगीच्या अटीला अनुसरून धर्मशिक्षण देतां येऊं शकेल.

पाटणा युनिव्हर्सिटीचा कायदा सन १९१७ चा १६. यामध्यें धर्मशिक्षणासंबंधीं कांहीं उल्लेख नाहीं; पण विद्यापीठ सर्व जातींना व धर्मांना खुलें राहील असा स्पष्ट शब्दांनीं इतर विद्यापीठांच्या कायद्यांतून घातलेला निर्बंधहि त्यांत मला आढळत नाहीं. पण ही गोष्ट या कायद्यानें बहुधा गृहीतच धरलेली असावी.

तात्पर्य, विद्यापीठांचे हे निरनिराळे कायदे पाहतां, त्यांचा झोंक सर्व प्रकारच्या धर्मशिक्षणावर बहिष्कार घालण्याचा दिसत नाहीं, तर विद्यापीठांवर फक्त विशिष्ट धर्म-शिक्षण घेण्याची सक्ति होऊं नये इतक्यापुरताच दिसतो. म्हणजे बायबल, गीता किंवा कुराण यांच्या शिक्षणाच्या तासाला मुलांना बसण्याची सक्ति करावी किंवा नाहीं असा प्रश्न कोणी केला असता तशी सक्ति होऊं नये असें सहज उत्तर देतां येईल. तथापि तात्त्विक धर्मशिक्षणाला विद्यापीठांत मज्जाव नसावा व तुलनात्मक पद्धतीच्या धर्मविचाराला तर मज्जाव नसावाच नसावा असें माझें निश्चयात्मक मत आहे.

पण स्मृति अठरा कां मानावयाच्या ? व इतर एकशेंआठांना गौणत्व कां यावयाचें हें कोडें नुसत्या श्रद्धेनें उलगडत नाहीं. स्मृतिकारानंतर निबंधकार येतात व निबंधकारांपैकीं कांहीं निबंध आम्हीं आजहि प्रमाण मानले पाहिजेत, असा ठराव काशीच्या संमेलनामध्येंच झाला आहे. अर्थात् श्रद्धेची मर्यादा या परंपरेनें किती लांबवावयाची ? असा प्रो. नाईक यांनीं प्रश्न केला आहे व तो बरोबर आहे असें मला वाटतें.

स्मृतीच्या तपशिलाबद्दल मतभेद दर्शवून वर्णाश्रमधर्माची कल्पना आपणाला आजहि मान्य आहे असें कोणीं म्हटलें, तर कित्येकांना वाटतें कीं, ही खरी खरी प्रामाण्य-बुद्धि नव्हे ! पण यांत लबाडी कसली ? त्यांची ती प्रामाण्यबुद्धि खरीच असते. खालीं पडून विनयानें व गोडवेपणानें घर घेतां आलें तर तें कां घेऊं नये ? तर्क व अनुमान यांचा यत्किंचितहि उपयोग न करता केवळ 'शास्त्राचें अक्षर' म्हणून तें शिरसावंद्य मानणें यांतला नादानपणा माझ्या मनाला पटत नाहीं ! श्री. चिं. वि. वैद्य यांच्याशीं या बाबतींत माझा मतभेद आहे.

## तर्क करणें ही बंडखोरी नव्हे

नुसतें प्रामाण्य एवढा शब्द उच्चारल्यामुळें निबंधकारांना शंभर खून माफ असावे; पण जो थोडाफार तर्काचा आश्रय करील, तो नास्तिक ठरावा, या गोष्टीच्या मी साफ विरुद्ध आहें. शंकराचार्यांचें वचन आपण प्रमाणभूत मानतों; पण तें प्रमाण कां मानावयाचें हें तरी आपण स्वतःच्या मनानें आणि तर्कानेंच ठरवतों. वलीकदच्या कोर्टांतून न्याय आपणासारखा मिळण्याकरितां जशा कारवाया होतात, त्याप्रमाणें धर्माच्या बाबतींत शंकराचार्यांकडून अनुकूल निकाल मिळण्याकरितांहि कसकशा दरबारी कारस्थानें केलीं जातात याहि गोष्टी लोकांना अगदींच माहीत नसतात असें नाहीं ! निबंधकारांनीं तर अप्रामाणिकपणानें धर्मग्रंथांतून धर्मांत नसलेल्या अनेक गोष्टी प्रक्षेप करून लिहिल्या, याचीं शेंकडों उदाहरणें काढून देण्याला मी तयार आहें. हें तुम्हांला चालतें; पण प्रामाणिकपणानें व श्रद्धा ठेवूनहि एखाद्यानें तर्क चालवूं म्हटलें तर मात्र तुम्हीं लगेच कानावर बोट ठेवतां ! श्रद्धेप्रमाणें तर्क ही ईश्वरदत्त देणगीच आहे व म्हणून धर्मशास्त्रांतहि सारा-सार विचार करून तर्क करणें हा मनुष्याचा जन्मसिद्ध हक्क आहे असें मी म्हणतों. यांत बंडखोरी कसली ? जो हक्क पूर्वी नव्हता तो आम्हीं मागूं अगर प्रस्थापित करूं, तर ती बंडखोरी होईल. पण आम्हीं केवळ जुन्या हक्काची बजावणी करावयास मागतों; नवा हक्क उत्पन्न करीत नाहीं.

## ज्ञान अनुभवात्मक आहे

तर्क व श्रद्धा ही अनुमानाचींच वेगळीं स्वरूपें आहेत, भिन्न नाहींत. ज्याला आपण श्रद्धा म्हणतों, त्याच्याहि पाठीमागें अनुमान–परंपरा असतेच. आपण तोंडचा दिवेच चटकन करतों, त्याप्रमाणेंच या अनुमानशक्तीचें कार्यहि जलद होत असतें इतकेंच. किंबहुना जगांतील सर्व ज्ञानाचा असा सिद्धांत सांगतां येईल की, ज्ञान हें सर्व अनुभवात्मक आहे'

मनुष्य नवें असें कांहींच करीत नाही. मूल उपजतांक्षणींच आईचें दूध पितें. त्याला दूध पिण्यास खरोखर कोणी शिकविलेलें असतें ? पण आपण हिंदु पुनर्जन्म मानतों. व हजारों पूर्वजन्मांत मनुष्याला लहानपणीं स्तनपान करण्याचा संस्कार झाला आहे, म्हणूनच लहान मूल स्तनाला तोंड लावताच त्याचे ओंठ हलूं लागतात. वानराचें लहान पोर खाली पडूं नये म्हणून झाडाची डाहाळी धरतें किंवा आपल्या आईच्या पोटाला बिलगतें, हें त्याला शिकवावें लागत नाहीं. याचें कारण शेंकडों पूर्वजन्मांतून वानरजात हेंच करीत आलेली आहे. या श्रद्धात्मक क्रियेला पूर्वानुभव हेंच कारण आहे......

ईश्वर वेदापेक्षां मोठा म्हणून मी खुद्द परमेश्वराविषयींच्या प्रामाण्यबुद्धीबद्दलच प्रश्न करतों. परमेश्वराला तरी स्वतःप्रामाण्य कोठें आहे ? मनुष्य मानतो म्हणून परमेश्वराला प्रामाण्य, असेंच नाहीं काय ? वृक्षापासून बीज निर्माण होतें व त्या बीजांतून पुन्हा वृक्ष निर्माण होतो. याचप्रमाणें परमेश्वरानें मनुष्याला निर्माण केलें व मनुष्यानें पुन्हा आपल्या बुद्धीनें व श्रद्धेनें परमेश्वराची स्थापना केली ! परमेश्वराला्हि अस्तित्व आहे, पण तें, मनुष्य मानतो म्हणून ! मनुष्यानेंच तें अमान्य केलें, तर मग परमेश्वराचें अस्तित्व जगांत राहिलें कोठें ?

परमेश्वराप्रमाणेंच वेदप्रामाण्याची गोष्ट. वेदांत विधिवचनें थोडींच आहेत. त्यांचा व्यवहाराशीं फारसा संबंध येत नाहीं म्हणून बिचारे वेद तंट्यापासून सुरक्षित राहिले आहेत ! पण वेद हे पौरुषेय, कीं अपौरुषेय असा वाद प्रामाण्यबुद्धि मानणारांतहि होऊं शकतो. खुद्द जिनसीवाले व टिळक यांच्यांतच हा वाद झाला ! टिळकांच्या प्रामाण्यबुद्धीबद्दल प्रश्न नाही. पण कर्मठपणांत जिनसीवाले हे टिळकांपेक्षांहि वर होते. पण असें असूनहि जिनसीवाले म्हणत वेद हे पौरुषेय आहेत व टिळक म्हणत वेद अपौरुषेय आहेत.

स्मृतिप्रंथाबद्दल तशीच गोष्ट. केवळ अठरा स्मृति तुम्ही मानणार; पण बाकीच्या एकशें आठ तुम्ही तितक्याच प्रामाण्यबुद्धीनें कां मानूं नये ? याचें उत्तर कोणी देत नाहीं. असें म्हटलें कीं आला तंटा ! माझें म्हणणें इतकेंच कीं, नुसती प्रामाण्यबुद्धि आहे म्हणून व्यवहाराचें काम भागत नाहीं. स्मृति उघडून पाहिली तर त्यांत लौकिक, पारलौकिक व उभयविध अशा गोष्टी कोणत्या येथें तुम्हाला तर्कच चालविला पाहिजे. स्मृतीनें असें वर्गीकरण केलेलें नाहीं. कारण अथपासून इतिपर्यंत स्मृतीमध्यें धर्माचें अवगुंठन नाहीं व धर्माच्या नांवानें सांगितली नाहीं अशी एकहि गोष्ट सांगता येणार नाहीं. तोंडानें वेदप्रामाण्य म्हणावयाचें, स्मृतींनाहि प्रामाण्य म्हणावयाचें, निबंधकारांनाहि प्रामाण्य दाखवावयाचें, पण त्यांतील एकहि गोष्ट स्वतः न करतां " स्वस्य च प्रियमात्मनः " असें वर्तन करावयाचें हा सर्व शब्दप्रामाण्याचा घुपडाच नाहीं काय ?

वेद व स्मृति यांचीच गोष्ट कशाला ? जेथें आपली पूर्ण श्रद्धा असते अशी आणखी व्यवहारांतील उदाहरण घेतों. म्हणजे तर्क हा श्रद्धेच्या बरोबर किंबहुना श्रद्धेच्या हातांत हात घालूनच कसा काम करीत असतो, हें लक्षांत येईल. तुम्ही आजारी पडला आहां व तुम्हांला औषध घ्यावयाचें आहे असें समजा. परमेश्वराच्या घरी तुमचें आयुष्य होतें

ठराविक वर्षे बांधलेलें आहे व तुमच्या नशिबाच्या संग्रहीं नसलेलें आयुष्य, तुम्ही हे औषधोपचार करण्यांत परमेश्वराकडे मागत नाहीं. ही तुमची प्रामाण्यबुद्धि खरी आहे. असेल आयुष्य तें सुखानें जावें म्हणून तुम्ही केवळ पुरुषप्रयत्न करणार. तुमची परमेश्वराविषयींची प्रामाण्यबुद्धि खरी व औषध घेतल्यानें गुण येतो हीहि प्रामाण्यबुद्धि खरीच. पण औषध घ्यावयाचें तें डॉक्टरचें घ्यावयाचें कीं वैद्याचें घ्यावयाचें हें तुम्हीच प्रथम ठरविणार.......

शस्त्रक्रियेनें रोग बरा होतो असें असलें तरी, स्वतःवर शस्त्रक्रिया करावी कीं नाहीं, हें अखेर आपणच ठरवितों कीं नाहीं? वैद्य अगर डॉक्टरी शास्त्र यांतलें आपणाला कांहीं कळत नाही. परंतु आपण परमेश्वराइतकीच एखादा हकीम अगर डॉक्टर यांच्यावर श्रद्धा ठेवली, वेदवचनाइतकेंच औषध पथ्यकर आहे असें मानून तें घेतलें, तरी अगदीं पावलोपावलीं सारासार विचार अगर तर्कवाद हा आपणाला कसा सोडतां येत नाहीं हें लक्षांत घेण्यासारखें आहे. तर्कवाद आम्ही सोडूं म्हटलें तरी आपणालां शक्य नाहीं.

मनुष्यव्यवहार पाहिला तर प्रामाण्यबुद्धि खरी, पण ही प्रामाण्यबुद्धि स्वतःच्या तर्काला पटेल तरच ती मानावी असा हट्ट, आग्रह, किंवा हक्क, मनुष्य मग तो कितीहि धार्मिक असो, आपल्या हातीं राखून ठेवीत असतो. स्मृतिवचनांत विरोध आला, तर त्याचा निकाल शेवटीं आपण आपल्या स्वतःच्या मनानें करावयाचा नाहीं, तर कोणीं करावयाचा? शंकराचार्यांनीं निकाल करावा व तो आपण मानावा असें श्री. चिंतामणराव वैद्य म्हणतात; ठीक आहे. पण या बाबतीत मी त्यांना खुद्द शंकराचार्यांचाच पूर्वदाखला देतों! पुण्यांत ४० वर्षांपूर्वी ग्रामण्य झालें तेव्हां टिळकांच्या विरुद्ध बाळासाहेब नातूंनीं शंकराचार्यांकडे तक्रार केली. टिळक व नातू दोघेहि कट्टे धार्मिक व प्रामाण्यवादी. शंकराचार्यांविषयीं प्रामाण्य दोघांनाहि कबूल. शंकराचार्यांनीं जीं शास्त्रवचनें काढलीं तीहि दोघांना मान्य. येथपर्यंत कोणाच्याहि प्रामाण्यबुद्धींत कमतरता नाहीं. पण आपल्या विरुद्ध व टिळकांच्या तर्फेनें शंकराचार्यांनीं निकाल देतांच बाळासाहेब नातू म्हणूं लागले:—"मीहि शंकराचार्यांचा निर्णय मान्य करीन; पण तो सशास्त्र असेल तर!" त्या वेळच्या वादांतील इतर बऱ्यावाईट गोष्टी लक्षांत घेऊं नका. पण "शंकराचार्यांचा निर्णय मान्य, पण सशास्त्र असेल तर" या उत्तरांतच या वादाचें सर्व मर्म आहे!! निर्णय देण्याचा अधिकार शंकराचार्यांचा खरा, पण तो निर्णय अखेर मानावयाचा कीं नाहीं हें मीच माझ्या बुद्धीनें ठरविणार. व्यवहाराच्या दृष्टीनें प्रामाण्यबुद्धीची हीच अवस्था होत असेल, तर शब्दप्रामाण्य खरें खोटें म्हणाल कीं, प्रामाण्यबुद्धि खरी खोटी म्हणाल?

स्मृतींत बदल करा असें म्हणणाऱ्या पक्षाच्या विरुद्ध श्री. वैद्य आपलें मत देतात; म्हणून जुन्या शास्त्रीमंडळाची व त्यांची एकवाक्यता होऊं शकणार नाहीं हें मात्र त्यांनी लक्षांत ठेवावें. अबलोन्नतिलेखमाला या पुस्तकांत श्री. वैद्य यांनीं बालविवाहाविरुद्ध मत देऊन शास्त्राच्या आधारानेंच प्रौढ विवाहाचें समर्थन केलें आहे. तें तुम्हांस मान्य आहे काय? असेल तर सांगा. एखादा तरुण मुलगा डोक्यावर केस ठेवतो म्हणून त्याला दोष

देणें अगर जिव्हेला शब्द आल्याबरोबर एकाद्याला नास्तिक म्हणणें हें फार सोपें आहे ! पण जें स्मृतिशास्त्र तुमच्या दृष्टीनें प्रमाण आहे, त्यांतील तुम्ही काय काय पाळतां ? तुम्हांला तें लागू आहे की नाहीं ? ब्राह्मणानें सेवावृत्ति करूं नये, शील व उञ्छ या वृत्तीचा स्वीकार करावा व तीन दिवसांखेरीज धान्याची अधिक सामग्री ब्राह्मणानें आपल्या घरांत ठेवूं नये, असें मनुस्मृतींत सांगितलें आहे. पण तुम्ही बेलाशक सरकारी नोकऱ्या करतां, सरकारचें पेन्शन खातां. ब्राह्मणांनीं कुसीद अगर व्याजबट्टा करूं नये असें स्मृतींत सांगितलें असतां हि तो करून त्यावर वैश्वदेव करतां. धनधान्य व सुखसोईच्या साधनसंपत्ति यांनीं घर भरतां, या सर्व गोष्टी तुम्ही करतां. फक्त डोक्यावर केस ठेवीत नाहीं, इतकेंच कीं नाहीं ? मग दुसऱ्याला अधार्मिक म्हणून म्हणावयास तुम्हांला अधिकार काय ? सर्व आश्रमधर्म पोथ्यापुस्तकांत व स्मृतिग्रंथांत राहिले, पण वृद्धापकाळांतहि पोराबाळांनीं भरलेल्या संसारांत राहून व संसार करून दुसऱ्याच्या प्रामाण्यबुद्धीला मात्र तुम्ही नांवें ठेवणार हें कसें जमेल ?

'नवी स्मृति करा' असें म्हणणाऱ्या नव्या लोकांवर जुन्या लोकांचा विशेष राग आहे. पण नवी स्मृति ही मुद्दाम करावयासच कशाला पाहिजे ? ती आपोआपच होत आहे ! कोणी एकादा मनुष्य "ही पहा मी नवी स्मृति लिहितों" असें म्हणेल, तर "हो हो ! तुम्ही मनूचे नवे अवतारच कीं नाहीं ?" असें उत्तर त्याला मिळून तो व्यक्तिशः सहजच हास्यास्पद होईल. पण मनुष्यानें सर्व हिंदु समाजाच्या नांवानें अशी भाषा बोलण्याला काय हरकत आहे ? स्मृतिकारांचा कांहीं निर्वंश झाला नाहीं ! आजच्या युगांत आजच्या समाजाला ही स्मृति बदलण्याची किंवा कालानुरूप नवा धर्मग्रंथ करण्याची पात्रता नाहीं कीं काय ? असें कोणालाहि हक्कानें म्हणतां येईल, व तें खरेंच आहे.

तात्पर्य, धर्मबुद्धि ठेविली तरी धर्माच्या बाबतींतहि तर्क चालविणें व श्रेयस्कर व्यवहार करणें हा मनुष्याचा हक्क आहे. यांत बंडखोरी नाहीं व यांत प्रामाण्यबुद्धीचाहि अभाव नाहीं. धर्म हा कांहीं केवळ पारलौकिक नाहीं. अभ्युदय व निःश्रेयस ह्या दोन्ही गोष्टी जर धर्मानें आपण साधणार, तर त्या अभ्युदयाकरितां प्रामाण्यबुद्धीनें आपला तर्क चालविणें यांत कांहींच वावगें नाहीं. श्रद्धा व तर्क या दोन्ही गोष्टी ईश्वरानें मनुष्याला दिल्या आहेत व त्याहि उपयोगाकरितांच दिलेल्या आहेत. श्रद्धा मात्र ईश्वरानेंच दिली व तर्क मनुष्यानें आपल्या घरचा आणला असें थोडेंच आहे ? त्या श्रद्धेबरोबर तर्कालाहि वागावयास थोडी वाट सोडाल तर व्यवहार चालेल. पण ठिकठिकाणीं ही वाट बंद करून तर्काला कोंडूं लागाल तर कोंडलेलें मांजर धरणाराच्या गळ्यावर उडी मारतें तसें, तर्क हा शब्दप्रामाण्याच्या गळ्यावर उडी मारल्याखेरीज राहणार नाहीं ! श्रद्धा खरी पण ती सर्वस्वी घेऊन कसें चालेल ? तर्काच्याबरोबर तीहि पुरवून पुरवून घ्या. सोन्याची अंडीं घालणारी हंसी तुमच्या हातांत आहे, पण तिचा अविचारानें असा घात करूं नका. शिकारी माणसाइतकीहि तर्कांशीं मागणाविषयीं बोलतांना न्यायबुद्धि तुम्ही ठेवीत नाहीं. श्वापद निजलें असलें तर शिकार करण्यापूर्वी त्याला इशारा देऊन जीव बचावण्याला

वाट मोकळी करून देतात. पण निजलेल्या सावजावर कोणी गोळी घातली तर त्याला शिकार ( Sportsmanship ) न म्हणतां खून म्हणतात. जे केवळ 'तर्क' हा नुसता शब्द उच्चारतात त्यांना जीभ उचलून नास्तिक म्हणणें हाहि एक प्रकारें त्यांचा खूनच नव्हे काय ? तुम्ही 'प्रामाण्य' हा शब्द नांवाला उच्चारून तर्क चालवितां, एवढयामुळेंच वाटेल त्याला वाटेल तें नांव ठेवण्याचा तुम्हांला परवाना मिळाला कीं काय ? आपण सर्वच धार्मिक आहोंत व एकाच प्रामाण्यबुद्धीच्या नावेंत बसलों आहोंत. असें असतांना 'तर्कवादी' हा शब्द तोंडानें म्हणून थाप द्यावा, यांत अर्थ काय ? पण याहिपेक्षां समर्पक उपमा म्हणजे आपण सर्वच प्रामाण्याच्या नावेंत बसून परिस्थितीचा प्रवाह ओलांडीत आहों. तर्क हें या नावेचें सुकाणू आहे व निरनिराळीं साधनें हीं आवलीं वल्हीं आहेत. तुमच्या आमच्या विचारानें वाटेल त्या स्थळीं ही नाव आपल्याला नेतां येईल. मग एकाच नावेंत बसणारांनीं, एकाच परिस्थितींत राहणारांनीं त्याच साधनाचा उपयोग करणारांनीं, व एकाच निश्चित स्थळीं प्रवास करणारांनीं शब्दप्रामाण्याचा तंटा का करावा ?

—नव्या स्मृतीची आवश्यकता पृष्ठ ७१–७८

## केळकरांचीं सामाजिक मतें

'संग्राम' हें पत्र नवीन आहे. तें एका विशिष्ट कार्याकरितां अवतरलें आहे. तें कार्य म्हटलें म्हणजे आडदांड सत्यशोधकांशीं 'जशास तसें' या न्यायानें झुंजणें. या झुंजण्यांत अर्थात् लढण्याच्या सर्व प्रकारांचा समावेश होतो. पुष्कळ वेळीं संग्रामांतील कित्येक प्रकरणांची भाषा वाचून वाचकांस खेद होतो. पण ही भाषा योजून चालून प्रतिकारार्थ योजण्यांत आलेली असल्यामुळें या खेदाबरोबरच, ज्या लेखांना संग्रामांतील लेख हीं उत्तरें असतात ते लेख लिहिणाऱ्या मूळ नाठाळ अपराध्यांची आठवण झाल्यावांचून राहात नाहीं.

असो. पण मला आज या भाषेच्या वादांत शिरावयाचें नाहीं. आज मला ब्राह्मण–ब्राह्मणेतर वादासंबंधानें कांहीं गोष्टी स्पष्ट सरळ अशा सांगावयाच्या आहेत. हेतु हा कीं, कित्येक ब्राह्मणेतर पुढाऱ्यांचें म्हणणें ब्राह्मण–ब्राह्मणेतर विषयांतील आमचीं मतें स्पष्ट कळून येत नाहींत व तीं तशीं कळून येण्यासारखीं असलीं तरी आम्ही त्यांचा एकसारखा पुनरुच्चार करीत रहात नाहीं. या दुसऱ्या आक्षेपासंबंधानें मला इतकेंच म्हणावयाचें कीं, केवळ सामाजिक सुधारणा हा एवढाच विषय मीं माझा म्हणून मानलेला नाहीं. माझा व्यवसाय राजकारण हाच मुख्य असल्यानें इतर विषय मला तुलनेनें गौण असेच मानावे लागतात, याला माझा नाइलाज आहे. तथापि समाज–सुधारणेच्या निरनिराळ्या अंगांविषयीं आणि ब्राह्मण–ब्राह्मणेतर वाद या त्यांतील उपांगाविषयीं माझीं मतें लोकांपासून मीं झांकून ठेवलेलीं आहेत असें वाटत नाहीं. मी त्यांचा डांगोरा पिटीत नाहीं, पण तीं कधीं दडपूनहि ठेवीत नाहीं. कोणत्याहि सार्वजनिक विषयांवरील कोणाचीहि मतें ही सार्वजनिक मालमत्ता आहे, असें मानणारा मी आहें; म्हणून कोणीं माझीं

मतें विचारली असतां मी तीं उघडून दाखविणें हें आपलें कर्तव्य समजतों. आणि कित्येक वेळां कोणी न विचारतांहि न्यायबुद्धीमुळें किंवा एखाद्या विषयाच्या कळकळीमुळें मी तीं स्वयंस्फूर्तीनेंहि सांगतों. माझी मतें बरीचशीं सदोष असूं शकतील. मी कोणत्याहि रीतीनें पूर्वग्रहदूषित नाहीं असें स्वतः समजत नाहीं. इतर चारचौघांप्रमाणें माझीं मतेंहि, माझी पूर्वपरंपरा, स्वार्जित संस्कृति आणि प्रत्यक्ष परिस्थिति या निरनिराळ्या शक्तींचा असाच संकीर्ण परिणाम असणार. पण माझीं मतें सदोष व चुकीचीं असलीं तरी मनानें मी कोणत्याहि जातीचा किंवा वर्गाचा द्वेष करीत नाहीं व पूर्वी कधीं केलेला नाहीं, असें मात्र मी निष्ठापूर्वक म्हणतों.

'संग्राम' च्या या विशेष अंकाकरितां एक लहानसा लेख संपादकांकडून मजकडे मागण्यांत आला तेव्हां मीं असा विचार केला कीं, सामाजिक विषयावरील आपलीं कांहीं मतें सूत्ररूपानें मांडूनच त्याचा लेख बनवावा. पण तो लेख लिहिण्याला मला वेळ मिळाला नाहीं. हा लेखहि म्हणजे कांहीं एखाद्या अधिकाऱ्याचा जाहीरनामा नव्हे. वाटेल तर कोणी आरोपीचा कबूलीजबाब म्हणावा. मी सूत्ररूपानें सांगतों तीं मतें ज्यांचीं तंतोतंत आहेत, असे शेंकडों हजारों लोक सुशिक्षितांतच काय पण ब्राह्मणांतहि आहेत असें मला वाटतें. अर्थात् या मताच्या वैशिष्ट्याबद्दल मीं अहंकार बाळगावा असें त्यांत कांहींच नाहीं.

मनुष्य जात ही पुरुषसूक्तांत सांगितल्याप्रमाणें ईश्वराच्या चार निरनिराळ्या अंगांपासून निघाली असें मी मानीत नाहीं. पुरुषसूक्तांतलें तें एक प्रकारचें रूपक आहे. मनुष्य जात कांहीं प्रकारच्या उत्क्रांति तत्त्वाप्रमाणेंच कनिष्ठ जीवांपासून बनलेली आहे. अखिल मनुष्य जात ही एकाच खाणींतील माती होय. केवळ संस्कारानें निरनिराळीं रूपें घेऊन तिचे निरनिराळे वर्ग बनले.

धर्मबुद्धि हा त्या सर्व संस्कारांत अतिशय प्रबळ असा संस्कार होय; व जगांतील मनुष्य जातीचे मुख्य वर्ग धर्मावरून केले जातात यांत मला आश्चर्य वाटत नाहीं.

सर्व धर्म हे मनुष्याला ईश्वराकडे नेण्यास तात्त्विक दृष्ट्या सारखेच समर्थ असून मोक्ष किंवा तत्सदृश अशी जी स्थिति असेल ती व्यक्तिशः मनुष्याच्या कर्मानेंच त्याला प्राप्त होणारी आहे. ती प्राप्त करून घेण्याला, स्वतःस कनिष्ठ मानणाऱ्यानें, त्याला दुसरा कोणी श्रेष्ठ वाटत असल्यास त्याची मदत स्वेच्छेनें घ्यावी. परंतु कोणासहि दुसऱ्याच्या धर्मकृत्यांत ईश्वराकडे दलाली करण्याचा हक्क सांगतां येणार नाहीं. या दलालीला फक्त व्यावहारिक स्वरूप असूं शकेल, धार्मिक स्वरूप नाहीं.

सर्व धर्म सारखेच असले तरी मनुष्य ज्या धर्मांत जन्मास आला त्या धर्माचा त्याला अभिमान अवश्य असला पाहिजे. मी स्वतःला हिंदु म्हणवून घेण्यांत अभिमान मानतों; व त्या धर्माला शक्य तितकें शुद्ध स्वरूप यावें पण त्याचें मूलतत्त्व मात्र नष्ट होऊं नये असें मला वाटतें. परवां एकानें मजवर असा आक्षेप घेतला कीं, केळकरांची दृष्टि अजून संकोचित आहे; ते हिंदुधर्माच्या अभिमानांतून अद्यापि बाहेर पडले नाहींत.

पण ही टीका करणाऱ्यानें माझा बहुमानच केला असें मी समजतों. हिंदुधर्मांत राहून इतर धर्मीयांशीं बंधूप्रमाणें ममतेनें व सहिष्णुतेनें वागावें व तसें वागतांहि येतें. त्याकरितां आपला धर्म टाकण्याची जरूरी नाहीं. धर्म टाकावा तर नांवगांवाचा अभिमानहि टाकावा! अर्थात् व्यक्तित्वाचाहि अभिमान टाकावा असें ओघानें येईल. पण सडा तुटलेल्या वावडीप्रमाणें मनुष्यानें न वागतां नांगरलेल्या जहाजाप्रमाणें त्यानें वर्तावें.

मी हिंदु म्हणवितों तरी जातिभेद हाच. या धर्माच्या श्रेष्ठतेचा किंवा शुद्धतेचा आत्मा आहे असें मी मानीत नाहीं. जाति जन्मसिद्ध नाहीं; ती कर्मसिद्ध आहे. अर्थात् कर्मपरत्वें जातींच्या मर्यादा बदलूं शकतात; म्हणजे जातींत जाती मिसळूं शकतात किंवा जातींतून जाती बाहेर निघूं शकतात. हा नित्यक्रम सुरुहि आहे. पण त्याचे परिणाम दृष्टीस पडण्यास कालावधि लागतो म्हणून ते लोकांच्या लक्षांत सहसा येत नाहींत.

हिंदुसमाजाचें चातुर्वर्ण्य हें एक प्रमुख अंग होऊन राहिलेलें आहे. पण चार हा शब्द अगदीं वाच्यार्थानें घ्यावयाचा नाहीं. चार वर्णांत ब्राह्मण वर्णाला इतराहून श्रेष्ठत्व पूर्वी केव्हां होतें असें दिसतें; पण आज तें उरलेलें नाहीं व तसें उरण्याचें कारणहि नाहीं. ब्राह्मण याचा अर्थ जन्मविशिष्ट मनुष्य असा न घेतां गुणकर्मविशिष्ट असा घेतला पाहिजे. गुण हे पुष्कळसे उपजत असतात, पण कोणत्याहि गुणाचा मक्ता असा कोणत्याहि जातीला ईश्वर कधीं देत नाहीं. चांगलें, वाईट, सात्त्विक, राजस, तामस या गुणांची वांटणी ईश्वरानें सर्व वर्गांत यथाप्रमाण केलेली असते.

कर्म हें उपजत नसून स्वेच्छेनें घडतें. वर्णांचीं कर्में बदलूं शकतात व तीं स्वेच्छेनें बदलण्याचा सर्वांना सारखा हक्क असला पाहिजे.

आपल्या गुणकर्मांच्या जोरावर मनुष्याला वाटेल तितकें उच्चस्थान मिळवितां येतें, व तें इतरांना मान्यहि करावें लागतें.

जमीन नांगरून खालवर करावी त्याप्रमाणें हल्लीं तरी व्यक्तिस्वातंत्र्य व कायद्याचें पाठबळ यांच्या योगानें कोणीहि हिंदु कोणताहि धंदा आपल्या इच्छेप्रमाणें करूं शकतो; व तो करण्यास त्याला प्रत्यवाय आहे असें कोणी मानीत नाहीं. यामुळें वर्णव्यवस्थेचें अधिष्ठान डळमळित झालेलें आहे. पण ही गोष्ट वाईट झाली असेंहि मला वाटत नाहीं. नवीन पीक येण्याला जशी नांगरणी अवश्य तसेंच समाज जिवंत राहण्यास गुणकर्मांच्या अनुरोधानें त्यांतील वर्गांची उलथापालथ होणें जरूर आहे. कारण कोणताहि एक वर्ग नेहमींच विद्येनें, संपत्तीनें, हक्कानें, अधिकारानें, कायद्याच्या सवलतीनें, धंद्याच्या चांगुलपणानें किंवा इतर कोणत्याहि रीतीनें कायमचा श्रेष्ठ व पुढारी असणें हें स्वाभाविक नाहीं, आणि न्याय्यहि नाहीं.

समाजांतील पुढारीपण जन्मसिद्ध नसून तें त्या वर्गाकडून समाजाला मिळणाऱ्या सेव्यसेवेच्या भरावर लाभावर अवलंबून राहील व राहिलें पाहिजे.

स्पर्शास्पर्श विचाराला खऱ्या धर्मांत स्थान आहे असें मला वाटत नाहीं. स्पर्शदोष हा धार्मिक न मानतां तो स्वच्छाच्छतेच्या कारणापुरताच मानणें सयुक्तिक होईल.

कोणींहि स्वतःची स्वच्छता किती ठेवावी याला दुसरा कोणी किती व कशी मर्यादा घालणार? एकलकोंड्या स्वभावाचा मनुष्य जसा इतरांचा उपसर्ग नको म्हणून दार लावून एकटा बसूं शकेल, तसाच फाजील सोवळा मनुष्यहि बसूं शकेल. तसें बसण्याचा त्याला हक्कहि आहे. स्वच्छतेची इच्छा धरणाऱ्याची ही गोष्ट आहे. पण अस्पृश्य म्हणून कोणी असूं शकतो व त्याच्या स्पर्शानें धर्म बुडतो असें मी मानीत नाहीं.

अनुलोम विवाह पद्धति ही स्मृतिग्रंथांतून सशास्त्र म्हणून सांगितली आहे, पण ती आज रूढ नाहीं. तथापि या पद्धतींत अमुक एक श्रेष्ठ व तदपेक्षेनें अमुक कनिष्ठ ही गोष्ट प्रमुखपणें नजरेस येणारी असल्यामुळें व तो एक प्रकारचा अन्याय असल्यामुळें त्या पद्धतीचा पुरस्कार करणें बरोबर नाहीं. बेटीव्यवहार सर्रास व्हावा असें कोणास म्हणा धयाचें असेल तर त्यानें अनुलोम प्रतिलोमाच्या भानगडींत न पडतां सर्वसामान्य युक्ति-वादानेंच तो उपदेशावा. पण रक्ताचा अभिमान जगांत कोणत्याहि लोकांत आढळतो, आणि जसा धर्माचा तसाच रक्ताचाहि अभिमान धरणें हें युक्तिसिद्ध आहे. उलट वधूवर पसंतीचें क्षेत्र अतिसंकुचित असल्यास सुप्रजाजननास प्रतिबंध होतो. याकरितां आपली वंशपरंपरा सुदृढ, सतेज अशी राहावी असें ज्याला वाटेल त्यानें वरील दोन मर्यादेंत पण त्यांतल्या त्यांत शक्य तितकी व्यापक दृष्टि ठेवून लग्नसंबंध करण्याची प्रवृत्ति ठेवावी. आज सर्व पोटजाती नष्ट होऊन मुख्य चार जाती लग्नसंबंधाकरितां उरल्या तरी या व्यापक दृष्टीनें मोठेंच कार्य होईल.

मला निरनिराळ्या वर्णांतील श्रेष्ठकनिष्ठ भाव धार्मिक दृष्ट्या मान्य नाहीं. वेदविद्या संस्कृत मराठी वाङ्मय, जपजाप्य, अनुष्ठानाचे प्रकार, पूजाविधि व हिंदुधर्माचे संस्कार यांवर सर्व हिंदूंचा सारखा हक्क असावा असें मी मानतों. बोलविल्याशिवाय इतर वर्णांचें पौरोहित्य ब्राह्मणानें याचनावृत्तीनें करूं नये व तें करण्याचा हक्क सांगूं नयेच नये असें माझें मत आहे.

नवीन राजकीय पद्धतींत सार्वजनिक जनतेला मतदारीचे हक्क प्राप्त झाल्यामुळें ब्राह्मणेतरांनीं ते हक्क बजावून आपले लोक सरकारी नोकरींत मानाच्या अधिकाराच्या जागांत जितके अधिक शिरतील तितके शिरवण्याचा प्रयत्न करणें ही गोष्ट स्वाभाविक आहे. तथापि त्यांनीं योग्य ती राष्ट्रीय दृष्टि न धरल्यास देशाचें नुकसान आहे, येवढें लक्षांत ठेवावें. ब्राह्मणांनींहि प्रथम शक्य तेथें राष्ट्रीय दृष्टीच्या ब्राह्मणेतराला सार्वजनिक कार्यांत पुढें करून त्याला मदत द्यावी व त्याचा पाठपुरावाहि करावा हें योग्य आहे. तथापि, जसा हिंदु तसाच ब्राह्मण या नात्यानें मला स्वज्ञातिविषयीं अभिमान अहर असणारच व आहे. ब्राह्मणेतरांनीं ब्राह्मणांना शिव्या दिल्यानें तो अभिमान कमी न होतां वाढण्याचाहि संभव आहे. खेडेगांवांतील कुळकर्णी व पाटील हे असले तर दोघेही धारखेच ग्रामकंटक होत, व यतनें बुडवावयाचें तर दोघांचीहि बुडवावी लागतील, असें माझें मत आहे. ब्राह्मणेतरांचे समारो वगैरे प्रकार मला सर्वस्वी निंद्य वाटतात; आणि ब्राह्मणेतरांनीं केलेले अत्याचार व प्रांतिक निंद्य प्रकार वगैरे गोष्टींबद्दल तर मी असें स्पष्ट

म्हणतों की, ब्राह्मणांना या गोष्टींचा जोरानें प्रतिकार करण्यांत आपले प्राण खर्ची घालावे लागले तरी ते खर्ची घालूनहि हा प्रतिकार केला पाहिजे. ब्राह्मणेतरांना सहानुभूति अवश्य दाखवावी. पण त्यांचा जुलूम, त्यांची जबरदस्ती काडीइतकी देखील सोसूं नये. घटास घट या नात्यानें वागून त्यांना आपलें तेज दाखवून बरोबर शिस्त लावावी.

—'संग्राम' (पुणें.) राज्यारोहण अंक १९२६ पृ. २२–२३

## ब्राह्मणसमाजाचें संघटन

रविवार ता. २७ सप्टेंबर (दसरा) रोजीं श्री. केळकर यांनीं मुंबईस 'ब्राह्मणसभे'च्या विद्यमानें श्री. अण्णासाहेब नेने यांचे अध्यक्षतेखालीं मुरारबागेच्या सभागृहांत वरील विषयावर व्याख्यान दिलें. त्याचा सारांश खालीं दिल्याप्रमाणें आहे.

विजयादशमीच्या दिवशीं सरस्वतीपूजन व सीमोल्लंघन आणि शस्त्रपूजन हे समारंभ होतात. पैकीं सरस्वतीपूजन हें ब्राह्मणसमाजापुरतें पाहिलें असतां अनादि आहे. मुंबईत सीमोल्लंघनाला जागा नाहीं असें अध्यक्षांनीं सांगितलें. समुद्रवलयांकित शहरांत असें होणारच! पण प्रत्यक्ष सीमोल्लंघनापेक्षां एका वेगळ्या प्रकारचें सीमोल्लंघन ब्राह्मण-समाज आज शेंकडों वर्षें करीत आला आहे. कारण मुलूखगिरी व शस्त्रपूजन हीं ब्राह्मणांनीं केल्याचा पुरावा ऐतिहासिक कालीं तर मिळतोच, पण पुराणांतरींहि मिळतो. आपद्धर्म म्हणून या गोष्टी ब्राह्मणांनीं केल्या, असें मानलें तर हा आपद्धर्म शेंकडों वर्षें या समाजावर येऊन पडला आहे असें म्हटलें पाहिजे!

विद्याभ्यासाप्रमाणें राज्यकारभार व शस्त्रग्रहण म्हणजे वीरवृत्ति या गोष्टी ऐतिहासिक कालांतील ब्राह्मण शेंकडों वर्षें करीत असतां, त्यासंबंधानें हलीं क्वचित् कोणास शंका येते. ब्राह्मण–ब्राह्मणेतर–वादामुळें ब्राह्मणांचें खरें कर्तव्य काय असाहि वाद पुण्यांतील कांहीं ब्राह्मणवर्तुळांतच झाल्याचें मीं नुकतेंच वाचलें. या वादांतील एका पक्षाला 'भिक्षापक्ष' असें नांव दिलें तर दुसऱ्या पक्षाला 'लक्षसंचयपक्ष' असें नांव द्यावें लागेल. पण हीं दोनहि मतें एकांतिक असून माझ्या मतें ब्राह्मण–कर्तव्याविषयीं खरा सत्पक्ष म्हणजे 'संतोषयुक्त–स्वावलंबन–पक्ष' हा होय. मोठ्या सार्वजनिक कार्याकरितां ब्राह्मणानें हवा तेवढा मोठा पदर पसरून वाटेल तितकी भिक्षा मागावी. पण स्वतःच्या आणि उपजीवी जनांच्या उदरपोषणार्थ ब्राह्मणानें कधींहि भिक्षा मागूं नये, तर इतरांप्रमाणेंच कोणतीहि शास्त्रोक्त वृत्ति स्वीकारून आपला चरितार्थ स्वावलंबनाच्या तत्त्वावर चालविला पाहिजे असें माझें मत आहे. स्वतःकरितां भिक्षा मागणें ही गोष्ट ब्राह्मणालाहि अत्यंत लाजिर-वाणी होय. उलटपक्षीं संतोष सोडून अपरिमित द्रव्यसंचय करीत बसणें ही गोष्ट देखील ब्राह्मणाला कमीपणा आणणारी आहे. 'असंतोषात् द्विजा नष्टाः संतोषाच्च महीभृतः' हें वचन मला मान्य आहे. हें वचन सर्व द्विजांना लागू असलें तरी तें मुख्यतः ब्राह्मणांनाच अधिक लागू पडतें.

स्मृतिकारांनीं ब्राह्मणांचें वैशिष्ट्य किंवा श्रेष्ठत्व प्रतिपादिलें असलें तरी तें भिक्षावृत्तीत

कर्तव्य केलेंच पाहिजे, तरच ब्राह्मणांनीं उञ्छवृत्तीला चिकटून राहणें शक्य होईल. पण प्रस्तुत काळांत सर्वच वर्णांनीं आपले धर्म स्वेच्छेनें सोडून ही व्यवस्था मोडली आहे. याचें कारण, माझ्या मतें असें कीं, ही व्यवस्था अमलांत राहण्याचा जो मूळ आधार तोच सर्वस्वीं नष्ट झालेला आहे.

मुसलमानांच्या स्वाऱ्या होऊन त्यांची बादशाही भरतखंडांत स्थापिली गेली व पुढें 'गण्डस्योपरि पिटिका संवृत्ता' या न्यायानें ख्रिस्ती लोकांचें अधिराज्य हिंदुस्थानावर आलें. अशा स्थितींत जुन्या ध्येयात्मक वर्णधर्माला किंवा जातिधर्माला चिकटून कोण कसा बसणार? रघुवंशांत वर्णिल्याप्रमाणें, वरतंतुशिष्य कौत्स हा गुरुदक्षिणेची भिक्षा मागण्याकरितां क्षत्रिय राजाकडे गेला असतां राजानें किती बारीकसारीक गोष्टीविषयीं कुशल प्रश्न विचारून परामर्श घेतला हें पाहिलें म्हणजे चातुर्वर्ण्यात्मक सुव्यवस्थेचें खरें काव्य कल्पनेंत उतरतें. पण कोणता मुसलमान बादशहा किंवा ख्रिस्ती गव्हर्नर ब्राह्मण अतिथीला आज असले कुशल प्रश्न विचारतो? स्वधर्मीय राजा असला म्हणजे अशा गोष्टी थोड्याबहुत घडूं शकतात हें क्षत्रियकुलावतंस श्रीशिवाजीमहाराज यांच्या उदाहरणावरून दिसून येतें. पण स्वदेशी अधिराज्य ज्या दिवशीं भरतभूमींतून नष्ट झालें त्या दिवसापासूनच आपद्धर्माला सुरुवात झाली व तो अजूनहि चालूच आहे. शाक्तसंप्रदायांतील एक वचन असें आहे कीं, 'प्रवृत्ते भैरवे चक्रे सर्वे वर्णा द्विजातयः। निवृत्ते भैरवे चक्रे सर्वे वर्णाः पृथक् पृथक्' परधर्मी अधिराज्य हें उपमेपुरतें एक भैरव-चक्रच होय. याचा लाक्षणिक अर्थ भीषण परिस्थिति इतकाच घ्यावा. हें चक्र प्रवर्तित झाल्यापासून सर्व वर्ण जवळ जवळ एकच होत आले आहेत. कोणताहि वर्ण आपला शास्त्रोक्त धर्म पाळीत नाहीं. त्याला आपद्धर्माचा स्वीकार करावा लागला.

आपद्धर्मांत ब्राह्मणांनीं प्रथम क्षत्रिय-धर्म स्वीकारून पहावा व त्यानेंहि न भागेल तर नंतर वैश्यधर्माचाहि अंगीकार करावा अशी शास्त्राची सवलत आहे. यामुळें ब्राह्मणांच्या नित्य वृत्तीशिवाय ग्राम-नगररक्षण, शस्त्रास्त्रधारण, कृषि, गोरक्षण, वाणिज्य वगैरे गोष्टी करण्यास त्याला प्रतिबंध नाहीं. हा सिद्धांत आपण व्यवहारानेंहि खरा करून दाखवूं लागलों आहों! पण जी गोष्ट ब्राह्मणांची, तीच इतर वर्णीयांचीहि आहे. क्षात्रकर्म क्षत्रियाचें पुष्कळसें लोपलें. त्याला वाव उरला नाहीं. वैश्यांनीं शिक्षण मिळविण्याला व नोकरपेशा पत्करण्याला सुरुवात केली आहे. ज्यांना आपण शूद्र मानतों, ते खरोखरच शूद्र ठरतात कीं कांहीं उच्चवर्ण त्यांना लागतो याचाहि विचार झाला पाहिजे. शिवाय शूद्रांनीं नुसती सेवाच करावी हें म्हणणें आतां कोण मानील? शूद्रांना धनसंचय वर्ज म्हणून स्मृतिग्रंथांत सांगितलें आहे; पण एकादा शूद्र बुद्धिवान व मेहनती निघून तो श्रीमान झाला तर या दिवसांत किंवा केव्हांहि त्याच्या धनसंचयाला प्रतिबंध करतां येईल काय व तें करणें न्यायाचें होईल काय? तात्पर्य, वर्णाश्रम धर्माची गल्लत झाली आहे, व नव्या आर्थिक व राजकीय परिस्थितींत ती अपरिहार्यहि आहे. हल्लीं समाजाचा खरा पाया म्हटला म्हणजे स्वावलंबनी व्यक्ति हाच होय, व नव्या युगांत स्वावलंबन म्हटलें म्हणजे तें साधण्याला जुन्या वर्णधर्मांना सर्वस्वीं चिकटून बसून चालावयाचें नाहीं.

कोणत्याहि वर्णांतील मनुष्यानें जरूर ती मेहनत करून आपलें व उपजीवी लोकांचें पालनपोषण केलें पाहिजे. ब्राह्मणांनीं भिक्षा मागावयाची हें तत्त्व निवडक किंवा संन्यस्त ब्राह्मणांपुरतेंच मानावयाचें कीं सरसकट सर्व समाजापुरतें ? ब्रह्मचर्याश्रमांत म्हणजे विद्यार्जनकालांत भिक्षा शोभेल व कोणी ती घालील. पण ज्यां लग्न करून ब्राह्मण गृहस्थाश्रमी बनला तरी त्यानें बरोबर बायको घेऊन भिक्षेला जावें, आणि पुढें मुलें झालीं म्हणजे त्यांचेंहि लटांबर बरोबर घेऊन भिक्षेला निघावयाचें कीं काय ? ब्राह्मण-समाजाची खानेसुमारी महाराष्ट्रांत ४१५ लक्ष तरी असेल; मग इतके सर्व भिकारी भीक मागत सुटले तर त्यांना भिक्षा कोण व किती घालील ? गरीबीचें व्रत मुद्दाम पाळणारा एखादा उच्च विचारांचा मनुष्य निघेल, पण तोहि स्वाभिमानी असेल तर निदान आपली उपजीविका भिक्षेवर करण्याला शरमिंदा झाल्याशिवाय राहणार नाहीं. तसेंच ब्राह्मण-समाजरक्षणाकरितां त्यानें लोकांचे तोंडाकडेच पाहावयाचें कीं काय ? क्षत्रियांनीं ब्राह्मणांचें रक्षण करावें हें तत्त्व बाजूस राहून कुंपणानें शेत खावें त्याप्रमाणें प्रकार पडूं लागला तर ब्राह्मणानें स्वतः आत्मरक्षणाचा उपाय योजलाच पाहिजे. इतर सर्व जाति आपआपलें नांव घेऊन उघडपणें संघटन करूं लागल्या असतां ब्राह्मणसमाजानें आपलें संघटन कां करूं नये ! पण ब्राह्मणसमाजांत संघटन व्हावयाचें तर त्यांनीं आपल्यांतील सर्व पोटभेद नाहींसे करून व्यापक दृष्टीनें वागावयास शिकलें पाहिजे.

कोणाचेंहि श्रेष्ठत्व हें दुसऱ्यांनीं मानण्यावर अधिक अवलंबून असतें, व त्या श्रेष्ठत्वाच्या अहंकाराला दुसऱ्याच्या भावनेच्या उपमर्दानें अधिकच धाटिंट रूप येतें. आपद्धर्माच्या सबबीवर इतर वाटेल ते धंदे करावयास लागून शिवाय इतर वर्णांच्या धर्मविधींमध्यें पुरोहितत्व करण्याचा हक्क ब्राह्मण सांगूं लागेल, व पुरोहिताला न बोलावलें तरी दक्षिणा तरी दे असा वृत्तीचा संबंध जोडूं पाहील, तर तो हक्क म्हणून कायदेशीर ठरला तरी ती दक्षिणेची मागणी निंद्यच ठरेल. दुसऱ्याच्या धर्मकृत्यांत पडण्याचा–त्याच्या व त्याच्या ईश्वराच्या दरम्यान अंतराय होऊन उभें राहण्याचा–ब्राह्मणाचा हक्क तरी कसला ? विद्यासंपन्न असल्याकारणानें आपण होऊन कोणीं आदरानें धर्मकृत्य चालविण्यास बोलाविलें तरच ब्राह्मणानें जावें, पण अनाहूत जाऊं नये व न बोलावलें असतां हक्कहि सांगूं नये. धार्मिक कृत्य सफल होणें न होणें हें जो जसें मानील तसेंच तें होईल.

स्वार्थत्याग हाच इतर रीतीनेंहि संघटनेचा पाया होय ! व हा स्वार्थत्याग झाला तरी ज्या कृत्रिम भेदांनीं दुळबेपणा आला व सामाजिक हिताची दृष्टि संकुचित झाली ते काढून टाकणें इतकाच होय. जपानांतील खानदानीची मिजास भोगणाऱ्या सरदारांनीं जेव्हां आपली खोटी श्रेष्ठत्वबुद्धि टाकिली व विशिष्ट हक्क सोडून देण्याची तयारी दाखविली तेव्हांच जपानांत राष्ट्रीयत्व हें पायावर उभें राहिलें. ब्राह्मणवर्गानेंहि तोच कित्ता गिरविला पाहिजे. उलट पक्षीं हल्लींच्यासारख्या बिकट प्रसंगीं ब्राह्मणाला परावलंबी व परोपजीवि हो असें सांगणें म्हणजे त्याला आत्मघाताचा चरकट उपाय सांगणेंच होय !

—केसरी ६ ऑक्टोबर १९२५

## भट्टप्रभु-पाध्ये

आजचा प्रसंग मी अनेक दृष्टींनीं अपूर्व मानतों. गोवें प्रांतांतील एका विशिष्ट ज्ञातींतून वगळल्या गेलेल्या एका उपवर्गाला आपल्यावर पडलेल्या बहिष्काराची दुःसहता भासूं लागली. त्यानें त्या ज्ञातिकडे आपलें सामाजिक दुःख कळकळीनें निवेदन केलें. त्या ज्ञातीला सहानुभूति उत्पन्न होऊन तिनें तो बहिष्कार दूर करण्याविषयीं आपली इच्छा प्रदर्शित केली. या ज्ञातीच्या या दोन अंगांकडून फिरून एकजीव होण्याच्या प्रयत्नाला श्रीमच्छंकराचार्य यांनीं आपल्या अधिकाराचा योग्य उपयोग करून संमति दिली. आणि हा बहिष्कार दूर झाल्याची गोष्ट ठरल्यास जगप्रसिद्ध करण्याकरितां आजची ही सार्वजनिक सभा भरत आहे. वर ज्या गोष्टींचा निर्देश मी केला त्या माझ्या मतें हिंदु समाजस्थितीला उपकारक व उत्कर्षजनक अशा आहेत. अशा सुप्रसंगीं भरणाऱ्या सभेचें अध्यक्षस्थान मीं घेऊन सभेचें कार्य करावें असें श्रीमच्छंकराचार्यांचें आज्ञापत्र मला आलें हा त्यांचा मजवर मोठा अनुग्रह झाला असेंच मीं मानतों. कारण हिंदुसमाजाच्या सुस्थितीला कारणीभूत होणाऱ्या अशा कार्यांत प्रमुखपणें भाग घेतां येणें याहून हिंदुमात्राला अधिक भाग्य कोणतें लाभणार ?

आजच्या सभेचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याची आज्ञा श्रींकडून मला झाली यांत माझा बहुमान झाला हें तर खरेंच. परंतु माझ्यासारख्या एकाद्या व्यक्तीचा बहुमान करण्यापेक्षांहि अधिक उदात्त असाहि एक हेतु श्रींचा असावा असें मला वाटतें. तो हेतु हा कीं, महाराष्ट्राच्या नैर्ऋत्य दिशेच्या अगदीं एका कोपऱ्यांत ही जी इष्ट सामाजिक सुधारणा श्रींच्या कृपेनें व स्थानिक जनतेच्या स्फूर्तीनें आज घडून येत आहे, तिची प्रसिद्धि मजकडून सर्व महाराष्ट्रभर यथाशक्ति केली जावी. आणि आजच्या सभेचें कार्य केवळ ठरावानेंच नव्हे तर प्रत्यक्ष कृति व व्यवहार यांनीं फलित झालेलें पाहतांच मी तें एक एकंदर हिंदुसमाजाला अनुकरणीय उदाहरण म्हणून त्याची शक्य तितकी प्रसिद्धि व पुरस्कार करीन. ही प्रसिद्धि करण्याचें एक साधन म्हणजे केसरी पत्राचें संपादकत्व हें मला सुदैवानें लाभलेलें आहे; व त्या साधनाचा उपयोग या कामीं मी मोठ्या आस्थेनें व आनंदानें करीन.

या प्रकरणांतील जे कागदपत्र मला पाहावयास मिळाले त्यावरून असें दिसतें कीं, कांहीं एका क्षुल्लक कारणावरून पद्ये नामक पंचद्रविडान्तर्गत ब्राह्मण ज्ञातींतील कांहीं लोक सुमारें दोनशें वर्षांपूर्वी बहिष्कृत झाले व यदृच्छेनें त्यांना भट्टप्रभु हें नामाभिधान मिळालें. या दोनहि ब्राह्मणवर्गांत गोत्रप्रवर, कुलदेवता, धंद्यांचा प्रकार, मतानुष्ठानाचें आचरण, आहारपानादिकरून मुख्य व इतर किरकोळ आचार आणि रीतरिवाज हीं सर्व अन्वय-व्यतिरेकानें समान असल्याचें पुराव्यानें जवळ जवळ निर्विवादपणें शाबीत आहे. असें असतां बहिष्काराचें मूळ कारण शोधूं जातां कागदोपत्रीं किंवा इतर निश्चयात्मक पुराव्यानें तें कारण उमगत नाहीं. जें उमगतें तें फक्त एका दंतकथेवर अवलंबून आहे; व त्या दंतकथे-

तरि इतकच आढळतें की, सुमारें दोनशें वर्षांपूर्वी या सप्तकोशीतील लोकांना श्रींच्या तीर्थ-प्रसादास निमंत्रण आलें, असतां कांहीं लोक उशीरां येऊन पोंचल्यामुळें त्यांना मुख्य पंगत साधली नाहीं; म्हणून त्यांना मागच्या पंगतींत जेवावें लागलें. या पंक्तिभेदाला उभय पक्षाच्या स्वभावदोषामुळें बहिष्काराचें स्वरूप आलें, व तो बहिष्कार दूर करण्याचा प्रयत्न पुढें लवकर न झाल्यामुळें तो बहिष्कार जवळ जवळ वज्रलेप बनून भद्रप्रभूंचें मूळच्या ज्ञातींतून कायमचें उच्चाटन झालें. बहिष्कृत झालेल्या या समाजानें आपला वेगळेपणा ही प्रथम स्वाभिमानाची खूण म्हणून कदाचित् मानली असेल. पण कदाचित् या बहिष्काराचा त्यांच्यावर जुलुम झाला असेल हेंहि संभवनीय आहे. तें कसेंहि असो, असें कोणतेंहि कारण या बहिष्काराचे संबंधांत कोणास दाखवितां येत नाहीं की, तो बहिष्कार पूर्वी पडला तेव्हां सयुक्तिक असला किंवा नसला तरी आजहि तो तसाच कायम राहावा. कारण समाजाचीं अशीं शकलें पडल्यानें हानि होते ती एकाच पक्षाची होते असें नाहीं, तर ती हानि उभयतांचीहि सारखीच होते. कोणत्याहि बहिष्काराचें योग्य कारण म्हटलें म्हणजे पतितत्व, व तें विशेष प्रकारच्या पापाचरणामुळें किंवा समाजघातक अनिष्ट अशा आचारामुळें प्राप्त होतें. भद्रप्रभु या ज्ञातीच्या बहिष्काराला तो पडला तेव्हां असलें एकादें बलवत्तर कारण घडून आल्याचें दिसत नाहीं. आणि त्यांचा आजचा आचारविचार पाहावा तर तो निरपवाद व वरे ब्राह्मणवर्गाशीं समरस होण्यासारखाच असल्याचा पुरावा अनेक सद्गृहस्थांनीं दिलेला आहे. असें असल्यानें प्रस्तुतचा बहिष्कार निष्कारण व निरर्थक ठरतो; आणि भद्रप्रभु वर्गाकडून तो बहिष्कार निघून जावा अशी इच्छा प्रदर्शित होऊन प्रत्यक्ष तशी अर्जरूपानें विनंति करण्यांत आल्यावरहि तो झाडून न टाकणें हा मोठाच सामाजिक अन्याय होईल.

हिंदुसमाजांतील ज्ञातिबंधनें मोठीं कठोर असतात. तीं सहसा मोडून निघत नाहींत व शिथिलहि होत नाहींत असा अनुभव आहे. होईल तितकें एकानें दुसऱ्यापासून वेगळें व स्वतंत्र राहावें अशी प्रवृत्ति हिंदुधर्मीयांत बहुशः सनातनच आहे हो गोष्ट खोटी नाहीं. तथापि ही प्रवृत्ति अयुक्तिकपणें परमावधीस जाऊन समाजघात होतो असें दिसलें किंवा बहिष्कारामुळें उद्वेगजनक परिस्थिति उत्पन्न होते असा समय आला तर या समाजाच्या मनांत तत्संबंधीं प्रतिक्रियाहि संभवते असा पूर्वापार अनुभव आहे. वंश, ज्ञाति, आचारविचार, संस्कृति व धर्माचरण यांची शुद्धता राखण्याची तीव्र इच्छा अबाधित राखीत असतांहि हिंदु समाजानें पतितपरावर्तनाची परंपरा अबाधित राखलेली आहे. जुन्या काळीं हिंदुस्थानांत आलेल्या कांहीं ग्रीक लोकांना हिंदुधर्माची दीक्षा देऊन त्यांना व्यवहारांत समाविष्ट करून घेतल्याचा दाखला आढळतो. अर्थात् जो धर्म म्लेंच्छ व यवन यांना स्वकीय बनवूं शकतो तो आपल्याच समाजांतील भ्रष्ट व पतित लोकांना फिरून स्थानापन्न करण्याची अनुज्ञा देईल यांत काय आश्चर्य ? आणि ह्यांप्रमाणें उपकार अशीं ग्रामण्यें म्हणजे ग्रामस्थ लोकांच्या चळवळी घडून येऊन एक वेळ पडलेले बहिष्कार दूर झाल्याचीं अनेक उदाहरणें दाखवितां येतील.

ब्राह्मण समाजाची हल्लींची विकट स्थिति लक्षांत घेतां ब्राह्मण समाजांत जी फूट पडलेली आहे ती अशी उपकारक ब्रामण्याची चळवळ करून भरून काढणें हें समाजांतील पुढाऱ्यांचें कर्तव्य ठरतें. वेदशास्त्रसंपन्न पणशीकरशास्त्री यांच्या शब्दांनीं बोलावयाचें तर " कोणत्याहि कारणांनीं फुटून वेगवेगळे झालेले समाजाचे तुकडे प्रेममय वज्रलेपानें सांधून विस्कळित झालेला समाज सुसंघटित करण्याला सर्वांनीं झटावें. जुन्या ब्रामण्यांना चिकटून बसण्याची ही वेळ नाहीं. आज जवळ जवळ तीनशें लोकांचा भद्रभूंचा समाज आम्ही हकनाहक बाहेर ठेवून आमचा स्वतःचा समाज विकल आणि निर्बल करीत आहों. आपल्यांतीलच चाळीस घरें व आपल्या रक्तमांसाचे तीनशें लोक कुचंबत ठेवून त्यांची गैरसोय करून व आपलें सामर्थ्य क्षीण करून घेणें मुळींच शहाणपणाचें होणार नाहीं. " प्रसंगोपात्त बहिष्कृत झालेला ज्ञातिखंड फिरून मन मोठें करून स्वकीयांत समाविष्ट करून घेणें हें दुर्बल मनाचें लक्षण नसून सुदृढ मनाचें व आत्मप्रत्ययाचें लक्षण आहे. जातीला जर गंगेची उपमा आपण देतों तर मनांत आणल्यास जातीला गंगेप्रमाणेंच जें अशुद्ध तेंहि शुद्ध करून घेण्याचा पराक्रम कां करतां येऊं नये ?

केवळ दयाबुद्धीनेंहि ही गोष्ट प्रस्तुत प्रकरणीं पडून येणें अपरिहार्य ठरतें. तीनशें लोकांच्या या समाजानें बहिष्कृत स्थितींत दिवस कसे काढावेत ? पंक्तिभोजनासारखें सामाजिक सुख नाहीं. व हें सुख भद्रभूसारख्या निरपवाद आचारांच्या लोकांना कायमचें अंतरविणें यांत कोणाचा कोणता पुरुषार्थ साधतो ? पण पंक्तिभोजनाचा आनंद ही एक क्षुद्र गोष्ट मानली तरी बहिष्कृत झालेल्या या तीनशें लोकांच्या समाजानें आपल्या मुलामुलींचीं लग्नें कशीं करावीं याचाहि विचार सदय बुद्धीनें व्हावयास नको काय ? कोणताहि समाज संख्येनें कांहीं मर्यादेपलीकडे आकुंचित झाला म्हणजे योग्य समयीं मुलांमुलींचीं लग्नें होणें अशक्य होतें, व वय, कुटुंबस्थिति, पात्रापात्रता या गोष्टींचें तारतम्य संभाळून वधूवरांची निवड करतां न आल्यास पुढें कौटुंबिक दुःख वाढून ठेवलेलें असतें हें सांगावयास नकोच. कोंडवाड्यांत घातल्याप्रमाणें अतिसंक्षिप्त झालेल्या अशा किती तरी जातींचीं उदाहरणें महाराष्ट्रांत व विशेषतः गुजराथेंत दाखवितां येतील. तात्पर्य, राष्ट्रीय भावनेच्या मोठमोठ्या गोष्टी आपण बोलत असतां समाजामध्यें निष्कारण पडलेले तट ढांसळून टाकण्याची जर इच्छा आपणाला झाली नाहीं, किंवा इच्छा होऊनहि क्रिया घडली नाहीं, तर ती राष्ट्रीय बुद्धि खोटी किंवा दिखाऊ असें म्हणण्यास हरकत नाहीं.

हे तट ढांसळून टाकण्यामध्यें निवळ स्वेच्छाचाराची कोणाची बुद्धि असेल तर गोष्ट वगळी. कोणीहि समंजस समाजसुधारक घेतला तर तो आपल्या समाजाची संस्कृति उच्च पदावरून ढांसळावी असें इच्छीत नाहीं. तथापि समाजांत वर्ग, उपवर्ग, तट, हद्दी, कुंपणें वगैरे अस्वाभाविक प्रकार व तेहि निष्कारण घालणें किंवा कारण सरल्यावरहि राहूं देणें यांत समाजाचें संगोपन किंवा संवर्धन साधत नाहीं. उलट समाजांत जितकी फूट तितका समाज दुबळा राहतो, परस्पर सहानुभूति व सादात्म्यता कमी होते, निराधार अहंकार मनांत राहतो, व एकंदरीनें समाजाचें अनहित होतें. सामाजिक यंत्राची गति बाहेर

फेंकण्याची नसावी तर आंत ओढून घेण्याची असावी. आपली पृथ्वी ही अत्यंत वेगानें परिभ्रमण करीत असते. तथापि तिच्या ठिकाणीं आकर्षण शक्ति आहे म्हणूनच आपण सर्व स्थिरचर पदार्थ तिजवर राहतों व नांदतों; विषम संस्कृतीचे लोक एकदम एकजीव करणें हा जसा अविचाराचा एक प्रकार तसाच समान संस्कृतीचे लोक निष्कारण दूर ठेवणें हाहि अविचाराचा दुसरा एक प्रकार होय. आचारपरंपरा व रूढि यांची सर्वमान्यता प्रसिद्ध आहे. हिंदुधर्मशास्त्रांचा तो पाया आहे. तथापि त्या हिंदुधर्मशास्त्रांतच असेंहि सांगितलें आहे कीं, योग्य कारण उपस्थित असतां आचार बदलण्यास प्रत्यवाय नाहीं. शिवाय बहिष्काराच्या शिक्षेविषयीं तर असें म्हणतां येईल कीं, शिक्षाविषयक आचार जितका जुना तितका तो बदलण्यास अधिक पात्र होतो. कारण अशी कोणतीहि शिक्षा नाहीं कीं जिला अंत नाहीं. किंबहुना, शिक्षेचा काल जसजसा अधिकाधिक वाढत जातो तसतशी दया, अनुकंपा, सहानुभूति या भावना उदित होऊन शिक्षा हा ज्यांचा परिणाम त्या रागद्वेषादि भावना कमी कमी होत जातात. स्मृतिग्रंथांतील प्रायश्चित्त-विभाग स्मृतिकारांनीं याच तत्त्वावर रचला आहे. तें मुख्य तत्त्व असें कीं, प्रायः असें कोणतेंहि पाप नाहीं कीं ज्याची निष्कृति प्रायश्चित्तानें होत नाहीं. महाराष्ट्रांतील शुद्धिसंस्काराचा इतिहास हीच गोष्ट सांगतो. कबुली दिलेल्या किंवा सिद्ध झालेल्या पातकासंबंधानें ही गोष्ट झाली. पण पुष्कळ सामाजिक बहिष्कार पापमूलक नसतात. त्यांना वरिष्ठानें दिलेल्या शिक्षेच्या स्वरूपापेक्षां बरोबरीच्या लोकांनीं आपसांतील भांडणामुळें एकमेकांना दूर राखल्याचेंच स्वरूप असतें. अशा ठिकाणीं कालांतरानें तें भांडण मिटावें व बहिष्कार बंद व्हावे हेंच समुचित आहे. सत्य व्यवहार कोणता व असत्य व्यवहार कोणता याचा विवेक जागृत ठेवणें हा एक मोठा पराक्रम आहे.

प्रस्तुत बहिष्कारप्रकरणीं भट्टप्रभू ज्ञातीनें आज दोन अडीच वर्षें बहिष्कारदुःख सोसून एक प्रकारची तपश्चर्याच केली; ही लक्षांत घेऊन सरसजातीय अशा मोठ्या वर्गानें त्याला अभीप्सित वर मागण्याची आज्ञा केली; त्या आज्ञेनुसार आपणाला पंक्तिपावन व शरीरसंबंधार्ह करून घेण्याचा वर त्यानें मागितला; तो त्याला देण्याची त्याच्या बंधुवर्गानें इच्छा प्रदर्शित केली. हा सर्वच कथाभाग अद्भुतरम्य वाटतो, व त्यापासून समाजसुधारणेविषयीं उत्साह बाळगणाऱ्यांना आशा वाटूं लागेल असें मी आनंदानें म्हणतों. सज-धे या विषयासंबंधानें जे कागदपत्र आले त्यांत इकडील समाजांपैकीं कांहीं विद्वान् लोकांचे अभिप्राय मी वाचले व ते वाचून मला फार आनंद झाला. कारण युक्तिसिद्ध समाजसुधारणेला लोकमान्यता मिळावयाची तर ती जुन्या पद्धतीच्या शास्त्रीपंडितांकडून मिळाली तरच मिळेल, जुन्या शास्त्रीपंडितांच्या आशीर्वादाशिवाय हें कार्य सिद्धीस जावयाचें नाहीं. वर उल्लेखिलेल्या अभिप्रायांत, शास्त्राधार घेऊन समाजघटनेचा युक्तिवाद ठाकठीक बसविण्याचें काम अभिप्राय देणाऱ्यांनीं निःपक्षपातीपणानें व प्रांजल मनानें केलें आहे. समाजाच्या आचारांत अतिव्याप्ति व अव्याप्ति हीं पदोपदीं पहात असतें. परंतु मधून मधून पुढें येऊन युक्ति व आचार दोघी समरसशी सिद्ध करणें हें काम तत्त्वदर्शन विद्वानांचें आहे.

आमची ही सभा देखील या प्रांताचे अभिमानी विद्यमान शास्त्रीपंडित यांच्या साहाय्याशिवाय घडून आलीच नसती असें मला वाटतें. आणि या सभेचें हें उदाहरण इतर प्रांतांना अनुकरणीय वाटेल असें मी खात्रीनें सांगतो. पण याहून विशेष महत्त्वाचें साहाय्य श्रीमज्जगद्गुरु श्रीशंकराचार्य यांचेकडून झालें असेंच म्हटलें पाहिजे. शंकराचार्य हे संन्यासवृत्ति धारण करून, आमच्या सर्व व्यवहारोपयुक्त वस्तूंचा त्याग करून, समाजांत कालपरिस्थितीनें होणारें मालिन्य नाहींसें करण्याकरितांच बसले आहेत. त्यांना पक्षपात करण्याचें कारण नाहीं. अपेक्षित धार्मिक हक्क, नवीन कालांतील शिष्यांनाहि येणाऱ्या धार्मिक अडचणींचें दूरीकरण, या सर्व गोष्टी जशा शास्त्रीय परिस्थितीनें शक्य असतील तशी वेळोवेळीं या विषयांची मागणी संघशः केली पाहिजे. जर मागणीच नाहीं तर त्यांनीं मठांत बसून नुसतीं आज्ञापत्रें काढून उपयोग काय? समाजाच्या गरजा विद्वानांपुढें समाजानें आणाव्या, त्यांचा विचार विद्वान शिष्टांनीं करावा, साधकबाधक प्रमाणांची एकवाक्यता करून त्या श्रींकडे पाठवाव्या, श्रींनीं पुनः "अलुब्धधर्मकाम" विद्वान सामाजिकांची त्या प्रकरणीं योजना करावी, व त्यांनीं केलेल्या निर्णयाचा निर्विकार चित्तानें निकाल द्यावा. परस्परांची गरज परस्परांना आहेच, व ध्येय केल्यानें ती वाढत्या प्रमाणांत राहील याबद्दल आम्हांस मुळींच संशय वाटत नाहीं.

शंकराचार्यांच्या पीठांचा उपयोग जनतेस दोन प्रकारांनी आहे—(१) संसारविरक्त लोकांकरवीं वेदान्त ग्रंथांचा अभ्यास करविणें. (२) समाजाच्या धार्मिक, नैतिक, सामाजिक अडचणी ज्या ज्या वेळीं उत्पन्न होतील त्या त्या वेळीं तिन्हाईत इतकेंच नव्हे तर अधिकारी धर्मगुरु म्हणून त्या दूर करणें. याकरितांच जगद्गुरु संन्यासी असावा असा मठसंप्रदाय आहे. त्या संप्रदायाला अनुसरून श्रींकडून व्यवस्था झाली तर जनता जी प्रसंगविशेषीं स्वकर्तव्यपराङ्मुख होते ती होणार नाहीं. समाज व आचार्य हे एकमतानें परस्परांचीं कार्यक्षेत्रें ओळखून वागल्यास आजच्या या प्रसंगासारखे सुप्रसंग पुष्कळ येतील व "परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ" असें होऊन उभयतांसहि हितकारक होईल.

असो. वरील सर्व भाषण मी केवळ प्रास्ताविक म्हणून केलेलें आहे. आणि तेंहि मजपुढें आलेल्या कागदपत्रांच्या आधारावरच केलेलें आहे. त्यांत जी चूकभूल असेल ती कोणी माझ्या नजरेस आणून दिल्यास तिचा स्वीकार करण्यास मी सिद्ध आहें. शिवाय ही गोष्ट माझ्या लक्षांत आहे कीं, मी या ठिकाणीं आलों तो केवळ या सभेचा नियोजित अध्यक्ष याच नात्यानें आलेला आहें, प्रस्तुत प्रकरणीं अधिकृत न्यायाधीश म्हणून नव्हे. या प्रकरणीं न्यायाधीशाचा अधिकार व न्यायनिर्णय प्रत्यक्ष व्यवहारांत आणण्याचा अधिकार इकडील जनतेचाच आहे. तो अधिकार बजावण्याकरितांच आजची ही सभा भरविण्यांत आलेली आहे. तींत साधकबाधक विचारांची चर्चा कोणास करावयाची असल्यास त्यास संधि अवश्य मिळेल. शेवटीं विद्वान शास्त्रीपंडितांची मतें आणि सभेंतील वक्त्यांचीं भाषणें ऐकून ही सभा जो निर्णय देईल किंवा जो ठराव करील त्या-

प्रमाणेंच या प्रकरणीं इकडील जनतेचें मत आहे असें समजण्यांत येईल. श्रीशंकराचार्य हे फक्त सत्स्फूर्ति व आशीर्वाद देऊं शकतील. विद्वान शास्त्रीपंडित हे शास्त्रार्थ सांगूं शकतील; माझ्यासारखा एखादा प्रयस्थ मनुष्य लौकिक दृष्ट्या ग्राह्याग्राह्य काय हें सांगूं शकेल; तथापि कोणतीहि गोष्ट जनतेला ग्राह्य वाटून मनाला पटेल तरच ती अमलांत येऊं शकेल. इंग्रजींत अशी एक म्हण आहे कीं, " तुम्हांला घोड्याला पाणवठ्यावर नेतां येईल, पण पाणी पिणें न पिणें हें स्वतः घोड्यानेंच केलें पाहिजे. " या म्हणीप्रमाणें प्रस्तुत प्रकरणीं न्याय्य व समाजहित-साधक अशी जी गोष्ट असेल ती ही सभाच ठरवील, व या सभेला ज्या जनतेचे प्रतिनिधि आले आहेत तीच पार पाडील.

—कपिलेश्वर ( फोंडा गोवा ) केसरी १९२६ एप्रिल २७.

## अ. भा. हिंदु-महासभा

हिंदु-महासभेच्या या अधिवेशनाचें अध्यक्षस्थान मला देऊन आपण जो माझा सन्मान केला त्याबद्दल मी आपला आभारी आहें. या मानाचें केवळ मानाकरितां मला महत्त्व वाटत नसून आजकाल आपण ज्या ज्ञातिनिविष्ट वादांत इच्छेनें वा अनिच्छेनें सांपडलों आहों त्याविषयीं माझें मत सांगण्याची संधि मला त्यामुळें मिळाली या दृष्टीनेंच मी त्याला महत्त्व देतों. जातिविषयक भावनेला सहसा बळी पडणाऱ्यांतला मी नाहीं.

## जागृतीचें चिन्ह

कोणत्याहि एखाद्या विशिष्ट ज्ञातीच्या प्रगति-परागतीपेक्षां देशाची राजकीय प्रगति मी जास्त महत्त्वाची समजतों. किंबहुना एका आयरिश कवीनें म्हटल्याप्रमाणें, खांद्यास खांदा लावून देशासाठीं लढणाऱ्या माझ्या शूर सोबत्याला आपलीं धर्ममतें जुळतात का असें विचारणें न्याय्य होईल काय ? किंवा माझ्या विश्वासू व पुरातन मित्राचा व आमचा देव वेगळा आहे येवढ्यासाठीं त्याचा त्याग करणें न्याय्य होईल काय ? मी जातिद्वेषाच्या धुळवडींत मनापासून रंगलों आहें असें समजणाऱ्या माझ्या टीकाकारांस या माझ्या वृत्तीवर विश्वास ठेवा असें सांगणें मोठेंच धाडसाचें आहे. पण त्यांचें मत कांहींहि असो, माझी स्वतःची मनोवृत्ति स्पष्ट करून सांगणें हें माझें स्वतःसंबंधींचें कर्तव्य आहे असें मी समजतों. कोणत्याच तऱ्हेची जातिविषयक चळवळ देशांत असूं नये असें माझें व्यक्तिशः मत आहे. परंतु देशांत आज जी निष्ठुर परिस्थिति उद्भवली आहे तिजकडे दुर्लक्ष करणें गुन्हा ठरेल. मोठ्या चमत्काराची गोष्ट ही कीं, राजकीय सुधारणा दृष्टिपथांत येऊं लागतांच समाजांत ज्ञातिविशिष्ट मध्ययुगीन भावना प्रादुर्भूत झाल्या ! विशेष खेदाची गोष्ट ही कीं, अज्ञानी लोकांत धर्मवेडाच्या लहरींनें जे दंगे होतात ते चिरस्थायी असत नाहीत; पण सुशिक्षित लोकांत, शिक्षणाचा परिणाम म्हणूनच की काय कोण जाणे, या धर्मवेडाला शाश्वत पायढ्याचें स्वरूप येतें ! शिक्षणाचा उपयोग धर्मद्वेषाच्या व जातिद्वेषाच्या भावनांना बौद्धिक आधार शोधण्यांत व्हावा हा एक मानसशास्त्रवेत्त्यांनी विचार करण्यासारखा प्रश्न आहे.

पण हा प्रश्न वाटतो तितका कांहीं गूढ नाहीं, थोडा खोल विचार केल्यास लगेच समजून येईल कीं, राष्ट्रीय समष्टीची जाणीव उत्पन्न होण्याला ज्ञातिविशिष्ट भावनांमधून समाजाला जाणें अवश्यच आहे. ज्ञातिविषयक जागृति ही राष्ट्रीय बुद्धि जागृत झाल्याचें द्योतक आहे असेंच मी म्हणेन. अगदीं सामान्य मनुष्याला देखील राजकीय हक्क व सवलतीचे फायदे दिसूं लागल्यामुळें प्रत्येकाला आपल्या धर्माची व ज्ञातीची साहजिकच आठवण झाली. कारण त्यांतच आमच्या समाजाची बळकटी आहे असें वाटूं लागतें.

## धार्मिक चळवळीचें बीज

धार्मिक चळवळीचा जो इतका गाजावाजा आपण ऐकतों त्याच्या बुडाशीं पारलौकिक मुक्ति हा हेतु नसून ऐहिक सुखाची इच्छाच असते असें मी तरी म्हणेन. यांत कोणाहि धार्मिक माणसाचा अवमान करण्याचा माझा उद्देश नाहीं. माझें म्हणणें असें कीं, परमेश्वरप्राप्ति ही एकांतांत ध्यान करून कोणीहि साध्य करून घेईल. परंतु ऐहिक सुख-साधनांत आपल्या भागीदाराशीं जेव्हां संबंध येतो तेव्हां त्याच्यापुढें या ज्ञातिविषयक चळवळीचा देखावा करणें जरूर असतें. देशाच्या राजकारणावर ज्ञातिविषयक वादाची जी छाया पडलेली दिसते तिची उपपत्ति माझ्या मतानें अशी आहे. माझें हें म्हणणें कित्येकांना अगदींच कुत्सितपणाचें वाटेल. त्यावर माझा खुलासा असा कीं, मी हल्लींच्या ज्ञातिविषयक जागृतीचें एकच बाजू—एक क्षणिक स्वरूप—येथें मांडलें आहे. केवळ धर्माकरितांच धर्मप्रसार करणारीं निःस्वार्थी माणसें असूं शकतात हेंहि मी जाणून आहें. रोमन बादशाहीच्या वेळचे अशा प्रकारचे ख्रिश्चन मिशनरी व इंडो—चायना व सिलोन इतक्या लांबवर, बुद्धधर्माचा प्रसार करण्याकरितां गेलेले बुद्ध मिशनरी हीं पूर्वकालीन उदाहरणें आहेत. स्वामी विवेकानंदासारखे हिंदु मिशनरी कोणत्याहि ऐहिक फायद्याचा हेतु मनांत न धरतां केवळ हिंदुधर्माच्या अद्वैत तत्त्वज्ञानाचें वैभव पटविण्या-साठीं अमेरिकेस गेलेले होते. मोगल बादशहांच्या वेळीं शिखांनीं चालविलेला लढा असाच केवळ धार्मिक स्वातंत्र्याकरितां होता. दिल्लीच्या राजदरबारी राजकीय मानमरातब किंवा हक्क मिळवावे हा कांहीं त्यांच्यापुढें प्रश्न नव्हता. तसेंच प्युरिटन लोक '—मेफ्लॉवर' मध्यें बसून अमेरिकेस गेले तेहि तेथें कांहीं जास्त सुख—साधनें त्यांच्याकरितां वाढून ठेवलीं होतीं म्हणून गेले नव्हते, तर तेथें तरी पूर्ण धार्मिक स्वातंत्र्य मिळेल अशाच बुद्धीनें ते गेले. सारांश, केवळ धार्मिक भावना एकाद्या मनुष्यांत किंवा समाजांत असूं शकते; पण आज जी ज्ञातिविषयक चळवळ हिंदुस्थानांत चालू आहे ती मात्र या शुद्ध स्वरूपाची आहे असें मी म्हणूं शकत नाहीं. फार तर इतकें म्हणतां येईल कीं, खरी खरी धार्मिक भावना राजकीय भावनेहून भिन्न आहे. पण, इन्द्रधनुष्यांतील रंगाप्रमाणें त्या वेगवेगळ्या दिसत असल्या तरी आजच्या स्थितींत त्या एकमेकींत इतक्या मिसळल्या आहेत कीं, प्रत्येकीची निरनिराळी सीमान्तरेषा ठरवितां येत नाहीं.

प्रस्तुतच्या ज्ञातिविषयक वादांत मुख्यतः तीन समाज सामील आहेत. प्रत्येक

समाजापुढें त्याच्या कांहीं विशिष्ट अडचणी आहेत. मात्र या कलहांत कोणी कोणची भूमिका घेतली आहे हें समजण्यासाठीं थोडा खोल विचार केला पाहिजे.

## ख्रिस्ती लोकांचा उद्योग

प्रथम हिंदी ख्रिश्चन समाज विचारांत घेऊं. यांत अँग्लो-इंडियन, खुद्द इंग्रज व नेटिव्ह ख्रिश्चन यांचा अंतर्भाव होतो. पैकीं इंग्रज ह्या देशांत पूर्ण सत्ताधीश असल्यानें ख्रिश्चन धर्मप्रसारानें त्यांच्या राजकीय हक्कांत कांहीं भर पडण्यासारखी नाहीं. लष्करी व औद्योगिक वर्चस्वाच्या जोरावर राजकीय सत्ता आपण हातीं ठेवूं शकूं असा त्यांचा विश्वास आहे. आणि या ख्रिश्चन प्रचारकांच्या चळवळीची केव्हां केव्हां त्यांना कींव येते. आपल्या सत्तेच्या जोरावर हिंदुस्थानास इंग्लंडावर औद्योगिक बाबतींत अवलंबून राहण्यास भाग पाडून आपल्या मालाला हिंदुस्थानाची अफाट बाजारपेठ मिळवावयाची व आपल्या जातीचा वरचष्मा कायम राखून हिंदी लोकांना अंकित ठेवावयाचें इतकें शक्य झालें तर दहापांच हिंदू ख्रिस्ती धर्मांत आले काय किंवा गेले काय याची पर्वा त्यांनीं कां करावी ? त्यामुळें ख्रिश्चन मिशनऱ्यांच्या कार्यपद्धतीविषयीं अनादर व्यक्त करणें त्यांना सोईचें असतें. आणि मिशनरीहि हिंदी जनतेच्या आकांक्षांविषयीं सहानुभूति दर्शवून व पुष्कळ वेळां त्यांच्या चळवळींत भाग घेऊन राज्यकर्त्यांना त्यांच्या अनादराचा मोबदला परत देतात ! तरी देखील या इंग्रजांनीं स्वतःला स्वतंत्र प्रतिनिधित्वाचा हक्क राखून ठेवलाच आहे !

अँग्लो-इंडियनाबद्दल बोलावयाचें म्हणजे आधीं सरकारी नोकरींतून त्यांची यथास्थित वरणी लागलेलीच आहे. शिवाय इंग्रजांच्या बरोबर त्यांच्या इभ्रतीचा व निर्भयपणाचा अर्धा वांटा त्यांनाहि मिळत असतो. म्हणून अँग्लो-इंडियन देखील ज्ञातिविषयक चळवळीबरोबर धर्मवेडाचें विष पसरवीत नाहींत. या बाबतींत नेटिव्ह ख्रिश्चन लोकांची वृत्ति तारीफ करण्यासारखी आहे. एक तर ते ख्रिश्चन असल्यामुळें हिंदू व मुसलमान यांच्यांत त्यांना मिसळतां येत नाहीं व ते हिंदी असल्यानें गोऱ्या लोकांची सत्ता, हक्क व सवलती यांचाहि त्यांना फायदा मिळत नाहीं. अशा स्थितींत आपलें संख्याबल वाढविण्याची आकांक्षा त्यांनीं बाळगावी हें स्वाभाविक आहे. तरी पण धर्मप्रसाराच्या बाबतींत इतर धर्मीयांचीं मनें न दुखविण्याची ते खबरदारी घेतात. त्यांनीं एक वेळ स्वतंत्र प्रतिनिधि मागितले असते तरी शोभले असतें. पण त्यांनीं या मार्गाचें अवलंबन केलेलें नाहीं. डॉ. बॅप्टिस्टा व डॉ. दत्त यांसारखे त्यांचे पुढारी हे नेहमीं राष्ट्रीय भावनेला प्रथम स्थान देतात आणि वैभवसूर्याचा प्रकाश लाभण्याचा बाबतींत स्वतःच्या योग्यतेवरच भिस्त ठेवतात.

## मुसलमानांच्या आकांक्षा

पण या यादवींत पुढाकार घेणाऱ्यांचा उल्लेख करतांना मुसलमानांचा उल्लेख प्रथम करावयास पाहिजे. कारण या मांडणांत इतर जातींपेक्षां त्यांचाच हात अधिक गुरफटलेला आहे. हिंदुस्थान देशांतील सत्तेचा व सामर्थ्याचा विचार केल्यास ते हिंदूंइतकेच

उंबऱ्याजवळीकडे एखाद्या ठराविक मर्यादेजवळ कोणी उभें राहिल्यास त्याला देवदर्शन घडण्याला अडचण पडणार नाहीं; व देवाला उद्देशून ज्या वस्तू कोणाला अर्पण करा-वयाच्या त्या ठराविक पुजाऱ्याच्या हातीं देऊन देवाला अर्पण झालेल्या पाहिल्यास विचारी माणसाच्या समाधानांत कांहीं कमी पडूं नये.

अशी मर्यादा घातल्यानें देवळाच्या गाभाऱ्याची म्हणजे मुख्य देवस्थानाची स्वच्छता व पवित्रपणा हीं साधतात, त्याचप्रमाणें दुसऱ्या बाजूपहि त्याचे अनेक फायदे आहेत; व सर्वांत मुख्य हा कीं, या मर्यादेपर्यंत वाटेल त्याला जाऊं दिल्यास वरील स्वच्छता व पवित्रपणा यांना बाध न येतां, भजकपूजकांमध्यें आज जो भेदभाव व विषमता आढळून येते ती नाहींशी करणें सोपें होईल. मर्यादा सुचविण्याचा हाच आमचा दुसरा हेतु. देवळांतहि खाजगी व सार्वजनिक भाग असा किंचित् स्थलभेद योग्य तारतम्यानें केल्यास, देवापरी-देवाचें व माणसापरी माणसाचें काम होईल. देवाचें काम म्हटलें तरी एक प्रकारें तेंहि आपलेंच काम, म्हणजे स्वच्छता व पवित्रपणा राहणें. आणि आपलें काम म्हणजे बोलूनचालून आपलेंच काम, म्हणजे हिंदुधर्मीयांतील अन्यायी व उद्वेगकारक विषमता काढून टाकणें.

ही विषमता ज्या वर्गांना पक्षपात करते त्यांच्या अंगावर धार्मिकतेचें किंवा पुण्याचें मूठभर अधिक मास ती चढवीत नाहीं. पण ज्या वर्गाविरुद्ध या विषमतेचा अंमल होतो, त्यांच्या मनाला ती खोल जखम करते यांत मात्र शंका नाहीं. ही विषमता घालविण्याकरितां कोठें ब्राह्मणांचे तर कोठें ब्राह्मणेतरांचेहि विशेष हक्क आज उपभोगांत असलेले काढून घ्यावे लागतील. पण ते काढून घेतल्यानें, व या गोष्टीला ब्राह्मण व ब्राह्मणेतर यांनीं संमति दिल्यानें, एक फार मोठें कार्य होणार आहे. कारण स्वार्थत्याग ही एक दैवी किमया आहे, व तिच्या योगानें विद्वेषी भावनांच्या विषाचें प्रेममय भावनेच्या अमृतांत रूपांतर होतें असा अनुभव आहे. एकच उदाहरण द्यावयाचें तर तें जपानचें देतां येईल. इतिहासज्ञांना हें माहीत आहे कीं, पूर्वी जपानांत 'सॅमुराय' लोकांना विशेष हक्क होते. ते त्यांनीं आपखुषीनें सोडून दिल्याबरोबर त्या राष्ट्रांत ऐक्याचें चैतन्य एकदम संचारलें.

आणि देवदर्शनाच्या बाबतींत ब्राह्मण किंवा ब्राह्मणेतर यांनीं आपआपले विशेष हक्क सोडून देऊन, अस्पृश्यांसुद्धां ते सर्व जर देवालयांत एकाच ठरीव स्थानापासून देव-दर्शन करूं लागतील तर हिंदु समाज एकजीव होण्याला, त्याचें संघटन होण्याला, फार सोपें जाईल. देवाला प्रत्यक्ष स्पर्श करून त्याची पूजाअर्चा करण्याचें सुख हें कांहीं विशेष असलें तर तें घरच्या खाजगी देवघरांत वाटेल तितकें अनुभवितां येण्यासारखें आहे. पण बाहेरच्या म्हणजे सार्वजनिक किंवा अर्धसार्वजनिक देवालयांतहि या सुखाचा अभि-लाष धरणें यांत धर्मभावनेचें खरें बीज नसून, मानवी अहंकाराचेंच तामस बीज आहे. देवासमोर उभे राहून - माणसानें इतरांना विषमता भासवून स्वतः संबंधानें चढ्या हक्काचा

वाद सांगणें हें देवाला तरी कसें आवडेल ? निदान हल्लीं तें देवाला आवडेनासें झालें आहे म्हणूनच अलीकडे कांहीं वर्षांपासून देवालयप्रवेशाची ही नवी चळवळ या देशांत सुरू झाली असें आम्ही समजतों. असो.

अशा रीतीनें स्पृश्य वर्गांनीं आपल्या हक्कांना बंधन घालण्याची तयारी दाख- विल्यास तें बंधन अस्पृश्यावरहि ओघानेंच पडणारें आहे. त्याचें अतिक्रमण करण्याचें मग त्यांना शोभणार तर नाहींच, पण सुचणारहि नाहीं. येऊन जाऊन प्रश्न इतकाच उरेल कीं, त्यांना सभामंडपांत ठराविक मर्यादेपर्यंत इतरांबरोबर येऊं द्यावें कीं नाहीं ? व याचें नकारार्थी उत्तर कोणीहि देऊं शकणार नाहीं. कारण अस्पृश्य झाले तरी ते हिंदूच आहेत आणि हिंदुहिंदूंनीं आपापसांत 'देवदर्शना'च्या बाबतींत विषमता ठेवावी हें कोणत्या देवानें सांगितलें आहे ?

महाराष्ट्रांतील संतमालिका लक्षांत घेतली तर त्यांत अस्पृश्य वर्गांतले साधुसंत किती तरी आहेत! आणि या व्यक्ति साधुसंतांच्या पदवीला जाऊन पोंचल्या म्हणूनच त्यांना विशेष हक्क प्राप्त झाले, असें म्हणणाऱ्या ब्राह्मण–ब्राह्मणेतरांना उलट विचारतां येईल कीं, "बाबा तूं जो हा आपल्यापुरता चढा व विशेष हक्क सांगतोस तो तूं तरी त्या साधुसंतांच्या पदवीला कोठें पोंचलेला आहेस ?" अर्थात् तुझ्या हक्काचा आधार विशिष्ट जातींतील जन्म इतकाच होय. पण देवापुढेंहि जर हा हक्क तूं मिरवूं लागलास तर तो यापुढें टिकणें शक्य नाहीं. तूं तर आपल्याच हातानें यापूर्वी अनेक रीतींनीं आपलें वैशिष्ट्य काढून टाकलें आहेस. तुझ्या जातींतीलहि गुण किंवा कर्में तुझ्या ठिकाणीं राहिलेलीं नाहींत. मग तूं स्वतःला कितीहि मोठें मानलेस तरी तो तुझा मोठेपणा दुसरे लोक काय म्हणून मानतील ?"

बरें, नाहीं म्हणावें तर देवळाच्या सभामंडपांत अस्पृश्यांना येऊं देण्याची वहिवाट कोठेंहि नाहींच असें नाहीं. कोंकण प्रांतांतले लोक मोठे शिवाशिवीचे वेडे असें आपण सम- जतों. पण कोंकणच्या कोणत्याहि देवळांत खुद्द सभामंडपांतच स्पृश्याशेजारीं अस्पृश्या- करितां म्हणून एक ठरीव भाग आंखून दिलेला असतो, व यांच्या–त्यांच्या दरम्यान मर्यादा म्हणून एखादें आडवें लाकूड बांधलेलें असतें. पण स्पृश्य व अस्पृश्य यांतील प्रत्यक्ष अंतर चार दोन वितींचेंहि नसतें. एकाच पंक्तीला बसलेले ब्राह्मण रांगोळीच्या पट्ट्यानें, किंवा वेगळ्या पाटानें, किंवा पानाभोंवतीं पाणी फिरविल्यानें जितके एकमेकापासून वेगळे ठर- तात, तितकेच कोंकणच्या सभामंडपांत स्पृश्य आणि अस्पृश्य हे या मर्यादेनें 'वेगळे' बसतात. मग कोंकणच्या देवळांतून खुद्द सभामंडपांत अस्पृश्य बसल्यानें जर कोंकणचे ब्राह्मण, ब्राह्मणेतर किंवा कोंकणचा देव विटाळत नाहीं, तर अस्पृश्यांनीं सभामंडपांत उभे राहिल्यानें देशावरचे ब्राह्मण, ब्राह्मणेतर किंवा देव हे तरी कां विटाळा ?

—केसरी १९२९ आक्टो. १५

## हिंदु-मुसलमानांचे तंटे

कवींना विरोधाभास हा जसा सर्वांत अधिक आंवडता अथा अलंकार आहे तसाच विरोधाभास हा दैवाचाहि सर्वांत अधिक आवडता असा खेळ असावा असें वाटतें. एरवीं क्या हिंदुस्थानांत तीनचार वर्षांपूर्वी ' हिंदु-मुसलमानांची एकी ' याच्याइतका दुमदुमणारा दुसरा शब्द नव्हता, त्याच हिंदुस्थानांत आज ' हिंदु-मुसलमानांचे तंटे ' याच्याइतका दुमदुमणारा दुसरा शब्द ऐकूं येत नाहीं. क्रिया व प्रतिक्रिया ही तुल्यबल असावयाचीच या भौतिक सिद्धान्तानुरूपच ही गोष्ट घडून येत आहे असेंहि त्याचें निदान करतां येईल. दुःखांत सुख इतकेंच मानतां येईल की, जाणत्या चाणाक्ष माणसांना पूर्वीच्या हिंदु-मुसलमानांच्या एकीत जसें नैमित्तिक स्वरूप दिसल्याशिवाय राहिलें नाहीं, तसेंच हल्लींच्या हिंदु-मुसलमानांच्या या तंट्यांतहि त्यांना नैमित्तिक स्वरूपच आढळतें.

पण या दंग्यांना नैमित्तिक स्वरूप असलें तरी एकंदर देशाला अनेक दृष्टींनीं तो एक चिंतेचा विषय होऊन बसला आहे यांत शंका नाहीं. कारण असा एकहि दिवस जात नाहीं की, ज्यांत एकाद्या नव्या दंग्याची वार्ता कानीं पडत नाहीं. रणांगणावरचीं सैन्यें जशीं खांद्या-कमरेला हत्यारें लटकावूनच शांततेचेहि व्यवहार करतात किंवा निरनिराळीं महत्त्वाकांक्षी भांडखोर राष्ट्रें तोंडानें विश्वबंधुत्वाचें महामंत्र जपत असतां आणि परराष्ट्राशीं आमचे संबंध अत्यंत स्नेहवृद्धीचे आहेत असें सांगत असतां इकडे लष्कर व आरमार लढण्याला सिद्ध ठेवीत असतात तसेंच हिंदुस्थानांतील हिंदु व मुसलमान हे स्वराज्य व संयुक्त राष्ट्रीयत्व यांच्या गोष्टी बोलत असतां आपापले समाज प्रबळ व आक्रमणशील कसे होतील याचेच उद्योग मुख्यतः त्यांचे हातून सुरू आहेत.

दिसतांना या भांडणाचें कारण हो एक धार्मिक बाब अशी दिसते. पण किंचित् खोल पाहिलें असतां तिला केवळ धार्मिक स्वरूप नसून बरेंचसें राजकीय स्वरूप आहे. एका बाजूला वाद्यांना मनाई व दुसऱ्या बाजूला शुद्धिकार्याविषयीं उत्साह याच गोष्टी डोळ्यांपुढें तंट्यांचीं कारणें म्हणून दिसतात तरी तीं कांहीं अंशीं रोगलक्षणें आहेत रोगकारणें नव्हेत. खरें रोग-कारण म्हटलें म्हणजे मुसलमानांना आज निदान हिंदूंच्या बरोबरीनें व साधल्यास वरचढपणानें जगून-मिरवून सत्ता व वैभव भोगावयाचें आहे. आणि हिंदूंना खरी, काळजी ही कीं सर्व बाजूंनीं पावलापावलानें मुसलमान लोक जर अतिक्रमणच करूं लागले तर हिंदुसमाज कालांतरानें जाग्यावर तरी कसा उरणार? आणि हिंदुत्व नष्ट व्हावयाचें असलें तर स्वराज्याची तरी काय मातब्बरी!

हे अंतिम प्रश्न उभयपक्षीं मनांत एकसारखे घोळत असल्यानें धर्माचाराची म्हणून कोणतीहि बाब पुढें आली कीं, एका बाजूनें अतिक्रमणासाठीं व दुसऱ्या बाजूनें संरक्षणासाठीं जोराचे प्रयत्न सुरू होतात व या ओढाताणींत गारेवर लोखंड आपटावें त्याप्रमाणें होऊन कोठें तरी ठिणगी पडते व सभोंवतीं सर्वत्र ज्वालाग्राही द्रव्यच पसरून राहिलेलें असल्यामुळें आगीचा भडका होण्यास उशीर लागत नाहीं. अलीकडे दुसरीहि एक गोष्ट झाली आहे ती अशी कीं, टपाल, तारायंत्र व वर्तमानपत्रें यांच्या योगानें

घडलेल्या गोष्टींची हकीकत सर्व देशभर तेव्हांच पसरते, आणि प्रत्यक्ष दंगा जरी एके ठिकाणीं झाला असला तरी इतर शेंकडों ठिकाणीं लोकांना तो दंगा आपल्या गांवींच झाल्याप्रमाणें सहानुभूतिजन्य दुःख होतें व चिंता वाटूं लागते; आणि अशा रीतीनें दंग्याची एक प्रकारची हवाच देशांत उत्पन्न होते.

हिंदु–मुसलमानांच्या तंट्याच्या खोल मुळाशीं जें कारण आहे त्या दृष्टीनें पाहतां हे तंटे केव्हांहि सर्वथा निर्मूल होतील असें म्हणतां येत नाहीं. पण इतक्या सूक्ष्म स्वरूपांतच हा प्रश्न राहिला तर तो प्रत्यक्ष चिंतेचा विषयहि फारसा होऊं शकत नाहीं. जगांत मनुष्यामनुष्यांत, समाजासमाजांत व राष्ट्राराष्ट्रांत द्वैत व तज्जन्य कलह सुरूच आहेत. एक धर्म जाऊन दुसरा धर्म त्याचे जागीं येणें, एक राष्ट्र लयाला जाऊन दुसरें उदयाला येणें, एका घराण्याची राजसत्ता नष्ट होऊन ती दुसऱ्या घराण्याला मिळणें, श्रेष्ठ–कनिष्ठ म्हटल्या जाणाऱ्या सामाजिक वर्गांची अदलाबदल होणें अशा गोष्टी कालांतरानें व्हावयाच्याच; त्यांच्या चिंतेनें मनुष्य मरत नाहीं. पण मनुष्य हा मर्त्य आहे हें शुद्ध ज्ञान वेगळें व प्रत्यक्ष त्याच्या गळ्यावर सुरी येऊन पडणें हा अनुभव वेगळा !

मुसलमानांकडून एकंदर अतिक्रमण कसें चाललें आहे हें प्रसिद्धच आहे. कांहीं शतकांपूर्वी असा एक काल निर्दिष्ट करतां येतो कीं, मुसलमान असा हिंदुस्थानांत नव्हता. त्याच हिंदुस्थानांत आज पांच-सहा कोटी मुसलमान आहेत. पण हे इतके लोक सर्वच्या सर्व बाहेरून येऊन या देशांतील रिकाम्या जागेत भरले व तेहि हिंदूंची जागा न घेतां न अडवितां आणून भरले असें असतें तर गोष्ट वेगळी, पण तसें नाहीं. या पांच-सहा कोटींपैकीं परदेशांतून म्हणजे इराण, अरबस्थान, तुर्कस्थान वगैरेंतून आलेले भिन्न वंशांचे असे लोक एक-दशांशहि नसतील. बाकी सर्व हिंदूच असून धर्मांतर पावलेले किंवा बाटलेले असे आहेत. पण केवळ धर्मप्रसारानेंच मुसलमानांचें समाधान झालेलें नाहीं. राज्यप्रसार हा त्यांच्या धर्मप्रसाराबरोबरच प्रवास करीत असतो हें हिंदुस्थानांत प्रस्थापित झालेल्या निरनिराळ्या बादशाह्या व राज्यें यावरून दिसून येतें.

आज दोघांवरहि परकी इंग्रजी राज्य असलें तरी आज आपली लोकसंख्या व हक्क वाढवून प्रबळ होऊन बसावयाचें; आणि ज्या राज्यक्रांतीची संधि आली तर चटदिशीं पुढें होऊन परदेशच्या मुसलमानांच्या साहाय्यानें फिरून राज्य किंवा बादशाही मिळेल तशी स्थापन करावयाची असाहि त्यांच्या मनांत एक विचार असतो. हा विचार प्रायः गुप्त असतो. कारण इंग्रजांचें राज्य असतां तो बोलून दाखविण्यांत काय फायदा ? पण या इंग्रजी राज्यांतहि भविष्यपुराण म्हणून तात्त्विक रीत्या चर्चा निघाली असतां मुसलमानांच्या तोंडून ही गोष्ट भावनेच्या रूपानें बाहेर पडते. येवढेंच नव्हे तर ऐन असहकारितेच्या चळवळींत अफगाणिस्थानाकडून अमीर हा मोठें सैन्य घेऊन पंजाबावर चालून येत आहे तरी त्याच्या आगमनाची तयारी करण्यास मुसलमानांप्रमाणें हिंदूंनींहि कंबर बांधावी असें जबाबदार म्हणविणाऱ्या मुसलमान पुढाऱ्यांच्या तोंडून खासगी संभाषणांत निघत होतें हें अनेकांना माहीत आहे !

त्या मागें व मुख्य महत्त्वाकांक्षेमुळेंच मुसलमानांच्या तोंडून कॉन्स्टँटिनोपलपासून दिल्लीपर्यंत एक सांखळी जोडण्याचे उद्गार निघतात. आणि त्या महत्त्वाकांक्षेचें उपांग म्हणून स्थानिक स्वराज्यापासून वरिष्ठ कायदेकौन्सिलें व सरकारी खातीं येथपर्यंत साधेल तेथें सवता सुभा स्थापून त्यांत साम्राज्य, व त्याच्या आधारावर इतर राजकारणप्रांतांतहि निदान कोरडा तरी वरचष्मा, गाजवावयास सापडावा असा त्यांचा उपक्रम सुरु आहे. आणि नव्या राज्यपद्धतींत शिरगणती हें लाभाचें निर्णायक गमक ठरत असल्यानें मुसलमानांच्या आजच्या संख्येंत या देशांत एकाला एक अशी भरच हरप्रयत्नानें पाडण्याचा त्यांचा उद्योग सुरू आहे.

या सर्व गोष्टी साधावयाच्या तर आपण प्रबळ व शक्तिमान् आहों, आपला जोर व आपला उत्साह आपल्या महत्त्वाकांक्षेइतकाच मोठा हें पदोपदीं सिद्ध करणें अवश्य आहे अशी मुसलमानांनीं सहजच आपली समजूत करून घेतली आहे. व हीच समजूत मशिदींपुढील वाद्याला प्रतिबंध होवो, किंवा तंझीम व तब्लीघ ही चळवळ होवो, तिजमध्ये दिसून येते. सयुक्तिक काय वा अयुक्तिक काय, न्याय्य कोणतें अन्याय्य कोणतें याचा विचार बाजूस सारून वाद निघाला कीं, तेथें हट्टच धरावयाचा; आणि मग तो कोणीकडून तरी, जुलुमजबरदस्तीनें का होईना, पु रा पाडावयाचा यांतच आपल्या हक्काचें समर्थन व धोरणाचें यश आहे असें मुसलमानांनीं आपल्या मनाशीं ठरवून ठेवलेलें दिसतें.

सयुक्तिक व अयुक्तिक, न्याय्य व अन्याय्य हा भेदच मुसलमानांच्या मनाला जवळ जवळ आज शिवत नाहीं असें जें आम्हीं वर म्हटलें आहे त्याचें थोडेंसें स्पष्टीकरण करणें जरूर आहे. हिंदूंना बाटविण्याचा जर मुसलमानांना अधिकार आहे तर प्रथम त्यांना बाटूं न देणें आणि ते बाटल्यावरहि त्यांना शुद्ध करून परत स्वधर्मांत घेणें हा अधिकार हिंदूंनाहि असला पाहिजे ही गोष्ट अगदीं सूर्यप्रकाशाइतकी स्वच्छ व उघड आहे. शुद्धि या शब्दांतच मूळ धर्मांतर अध्याहृत किंवा गृहीत आहे; आणि धर्मांतर म्हणजे हिंदु समाजाची ती हानि. असें असतां हिंदु समाजानें आपली हानिहि थांबवूं नये आणि मुसलमानांना होणारा लाभ अप्रतिबंध रीतीनें चालू द्यावा असा कांगावा मुसलमान अगदीं सरळ व प्रामाणिकपणाचा आव आणून करतात! पण माझें तें माझें व तुझें तेंहि माझें हा न्याय कोठला!

प्रातिनिधिक संस्थांतील हिस्सेरशीचीहि तीच गोष्ट. ही हिस्सेरशी सरकार ठरवो किंवा हिंदूंच्या सहविचारानें ठरो. तींत मुसलमानांचें एक धोरण निश्चित आहे. तें असें कीं, ज्या प्रांतांत ते संख्येनें मोठे तेथें संख्येच्या तरवावर मोठा हिस्सा मागावयाचा व जेथें संख्येनें ते कमी तेथें अल्पसंख्याकांचें मत परिणामकारक व्हावयास पाहिजे म्हणून तेथेंहि प्रमाणाबाहेर हिस्सा मागावयाचा. जेथें तीन जागा वांटावयाच्या असतील तेथें संख्याबळावर दोन; संख्या अगदीं कमी असेल तर एकाहून खालीं जाता येत नाहीं, म्हणून एक; आणि जेथें आलटूनपालटून म्हणून निम्मेनिम वांटणी व्हावयाची तेथें, दीड

देतां येत नाहीं म्हणून दोन; असे हिस्से ते मागत असतात. सारांश, हक्काच्या आधारावर तीन, करुणा व सहानुभूति यांच्या आधारावर कमींत कमी एक आणि सोयीच्या आधारावर दोन अशी त्यांची मागणी असते.

गोवधासंबंधानें पाहिलें तरी तेंच. गोमांस खाण्याला मुसलमानांना धार्मिक प्रतिबंध नाहीं ही गोष्ट खरी आहे. पण त्यांच्यांतले रुचिविवेकानें खाणारे लोकहि गोमांस हें सर्वांत श्रेष्ठ मानीत नाहींत. कुरबानीलाहि गोवध अनिर्वाह्य आहे असेंहि कुराणांत नाहींच आणि खुषींत असले म्हणजे मुसलमानच तद्विरुद्ध वचनेंहि फाडून दाखवितात, आणि काबूलच्या राज्यांत सर्वसत्ताधीश मुसलमान असतांहि तेथें बकरीदच्या सणाचे दिवशीं गोवध करूं देत नाहींत असें म्हणतात. अशी गोष्ट असतां गोवधाचा आग्रह मुसलमानांनीं कां धरावा ? याचेंहि कारण आम्हीं वर दर्शविलें तेंच होय.

हिंदूंचें म्हणणें इतकेंच कीं, मुसलमानांना गोवध करावयाचाच तर त्यांनीं तो सरकार किंवा म्युनिसिपालिटी यांच्या परवानगीनें घातलेल्या दूर गांवाबाहेरच्या खाटिकखान्यांत करावा. आणि नैमित्तिक धर्मप्रसंगीं जरी तो त्यांना करावासा वाटला तरी त्यांनीं तो हिंदूंच्या दृष्टीआड कोठें तरी आपल्या वस्तींत करावा. पण ही साधी गोष्ट देखील मुसलमानांना पटत नाहीं. ते हटकून गोवध करतील; इतकेंच नव्हे तर वध करावयाच्या गाई हिंदु मोहल्यांतूनच ते नेतील व त्या देखील चांगल्या वाजतगाजत नेतील ! त्याशिवाय त्यांच्या मनाचें समाधान व्हावयाचें नाहीं. हिंदु मोहल्यांतून वाजतगाजत गायी मारावयास नेणें यांत खऱ्या धर्मबुद्धीचा वास्तविक काय संबंध ? पण आम्हीं वर दर्शविल्याप्रमाणें यांत खऱ्या धर्मबुद्धीचें समाधान नसून आक्रमणशील अशा हट्टाचीच ती परिसीमा होय.

मशिदीपुढील वाद्यांचा प्रश्न घेतला तर तेथेंहि हाच प्रकार. मुसलमानांनीं दृष्टीआड गाय मारली असतां त्याला हरकत करणें हें हिंदूंना दुसऱ्यांच्या दिवसांत योग्य होणार नाहीं हें अगदीं उघड आहे. पण मशिदीपुढील वाद्यांच्या बाबतींत इतकाहि अयुक्तिकपणा हिंदूंच्याकडे येत नाहीं असें आम्हांस वाटतें. धर्माचाराच्या दृष्टीनें मंगलवाद्य हें वास्तविक अखंड चालू राहावयास पाहिजे. शिवाय हें मंगल वाद्यहि केवळ सार्वजनिक अशाच रस्त्यावरून जावयाचें. आणि याहूनहि विशेष हें कीं, आजघटकेला जेथें जुन्या मशिदींपैकीं ज्यांच्या पुढून वाजवीत जाण्याचा हक्क वहिवाटीनें प्रस्थापित झालेला आहे त्यांच्यापुरताच तो बजावण्याचा हिंदूंचा आग्रह. अशी स्थिति असतांहि राष्ट्रबांधवांच्या भावनेला मान देण्याकरितां म्हणूनहि हिंदु पुढारी आपल्या ज्ञातिबांधवांना असा सल्ला देऊं इच्छितील कीं, प्रतिष्ठित मशिदीपुढून जातांना, वहिवाटीचा हक्क असला तरी, चार पावलें मोठीं वाद्यें न वाजवितांच मिरवणूक न्यावी.

पण याच्या उलट मुसलमानांची मनोवृत्ति कशी आहे ती पाहा. त्यांचें म्हणणें असें कीं, रस्ता सार्वजनिक झाला तरी मशिदीपुरता तो जवळ जवळ खासगी स्वरूपाचाच मानावा. वाद्यें मोठीं तर वाजवूं नयेतच, पण मंद्रमध्यहि वाजवूं नयेत ! एक वेळ मुसल-

मानांनी वाद्यें वाजवीत नेली तरी चालेल. इंग्रजाला म्हणजे सरकारला तर कांहींच हरकत नाहीं. पण हिंदूंनीं मात्र तीं वाजवीत नेतां कामा नयेत. या कामीं आम्ही जुनी वाढ वहिवाट मानणार नाहीं, मग नवी कोण पाहूं देतो ? मशीद म्हणजे ती प्रार्थनेची जागा, आणि तींत प्रार्थना चालू नसली तरी ती प्रार्थनेचीच जागा ! तेथें प्रार्थना एक करील, दहा करतील, किंवा मुळीच कोणी करणार नाहीं, त्याबद्दल प्रश्न विचारूं नये. आणि मशीद ही प्रार्थनेची जागा म्हटल्यावर ती नवी काय अगर जुनी काय सारखीच ! वाद्यें मशिदीच्या पुढच्या बाजूसच थांबवावीं असें नव्हे तर चौफेर आजूबाजूसहि तीं थांबविलीं पाहिजेत. किंबहुना आजूबाजूच्या खासगी घरांतूनहि हिंदूंनीं भजन करूं नये किंवा लग्नकार्याकरितांहि वाजंत्रीहि वाजवूं नयेत ! तात्पर्य, आज किंवा यापुढें केव्हांहि हिंदुस्थानांत कोठेंहि मशिदीच्या आकाराची किंवा ही आमची मशीदच असें म्हणण्यांत येणारी कोणतीहि, कसलीहि, केवढीहि इमारत असो; मग तें दोन वासे, चार काामठ्या यांनीं उभारलेलें छप्पर किंवा बिनइमारतीची पण स्वेच्छेनें कोणीहि एखादा मुसलमान नमाज पढण्याची सार्वजनिक मोकळी जागा कां होईना—तिच्यापुढें हिंदूंचीं वाद्यें थांबलींच पाहिजेत. याचाहि फिरून अर्थ असाच कीं, मुसलमान म्हणेल तेथें हिंदूंनीं वाद्यें वाजवूं नयेत.

मुसलमानांच्या अतिक्रमणशील मनोवृत्तीचें जें वर्णन निरनिराळ्या प्रकारांनीं वर केलें आहे त्यांतून अर्थात् रोकडा असा हाच प्रश्न उत्पन्न होतो कीं, मुसलमानांकरितां हिंदूंनीं गम खावयाची किती व हक्क सोडावयाचे तरी कोणकोणते ? दुसरा प्रश्न असा कीं, मुसलमानांनीं कांहीं म्हटलें तरी या अतिक्रमणाच्या हक्कसंरक्षणाचे बाबतींत सरकार स्वतःचें असें कोणतें धोरण स्वीकारणार ? बंगाल व संयुक्त प्रांत येथील सरकारांनीं नुकतेंच हिंदु-मुसलमानांच्या दंग्यासंबंधानें ठराव प्रसिद्ध केले आहेत. त्यांत बंगालसरकाराच्या ठरावांत हक्कसंरक्षणाविषयीं कांहींच उल्लेख नाहीं. फक्त शांततासंरक्षणाच्या नांवावर सर्व अधिकार पोलीस कमिशनराला दिले आहेत. संयुक्त प्रांताच्या सरकारनें काढलेल्या ठरावांत मात्र दंग्यांच्या मूळ कारणांच्या बाबतींतहि हक्क म्हणून कांहीं असतात व त्यांचें संरक्षण सरकार म्हणून जें एक कोणी आहे त्यानें कर्तव्य म्हणून केलें पाहिजे अशी ढोबळ पुसट भावना तरी व्यक्त केली आहे हें सुदैवच समजावयाचें.

बंगालसरकारच्या ठरावाप्रमाणें पोलीस कमिशनरला क्रि. प्रो. को. च्या १४४ व्या कलमाप्रमाणें जाहिरनामा काढून एकादे वेळीं दंगा थांबवितां येईल. पण त्यानें कायमचा निर्वाह लागत नाहीं. दर दोन महिन्यांनीं एक याप्रमाणें दरवर्षी सहा जाहिरनामे काढून त्यांच्या आधारानें हे दंगे थांबवूं पाहणाऱ्या सरकारास शतमूर्खच म्हणावें लागेल. कारण पोट बांधून भुकेची कळ क्षणभर थांबेल, पण पोट बांधल्यानें कायमची भूक थांबवितां आली असती तर मनुष्याला या जगांत उद्योग म्हणून करण्याचें कारणच राहिलें नसतें. तीच गोष्ट हक्कसंरक्षणाची होय. अर्थात् दिवाणी स्वरूपाचे हक्क म्हणून कांहीं चीज आहे कीं नाहीं ? व ते ठरवून घेण्याचा कांहीं कायदेशीर म्हणून मार्ग आहे

कीं नाहीं ? तसेंच अशा रीतीनें प्रस्थापित झालेल्या हक्कांचें संरक्षण करणें सरकारचें कर्तव्य आहे कीं नाहीं ? आणि मुसलमानांनीं जुलूमजबरदस्ती, भांडखोरी, आततायीपणा, माथेफिरूपणा, किंबहुना प्राणत्यागाची तयारी दाखविली तरी सरकार न्यायाच्या बाजूला उभें राहून अन्यायवर्ती लोकांशीं झगडण्याला, व आपली इभ्रत सांभाळण्याला, तयार आहे कीं नाहीं, हा आज सरकारापुढें बिनतोड प्रश्न उपस्थित झाला आहे. असहकारितेच्या काळांत कायदा, सुव्यवस्था व शांतता यांची जपमाळ घेऊन ज्या ज्या युक्तिवादानें व न्यायनिष्ठुरतेनें सरकार लोकांना सवाल टाकीत होतें त्याच रीतीनें तसलेच प्रश्न देवानें आज खुद्द सरकारापुढेंच उपस्थित केले आहेत. त्यांचें उत्तर सरकारनें द्यावें.

—केसरी १९२१ आक्टोबर १८

## वतनदार जोश्यांची वृत्ति

ब्राह्मणांची जोशीपणाची वृत्ति कायद्यानें नष्ट करणें कां योग्य नाहीं याचें दिग्दर्शन आम्हीं या विषयावरील मागील लेखांत केवळ व्यवहाराच्या दृष्टीनें केलें आहे. त्याचेंहि कारण इतकेंच कीं, परंपरागत वृत्ति हा एक प्रकारचा कायदेशीर हक्क बनून न्यायकोर्टेंहि तो मान्य करितात, व त्याबरहुकूम हुकूमनामा देण्यांत न्यायकोर्टांनाहि आपण कांहीं अनीतिप्रवर्तन करीत आहों असें वाटत नाहीं. अशा हा वृत्तीचा हक्क, केवळ व्यवहाराच्या दृष्टीपुरतेंच बोलावयाचें तर, इतर सर्व वर्ण, जाति व धंदेवाईक लोक बजावीत असत ब्राह्मणांपासूनच तेवढा कायद्यानें तो कां हरण करण्यांत यावा ? जोश्यांच्या वतनदारी इतकीच पाटील-कुळकर्ण्यांचीहि वतनदारी जुनी आहे, पैकीं कुळकर्ण्यांचें वतन बुडविण्यांत आलें त्या वेळीं आम्हीं वरील तत्त्वानुसार हरकत घेतली. आज जोश्यांच्या वृत्तीसंबंधानें केवळ व्यवहाराच्या दृष्टीनें आम्हांस हरकत घेणें प्राप्त आहे. दुर्दैवानें उद्यां पाटलांच्या वतनावर गदा येईल तेव्हांहि आम्हांला अशीच हरकत घ्यावी लागेल. ही शेवटची गोष्ट फार दिवस टळेल असेंहि आम्हांस वाटत नाहीं. कारण सरकारला सगळेच वतनदार बुडवावयाचे आहेत.

पण प्रस्तुतच्या वादांत केवळ व्यवहाराचीच दृष्टि ठेवून भागावयाचें नाहीं. मागील लेखांत आम्हीं असें दर्शविलें होतें कीं, जोश्यांची वृत्ति कायदा करून नष्ट करण्यांत येऊं नये, पण तीच गोष्ट इतर रीतीनें घडून येणें शक्य झालें तर अवश्य करावी. ही रीत म्हणजे वतनदार जोशी लोकांची या बाबतींत समजूत पाडून, उपदेश करून, विनंति करून, किंबहुना त्यांचें होणारें नुकसान सामुदायिक रीतीनें भरून देण्याकरितां एखादा फंड उभारून यापुढें जोश्यांकडून जोशिकी हक्काबद्दल कोर्टांत होणाऱ्या फिर्यादी टाळाव्या ही होय. यापूर्वी झालें तरी अशा फिर्यादी कोर्टांपुढें फारशा गेल्या होत्या असें नाहीं. कारण जोशिकीचें वतन झालें तरी त्याचें वेतन तें किती असणार ? व त्याकरितां रिकामें तीन कोर्टें कोण भांडणार ? म्हणून ज्या फिर्यादी झाल्या त्या लाभबुद्धीपेक्षां हक्कशाबितीकरितांच अधिक झाल्या असें मानिल्यास त्यांत चूक होणार नाहीं. उदाहरणार्थ, १९११

साली यळवंत लक्ष्मण घाटपांडे नांवाच्या जोश्यानें जी फिर्याद मुन्सफ कोर्टात दाखल केली, व जिचा निकाल १९१८ साली हायकोर्टात लागून अखेर दावा रद्द झाला, ती ४-रु. ११ आ. इतक्या रकमेकरितां होती, व तीन कोर्टे भांडण भांडण्याला सदर वादीला कदाचित् ४०० रुपयेहि पुरले नसतील. १८७९ पासून १९१८ पर्यंत अशा फिर्यादींची संख्या दहापांचांवरहि गेलेली नाहीं व त्या बहुतेकांत मागितलेल्या रकमा प्रायः अशाच किरकोळ असण्याचा संभव आहे, एवंच जोशी-वतनाचें हें भांडण आम्हीं वर म्हटल्याप्रमाणें मुख्यतः परंपरागत हक्कसंरक्षणाकरितांच आहे.

व्यवहारापुरतीच दृष्टि ठेविल्यास अशा प्रकारचे दावे भांडणाऱ्या जोश्यांना आपल्या हक्काकरितां दक्ष असणारा कोणीहि संसारी मनुष्य फारशीं नांवें ठेवणार नाहीं. याच दृष्टीनें, आणि 'म्हातारी मेल्याचें दुःख नाहीं पण काळ सोकावतो' या वाक्यानुसार सदर बिल अनिष्ट आहे असें आम्हीं आपलें मत दिलें आहे. तथापि आज या विषयावर लिहिण्याचा आमचा मुख्य हेतु हें बिल टळावें कसें यासंबंधानें आपलें मत देण्याचा आहे, व हें बिल टळण्याला जोशिकी वतनाच्या हक्काबाबतीबद्दल आज ज्या थोड्याशा तरी फिर्यादी होतात त्या टळल्या पाहिजेत, व त्या टळण्याचाहि खरा मार्ग म्हटला म्हणजे जोशिकी वतनासंबंधानें एकंदर समाजानें नवीन धोरण स्वीकारणें हा होय. नवीन लोकमत बनलें म्हणजे तें व्यक्तीच्या आचरणांतून आपोआपच प्रत्ययास येऊं लागेल. या नवीन धोरणाचें स्वरूप एका वाक्यांत सांगावयाचें तर आम्ही असें म्हणूं कीं, वतनदार जोश्यांनीं यापुढें जोशिकीच्या दक्षिणेवर फारशी दृष्टि ठेवूं नये, निदान तिजकरितां कोर्टाची पायरी आपण चढणार नाहीं अशी मनाशीं शपथ वाहावी. या उपदेशावर अनेक प्रकारचे आक्षेप येतील हें आम्ही जाणून आहों. पण तें सर्व जमेस धरले तरी वरील प्रकारचा उपदेशच समाजहिताच्या दृष्टीनें अधिक श्रेयस्कर ठरेल अशी आमची खात्री आहे.

वतनदार जोशी असा आक्षेप घेतील कीं, "बोलावयाला ठीक आहे, यांत उपदेश करणाराचें काय जातें? पण आमची कुळपरंपरागत वृत्ति आम्हीं कां बुडवावी? हक्कसंरक्षणाकरितां झगडण्याचे हे दिवस आहेत, आणि आम्हीं न झगडल्यानें आमचें प्रत्यक्ष नुकसान होईल तें कोण भरून देणार?" हे तीनहि आक्षेप आमच्या मतें निरुत्तर नाहींत व त्यांना खालीलप्रमाणें सप्रमाण उत्तर देतां येईल. प्रत्यक्ष लाभाचा विचार करितां हा लाभ खरोखर फार थोडा आहे असेंच म्हणावें लागेल. दरएक सबंध गांवाला एक जोशी असें जरी सरसकट प्रमाण धरलें तरी जोशीपणाच्या वतनाच्या वांटण्या होऊं शकतात, यामुळें या गांववतनाच्या इतक्या ठिकऱ्या उडालेल्या असतात कीं, जोशी-घराण्यापैकीं प्रत्येक घरटीं वतनाच्या उपभोगाची पाळी कित्येक वर्षांनीं एखादे वेळीं येते! अर्थात् पुष्कळ वर्षांनीं एखादे वर्षी होणाऱ्या या लाभावर कोणाहि कुटुंबाचा चरितार्थ चालणें शक्य नसतें आणि प्रत्यक्ष पाहूं गेलें तरी कोणत्याहि गांवच्या वतनदार जोश्याच्या घरीं नुसत्या भिक्षुकीवर चरितार्थ अवलंबून आहे असें आढळून

येणार नाहीं. कोणाची शेती असते, कोणी व्यापार करतो, कोणी नोकरी पतकरतात. घरीं पुष्कळ मुलें असली व त्यांपैकीं एखादा उनाड किंवा इतर कामाला निरुपयोगी असला आणि वतनांत इतर अंशभागी फारसे कोणी नसले, तर त्याला वैदिकी शिकवून भिक्षुक बनविला जातो. पण एरवीं भिक्षुकी वतनाकरितां आधुनिक विद्या व तिजपासून होणारा लाभ कोणी सहसा बुडवीत नाहींत. तात्पर्य, जोशीपणाचें वतन नष्ट झाल्यानें पैशाच्या दृष्टीनें कोणाचें म्हणण्यासारखें नुकसान होण्याचा संभव नाहीं.

राहतां राहिला हक्काचा प्रश्न. भिक्षुकी करून दक्षिणा मिळविणें याला रूढीनें कायदेशीर हक्काचें स्वरूप येतें ही गोष्ट खरी; तथापि हक्क झाला म्हणून फारसें नुकसान नसतांहि तो हट्टानें बजावलाच पाहिजे असें थोडेंच आहे ? विशेषतः देशाची आजची स्थिति लक्षांत घेतली असतां, किंवा ब्राह्मणांचें खरें कर्तव्य काय हें लक्षांत आणल्यासहि, हा हक्क बजावणें गैर आहे असेंच कोणासहि दिसून येईल. आज असल्याच हक्काकरितां हट्टानें भांडलें पाहिजे की, ज्या योगानें सामुदायिक हित वाढीस लागेल. उलट ज्या हक्काच्या भांडणामुळें समाजाच्या निरनिराळ्या अंगांमध्यें अधिक फाटाफूट होईल त्या हक्काच्या बाबतींत माघारच घेतली पाहिजे; मग त्यापासून व्यक्तिशः थोडेंसें नुकसान झालें तरी चालेल. हक्काच्या दृष्टीनें पाहिलें असतां, ब्राह्मणानें दुसऱ्याचीं धर्मकृत्यें चालवावयास जाऊन दक्षिणा घेण्याच्या हक्कास रूढीमुळें हक्काचें स्वरूप ( Civil Right ) आलें तरी खऱ्या धर्मदृष्टीनें तो हक्क होऊं शकत नाहीं. तो 'अधिकार' आहे व अधिकार हा हक्काप्रमाणें केवळ पैशावर दृष्टि ठेवून गाजवावयाचा नसतो. क्षुद्र प्रसंगीं क्षुद्र कारणाकरितां क्षुद्र रीतीनें अधिकाराचा उपयोग केल्यास त्यांतील गांभीर्य निघून जातें व तो उपहासास पात्र होतो. अधिकाराची थोरवी तो दुसऱ्यानें मानण्यांत असते, तो हट्टातट्टानें प्रस्थापित करण्यांत नसते. ब्राह्मणाला जर खरोखर वर्णगुरु म्हणून घ्यावयाचें असेल तर " मी गुरु, मजकडून विद्या शिका, मजकडून आशीर्वाद घ्या, मला न बोलवाल तर तुमचें धर्मकृत्य सफल होणार नाहीं असा शाप देईन; शिवाय दक्षिणेबद्दल न्यायकोर्टांत वकील लावून भांडेन व पदरचे पैसे भरीन, पण दक्षिणा वसूल करीनच करीन " असें स्वतः ब्राह्मणानें हटवादीपणानें म्हणतां कामा नये. इतर वर्णांनीं वाटेल तर खुषीनें ब्राह्मणाला गुरु म्हणावें व अशा खुषीनें दिलेल्या पद्धतीलाच मान राहील. त्यांनीं आदरानें बोलावून आनंदानें दिली तीच दक्षिणा; व वृत्ति म्हटली तरी फिर्यादीनें वसूल करावी असें कोठेंहि सांगितलें नाहीं खऱ्या धर्मनिष्ठ ब्राह्मणानें स्वजातीयांविरुद्ध परधर्मी राजाकडे फिर्याद नेऊन त्याजकडून प्रतिकार करविणें हें शास्त्रसंमत नाहीं. त्यानें स्वधर्मी राजाकडेहि फिर्याद नेऊं नये; . मग विधर्मी राज्यांतील न्यायकोर्टांत फिर्याद मांडणें गैर आहे हें कोणीहि कबूल करील ! ऋषिवर्य मनु म्हणतो—

न ब्राह्मणोऽवेदयत किंचिद्राजनि धर्मवित् ।
स्ववीर्येणैव ताञ्छिष्यात् मानवानपकारिणः ॥

'ब्राह्मणानें आपल्या तेजानेंच अपकाराचा प्रतिकार करावा, राजाकडे जाऊन

कागाळी करूं नये.' आणि याला कारण म्हणून जें दिलें आहे तें विशेष लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

स्ववीर्यात् राजवीर्याच स्ववीर्यं बलवत्तरं ।
तस्मात्स्वेनैव वीर्येण निगृह्णीयादरीन् द्विजः ॥

महात्मा गांधी ज्या शांतताप्रधान असहकारितेचा उपदेश करितात तीच तत्त्वतः वरील वाक्यांत मनूनें सांगितली आहे. मात्र ती ब्राह्मणांपुरती सांगितली आहे. आत्मतेज व राजतेज यांपैकी आत्मतेजच अधिक दुर्धर असा निश्चय असेल तोच खरा ब्राह्मण, म्हणून त्यानें प्रतिकारार्थ सरकार-दरबार करणें हें आपणास कमीपणा आणणारें असेंच मानलें पाहिजे.

जुन्या धर्मशास्त्राप्रमाणें ब्राह्मणाच्या सहा कार्यांपैकी अध्ययन, यजन व दान हीं जमेचीं खातीं अर्थातच नव्हत. अध्यापन, याजन व प्रतिग्रह या तीन कर्मांत जमेची बाब आहे; व यावरच ब्राह्मणाची उपजीविका मुख्यत्वेंकरून अवलंबून असते. व या उपजीविकेवरच त्यानें अवलंबून राहावें, इतर कांहीं कर्म त्यानें करितां कामा नये. नाहीं तर दोन प्रहरच्या वेळीं सरकारी नोकरी करीन व सकाळीं भिक्षुकी ठेवलेलीच आहे असें त्याला म्हणतां येणार नाहीं. शिवाय वृत्तिकर्मांपैकी एखादें कृत्य केल्याचा मोबदला जरी कोणीं दिला नाहीं तरी तो सक्तीनें वसूल करण्याचा अधिकार धर्मानें ब्राह्मणास ठेवलेला नाहीं हें वर सांगितलेंच आहे. अध्यापनाची गुरुदक्षिणा, किंवा यज्ञ केल्याबद्दलची ऋत्विज —दक्षिणा, या कोणी खुषीनें दिल्या तरच घ्यावयाच्या, त्या हक्कानें अमुक इतक्या देण्याच्या करारावर अध्यापन किंवा याजन करावयाचें नसतें; इतकेंच काय, पण पूर्वोच्चार किंवा संकल्प असला व तो कोणीं मोडला तरी ब्राह्मणानें तामसीपणानें तो पुरा करण्याचा हट्ट धरणें हें ब्राह्मणाच्या बाण्याला शोभण्यासारखें नाहीं. तिसरें कलम प्रतिग्रहसंबंधाचें, पण येथेंहि " विशुद्धाच प्रतिग्रहः " असा निर्बंध घातला आहे. म्हणजे प्रतिग्रह झाला तरी तो विशुद्ध मनुष्यापासून घेतला पाहिजे, वाटेल त्यापासून घेऊन चालणार नाहीं. आपली वृत्ति चालत नाहींशी झाली असें वाटलें तरच ब्राह्मणानें आपद्धर्म म्हणून क्षात्र-वैश्य-धर्म स्वीकारावा. पण तसें झाल्यानें त्याचा ब्राह्मणधर्म सुटला हें मात्र लक्षांत ठेवलें पाहिजे. आपद्धर्म हा अगदीं जरूरीपुरता नाइलाज म्हणून अनुसरण्याचा आहे. तो सोईचा म्हणून त्याला निरंतर चिकटून बसणाराला कोणीहि ब्राह्मण म्हणणार नाहीं. ज्याची वृत्ति अध्यापनादिकावर चालत नाहीं, त्यानें इतर वर्णांचे धर्म स्वीकारण्यापूर्वी फार तर हीन लोकांनाहि अध्यापनादि करून द्रव्य घ्यावें अशी सवलत ठेविली आहे. पण कोणत्याहि प्रसंगीं त्यानें कोर्टांत दावा मांडून दक्षिणा उकळावी असें सांगितलें नाहीं. दक्षिणा ही स्वीकारण्याची गोष्ट आहे, आपण होऊन मागून घेण्याची गोष्ट नाहीं. ज्यांचा चरितार्थ वृत्तिकर्मांवर अबाधित चालत नाहीं त्यांना स्मृतिकारांनीं शिल व उञ्छ या वृत्तींचा स्वीकार करण्यास सांगितलें आहे, व या वृत्ति, आपद्धर्मांतर्गत निषिद्ध कृत्यें व परवर्णधर्मांचीं कृत्यें करण्यापेक्षां,

अधिक प्रशस्त होत. धान्य कापून नेलेल्या शेतांतून पडलेली कणसें किंवा सांडलेलें धान्य त्यानें खुशाल वेंचून आणावें, ती चोरी होऊं शकत नाहीं व या मार्गांत याचनाहि घडत नाहीं; पण ब्राह्मण्य कडकडांत असेल, म्हणजे केवळ उदरनिर्वाहापुरती व देहधारणापुरतीच ज्याची दृष्टि असेल, धनसंचय करण्याची दृष्टि नसेल अशा ब्राह्मणाला कडकडीत उपवास पडल्यानंतर स्मृतिकारांनीं याहून विशेष सवलत ठेवून, बलात्कारानेंहि धान्य हरण करण्याचा अधिकार दिला आहे. व अशा कारणानें अपहारास प्रवृत्त झालेल्या ब्राह्मणाला राजानें शिक्षा करूं नये अशीहि त्या वेळीं स्मृतिकारांनीं शिफारस केली आहे. कारण सत्कर्मरत वृत्तिनिष्ठ अशा ब्राह्मणाला उपाशीं मरण्याची पाळी येणें याचा दोष ते स्वतः राज्यकर्त्यांच्या मूर्खपणाच्या माथींच मारतात.

न तस्मिन् धारयेद्दंडं धार्मिकः पृथिवीपतिः।
क्षत्रियस्य हि बालिश्यान् ब्राह्मणः सीदति क्षुधा॥

राजानें स्वतःच अशा ब्राह्मणाच्या पोटाला द्यावें असेंहि सांगितलें आहे. या सर्व सोई वृत्तिनिष्ठ अशा ब्राह्मणांकरितांच आहेत. पण वृत्तिनिष्ठता ही गोष्ट संभाळण्यास किती कठीण आहे याचाहि विचार करावा. किंचित् गैरसोय होतांच आपद्धर्माची सबब सांगून मोकळे होणाऱ्या व इतर वाटेल तें वर्णकृत्य करण्यास तयार होणाऱ्या ब्राह्मणाला या सवलतीचा फायदा कसा मिळणार? व त्यानें आपद्धर्माचा विनाकारण स्वीकार केल्यास त्यापुढील त्याचीं धर्मकृत्यें सफळ तरी कशीं होणार?

तात्पर्य, ब्राह्मणाचा अधिकार जसा मोठा तशीच त्याला बंधनेंहि फार आहेत. स्वकर्मनिष्ठ ब्राह्मणाला सहसा उपाशी मरावें लागत नाहीं. त्याला कोणी तरी दाता भेटतोच. अतिथीनें ज्याप्रमाणें त्रिरात्र एका ठिकाणीं राहूं नये, त्याप्रमाणें खऱ्या ब्राह्मणानें धनसंचय तर राहोच, पण धान्यसंचय देखील तीन दिवसांच्या पलीकडे करूं नये; व इतकी निर्लोभबुद्धि बाळगणाऱ्या ब्राह्मणाला इतर वर्णहि वंद्यच मानतील. स्वार्थत्यागाचें तेज असेंच कांहीं विलक्षण आहे. पण स्वार्थत्यागाचें नांवहि नाहीं, ब्राह्मणकर्माचें अनुष्ठानहि यथातथाच, शमदमादि गुण पाहावे तर ते अंगीं मुळींच नाहींत, अशा ब्राह्मणानें दुसऱ्याचीं धर्मकृत्यें चालविण्याचा अधिकार गाजवूं पाहावा, व तीं चालविण्यास कोणीं न बोलाविलें तरी देखील स्वामित्वादाखल दक्षिणेवर हक्क सांगावा, व तो हक्क कोणीं न मानला तर कोर्टांत फिर्याद मांडावी याहून ब्राह्मणधर्माची विटंबना ती दुसरी कोणती?

—केसरी १९२१ आक्टोबर २५

## धर्मबुद्धीचा ऱ्हास होत आहे काय?

ता. २० रोजीं सायंकाळीं तरवडे गणपतीपुढें रा. नरसिंह चिंतामण केळकर यांचें 'धर्मबुद्धीचा ऱ्हास होत आहे काय?' या विषयावर डॉ. नरहर शिवराम परांजपे यांच्या अध्यक्षत्वाखालीं व्याख्यान झालें. त्याचा सारांश असाः—"वर्तमानकाळ वाईट

म्हणणाऱ्या लोकांचा एक पक्ष नेहमीं समाजांत असतो तसा आज आमच्यांतहि आहे. त्याच्या मतानें आमच्यांतील धर्मबुद्धीचा ऱ्हास होत आहे. मला हें मत मान्य नाहीं. धर्मबुद्धीच्या ऱ्हासाचा आरोप समाज एकसारखा निर्वीर्य, निर्धन, बेइमान होत चालला आहे, अशा प्रकारच्या इतर आरोपांइतकाच खरा आहे. नव्या काळावर लोक नेहमीं ऱ्हासाचाच आक्षेप आणतात. याचें कारण जुनें फार अंतरावरून म्हणून मोहक दिसतें. पण समाजाचें तितक्याच दूरचें भविष्यहि वास्तविक त्यांना मोहक दिसावें, पण दिसत नाहीं याचें कारण ते स्वभावतः आत्मविश्वासहीन व नैराश्यवादी असतात. जुन्याच्या स्तुतीला श्रम लागत नाहींत; पण आजच्या कृतीला ते लागतात, यामुळें दुर्बळ व आळशी लोक समाज हा एकसारखा घसरणीलाच लागला आहे, अशी समजूत करून घेऊन दुःख करीत असतात. धर्मभ्रष्टतेची ही तक्रार आजची नाहीं. प्रत्येक जुन्या काळीं, जेव्हां तो काळ वर्तमानकाळ होता तेव्हां, आपल्या धर्मबुद्धीचा ऱ्हास होत आहे असेंच त्या वेळच्या लोकांस वाटत असावें. धर्मराजाच्या काळींदेखील धर्मबुद्धीच्या सुवर्णयुगाचा काळ त्याच्या वर्तमानकाळीं नव्हता, तर त्याच्याहून फार जुन्या भूतकाळीं होता. आदिपर्वांत अवतार-निश्चय सांगतांना वैशंपायनानें धर्मनिष्ठ समाजाचें उदाहरण आपल्या वेळचें दिलें नाहीं, एकीव अशा जुन्या काळाचेंच दिलें. धर्मबुद्धीच्या दृष्टीनें वर्तमानकाळाविषयीं अनादर वाटण्याचें कारण हें असावें कीं, धर्माचें काल्पनिक स्वरूप व धर्माचा प्रत्यक्ष आचार–व्यवहार यांमध्यें मनुष्याला केव्हांहि पुरा मेळ पडलेला दिसत नाहीं. मनुष्याच्या आंगच्या सावलीप्रमाणें प्रगतिपर लोकमत हें नेहमीं धर्म व कायदा यांच्या नियमाला थोडेंबहुत सोडून पुढेंच असतें. फक्त मध्यान्हाच्या एका क्षणास सावली बरोबर पायाखालीं येऊन वस्तु व छाया यांचा सोळा आणे मेळ पडतो. तेवढा एक क्षण सोडला म्हणजे बाकी सर्व काळ विसंवादित्वच असतें. धर्म हा दिसण्यांत स्थूल असतो, पण प्रत्यक्ष हातांत धरावयास गेलें असतां तो कधींहि सांपडत नाहीं इतका सूक्ष्म असतो. ' अणीयान क्षुरधारायाः गरीयानपि पर्वतात् ' अथवा

गंधर्वनगराकारः प्रथमं संप्रदृश्यते ।
अन्वीक्ष्यमाणः कविभिः पुनर्गच्छत्यदर्शनम् ॥

ही भारतांतील धर्माचीं वर्णनें फारच मार्मिक आहेत. धर्माचाराचें स्वरूप पावलोपावलीं पालटत असतें; आणि भाषेचें जसें एक पाऊल व्याकरणापुढेंच असतें, तसें रूढाचाराचें एक पाऊल नेहमीं धर्मशास्त्राच्या नियमाच्या शब्दापुढें असतें. अर्थात् जुन्याविषयीं आदर पण नव्याविषयीं नावड यामुळें समाजाच्या मनांत रूढाचाराविषयीं नेहमीं एक प्रकारची रुखरुख वाटत असते. ही स्थिति जशी आज आमची आहे तशीच त्रेतायुगांत श्रीरामचंद्राच्या वेळींहि खचित असेल. अशा वेळीं छापाचार वगळून, शिष्टसंमत असे नवे आचार घेऊन, नवीन स्मृति बनवून तिचा आधार आमच्या मनास देणारा कोणी महात्मा आज मिळाला तर धर्मबुद्धीच्या ऱ्हासाची रुखरुख कदाचित् नाहींशी होईल. पण वर्तमानकाळाविषयीं अनादरबुद्धि असल्यामुळें असा कोणी स्मृतिकार मुनि झाला तरी

त्याचें चीज आज न होतां तो जेव्हां शेंकडों वर्षांचा जुना होईल तेव्हांच त्याला महत्त्व येईल ! तात्त्विक दृष्टीनें पाहिलें तरी धर्मबुद्धीचा न्हास होण्याचें आज काय कारण ? धर्म म्हणजे ईश्वर व आत्मा यांच्या संबंधाची उपपत्ति व या उपपत्तीविषयीं चिकित्सा पूर्वी-इतकीच आज चालू आहे. धार्मिक म्हणून मानलेल्या प्रत्यक्ष आचारांचें स्वरूप कांहींसें पालटलेलें दिसेल; पण देशभिन्नत्व, कालभिन्नत्व, समाजभिन्नत्व व व्यक्तिभिन्नत्व यांच्या योगानें धर्माचारांत भिन्नत्व हें राहणारच. एकाच गुणधर्माच्या, चार हातांएवढ्या, जमिनी-च्या तुकड्यांत दोन निरनिराळ्या जातींचें बी लावलें असतां निरनिराळीं झाडें येतात, किंबहुना तेवढ्याच क्षेत्रांत एकाच झाडाच्या दोन बिया लावल्या तरी त्यांपासून येणाऱ्या वृक्षांची वाढ व विस्तार सर्वस्वीं सारख्या प्रमाणानें झालेला आढळत नाहीं. तीच गोष्ट धर्माचाराचीहि आहे. भौतिक शास्त्राच्या परिणतीनें खरोखर धर्मबुद्धीची हानि न होतां धर्मबुद्धीला उत्तेजनच मिळालें आहे. आत्म्याच्या स्वरूपाविषयीं आश्चर्य किंवा ईश्वराच्या स्वरूपाविषयीं विचारगंभीरता हीं मुळींच कमी झालीं नाहींत. सर्वांत आधुनिक व प्रमुख युरोपियन तत्त्ववेत्ता हेनरी बर्गसन यानें धर्मबुद्धीचा न्हास होत नसून ती वाढत आहे असाच अभिप्राय दिला आहे. तो म्हणतो:—'The progressive deepening of the religious idea may make the religious sense clearer and ever clearer; it cannot modify that which is essential in it, still less effect its disappearance.' धर्माच्या अनित्य स्वरूपांत कालांतरानें फरक पडला आहे व पडलाच पाहिजे. पण धर्मबुद्धीच्या नित्य स्वरूपांत तसा फरक पडलेला नाहीं." ( हें व्याख्यान पाऊस पडूं लागल्यामुळें येथेंच थांबलें. )

—केसरी १९१५ सप्टेंबर २८



# उतारे-चरित्रें

## कै. ना. रा. ब. गणेश व्यंकटेश जोशी

महाराष्ट्राचें नष्टचर्य अद्यापि संपलें नसल्यामुळेंच की काय, हळहळ वाटण्यासारखी बातमी कानीं आली नाहीं, असे दिवस फार थोडे जातात. नामदार ग. व्यं. जोशी यांच्या आकस्मिक मृत्यूची बातमी ही अशाच वर्गापैकीं असल्यानें ही अशी बातमी केसरीच्या वाचकांस कळविण्याचें आमचे नशीबीं आज आलें आहे हें आम्हीं मोठेंच दुर्दैव मानतों. रा. ब जोशी यांजविषयीं यापूर्वी जो ताजी म्हणून बातमी लोकांस केसरीमार्फत कळली होती ती सातारच्या जिल्हापरिषदेंत हजर राहून त्यांनीं समारोपादाखल सुंदर भाषण केलें ही होय. या गोष्टीस तीन आठवडेहि झाले नाहींत; त्यानंतर ते कऱ्हाड, मिरज वगैरे ठिकाणीं हिंडून आले. फार काय पण केसरीचा मागचा अंक प्रसिद्ध होईपर्यंत रा. ब. जोशी यांची प्रकृति उत्तम असून गेल्याच्या मागील सोमवारी ते वसंत व्याख्यानमालेस हजरहि होते. परंतु गेल्या मंगळवारच्या संध्याकाळपासून ती बिघडली. बरेच दिवसांपासून रावबहादुरांना अंतर्गळाच्या व्यथेची बाधा होती खरी; तथापि, तात्पुरत्या उपायांनीं ती हटत असे. मजल मारणें, जिन्यावरून चढणें उतरणें वगैरे गोष्टी त्यांना जपूनच कराव्या लागत. पण बसणें उठणें, हिंडणें फिरणें, व्यायाम घेणें हीं नित्य व्यवहाराचीं कामें करण्यास त्यांस अडचण पडत नसे. व त्यांचा आवडता असा जो व्यवसाय म्हणजे लिहिण्यावाचण्याचा तो तर गेल्या मंगळवारपर्यंत अबाधित चालला होता. पण मंगळवारी संध्याकाळीं अंतर्गळाचा विकार वाढून एकदम शस्त्रक्रिया करावी लागली. बुधवारीं पुणें शहरांतील सर्व नामांकित डाक्तर-लोकांची कमिटी भरवून शस्त्रप्रयोग करण्यांत आला व तो सफळ होऊन मूळ विकार हटलाहि. पण शिवलेल्या जखमेचे टांके तुटूं नयेत म्हणून त्यांस अमूक एका स्थितीतच पडून राहणें भाग झालें; व एकाच कुशीवर निजल्यानें छातींत रक्त उतरून फुप्फुसें बिघडलीं व श्वासोच्छ्वासाची अडचण पडून गेल्या शनिवारीं सकाळीं ९॥ वाजतां त्यांस देवाज्ञा झाली. रावबहादूर आजारी आहेत ही बातमी शहरांत पसरते व पसरते तों त्यांच्या मृत्यूची बातमीहि लोकांच्या कानीं पडली. फार काय, त्यांची गांठ वारंवार पडणारी अनेक स्नेही मंडळी याच दिवसांत कर्मधर्मसंयोगानें विशेष कामानिमित्त पुण्याच्या बाहेर गेलीं असल्यानें तेहि इतर लोकांप्रमाणेंच रावबहादुरांच्या भेटीस अंतरले. अशा तऱ्हेचा हा आकस्मिक घाला पडून आजकाल पुण्यांतलाचसा काय पण सर्व हिंदुस्थानांतील नामांकितांपैकीं एक नेता पुरुष नाहींसा झाला!

रा. ब. जोशी यांचा जन्म सन १८५१ च्या जून महिन्याच्या ८ व्या तारखेस मिरज मुक्कामीं झाला. जोशी यांचे घराण्यास 'उस्तुरकर' या नांवानें मिरजेकडे ओळखतात.

केवळ ३५० रुपयांच्या जागेवरच त्यांस पेन्शन घ्यावें लागलें हें खरें. पण याला इतर कारणें आहेत, व त्यापैकीं मुख्य म्हटलें म्हणजे जोशीबुवा हे निःस्पृह व ताठर होते, आणि अधिकाऱ्यांस फाजील नमून त्यांचे स्तुतिपाठ गाणारे नव्हते हेंच होय. किंबहुना जोशीबुवासारख्या मनोरचनेचा मनुष्य सरकारी नोकरींत मुळीं शिरला कसा याचेंच आजच्या घटकेस पुष्कळांना आश्चर्य वाटेल. एका काळच्या समजभावनेवरून दुसऱ्या काळाच्या कृत्यांचे गुणदोष आपण पुष्कळ वेळां ठरवितों. पण ही वास्तविक चूक आहे. जोशीबुवा नोकरींत शिरले त्यावेळीं सरकारी नोकरीस हल्लींहून अधिक मान व नोकरींत हल्लींहून अधिक स्वातंत्र्य होतें; लोककार्य व राजकार्य यांमध्यें हल्लींइतका दुःसह व बिनतोड विरोध भासत नव्हता; किंबहुना तो काळ असाच होता कीं, राजसेवा ही लोककार्यक्षमतेस थोडी बहुत उपकारच होती. जोशीबुवा हे शिक्षणप्रिय असल्यामुळें त्यांना शाळाखात्यांतील नोकरी आकर्षक वाटली; व शाळाखातें हें सर्वांत सालस व निरुपद्रवी असें खातें असल्यामुळें त्यांना त्यांतील नोकरी पटली. पण सरकारी नोकरींत राहूनहि लोक सेवा कशी करतां येते याचें उत्कृष्ट उदाहरण जोशीबुवांनीं घालून दिलें. या पुढच्या पिढीस तें उदाहरण गिरवणें कठिण झालें आहे खरें; परंतु जोशीबुवांशीं समकालीन असणाऱ्या बहुतेक सरकारी नोकरांना तें पाहून लज्जेनें मान खालींच घालावी लागेल यांत शंका नाहीं. न्यायखात्यांत राहून कै० रा. ब. रानडे यांनीं व रेव्हिन्यु खात्यांत राहून रा. नाना साहेब भावगी यांनीं ज्या प्रकारचें लोकसेवाक्षमत्व दाखविलें त्याच प्रकारचें लोकसेवा क्षमत्व शाळाखात्यांत राहून कै० विष्णुशास्त्री चिपळूणकरांप्रमाणें कै० रा. ब. जोशी यांनीं दाखविलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. जोशीबुवांनीं जे लेख लिहिले, सरकारी कारभारावर जी टीका केली व लोकहिताचे जे मार्ग दाखवून दिले ते सर्व सरकारी नोकरींत असतांनाच! पेन्शन घेतल्यावर उघडपणें त्यांना सभांना वगैरे जातां आलें; पण नोकरी सोडल्यावर त्यांनीं बहुधा कांहीं लिहिलें नाहीं—नवीन लिहिण्याचें असें त्यांस कांहीं उरलें नव्हतें—असेंच म्हटलें तरी चालेल.

नोकरी करतांना जोशीबुवांनीं आपलें स्वातंत्र्य वाजवीहून फाजील असें केव्हांच गमावूं दिलें नाहीं. राज्यकारभाराच्या बाबीवर आपलें मत व्यक्त करणें हा प्रत्येक नागरिकाचा स्वभावसिद्ध हक्क आहे, असें ते मानीत; व या हक्कास अनुसरूनच खुद्द फाईलसाहेबांच्या रावणराज्यांतहि जोशीबुवांनीं 'टाइम्स ऑफ इंडिया' पत्रामध्यें सरकारी रेव्हिन्यु खात्यावर सणसणीत पत्रें 'जे' या सहीनें लिहिलीं. तसेंच खाजगी संभाषणांत व पत्रव्यवहारांत, पुस्तकें वगैरेवर अभिप्राय देतांना, वरिष्ठ अधिकाऱ्यांची मीड न ठेवतां ते आपलीं मतें प्रतिपादन करीत. अशा कृत्यांपासून आपणावर अधिकाऱ्यांची मनांतून इतराजी होण्याचा संभव आहे हें ते जाणत नव्हते असें नाहीं; परंतु बरतीपेक्षां आपल्या मतांचेंच त्यांना अधिक भूषण वाटे. आपल्या नोकरीच्या मुदतींत त्यांनीं दोन तीन वेळां राजीनामा देऊं केला होता. पण तो स्वीकारणें अधिकाऱ्यांसच बरें वाटलें नाहीं. सोलापुरास हेड मास्तरीच्या जागेवर असतांना तेथच्या कारभारांत त्यांचा व

तेथील युरोपियन अधिकाऱ्यांचा बेबनाव झाला. तेव्हां राजीनामा देण्यास तयार होऊन जोशीबुवांनीं तो वाद वरिष्ठ अधिकाऱ्यापर्यंत नेला. तेव्हां सदर युरोपियन अधिकाऱ्यास त्यांची माफी मागावी लागली व ड्रेनेजव्यवस्थेचा कारभार उत्कृष्ट केल्याबद्दल सरकारकडून त्यांस रावबहादूर हा किताबहि देण्यांत आला. पेन्शन घेतल्यानंतरहि त्यांच्या मागचा जाच सर्वस्वीं सुटला नव्हता; कारण १९०८–९ सालच्या दडपशाहीच्या अवधींत त्यांनीं राजकारण प्रकरणीं जी स्पष्टोक्तिपूर्ण भाषणें केलीं, व राष्ट्रीय स्वरूपाच्या चळवळीस आपली उघड सहानुभूति दाखविली, ती सरकारास अमान्य होऊन, पुण्यास एका वरिष्ठ युरोपियन अधिकाऱ्यानें "आपण सरकारचें पेन्शन घेत आहांना? सरकार नोकरास पेन्शन चालवितें तें कोणत्या अटींवर याची दाखलगिरी आपणास आहे ना?" असें दटावून विचारिलेंहि होतें. पण त्याला जोशीबुवांनीं 'होय, मला त्याची पूर्ण माहिती आहे" असा शांतपणें जबाब दिला, असें आम्हांस माहिती आहे. नोकरी सोडल्यावरहि सरकारनें नोकरांच्या विचारस्वातंत्र्यांत हात घालावा ही गोष्ट जोशीबुवांस मान्य नव्हती; व पेन्शन जाण्याचा धोका कदाचित् आपणास बसण्याचा संभव आहे, हें नेहमीं मनांत बाळगूनच त्यांनीं आपलें लोकसेवेचें काम चालू ठेविलें होतें.

पण रावबहादूर जोशी यांचो हो न्यायाची व रीतसर दांडगाई पचण्यास आमच्या मतें एक मुख्य कारण होतें; व तें असें कीं ते टांकाचे खंबीर असून, जो कोणताहि लेख ते लिहीत, जो कोणतीहि टीका ते करीत ती सर्वस्वीं सप्रमाण व साधार अशीच असे. विरुद्ध टीका साधार असली तरी ती सरकारास मानवलेच असें नाहीं; पण अशा टीकेचें निमित्त करून टीकाकाराचें उघड नुकसान करणें जड जातें. भरपूर आंकडे व माहिती–आणि तीहि खुद्द सरकारनें प्रसिद्ध केलेल्या रिपोर्टांतून घेतलेली–अशी त्यांच्या प्रत्येक लेखांत असल्यामुळें खुद्द अधिकाऱ्यांसहि त्यांच्या ज्ञानाबद्दल पूज्यबुद्धि वाटे; व केवळ यामुळेंच, सरकारच्या रेव्हिन्यू धोरणाबद्दल अत्यंत अनादर उत्पन्न करणारीं टाइम्समध्यें प्रसिद्ध झालेलीं त्यांचीं पत्रें कोणीं लिहिलीं हें सरकारास माहीत असतांहि त्यांना मूग गिळून गप्प बसावें लागलें. कच्च्या टांकाच्या टीकाकाराची उचलबांगडी सरकारनें केव्हांच केली असती. पण केवळ सरकारविरुद्ध टीका करितांनाच काय तें जोशीबुवा आपलें आंकडेशास्त्र पुढें आणीत असें नव्हे, तर त्यांचें हें अमोघ शस्त्र सदोदित पाजळलेलें असे. कोणताहि विषय निघो, त्याचा पूर्वापर इतिहास आणि त्याचे मुद्देसूद आंकडे जोशीबुवांजवळ तयार नाहींत असें कधींहि होत नसे. एखाद्या विषयावर नुसतें तर्कट चालविणें किंवा वावटळीच्या वाऱ्यासारखें वाटेल त्या बाजूनें धूळ उडविणें फार सोपें आहे. पण या विषयाचा सांगोपांग अभ्यास करून व मिळतील तितके आंकडे मिळवून त्यांवरून सिद्धांत बनविणें हें काम फार कठीण आहे. असलें हें काम साध्य होईपर्यंत जितकें परिश्रमाचें तितकेंच तें साधलें म्हणजे मग बहुमोल असें ठरतें. आंकड्यांवरून कोणत्याहि प्रश्नाचें यथार्थ व प्रमाणबद्ध असें ज्ञान होतें; व त्याच्या सर्व नाड्या आपल्या हातीं येतात. आंकडेशास्त्रांत जोशीबुवांनीं जसें प्रावीण्य मिळविलें होतें

तसें या काय किंवा इतर इलाख्यांत काय, फारच थोड्यांनी मिळविलें असेल. चार वर्षांपूर्वी मँचेस्टर गार्डियनचे प्रतिनिधि मि० नेव्हिन्सन् हे इकडे आले होते. त्यांनी The new spirit in India, या नांवाचें एक पुस्तक लिहिलें आहे; त्यांत जोशीबुवांच्या आंकडेशास्त्रप्रियतेचें फारच मार्मिक व विनोदी वर्णन केलें आहे. जोशीबुवांना आंकड्याचा छंद किंवा नादच होता असें म्हटलें तरीहि चालेल. पण त्या छंदाचा व्यावहारिक उपयोग किती आहे, हें सार्वजनिक विषयांची चर्चा करणारे लोकच जाणूं शकतात!

सार्वजनिक प्रश्नाचा अभ्यास करण्याचें काम जोशीबुवांनीं सुमारें ३५ वर्षांपूर्वी सुरू केलें, तें मरणकालपर्यंत चालूंच होतें. याच काळांत महाराष्ट्रामध्यें राजकीय शिक्षणाचा प्रसार झाला; व या प्रसाराचें श्रेय ज्यांस आहे, अशा पुढाऱ्यांमध्यें जोशीबुवांचा दर्जा बराच वर लागेल यांत शंका नाहीं. जोशीबुवा हे रा० सा० रानड्यांहून वयानें लहान होतें, तथापि त्यांना रानड्यांशीं समकालीन असें गणण्यास हरकत नाहीं. निदान रानडे व जोशीबुवा यांचें समव्यवसायित्व व सहकारित्व सुमारें पंधरा वर्षेपर्यंत सतत चालू होते. जोशीबुवांचे भरपूर आंकडे व रानड्यांची मार्मिक मांडणी असा मेळ पडून त्या काळांत किती तरी महत्त्वाचे सार्वजनिक प्रश्न सजले गेले असतील! रानड्यांना जोशीबुवा हे गुरुप्रमाणें मानीत. व निरंतर त्यांचा उल्लेख आदरपूर्ण अशा प्रेमानेंच करीत. रानड्यांच्या अनुषंगानेंच जोशीबुवा व नामदार गोखले यांचा स्नेह जमला; व रानड्यांस जोशीबुवा जो मान देत तोच ना. गोखले हे जोशीबुवांस देत असत. नामदार गोखले व जोशीबुवा हे सार्वजनिक कामें पांच वर्षेपर्यंत एकविचारानें व परस्पर सल्लामसलतीनें करीत असत; व १८९७ सालीं वेल्बी कमिशनपुढें झालेल्या साक्षींत अथवा कायदे कौन्सिलांच्या सभांतील भाषणांत सरकारपुढें व लोकांपुढें ना. गोखले जी माहिती ठेवीत त्यापैकीं कांहीं कांहीं माहिती जोशीबुवांनीं पुरवलेली अगर त्यांच्या विचारें तपासून घुलावून घेतलेली असे. जोशीबुवा पुण्यास येईपर्यंत त्यांचा व रा० टिळक यांचा परस्पर अत्यंत आदर असे, पण निकट स्नेह असा नव्हता; तो १९०५ सालापासून जडला व तेव्हांपासून तो एकसारखा वृद्धिंगतच होत गेला. राष्ट्रीय पक्षाचीं मतें जोशीबुवांस बहुतांशीं ग्राह्य असत; व गेल्या तीन वर्षांत असलेल्या बिकट परिस्थितींत त्यांनीं राष्ट्रीय पक्षाचें धुरीणत्व पत्करून त्या मतांस पाठिंबा देण्याचें काम धैर्यानें व उत्साहानें कसें केलें, हें महाराष्ट्रास आज नव्यानें सांगण्याचें कारण नाहीं.

अलीकडे जोशीबुवांवर जहाल मताची छाया पडली होती, असें त्यांच्यावरील मृत्युलेखांत आमचे व्यवसाय-बंधु 'ज्ञानप्रकाशकार' यांनीं म्हटलें आहे. मत बदलल्याचा हा आरोप आमच्या मतें खरा नाहीं. पण एके काळीं जोशीबुवा नेमस्त मनाचे होते, असे गृहीत धेऊन चाललें तरी, त्यांची अलीकडील जहाल मतें हें, जन्मभर केलेली आंकडेमोड निष्फळ झाली असें पाहून वाटणाऱ्या निराशेचें स्वाभाविक फळ तरी नसेल कशावरून? कोणत्याहि प्रश्नाची चर्चा भरपूर माहिती मिळवून मग करावी हें बरोबर

आहे; व जन्मभर जोशीबुवा याच तत्वाप्रमाणें वागत आले. पण, आंकडे आणि कारणें यांचें माप भरपूर पदरांत घातलें, तरी, शेवटी अधिकारी लोक स्वतःच्या 'मर्जीचा' सवाई सोटाच सरसावून प्रतिपक्षी जमीनदोस्त करतात, असा जन्मभर अनुभव आल्यानें जोशीबुवांसारखा शांत डोक्याचा मनुष्यहि रागावूं शकतो; या गोष्टीवरून जोशीबुवांचीं मतें बदललीं म्हणून त्यांस दोष देण्यापेक्षां, अरेरावी सवाई सोट्यापुढें आंकड्यांचें आणि युक्तिवादाचें ज्या राज्यकारभार पद्धतीमध्यें कांहीं चालत नाहीं, त्या पद्धतीस नांवें ठेवणें हेंच अधिक न्याय्य होईल. ढळढळीत अन्यायानें व तीव्र निराशेनेंहि ज्यांचें शांति-ब्रह्म-पद-ढळत नाहीं त्यांचें तें पद त्यांसच लखलाभ असो. पण जोशीबुवांस नांव ठेवण्याच्या कुत्सितबुद्धीनें त्यांस 'जहाल' हें पद लावणाराला खरोखरच लाज वाटली पाहिजे. सुदैवानें 'जहाल' हें विशेषण खरोखर दूषणास्पद नाहीं. तें जोशीबुवांस लावल्यानें लोकांत त्यांची किंमत तर कमी होणार नाहींच. पण मृत्युलेख लिहितांनाहि, ज्यांना आपल्या पक्षमूलक वैराचा विसर पडत नाहीं, त्यांची योग्यता मात्र जग चांगलीच पारखील यांत शंका नाहीं.

जोशीबुवा हे जरी मोठे ग्रंथकार नव्हते तरी त्यांची विद्वता जाडी होती यांत शंका नाहीं. त्यांचा मुख्य व्यासंग सरकारी राज्यकारभारासंबंधाची माहिती मिळविण्याचा असे, व ही माहिती मिळवून त्यांनीं बहुधा सर्व खात्यांच्या कारभारावर टीकात्मक लेख लिहिले आहेत. तथापि शिक्षण, जमीनमहसूल व देशाची सांपत्तिक स्थिति हे तीन विषय त्यांच्या विशेष आवडीचे होते. अलीकडे हिंदुस्थानच्या सांपत्तिक स्थितीसंबंधानें सरकारी अधिकाऱ्यांकडून जो आग्रहपूर्वक पूर्वपक्ष करण्यांत येत आहे त्याला उत्तरादाखल एक निबंध लिहिण्यांत ते गुंतले होते. परंतु दुर्दैवानें त्यांच्या मृत्यूमुळें आतां तें काम अपूर्णच राहणार !

जोशीबुवांच्या अंगीं जे विशेष गुण म्हणून होते ते विद्याव्यासंगित्व, निस्पृहता व लोकशिक्षणाची हौस हे होत. केव्हांहि त्यांजकडे जा, जिकडे तिकडे पुस्तकें व कागदपत्र पसरलेले असून मध्यें बसून हातांत पेन्सिल घेऊन ते त्याचा काळजीपूर्वक अभ्यास करीत आहेत असेंच दिसे. कोणीहि केव्हांहि गेला तरी त्यास कोणत्याहि प्रश्नाची सांगोपांग माहिती सांगणें व पुस्तकांची मदत करणें याची त्यांस फार आवड होती. आचरणानें ते शुचिर्भूत नियमनिष्ठ व धार्मिक भावनेचे असत. श्रीगणपतीला दूर्वा वाहिल्याशिवाय ते कधींहि अन्नग्रहण करीत नसत. गरीबांस अन्न देणें याची त्यांना विशेष आवड असे. जोशीबुवांमध्येंहि स्वभावाचे असे किरकोळ थोडेसे दोष होते. पण जगांत निर्दोष असा मनुष्य कोण आहे ? विशेषतः राष्ट्राच्या दृष्टीनें व्यक्तीची किंमत करतांना असले किरकोळ दोष कोणत्याहि देशांत अगर समाजांत उपेक्षणीय असेच मानले जातात. जोशीबुवांच्या अंगीं ठळक असा कोणताच दोष नव्हता. ठळक असे गुणच पुष्कळ होते. महाराष्ट्रानें अभिमान बाळगण्यासारखाच हा पुरुष होऊन गेला, असें आज सर्व जनता एकमतानें म्हणत आहे; व भविष्यकाळीं इतिहासहि हेंच लिहून ठेवील.

—केसरी १९११ मे २१

## वासुदेवशास्त्री खरे यांचा मृत्यु

जुन्या पिढींतले पण नव्याहूनहि अधिक उमेदीनें संशोधनाचें कार्य करणारे मिरजे-चे सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक, कवि व नाटककार वासुदेवशास्त्री खरे यांस मिरज मुक्कामीं बुधवार ता. ११ रोजीं रक्तक्षयाच्या विकारानें देवाज्ञा झाली हें कळविण्यास आम्हांस अत्यंत वाईट वाटतें. केसरी-मराठा संस्थेच्या जन्मापासूनच शास्त्रीबुवांचा संबंध या संस्थेशीं जडला होता. केसरीच्या मथळ्यावर असलेल्या 'स्थितिं नो रे दध्याः' या श्लोकाचें 'गजालिश्रेष्ठा या' हें समवृत्तांतलें पद्यमय भाषांतर शास्त्रीबुवांनींच करून दिलें होतें. टिळक डेक्कन कॉलेजांत असतांनाच त्यांचा टिळकांशीं परिचय जडला; परंतु पुढें शास्त्रीबुवांचा व्यवसाय भिन्न तऱ्हेचा सुरू झाला व त्यांतूनहि त्यांस संस्थानांत राह-ण्याचा प्रसंग आला, म्हणून ते प्रत्यक्ष राजकीय चळवळींत पडले नाहींत; तथापि लोक-मान्यांच्या राजकारणाविषयीं त्यांना अंतःकरणपूर्वक सहानुभूति वाटत असे.

खरेशास्त्री यांचें मूळ गांव कोंकणांतील गुहागर हें होय. त्यांचें घराणें शास्त्र-विद्येविषयीं प्रसिद्ध आहे. कोंकणांतून वर आल्यावर त्यांनीं प्रथम सातारा येथें कै० विद्वच्छ्रेष्ठ अनंताचार्य गजेंद्रगडकर यांचे घरीं राहून संस्कृत विद्येचा परिश्रमपूर्वक अभ्यास केला. तेथें असतां ते कै. बाळाचार्य गजेंद्रगडकर यांचे सहाध्यायी होते. गजेंद्रगडकरघराण्या-संबंधानें खरेशास्त्री यांची नेहमीं आदरबुद्धि असे. शास्त्रीबुवांनीं पुढें पुण्यास नवीन निघा-लेल्या न्यू इंग्लिश स्कूलमध्यें संस्कृत शिक्षकाची नोकरी धरली. त्या वेळीं त्यांचा व टिळकांचा स्नेहसंबंध विशेष दृढ झाला. पुढें मिरज येथें नवीन हायस्कूलची योजना झाल्यामुळें कै. अण्णाजी रामचंद्र अभ्रे यांना हेडमास्तर व खरेशास्त्री यांना संस्कृत शिक्षक म्हणून मुद्दाम नेण्यांत आलें. लोकमान्य टिळकांचे शिफारशीवरून या उभयतांची मिरजेस नेमणूक झाली होती. पुण्यास असेपर्यंत शास्त्रीबुवांना इंग्रजी फारसें येत नव्हतें. परंतु मिरजेस गेल्यावर रात्रीचा दिवस करून केवळ स्वतःच्या प्रयत्नानें त्यांनीं इंग्रजीचा उत्तम अभ्यास केला, व दोन-तीन वर्षांत मिरज लायब्ररींतील सर्व इंग्रजी ग्रंथ त्यांनीं वाचून टाकले ! पुण्यासारख्या ठिकाणीं ते असते तर संस्कृत व मराठी भाषांप्रमाणें इंग्रजी भाषेवरील त्यांचें प्रभुत्वहि लोकांच्या निदर्शनास खचित आलें असतें. पण दुर्दै-वानें त्यांची आयुष्यक्रमाची गाडी एका मागसलेल्या संस्थानाच्या आडरुळावर गेली त्यामुळें त्यांचें सर्व प्रकारें नुकसान झालें. या अशा स्थितींत असतांहि त्यांनीं उत्तम ग्रंथ-कार व लोकोत्तर इतिहाससंशोधक म्हणून कीर्ति मिळविली हेंच त्यांच्या बुद्धिमत्तेचें व ध्येयनिष्ठेचें खरें लक्षण होय. ग्रंथवाचनाची गोडी लागली असतां तहानभूक विसरणें हें वर्णन शास्त्रीबुवांसंबंधानें अक्षरशः पहावयास सांपडे, व खेळण्याचा अड्डा काय किंवा विद्याव्यासंग काय, दोहोंसंबंधानें त्यांची बैठक येवढी दांडगी असे कीं, आठ आठ प्रहर देखील ती कित्येक प्रसंगीं टिकलेली आहे. कविता करण्याचा नाद शास्त्रीबोवांना लहान-पणापासून असे. मिरज हायस्कुलांत गेल्यानंतर लगेच त्यांनीं "यशवंतराव" नांवाचें

महाकाव्य लिहिलें. त्यांच्या फुटकळ कविताहि बऱ्याच आहेत. विद्यार्थ्यांना संस्कृत शिकवीत असतां प्रसिद्ध संस्कृत काव्यग्रंथांतील श्लोक घेऊन त्यांचें समवृत्त मराठी भाषांतर तावडतोब ते करून दाखवीत. ते शिक्षक या नात्यानें मोठे रागीट व मारके असत; तथापि त्यांच्या शिक्षणप्रसंगीं विद्यार्थ्यांना कोट्या, हास्यविनोद, कथाकलाप, काव्यस्फूर्ति व सुभाषितसंचय यांचा जो अपूर्व लाभ घडे, त्यामुळें विद्यार्थी त्यांचा राग व मार दोनहि विसरून जात व त्यांजवर नेहमीं खूष असत. पुढें स्वतः त्यांनीं इतिहास विषयाचा व्यासंग सुरू केल्यानंतर काव्य व नाटक या दोनहि गोष्टींना सहजच गौणत्व आलें व पुढें केवळ ते जरूरीपुरत्याच त्यांना हातीं धरीत. तथापि त्यांच्याशीं संभाषण करण्याचा प्रसंग ज्यांना सुदैवानें लाभला असेल त्यांना खरी बहुश्रुतता हा पदार्थ काय असतो हें कळून आल्याशिवाय राहिलें नसेल. यांच्या आख्यायिका म्हणजे चालतें-बोलकें उदार शिक्षण होतें.

मिरज हायस्कुलांत संस्कृत शिक्षक बनल्यापासून तेथें ३० वर्षें काम करून पेन्शन घेतल्यावरहि आमरण ते मिरजेसच राहिले. १८९८ सालीं त्यांनीं आपल्या ' ऐतिहासिक लेखसंग्रह ' मासिकद्वारा संशोधन कार्यास प्रारंभ केला आणि यावज्जन्म तें कार्य त्यांनीं अत्यंत एकनिष्ठेनें व कळकळीनें चालविलें. ऐतिहासिक पत्रांच्या भाराभर गठ्ठ्यांतून महत्त्वाचीं पत्रें नेमकीं निवडून काढणें आणि त्यांतला वेंचक भाग वाचकांपुढें व्यवस्थितपणें मांडणें ही हातोटी शास्त्रीबुवांना फारच उत्तम साधली असल्यानें ' ऐतिहासिक लेखसंग्रह ' हें मासिक फारच लोकप्रिय झालें. शास्त्रीबुवांनीं पुढें या मासिकाचें पुस्तकांत रूपांतर केलें. त्याचे आतांपर्यंत ११ भाग छापून प्रसिद्ध झाले असून १२व्या भागाची लेखी प्रत शास्त्रीबुवांनीं तयार करून ठेवली आहे. शास्त्रीबुवांचा हे रसिक विद्वान असून त्यांच्या साध्या भाषणांत देखील मनोरंजक कोट्या व विनोदपर अलंकार भरपूर असत, यामुळें त्यांचीं नाटकेंहि फार लोकप्रिय झालीं आहेत. ' गुणोत्कर्ष ' हें त्यांचें पहिलें नाटक प्रसिद्ध होऊन चाळीस वर्षें होत आलीं, तथापि त्याची लोकप्रियता नव्या नाटकाइतकीच ताजी आहे. त्यांचें ' तारामंडळ ' हेंहि नाटक वाखाणण्याजोगें झालें आहे; पण 'उग्रमंगल' आणि ' शिवसंभव ' या शेवटच्या नाटकांनीं सर्वांवर ताण केली आहे. या नाटकांतील प्रसंग ऐतिहासिक माहितीला धरून असून, अत्यंत उठावदार बनले आहेत. ऐतिहासिक लेखसंग्रहाखेरीज त्यांनीं नाना फडनविसांचें चरित्र, अधिकारयोग, शहाजी वगैरे ग्रंथांनीं व निबंधांनीं इतिहास विषयांत चांगलीच भर टाकली आहे.

जुन्या काळीं केवळ इंग्रजी शिक्षणानें मिळणारी पदवी संग्रहीं नसल्यानें, बुद्धिमान तेजस्वी व कर्तृत्वशाली अशा ज्या अनेक गृहस्थांना गरिबींत दिवस काढावे लागले व कर्तृत्वाला शोभण्याजोगी कीर्ति ज्यांना लाभली नाहीं अशांपैकींच खरेशास्त्रीबुवा हे एक होत. ते कोणत्याहि युनिव्हर्सिटीचे उच्च पदवीधर अथवा फर्डे वकील किंवा बॅरिस्टर होण्याइतकी त्यांची बुद्धिमत्ता होती. आपले रँग्लर परांजपे यांना सुदैवानें प्रो. कर्वे यांच्या उत्तेजनानें विद्येचें निराळें वळण न लागतें तर त्यांचा सर्व बुद्धिचमत्कार वेदांचा जटापाठ किंवा

घनपाठ म्हणण्यांतच निदर्शनास आला असता, व निवळ स्मरणशक्ति हेंच त्यांच्या कर्तृत्वाच्या परिमाण होऊन बसलें असतें. ही जी गोष्ट रँग्लर परांजपे यांच्यासंबंधीं घडावयाची टळली ती किंचित् रूपांतरानें, खरेशास्त्री यांच्या बाबतींत प्रत्यक्ष घडून आली; असें म्हणतां येईल. एरवीं येवढी बुद्धिमत्ता व एवढी उद्योगप्रियता यांची फलश्रुति एखाद्या मागसलेल्या संस्थानांत मोडकळलेल्या हायस्कुलांतील पंतोजीगिरींत व्हावी या चमत्काराचा प्रश्न उलगडत नाही. खरेशास्त्रीबुवांना सर्व जन्मांत चाळीसपंचेचाळीस रुपयांहून अधिक पगार मिळूं नये व खालसातींत एखाद्या यःकश्चित् प्राथमिक शिक्षकाला जें पेन्शन मिळूं शकतें त्याच्या निम्यानेंहि "खरेशास्त्री" यांना पेन्शन मिळूं नये ही दुर्दैवानें केलेली त्यांच्या योग्यतेची विटंबनाच होय. तथापि शास्त्रीबुवांच्या स्वभावांत संतोषवृत्ति असून शिवाय संसाराच्या छानछुकीनें मिळणाऱ्या सुखापेक्षां विद्याव्यासंगानें मिळणारें सुख अधिक मानण्याची पात्रता खरोखरच होती. यामुळें स्वतःच्या स्थितीसंबंधानें त्यांचे तोंडून कोणास कधीं पश्चात्तापाचे किंवा दैन्याचे उद्गार ऐकावयास सांपडले नाहींत.

शास्त्रीबुवांनीं इतिहाससंशोधनाचें जें काम पंचवीस वर्षे केलें तें इतकें भरीव व सुव्यवस्थित झालेलें आहे कीं कोणत्याहि पिढीतील आंग्लविद्याविभूषित विद्वानाला तें शोभेल व अभिमानास्पद होईल. रा. ब. पारसनीस यांच्याप्रमाणें साधनांची अनुकूलता किंवा राजवाडे यांच्याप्रमाणें पदरीं संसार नसल्यामुळें मिळालेलें संचारस्वातंत्र्य, या दोनहि गोष्टींचा लाभ शास्त्रीबुवांस घडलेला नसतां, या उभय इतिहाससंशोधकांपेक्षांहि त्यांचें संशोधनकार्य अधिक सूत्रबद्ध व व्यवस्थित झालें हें कोणीहि कबूल करील. खरेशास्त्र्यांपेक्षां पारसनीस यांचे संग्रहीं अधिक मातबर मौल्यवान् कागदपत्र असतील; किंवा राजवाडे यांच्या अंगीं असलेली कल्पनेची भरारी किंवा शीघ्र-ग्रहणशक्ति खरे यांचे अंगीं नसेल. परंतु खरेंच बोलावयाचें तर या उभयतांच्यापेक्षांहि खरेशास्त्री यांचे अंगीं अधिक निर्दोष अशी विवेचक बुद्धि होती. इतकेंच नव्हे, तर त्यांच्या एकंदर ग्रंथप्रसिद्धीमध्यें जी सारासारबुद्धि, प्रमाणबद्धता, शिस्त, पद्धत व वाचकांना आपल्याशीं समरस करण्याची हातोटी होती ती खरोखरच अवर्णनीय होय. पारसनिसांचा ऐतिहासिक साधनसंग्रह पाहून मनुष्याला हेवा वाटेल, आणि राजवाड्यांची संशोधकीय रंगीबेरंगी आतषबाजी पाहून मनुष्य क्षणभर आश्चर्यचकित होऊं शकेल. परंतु ऐतिहासिक चिकित्सक बुद्धीला रुचकर सहजें पचणारें व कायमची पुष्टि देणारें असें खाद्य खरेशास्त्री यांच्या ग्रंथांत जसें मिळतें तसें इतरत्र क्वचितच मिळेल. मोठ्या पायावर लहान इमारत ते रचीत, यामुळें त्यांचीं अनुमानें सहसा अबाधित रहात; व आपल्या ऐतिहासिक माहितीचा ते कधींहि मीनाबझार करून मांडीत नसल्यामुळें त्यांच्या-निबंध प्रबंधांतील प्रमेयें आपल्याभावाक्यांतील आहेत असेंच सर्वांस वाटे.

पटवर्धनी कागदपत्र हा एकच जरी त्यांनीं आपला मुख्य विषय केला होता तरी इतिहासाच्या बहुतेक सर्व अंग-उपांगांत त्यांची गति असे. त्यांनीं प्रसिद्ध केलेला कोणताहि ग्रंथ चाळून पाहिल्यास त्यांच्या कामाचा सुबकपणा, सुव्यवस्थितपणा, व उपयुक्तता

कोणासहि दिसल्यावांचून राहणार नाहीं. पटवर्धन-घराण्यासंबंधानें तर खरेशास्त्री हे प्रामाण्यतेच्या दृष्टीनें वेदश्रुतिच होऊन बसले होते. पण वाईट येंवढेंच वाटतें कीं, ज्या घराण्याचा लौकिक वाङ्मयद्वारा चिरंतन करण्याचे श्रम खरेशास्त्री यांनीं घेतले, त्या घराण्यांतील संस्थानिकांनीं, क्वचित् प्रसंगीं त्यांना खैरात म्हणून देणग्या दिल्या असल्या तरी, आपल्या घराण्याचे उपकारकर्ते म्हणून योग्य मान किंवा ग्रंथप्रकाशनास भरपूर द्रव्यसाहाय्य दिलें नाहीं. परंतु परक्याच्या मदतीवर अवलंबून राहणें हा खरेशास्त्री यांचा स्वभावच नव्हता. मिळेल त्या साधनांत निर्वाह करून आपल्या चिकाटीच्या व उद्योगाच्या बळावर संशोधनकार्य सिद्ध करावयाचें हा त्यांचा बाणा होता व तो त्यांनीं आमरण पाळला यांत शंका नाहीं. उपास तर उपास काढून, पायानें मजला मारून, प्रहाराप्रहर दप्तरें चिवडून, आपल्या हातानें नकला करून, परगांवीं बसून प्रुफें वाचून, व पुढच्या ग्रंथाच्या विक्रीनें छापखानेवाल्याचें मागच्या ग्रंथाचें कर्ज फेडून–तात्पर्य शक्य तितक्या अडचणी सोसून–खरेशास्त्री यांनीं इतके ग्रंथ छापून काढले कीं, पुणें मुंबईसारख्या विपुल साधनसंपन्न शहरीं राहणाऱ्या श्रीमान् संशोधकासहि त्यांचा हेवा वाटेल. स्वतः पदवीधर नसतां ज्यांनीं केलेले ग्रंथ युनिव्हर्सिटीच्या अभ्यासक्रमांत प्रमाणभूत मानले व शिकविले जातात, आणि सर्व जन्मभर उदरनिर्वाहाकरितां भांडारकरांचीं संस्कृत पुस्तकें शिकवावीं लागलीं असतां, मराठी इतिहाससंशोधनाच्या मर्यादित क्षेत्रांत कां होईना, पण डॉ. भांडारकर यांसारखी कीर्ति ज्यांनीं मिळविली, त्यांचें उदाहरण कोणत्याहि समाजांत कोणत्याहि पिढीपुढें आदर्शभूत म्हणून ठेवण्यास हरकत नाहीं.

शास्त्रीबुवांच्या मृत्यूमुळें महाराष्ट्राच्या ऐतिहासिक वाङ्मयाच्या अभिवृद्धीला जो जबर धक्का बसला त्याचा दुष्परिणाम सर्वैव नाहींसा करणें शक्य नाहीं. इतका चतुरस्र, निरलस, मार्मिक, माहितगार आणि निष्ठावंत इतिहाससंशोधक पुनः लाभणें दुर्घटच आहे. —केसरी १९२४ जून १७

## हेन्री ग्रॅटन

ग्रॅटनच्या अंगचे मुख्य गुण म्हटले म्हणजे अत्युत्कट देशाभिमान, तीव्र बुद्धिमत्ता, व पराकाष्ठेचा निःस्पृहपणा. देशकार्यासाठीं त्यानें वकीलीचा धंदा पहिल्यापासून जन्मभर सोडून दिला, हें मागें सांगितलें आहेच. पण त्याहून लक्षांत ठेवण्याची गोष्ट ती ही कीं, लाचलुचपतीनें बुजबुजलेल्या त्या काळामध्यें आयरिश पार्लमेंट सभेमधून ग्रॅटन इतका निर्मळ व निर्दोष असा त्याचा तोच निघाला. पार्लमेंट सभेंतील त्याच्या कारकीर्दीच्या बहुतेक भागांत प्रधान मंडळापैकीं एखाद्या प्रधानाइतकें वजन त्याच्या शब्दाला व मताला नेहमीं असे. परंतु प्रत्यक्ष प्रधानकीचें काम असें त्यानें फक्त एकच वेळ केलें. पण प्रजापक्षीय पुढाऱ्यांच्या नशीबीं नुसती टीका व चळवळ करीत बसण्याचें यावें, प्रत्यक्ष राज्यकारभाराचा अनुभव त्यांस फारसा मिळूं नये, हा अनुभव परकीय अंमलाखालीं असणाऱ्या देशभक्तांस सर्व देशांत नेहमींच येणारा आहे. तो निःस्पृह

असल्यामुळें अधिकारी वर्गाची मर्जी संपादन करण्याकडे जितकें त्याचें दुर्लक्ष असे, तितकेंच लोकप्रियता संपादण्याकडेहि त्याचें दुर्लक्ष असे. कोणत्याहि बाबतींत त्याची मतें चोख व ठाम असत, व तीं चोळून दाखविण्यास तो कधींहि मागें घेत नसे. मग त्याचेयोगानें अधिकारीवर्ग व समाज यांचा राग होवो वा लोभ होवो. मात्र त्याचीं मतें चोख व ठाम असत, म्हणून तो दुराग्रही होता असें नाहीं. कोणत्याहि मतभेदाचे प्रसंगीं प्रत्यक्ष कृतीच्या संबंधांत शक्य तितकें मिळतें व मिटतें घ्यावें, असें त्याचें नेहमीं धोरण असे. परंतु प्रतिपक्षाचा केवळ राग अगर खाजगी स्नेह्यांची भीड यांस त्यानें कधींहि भीक घातली नाहीं. सार्वजनिक कामकाजांत तरतरीत बुद्धीप्रमाणें उज्ज्वल अशा वक्तृत्वाची त्यास मदत होई; व आजमितीस सर्व आयरिश वक्त्यांमध्यें त्याची गणना प्रमुखत्वानें करितात. त्याच्या शरीराची ठेवण व रूप यांत अलौकिक असें कांहींच नव्हतें. आवाज असावा तितका गोड नव्हता व केव्हां केव्हां त्याचे हातवारे हंसूं येण्यासारखे होत. पण त्याच्या भाषण-प्रसंगीं पहिलीं दोन-चार मिनिटें प्रस्तावनेदाखल जाऊन, मग उत्कृष्ट अलंकार व रम्य विचारसरणी यांनीं ओतप्रोत भरलेल्या अशा त्याच्या अमोघ वक्तृत्वाचा अस्खलित प्रवाह एकदां सुरू झाला, म्हणजे श्रोतृवृंद तासांचे तास तल्लीन होऊन ऐकत असे. त्याचें वक्तृत्व अशिक्षितांपेक्षां सुशिक्षितांनाच अधिक आवडण्यासारखें होतें. कारण त्यामध्यें ग्राम्यपणा मुळींच नसून सुसंस्कृतीची लकाकी भरलेली असे. व पार्लमेंटमधील नांवाजलेले वक्तेहि त्याचें भाषण ऐकतांना प्रेमानें तल्लीन होत. त्याची कल्पनाशक्ति फारच विशाल होती, व भाषेंतील अलंकार योजणें हा त्याच्या हातचा सुपता मळ होता. यामुळें कोणत्याहि विषयासंबंधानें उत्कृष्ट शब्दचित्र रेखाटून त्यांतील देखावे कोटीबाज व खुसखुशीत शब्दांनीं त्याला दाखवितां येत असत. ग्रॅटन हा आयरिश मुत्सद्दी व वक्ते यांमध्यें मूर्धाभिषिक्त होऊन गेला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

आयर्लंडचे राष्ट्रवीर. भाग १ ला. पृष्ठें २४-२५.

## वूल्फटोन

इतर आयरिश लोकांप्रमाणें टोन हा अमेरिकेंत जाऊन कामधंदा करून अगर सैन्यांत नोकरी धरून राहता तर झटकन नांवारूपास आला असता. परंतु त्यानें आरंभिलेला उद्योगच त्यास अधिक प्रिय वाटून तो आपल्या पराक्रमी स्त्री-सहवर्तमान पॅरिस येथें आला; व त्या वेळचा फ्रेंच युद्धमंत्री कार्नो याच्याशीं त्यानें बोलणें लाविलें. टोन यानें कार्नो याची अशी खात्री करून दिली कीं, जरकरितां फक्त वीस हजार फ्रेंच सैन्य आयर्लंडांत उतरलें तर आयरिश लोकांच्या बंडास जरूर तेवढी मदत होऊन आयर्लंड स्वतंत्र होईल. कार्नो यानें ती गोष्ट मान्य करून सैन्य पाठविण्याचें ठरविलें. सन १७९६ चे डिसेंबरचे १६ तारखेस ब्रेस्ट येथून लहान मोठीं अशीं तीस जहाजें, पंधरा हजार सैन्य, आयरिश लोकांस पुरविण्याकरितां हत्यारें घेऊन आयर्लंडवर स्वारी करण्यास निघालें. टोन यास फ्रेंच सैन्यांतील ॲडज्युटंट जनरल असा हुद्दा देण्यांत आला होता. आरमारावर ॲडमिरल हॉच नांवाचा अधिकारी मुख्य होता. हें सर्व सैन्य आयर्लंडच्या किनाऱ्यावर

जाऊन पोहोंचतें तर कदाचित् टोन याच्या कल्पनेप्रमाणें सर्व गोष्टी घडून आल्याहि असत्या. परंतु आरमाराच्या दोन भागांची चुकामूक झाली. एक भाग टोन व हॉच या-सह बॅन्ट्रीवे नांवाच्या उपसागरांत येऊन बरेच दिवस मुक्काम करून राहिला; पण या एकाच भागांतील सहासात हजार लोकांनी किनाऱ्यावर उतरून आपल्या कामास प्रारंभ करावा किंवा नाहीं, याविषयीं कांहीं दिवस वाटाघाट चालली. इतक्यांत मोठें वादळ झालें, जहाजांचे नांगर तुटले व या आरमारास फ्रान्स येथें परत यावें लागलें. यामुळें टोन याची अत्यंत निराशा झाली; परंतु त्यानें धीर सोडला नाहीं. सन १७९७ सालीं डच लोकांनीं स्थापिलेल्या प्रजासत्ताक मंडळानें त्रेन यास मदत देण्याचें कबूल करून पूर्वीएवढें आरमार व सैन्य त्याचे स्वाधीन केलें. परंतु फिरून पूर्वीप्रमाणेंच वाऱ्याच्या प्रतिकूलतेमुळें स्वारी करण्याचा बेत फसला. फिरून १७९७ सालीं फ्रान्स येथील मंत्रि-मंडळानें इंग्लंडवर स्वारी करण्याकरितां सैन्य तयार करून त्यावर जनरल बोनापार्ट यास मुख्य नेमिलें. हें पाहून तर टोन यास अधिकच आशा उत्पन्न झाली, आणि त्याच्या व बोनापार्ट याच्या कित्येक भेटी होऊन संभाषणाहि झालें. परंतु अगदीं आयत्या वेळेस इंग्लंडवर स्वारी करण्याचा बेत रहित होऊन पुढील सालीं मे महिन्यांत, जमलेलें सैन्य घेऊन बोनापार्ट हा इजिप्तवर स्वारी करण्यास निघून गेला. यामुळें टोन यास 'वरंडलेवूक इव दूरमुत्क्षिप्य पातितः' असें होऊन तो निराशेनें जवळ जवळ वेडा झाला. आयर्लंडां-तील अधिकाऱ्यांनींहि कांहीं तरी तजवीज लवकरच केली पाहिजे, नाहीं तर बंडाचा फैलाविल, असा विचार करून लॉर्ड एडवर्ड फिट्झरल्ड व टोन याचे आणखी कित्येक सहकारी पकडले. इकडे आयरिश शेतकऱ्यांमध्यें बेबंदशाही माजली होती व त्यांजवर होणारा जुलूम व जाच त्यांना असह्य वाटूं लागला होता. या सर्व कारणांचा एकदम परिणाम होऊन बोनापार्ट हा इजिप्तवर स्वारी करण्यास निघाल्यापासून तीन दिवसांचे आंत आय-र्लंडांत उघड रीतीनें बंड सुरू झालें व टोन हा उतावीळ होऊन 'हीच वेळ आहे, तरी या वेळेस काय मिळेल तें सैन्य आयर्लंडवर धाडा' असें सांगण्याकरितां फ्रेंच लष्करी अधिकाऱ्यांकडे खेपा घालूं लागला. फिरून स्वारी करण्याच्या बेताची वाटाघाट होऊं लागली. जनरल हुम्बर्ट नांवाचा एक फ्रेंच लष्करी अंमलदार थोडीशी युद्धाची सामग्री घेऊन टोनसहवर्तमान अधिकाऱ्यांच्या हुकुमांची वाट न पाहतां फक्त एक हजार सैन्या-निशीं आयर्लंडच्या किनाऱ्यावर जाऊन उतरला, व तोंड देण्यास आलेल्या इंग्रजी सैन्याचा पराभव करून तो पुढें चाल करून जाऊं लागला. परंतु जनरल लेक हा वीस हजार सैन्यानिशीं आडवा येऊन त्यानें त्याचा पराभव केला. हें पाहतांच आणखी पांच हजार सैन्य देऊन हारडी नांवाच्या सरदारास टोन याजबरोबर आयर्लंडास पाठविण्यांत आलें. या छोट्या आरमाराची व इंग्रजी आरमाराची गांठ पडून तुंबळ युद्ध झालें, व शेवटीं फ्रेंच आर-माराचा पराभव झाला. मुख्य जहाजावर टोन हा लष्करी अधिकाऱ्याचा पोषाख घालून लढत होता व आपल्या हातानें तोफांस सरबत्ती देत होता. टोन यास प्रथम कोणी न ओळखल्यानें त्यास इतर फ्रेंच अधिकाऱ्यांप्रमाणें प्रथमतः लष्करी सन्मानानें वागविण्यांत आलें. परंतु

दुर्दैवानें एकपरच त्याच्या एका आयरिश मित्रानें त्याच ओळखिलें, व लगेच आयरिश पेंडरगेर या नांवानें टोन यास धरविण्यांत पुरवात होऊन त्यांनी त्याच्या पायांत बिड्या घातल्या. पण यांत मेंव लष्करी पोषाखाचा अपमान होत आहे तो होऊं नये म्हणून त्यानें तो पोषाख अंगावरून काढून फेंकून दिला, व 'सन्मानाच्या किताबाचा बिल्ला लटकविणाऱ्या सोन्याच्या साखळीपेक्षां मला स्वदेशहिताकरितां पायांत पडलेल्या बिड्याच अधिक प्रिय वाटतात,' असें म्हणून त्या लोखंडी सांखळ्यांचें त्यानें चुंबन घेतलें.

सन १७९८ च्या नवंबरच्या दहावे तारखेस त्याची डब्लिन येथें लष्करी कोर्टा-मार्फत चौकशी होऊन त्यास देहांत शिक्षा ठरविण्यांत आली. सदर चौकशीचे वेळीं दोषारोपांतील सर्व गोष्टी त्यानें एकदम कबूल केल्या व लिहून आणलेलें सणसणीत भाषण कोर्टापुढें वाचून दाखविलें. तें भाषण अत्यंत प्रेमळ व आवेशयुक्त असें होतें. त्याच्या भाषणांतील मुख्य मुद्दा असा होता कीं, " मी स्वदेश स्वतंत्र करण्याकरितां उघड लढाई केली ही गोष्ट खरी आहे, परंतु हें सर्व मी देशांत चाललेले मूर्ख अत्याचार, गुप्तवध वगैरे बंद व्हावे एवढयाकरितांच आरंभिलें होतें. मी वॉशिंग्टनप्रमाणें यशस्वी झालों असतों तर मला खचित कोणी नांवें ठेविली नसती. परंतु माझे प्रयत्न केवळ निष्फळ झाले एवढयाकरितांच मला बंडखोर अगर गुप्तवध करणारा वगैरे अपमानकारक विशेषणें लावणें गैर होईल. " हें भाषण चाललें असतां न्यायपीठावर बसलेले लष्करी अधिकारी व टोन यांजमध्यें बरींच प्रश्नोत्तरें झालीं, व त्यावरून टोन याचा पाणीदारपणा कळून आला. तसेंच आपल्या भाषणांत त्यानें क्याथोलिक लोकांविषयीं जी अत्यंत कळकळ व जो प्रेमभाव उदारपणानें व्यक्त केला, तो पाहून या आयरिश देशभक्ताच्या देशभक्तीचा विस्तार खरोखर किती व्यापक होता, व त्याचें मन किती मोठें होतें हें कोणासहि तेव्हांच दिसून येईल. अखेर शिक्षा सांगण्याचे वेळीं आपणास गोळी घालून मारण्याचा लष्करी मान तरी मिळावा अशी त्यानें कोर्टाची विनवणी केली, परंतु शेवटीं त्यास फांशीं देण्याचीच शिक्षा लॉर्ड कॉर्नवालीस यानें ठरविली. दुसरे दिवशीं सकाळीं म्हणजे तारीख १२ रोजीं त्यास फांशी देणार तों, आदले दिवशीं रात्रीं तुरुंगाच्या अंधारकोठडींत कोणास न कळत त्यानें चाकूनें आपली रक्तवाहिनी शीर कापण्याइतकी जबर जखम गळ्यास करून घेतली व भयंकर रक्तस्राव होऊन तो उजाडेपर्यंत आसन्न-मरण होऊन पडला. ही बातमी बाहेर कोणास कळली नाहीं. इकडे १२ वे तारखेस सकाळीं त्या-वेळचा प्रसिद्ध वक्ता व वकील क्यूरन हा गडबडीनें हायकोर्टापुढें उभा राहून त्यानें अशी तक्रार केली कीं, टोन याचा गुन्हा बंड करण्याचा जरी असला, तरी त्याची चौकशी लष्करी कोर्टामार्फत होणें हें बेकायदेशीर आहे, व ही तक्रार मान्य करून हायकोर्टानें टोन यास तुरुंगांतून काढून आपणासमोर हजर करण्याबद्दल 'शेरीफ' यास तांतडीचा हुकूम व वारंट सोडलें. कारण कीं, कदाचित् हुकूम पोंचण्याच्या आधींच फांशीच्या शिक्षेची अंमलबजावणी व्हावयाची ! शेरीफ तुरुंगांत जाऊन पहातो तों, टोन जखमी

होऊन पडलेला. ही बातमी हायकोर्टास लागतांच हायकोर्टाच्या चीफ जजानें त्याच्या फांशीची शिक्षा तहकूब केली, व नंतर सात दिवसपर्यंत अत्यंत कष्ट होऊन तो तारीख १९ नवंबर सन १७९८ रोजीं तुरुंगांतच मरण पावला. अशा रीतीनें आयर्लंडचा एक उत्कृष्ट देशभक्त मोहरा अकालीं खर्ची पडला.

टोन यानें आपल्या वयाच्या पंचविसाव्या वर्षी बॅरिस्टरची परीक्षा दिली होती. परंतु वकीली वगैरे न करितां सार्वजनिक कामास वाहिलेल्या त्याच्या आयुष्याचा अंत पुढें नऊ वर्षांतच अशा अद्भुत व अकल्पित रीतीनें व्हावा असा ईश्वरी संकेत होता व तसेंच घडून आलें. आयर्लंडचे राष्ट्रवीर; भाग १ ला. पृष्ठ २८-३२

## ओकॉनेल व पार्नेल

ओकॉनेल व पार्नेल यांच्यामधील साधर्म्य लक्षांत ठेवण्यासारखें आहे. दोघेहि मुख्यतः पार्लमेंटांत् कायदेशीर असेच काम करणारे होते. आपलें कार्य अखेर पार्लमेंटच्या द्वारें व तिच्याच हातून घडून येणार असा त्यांचा भरंवसा होता व तेंच घडवून आणण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा होती. पार्लमेंट ही शत्रुपक्षाचे प्रतिनिधींनीं भरलेली सभा आहे, सबब त्यांजकडून आपखुषीनें असें कांहीं मिळणार नाहीं; व याकरितां त्यांच्याशीं कायद्यास धरून ओढून ताणूनहि भांडलें पाहिजे असें दोघांसहि वाटे. दोघांनीहि पार्लमेंट सभेला अगर तिचा आपणाला बाऊ वाटतो असें कधींहि दाखविलें नाहीं. तर आपणास नांवें ठेवणाऱ्या, निंदा करणाऱ्या व पाण्यांत पाहणाऱ्या पांचशें सभासदांवर ते दोघेहि तुटून पडत व 'लांडगेतोड' करीत. दोघांचीहि इच्छाशक्ति, करारीपणा व धैर्य हीं कांहीं विलक्षण होतीं, परंतु या दोघांमध्यें फरकहि पुष्कळ होता. ओकॉनेल हा अधिक बुद्धिमान् व लोकांत खरोखर मिळून मिसळून काम करणारा होता. ओकॉनेलच्या पाठीमागें सर्व आयर्लंड असे, तथापि प्रत्यक्ष पार्लमेंटमध्यें त्याला आपल्याबरोबर मत देण्यास ३०।४० पेक्षां अधिक आयरिश सभासद मिळत नसत. परंतु पार्नेलच्या शब्दाबरहुकूम वागण्यास व तो सांगेल तशी कवाईत करण्यास कमीत कमी ८० सभासद नेहमीं सज्ज असत. ओकॉनेल आपल्या वक्तृत्वानें आयरिश लोकांस नुसता नाचवीत असे, व कित्येक वेळां आपल्या मनाच्या लहरीप्रमाणें त्यांकडून परस्पर विसंगत अशा गोष्टीहि करवी. आज त्याच्या भाषणाचा रोख राजरस्त्यानें वळला, आणि अधिकार, कायदेकानू, सनदशीर चळवळीचे मार्ग वगैरे गोष्टींविषयीं तो बोलूं लागला म्हणजे सर्व समाजांत राजनिष्ठेचा पूर आल्यासारखा दिसून आयरिश लोक अधिकारी लोकांचा सत्कार करून, केवळ प्रेमानें त्यांच्याशीं भांडत असून मोहबतीनेंच काय मिळेल तें घेतील असें वाटे. परंतु दुसरे दिवशीं जर तो ओघ जरा निराळ्या दिशेनें वळला, म्हणजे मग समाज खवळून जाऊन चार दोन दिवसांत बंडाचा झेंडा उभारण्यांत येणार अगर लढाईचें बिगुल फुंकलें जाणार असें वाटे. पार्नेलचें धोरण नेहमीं एका प्रकारचें असे. पार्लमेंट, अधिकारीवर्ग हे आयर्लंडचे हितशत्रू असून अडवून घेतल्याशिवाय काहीं

इतकेंहि कांहीं कधीं ते देणार नाहीत अशी त्याची पक्की खात्री असे. त्यांच्याविरुद्ध त्याची तलवार नेहमीं उपसलेली असे; तथापि कायदेशीर अगर सनदशीर मार्ग सोडून आपण कधींहि कांही करणार नाही असें त्याचें ब्रीद होतें. कारण बंडाळी वगैरे करण्यास देश असावा त्या स्थितीत नाहीं, म्हणजे लोकांत संपत्ति, त्राण, ऐक्यबळ, व भांडणास लागणारी इतर सामग्री नसून केवळ बंडाळीनें लोकांचीं दुःखें मात्र वाढतील असें त्यास वाटे. फिनीयन वगैरे लोकांशीं मिळून तो लँडलीगचें काम करी. कारण जो तो मनुष्य आपापल्या पुरता जबाबदार असतो. आपलें कर्म व कर्मफळ याचा ज्याचा तो मालक व मुखत्यार असतो असें तो म्हणे. लँडलीग ही कायदेशीर आहे, सबब तींत मिळून जो त्या संस्थेचें कार्य करील त्यास तींत घेण्यास तो कांहीं प्रत्यवाय करीत नसे. ओकॉनेलचें तसें नव्हतें. बेकायदेशीर अशा कोणत्याहि चळवळींत कोणी उघडपणें अगर गुप्तपणें काम करीत असला तर त्याच्याशीं ओकॉनेल हा संबंध ठेवण्यास राजी नसे व आपल्या 'रिपील' सभेंत अशा माणसांचा शिरकाव होऊं नये अशाविषयीं त्याचा मोठा कटाक्ष असे. पार्नेलचें म्हणणें असें असे कीं, काम झाल्याशीं कारण, मग तें कोणींहि करो. ओकॉनेल हा आपल्या मताप्रमाणें लोकमतास वळण लावण्याचा प्रयत्न करी. पार्नेल लोकमतास धरून चाले व लोकांस आपणांपेक्षां बरेंवाईट अधिक कळतें, त्यांस सांगायला नको असें तो म्हणे. ओकॉनेल हा पार्लमेंट सभेंत भांडणारा खरा, तरी पण होतां होईतों लिबरल पक्षास मिळून व संभाळून काम करणारा होता. पार्नेल यानें लिबरल पक्षास स्वतः होऊन कधींहि अनुकूलता दाखविली नाही, तर आपल्या बाजूस बहुमत व्हावें म्हणून अगर आयर्लंडच्या हिताकरितां पुढें आणलेल्या बिलास आयरिश लोकमत अनुकूल व्हावें म्हणून लिबरल प्रधानमंडळच त्याची खुशामत करी असें दिसे. ओकॉनेल हा पार्लमेंटमध्यें एखादे वेळीं तरी खुशालीखुशालींत व खेळी-मेळींत येई. पण पार्नेल हा नेहमीं रुतलेला, उद्विग्न व घाव घालण्यास हत्यार सावरून बसलेला असा असे. ओकॉनेलला संधि मिळती तर तो प्रधानमंडळांत शिरता, अगर विशिष्ट कार्याकरितां नोकरीहि धरता. एक वेळ जवळ जवळ तसा प्रसंग आलाहि होता; परंतु पार्नेल हा जर प्रधानमंडळांतील एखादें पद स्वीकारता तर त्यास लोकांनीं बहुधा ठारमारच केला असता. इतकें पार्लमेंटविरुद्ध त्याच्या वेळीं आयरिश लोकमत क्षुब्ध झालें होतें. ओकॉनेलचा असा प्रयत्न असे कीं, आपल्या मताखेरीज इतर मत देशांत प्रचलित असूंच नये. पार्नेलचें तसें नव्हतें. तो लोकमताचा मुख्य प्रवाह तेवढा धरून बसे, मग अवांतर कोणी कांहीं ज्याच्या त्याच्या मताप्रमाणें केलें तर त्यांत तो मन घालीत नसे. ओकॉनेलला प्रामाणिकपणानें असें वाटे कीं, इंग्लंडचा व आयर्लंडचा संबंध राहणें यांतच आयर्लंडचें खरोखरच हित आहे. पार्नेल या बाबतींत मुळीं लक्षच घालीत नसे. तो म्हणे कीं, अमुक एक गोष्टी आयर्लंडास मिळाल्या पाहिजेत, मग त्या हा संबंध राहून मिळोत अगर त्या मिळण्यांत हा संबंध तुटण्याचा प्रसंग आला तरी हरकत नाहीं. ओकॉनेलच्या मताप्रमाणें 'रिपील' करणें अगर न करणें ही गोष्ट उभय राष्ट्रांच्या

सलोख्यानें होतां होईतों व्हावी; पार्नेल म्हणे कीं, आयर्लंडचें स्वतंत्र पार्लमेंट इंग्लंडनें मुडविलें त्या अर्थी आयरिश लोकांना काय हवें व काय नको हें त्याचें त्यांनीं ठरविलें पाहिजे व ते मागतील तें इंग्लंडनें दिलें पाहिजे. ओकॉनेल हा गुप्त मंडळयांचा उघड निषेध करी व त्या त्यास मनापासून आवडतहि नसत. पार्नेल यांसहि गुप्त मंडळ्या व गुप्तवध यांचा मनापासून तिटकारा असे; परंतु त्याचें धोरण असें कीं, तो त्यांजविरुद्ध मुद्दाम होऊन उघडपणें बोलत नसे. तो म्हणे तें काम सरकारचें आहे, आपलें नाहीं. ' आयरिश लोकमताच्या पुढाऱ्यांची मदत घेतल्याशिवाय अधिकाऱ्यांस, तीनशें वर्षे अंमल चालवूनहि, जर शांतता राखतां येत नाहीं तर त्यांनीं आपल्या कामाचा राजीनामा द्यावा व राज्यकारभाराचें काम या पुढाऱ्यांकडे सोपवावें. परंतु आपण अधिकार गाजविणार व त्याच्या दुष्परिणामापासून होणारा शांतताभंग वांचविण्याचा प्रयत्न करून पुढाऱ्यांनीं मात्र आपणास लोकनिंदेस पात्र करून घ्यावयाचें हा न्याय कुठला ? ' असें तो विचारी. ओकॉनेल याला आपण नुसता पुढारी नसून राजा आहे असें वाटे व लोकांवर निग्रहानुग्रह करण्याचा अधिकार पुढाऱ्यास येतो असें तो समजे. पार्नेलचें मत असें होतें कीं, पुढाऱ्यांनीं चळवळ करण्याचें आपलें काम आपण करावें. 'जोंपर्यंत अनुग्रह करण्याचें आपले हातीं नाहीं तोंपर्यंत पुढाऱ्यांनीं निग्रह करण्याचे भानगडींत तरी कां पडावें ?

पार्नेलच्या वेळीं आयरिश पक्ष पार्लमेंटांत जितका प्रबळ होता तितका तो पूर्वी कधींहि नव्हता. १८९० सालीं आयरिश पक्षांत भांडणें होईपर्यंत पार्नेलनें आयरिश सभासदांची अशी कांहीं विलक्षण जूट ठेविली होती कीं, ते सर्व मिळून पार्लमेंट सभेस केव्हां केव्हां भारी होत. त्याच्या अनुयायांत त्यावेळीं बिगर, विलियम ओब्रायन, हॅरिंग्टन, रेडमंड टिमहिली, सेक्स्टन, बॅरी, मॅकार्थी, ओकॉनर, जॉन डिलन, सालिव्हन वगैरे निवडक मंडळी असत. हे बहुतेक लोक हुशार वक्ते, वादविवादांत पटाईत व कसलेले लेखक असे असत. ओकॉनेल हा स्वतःच कामकाजांत वाघासारखा असे, परंतु तो एकटा असल्यामुळें त्याच्या हल्ल्यांचा परिणाम केव्हां केव्हां होत नसे. परंतु पार्नेलच्या अनुयायांची ही टोळी मोठी कठिण होती. व तिला हल्ल्यांत यश आलें नाहीं असें सहसा कधीं होत नसे. पार्लमेंट सुरू झालें म्हणजे मग काम असो नसो, ही आयरिश मंडळी आपापल्या जागीं दबा धरून बसे, व केव्हां गनिमी काव्यानें तर केव्हां उघड एकजमावानें तोंड देऊन काय साधेल तो हात ते साधून घेत. त्यांचा पुढारी पार्नेल याला पार्लमेंटच्या कामकाज करण्याच्या कायद्यांतील बिंगें माहीत असत, व कोठें संधि सांपडेल तेथें डाव साधण्यास तो डोळ्यांत तेल घालून टपून बसे. योग्य संधीचा इषारा मिळतांच त्याची मंडळी वादांत घुसून, केव्हां टाळ्या वाजवून केव्हां हास्यकारक उद्गार काढून, केव्हां भाषणें करून, केव्हां पार्लमेंटचें काम थांबविण्याच्या सूचना पुढें आणून अशा रीतीनें चालत्या गाड्यास ते खीळ घालीत. पार्लमेंटमध्यें नेहमींच बहुधा वादविवाद चालावयाचा, त्यांत आयर्लंडचा संबंध नसावयाचा, व अर्थात् कोणास जय मिळाला व कोणाचा पराभव झाला याम-

बद्दल त्यांस काळजी करण्याचें कारण नसे. यामुळें त्याचें अडवणुकीचें काम म्हणजे कोरडी गंमत असे. खुशाल हवें तें बोलावें, हव्या त्या सूचना पुढें आणाव्या व हवें तसें मत द्यावें. मात्र या सर्वांत एक मुख्य हेतु साधला म्हणजे त्यांचें काम झालें. तो हेतु हा कीं कोणीकडून तरी पार्लमेंटच्या कामास उशीर लागावा; अडथळा व्हावा, व अशा रीतीनें प्रधान मंडळानें त्रासून जाऊन आयरिश लोकांच्या मागण्यांकडे लक्ष द्यावें. या अडवणुकीचें कामीं ही आयरिश फौज वाटेल तेव्हां गनिमी काव्यानें भराऱ्या मारून नुसती भालेराई, करण्यास किंवा कंपू करून जमीन धरून चारी बाजूंनीं तोंड देऊन लढाई देत देत एकेक पाऊल पुढें सरण्यास तयार असे. त्यांची कवाईत पुरी बसलेली होती व या सर्व कवाइतीचें श्रेय पार्नेल याजकडे होतें. —आयर्लंडचे राष्ट्रवीर; भाग १ ला, पृष्ठें १२५-१२६.

---

## क्रॉफर्ड

क्रॉफर्डसाहेब हे एक असल इंग्रज सिव्हिलियन होते. ते मोठे बुद्धिमान असत. पण बुद्धिमान मनुष्यांच्या अंगीं असणारा आळसहि त्यांच्या अंगीं पूर्णपणें वसत होता. महिना महिनाभर खुशालीखुशालींत रहावें, व काम तुंबलें म्हणजे एखाद्या रात्रीं अवशीच्या प्रहरीं टेबलावर एका बाजूस थेलक्या प्रकरणांचा डोंगर रचावा, दुसरे बाजूस दारूच्या बाटल्या व सिगारेटच्या पेटया ठेवून द्याव्या; व उजाडेपर्यंत तीं प्रकरणें, ती दारू व त्या बिड्या सर्व संपवून सूर्योदयाच्या वेळीं साहेबांनीं पांघरुणांत शिरून ऐन मध्यान्हीची मध्यरात्र करावी, असा त्यांचा प्रघात असे. ते लिहिणारे मोठे फर्डे असत; व त्यांचे कित्येक भाविक भुरये साहेब एकाच वेळीं डाव्या उजव्या हातानें निरनिराळे दोन दोन रिपोर्ट किंवा शेरे लिहूं शकतो असें मानीत. त्यांचा स्वभाव अत्यंत खर्चिक असून ते ज्या जिल्ह्यांत असतील त्या जिल्ह्यांतील सुखावलेल्या सर्व युरोपियन स्त्री पुरुषांचा अड्डा त्यांच्या बंगल्यांत कायमचा पडलेला असे. या स्त्री वर्गाला जिच्या तिच्या लायकीप्रमाणें मोत्यांच्या हारापर्यंतहि क्रॉफर्डसाहेबांकडून देणग्या मिळत. हा सर्व पैसा डोलस पगारांतून किंवा आंधळ्या भत्यांतूनहि पुरा पडणें अर्थातच शक्य नव्हतें; व लांचलुचपतीची खोड साहेबमजकुरांना अगदीं पहिल्यापासूनची होती. या लांचापैकीं कांहीं ते कर्ज म्हणून घेत व कांहीं देणगी म्हणून स्वीकारीत. पण त्यांच्या तर्फे एक गोष्ट सांगणें न्यायाचें होईल; ती ही कीं त्यांचा स्वभाव खरोखर दिलदार व सरदारी असून, त्यांनीं ज्यांचा लांच घेतला त्यांचीच काम पण ज्यांचा न घेतला त्यांचीहि कामें करून दिलीं. त्यांनीं कोणाच्या डोक्यांत दगड घातला असेल तर तो सरकारच्याच. किरकोळ नोकऱ्या वगैरे तर बोलावयासच नको; पण जमिनदिशा देणग्या व वतनाच्या सोडवणुकी या त्यांच्या इतक्या आजवर कोणत्याहि साहेबानें दिल्या किंवा केल्या नाहीत. नेटिव लोकांत मिसळून मिसळून वागण्याची त्यांची हातोटी कांहीं विशेषच होती. त्यांतल्या त्यांत कोंकण

प्रांत हा त्यांना फ़ार प्रिय वाटे. रत्नागिरी ही ते आपल्या जन्मभूमीप्रमाणें मानीत. अस्सल कोंकणी मराठी भाषा तर ते इतकी उत्कृष्ट बोलत कीं, पडद्याआडून ऐकल्यास युरोपियन बोलतो कीं नेटिव बोलतो हें कोणासहि कळून यावयाचें नाहीं. रत्नागिरी येथील सुप्रसिद्ध धनिक सावकार काका फडके यांना ते प्रत्यक्ष चुलत्याप्रमाणें मानीत; व लहर लागेल तेव्हां अभावितपणें काकांच्या माजघरापर्यंत जाऊन बसून गोष्टी बोलून हवा तो पदार्थ मुद्दाम मागून घेऊन खात असत असें म्हणतात. तात्पर्य, नेटिव लोकांशीं इतक्या खेळीमेळीनें वागणारा दुसरा कोणी सिव्हिलियन झाला नाहीं ही गोष्ट अगदीं निश्चित आहे. —लो० टिळक यांचें चरित्र. खंड १ ला भाग १० वा; पृष्ठें २१९–२२०.

---

## गोपाळराव जोशी

गोपाळराव जोशी ही एक मोठी विचित्र वल्ली होती. त्यांचें शिक्षण बेताचेंच होतें; तरी सामाजिक प्रगतीच्या बाबतींत ते बरेच पुढें असत. पण मनाची जात थोडी कुत्सित असल्यामुळें सोपपत्तिक चर्चा, विधायक सूचना वगैरे रीतसर न करितां त्यांना आपल्या समाजाला हरएक बाबतींत नांवें ठेवून कुचेष्टा करण्याची फार आवड असे. त्यांचा स्वभाव मोठा विनोदी, आणि बोलतांना जीभ बिनहाडाची, असल्यामुळें ते कोणाविषयीं केव्हां काय बोलतील व कसें हसें उत्पन्न करतील याचा नियम नसे. नाहीं म्हणावयास त्यांनीं विधायक अशी एक गोष्ट केली व तीहि फारच धाडसाची आणि खरोखरीच वाखाणण्यासारखी होती. तेवढ्या एका गोष्टीकरितां कीं होईना त्यांना बाकी सर्व खून माफ करावे असें पुष्कळांना वाटे. ती गोष्ट म्हणजे त्यांनीं आपली बायको अमेरिकेस डॉक्टर होण्याकरितां अगदीं अल्पवयांत व असाहाय्य स्थितींत पाठवली, व तीहि आपल्या समाजाला धाडसाचें उदाहरण घालून देण्याकरितां........ह्या एका गोष्टीमुळें गोपाळराव हे प्रसिद्धीस आले; व या दृष्टीनें त्यांना मिळालेली प्रसिद्धि यथायोग्यच होती. पण कोणत्याहि गोष्टींत वाहवण्याचा गोपाळरावांचा स्वभाव असल्यामुळें, हिंदुधर्माची थट्टा करण्याच्या बाबतींत त्यांनीं जें कृतीचें धाडस दाखविलें तें त्यांच्या अंगावर आलें. धर्म म्हणजे ती एक थट्टेची गोष्ट आहे, हवें त्यानें हवें तेव्हां हव्या त्या धर्मांत जावें, धर्मांतराचा विधि ही थट्टा होय, धर्मांतर केलेल्या व न केलेल्या मनुष्यांत कांहींच फरक नसतो, असले कांहीं सिद्धांत सिद्ध करण्याच्या भानगडींत पडून, त्यांनीं पुण्याच्या संगमावर चार लोकांदेखत बाप्तिस्मा घेतला, व तो घेतल्यावर या बाप्तिस्म्यांत कांहीं अर्थ नाहीं असें म्हणून पुनः गंध लावून ते पाद्रीमंडळाच्या अंगावर उलट तुटून पडूं पाहूं लागले. यामुळें त्यांना ख्रिस्ती म्हणतां येत नाहीं ही ख्रिस्त्यांना अडचण झाली, व ते हिंदु आहेत असें हिंदूंना म्हणतां येईना. कुचेष्टेखोर-पणाची मजल जो गृहस्थ स्वतःच्या बाबतींत इतकी दूरवर नेऊं शकतो, तो दुसऱ्याचा

मुलाजा काय धरणार ? सनातन धर्माभिमानी जुन्या पक्षाची चेष्टा तर गोपाळराव अनिवार करीतच; परंतु सुशिक्षित लोकांवरहि भ्याडपणाचा आरोप करून त्यांच्या अंगीं खरा सुधारकी बाणाच नाहीं, त्यांचें उदार शिक्षण सगळें फुकट गेलें, असें म्हणून ते त्यांचीहि चेष्टा करीत !

लो. टिळक यांचें चरित्र. खंड १ ला, भाग १३–पृष्ठे २८६–८७.

कर्मधर्मसंयोगानें हिंदूंनीं ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेणें हा विषय दुसऱ्या एका रीतीनेंहि याच वेळीं लोकांपुढें आला होता. गोपाळ विनायक जोशी म्हणजे डॉ. आनंदीबाई जोशी यांचे पति, यांच्या विनोदमिश्रित कुटिल बुद्धीचें वर्णन मागें एका प्रकरणांत आम्ही दिलेंच आहे. तथापि या धर्मांतराच्या विषयाला लागू म्हणून पुण्यांतील प्रामण्याप्रमाणें ख्रिस्ती–धर्म–विटंबनेची त्यांनीं जी एक गमतीदार लीला याच वेळीं केली तिचाहि उल्लेख येथें करणें जरूर आहे......गोपाळराव जोशी यांनीं एक भोळा व अंधाशी मिशनरी गांठला, व चल मी तुला एक सुशिक्षित हिंदु येरूच्या फळपांत जाहीर रीतीनें, शिरणारा देतों असें भासवून नादाला लाविलें. आणि अमुक दिवशीं अमुक वेळीं आरण संगमावर जाऊन बाप्तिस्मा घेणार अशी वर्तमानपत्रांतून जाहिरातहि दिली.

...गोपाळराव धर्मांतर करून स्वयंबहिष्कृत होणारच; परंतु धर्मांतर केल्यानेंहि मनुष्यव्यवहाराला बहिष्कृत होण्याचें कारण नाहीं व हेंच आपण सिद्ध करून देणार आहों, असा एक नवीन मनोरंजक वादाचा मुद्दा त्यांनीं उपस्थित केला. व त्यांनीं दीक्षा घेण्या-पूर्वीच पुढें त्यांच्याशीं कसें वागावयाचें हा वाद लोकांत जोरानें सुरू झाला.

...एक गोपाळराव ख्रिस्ती झाल्यानें येवढ्या मोठ्या हिंदुसमाजाची कितीशी हानि होणार ? पण त्यांनी उपस्थित केलेला प्रश्न महत्वाचा खरा. हिंदु लोक अनेक देव व दैवतें मानतात, त्यांतच कोणी येशुख्रिस्त हाहि एक माझा देवच आहे असें म्हटलें तर त्याला हरकत कशी घेतां येणार ? इतर सर्व हिंदुधर्माचे रीतिरिवाज बरोबर पाळावयाचे, त्यां-पासून किंचितहि भ्रष्ट व्हावयाचें नाहीं; फक्त तेहतीस कोटी देवांत आणखी एक ख्रिस्ताची भर टाकावयाची, यांत काय पाप ? दशावतारांत वेदविरोधी बुद्धाची गणना केल्यानें हिंदु बौद्ध ठरत नाहीं. मोहरमामध्यें हातांत गंडा बांधून कोणी हिंदु नाचला व त्यानें महंमद पैगंबराला मान दिला म्हणून तो मुसलमान होत नाहीं. प्रार्थना–समाजिस्ट वेद, कुराण बायबल, वगैरे धर्मग्रंथ सारख्याच योग्यतेचे समजतात म्हणून ते कांहीं हिंदु नाहींसे होत नाहीत. तर मग ख्रिस्त हाहि आपला देव म्हटल्यानें कोणी हिंदु समाजबाहेष्कृत कां व्हावा ?

पण गोपाळरावांनीं हें एक कातेरी तारेचें कोडें जितकें हिंदूंच्या पोटांत खुपण्याकरितां तितकेंच मिशनऱ्यांचे आंतडें फाडण्याकरितां निर्माण केलें होतें. त्यांना असें दाखवावयाचें होतें कीं, ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेणारा मनुष्य जर फिरून आपल्या धर्मांत येईल, व समाज त्याला घेईल, तर तें एक मोठेंच कार्य झालें. कां कीं, एखादा जसा हिंदुधर्मांत

पुनः संग्रह करावयाचा, तसाच इतरांचा; व पूर्वी स्वतः किंवा वाडवडिलांच्या चुकीनें जे हजारों हिंदु ख्रिस्तीधर्माच्या जाळ्यांत सांपडले आहेत त्यांना तें जाळें तोडून परत हिंदुधर्मांत येण्याच्या मार्गाची ती एक सूचनाच होणार होती. ख्रिस्ती धर्मदीक्षेची यद्य करण्याकरितांच मुख्यतः गोपाळराव ती घेणार होते. केसरीचा अंदाज असा होता कीं, गोपाळरावांच्या या तडजोडीस हिंदूंपेक्षां ख्रिस्तीच अधिक प्रतिकूल होतील; कारण आमच्या हिंदु देवापेक्षां ख्रिस्तदेव हाच खरा असहिष्णु आहे. त्याला जोडीदार देव खपत नाहीं. —लो॰ टिळक यांचें चरित्र. खंड १ ला. पृष्ठें ३२२ ते ३२४.

---

## करवीरचे छत्रपति यांचा मृत्यु

आम्हांस कळविण्यास दुःख वाटतें कीं, करवीरचे छत्रपति श्रीशाहूमहाराज यांना गेल्या शनिवारीं मुंबई येथें देवाज्ञा झाली. महाराजांची शरीरयष्टि अतिशय भव्य असल्या-मुळें ते आजारी असले तरी तसें सहसा दिसून येण्यासारखें नव्हतें. यामुळें त्यांचा देह अनेक रोगांचें घर होऊन बसला असता हि, त्यांची प्रकृति क्षीण झाली असेल असें कोणास वाटलें नाहीं. किंबहुना अखेरपर्यंत त्यांच्या हालचाली व सर्व प्रकारचे उद्योग नेहमींप्रमाणें चालले असून, ते अंथरुणाला खिळून असे अवघे एकदोन दिवसच पडले होते. त्यांचा मृत्यु अभावितपणें मुंबईस झाल्यामुळें त्यांचें शव स्पेशल ट्रेननें शनिवारीं पुण्यास आणून तेथून मोटारीनें कोल्हापुरास अखेरच्या संस्काराकरितां नेण्यांत आलें.

शाहूमहाराजांचा जन्म सन १८७४ सालीं कागलच्या घाटगे कुळांत झाला. त्यांचे वडील सर्जेराव आबासाहेब घाटगे हे, कोल्हापुरचे माजी शिवाजीमहाराज मृत्यु पावल्या-वेळीं कोल्हापूरचे रीजंट म्हणजे मुख्य कारभारी होते. शिवाजीमहाराज निपुत्रिक वारल्यामुळें त्यांचे पश्चात त्यांचे कुटुंबाचे मांडीवर शाहूमहाराज यांस त्यांच्या दहावे वर्षी दत्तक देण्यांत आलें. महाराजांचें मामुली शिक्षण राजकोटास झाल्यावर १८९४ सालीं त्यांना राज्याची मुखत्यारी मिळाली. तव्हांपासून त्यांनीं केलेला राज्यकारभार लोकांस विदितच आहे. महाराज हे आपल्या दौलतीचे अभिमानी असून त्यांनीं आपल्या कनिष्ठ रजवाड्यांचे हातीं आपले अधिकार सहसा जाऊं दिले नाहींत. राज्यांत इमारती, शिकार-खाने वगैरे अनेक बांधले, व राज्यांतील वतनदार वगैरे लोकांना पूर्ण कह्यांत ठेविलें. महाराजांची बुद्धिमत्ता चांगली असल्यामुळें राज्यकारभारासंबंधानें विशेष परिणामकारक अशी कोणतीहि सूचना सल्लागारांनीं केल्यास ती त्यांना तेव्हांच पटून अमलांत आणली जाई. शिवाय राज्यकारभाराच्या सूक्ष्म बाबतींत स्वतः त्यांनाहि पुष्कळच सुचे!

महाराजांचे शरीरगुण व बुद्धिगुण लक्षांत घेतां ते सामान्य प्रतीचे मनुष्य नव्हते हें कोणीहि कबूल करील. शरीरसामर्थ्याच्या बाबतींत ईश्वराची त्यांना कांहीं एक वेगळीच देणगी होती. सर्व हिंदुस्थानांत शरीरबलानें त्यांच्या तोडीचा एकहि संस्थानिक असेल असें

वाटत नाहीं. अनेक मर्दानी खेळांत ते निष्णात होते. शिकार व पहिलवानगिरी या गोष्टी त्यांना अत्यंत प्रिय असत. शिकारीला लागले कीं मग आपला राजेपणा सर्व विसरून निवळ रानटी शिकाऱ्याप्रमाणें ते पहाड व जंगलें पाटेल तशीं तुडवीत जात, पडतील ते कष्ट सोशीत, व शौर्यानें सर्व प्रकारच्या धाडसाचीं कामें करीत. वाघ व अस्वलें यांच्याशीं त्यांनीं अनेक सामने केले म्हणतात. त्यांच्या धिप्पाड शरीराच्या मानानेंच त्यांची शक्ति अचाट असे; सरपंच या नात्यानें कुस्ती सोडविण्याचे प्रसंग आले असतां ते मोठमोठ्या जवानांना चड्डींत हात घालून उचलून ठेवीत. कोल्हापूरच्या पागेला एकदां आग लागली असतां महाराजांनीं हातानें खूर धरून घोडे ठाणावरून उचलून बाहेर काढले असें सांगतात. महाराजांची बुद्धिमत्ताहि अशीच मोठी होती, व कारस्थानपटुता हा तिचा विलक्षण गुण असल्यामुळें, जुन्या काळीं असते तर त्यांना ऐतिहासिक कीर्ति लाभण्यासारख्या गोष्टी त्यांचा हातून घडल्या असत्या यांत शंका नाहीं. आपल्या हयातीचा काल मनुष्याला रुक्ष व नीरस वाटतो. पण अशाहि काळांत बुद्धिमत्ता, मनुष्यस्वभावाचें ज्ञान व जबर महत्त्वाकांक्षा या त्रयींच्या जोरावर त्यांनीं 'खास दरबारांत' व 'आम दरबारांत' ज्या अघटित घटना केल्या व करविल्या त्यांचें वर्णन तज्ज्ञ माणसानें यथास्वरूप लिहिलें तर, तो एक अत्यंत मनोवेधक असाच ग्रंथ होईल यांत शंका नाहीं. धर्मशास्त्र, राजकारणशास्त्र, समाजशास्त्र या तिन्हींमध्यें चक्रबुद्धीचा नांगर खोल घालून सत्तेच्या बळावर शाहू महाराजांइतकी हल्लींच्या काळांत दुसऱ्या कोणीहि बिचारी जमीन उलथापालथी केली नसेल. त्यांनीं केलेल्या मेहनतमशागतीनें कोणत्या प्रकारचें पीक आलें हें लोकांना दिसतच आहे; तथापि बाजूस पडलेल्या अनेक मनुष्य-वर्गांना अपूर्व पुढारी मिळून त्यांची बुद्धिजागृति झाली हें जितकें खरें, तितकेंच महाराजांची उद्योगशीलता, प्रयत्नाची चिकाटी व ध्येयाची एकनिष्ठता लोकोत्तर होती हेंहि खरें आहे. सूक्ष्म दृष्टीनें पाहणाऱ्या तत्त्वज्ञान्यास मनुष्यस्वभावाच्या शास्त्रांत अनेक अपूर्व सिद्धांत सुचविण्याइतकी विपुल सामुग्री महाराजांनीं आपल्या चरित्रानें पुरविली आहे यांत शंका नाहीं. त्यांच्या दोषांप्रमाणें त्यांचे कांहीं गुणहि लोकोत्तर होते; व महाराज निवर्तल्यावर जनता त्यांचे गुणच तेवढे स्मरणांत ठेवून दोष विसरून जाण्याचें औदार्य दाखवील अशी आमची खात्री आहे.

केसरी १९२२ मे ९.

## श्रीधर विठ्ठल दाते

हें महाराष्ट्रांतलें जुन्या काळचें एक मोठें प्रकरणच होतें. त्यांचें सर्वच कांहीं अजब होतें. त्यांचें पूर्वचरित्र बहुतेक पुण्याबाहेर पडलें असलें तरी त्यांची कीर्ति पुण्यास त्यांच्यापूर्वीच येऊन धडकली होती. या कीर्तीचें वर्णन एका शब्दांत यथार्थतेनें करावयाचें म्हटलें म्हणजे 'स्वारी प्रत्येक गोष्टींत दांडगेवर होती' असें करितां येईल. दाते हे पदवीधर नसले तरी त्यांना इंग्रजी शिक्षण चांगलें मिळालें होतें आणि आपल्या बुद्धिमत्तेनें व वाचनानें त्यांनीं तें बरेंच वाढविलें होतें. त्यांना चांगला इंग्रजी लेखक किंवा वक्ता

अशी संज्ञा देतां आली नसती; कारण त्यांच्या लिहिण्याबोलण्यांत खऱ्या वाङ्मयाची झांक फारशी नसे. सदभिरुचि व औचित्य यांच्या बंधनांची ओळखहि त्यांना फारशी नसे. पण लेखन व भाषण यांचा ओघ त्यांजपाशीं अखंड असे. भरमसाट लिहिणें, भरमसाट बोलणें यांत त्यांचा हातखंडा असे. पूर्ववयांत त्यांनीं सरकारी नोकरी केली व शेवटीं ते मामलतीवरून बडतर्फ झाले होते असें म्हणतात. त्याचीं इतर कारणें कांहींहि असतील, परंतु साहेब लोकांची देखील वेळ पडल्यास मीडमुर्वत ठेवावयाची नाहीं व त्यांना वाटेल तसें टाकून बोलावयाचें व लिहावयाचें हा दोष त्यांना भोंवला असल्याचा संभव आहे. त्यांच्या दांडगेश्वरपणाबद्दल लोकांची जी समजूत होती तिला मात्र साहेब लोकांशीं असणारें त्यांचें उद्धट वर्तन येवढेंच कारण खास नव्हतें. स्वतः लोकसमाजाशींहि ते तसेच वागत. अधिकारी या नात्यानें दाते यांची नाठाळाशीं गांठ पडली असतां, आपणास सवाई नाठाळ भेटला अशीच त्याची खात्री होईल असें वर्तन त्यांजकडून होई. उलट एकादी गैरवाजवीदेखील गोष्ट करण्याचें मनांत आलें, व लोकमत त्याला विरुद्ध पडलें, तरीहि हरप्रयत्नानें ती गोष्ट घडवून आणण्याचे कामीं दाते यांचा हातखंडा होता. आपलें कार्य सिद्ध करण्याला जरूर तर ते सगळ्या गांवच्या मुसक्या बांधतील, किंवा सगळ्या गांवाला आग लावून देतील, किंवा हवीं तीं घरें एका रात्रींत जमीनदोस्त करून व त्यांवर नांगर फिरवून, सकाळीं 'काय झालें' म्हणून विचारण्यास स्वतः स्वारी जाग्यावर हजरच, असा त्यांचा लौकिक असे. कुशाग्रबुद्धि, जबरदस्त स्मरणशक्ति व सरकारी कागदपत्रांच्या दाखल्याचें उत्कृष्ट ज्ञान यांच्या योगानें मुलकी वकीली करण्यास ते सर्वस्वी लायक होते, व नोकरींतून सुटल्यावर सरकारी खात्याकडील अर्ज लिहून देण्याचें काम ते करीत असत. या कामाकरितां त्यांनीं थोडाबहुत कायदाहि वाचला होता व वकील या नांवानेंच त्यांना लोक विशेष ओळखीत. त्यांनीं तयार केलेले कांहीं अर्ज आम्ही पाहिलेले आहेत. त्यांत वकिली आधारापेक्षां जुनी वहिवाट व दप्तरी दाखले यांचे आधार देण्याची त्यांची हातोटी अधिक समर्पक दिसून येते. पण सामान्यतः मुलकी प्रकरणांतले निकाल कायद्याच्या किंवा दाखल्याच्या आधारापेक्षां अंतस्थ दरबारी खटपटीच्या आधारावरच अधिक अवलंबून असतात ही गोष्ट महशूर आहे, व अंतस्थ खटपट कशी करावी याचें ज्ञान धीवर विठ्ठल यांना पुष्कळ होतें. या ज्ञानाच्या जोरावर त्यांनीं अनेक कामें जिंकून पुष्कळ पैसा मिळविला होता. इनाम कमिटीचें काम नुकतेंच होऊन गेलें असल्यामुळें इनाम चौकशीचे अर्ज त्या काळीं बरेचसे होत असत. मुलकी खात्याच्या दांडगाईनें इनाम गांव जप्तींत पडत, इनामदार हे स्वतः मिजासी व अज्ञानी असल्यामुळें ते अनेक वर्षें तसेंच जप्तींत पडून रहात, व त्यांच्या उत्पन्नाचा ऐवज पुष्कळसा सांचे. पण जप्तीच्या या कुलपाला धीवर विठ्ठली किल्ली लागली कीं, बाहेरून अर्ज, आंतून खटपट, अशा प्रयत्नानें अनेक वेळीं जप्ती सुटी होई व शिलकी ऐवजाची रास इनामदाराच्या हातांत पडण्याची वेळ आली की धीवर विठ्ठल हे आपल्या फीकरितां आधीं ठरवून ठेविलेली मोठी रकम तींतून उचलीत. अशाच तालुक्यांतील एका वेटकीहाळ

गांवाच्या जप्तीसंबंधानें त्यांना अर्जाची व खटपटीची फी म्हणून एक लक्ष रुपये मिळाले होते असें सांगतात. जुन्या व नव्या मिळकतीनें समृद्ध होऊन सुखवस्तु म्हणून ते पुण्यास येऊन राहिले होते; व मेहुणपुऱ्यांतील, हल्लीं लोकसंग्रह छापखाना असलेला, त्यांचा वाडा हल्लींच्या स्थितींत पाहणाऱ्यालाहि त्याचा मालक कसा असावा याची स्थूल कल्पना येऊं शकेल. पण स्वतः श्रीधर विठ्ठल या वाड्यांत नांदत असतां त्यांचें ऐश्वर्य ज्यांनीं पाहिलें असेल त्यांनाच तें खरें माहीत.

श्रीधर विठ्ठल यांची उंची सहा फुटांवर असून त्यांतच त्यांच्या पागोट्याची उंची मिळविली म्हणजे तो एखादा मनुष्य चालत नसून कपड्यांचें ठाणें अंगावर चढविलेला नालपीर चालला आहे असें वाटे. त्यांचें शरीर जसें उंच तसेंच रुंद व भरदार असे. त्यांच्या डोक्यावरील पागोट्याएवढें मोठें पागोटें त्या वेळीं सर्व पुण्यांत दुसऱ्या कोणाचें नव्हतें. त्यांचा आवाजहि शरीराच्या प्रमाणानेंच होता. विंचुरकरांच्या वाड्याशीं येऊन दारांतून त्यांनीं 'टिळक' म्हणून हांक मारली म्हणजे वाड्यांतला कानाकोपराहि दणाणून निघे. भाषणपद्धतीहि आवाजासारखीच दणकट. तोंडांतून कोणाला उद्देशून काय शब्द निघेल याचा नेम नाहीं. एकदां शिव्यांची फेंक सुरू झाली कीं शिव्या खाणाऱ्यावरोबर नुसता ऐकणाराहि चीत होऊन जावयाचा. संभाषणात्मक इंग्रजी बोलण्याची संवय त्यांना फार असे व एकदां पट्टा इंग्रजींत सुरू झाला म्हणजे तोहि अर्धा अर्धा तास सारखा चाले; मग त्यांत किती खऱ्या गोष्टी, किती दंतकथा, किती उतारे, किती आधार येतील यांचा नेम नाहीं. टिळकांपेक्षां दाते हे वयानें बरेच मोठे असल्यामुळें ते त्यांना सहजच मुलाप्रमाणें वागवीत. टिळकांसारख्यांशीं बोलावयाचें तेंहि बहुतेक सगळें आशार्थी. खलटसुलट युक्तिवाद किंवा विवेकशील चर्चा ही दाते यांना कधीं माहीतच नव्हती. त्यांच्या भाषणांत गोष्टी येतील त्या तशा 'असल्याच पाहिजेत किंवा नसल्या तरी झाल्याच पाहिजेत;' निदान त्यांच्या जड जोड्याच्या पायाची ठोकर व भीमसेनी मुठीचा आघात यांच्या जोरानें होणार नाहीं अशी गोष्टच नव्हती. बोलण्याप्रमाणें त्यांचें हसणेंहि ठाणबंद घोड्याच्या खिंकाळण्यासारखेंच असे. टिळक त्यांच्यापुढें उभे राहिले व संभाषण जोरांत चालू असलें म्हणजे पाहणारास वाटे कीं, हा टिळकांना आतां खाकेंत मारून गाडींत घालून घेऊन जातो कीं काय? पण वामनमूर्ति टिळकांचीहि योग्यता श्रीधर विठ्ठल जाणून असत. आहे मूल पण तलवारबहाद्दर आहे, असें ते टिळकांविषयीं म्हणत. पुढें पुढें रिकामपणीं येऊन गप्पा मारण्याचें एक स्थान म्हणजे टिळकांचें घर असें त्यांना झालें होतें व टिळकांनाहि नाइलाजानें आपला बहुतेक वेळ खर्च करून, मनांतून कंटाळा आला तरी, या बड्या धेंडाला नाखूष करवत नाहीं म्हणूनच त्यांच्याशीं बोलत बसावें लागे. एखादे वेळीं टिळकांनाच ते घरीं बोलावून नेत, आणि आपलें घर लोकांना हिंडून दाखविण्याची जी खोड पुष्कळांना असते तिची लहर आली असतां, तळघरांत मांडून ठेवलेल्या पांच पन्नास प्रकारच्या लोणच्या-मुरंब्याच्या बरण्यांपासून तों तिजोरींतील मनगट्यासारख्या सोन्याच्या सऱ्यांनीं जोड व रुप्याच्या गोठांचे सर येथपर्यंत सर्व चिजा दाखवून ते आपलें ऐश्वर्य टिळकांना नीट समजावून देत.........

पण हें ऐश्वर्यप्रदर्शनच या मंडपाच्या वादांत टिळकांना थोडेसें उपकारक झालें. तो प्रकार असा. श्रीधर विठ्ठल हे मोठे धर्मनिष्ठ नसले तरी मंडपाच्या वादांत त्यांचा ओढा नातूपक्षाकडे होता व राष्ट्रीयसभेच्या मंडपांत सामाजिक परिषद भरविली जाऊं नये हें यांचें मत हळू हळू गांवांत प्रगट झालें. नातूपक्षाला हा एक मोठा लाभ घडला. तथापि दाते या भांडणांत उघड रीतीनें पूर्वी फारसे पडले नव्हते. जो त्यांच्या तावडींत सांपडेल त्याच्या देखत ते परिषदेला लाखोली वाहून तिचा चक्काचूर करीत. पण राष्ट्रीयसभेला झटून मदत करणारांपैकीं ते नव्हते. पुढें वर्किंग कमेटींतील वाद जोराला लागला व कोणत्या तरी एका पक्षाच्या हातीं राष्ट्रीयसभेची व्यवस्था देणें प्राप्त होईल असें दिसूं लागलें. पण हें ठरवितांना पैशाच्या दृष्टीनें कोणता पक्ष अधिक पात्र आहे हीहि गोष्ट विचारांत घेतल्याशिवाय निर्वाह नव्हता. नुसत्या मेहनतीच्या दृष्टीनें टिळकांचा पक्ष कांहीं कमी नव्हता, पण पैशाचा प्रश्न आला म्हणजे सहजच त्याला खालीं पहावें लागे. बाळासाहेब नातू यांची मदत असली तर कोरडी असावयाची हें मागें सांगितलेंच आहे. पैसे खर्चण्याचा प्रश्न निघाला कीं त्यांच्या हजारों सबबी पुढें आल्याच. टिळकांनीं जोडलेले नवीन स्नेही बाबामहाराज हे नांवानें श्रीमंत असले तरी बारा वर्षे कोर्टांत चाललेल्या दत्तकाच्या वादामुळें स्वतःच कर्जाखालीं जिकिरीस आलेले. टिळकांनीं वाटेल त्या रकमेची प्रामिसरी नोट लिहून पुढें टाकली तरी ते सहीला माघार न घेण्याइतके मनानें उदार होते. पण त्यांच्याहि प्रामिसरी नोटोला या वेळीं सावकार लोकांत फारशी किंमत उरली नव्हती. अशा स्थितींत वर्किंग कमेटीचा वाद जवळजवळ या मुद्यावर आला कीं, राष्ट्रीयसभेची व्यवस्था हातीं घेण्याची ज्याची इच्छा असेल त्यानें ती पार पाडण्याच्या जामिनकीबद्दल आधीं कमींत कमी दहाहजार रुपये मोजावे. गोखलेपक्षांत मोठेमोठे वकील पेन्शनर वगैरे लोक व रानड्यांची अप्रत्यक्ष जामिनकी असल्यामुळें ते दहा हजार रुपये केव्हांहि मोजूं शकते. उलट टिळकांच्या बाजूला बहुजनमत खरें, पण हुकमी दहा हजार रुपयांची रक्कम नाहीं. ह्या रुपयांचा प्रश्न नेटाला लागला तेव्हां टिळक बाळासाहेब नातूंकडे रक्कम कर्जाऊ मागण्यास गेले; पण योग्य तारणाशिवाय आपण हक्क देऊं शकत नाहीं असा नातूंनीं जबाब दिला. या अडचणींत सांपडल्यामुळें टिळकांना श्रीधर विठ्ठल यांची आठवण सहजच झाली व तळघरांत नऊन ऐश्वर्य दाखविणाऱ्या या गृहस्थाच्या श्रीमंतीइतकेंच त्याचें धारिष्टहि आहे कीं नाहीं हें पहावें असें टिळकांस वाटलें. आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं, श्रीधर विठ्ठल या धाडसाच्या परीक्षेंत खरोखरच पहिल्या वर्गांत उतरले ! एके दिवशीं रात्रीं टिळक व त्यांचे स्नेही वासुदेवराव जोशी हे मुठींत जीव घेऊन अवेळीं श्रीधर विठ्ठल यांचे घरीं गेले. अशा वेळीं टिळक कधीं यावयाचे नाहींत, ते कां आले याचें दात्यांना सहजच आश्चर्य वाटलें. आणि विचारपूस होतां होतां ओघानें टिळकांनीं ही पैशाची गोष्ट काढली; आणि सांगितलें कीं, दहा हजार रुपये जर मोजतां येतील तर राष्ट्रीय सभा आपल्या हातीं येते. पण ते कसे मिळणार ? दाते यांनीं क्षणभरहि विचार न करितां सांगितलें कीं रुपयांची तजवीज होऊं शकेल, तुम्ही सभा हातीं घ्या. पण रुपये रोकड पाहिजेत त्याची वाट काय ? याविषयीं

टिळकांनीं सांगितलें कीं नातूंच्याजवळ रोकड पाटेल तितकी आहे. पण ते योग्य तारण मागतात. तेव्हां श्रीधर विठ्ठल म्हणाले तारण काय वाटेल तेवढें देतों. असें म्हणून त्याच पावलीं ते टिळक व जोशी यांना घेऊन तळघरांत गेले व दहा हजारांहून अधिक किंमतीच्या सोन्यामोत्यांच्या दागिन्यांचा डबा, पावतीदाखल एक चिटोरेंहि न मागतां, त्यांनीं टिळकांच्या स्वाधीन केला.

या उदारपणाच्या कृत्यानें परिषदेच्या प्रतिपक्षाच्या प्रमुखस्थानीं दाते यांची गणना एकदम होऊं लागल्यास नवल नाहीं. ते गांवांतील एक वजनदार गृहस्थ म्हणून सभेटाच्या कामीं त्यांचा उपयोग करून पाहण्यांत येऊं लागला. त्यांनीं रा. ब. रानडे यांची गांठ घेतली व परिषद् मंडपांत भरविण्याचा आग्रह आपण धरणार नाहीं असें आश्वासन रानडे यांचेकडून घेतलें. अशा रीतीनें परिषद बाहेर पडली व दहा हजार रुपयांच्या जोरावर कॉंग्रेसची व्यवस्था टिळकपक्षाच्या हातीं येण्याचा संभव दिसूं लागला. पण इतक्यांत मुंबई स्टॅंडिंग कमेटीनें मध्यें पडून सर्व व्यवस्था चिटणीस-सप्तकाच्या हातीं देण्याची योजना केली, ती टिळकांनीं मान्य केल्यामुळें बाजू उलटली. वर्किंग कमेटी सुधारकांच्या हातीं कायम झाली व परिषद बाहेर भरविण्याविषयींचें आश्वासन परत घेण्याला रानडे यांच्या अनुयायांनीं त्यांना चिथवून यशहि संपादलें. यामुळें श्रीधर विठ्ठल दाते यांना आपलें अखेरचें शस्त्र बाहेर काढावें लागलें. ता० १० नोव्हेंबर रोजी रेमार्केटच्या मैदानांत प्रचंड जाहीरसभा भरविण्यांत आली. लोकसमूह सुमारें दहा हजार असावा म्हणतात. अध्यक्षस्थानीं डॉ. गर्दे यांची निवडणूक करण्यांत येऊन एक दोन ठरावहि करण्यांत आले. मुंबई कमेटीनें ज्याअर्थी पुण्यांतील लोकांना धाब्यावर बसविलें त्याअर्थी पुण्यास होणारी राष्ट्रीय सभा ही निवळ एकपक्षीय होय, व सामाजिक परिषदेचा व आपला संबंध राष्ट्रीय सभेनें कायमचा तोडून टाकावा, अशा अर्थाचेहि ठराव होते. या सभेंत टिळकांनीं भाग घेतला नाहीं. तिचें अपूर्वत्व एकाच गोष्टीनें सिद्ध झालें. ती ही कीं श्रीधर विठ्ठल दाते यांनीं मुख्य ठरावावर दीड तास भाषण करून त्यांत कोणाची कांहीं बाकी ठेविली नाहीं. त्यांचे भाषणांतील मुख्य मुद्दा कांहीं गैरवाजवी नव्हता. राष्ट्रीयसभा ही सर्वांना पूज्य आहे. तिचे उत्पादक रानडे हेहि पूज्य आहेत. त्यांच्या अनुयायांच्या हातीं सभेची व्यवस्था गेली तरीहि त्यांत कांहीं अस्वाभाविक नाहीं. पण परिषद मंडपांत भरविण्याचा आग्रह वर्किंग कमेटी धरते ही गोष्ट मात्र गैर आहे. यांत अधिकारांचें अतिक्रमण होतें. सुधारकप्रमुख वर्किंग कमेटीवर पुण्यांतील लोकांनीं विश्वास टाकला असला तर तो राष्ट्रीयसभेच्या बैठकीच्या व्यवस्थेपुरता. पण सामाजिक परिषद ही बहुजनमताला अप्रिय आहे असें पक्कें ठाऊक असतां, हातीं आलेल्या अधिकाराचा उपयोग कमेटी जर परिषदेस मंडप देण्याकडे करील तर तो विश्वासघात होईल. वर्किंग कमेटींतील लोक सुधारणावादी आहेत तसेच मी व टिळक हेहि आहोंत. किंवा इंग्रजी शिक्षणाचें वारें लागलेले सर्वच लोक सुधारक असतात. पण सामाजिक परिषद व तिचे पुढारी लोकांत अप्रिय आहेत व लोक जर परिषदेला मंडप देण्याच्या विरुद्ध आहेत तर यांनी तो कां द्यावा ?

पण दाते यांच्या भाषणांतील खरी खोंच या युक्तिवादांत नव्हती; तर भाषणाच्या ओघांत त्यांनीं दहशतीचीं अशीं जीं एक दोन वाक्यें उच्चारलीं त्यांत होती. तीं वाक्यें अशीं:—"लोकांच्या विरुद्ध जर सभा भरेल तर ती राष्ट्रीय होईल काय? तेथें विरुद्ध मताचे लोक गेले तर त्यांच्यानें त्यांना घालवून देववेल काय? अशानें गोंधळ होईल, राष्ट्रीय सभेला आग लागेल, दयानंदाचे वेळचा प्रसंग येईल. संमतिबिल सरकारला सत्तेमुळें पास करतां आलें. पुण्यांतील सुधारकांची आमच्याविरुद्ध जाण्याची काय मगदूर आहे? इंद्रायतक्षकाय स्वाहा याप्रमाणें यांची दशा होईल. या बादशाही शहरांत आम्ही यांचें चालूं देऊं काय? सामाजिक परिषद हा रोग आहे. हें कुलंगी कुत्रें आहे. तें पुण्यास एकदां मंडपाच्या बाहेर काढून दिलें म्हणजे इतर गरीब शहरीं त्रास देणार नाहीं." वगैरे वगैरे. श्रीधर विठ्ठल यांची कीर्ति आधींच लोकांना माहीत होती. अशा स्थितींत हें भाषण झालें. मग काय विचारावें? सभा ही येवढी मोठी होती कीं, तिचे ठराव मंजूर झाल्याचें जाहीर करण्याकरितां कर्णे, शिंग व चौघडे आधींच आणून ठेविले होते. ठराव मंजूर होतांच 'कर्णा बजाव' म्हणून श्रीधर विठ्ठल यांनीं हुकूम द्यावा व वाद्यांच्या गोंगाटांनीं ठरावाची मंजुरी जाहीर व्हावी असें चाललें होतें. असल्या सभेंत प्रतिपक्षी येऊन काय करणार? सभेंतून परत जातांना लोकांच्या तोंडीं राष्ट्रीय सभेंत गोंधळ होईल, मंडपाला आग लागेल, इंद्रायतक्षकाय स्वाहा होईल हेच शब्द घोंटाळत होते. मंडप अद्यापि बांधावयाचाच होता! पण कल्पनाप्रधान लोकांना तो आधींच जळालेला दिसूंहि लागला! लोक म्हणत, एवढेसेही लोकांना पशु म्हणतां खरे, मग त्यांनीं पशुप्रमाणें वर्तन केलें तर त्यांत आश्चर्य कां मानतां? पुढें मंडप बांधण्यास सुरवात झाली, तेव्हां श्रीधर विठ्ठल हे संध्याकाळचे प्रहरीं गाडींत बसून मंडपाच्या जागीं जात व मुद्दाम कुचेष्टा करण्याकरितां कमरेवर हात ठेऊन शेजारच्या लोकांस म्हणत 'मंडपास आग लावायला ही जागा फार छान दिसते.' वास्तविक आग लावणारा दुष्ट मनुष्य आपलें बेत असें जाहीर रीतीनें बोलून दाखवीत नसतो. पण भीतीनें गांगरलेल्या मनुष्याला हें सांगून काय उपयोग? पुढें एक दोन आठवड्यांत हा वादच मुळीं मिटला. कारण सामाजिक परिषद आपण दुसरे जागीं भरविणार, असें तिचे सेक्रेटरी रा. ब. रानडे यांनीं जाहीर केलें,......
लो. टिळकांचें चरित्र खं. १ पृ. ४५४–४६०

## सर फेरोजशहा मेथा

सर फेरोजशहा यांचें थोडक्यांत वर्णन करावयाचें तर आम्ही असें म्हणूं कीं त्यांच्या इतका दणदणीत पुढारी मुंबई शहराला आजवर लाभला नव्हता. त्यांचें वय मरणसमयीं सुमारें सत्तर वर्षांचें होतें. पण त्यापूर्वी सतत चाळीस पंचेचाळीस वर्षे त्यांनीं देशसेवा केली होती. त्यांचा जन्म १८४५ सालीं झाला. मेथा यांनीं विद्यार्थीदशेंत दाखविलेली बुद्धिमत्ता पाहून सर अलेक्झांडर ग्रँट हे त्यांच्यावर खुष झाले आणि त्यांनीं यांना विलायतेस जाण्याला मदत केली. १८६८ सालीं मेथा हे बॅरिस्टर होऊन परत आले. विलायतेंत असतांच त्यांनीं कांहीं निबंध लिहून कांहीं व्याख्यानें देऊन आपल्या

कृत्येंहि करण्यास हरकत नसते. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे गृहस्थास ज्या गोष्टी सदरेवर करतां येत नाहींत त्या गोष्टी तो परसांत करतो. तेव्हां सरकारला त्यांचें मन त्यांचेवर सक्ति करून दुखवितां येत नाहीं. कारण ती राखीव जंगलें अगर कुरणें आहेत. तेव्हां ते धडधडीत सल्ला देऊं शकत नाहींत. याचें उदाहरण म्हणजे मांटेग्यू-चेम्सफोर्ड रिपोर्ट ! त्या रिपोर्टामध्यें हिंदुस्थानच्या दृष्टीनें चर्चा केली आहे, पण त्याच संस्थानाचा भाग आल्याशिवाय तो पूर्ण होऊं शकत नाहीं म्हणून त्यांत शेवटेस एक भाग खर्ची घातला आहे. यांतहि नोंद झाली नसती तर सर्व काम अपुरें झालें असतें. या भागांत सरकारचें मनोगत काय आहे हें प्रगट झालें आहे. अर्थात् तें न कळत झालें आहे. रिपोर्ट मात्र अगदीं मोहक व गोड भाषेंत लिहिला आहे. तरी आतां वर मी जें मनोगत न कळत प्रगट केलें म्हणून सांगितलें त्याचें कारण या रिपोर्टांत संस्थानांत सुधारणा होणें जरूर आहे अशाबद्दल जी उपमा दिली गेली आहे ती निराळ्या शब्दांत त्यांना देतां आली असती. त्यांनीं रस्त्याच्या एका बाजूस आग लागली असतांना त्याच्या ठिणग्या दुसऱ्या बाजूवर पडण्याचा संभव आहे अशा अर्थाची वाक्ययोजना केली आहे; यापेक्षां त्यांना निराळ्या रीतीनें सांगतां आलें असतें. उदाहरणार्थ वसंत ऋतूचा समय प्राप्त झाल्यानें झाडाझुडांना नैसर्गिक रीतीनें पालवी फुटली आहे व वनस्पतींनाहि बहार आला आहे वगैरे रम्य शब्दांत त्यांना सांगतां आलें असतें. परंतु अंतरंगांत खालसा प्रजेच्या मागणीबद्दल वैषम्य धारून ही योजना केली आहे. रस्त्यावरील एका बाजूचें घरास आग लागली आहे त्याची झळ व ज्वाळा दुसऱ्या बाजूस लागेल, असें जें म्हटलें तेव्हां दोन्ही घरांस आग लागली म्हणजे दोन्ही घरें नवीन होतील व रस्ताहि नवीन बनवितां येईल. आम्हांस कांहीं विधिनिषेध वाटत नाहीं. असो, सांगण्याचा मुद्दा म्हणजे शेजारच्या प्रदेशांत जी नवीन तत्त्वांची लाट आली आहे त्याकडे लक्ष देऊन आपल्या प्रजाजनांना एकत्र जमण्यास *परवानगी दिलीच पाहिजे असें निजामसाहेबांस सांगणें सरकारला प्राप्त आहे व त्यांनीं तें* केलें पाहिजे, असें माझें मत आहे. ( ३ ) आतां तिसरे भागीदार म्हणजे स्वतः संस्थानी प्रजा हें बोलणें जरा वाईट आहे, पण सत्य आहे व भाग आहे. संस्थानी प्रजेनें तरी संस्थानांत अशी काय चळवळ केली आहे ? कोणत्या राज्यांत श्रमाशिवाय हक्क मिळाले आहेत ? आम्ही खालसांतील लोकांनीं अनंत हाल व कष्ट सोसलेच कीं नाहीं ? किती तुरुंगांत गेले, किती फांसावर लटकले, कितींना जन्मठेपी झाल्या याचा विचार करा. इतके छळ सोसले म्हणूनच थोडीफार सुधारणा झाली. तशा प्रकारची चळवळ संस्थानी प्रजेनें कां करूं नये ? माझें असें म्हणणें नाहीं कीं, आम्ही जशी चळवळ करीत आहों तशी चळवळ आपण संस्थानांत आजच करावी. आम्ही ज्या पद्धतीनें आतांपर्यंत चळवळ केली त्या पद्धतीनेंच चळवळ करण्यास हरकत नाहीं. इकडे जो छळ होतो तो कायद्याचे नांवाखालीं होतो व व्यक्तिगत होतो हें ध्यानांत ठेवावें. बॅ. सावरकर यांनीं स्वराज्याकरतां अंदमान पाहिलें कीं नाहीं ? व तेथूनहि परत आलेच. संस्थानी प्रजेनें चळवळ सुरू केल्यावर लहान मोठी संस्थानें असा कांहीं त्यांत भेद नाहीं. प्रजा चळवळ करूं लागेल तर त्यांच्यावरहि

अनिष्ट प्रसंग येतील अशी खात्री बाळगा. लायख लोक हजारों गडप होतील; पण त्यास इलाज नाही. आम्ही बाहेरचे आपल्यास मदत करूं शकूं, आम्ही वर्तमानपत्रद्वारें जीव तोडून अगदीं सुंदर असें तुमचें म्हणणें पुढें मांडूं, पण आमच्या पत्रांना एका फटकाऱ्याबरोबर जेथें बंदी होणार तेथें त्याचा उपयोग तुम्हांला नाहीं आम्हांलाहि नाहीं.

## प्रजेचीं तीन कर्तव्यें

पहिल्या प्रथम आपण आपल्या सभेंत राजनिष्ठेचा ठराव जरूर पास करा. व्यक्तीला खुष करून आपला मतलब न सोडतां सनदशीर मार्गानें आपली चळवळ सुरू करा. भोरमध्यें आम्ही सत्याग्रह केला त्यापूर्वी आम्हीं अन्यायाचें माप त्याचे पदरांत घातलें ( We put them in the wrong ). त्यावेळीं भोरच्या लोकांना कायदा मोडावा असें सांगितलें; त्याबरोबरच लोकांनीं कोणत्या गोष्टी करूं नयेत त्याहि सांगितल्या. त्या अशा–( १ ) आपण कधींहि राजाची व्यक्तिशः निंदा करूं नये अगर त्याचे कुलासंबंधानें वाईट बोलूं नये. कारण सार्वजनिक स्वरूपाच्या मागण्या करतांना एका व्यक्तीची निंदा करूं नका. तो एकटाच जबाबदार नाहीं. व्यक्तींचे गुणदोष त्याचे बरोबर. तशीच कुळासंबंधानेंहि निंदा उपयोगाची नाहीं. ( २ ) दुसरी गोष्ट जातीजातींत वैरभाव उत्पन्न होईल अशी चळवळ सुरू करूं नये. राजकीय स्वरूपाची मागणी सर्व जातींकरतां करतांना उगीच एका जातीची निंदा करणें गैर आहे. मुद्दा सोडूं नका, पण भरमसाट निंदा करूं नका. असें झाल्यानें public sympathy म्हणून ज्याला म्हणतात ती तुमच्या बाजूस मिळेल. तसेंच बढाराचे बिऱ्हाडाप्रमाणें रानोमाळ आपलें बिऱ्हाड घेऊन भटकत फक्कूं नका. तेथेंच संस्थानांत भरभक्कम पाय रोंवा. पाया ठेचून ठेचून भरून मजबूत करा. उतावीळ होऊं नका. हल्लीं बराच काळ पालटला आहे. बऱ्याच संस्थानहद्दीत सभा होत आहेत. औंध वगैरे संस्थानांचें उदाहरण आपल्यास घेण्यासारखें आहे. ( ३ ) संस्थानें खालसा करण्याची भाषा बोलूं नका. या आतां ज्या तीन गोष्टी सांगितल्या त्या वगळून मग वाटेल तें करा. हल्लीं असा एक पक्ष निघाला आहे कीं तो देशी संस्थानें बुडवावीं असें म्हणतो; पण हें मत मला मान्य नाहीं. संस्थानें टिकलीं पाहिजेत असें मला अनेक कारणांनीं वाटतें. एकतर हीं संस्थानें आपल्या पूर्वजांच्या पराक्रमाच्या खुणा आहेत. त्या खुणा शिलक ठेवल्या पाहिजेत. मूळ संपादकानें–मग तें राज्य कशाहि प्रकारें मिळो–पराक्रमानें हीं संस्थानें मिळविलीं आहेत. त्यांच्या या जिवंत खुणा आहेत. इंग्रज सरकारनें तरी काय केलें ? कसें राज्य मिळविलें ? ते आहेतच ना ! मग हीं संस्थानें बुडवावींत काय म्हणून ? पुराणवस्तुसंशोधन खात्यामार्फत जुनी थडगीं उकरून राष्ट्राचा मागचा इतिहास शोधतात आणि ही हक्काची राजवटी मोडून तिचें नंतर संशोधन करावें हें कोणी सांगितलें आहे ? होळकर व शिंदे यांनी राज्य कसें मिळविलें हें समजलें म्हणजे 'पुरुषस्य भाग्यं' कसें असतें याची कल्पना येईल. तशींच स्वराज्याचीं हीं जुनीं चिन्हें आहेत तीं स्मृतिशेष तरी कां करावीं ? दुसरें एक कारण आपण ब्रिटिश हिंदु-

म्हणजे तो त्यांत आपोआपच पडणार, हें साहजिक आहे. त्याप्रमाणें ही त्यांची चळवळ पाहिली असतां वरीलप्रमाणें उद्गार आपोआपच सुचतात. तेव्हां ही त्यांची चळवळ म्हणजे वंशपरंपरेनें जुलूम करण्याची हांव आपण दाबांत राखिली पाहिजे.

नि० हैद्राबाद–परिषद्–पुणें, अध्यक्षीय भाषण, १९२८ मे ५

## संस्थानी चळवळींच्या बाबतींत चमत्कारिक अनुभव

मी आजचे व्याख्यानांत काय व कसें बोलावें हा एक मजपुढें बिकट प्रश्न एका तऱ्हेनें उभा आहे, परंतु माझा संस्थानी चळवळीच्या बाबतींत चमत्कारिक अनुभव असल्यामुळें त्यांतीलच हा एक प्रसंग आहे असेंच मी धरून चालतों. रा. वामनरावजी पटवर्धन यांनीं व मीं ही चळवळ सुरू केल्यावर दक्षिणेंतील एका वडया संस्थानच्या मरहूम अधिपतींनीं आम्हां चळवळ्यांस आपल्या संस्थानच्या तुरुंगाची हवा खाणेस पाठविणेबद्दल वरिष्ठ सरकारास सुचविण्यापर्यंत मजल नेली होती. एका संस्थानांत माजी पंत सचिवसाहेबांनीं कायदेभंगाचा खटला ज्या दिवशीं केला त्या दिवशींच त्यांचे चिरंजीव यांनीं मला व रा. वामनराव यांना चहास बोलाविलें होतें. दुसऱ्या एका संस्थानचे अधिपति श्रीमंत सर बाळासाहेब यांचें माझ्याबद्दल ममत्व आहे. खालसा मुलुखांतील " चळवळे" लोक मिरजेस जाऊन व्याख्यानें देतात सबब या गोष्टीस आळा घालावा असें त्यांना पोलिटिकल एजंटाकडून लिहून गेल्यावेळीं त्यांना संस्थानहद्दींत कोणाकोणाचीं व्याख्यानें होणें वरिष्ठ सरकारास इष्ट वाटत नाहीं त्याची नांवनिशी आल्यावर त्याप्रमाणें बंदोबस्त करण्यांत येईल असें उत्तर श्रीमंत सर बाळासाहेब यांचेकडून गेलें. त्यावर पोलिटिकल एजंटकडून आलेल्या यादींत माझें नांव साहाजिकच होतें, परंतु अधिपतींनीं या पत्रास उत्तर पाठवितांना ' केळकर यांना मी प्रतिबंध करणें शक्य नाहीं, ते मिरज संस्थानाचा परके नाहींत. सबब त्यांचेवांचून इतरांचे बाबतींत मी विचार करीन ' असा जबाब श्रीमंत बाळासाहेब यांचेकडून गेला. चवथ्या एका संस्थानांत असाच चमत्कारिक अनुभव दोन कारकीर्दींत भिन्नभिन्न असा आला आहे. बेळगांव येथें दक्षिणी सं. प्रजापरिषदेचें १ रें अधिवेशन झाल्यावर पुण्यास परत येतेवेळीं वाटेंत एका संस्थानांत जावयाचें ठरलें होतें. त्यावेळीं संस्थानाधिपतींनीं आम्हीं मुक्काम्यानें परत जावें अशी तजवीजहुकुम पठावून केली होती; परंतु अशा हुकुमाचा परिणाम निष्कारण वाईट होईल असें त्यांना उभयान्वयी मित्रांकडून स्पष्टपणें दाखवून देण्यांत आल्यावर सरकारी व निमसरकारी संस्थांमार्फत माझ्या भेटीची कसलीहि जाहिरात होऊं नये अशा बाबतींत तारेनें बेळगांवहून हुकूम गेले व माझ्या स्वागताकरितां नगरसभेनें केलेली तयारी रद्द करण्यांत आली. या हुकुमामुळें माझ्या सार्वजनिक व्याख्यानाच्या वेळीं हजर असलेल्या श्रोतृसमाजांत जास्तच भर पडली, हा भाग निराळा. त्याच संस्थानच्या नंतरच्या अधिपतींनीं याचे उलट जमखंडी सं. प्रजापरिषदेचें अधिवेशन भरविण्याव अध्यक्षपानीं माझी योजना केल्यास परवानगी देतों असें सांगितलें. स्थानिक सरकारी म्युनिसिपालिटीनें मला मानपत्र देण्याचें ठरविलें. त्या बाबतींत आडकाठी घातली नाहीं. इतकेंच नाहीं तर संस्थानिकांनीं माझी भेट घेतली

असा प्रकार त्याच संस्थानांत पुढें झाला. औंध संस्थानचे अधिपति श्रीमंत बाळासाहेब हे माझे कॉलेजांतील सहाध्यायी जरी आहेत, तरी ते संस्थानाधिपति आहेत, हें मी विसरलों नाहीं. परंतु त्यांचें राज्यकारभाराचें धोरण प्रगमनशील असल्यामुळेंच त्यांनीं मला त्यांच्या प्रातिनिधिक सभेचें कामकाज पाहण्याकरितां आमंत्रण मोठ्या अगत्यानें दिलें, व मी तें आमंत्रण तशाच उत्सुकतेनें स्वीकारलें; त्याचाच परिणाम आजचें हें व्याख्यान होय.

माझें धोरण संस्थानें टिकविण्याचें आहे, तीं बुडविण्याचें नाहीं, यामुळें मला संस्थानी विषयासंबंधानें संस्थानिकांसमोर भाषण करण्यास मुळींच भय वाटत नाहीं. प्रजेच्या साह्यावर संस्थानिकांचें बळ आहे हें संस्थानिक हल्लीं विसरले आहेत व त्यामुळें त्यांची दिशाभूल झालेली आहे. आम्हां "चळवळ्यां"ना संस्थानें अनेक कारणांकरितां पाहिजे आहेत. आम्ही श्रीमंतांचे द्वेष्टे नाहीं. आम्हांस सोशल इन्इक्वॉलिटी जगांतून जाईल असें वाटत नसल्यामुळें आम्हांस मथुरादासाचा द्वेष करावयाचा नाहीं किंवा संस्थानिकांचाहि करावयाचा नाहीं. संस्थानिकांच्या पूर्वजांच्या कर्तबगारीनें त्यांच्या पदरीं संस्थानें आहेत, तेव्हां एखाद्या कोटयधीशाच्या मुलाची इस्टेट काढून घेणें हें जसें आम्हांस न्याय्य वाटत नाहीं तसेंच संस्थानिकांनाहि स्थानभ्रष्ट करावें असें वाटत नाहीं. संस्थानिक स्वकीय प्रजेचे अवशेष आहेत. ज्यांना भूतकाळ आहे, त्यांनाच भविष्यकाळ आहे, या तत्त्वाचें निदर्शक चिन्ह म्हणून संस्थानें आम्ही मानतों. कालानें परिणत झालेल्या ऐतिहासिक चिन्हांचें संरक्षण ऑर्किऑलॉजिकल खात्यामार्फत पैसे खर्चून आम्ही जर करतों, तर संस्थानासारखे जिवंत अवशेष नष्ट व्हावे असें मानणें योग्य नाहीं. संस्थानी पिवळ्या मुलखावर तांबडा रंग फासल्यानें इंग्रजी राजसत्ता आम्हांस कांहींहि देणार नाहीं, हें पूर्णपणें माहीत असल्यावर आम्ही पिवळ्याचें तांबडें व्हावें असें कां इच्छावें? बायबलमधील नोहाच्या बोटी-( Arc ) मध्यें सजीव सृष्टीचे सर्व नमुने राखून ठेविल्यामुळें प्रळयानंतर सृष्टीची वाढ होण्यास साधन जसें उपलब्ध झालें तीच भावना आमची संस्थानिकांचे बाबतींत आहे. आमचे पूर्वज पराक्रमी होते हें उदाहरण दाखवूनच आम्ही संधि मिळाल्यास पराक्रम करून दाखवूं असें प्रतिपादन करण्यास समर्थ आहोंत. जोडे उचलणारा शिंदे व मेंढ्या वळविणारा होळकर यांनीं केलेल्या कर्तबगारीवरून आम्हांस भविष्य काळांत कर्तबगारी करण्यास संधि द्या असें म्हणूं शकत आहोंत. खालसा मुलुखांत आम्ही इंडियनायझेशन मागत आहोंत; मग संस्थानांत असलेलें इंडियनायझेशन बुडविण्यांत काय शहाणपण आहे? औंध प्रातिनिधिक सभेच्या एका सभासदानें आपल्या भाषणांत आज सकाळीं जें उद्दिष्ट औंध प्रातिनिधिक सभेनें आपल्यापुढें ठेविलें आहे म्हणून सांगितलें तेंच उद्दिष्ट आमच्या चळवळीचें आहे. संस्थानांतील कारभार खालसा मुलुखांतील राज्यपद्धतीपेक्षां जास्त चांगला व नमुनेदार करून दाखवून आम्ही हिंदुस्थानांतील स्वराज्याची मागणी योग्य व आवश्यक आहे असें दाखवून देणार आहोंत. अशी आमची महत्वाकांक्षा आहे व तसें दाखवितां येईल अशी आम्हांस आशा आहे.

संस्थानांतील कारभार वाईट किंवा कमी दर्जाचा असाच रहावयाचा असेल तर दुःखानें संस्थानें नामशेष होवोत असें म्हणावें लागेल. बटलर कमिटीच्या रिपोर्टांत संस्थानांतील घटना नुसत्या नांवाच्या आहेत असें म्हटलें आहे व तशी स्थिति बऱ्याच ठिकाणीं आहे; परंतु संस्थानिक प्रागतिक विचाराचा असल्यास व त्यास साहाय्य करण्यास लोक चांगले मिळाल्यास किती कार्य होतें याचें उदाहरण औंधचें आहे, असें म्हणण्यास मला मुळींच हरकत वाटत नाहीं. राजसत्ता समता ठेवण्यास तयार नसली म्हणजे किती असंतोष होतो याचें उदाहरण पेशवाईत कायस्थांना भाताचा पिंड न करतां तांदुळाच्या पिठावर भागवून घेणें प्राप्त केल्यानें काय स्थिति झाली हें सर्वांच्या ध्यानांत आहे. आज औंधच्या प्रातिनिधिक सभेनें विषमता वाटणारी गोष्ट कायदा पास करून रद्द करून अन्यत्र ठिकाणाच्या कायदेकौन्सिलांना धडा घालून दिला आहे.

## बटलर कमिटीच्या रिपोर्टापासून फायदा

बटलर कमिटीच्या रिपोर्टांत संस्थानांतून ज्या घटना केल्या आहेत त्या तकलुपी स्वरूपाच्या आहेत व संस्थानांतून ज्या सुधारणा आज दिसत आहेत त्या वरिष्ठ सरकारच्या सक्तीमुळेंच झालेल्या आहेत असें प्रतिपादन केलेलें आहे व तें बहुतांशीं खरें आहे हें लक्षांत ठेवून औंध येथील प्रातिनिधिक सभेची घटना व तिच्या मार्फत होत असलेली कामगिरी यांच्या विवेचनावरून संस्थानांतून काय करतां येईल हें दाखवून आम्हांस संस्थानांबद्दल आशा कां वाटते त्याचें दिग्दर्शन केलें आहे. बटलर कमिटीच्या रिपोर्टांत संस्थानिकांनीं ज्या गोष्टी मागितल्या आहेत, त्यांबद्दल जो निर्णय केला आहे, तो नवीन स्वरूपाचा आहे असें मुळींच नाहीं. संस्थानिकांच्या दोन मागण्या प्रामुख्यानें होत्या, एक संस्थानिकांचे संबंध विलायतेंतील काऊनशीं आहेत असें ठरवून घेणें व दुसरी संस्थानी कारभारांत वरिष्ठ सरकारनें हात न घालणें. या दोन बाबतींत बटलर कमिटीनें संस्थानिकांना सद्यःफलदायी असें काय दिलें आहे असें म्हणावें तर कांहीं नाहीं हेंच उत्तर आहे. लॉर्ड रीडिंग यांनीं निजामसाहेबांना खलिता पाठवून जें कळविलें तेंच जास्त पक्क्या स्वरूपांत बटलर कमिटीनें ठरविलें आहे. संस्थानिकांनीं संस्थानी कारभारांत वरिष्ठ सरकारनें हात घालूं नये असें मागणें करून "हालवून धुंडा थळकट वसवून मात्र घेतला " दुसरें कांहीं नाहीं. संस्थानिकांचा संबंध विलायतेंतील काऊनशीं आहे असें बटलर कमिटीनें ठरविलें, यामुळें संस्थानिकांना आपल्या मागणीपैकीं ५० टक्के पदरीं पडले असें वाटण्याचा संभव आहे; परंतु हिंदुस्थानला स्वराज्य मिळाल्यानंतर संस्थानिकांचे संबंध हिंदुस्थान सरकारशीं राहूं नयेत असें या निर्णयानें होणार आहे. परंतु हिंदुस्थानास स्वराज्यप्राप्तीची गोष्ट "दिल्ली तो बहोत दूर है" यापैकीं आहे. आज संस्थानिकांच्या दररोजच्या कारभारांत हात घालण्याचा आपला अधिकार इंग्रजी राजसत्तेनें जास्त निश्चित स्वरूपांत जाहीर रीतीनें प्रस्थापित केला आहे. संस्थानांतून अंदाधुंदी असल्यावर वरिष्ठ सरकारनें हात घालण्यांत गैर तें काय आहे? बटलर कमिटीनें आपल्या रिपोर्टाच्या ५०व्या कलमांत " संस्थानी प्रजेनें

संस्थानांतून सुधारणा करण्याकरितां चळवळ करून संस्थानिकाला नकोसें करून सोडल्यास वरिष्ठ सरकार संस्थानिकांच्या अधिकारास टेकू देणार, परंतु त्याबरोबरच संस्थानांतून प्रजाजनांनीं मागितलेल्या सुधारणा अमलांत आणण्यास संस्थानिकांना सल्ला ऊर्फ हुकूम करणार " असें स्पष्ट शब्दांत सांगितलें आहे. वरिष्ठ सरकार हात न घालण्याचें आश्वासन देतें असें मानणें चुकीचें आहे. संस्थानिक व संस्थानी प्रजाजन एका खाणींतील मातीसारखे आहेत. असें असून संस्थानिकानें सर्व माती एक रांजण बनविण्याकरितां राखून ठेवणें केव्हांहि मान्य होणार नाहीं. संस्थानिकरूपी घागर बनविल्यास संस्थानी प्रजाजनांचीं लोटकीं बनवून या सार्‍यामध्यें अधिकाराचें पाणी वाटल्यास त्यांत काय वाईट आहे ? संस्थानांत सुराज्य असल्यावर संस्थानी राज्यकारभारांत हात घालण्याचें वरिष्ठ सरकारास कारण उरणार नाहीं व अंधाधुंदी असल्यास संस्थानी कारभारांत हात घालणें चुकीचें होणार नाहीं. संस्थानिकांनीं वरिष्ठ सरकारकडे जी मागणी केली तिचें स्वरूप कसें आहे हें एका दाखल्यावरून आपल्या ध्यानीं उत्तम येणार आहे. एखाद्या वृद्ध पुरुषानें तरुण्या स्त्रीशीं विवाह केल्यावर तो आजारी पडून अंथरुणास खिळून जावा म्हणजे त्या तरुण स्त्रीची मनोवृत्ति जशी होते तशी संस्थानिकांची झालेली आहे. त्यांना इंग्रजी राज्यरूपी भ्रतार प्रजाजनांच्या चळवळीच्या आजारानें आसन्नमरण झाला असें वाटून त्याजपाशीं संस्थानिकरूपी या तरुण भार्येनें " माझी वाट काय " ? असा प्रश्न करण्यासारखी स्थिति संस्थानिकांच्या मागणीची आहे. भावी हिंदुस्थानच्या स्वराज्यरूपी सवतीच्या मुलाच्या हातीं आपली मान देऊं नये असें या संस्थानिकांना वाटत आहे. इंग्रजी राज्यसत्तेनें संस्थानिकांचे संबंध ब्रिटिश क्राऊनशीं आहेत असें सांगून काय केलें म्हणावें तर " उगी रहा रडूं नको, तुला सवतीच्या मुलाच्या तोंडाकडे पाहण्याची गरज पडणार नाहीं, अशी मी व्यवस्था करणार आहें. मात्र आजच माझ्या कमरेची किल्ली तुझ्या अगर त्याच्या हातीं देत नाहीं. " या उत्तरानें संस्थानिकांचें समाधान होत असल्यास त्याबद्दल आम्हांस मुळींच वाईट वाटत नाहीं. संस्थानिकांची सत्ता बेबंद राहूं देण्यास सरकार तयार नाहीं. उलट संस्थानांत सुराज्याच्या गोष्टी करविण्यास लोकांनीं चळवळ केल्यास सरकार तयार आहे हें बटलर कमिटीच्या रिपोर्टाच्या द्वारें जाहीर झालें आहे. या रिपोर्टाचा खरा विचार केला असतां संस्थानिकांना कांहींच मिळालें नसून मिळालें असलें तर संस्थानी प्रजाजनांनाच चार दोन पैसे खिशांत टाकण्यास मिळाले आहेत व संस्थानी प्रजाजन आणखी चळवळ करतील तर आणखींहि चार दोन आणे खिशांत पडल्यावांचून रहाणार नाहींत. या गोष्टी आपण सर्वांनीं लक्षांत ठेवाव्यात एवढेंच माझें आपणांस सांगणें आहे.

औंध येथील व्याख्यान, १९२९ जून ३१.

## संस्थानी प्रजा व राउंडटेबल

आजपर्यंत संस्थानांत एकतंत्री अमलाचा प्रजेवर जुलूम होता. आतां उलट अनियंत्रित राज्यकर्त्यांना लोकसत्तेचें भय उत्पन्न झालें आहे. पण परस्परांचें भय

नाहींसें होऊन खऱ्या प्रतिनिधिकें संस्थांचे रूपानें दोघांनाहि राज्यघटनेंत योग्य स्थान मिळावें, अशी आमच्यासारख्या दोघांच्याहि हितचिंतकांची इच्छा असणार. संस्थानांतील स्वराज्याची प्रगति ब्रिटिश मुलखांतल्या स्वराज्याच्या मार्गानेंच होणारी आहे. या दोनहि स्वराज्यांचा मेळ घालणाऱ्या राऊंडटेबल परिषदेंत संस्थानी प्रजेला स्थान मिळेल कीं नाहीं ही गोष्ट संशयित आहे. व्हाइसरॉयांच्या जाहिरनाम्यांतील संस्थानी प्रतिनिधि या शब्दांचा अर्थ केवळ संस्थानिक असा ठरविण्याचे प्रयत्न सुरू आहेत. ब्रिटिश हिंदुस्थानाला डोमीनियन स्टेटस् मिळण्याच्या मार्गांत संस्थानिक आडकाठी करणार नाहींत अशी बिकानेरच्या महाराजांनीं संस्थानिकांचे वतीनें घोषणा नुकतीच केली आहे. आजपर्यंतच्या त्यांच्या वृत्तीवरून येवढयाबद्दलहि त्यांचे उपकारच मानले पाहिजेत ! त्यांना यापुढें असा अडथळा आणणें कितपत शक्य आहे, ही गोष्ट सोडा. पण ब्रि० मुलखांतील स्वराज्याच्या प्राथमिक लढ्यांत हें स्वराज्य आपल्याला भोवूं नये म्हणून संस्थानिकांनीं विरोधी भाव ठेवला नव्हता काय ? हिंदुस्तानाला सुधारणा देण्यांत ब्रि० सरकारनें कमकुवतपणा दाखविला असें मानणारे व हे स्वराज्यवादी चळवळ्ये आमच्या संस्थानांत असते तर त्यांना गडावरील तुरुंगांत कायमचें डांबून त्यांचा निकाल केला असता, असें आढयतेनें सांगणारे संस्थानिक मला माहीत आहेत. आतां नव्या जाहीरनाम्यानें अशा प्रकारच्या राजा महाराजांना स्वराज्यद्रोह करून सरकारशीं स्नेह वाढविण्याची संधि कायमची गेली याबद्दल ते मनांतल्या मनांत ब्रि० सरकारला शिव्याशाप देत असतील ! आजपर्यंत ह्या स्वराज्य–द्रोहाच्या मोबदल्यांत संस्थानांतील जुलुमाकडे ब्रि० सरकारचा कानाडोळा होण्याची व्यवस्था होई. ही पापमय देवघेव आतां संपली.

बटलर कमिटीनें संस्थानाच्या अंतर्गत राज्यकारभारावरहि देखरेख करण्याचा साम्राज्य सरकारचा हक्क व वहिवाट आहे असाच निर्णय दिला. बटलर कमिटीच्या बावतींत हात दाखवून अवलक्षण करून घेतलेल्या संस्थानिकांना राउंडटेबल परिषदेंत आपल्याला स्थान मिळेल व ब्रिटिश मुलुखांतील लोकप्रतिनिधींबरोबर न बसतां वेगळें बसतां येईल या योजनेनें त्यांतल्या त्यांत समाधानाची दुहेरी संधि लाभली. कारण लोकांच्या प्रतिनिधींबरोबर खांद्याशीं खांदा लावून बसण्यांत त्यांना कमीपणा वाटतो आणि आपल्याच प्रजेच्या प्रतिनिधींशीं बरोबरीनें वागण्यांत तर अपमानाचा कडेलोटच ते मानतील. वेगळ्या बैठकीनें त्यांचा मान राखला गेला व बटलर कमिटीचा निकाल आपण अजून स्वीकारला नसून त्याबद्दल राउंड टेबल परिषदेंत विरोध करूं असें भासविण्याची संधि सध्यां त्यांस सांपडली आहे.

आपलें अंतर्गत स्वातंत्र्य अबाधित राखूं इच्छिणाऱ्या बिकानेरच्या महाराजांना राउंड टेबल परिषदेंत संस्थानी प्रजेच्या प्रतिनिधींचा उल्लेख नाहीं याबद्दल समाधान वाटलें, आणि राष्ट्रीय सर्व–पक्षीय परिषदेंत सरकारचे प्रतिनिधि नव्हते व संस्थानी प्रजेचे प्रतिनिधि होते म्हणूनच संस्थानिकांनीं तींत भाग घेतला नाहीं, असें बिकानेरच्या महाराजांनीं आत्मसमर्थन केलें आहे. सरकारचे प्रतिनिधि नाहींत, तेथें संस्थानिकांनीं न

येणें हें त्यांच्या स्वभावानुसारच झालें! पण परिषदेंत प्रजेचे प्रतिनिधि आहेत म्हणून तींत भाग न घेणें या दुसऱ्या सबबीनें मात्र आम्हांस अतिशय चीड येते. राजांना प्रजेच्या अधिकृत प्रतिनिधींचा विटाळहि खपूं नये काय? राजा हाच प्रजेचे मनोरथ खरे जाणतो आणि हे प्रतिनिधि जाणत नाहींत असें बिकानेरचे महाराज म्हणतात. पण हा जुनाट युक्तिवाद आतां यापुढें टिकणार नाहीं. संस्थानांत प्रातिनिधिक संस्था स्थापन करून त्यांना अधिकार देईपर्यंत स्वस्थ बसावयाचें नाहीं व राजांनाहि स्वस्थता लाभूं द्यावयाची नाहीं असा संस्थानी प्रजेचा आतां निश्चय झाला आहे. संस्थानिक हेच जर प्रजेचे प्रतिनिधि म्हटलें तर सेक्रेटरी ऑफ स्टेट हेच ब्रिटिश प्रजेचे प्रतिनिधि मानावे लागतील! पण स्टेट सेक्रेटरीचें असें प्रातिनिधित्व हिंदी लोकांनीं कधींच मान्य केलेलें नाहीं. सरकारी अधिकारी व लोकप्रतिनिधी हा भेद जसा खालसांत मानला, तसाच तो संस्थानांचे बाबतीतहि कां मानूं नये? असे प्रजेचे प्रतिनिधि फार तर दोन-तीन घेतां येतील. यांत संस्थानिकांचा अपमान कोणत्याहि प्रकारें होण्यासारखा नाहीं. बिकानेरचे महाराज हे आपल्या संस्थानांतील प्रजेच्या प्रतिनिधींची सल्लामसलत घेण्यांत कमीपणा मानीत नाहींत, असें त्यांच्या भाषणावरूनच दिसतें. मग संस्थानांचे प्रतिनिधि म्हणजे एकटे संस्थानिक असा मक्ता त्यांनीं आपणाकडे कां घ्यावा? या बाबतींत इतकें विवेचन करण्याचें कारण हेंच कीं, हिंदुस्थानांत अनियंत्रित राजसत्ता कायमची चालू ठेवण्याच्या संस्थानिकांच्या प्रयत्नाला जोराचा विरोध करण्याची वेळ आली आहे.

## पतियाळाच्या महाराजांची कोटी

पत्याळाचे महाराजांनीं परवां अशी उपमा घेतली कीं, "संस्थानिक हे आईच्या घरीं (ब्रिटिश साम्राज्यांत) कन्या या नात्यानें वागले तरी आपल्या घरांत (संस्थानांत) ते घरधनिणीप्रमाणें स्वतंत्र आहेत." पण लग्न झालेल्या मुलीची दोन प्रकारची स्थिति असूं शकते. सधवा किंवा विधवा. संस्थानिक सधवा मुलीप्रमाणें मानले तर त्यांचा पति कोण? ब्रिटिश सरकार हें मायबाप असल्यामुळें तें पति होऊं शकत नाहीं. तेव्हां तो पति दुसरीकडेच हुडकला पाहिजे. तो प्रजेशिवाय दुसरीकडे कोठें सांपडणार? बरें या मुलीची वैधव्यावस्था मानली तर तिला इस्टेटीवर मर्यादितच अधिकार राहणार. भावी वारसाच्या हक्काला बाध येईल, अशा रीतीनें इस्टेटीची विल्हेवाट तिला लावतां यावयाची नाहीं. हे भावी वारस म्हणजे त्यांची प्रजाच होय. अशा रीतीनें आपल्या मतलबासाठीं पत्याळाच्या महाराजांनीं पुढें केलेली उपमा त्यांच्यावरच बरोबर उलटवितां येते. जुन्या परंपरेंत वाढलेले संस्थानिक झाले तरी 'मी म्हणजेच संस्थान' असें ते वाटेल त्या बाबतींत म्हणूं शकत नाहींत. स्वयंनिर्णयाचें सध्या युग सुरू आहे, हें खरें. पण हाच स्वयंनिर्णयाचा हक्क केवळ अनियंत्रित राजांनाच बहाल केलेला नाहीं. उलट या राजांना न जुमानतां प्रजेनेंच हा हक्क चालवावयाचा आहे. पाश्चात्य देशांतील सर्व राजमुकुट वितळविण्याच्या कढईंत पडले आहेत. आजचें वातावरण ओळखण्याच्या दृष्टीनें ही गोष्ट संस्थानिकांच्या निदर्शनास आणावीशी वाटते, त्यांचा पाणउतारा

करण्यासाठीं नव्हे. अशा वेळीं भोंवतालच्या परिस्थितीकडे संस्थानिकांनीं दुर्लक्ष करणें वेडेपणाचें ठेल. एका बाजूनें ब्रिटिश सरकार व दुसऱ्या बाजूनें ब्रिटिश प्रजा या दोन शक्तींच्यामध्यें सांपडलेल्या संस्थानिकांनीं यापुढें शहाणपणानें व जपूनच वागलें पाहिजे. नाहीं तर लोकसत्तेच्या क्षोभाच्या तुफानांत कांहीं एका मर्यादेपलीकडे त्यांना ब्रिटिश सरकारहि वांचवूं शकणार नाहीं. केसरी, ता. ३ डिसेंबर १९२९.

## संस्थानिकांना इषारा

मी जरी कोणत्या व्याख्येच्या शब्दाच्या काटेतोलपणानें मिरज प्रजाजन होत नसलों, तरी माझा जन्म मिरज संस्थानच्या भूप्रदेशांत झालेला आहे, इतकेंच नव्हे तर मिरज हायस्कूलमध्यें माझें शिक्षण झालेलें आहे. माझे वडील सेवानिवृत्त होईपर्यंत संस्थानचे नोकर असल्याकारणानें माझे बालपणचे गणगोत मिरजेचे लोक आहेत. संस्थानच्या गादीबद्दल मला अभिमान वाटत असून श्री. बाळासाहेब यांच्याबद्दल माझ्या मनांत प्रेम व आदर वसत आहे. श्री. बाळासाहेब यांचा ज्यांच्या ज्यांच्याशीं परिचय झाला, त्या सर्वांना श्रीमंतांची साधी रहाणी, उच्च विचारसरणी व निर्मळ वर्तन पाहून त्यांच्याबद्दल सादर कौतुकच वाटावें यांत नवल नाहीं.

बेजबाबदार कारभार व जुलमी राजसत्ता या बाबतींत उत्तर हिंदुस्तानांतील संस्थानें दक्षिणेपेक्षां वरचढ आहेत ही वस्तुस्थिति प्रजेच्या जबाबदार राज्यपद्धतीच्या मागणीस नकार देण्यास सबळ कारण होऊं शकतें असें मात्र म्हणतां येणार नाहीं परंतु एकतंत्री राज्यकारभार अगर सोटेशाही कारभार हा संस्थानी प्रजेचा उपमर्द करणारा आहे, एवढेंच नव्हे तर हुशार व सुविद्य जनतेची यामुळें बेअब्रू होत आहे. सुराज्याच्या निरनिराळ्या बाबींची कसोटी लावून त्यांत संस्थानें उतरल्यास बेजबाबदार कारभाराचा त्यांस कदाचित् पाठपुरावा करतां येईल; पण ही कसोटी दक्षिण महाराष्ट्रांतील किती संस्थानांना लावतां येईल ? या संस्थानांतून सुराज्याचा पूर्ण अभाव आहे व संस्थानाधिपति केवळ विद्वान् अगर उत्तम आहे, एवढ्याच गुणानें संस्थानी प्रजेचें काय समाधान होणार ? संस्थानिकाची इज्जत व त्याचा दर्जा संस्थानांत नांदत असलेल्या सु–राज्यानें ठरवावयाचा असतो, वैयक्तिक गुणावरून नव्हे !

'स्वराज्याची तहान सुराज्यानें भागत नाहीं' या म्हणींत पुष्कळ खोल अर्थ भरलेला आहे. संस्थानाधिपति हे आपण संस्थानांचे प्रतिनिधि आहोंत म्हणून शेखी मिरवितात, परंतु या त्यांच्या वल्गनांस आतां संस्थानी प्रजा भीक घालणार नाहीं. संस्थानी प्रजेंत झालेल्या जागृतीनें संस्थानिक जर जागे होणार नसले, तर मग त्यांचें नशीब त्यांच्याबरोबर असें म्हटलें पाहिजे. काळाचा ओघ ओळखून संस्थानच्या राज्यकारभारांत त्यांनीं प्रजेला अंशभागी केलें पाहिजे. परंतु असें करण्यास ते जर चुकतील तर संस्थानी प्रजेची चळवळ जलाल स्वरूपाची झाल्यास त्याचा दोष कोणाकडे ? व मग या चळवळीस अटकाव करणें संस्थानी सामर्थ्याच्या पलीकडे आहे, हें त्यांनीं खूप समजून असावें ! व त्यांनीं ब्रिटिश सरकाराकडून आपणास नेहमीं सक्रिय मदत मिळेल अशी

आशाहि पण बाळगूं नये ! संस्थानांत राजकीय सुधारणा करण्याची सक्ति जरी ब्रिटिश सरकारला करतां आली नाहीं तरी जुन्या पुराण्या काळांतील राज्यकारभार, ब्रिटिशांच्या सुधारलेल्या राजवटींत, पूर्वीप्रमाणें संस्थानांत चालविल्यास तें सरकारला पसंत पडेल अशी संस्थानाधिपतींची कल्पना असेल तर ती मात्र त्यांच्या हातून मोठी घोडचूक होत आहे, असें म्हणणें भाग आहे.

खालसांतील राज्यकारभारांत जबाबदारीचें तत्त्व समाविष्ट केल्यास आपण संघटनात्मक राज्यघटनेला संमति देऊं अशी कबूली संस्थानिकांनीं गोलमेज परिषदेंत दिली आहे; परंतु स्वतःच्या गुणकारी औषधाची प्रौढी मारणाऱ्या वैद्यानें स्वतःचा रोग आपल्या औषधानें नाहींसा करणें युक्त नाहीं काय ? तद्वतच संस्थानिकांची आज परिस्थिति आहे. बिकानेर व इतर संस्थानाधिपतींनीं आपल्या संस्थानांत एकतंत्री सत्ता ठेवून ब्रिटिशांना जबाबदार राज्यपद्धतीचा स्वीकार करा असें म्हणणें हास्यास्पद नाहीं काय ? खालसाप्रमाणें संस्थानी मुलुखांत जर राज्यकारभार चालविण्यांत आला तर संस्थानिकांना लोक डोक्यावर घेऊन नाचतील; पण ब्रिटिशांनी हिंदुस्थानास वसाहतींचें स्वराज्य जरी दिलें, तरी सुद्धां हिंदी जनतेकडून त्यांना तसा मान मिळणार नाहीं ! याचें इंगित काय आहे हें संस्थानिकांनीं समजून घ्यावें.

मी जरी दोन्ही पक्षांचा हितचिंतक असलों तरी दरबार व प्रजा यांच्यामध्यें किरकोळ बाबतींतील लढ्याबाबत मध्यस्थाचें काम करण्यास मी तयार नाहीं. मिरजेच्या जोड–अधिपतींचा विश्वास माझ्यावर आहे. हा भाग निराळा ! मी येथें अगर कोणत्याहि संस्थानप्रजापरिषदेचें धुरीणत्व जरी स्वीकारलें तरी मी जे विचार प्रदर्शित करणार, त्यांत संस्थानिकाबद्दलच्या आवडत्या नावडत्या भावनेमुळें फरक पडणार नाहीं. संस्थानाधिपतीला व प्रजेला मी तोच सल्ला सर्वत्र देणार.

मी संस्थानिकांना असें आश्वासन केव्हांहि देण्यास तयार आहें, कीं संस्थानें नष्ट करण्यास अगर तीं नामधारी करण्याच्या कल्पनेस अगर त्यांचें आधिपत्य कमी करणें, अगर तह–करारांचा मलता अर्थ करून त्यांचें नुकसान करण्यास कोणी तयार झाला तर आम्ही विरोध करूं. अत्याचारी चळवळ, जातिविषयक वैमनस्य, करबंदीची चळवळ, न्यायदानांत नसती लुडबुड करून जर कोणी संस्थानी कारभाराचा विचका उडवील तर त्यांस प्रतिकार करावयास आम्ही तयार आहों. संस्थानामध्यें क्रांति न होतां उत्क्रांति होऊन त्यांची उन्नति व्हावी अशा मताचा मी आहें. संस्थानिक जर शहाणे असतील तर त्यांनीं राजशाहीचा व लोकशाहीचा मिलाफ करून एक सुंदर राज्यपद्धति अस्तित्वांत आणावी.

भविष्यकाळांत संस्थानांचें पुढें काय होणार असेल तें होवो, पण आज संस्थानांतून जी राज्यपद्धति आहे त्यामुळें आपल्याला लज्जेनें मान खाली घालावी लागते. हुशार व विद्वान् राज्यकर्त्यांना सुद्धां प्रजेला राज्यकारभाराचे हक्क द्यावेसे वाटत नाहींत; मग बाकीच्यांची तर काय कथा ? मिरज संस्थानांतील परिस्थिति तर फारच लाजिरवाणी व अपमानास्पद आहे. राजकीय सुधारणांच्याबाबत भाषण दरबारचा निषेध करूं तेवढा

थोडाच होणार आहे स्वकर्तव्याविषयींची दरबारची बेफिकिरी अक्षम्य आहे. येथें संस्थानाधिपतींचा शब्द म्हणजे कायदा आहे. मुद्रणस्वातंत्र्य, भाषणस्वातंत्र्य व संघटनास्वातंत्र्याचा अभाव आहे! अटीतटीवर भरविण्यांत आलेल्या या परिषदेचें अध्यक्षस्थान मला स्वीकारावें लागलें याबद्दल मला खरोखर लाज वाटत आहे व माझ्याच अध्यक्षतेखालीं परिषद् भरावी अशी अट परिषदेस परवानगी देतांना दरबारनें घातली, यामुळें तर मला फारच वाईट वाटत आहे.

खालसांतील 'परस्या'च्या कायद्याची येथें नक्कल करण्यांत आली म्हणून श्रीमंतांना हर्षवायु झाला आहे. परंतु ही नक्कल अविचारी व हलक्या मनोवृत्तीची द्योतक आहे. स्वदेशीचे कट्टे पुरस्कर्ते श्रीमंत बाळासाहेब स्वदेशीच्या उघड उघड प्रचारास बंदी करतात, हें दृश्य मोठें मनोहर आहे का? ग्रामपंचायतीचा अभाव आहे व स्थानिक स्वराज्याचें बीज जर पेरलें नाहीं तर रोपटें कोठून दिसणार? कायदेमंडळाची गोष्ट अजून 'दिल्ली तो बहोत दूर आहे!'

चाळीस पन्नास मैलांवर असलेल्या औंध संस्थानशीं मिरजेची तुलना केल्यास दोन्ही संस्थानांच्या राजकीय परिस्थितींत महदंतर, दृष्टीस पडणार आहे. तेथें संस्थानी प्रजेला आपण अधिकार कसे चालवावे व आपल्या प्रभूचें आव्हान कसें स्वीकारावें यांची विवेचना पडली आहे मिरजेचे प्रजाजन व औंधचे प्रजाजन यांच्या पात्रतेमध्यें इतका फरक नसून तो संस्थानिकांच्या मेंदूंत आहे. फाजील अधिकारतृष्णेचे परिणाम कोठेंहि दृग्गोचर होतात, व मग त्यास संस्थानें तरी अपवाद कशीं असणार? संस्थानी प्रजाहि संस्थानिकांच्या विरुद्ध पराकोटीस जाणें मनुष्यस्वभावास अनुसरून आहे.

संस्थानचें उत्पन्न हें जर संस्थानिकांचें वैयक्तिक उत्पन्न आहे असें संस्थानाधिपति म्हणावयास लागले तर संस्थानी प्रजेनें उलट असें म्हणणें साहजिक आहे कीं, संस्थानची पै न् पै आमची आहे व संस्थानाधिपतीनें आम्ही देऊं त्या तनख्यावर गुजराण केली पाहिजे. सभा भरविण्यास बंदी करण्यांत आल्यानें ती मोडण्याकडे लोकांची प्रवृत्ति झाली, पिनलकोडाच्या राजद्रोहाच्या कलमाच्या धिंगाण्यामुळें धाडसी लोक तो निर्माल्यवत् करण्यास तयार झाले. कायदेमंडळाची उपयुक्तता श्री. मिरजकरांना पटत नाहीं, याबद्दल खेद वाटतो. राजानें अधिकारी व लोकप्रतिनिधि यांची झुंज लावून देऊन मजा पहात आरामशीर बसावें व कधीं कधीं सदीसहामाशीं सल्ला देण्यासाठीं राजकारणाच्या प्राङ्गणांत उतरावें हेंच योग्य आहे.

खालसांतील राजकीय चळवळीची नक्कल संस्थानांत करणें योग्य नाहीं. संस्थानांत प्रजेला आठ आणे स्वराज्य मिळालें असून व बाकीचें आठ आणे स्वराज्य मिळविण्यासाठीं प्रजेनें धडपड केली पाहिजे. संस्थानचें उत्पन्न व इतर परिस्थितीचा साधकबाधक रीत्या विचार करून प्रजेनें आपलें धोरण ठेवलें पाहिजे. खालसाचें अनुकरण करून भागणार नाहीं. संस्थानाधिपतींच्या मानमरातबासाठीं व त्यांच्या इज्जतीसाठीं प्रजेनें योग्य पैसा

मंजूर केला पाहिजे. राजघराण्याच्याविरुद्ध अमद्र टीका करणें हें प्रजेस शोभणार नाहीं. करबंदीसारखी चळवळ हातीं न घेतां सलोखा व समेट यांस वाट ठेवून एक विवक्षित ध्येय साध्य करण्याच्या हेतूनें सत्याग्रहाची अनत्याचारी चळवळ करण्यास हरकत नाहीं. परिषदेनें दूरदृष्टि ठेवून योग्य तेवढेच ठराव पास करावेत व ब्रिटिश सरकारवर टीका करण्याचा मोह टाळावा. खालसांतील प्रजा तेथील सरकारचा समाचार घेण्यास भरभक्कम आहे. संस्थानी प्रजेवर संस्थानी हितसंबंधाची पुष्कळच जबाबदारी आहे व तिला खालसा मुलुखांत लुडबुडण्याचें कांहींच कारण नाहीं. सुदैवानें संस्थानांत जातिविषयक तंटे नाहींत व परिषदेमध्यें असले वाद न काढणें हेंच श्रेयस्कर होय. संस्थानिकांच्या मदतीशिवाय किती तरी गोष्टी करतां येणें शक्य आहे. संस्थानी प्रजेनें आत्मनिरीक्षण करून सामाजिक सुधारणा जर केल्या तर तिला अधिपतींवर सहज दाब टाकतां येईल. संस्थानी प्रजेनें विधायक कार्य करून अशी शक्ति उत्पन्न केली पाहिजे कीं तिचा प्रतिकार करणें संस्थानाधिपतींना अशक्य होऊन बसेल व मग संस्थानिकांना एकतर संस्थानचें सन्मान्य सेवक म्हणून राहिलें पाहिजे अगर लोकशाहीच्या वावटळींत कोठें तरी नाहींसें झालें पाहिजे! याशिवाय तिसरा मार्ग नाहीं.

—मिरज-सं० प्रजा परिषद् अध्यक्षीय भाषण, १९३१ मे



# उतारे-राजकारण

## आमचें स्थानिक स्वराज्य

एकंदर राज्यकारभाराच्या मानानें स्थानिक स्वराज्याचा कारभार लहान खरा. पण त्यावेंहि म्हणून एक प्रकारचें महत्त्व आहे हें विसरतां येत नाहीं. राजकीय सुधारणा-वाद्यानें आपलें अत्यंत श्रेष्ठ ध्येय मनांत धरून स्वराज्य मागितलें व तें त्याला मिळालें तरी, स्थानिक स्वराज्य हा त्यांतलाच एक भाग असणार यांत शंका नाहीं. स्वराज्याच्या कल्पनेचा किंवा मागणीचा केव्हांहि असा अर्थ नाहीं कीं, हिंदी लोकांस स्वराज्य मिळालें म्हणजे त्यांच्या शहरांच्या सफाईचीं-सुधराईचीं कामें कोणी परके येऊन करतील. ज्यां तुम्ही संपन्न झालां व स्वराज्याचीं सूत्रें तुमच्या हातीं आलीं म्हणजे, कित्येक श्रीमान् लोक ज्याप्रमाणें आपल्या गाड्या हांकण्यास युरोपियन कोचमन ठेवतात, त्याप्रमाणें, तुमच्या स्थानिक स्वराज्याचीं कामें करण्यास फार तर मोठमोठे युरोपियन नोकर ठेवून त्यांजकडून तुम्ही तीं कामें घ्याल. परंतु तीं कामें झालीं अगर न झालीं याविषयीं देखरेख करण्याची जबाबदारी सर्व तुमचीच राहील. गरीब मनुष्य आपल्या घरचा केर आपल्या हातानें काढतो; व श्रीमंताच्या घरीं केर काढण्यास नोकर असतात. पण गरीबाप्रमाणें श्रीमंताच्याहि घरचा केर 'निघावा' लागतो; व तो निघालेला नसला तर त्याबद्दल लोक नांवें ठेवतील, तीं नोकराला न ठेवतां यजमानालाच ठेवतील! स्वतंत्र देशांत झालें तरी स्थानिक स्वराज्याचें काम ज्या त्या गांवचे लोकच करतात, कोणी परके करीत नाहींत; व हिंदुस्थानांत-स्वराज्याचे श्रेष्ठ अधिकार नसणाऱ्या हिंदुस्थानांतहि-गांवचीं कामें गांवानेंच केलीं पाहिजेत हें उघड आहे. लोकांनीं हीं कामें अंगावाहेर टाकलीं तर तीं पडून राहतील असें नाहीं; कारण तीं झालींच पाहिजेत; आणि तुम्हीं न केलीं तर सरकार तीं आपल्या अधिकारी नोकरांकडून, अगर तुमच्यांतलेच दुसरे कोणी लोक आपल्या सत्तेनें नेमून त्यांजकडून, आपल्या अधिकाऱ्यांच्या नजरेखालीं करून घेईल. पण मग गांवच्या लोकांस त्यांत भूषण तें काय राहिलें! हल्लीं अहमदाबादच्या लोकांस अपात्र ठरवून सरकारानें अहमदाबादचेच कांहीं निवडक गृहस्थ म्युनिसिपालिटीवर नेमिले असून त्यांच्या हातून म्युनिसिपालिटीचें काम होत आहे, व हल्लीं तें बरें होत आहे असें गव्हर्नरसाहेबांनी परवां बोलूनहि दाखविलें. पण अहमदाबाद शहरच्या नागरिकांच्या-एकंदर जनतेच्या-दृष्टीनें यांत भूषणास्पद असा कोणता भाग आहे! सरकारानें आमच्यांतून निवडून नेमलेल्या माणसांस काम करतां येतें, पण तींच आमच्यांतली माणसें आम्हींच निवडून दिलीं तर त्यांच्या हातून मात्र तें होत नाहीं, यांत स्वाभिमानरोधक असें तत्त्व कोणतें आहे! निवड करणारे लोक तरी आपलें कर्तव्य नीट करीत नाहींत; किंवा लोकप्रतिनिधींना लोकांच्या दाबाखालीं व धाकाखालीं काम

करितां येत नसून, पर दाब ठेवणारा व धाक दाखविणारा अधिकारी युरोपियन असेल तर मात्र त्याच्या हातून काम पडतें असाच त्याचा अर्थ होत नाही काय ?

" स्थानिक स्वराज्याचें काम अशा रीतीनें प्राप्त व अनिर्वाह्य आहे, व तें झालेंच पाहिजे. पण आम्ही मागतों तें जोंपर्यंत आम्हांस मिळत नाहीं, तोंपर्यंत हें तरी करा. कशाला ?· जोंपर्यंत आम्हांस केवळ तादाखालच्या मोजप्रमाणें ठेवून तुपाचे गोळे सरकार व परकी लोक खाणार, तोंपर्यंत नुसती तादाखालचीं शितें वेंचून आम्हांस फायदा किंवा भूषण कोणतें ?. आम्हीं स्थानिक स्वराज्याचीं शितें सावडण्याच्या भरीस न पडतां जे तुपाचे गोळे खाणार त्यालाच सावडायला तीं कां ठेवूं नयेत ? त्यांत अप्रियता असेल तर ती सरकारच्या चोंडक्यावर पडविणें ही शिक्षा त्यांना योग्य अशीच आहे. बरें, स्थानिक स्वराज्य नीट करून दाखवून लोकप्रियता मिळण्यासारखी असली तरी ती ते खुशाल घेवोत ! सर्व मोठे अधिकार नेहमीं आपल्या हातीं बळकावून धरण्यानें सरकार जी राष्ट्रीय अप्रियता संपादन करितें ती या थोड्याशा लोकप्रियतेस ठीक भंजन आहे. आम्हांस तें कामहि नको, ती प्रियता नको, व ती अप्रियताहि नको. जोंपर्यंत खरे स्वराज्याचे अधिकार मिळत नाहीत तोंपर्यंत स्थानिक स्वराज्याचे अधिकार मिळून काय व न मिळून काय सारखेच ! बरें, जेव्हां ते अधिकार मिळतील तेव्हां हेहि त्याजबरोबरच आपोआप येतील; व मग ते जसे नीट करण्यास आम्ही पात्र ठरूं तसे हेहि बजावण्यास आम्ही पात्र ठरूच ठरूं. तोंपर्यंत आम्हांस त्या कामांत मुळीं पडावयाचेंच नाहीं. सरकार जाणे व तें स्थानिक स्वराज्य जाणे ! " असा तऱ्हेचा युक्तिवादहि दुसऱ्या बाजूनें करतां येण्याजोगा आहे. सरकाराशीं वाद घालीत घालीत जन्मचे जन्म जाऊन फलनिष्पत्ति कांहीं होत नाहीं, पालथ्या घागरीवर पाणी पडल्यासारखेंच तें होतें; व त्यामुळें सरकारांशीं स्थानिक स्वराज्याच्या कामांत जेवढें साहचर्य व सहकारित्व येतें, तेवढेंहि दुःसह वाटून मनुष्य निराशेनें वैतागून बोलूं लागला म्हणजे त्याला शोभेल अशाच प्रकारचा हा युक्तिवाद आहे यांत शंका नाहीं. पण अशा युक्तिवादानें स्थानिक स्वराज्याचें काम अंगाबाहेर टाकणारी माणसें राष्ट्रीय गुणांनींहि तशींच श्रेष्ठ व लोकोत्तर असावीं लागतात हें विसरतां कामा नये. वरील युक्तिवादांतील राग व वैराग्य हीं दोन्हीहि एकदम कबूल करावीं लागतात. पण, ज्यांना श्रेष्ठ व अंतिम राष्ट्रीय प्रश्नाशिवाय कांहीं सुचतच नाहीं, ज्यांचा अहर्निशमरचा व्यवसाय अशा प्रश्नासंबंधानेंच चालू आहे, ज्यांना जळीं स्थळीं काष्टीं पाषाणीं 'राष्ट्र'च दिसतें अशा लोकांनाच कदाचित् वरील युक्तिवादांतील सबबीचा फायदा मिळाला तर मिळेल; व अशांनीं स्थानिक स्वराज्यासारख्या 'क्षुद्र' बाबींत लक्ष न घातलें तर त्यांचें एक वेळ कौतुकहि करावेंसें वाटेल. आकाशांतील तारकांचे वेध घेणारा मनुष्य, त्याचें लक्ष पायाखालच्या डबक्याकडे न गेल्यानें त्यांत पडला तर त्याचेंहि हंसें झाल्याशिवाय राहणार नाहीं. पण डबक्यांत पडल्याबद्दल लोकांनी न हंसण्याची भय केलीच तर ती कदाचित् अशाच माणसाची एखादे वेळ होईल. कारण तो खगोलस्थ तारकांचे शोध तरी लावतो, व

अशा रीतीनें समाजावर खरे उपकार तरी करतो. ज्याला आकाश-समुद्राच्या खोलीचा खरा ठाव लागला त्यानें हवें तर एखाद्या सरोवराकडे पाहून तुच्छताबुद्धीनें हंसावें; पण ज्यांच्या अंगीं ती योग्यता नाहीं त्यांनीं सरोवरास तुच्छताबुद्धीनें हंसणें हें सरोवराच्या काल्पनिक तुच्छतेपेक्षां त्यांच्या स्वतःच्या विद्यमान क्षुद्रतेचेंच द्योतक अधिक होय यांत शंका नाहीं. मोठ्या स्वराज्याकरितां जन्म खर्ची घालणारांनीं स्थानिक स्वराज्याकडे पाहून नाक मुरडावें; तें त्यांना शोभेल. पण ज्यांच्या जिव्हेच्या वळवळीपेक्षां अधिक मौल्यवान् असें कांहींच स्वराज्याच्या पायीं खर्ची पडत नाहीं, ज्यांना स्वराज्याच्या कल्पनेइतकाच स्वतःचा देह तुळतुळीत ठेवण्याची हौस असते, त्यांनीं स्थानिक स्वराज्याची अवहेलना करण्यांत सारासारविचारशून्यतेच्या अपकीर्तीपेक्षां कांहीं एक अधिक मिळविलें असें म्हणतां येत नाहीं. मॅझिनी, डॉ. सन्यत्सेन—ज्यांनीं स्वराज्याच्या वेडांत देह किंवा व्यवहार कांहींच मानला नाहीं, अशा लोकांनीं स्थानिक स्वराज्याकडे दुर्लक्ष केल्यास तें त्यास माफ होईल. पण ज्यांचा सारा जन्म दुसऱ्याची नोकरी करण्यांत, व्याजबट्टा करून पैसे कमावण्यांत, किंवा वाङ्मयात्मक धंदा करून स्वार्थबुद्धीनें सोन्याच्या नाण्यांच्या चवडी बांधून ठेवण्यांत गेला, त्यांनीं मोठ्या स्वराज्याच्या भल्या मोठ्या गोष्टी सांगून स्थानिक स्वराज्यासारख्या लहान पण उपयुक्त गोष्टीकडे तिरस्कारबुद्धीनें स्वतः पहावें, अगर दुसऱ्यास सांगावें हें आश्चर्य नव्हे काय ?

मोठ्या गोष्टी बोलून धाकट्या गोष्टींकडे दुर्लक्ष करण्यास सांगण्यानें ऐकणाराची कांहीं थोडा वेळ चूकभूल होते खरी; परंतु ती फार वेळ टिकूं शकत नाहीं; यास दुहेरी कारणें आहेत. एक असें कीं, मोठ्या गोष्टी बोलणाऱ्या लहान मनुष्यास अहर्निश तेंच काम करितां येणें शक्य नसल्यानें व्यवहारांतल्या लहान गोष्टींची त्याची आवडनिवड लोकांनदर्शनास आल्याशिवाय राहत नाहीं. व्याकरण खाऊन पोट भरणेंहि खरोखर शक्य असतें तरी, चक्रपाणाचार्यानें वाढलेलें पंचपक्वान्नांचें ताट मागें लोटून पाणिनीची 'अष्टाध्यायी' पुढें ओढणें हें प्रत्येक पंडिताच्या हातून घडलेंच असतें किंवा काय याविषयीं शंका आहे. काव्यरसानें तृषा भागत नाहीं हें तर खरेंच; परंतु ती भागती तरी देखील शुद्ध गंगेचा तांब्या बाजूस सारून 'रस-गंगाधरा'चे प्यालेच प्रत्येक पंडित प्याला असतो असें व्यवहारावरून निर्विवादात्मक रीतीनें म्हणतां येत नाहीं व्यवहारांतल्या लहानसान गोष्टींवर मोठ्या मनुष्याचें मोठेपण, सोनें कसोटीवर घांसावें त्याप्रमाणें, घासलें जातें व या कसोटींत जें मोठेपण कसास उतरतें तेंच मोठेपण खरें हें उघड आहे. मनुष्याचे गुण व अवगुण हे कामाच्या लहानमोठेपणावर अवलंबून असत नाहीत, तर मनाच्या लहानमोठेपणावर अवलंबून असतात. काम लहानमोठें असल्यास त्या गुणाचे बाह्य दृश्य परिणाम लहानमोठे होतील हें सरळ आहे. पण गुणांची जात व किंमत तीच, बदलत नाहीं. जळत्या झोंपडींतून मुलास सुरक्षित बाहेर काढण्यासाठीं आंत शिरून आरलें प्राण धोक्यांत घालणारा भिकारी आणि परचक्रापासून प्रजेचा बचाव करण्याकरितां स्वतःचे प्राण व राज्यसुख यांजवर उदक सोडणारा सम्राट्—या दोघांच्या कृतीच्या परिणामांत बाह्य, दृश्य व मोजमापतां येण्यासारखें अंतर पुष्कळच

आहे; पण 'प्रेम' व 'स्वार्थत्याग' या गुणांच्या दृष्टीनें दोघांची किंमत सारखीच आहे. सराफकट्ट्यावरचा तिमाजी नाईक बाजार उठल्यावर केर गोळा करून फार तर दहापांच कवड्या जुळवील; तेंच समाराधनेच्या उष्ट्या पत्रावळीचा लिलांव करणारा, एखादा संस्थानिक आपल्या दक्षतेच्या कृत्यानें सहज शेंपन्नास रुपयेहि मिळवील. परंतु दोघांच्याहि अंगचे दुर्गुण वर्णन करावयाचे तर 'फाजील कृपणपणा' हा एकच शब्द त्यांस लावतां येतो व पुरतो. एखाद्या म्युनिसिपालिटीच्या कारभारांत लक्ष घालून एखादा मनुष्य फार तर हजारपांचशें रुपये वांचवून सार्वजनिक हित साधील; तेंच तो हिंदुस्थानसरकारचा फडणवीस असेल तर त्याच दक्षतेनें व मितव्ययबुद्धीनें दहापांच लक्ष रुपयांची बचत करूं शकेल. आतां ज्याला म्युनिसिपल प्रेसिडेंट होतां येतें त्याला हिंदुस्थानचा फडणीस होतां येत नाहीं हा हल्लींच्या सदोष व अपमानास्पद परिस्थितीचा एक परिणाम असेल. परंतु सार्वजनिक हित साधण्याच्या बुद्धीचा गुण ही तरी सर्वस्वीं स्वाधीनची गोष्ट आहे; व मनुष्याची किंमत होते ती त्याला पराधीन असणाऱ्या गोष्टींवरून लोक करीत नाहींत, तर त्याच्या स्वाधीन असणाऱ्या गोष्टींवरूनच करितात. मोठें स्वराज्य आपणास आज देत नाहींत ही सरकाराची चूक असेल. पण लहान स्वराज्य हातीं असलेलें आपण अव्हेरतों ही आपली चूक होय. ......

—केसरी, १९१२ फेब्रुवारी २०

## चला आतां शिपाई व्हा

लॉर्ड चेम्सफर्ड यांनीं ता० ७ फेब्रुवारी रोजच्या आपल्या भाषणांत हिंदी लोकांस लष्करी नोकरीचें दार उघडण्याचें जें जाहीर आश्वासन दिलें त्याला कायदेशीर स्वरूप देणारें बिल हवां दिल्ली येथील कायदेकौन्सिलांत प्रविष्ट होणार आहे. पण बिलाची वाट न पाहतां हिंदी पुढाऱ्यांनीं सभा भरवून व्हाइसरॉयसाहेबांचे आभार मानण्याला, आणि लष्करी नोकरींत शिरण्यास तयार होण्याबद्दल लोकांना उत्तेजन देण्याला आगाऊच सुरवात केली आहे. गेल्या एका आठवड्यांत सातारा, पुणें, मुंबई वगैरे ठिकाणीं झालेल्या सभांतून या बाबतींत लोकमत इतक्या स्पष्ट रीतीनें जाहीर झालें आहे कीं, लष्करी नोकरीचें द्वार आपण उघडणार खरें पण त्यांतून कोणी आंत येईल कीं नाहीं याविषयीं शंका घेण्याचें व्हाइसरॉयसाहेबांस बिलकुल कारण उरलें नाहीं. जी काय शंका उरलेली आहे ती लोकांना; व या सभांतून उच्चार झाल्याप्रमाणें, सरकार ब्रिटिश व हिंदी सैनिकांच्या बाबतींत समानतेचें धोरण ठेवतें कीं अजूनहि व याहि बाबतींत काळ्या-गोऱ्यांतील पंक्तिप्रपंचाचीच परंपरा चालवितें याबद्दल. सरकार आमच्याशीं कसेंहि वागलें तरी आम्ही सरकाराशीं कसें वागावयाचें हें आतां ठरून गेलेंच आहे. पण हल्लींसारख्या कठिण प्रसंगीं तरी पक्षपात व पंक्तिप्रपंच यांचें भूत सरकारास सोडतें किंवा पूर्वीसारख्याच चिकाटीनें तें त्यांस पछाडून बसतें हें पहाण्याविषयीं, म्हणजे त्यांच्या खऱ्या मनाची परीक्षा करण्याविषयीं, आमच्या मनाची उत्कंठा जात नाहीं हें आम्हांस प्रांजलपणानें कबूल केलें पाहिजे. पुढाऱ्यांनीं लोकांना बिनशर्त लष्करी नोकरींत शिरण्याचा उपदेश केला आहे हा त्यांचा थोरपण

झाली, व त्या उपदेशाप्रमाणें लोक विनशर्त लष्करी नोकरींत जातील तर तो लोकांचा थोरपणा होईल, पण सरकारच्या थोरपणाची परिक्षा होण्यासारख्या कित्येक 'शर्ती' नसल्या तरी स्पष्ट सूचना म्हणा किंवा विनंत्या म्हणा वरील सभांत मंजूर झालेल्या ठरावांतून ग्रथित झाल्या असून, त्यांजवरील भाषणांत ठरावापेक्षांहि त्यांच्यावर विशेष जोर देण्यांत आला होता. अर्थात् या विषयाची जितक्या नाजुक रीतीनें चर्चा होणें शक्य आहे, तितक्या नाजुक रीतीनें ती जबाबदार लोकाग्रणींनीं केली आहे. पण या नाजुकपणास शोभेल इतका नाजुकपणा उलट सरकारच्या कृतींत दिसून येतो कीं नाहीं, हें मात्र अद्यापि पहावयाचें आहे. व त्याची परीक्षा उद्यांच्या बिलावरील सरकारतर्फेच्या भाषणांत आपोआप होणारी आहे. या सूचनांत किंवा विनंत्यांत झालें तरी सरकारास कांहीं अलौकिक औदार्य दाखविण्यास आव्हान केलेलें नसून सामान्य न्यायबुद्धीलाच आव्हान केलेलें आहे. वरील सभांतून एकच गोष्ट सुचविण्यांत आली आहे. ती हीच कीं, "काळ्या लोकांना गोऱ्या लोकांसारखें वागवा; त्यांचे पगार त्यांच्या बढत्या व त्यांचा दर्जा गोऱ्या लोकांसारखा ठेवा; गोऱ्यांप्रमाणेंच काळ्यांनाहि लष्करी मानाच्या व अधिकाराच्या जागा द्या; हत्यारांचा कायदा ठेवणेंच असेल, सरकारास तो रद्द करवत नसेल तर काळ्यागोऱ्यांना तो सारखाच लागू होईल, अशी तरी कायद्यानें व्यवस्था करा." या मागण्या कोणीं केवळ अडवणुकीकरितां केलेल्या आहेत असें नाहीं. तर नेमस्तांतले नेमस्त, विचारवंतांतले विचारवंत, राजनिष्ठांतले राजनिष्ठ विश्वासुकांतले विश्वासु अशा सर सत्येंद्रप्रसन्न सिंहानीं, म्हणजे ज्यांना आज सरकारनें आपले प्रतिनिधि म्हणून विलायतेस साम्राज्याच्या युद्धपरिषदेस पाठविलें आहे, त्यांनीं १९१५ सालच्या राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष या नात्यानें आपली जबाबदारी ओळखून, व इतर राजकीय सुधारणांच्या बाबतींत हात आंखडल्यानें लोकांची अप्रीतिहि पतकरून, केलेल्या आहेत. अशा मागण्या जर सरकाराकडून दिल्या गेल्या नाहींत तर लोकांत नवीन असंतोष उत्पन्न झाल्यास, व कदाचित् लष्करी नोकरींत शिरण्याचें आमंत्रणहि त्यांनीं अवमानिल्यास, त्यांत दोष कोणाचा ?

वरील मागण्यांस इतकें महत्त्व आम्ही कां देतों याचा थोडासा खुलासा करणें जरूर आहे. लष्करी नोकरीचें दार आज सरकारनें हिंदी लोकांना खुलें केलें, याचा वास्तविक अर्थ काय आहे ? हा अर्थ सांगतांना कदाचित् स्पष्टोक्तीचा थोडासा दोष आम्हांस पतकरला पाहिजे हें आम्ही जाणून आहों. पण तो पतकरूनहि हा अर्थ एका वाक्यांत सांगावयाचा तर आम्ही असें म्हणूं कीं, सरकारचें आतां हिंदी लोकांच्या लष्करी मदतीशिवाय अगदीं अडलें आहे, म्हणून हें दार खुलें केलें जात आहे; यांत दुसरा तिसरा अर्थ कांहीं एक नाहीं. हा अर्थ समजून घेतांना फाजील राजनिष्ठेनें बुद्धीला येणारें मांद्य आपण दूर सारलें पाहिजे;: फाजील साम्राज्यप्रेमामुळें मनावर पडणारी भुरळ काढून टाकली पाहिजे; व फाजील गोडघालेपणानें येणारा जिभेवरील चिकटा झाडून टाकला पाहिजे. सरकारला आम्हांस जर खऱ्या मनानें व निःस्वार्थ बुद्धीनेंच आज पौरुषदान करा

वयाचें आहे असें म्हणावें तर त्यांना आज शंभर वर्षे कां थांबावें लागलें असतें? येवढेच नव्हे तर आम्हांस निःशस्त्र कां करावें लागलें असतें? पूर्वी आमच्यावर जर सरकारचा विश्वास बसण्यासारखा नव्हता, तर आज तो बसावा असें तरी पुण्य आम्हीं आज काय संपादन केलें आहे? १८५७ सालीं बंड झालें खरें, पण तें सर्वसामान्य प्रजेनें केलें कीं, सरकारच्या नोकरींतल्याच लष्करी शिपायांनीं? आणि हातांत हत्यार होतें येवढ्याच थोडया कारणाकरितां तेव्हां त्यांनीं बंड केलें असें म्हणावें तर, ज्या लोकांच्या हातीं सैनिक म्हणून हत्यारें पडलीं व त्यांना लष्करी शिक्षण मिळालें म्हणजे ते फिरून बंड करणार नाहींत याची तरी हमी राष्ट्रापासून त्यांनीं कोणती घेतली आहे? १८५७ सालीं लोक स्वराज्य तरी मागत नव्हते, आज ते स्वराज्यच मागूं लागले आहेत. म्हणजे बंडाला जो प्रबळ हेतु पूर्वी नव्हता तो कोणी वावदूक तसें म्हणणाराच भेटला तर आज नव्यानें उत्पन्न झाला आहे १८५७ सालीं जर्मन किंवा इतर परराष्ट्रीय शत्रूचा धाक तरी सरकारास नव्हता, आज पहावें तों सरकारच्या कडेकोट पहाऱ्यांतूनहि जर्मन हे हिंदुस्थानांत प्रवेश करितात, व माथेफिरु हिंदी तरुणांना गांठून त्यांच्या मनांत बेदिली उत्पन्न करून हातांत पैसा व हत्यारें बांधतात ही गोष्ट सरकारनें स्वतः आपल्या न्यायकोर्टांनीं शाबीत धरलेली म्हणून प्रसिद्ध केली आहे. तात्पर्य, आम्हांला निःशस्त्र करितांना जी स्थिति होती. तिच्यापेक्षां आजची स्थिति सरकारच्या दृष्टीनें अधिक चांगली नाहीं, वाईटच आहे. असें असतां सरकार आम्हांस सरोस सैन्यांत दाखल करूं इच्छितें, किंबहुना हें पौरुषदान आम्हो पदरांत खुषीनें घेतलें नाहीं तर सक्ती करून तें कदाचित् आमच्या गळ्यांत बांधण्याचा उपकार आमच्यावर करणार, याचा खरा अर्थ काय? तर त्याचा अर्थ, फिरून सांगावयाचा तर, हाच कीं, हिंदी लोकांच्या लष्करी मदतीखेरीज सरकारचा यापुढें निभाव लागणें कठिण आहे असें खुद्द सरकारचें सरकारास च वाटूं लागलें आहे. ही लोकोत्तर औदार्याची निपज नसून लष्कर-भरतीची गरज आहे. आज स्थितिच अशी आहे कीं, हिंदुस्थानांत गोरें लष्कर कायमचें ठेवून झालें, हिंदी सैन्यांत सरहद्दीपलीकडील म्हणजे परक्या काळया लोकांची जितकी खेंचून भरती करितां येईल तितकी करून झाली, हिंदुस्थानांतून काळें गोरें पगारी खडें सैन्य विलायतेस नेल्यामुळें तात्पुरत्या नोकरीचें गोरें टेरिटोरियल सैन्य हिंदुस्थानांत आणून झालें, हिंदुस्थानांतील गोऱ्या रहिवाश्यांस पूर्वी स्वयंसेवक व आज सक्तीचे शिपाई करून झालें, फार काय पण स्नेहाचे तह केलेल्या जपानसारख्या परराष्ट्राकडून तरी सैन्याची कुमक कितपत मिळेल याचा अंदाज पाहून झाला; तात्पर्य, खुद्द हिंदी प्रजेला आपल्या मातृभूमीचें संरक्षण करूं देण्याकरितां हातीं हत्यार व लष्करी शिक्षण देण्याशिवाय इतर, म्हणजे परक्या माडोत्री हत्यारबंद लोकांची मदत शक्य तितकी व शक्य त्या उपायांनीं घेण्याचे सर्व प्रयत्न होऊन चुकले, पण कांहीं केल्या लष्करभरतीच्या गरजेचा खळगा भरून येईचना! तेव्हां सरकारनें झालें तरी हिंदी लोकांशिवाय आतां दुसऱ्या कोणाकडे जावें? पूर्वी तपःसामर्थ्यानें मानसपुत्र निर्माण करितां येत असत, तसे आज सरकारास करतां

येते, किंवा शालिवाहन राजाच्या एका जुन्या दंतकथेंत सांगतात त्याप्रमाणें शेणामातीचीं गोऱ्या शिपायांचीं चित्रें करून त्यांच्या ठिकाणीं प्राणप्रतिष्ठा करतां येणें आज शक्य असतें, तर हत्यारांच्या घातक खेळापासून व युद्धाच्या दगदगीपासून आम्हांस आजवर दूर ठेवणाऱ्या अपत्यवत्सल इंग्रज सरकारनें असली नवी फौज निर्माण करण्यांत आपली सर्व पुण्याई खर्च केली असती, व नष्ट झालेली ही पुण्याई मिळविण्याकरितां फिरून शांततेच्या वेळीं तपश्चर्येस आरंभ केला असता. पण नास्तिकपणानें घेरलेल्या या विसाव्या शतकांत ही मंत्रसिद्धि कोणाच्या संग्रहीं असणार ? अर्थात् कोणत्याहि दृष्टीनें पाहिलें तरी हिंदी लोकांना खाकी पोषाख व हातांत हत्यार दिल्याशिवाय आतां गत्यंतर नाहीं असें दिसून आल्यामुळेंच केवळ लष्करी नोकरीचें दार खुलें होण्याचा योग आतां आला आहे. आम्ही पूर्वींचीं तींच माणसें आहों, आमची मातृभूमिहि पूर्वींची तीच आहे. आम्ही आज कांहीं दुसऱ्या एखाद्या राष्ट्रमातेच्या मांडीवर दत्तक गेलों नाहीं, किंवा आमच्या राष्ट्रपित्यानेंहि कांहीं दुसरें लग्न करून आम्हांला नवी राष्ट्रमाता मिळवून दिलेली नाहीं. आम्हांसारख्या सख्ख्या राष्ट्रपुत्रांनीं आमच्या सख्ख्या राष्ट्रमातेचें संरक्षण करण्याच्या कामीं सरकारनें आमचे जे हात बांधून टाकून आम्हांस आजवर लाचार करून ठेवलें होतें, ते हात आज कदाचित् सर्वन्यायी काळालाच त्याची लाज वाटून त्यानें सरकाराकडून सक्तीनें व प्राणसंकटाची भीति घालून सोडविले इतकाच अर्थ आम्हांस लष्करी नोकरीचें दार खुलें झालें याचा आहे.

पण झालें तें होऊन गेलें, त्याचा फिरून उच्चार करण्याची आमची इच्छा नाहीं. पण अजून झालें तरी सरकार न्यायबुद्धीनें वागणार किंवा आज आलेलें अभावित संकट कसें तरी टाळण्यापुरतें आम्हांस तात्पुरते सैनिक बनविणार ?, आम्हांला देऊं केलेली लष्करी नोकरी आमचें जन्मसिद्ध असें जें पौरुष तें अनुभविण्याकरितां देणार ? कीं स्वतःच्या कार्याकरितां बंदुका उडविणारीं हजारों लाखों जिवंत यंत्रें पैदा करण्याकरितां देणार ? याचें स्पष्ट उत्तर आम्हांला पाहिजे आहे. कारण आमचा लष्करी नोकरींत शिरण्याचा सर्व उत्साह या उत्तरावर अवलंबून आहे. आमच्या हातीं बंदूक देण्यास सरकार तयार झालें आहे व ती घेण्यास आम्हीहि तयार झालों आहों. पण स्वाभिमानी अशा स्थितींत आम्हांस घेतां आली तरच ती बंदूक, नाहीं तर तें केवळ बंदुकांच्या वजनाचें एक ओझें; याहून दुसरें कांहीं नाहीं असेंच आम्हांस वाटणार. ' अलिखित ' अशा इसापनीतींतील एका गोष्टीची आम्हांस या वेळीं आठवण होते. ती गोष्ट अशी. एका परटाच्या घरांत रात्रीं चोर शिरलें व त्यांनीं घरधन्यास पळवून लाविलें. हें पाहून तबेल्यांत बांधलेला एक गाढव आपल्या सोबत्यास म्हणजे दुसऱ्या गाढवास म्हणूं लागला, " भाऊ, चल आपण दावें तोडून मालकाच्या बरोबर पळून जाऊं. " तेव्हां दुसऱ्या गाढवानें पहिल्यास उत्तर केलें " दादा, तूं वाटेल तर जा. मी येत नाहीं. परधनी परागंदा होऊन त्याच्या जागीं उद्यां स्वतः चोर परधनी झाला तरी मला तो फार तर ओझेंच वाहावयास लावणार ! मला तो कापून खात नाहीं काम. जुना धनी ' माझा ' होता तरी मी त्याच्या ओझ्याचाच गाढव

होतों. झालें तर. ओझेंच वाहाण्याचें काम जर मला करावयाचें असेल तर मला घरधनी काय आणि चोर काय दोनीहि सारखेच." या गोष्टीतील तात्पर्य उघड आहे. केवळ लढण्याचीं यंत्रें या नात्यानेंच हिंदी लोकांचा उपयोग सरकारास करावयाचा असेल तर तें करो; तसें करण्यास तें समर्थ आहे. आज आम्ही खुषीनें सैन्यांत मिळून स्वतःचीं नांवें लष्करी पटांत नोंदवून न घेतलीं तर उद्यां सरकार एका घटकेंत सक्तीच्या लष्करी नोकरीचा कायदा करील व मग तरी आम्ही सैनिक होऊंच कीं नाहीं ? तात्पर्य, आम्ही राऊत होणारच, पण 'लढत राऊत' कीं 'रडत राऊत' एवढाच फरक ! व हा फरक सरकार जें धोरण स्वीकारील त्यावरच सर्वस्वीं अवलंबून राहील. 'तुम्हांस निःशस्त्र करणारा जर्मनी व निःशस्त्र करणारें इंग्लंड यांत तुमच्या बुद्धीला सरस-नीरस वाटण्यासारखें वास्तविक काय आहे ?' असें जर आम्हांस कोणीं विचारलें तर आमची राजनिष्ठा झाली तरी *आम्हांस काय उत्तर देण्यास शिकविणार ? "कांहीं झालें तरी आम्ही राजनिष्ठ आहों व रहाणार "* असलें उत्तर फार झालें तर आम्ही देऊं शकूं किंवा तें समर्पक न वाटल्यास मूग गिळून हातानें नुसता 'युनिअनजॅक' हलवीत गप्प बसूं; पण तेंच इंग्लंड आमच्या हातीं शस्त्र देणार येवढेंच नव्हेतर आमच्या स्वाभिमानास साजेल असेंहि वागविणार—म्हणजे आमच्यांत व गोऱ्या सैन्यांत पंक्तिप्रपंच करणार नाहीं. आम्हांस योग्यतेप्रमाणें लष्करी मानाच्या व अधिकाराच्या जागा देणार, आमच्या जातभाईंच्या वरिष्ठ हुकमतीखालीं पूर्वीच्या काळाप्रमाणें आजहि आम्हांस शिपाइगिरी करतां येणार, आम्हांस लष्करी शिक्षण देण्याकरितां ड्यूक ऑफ कॅनॉट यांच्या योजनेप्रमाणें कॉलेजें काढणार, युद्ध संपलें तरी आम्हांला व्हॉलंटियर होऊं देणार, आम्हांला गोऱ्या लोकांप्रमाणें हत्यारबंद राहण्याची परवानगी देणार व मातृभूमीवर केव्हांहि संकट आलें तरी तिच्या संरक्षणार्थ ताबडतोब दंड थोपटून उभें राहण्यास आम्हांला कायमचें पात्र करणार, अशी आमची खात्री पटेल तर आम्ही छोपेतूनहि असें सांगत उठूं कीं, *" हिंदी राष्ट्र आमचें आहे. तसेंच साम्राज्य व ब्रिटिश सरकार हेंहि आमचें आहे. आम्ही आपले प्राण वेंचूं, पण आमच्या सरकारच्या किंवा आमच्या साम्राज्याच्या केंसालाहि धक्का लावूं देणार नाहीं; शत्रूला यावयाचेंच तर आमच्या प्रेतांच्या ढिगांना तुडवून यावें लागेल. "* पण असले स्फूर्तिदायक शब्द आमच्या तोंडून वदविणें हें सर्वस्वी सरकारच्या हातीं आहे, दुर्दैवानें तें आमच्या नाहीं, एवढ्याचेंच मनापासून वाईट वाटतें. " तुम्ही स्वराज्य मिळवून स्वतः वरिष्ठ अधिकारी व्हाल तर तुमच्या हाताखालीं कोणता लेकाचा स्वाभिमानी इंग्रज सिव्हिलियन नोकरी करावयास मिळेल ? " असला असंबद्ध प्रश्न वावदूक अँग्लो इंडियन आम्हांला भेडसावण्याकरितां विचारतात. खुद्द प्रस्तुत लेखकालाच हा प्रश्न एकदां एका बड्या गोऱ्या अधिकाऱ्यानें विचारलेला होता. मग आम्हांला तरी उलट असें कां विचारतां येऊं नये कीं, " लष्करी वरिष्ठ मानाच्या व अधिकाराच्या जागांवर जर नेहमीं युरोपियनच राहणार तर तुमच्या तरी हाताखालीं कोणता लेकाचा स्वाभिमानी संभावित *हिंदी व्हॉलंटिअर हवेलदारी करावयास येईल ! सरकार पगार देईल, तोंपर्यंत आज सर-*

आहे असें जेव्हां सांगण्यांत येतें तेव्हां हें सांगणारा मनुष्य सर्व समाज डोळ्यांपुढें ठेवून बोलत असतो हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. हिंदुस्थानची लोकसंख्या तीस कोटि आहे, व केवळ स्वदेशी कपडाच घ्यावयाचा म्हटला तर तो तीस कोटि लोकांना पुरणार नाहीं असा त्याच्या मनांतला गर्भित हिशेब असतो. पण स्वदेशीचा उपदेश घेणारानें या हिशेबानें भिऊन जाऊं नये. त्यानें असें मनांत आणावें कीं, जर सर्व हिंदुस्थान मी निर्माण केलें नाहीं, तर मला तरी सर्व तीस कोटि लोकांशीं घेऊन काय करावयाचें आहे ? माझ्या पुरतें मी पाहीन. मला माझ्यापुरतें स्वदेशी कापड मिळेल कीं नाहीं ? तें मिळालें म्हणजे झालें !

एरवींच्या व्यवहारांत तरी आपण लोकांना कोणत्या गोष्टीचा किती पुरवठा होईल याची कितपत चौकशी करितों ? घरची चूल पेटविण्याकरितां लांकडी कोळसा खरेदी करण्याला आपण बाजारांत जातों तेव्हां हिंदुस्थानांतलीं जंगलें सर्व लोकांना कोळसे पुरविण्याइतकीं भरपूर आहेत कीं काय याचा हिशेब आपण करितों काय ? आपल्या एकाद्या लहानशा कारखान्याच्या लहानशा भट्टीला दगडी कोळसा खरेदी करावयाचा असतो तेव्हां तरी, जगांत दगडी कोळसा एकंदर किती आहे याचा विचार आपण थोडाच करतों ! जगाचा विचार करावयाचा तर याहि बाबतींत भीतीला सबळ कारण आहे. प्रो. जिव्हॉन्स यांनीं पन्नास वर्षांपूर्वीच कोळशाच्या पुरवठ्याचा प्रश्न उपस्थित केला असून त्यानंतर इंग्लंडांत अनेक वेळां रॉयल कमिशनें नेमून या प्रश्नाची चौकशी करण्यांत आली आहे. आणि या कमिशनांनीं असे अभिप्रायहि दिले आहेत कीं, हरघडीं दगडी कोळशाचा खप जर असाच चालू राहिला तर त्याची पैदास व खर्च यांचा मेळ न पडतां, आतां कोळसा मिळत नाहीं अशी स्थिति केव्हां तरी खास येईल ! पण कित्येकांची मजल याहिपलीकडे गेली आहे. त्यांना प्रत्यक्ष सूर्याच्या उष्णतेचाहि अविश्वास वाटूं लागलेला असून, अमुक इतक्या वर्षांनीं सूर्य हटकून विझून थंड पडेल असा हिशेब त्यांनीं करून ठेवला आहे ! पण सूर्याची उष्णता झाली तरी ती देखील केव्हां तरी संपणारच या भीतीनें आपल्यापुरतें अंगणांत धान्य पसरून उन्हांत वाळवून घेण्याचे कामीं कोणीं आपला हात आंखडता घेतला आहे असें आम्हांस तरी वाटत नाहीं.

लग्नकार्यांत कोणास घरीं सोन्यामोत्याचे चार दागिने करण्याची वेळ आली तर तो अर्थशास्त्राचे हिशेब कितपत लक्षांत आणतो ? दागिन्यावर खर्च करण्याचे पैसे व्याजीं लावले तर सालोसाल व्याज मिळेल, अर्थात् धनोत्पादन होईल. उलट दागिन्यांना क्वचित् चोरांची भीति असून निदान वापरामुळें नित्य झीज तरी हटकून ठेवलेलीच. म्हणजे दागिन्यांवर घातलेले पैसे एकदम नष्ट न झाले तरी हळूहळू नाश पावणारच, म्हणजे पैशाचा हा उपयोग अर्थशास्त्रदृष्ट्या विनाशक स्वरूपाचा ठरतो. म्हणून बायकामुलांच्या गळ्यांत सऱ्या हारांच्या घालण्याचें टाकून लहानमोठीं बँकबुकें किंवा सरकारी प्रॉमिसरी नोटा कोणी थोड्याच बांधतो ! पण असलल अर्थशास्त्राची दृष्टि म्हटली म्हणजे तिनें वास्तविक याहिपलीकडे जावें. कारण हिंदुस्थानच्या सर्व लोकांनीं स्वदेशी कापड वापरण्याचें

ठरविल्यास तो माल हातचा किंवा गिरणीचाहि पुरणार नाहीं ही भीति घालणें जितकें रास्त आहे, तितकेंच सोन्यामोत्यांचे दागिने करण्याच्या वेळीं जगांतील सोनें मोतीं कोणास किती कसें पुरेल याची भीति घालणेंहि रास्त होईल. हिंदुस्थानांत आज कोलार-च्या खाणींशिवाय इतर कोठें सोनें निघत नाहीं; तें अमेरिकेंत व ऑस्ट्रेलियांत पिकतें व तेथें झालें तरी नेहमीं जगाला हवें तितकें निघतेंच असें नाहीं; त्यांतूनहि उद्यां अमेरिकेशीं लढाई जुंपली तर हल्लींचा पुरवठाहि बंद पडणार. मोत्यांच्या बाबतींत तर बोलायासच नको. त्यांचें पीक धान्याच्या पिकाप्रमाणे वक्तशीर पाऊस पडण्यावरच अवलंबून असतें. धान्याच्या पिकाला निदान आरल्यापरल्या नक्षत्राचा तरी पाऊस चालतो, पण मोत्यांच्या पिकाला स्वाति नक्षत्राच्या पाण्याशिवाय दुसरें पाणी चालत नाहीं, आणि पाणी पडलें तरी त्याचें मोतीं बनविणारे शिंपले कांहीं थोड्या जागींच तयार होतात; तेव्हां एकंदरीनें हा विचार करण्यासारखाच प्रश्न आहे. असली शंका सराफकट्यावर गिऱ्हाइकानें किंवा सराफानें काढलेली कधीं कोणीं ऐकली आहे काय? मग सोन्यामोत्यांच्या दागिन्या-संबंधानें जर असली शंका येऊन व्यक्तीपुरती क्रिया थांबत नाहीं तर स्वदेशी कापड वापरण्याचें मनांत आल्यास ही शंका कां वाटूं लागावी? जी व्यापक किंवा परार्थशोधक बुद्धि कोणी सहसा एरवीं चालवीत नाहीं ती एकाद्या विशिष्ट कामांतच कोणी चालवूं लागला म्हणजे हटकून समजावें कीं, तें काम त्याला करावयाचें नाहीं. मग तें त्याला स्वतःला कर्तव्य नाहीं म्हणून, किंवा तें दुसऱ्यानें आरंभिलें याकरितां त्याला पाहवेना व हाणून पाडण्याची बुद्धि त्याला उत्पन्न झाली म्हणून; कसेंहि झालें तरी परिणाम एकच!

निवळ अर्थशास्त्रदृष्ट्या हिशेब कसेहि असोत; पण एक गोष्ट निश्चयात्मक सांगतां येते ती ही कीं, हिंदुस्थानांतले जितके लोक स्वदेशीबहिष्काराचें तत्त्व अनुसरण्यास तयार होतील तितक्यांना स्वदेशी कापडाचा पुरवठा होण्यास मुळींच अडचण पडणार नाहीं. हाच सिद्धांत दुसऱ्या रीतीनें मांडावयाचा तर असें म्हणतां येईल कीं, हिंदुस्थानांतील लोकांची स्वदेशीव्रत-ग्रहणाची मानसिक तयारी व त्यांना स्वदेशी कपडा मिळण्याची शक्यता या दोघांची केव्हांहि समगतीच राहील. याचें कारण अगदीं उघड आहे. आज म. गांधी यांनीं तोंडांतून उच्चार केल्याबरोबर हिंदुस्थानांतील तीस कोटि लोक एकदम स्वदेशीबहिष्काराचें व्रत अंगिकारण्यास तयार होतील असें थोडेंच आहे? त्यां-तूनहि जे तयार होतील त्यांनीं प्रारंभ तावडतोब केला तरी मतानुष्ठानाला पूर्णता येण्याला कांहीं काल सहजच लागेल. दोन महिन्यांत जी गोष्ट घडून यावयाची असें गांधी म्हण-तात तो या मानसिक तयारीची व मतानुष्ठानाच्या प्रारंभाचीच मुदत होय; पूर्णतेची नाहीं. या तयारीबरोबर प्रारंभ होण्याला मात्र फारशी अडचण नाहीं. कारण जुन्या परदेशी कापडाचा त्याग ही गोष्ट वाटेल तर ज्याची त्याला एका क्षणांत करितां येण्यासारखी आहे, व मतप्रारंभाला जितका स्वदेशी कपडा कोणास पाहिजे असेल तितका तो आजहि खचित मिळेल. स्वदेशी कपडा अंगावर घातल्याशिवाय आपण बाहेर पडणार नाहीं असा निश्चय जितके लोक करतील तितक्या सर्वांना तसें करण्याला ही प्रारंभाची दोन

महिन्यांची मुदत पुरे होईल व पुढेंहि ज्या मानानें मागणी वाढेल त्यॉ मानानें नवीन स्वदेशी कपड्यांची पैदास होण्याला फारशी अडचण पडणार नाही. पण मुख्य गोष्ट व्यक्तिशः प्रारंभ होण्याचीच आहे; व ती जोंपर्यंत होत नाही तोंपर्यंत हजारों लोकांनीं एकत्र जमून भाषणें होऊन ठराव मंजूर केले, तरी त्यापासून कांहींएक निष्पन्न व्हावयाचें नाही हें अगदीं निश्चित आहे. —केसरी, १९२१ ऑगस्ट ९

## स्वदेशी व सुशिक्षितांचें कर्तव्य

स्वदेशी–बहिष्काराचा प्रश्न प्रत्येक व्यक्तिमात्रानें आपापल्यापुरता सोडविण्याच्या मार्गाला लागावें; उगीच अर्थशास्त्राच्या तात्त्विक दृष्टीनें विचार चालवून, किंवा सर्व समाजाचें कसें होणार असा प्रश्न उपस्थित करून, डोक्यांत किडे पाडून घेऊं नयेत; या मार्गानें गेल्यास निदान व्यक्तिशः तरी हा प्रश्न सुटण्यास अडचण पडणार नाहीं असें आम्ही मागील लेखांत सांगितलेंच आहे. आणि आज त्याच मुद्द्याचा आणखी थोडा विचार, पण निराळ्या दृष्टीनें आम्हांस करावयाचा आहे. एखादा प्रश्न व्यक्तीपुरता सुटला म्हणजे तो सर्व समाजापुरताहि सुटलाच असें आम्ही हटवादानें म्हणूं इच्छीत नाहीं. अखेर परिणामीं सर्व समाजाचा प्रश्न सुटला तरच तो प्रश्न सुटला खरा हेंहि आम्ही जाणतों. तथापि सर्व समाजाचा प्रश्न झाला तरी तो सोडविण्याला व्यक्तीपासूनच प्रारंभ करावा लागतो. जो प्रश्न एका व्यक्तीपुरता सुटला तोच पुढें शंभरांकरितां सोडवावयाचा, तोच पुढें हजारांकरितां, व तोच पुढें लक्षांकरितां असें करीत करीत गेलें तरच अखेर सर्व समाजाचा प्रश्न सुटेल. एरवीं प्रारंभापासून घोळ घालून बसल्यानें सुटणार नाहीं, हेंहि ध्यानांत ठेविलें पाहिजे. दोन महिन्यांत स्वदेशी–बहिष्काराचा अंमल व्हावयाचा म्हणजे तीस कोटि लोकांपैकीं एकाहि व्यक्तीच्या अंगावर परदेशी कापड म्हणून उरणारच नाहीं अशी स्थिति प्राप्त होणें हा नव्हे, हें कोणीहि कबूल करील. आणि आपल्या प्रतिज्ञेच्या अभिमान बाळगणारे महात्मा गांधी हेहि, ३० सप्टेंबरअखेर परदेशी कापडा घातलेला एखादा हिंदी गृहस्थ दृष्टीस पडतांच आपण मिथ्याप्रतिज्ञ ठरलों असें म्हणून हिमालयांत खास पळून जाणार नाहींत ! परीक्षेंत पास किंवा नापास होण्यालाहि जशी कांहींएक गुणमर्यादा घातलेली असते, तशीच एखादी चळवळहि पास किंवा नापास होण्यास, म्हणजे यशस्वी ठरली अगर न ठरली असें मानण्यास, घातली पाहिजे. शेंकडा तेहतीस मार्क मिळाले म्हणजे विद्यार्थी प्रायः कोणतीहि परीक्षा पास होतो, शेंकडा पंचेचाळीस मिळाले म्हणजे दुसऱ्या वर्गांत येतो, शेंकडा साठ मार्क मिळाले म्हणजे तो पहिल्या वर्गांत येतो. राजकीय चळवळीच्या यशाची परीक्षा अशाच दर्जांनीं करावी लागते. स्वदेशी–बहिष्काराची चळवळ सावली किंवा फसली हें ठरवितांना तीस कोटि लोकसंख्येचा हिशोब करण्याचें कारण नाहीं. म्हणून प्रारंभ कसा व कोणी करावा हा प्रश्न महत्त्वाचा ठरतो.

कारण एक तर पुष्कळ लोक रानटी किंवा जंगली किंवा अगदीं रोडवळ किंवा

अगदी गरीब असल्यानें त्यांच्या साडेतीन हात देहाला साडेतीन हात वस्त्र लागत नाहीं व मिळतहि नाहीं. त्यांच्या अलीकडे येऊन पाहतां कोट्यवधि शेतकरी व कामकरी वगैरे लोक मिळाल्यास अंगभर कपडा वापरणारे असतात. पण ते या बाबतींत अत्यंत मितव्ययी, चालढकल करणारे व पुरवून खाणारे असतात. गरीब कुणब्याचें शरीर हेंच त्याचें कपड्यांचें कपाट. एकच सदरा व एकच धोतर हीं धुवून वाळवून वर्षभर वापरणारे लोक लक्षावधि किंबहुना कोट्यवधि सांपडतील. या लोकांच्या अंगावर आज निम्मा-शिम्मा विदेशी मांजरपाट आहे व स्वदेशीची चळवळ पूर्ण यशस्वी करावयाची तर यांच्याहि अंगावरचा परदेशी कपडा जाऊन तेथें स्वदेशी येईल अशी व्यवस्था झाली पाहिजे. पण परदेशी कपड्याविरुद्ध शहरांतून नाकेबंदी झाली म्हणजे खेड्यांतून ती आपोआपच होते. निराळा प्रयत्न करावा लागत नाहीं; शिवाय या बिचाऱ्यांना स्वदेशी व विदेशी यांतील भेदाचें ज्ञान नसल्यामुळें यांच्या हातून होणाऱ्या कृत्यांस गुन्हेगारी असें म्हणतां येत नाहीं. अर्थात् शहरांतून विदेशी कपडा थोडा उरला एवढ्याच गोष्टीनें "स्वदेशी-बहिष्काराची चळवळ साधली' या म्हणण्यास बाध येणार नाहीं. ही चळवळ साधल्याची किंवा फसल्याची खरी कसोटी सुशिक्षितांच्या आचरणांतच आहे; आणि सुशिक्षितांची किंवा पर्यायानें नगरवासी लोकांची संख्या थोडी असल्यामुळें स्वदेशी कापडाचा पुरवठा कसा होईल या चिंतेनें चळवळीचा विचार सोडून देण्याचें कारण उरणार नाहीं.

हातमागावर व गिरण्यांत मिळून तयार झालेला कपडा सर्व हिंदुस्थानच्या तीस कोटि लोकांना पुरेल किंवा नाहीं असला प्रश्न असमंजसपणाचा आहे. समंजसपणाचा प्रश्न म्हणजे हाच की, हें कापड प्रारंभीं सुशिक्षित व नगरवासी लोकांना पुरण्याइतकें आहे की नाहीं ! आणि तें पुरण्याइतकें आहे असें ठरेल तर पुरवठ्याचा प्रश्न सोडून देऊन भागणीच्या प्रश्नाकडे वळावें लागेल. यावर कोणी म्हणेल की, सुशिक्षित व नगरवासी लोक स्वदेशी कापड वापरणारे बनले तरी इतर समाज पुष्कळ असल्यामुळें परदेशी कापडाच खप होणारच; मग तुमचा बहिष्कार साधला कसा ? पण यावर उत्तर हेंच कीं, बहिष्काराची कसोटी विलायती व्यापाऱ्यांचा व्यापार किती घटला यापेक्षां, सुशिक्षित व नगरवासी हिंदी लोकांचें तोंड स्वदेशीकडे वळलें कीं नाहीं या प्रश्नाच्या उत्तरांतच आहे. बहिष्काराच्या यशाची किंमत परदेशी व्यापाऱ्यांच्या नुकसानीनेंच मोजावयाची नसून खरोखर सुशिक्षित व नगरवासी लोकांच्या देशाभिमानाच्या वाढीनेंच मोजावयाची आहे. बरें, बहिष्काराचा उपयोग सरकारच्या मनावर राजकीय परिणाम घडवून आणणें हाच होय असें मानलें, तरीहि हा परिणाम कसानें घडून येईल ? याहि प्रश्नाचें उत्तर हेंच कीं, तो परदेशी मालाच्या खपाच्या आंकड्यांनी नव्हे, तर उघांच्या मनांत थोडीबहुत राजकीय भावना येऊं शकते अशा लोकांच्या धोरणांत व मनःप्रवृत्तींत फरक पडल्यानेंच. हजारों कुणब्यांनी गांधीटोप्या घातलेल्या पाहून जी धडकी सरकारला बसणार नाहीं ती एक सरकारी नोकर किंवा एक कायदेकौन्सिलचा सभासद ती टोपी घालून गेल्यानें सरकारास

त्याजवर आक्षेप येऊं शकेल. उलट आक्षेप येऊं शकणार नाहीं. वरील विवेचनाचा मुद्दा इतकाच कीं, परदेशी कपडा न घेतला तर स्वदेशी कपड्यावर भागेल कीं नाहीं असा प्रश्न उत्पन्न झाल्यास त्याचें उत्तर आस्तिपक्षीं देण्यास कोणालाहि भिण्याचें कारण नाहीं. शिवाय हिशेबांत आम्हीं धरलेले सर्व साक्षर लोक एकदम एका दिवसांत बहिष्काराचा अंमल करण्याला तयार होतील असें नाहीं. याचाहि अर्थ हाच कीं, व्यक्तिशः जे तयार होतील त्यांना स्वदेशी कपडा मिळण्याला तितका वाव अधिकच झाला. एवंच हेंच सिद्ध होतें कीं, बहिष्काराला खरी अडचण असेल तर ती पुरवठ्याची नाहीं. तर बहिष्कार घालण्याच्या इच्छेची आहे. इच्छा कां नाहीं व ती कशी उत्पन्न होईल याचा विचार स्वतंत्र रीतीनें करतां येण्यासारखा आहे. पण इच्छा असतांहि पुरवठा कमी म्हणून ती सफल होऊं शकत नाहीं, असा खोटा युक्तिवाद जे करूं इच्छितात त्यांच्या करितांच मुख्यतः आमचें वरील हिशेबी उत्तर आहे.

आज वाण कशाची असेल तर ती इच्छेची आहे व ती एकदां उत्पन्न झाली म्हणजे मग संपूर्ण पुरवठ्याच्या बाबतींत आज जरी अडचणी असल्या तरी त्या हळूहळू निघून जातील. पुरवठ्याच्या मार्गांतील अर्थशास्त्रदृष्ट्या अडचणी म्हटल्या म्हणजे मागणी, उत्पादक द्रव्यें, मजूर व भांडवल. यांपैकीं मागणी इच्छाशक्तीनें वाढली असे गृहीत धेऊन चालल्यास बाकीचीं कारणें आज नडण्यासारखीं नाहींत. कारण हिंदुस्थानांतील लोकांना लागेल इतका कपडा तयार करण्याला जें भांडवल हवें तें हिंदुस्थानांत मिळूं शकेल, याची कोणासहि आज शंका नाहीं. मजुरांचा पुरवठा हिंदुस्थानांत वाटेल तेवढा आहे. कापसाविषयीं म्हणाल तर हिंदुस्थान हें त्याचें माहेरघरचआहे. राहतां राहिला प्रश्न यंत्रसामुग्रीचा. हा प्रश्न वरच्याइतका सोपा आहे, असा बहाणा आम्ही करूं इच्छीत नाहीं. परदेशाहून यंत्रसामुग्री मागणें, ती येऊन हातांत पडणें, ती गिरण्यांतून उभारणें व तिजपासून माल तयार होऊं लागणें या गोष्टी एकदम होऊं शकत नाहींत. त्यांना थोडा काळ लागतो हें कोणासहि कबूल करावें लागेल. पण महात्मा गांधी यांनीं सुरू केलेली चरख्यांची व खादीची मोहीम बरोबर याच मुद्द्यावर, कायमची नसेल पण सुतें तरी, उपयोगीं पडण्यासारखी आहे. कारण हातानें सूत काढणें व हातानें तें विणणें यांतहि यंत्रसामुग्री लागली तरी ती फार थोडी लागते; व ती इतक्या साध्या प्रकारची असते कीं, ती हिंदुस्थानांतहि वाटेल तितकी तयार होऊं शकेल. हिंदुस्थानांत एकहि गिरणी नव्हती त्या वेळीं हिंदी लोकांना पुरून उरलेल्या हातविणकरीचा कपडा परदेशाला पाठविण्यांत येत होता, व त्याच्या मोबदला मिळणाऱ्या किंमतीनें हिंदुस्थान सधन होत असल्याचें सांगण्यांत येत होतें. या एकाच गोष्टीवरून सर्व तात्विक आक्षेपांचा डोलारा कोसळलाच पाहिजे. जुनीं साधनें आजहि शिल्लक आहेत तर जुन्या काळीं होणारा स्वदेशी कपड्यांचा पुरवठा आजहि कां न व्हावा ? पुरवठा होईल पण कपडा ' आवडणार ' नाहीं असें म्हणणें असेल तर गोष्ट वेगळी. तो मुद्दा ' इच्छा नाहीं ' या सदराखालींच येईल व त्याचा विचार अर्थात वेगळा आहे.

बसेल. याचें कारण हेंच कीं, विदेशी कपड्याचा त्याग करण्याचे कामीं सुशिक्षित लोकच खरोखर खळखळ करितात, बिचाऱ्या अज्ञ लोकांना कांहींहि चालतें हें सरकारास माहीत आहे. ज्या खाडीच्या मार्गानें ओहोटीच्या वेळीं स्वदेशी कारागिरीचें पाणी ओसरलें त्याच खाडीच्या मार्गानें भरतीच्या वेळीं तें फिरून भरावयाचें तर भरेल. परदेशी मालाला देशांत थारा देण्याला सुशिक्षित नगरवासी पांढरपेशे लोकच मूळ कारणीभूत झाले, व त्यांनीं स्वदेशीचा घात केला. आतां हा प्रकार उलटावयाचा तर सुशिक्षितांनीं व नगरवासी पांढरपेशा लोकांनींच प्रारंभ केला पाहिजे. एतावता बहिष्काराच्या यशाची गुरुकिल्ली या मूठभर लोकांत असल्यामुळें स्वदेशी कपड्याच्या पुरवठ्याचा प्रश्नहि या मूठभर लोकांकरितांच प्रथम केला पाहिजे. स्वदेशी–बहिष्कारांतील श्रेयस्, प्रेयस् व शक्य या तीनहि गोष्टींचीं तोंडें सुशिक्षित वर्गातच येऊन मिळतात. या चळवळीला प्रारंभ सुशिक्षित वर्गातच झाला पाहिजे, व तिच्या यशापयशाची जबाबदारीहि त्याच्यावरच अवलंबून राहील !

सुशिक्षित हा लहान वर्ग न घेतां त्याहून मोठा जो साक्षरवर्ग त्या लोकांपुरता स्वदेशीबहिष्काराचा विचार केला असतांहि हिंदुस्थानांत तयार होणाऱ्या कपड्याचा पुरवठा कसा पुरा पडूं शकतो तें पाहा. हिंदुस्थानांत सुमारें **दीडशें कोटि वार कापड गेल्या सालीं तयार झालें** असा अंदाज आहे. हिंदुस्थानांतील साक्षर लोकांची संख्या सुमारें **दोन कोटी** आहे असें आपण धरूं. अर्थात् साक्षर लोकांनीं केवळ स्वदेशांत तयार होणाराच कपडा वापरावयाचा, इतर वापरावयाचा नाहीं, असा निश्चय केला तर सरासरीच्या मानानें प्रत्येकाच्या वांट्याला सालिना पाऊणशें वार कपडा येऊं शकेल. आतां देशी विदेशी दोनहि प्रकारचा कापडा हिंदुस्थानांत गतवर्षी किती खपला हें पाहिलें तर असें दिसून येतें कीं, बत्तीस कोटि लोकसंख्येचें काम दोनशें अठ्ठयायशीं कोटि वार कापडानें भागलें, म्हणजे सरासरीच्या मानानें दरमाणशीं अवघा साडेनऊ वार कपडा लागला. या मानानें पाहतां केवळ साक्षर लोकांनीं नुसता स्वदेशी कपडा वापरावयाचा असें म्हटलें तर प्रत्येकाच्या वांट्याला वरील सरासरीच्या मानापेक्षां आठपट अधिक कपडा येईल; व हा पाऊणशें वार कपडा, सरासरीच्या मानानें, दर साक्षर माणशीं पुरण्यासारखाहि आहे. उदाहरणार्थ, दरमाणशीं धोतरें किंवा विजारी यांना तीस वार, अंगांत घालण्याचे कपडे करण्याला सत्तावीस वार, चादरी, शेले वगैरे आठ वार, व इतर पांच वार मिळून सत्तर वार असा हिशेब केल्यास त्यांत अव्यवहार्य असें कांहीं नाहीं.

यावर कोणी असें म्हणेल कीं, कांहीं लोकांना इतका कपडा पुरणार नाहीं; तर त्याचें उत्तर हेंच कीं, इतर कित्येकांना इतका कपडा लागणार नाहीं ! साक्षरांच्या या सरासरीच्या हिशेबांत उधळे व चैनी सुशिक्षित लोक धरले आहेत, तसेच पांचपंचवीस वारांत ज्यांचें सालाचें काम भागूं शकेल अशीं लहान मुलें, आणि अधिक कपडा लागला तरी पैशाच्या अभावीं तो ज्यांना घेतां येत नाहीं असे गरीब लोकहि वरील संख्येंत येतात. मिळून पटी बसण्यासारखीच आहे. कदाचित् हा हिशेब ढोबळ आहे असाव-

त्याजवर आक्षेप येऊं शकेल. उलट आक्षेप येऊं शकणार नाहीं. वरील विवेचनाचा मुद्दा इतकाच कीं, परदेशी कपडा न घेतला तर स्वदेशी कपड्यावर भागेल कीं नाहीं असा प्रश्न उत्पन्न झाल्यास त्याचें उत्तर अस्तिपक्षीं देण्यास कोणालाहि भिण्याचें कारण नाहीं. शिवाय हिशेबांत आम्हीं धरलेले सर्व साक्षर लोक एकदम एका दिवसांत बहिष्काराचा अंमल करण्याला तयार होतील असें नाहीं. याचाहि अर्थ हाच कीं, व्यक्तिशः जे तयार होतील त्यांना स्वदेशी कपडा मिळण्याला तितका वाव अधिकच झाला. एवंच हेंच सिद्ध होतें कीं, बहिष्काराला खरी अडचण असेल तर ती पुरवठ्याची नाहीं. तर बहिष्कार घालण्याच्या इच्छेची आहे. इच्छा कां नाहीं व ती कशी उत्पन्न होईल याचा विचार स्वतंत्र रीतीनें करतां येण्याप्रमाणें आहे. पण इच्छा असताहि पुरवठा कमी म्हणून ती सफल होऊं शकत नाहीं, असा खोटा युक्तिवाद जे करूं इच्छितात त्यांच्या करितांच मुख्यतः आमचें वरील हिशेबी उत्तर आहे.

आज वाण कशाची असेल तर ती इच्छेची आहे व ती एकदां उत्पन्न झाली म्हणजे मग संपूर्ण पुरवठ्याच्या बाबतींत आज जरी अडचणी असल्या तरी त्या हळूहळू निघून जातील. पुरवठ्याच्या मार्गांतील अर्थशास्त्रदृष्ट्या अडचणी म्हटल्या म्हणजे मागणी, उत्पादक द्रव्यें, मजूर व भांडवल. यांपैकीं मागणी इच्छाशक्तीनें वाढली असें गृहीत घेऊन चालल्यास बाकीचीं कारणें आज नडण्यासारखीं नाहीत. कारण हिंदुस्थानांतील लोकांना लागेल इतका कपडा तयार करण्याला जें भांडवल हवें तें हिंदुस्थानांत मिळूं शकेल, याची कोणासहि आज शंका नाहीं. मजुरांचा पुरवठा हिंदुस्थानांत वाटेल तेवढा आहे. कापसाविषयीं म्हणाल तर हिंदुस्थान हें त्याचें माहेरघरच आहे. राहतां राहिला प्रश्न यंत्रसामुग्रीचा. हा प्रश्न वरच्याइतका सोपा आहे, असा बहाणा आम्ही करूं इच्छीत नाहीं. परदेशाहून यंत्रसामुग्री मागणें, ती येऊन हातांत पडणें, ती गिरण्यांतून उभारणें व तिजपासून माल तयार होऊं लागणें या गोष्टी एकदम होऊं शकत नाहींत. त्यांना थोडा काळ लागतो हें कोणासहि कबूल करावें लागेल. पण महात्मा गांधी यांनीं सुरू केलेली चरक्यांची व खादीची मोहीम बरोबर याच मुद्द्यावर, कायमची नसेल पण तूर्त तरी, उपयोगीं पडण्यासारखी आहे. कारण हातानें सूत काढणें व हातानें तें विणणें यांतहि यंत्रसामुग्री लागली तरी ती फार थोडी लागते; व ती इतक्या साध्या प्रकारची असते कीं, ती हिंदुस्थानांतहि वाटेल तितकी तयार होऊं शकेल. हिंदुस्थानांत एकहि गिरणी नव्हती त्या वेळीं हिंदी लोकांना पुरून उरलेल्या हातविणकरीचा कपडा परदेशाला पाठवण्यांत येत होता, व त्याच्या मोबदला मिळणाऱ्या किंमतीनें हिंदुस्थान सधन होत असल्याचें सांगण्यांत येत होतें. या एकाच गोष्टीवरून सर्व तात्त्विक आक्षेपांचा डोलारा कोसळलाच पाहिजे. जुनी साधनें आजहि शिल्लक आहेत तर जुन्या काळीं होणारा स्वदेशी कपड्यांचा पुरवठा आजहि कां न व्हावा ? पुरवठा होईल पण कपडा 'भवडणार' नाहीं असें म्हणणें असेल तर गोष्ट वेगळी. तो मुद्दा 'इच्छा नाहीं' या सदराखालींच येईल व त्याचा विचार अर्थात वेगळा आहे.

दुसरा एक आक्षेप आहे तो किंमतीसंबंधाचा. तो असा की, "स्वदेशी कपडा वापरण्याची आम्हांला इच्छा आहे; पण त्याला किंमत फार पडते आणि आम्हांपासून विनाकारण भारी किंमत घेऊन स्वतः व्यापारी मात्र गबर होतात व चैन करितात." यांतील शेवटच्या आक्षेपास प्रथम उत्तर देऊं. तें असें की, गिऱ्हाइकानें स्वदेशी कपडयाची किंमत आपल्याला परवडते की नाहीं एवढेंच प्रस्तुतसारख्या प्रसंगीं पाहावें. किंमत परवडलीच नाहीं, ती देण्याला सामर्थ्यच खरोखर नसलें, तर अर्थात् बोलणेंच खुंटलें. गांठीं पैसाच नाहीं तर मनांत स्वदेशीचें प्रेम वाटेल तेवढें असून तरी काय उपयोग ? पण आपल्याला जरूर तेवढा स्वदेशी कपडा विकत घेण्याला जर पैसा असेल तर गिरणीवाले लोक श्रीमंत होतात व मोटारी उडवितात या विचारानें आपलें पित्त कां खवळावें ? गिरणीवाल्यांनीं किंवा व्यापाऱ्यांनीं स्वदेशीच्या लाटेचा अनुचित फायदा घेऊं नये व पैसा मिळाला तर त्याचा उपयोग स्वतःच्या चैनीकडे न करितां गिऱ्हाइकांना अधिक स्वस्त माल देण्याकडेच करावा हें ठीक आहे. पण ते आपल्या कर्तव्याला न जागले म्हणून त्यांच्यावर रुसल्यानें आपल्याला काय फायदा होणार ? त्यांना अपशकुन करण्याकरितां आम्ही आपलें नाक कापून घ्यावें की काय ? बरें, आमच्या पैशानें व्यापारी व गिरणीवाले श्रीमंत झाले तरी ते आमचेच आहेत. त्यांच्या श्रीमंतीचा झिरपा आपल्याच देशाला अनेक प्रकारांनीं नेहमीं मिळत राहणार, व महात्मा गांधींच्या एक कोटि रुपये वर्गणी या प्रसंगीं घडून आलें त्याप्रमाणें, या श्रीमंतीच्या तळ्याचा एखादद्दुसऱ्या ठिकाणीं बांध फोडून नुसता झिरपाच नव्हे तर पाण्याचे प्रचंड प्रवाहहि, राष्ट्रकार्याला मिळूं शकतात.

बरें, स्वदेशी कापडाची किंमत बेसुमार वाढली तरी किती वाढते याचाहि विचार करावयास नको काय ? हिंदुस्थानांत अर्धी लोकरीचें किंवा रेशमाचें कापड फारसें तयार होऊं शकत नाहीं हाच मुळीं किंमतीच्या वाढीला पहिला जबरदस्त व नैसर्गिक प्रतिबंध आहे. आपल्या इकडे येऊनजाऊन सुती कापड निघणार व सुती कापड जास्तींत जास्त महाग झालें तर किती होईल ? धोतरजोडे वगैरेंच्या किंमती दीडपट व दुप्पट येथपर्यंत मध्यंतरीं वाढल्या होत्या हें आम्हांस माहीत आहे. पण मोठे सबंध धोतरजोडे वापरणारे लोक फारच कमी, व गिरणीच्या सुती कपड्याच्या किंमती वाढल्या तरी परदेशी लोकरी, रेशमी वगैरे कपड्यांवर होणाऱ्या ऐनखर्चाच्या मानानें व्यक्तिशः हा वाढवा फार कमी वाटेल. मागणीची चलबिचल झाल्यानें किंमती वाढल्या तरी त्यांना चढाओढ हें एक प्रतिबंधक कारण असतेंच. पण केवळ चैनीच्या गणलेल्या पदार्थांच्या किंमतींत जितका फरक पडतो तितका अन्नवस्त्रासारख्या अगदीं आवश्यक असलेल्या पदार्थांच्या किंमतींत पडत नाहीं हें अर्थशास्त्राचें एक ठराविक तत्त्व आहे. व या तत्त्वाचा फायदा घ्यावयाचा तर ज्यांना चैनीच्या म्हणतां येतील अशा, म्हणजे परदेशी लोकरीचे कपडयासारख्यादि, वस्तूंवर बहिष्कार घालून जेवढ्या निवळ गरजेच्या म्हणून वस्तु व त्याहि शक्य तितक्या स्वदेशीच वापरण्याचा सुशिक्षित लोकांनी निश्चय केल्यास त्यांनाहि किंमतीची वाढ फारशी बाधणार नाहीं हें उघड आहे. राहतां राहिला प्रश्न आवडीचा, चैनीचा व रूढीचा ऊर्फ फॅशनचा; पण त्याचा विचार पुढील लेखांत करूं. —केसरी, १९२१ आगष्ट १६

## पोपाख-पेहराव व स्वदेशी

स्वदेशी व बहिष्कार हा सुशिक्षित लोकांच्या गळीं न उतरण्याचें एक कारण 'फॅशन' किंवा पोषाखाची रूढि हें असल्याचें, या विषयावरील मागील लेखांत, आम्हीं उल्लेखिलें होतें. त्याच मुद्द्याचें प्रसंगोपात्त थोडेंसें विवेचन करण्याचें आज योजिलें आहे. कोणत्याहि पोषाख-पेहरावाचे मुख्य दोन हेतु असतात. एक शरीरसुख किंवा सोय, व दुसरी शोभा. पण त्यांतल्या त्यांत सुखसोयीपेक्षांहि शोभेचा हेतुच प्रायः अधिक प्रभावी ठरतो. कोणत्याहि प्रांतांतला आजचा पोषाख घेतला तर तो सुखसोयीच्या दृष्टीनें एखाद्या उपपत्तीबरहुकूम सप्रमाण बनविलेला आहे असें सहसा आढळणार नाहीं; तर केवळ लोकरूढि किंवा शिष्टसंकेत, व या उभयतांची गतानुगतिक परंपरा, यांना अनुसरून त्याची बनावट झालली आहे असेंच आढळून येईल. पोषाखाची सुखसोय म्हणजे उष्णता व थंडी यांपासून शरीराचें संरक्षण करणें, व मनुष्याला जो कोणता धंदा करावयाचा असेल तर तो करण्याला व्यत्यय न होणें. हें लक्षण गृहीत धेतलें तर निरनिराळ्या प्रांतांत आज जे निरनिराळे पोषाख प्रचलित आहेत, त्या सर्वांची समर्पक मीमांसा हाऊं शकत नाहीं किंवा समर्थनहि करतां येत नाहीं. तसें असतें तर थंड प्रदेशांत थंडीच्या वेळीं बूट-पाटलोणी व लोकरीचे कपडे, पण तेथेंच उन्हाळ्याच्या वेळीं वारा आंतबाहेर खुला खेळणारी तलम धोतरें व मलमलीचे सदरे असा दुरंगी पोषाख प्रचलित असावयास पाहिजे. पण कोणत्याहि प्रांतांत पट्टा, बूट पाटलोण व बनातीचे लांबआखूड कोट हा पोशाख सुशिक्षित लोकांमध्यें श्रेष्ठ मान मिळवून बसलेला आढळेल. बनातीच्या कपड्यांचें वर्चस्व बूट पाटलोणीइतकें नसलें तरी त्याच्या खालोखाल खास आहे. या गोष्टींचें समर्थन उपपत्तिदृष्ट्या कसें होणार ?

पोषाखाच्या विपरीतत्वाचा कडेलोट मुंबईइतका इतरत्र क्वचितच पहावयास सांपडेल. जेथें वर्षांतून निदान दहा महिने तरी उकाडा बेसुमार असतो, व पंख्याशिवाय जीवित दुःसह होतें, तेथें बूट पाटलोण व कोट घातल्याशिवाय वावरणारा,सुशिक्षित किंवा शिष्ट असा मनुष्य क्वचित्च आढळेल ! याचें कारण युरोपिअन लोकांचा सहवास व त्यांच्या चालीरीतींचें वर्चस्व हेंच होय. पण हें अनुकरण एवढ्यावरच थांबत नाहीं. ज्या दास्यबुद्धीमुळें बूट, पाटलोण व कोट अंगावर चढतात, तिच्याच योगानें कपडा देखील युरोपिअन लोक घालतात त्या आकाराचा नव्हे तर त्याच रंगरूपाचा व त्याच मूलद्रव्याचा असावा अशीहि इच्छा सहजच होऊं लागते. युरोपिअन लोक हे स्वतःच्या चालीरीतींना चिकटून बसणारे असल्यामुळें विलायतेच्या थंड हवेंत जसे लोकरीचे कपडे ते वापरतात, तसेच ते इकडल्या उष्ण हवेंतहि वापरीत असल्यामुळें, हा उपदार लोकरी कपडाच, मुंबईतील उष्ण वाफेनें भिजून निघालेल्या, शिष्ट लोकांच्याहि मानगुटीस बसतो. जी गोष्ट मुंबईस घडली तीच क्रमाक्रमानें बाहेरगांवींहि घडून आली. कारण रूढि पाडण्याचा अधिकार युरोपिअन लोकांच्या हातीं गेला, व इलाख्यांत असा एकहि भाग नाहीं कीं, जेथें त्यांचा रूढि पाडण्याचा हा अधिकार मानला जात नाहीं.

अशा कारणपरंपरेनें विलायती कपडा सुशिक्षित लोकांत एकदां जो रूढ होऊन बसला तो बसलाच. विलायती कपडा अशिक्षित खेडवळ लोकांच्याहि अंगावर चढलेला आहे, पण तो वरील कारणांकरितां मात्र नव्हे. गरीबांच्या अंगावरचा विलायती कपडा मांजरपाटासारखा स्वस्त व ओबडधोबड असतो. तो इतका कीं, हिंदुस्थानांत आलेला किंवा विलायतेंत असलेला एकहि गोरा अदमी तसला कपडा अंगावर कधींच घालीत नाहीं. अर्थात् या ठिकाणीं इंग्रजांचें राजकीय वर्चस्व कारणीभूत नसून औद्योगिक वर्चस्व आहे. शिवाय अशिक्षित किंवा खेडवळ लोक अद्यापि बूट, पाटलोण किंवा लोंकरीचा कपडा वापरूं लागले नसल्यानें रूढिच्छेदमूलक स्वदेशी-बहिष्कार हा त्यांना उपदेशण्याचें आज कारण नाहीं. तो उपदेश फक्त सुशिक्षितांनाच पाहिजे आहे.

वास्तविक सुशिक्षित लोकांनीं आपल्या शिक्षणामुळें सुख व सोयी यांकडे नजर देऊनच आपला पोषाख कायम करावयास पाहिजे होता असें कोणीहि म्हणेल, परंतु वर दर्शविल्याप्रमाणें मनोदास्य व अनुकरणबुद्धि हीच सुशिक्षितांमध्यें प्रभावी ठरली. एरवीं, निदान महाराष्ट्रापुरतें बोलावयाचें तर, निःशंकपणानें असें म्हणतां येईल कीं, बूट व पाटलोण हीं दोनहि या प्रांतांत अस्थानीं होत. तीच गोष्ट लोंकरीच्या कापडाची. ईश्वरकृपेनें महाराष्ट्राची हवा इतकी समधात, समशीतोष्ण व सर्वकाल सुखावह आहे कीं, केवळ कापसाच्या एखादुसऱ्या जाडयाभरडया वस्त्रावर पोषाखाचें काम बारमहा निर्भू शकतें. यापेक्षां जो अधिक कपडा वापरला जातो त्याला केवल रूढिच जबाबदार होय. पण अजूनहि महाराष्ट्रीयांनीं मनांत आणल्यास स्वदेशीबहिष्काराला अनुकूल अशा रीतीनें ही रूढि बदलतां येणें अगदीं शक्य आहे. मात्र मनाचा निश्चय हवा. पोषाख-पेहराव यांमध्यें असलेली शोभा ही केवळ एक प्रकारच्या संकेतामुळें उत्पन्न होते; व हा संकेत भाषापद्धतीच्या संकेताप्रमाणें चल असून स्थानभेद व कालभेद यांनीं तो बदलूं शकतो, ही गोष्ट निरनिराळया उदाहरणांवरून सिद्ध करितां येईल. कसें तें पहा.—पोषाख-पेहराव ही एक सामाजिक बाब असली तरी अमक्या समाजाचा पोषाख-पेहराव अमुक एक प्रकारचाच असावा असा त्रिकालाबाधित नियम नाहीं. आजच्या घटकेला हिंदु व मुसलमान यांचा पोषाख वेगवेगळा, व हिंदूंतल्या हिंदूंतहि महाराष्ट्रीयांचा वेगळा, असा भेद दाखवितां येतोच. पण शिवाय सर्व हिंदु किंवा त्यांतले महाराष्ट्रीय यांचा पोषाख अनादिकालापासून एकाच प्रकारचा नव्हता इतकेंच नव्हे, तर प्रत्येक पिढीला त्यांत थोडथोडा फरक पडत गेला हें कोणत्याहि दोनतीन पिढ्यांतील पोषाखांची तुलना करून पाहतां उघड दिसून येतें.

भारतकालीन आर्य लोक उत्तरहिंदुस्थानांत अतिशय थंडीच्या मुलखांत राहात असतां ते धोतरें नेसत असत; त्यावरून पाहतां दक्षिणेच्या समशीतोष्ण मुलखांतील शिष्ट लोकांनीं आजतागायत धोतरांचाच पोषाख ठेविला व विजारी या परकीय मानल्या तर त्यांत आश्चर्य नाहीं.......लहानशा फेट्याबजा पागोटें जाऊन तेथें शंभरसवाशें हाती पागोटें केव्हां आलें हें नक्की सांगतां येत नाहीं.; पण डोकीस पागोट्याचें चाक घालण्याची



श्री. न. चिं. केळकर

(इ. १९२३)

रीत परवांपरवांपर्यंत जिवंत होती. सन १८८०-८५ येथपर्यंत पास झालेल्या पदवी-धरांचीं कॉलेजमधील सामुदायिक छायाचित्रें पाहिल्यास, जे कित्येक आज 'फॅशनेबल' असून नखशिखांत विलायती पेहराव करतात त्यांच्या डोक्यावर तेव्हां भलीं मोठीं पागोटीं घातलेलीं दिसून येतील. पुण्यांतील जुन्या पद्धतीचें शेवटचें पागोटें श्रीधर विठ्ठल दाते यांच्या डोक्यावर लोकांनीं पाहिलें असेल. या गोष्टीला अद्यापि वीस वर्षेंहि पुरीं झालीं नाहींत. वरील सर्व विवेचनाचें तात्पर्य हेंच कीं, पोषाखाची फॅशन किंवा रूढि ही पाडावी तशी पडते. 'स यत् प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते' ही गोष्ट धार्मिक आचाराप्रमाणें पोषाखालाहि लागू आहे.

रूढि म्हणजे घटीव किंवा घोटीव संकेत व संकेत घडण्याला किंवा घोटण्याला निश्चयाचा आरंभ व निश्चयाची पुनरुक्ति लागते. संकेताच्या मालेचा पहिला वळसा उगाळ-तांना क्षणभर कोणाचेंहि हंसेंच होणार. महात्मा गांधी हे कितीहि आदरणीय पुरुष असले तरी त्यांच्या डोक्यावर खादीची पांढरी टोपी पाहिल्यांदा ज्यानें पाहिली त्याला मनांत किंवा उघडहि हंसूं आल्याशिवाय राहिलें नसेल. संकेताच्या युद्धांत जय हा निश्चया-वर अवलंबून असल्यामुळें, या युद्धांत लोक जिंकणार, किंवा नवीन संकेत पाडूं पाहणारा धीट मनुष्य जिंकणार, याचा निकाल कांहीं काळपर्यंत हेलकावेच खात असतो. पण जगाचें हंसें खाऊन जिरविण्याइतका ज्याचा निश्चय तीव्र असतो त्याला नवी पद्धति पाड-ण्यास अडचण पडत नाहीं. पोषाखांतील नवीन रीति राजेलोक, व्यापारी उदमी, फार काय पण कुशल शिंपीहि पाडूं शकतात; मग स्वदेशी-बहिष्कारासारख्या देशहिताच्या कामीं जर एखादी नवी फॅशन पडणें जरूरीचें असलें तर निश्चयी लोकांनीं ती पाडण्यांत काय कमीपणा आहे! एकानें दुसऱ्यास हंसणें हा पोकळ डोक्याच्या लोकांचा रिकाम-टेकडा धंदाच आहे; व नवीन पोषाखांच्या रूढि पडेपर्यंत तो घालणारांच्या माथीं निर्भर्त्सने-बरोबर अनेक खोड्यानाट्या हेतूंचा आरोपहि केला जाण्याचा संभव असतो. पण जे खोटया बुद्धीनें हंसतील त्यांचेच दांत दिसतील असें म्हणून मनुष्य एकदां मोकळा झाला म्हणजे पुढें त्याला लोकांच्या हंसण्याची बाधा होऊं शकत नाहीं.

लोकांनीं खादीचे कपडे किंवा टोप्या किंवा अशाच प्रकारचे इतर नवीन पोषाख घालणारांना हंसण्याचीं कारणें दोन संभवतात. एक स्वतः या पोषाखाचा विपरीतपणा, व दुसरें अनुकरणबुद्धि. पैकीं पहिल्या कारणासंबंधानें असें उत्तर देतां येईल कीं, खादीचे कपडे, धोंगड्या, खादीच्या पांढऱ्या अगर रंगीत टोप्या यांमध्यें थोडें नावीन्य म्हणून विपरीतत्व दिसलें तरी, हिंदी मनुष्यानें महाराष्ट्रासारख्या समशीतोष्ण प्रदेशांत बूट, पाटलोण व साहेबी टोपी घालावी याइतकें तें विपरीतत्व खास नाहीं. स्वतः साहेब लोकांना हिंदी लोक हिंदी पोषाखांत पाहिलेले जसे आवडतात तसे विलायती पोषाखांत पाहिलेले आवडत नाहींत; मग हिंदी लोकांना तर ते आवडूं नयेत यांत काय आश्चर्य! मुंबईतील हिंदी लोक पोषाख किती गैरसोयीचा करतात हें वर दिलें आहे. तसेंच इतर शहरीं थंडीच्या दिवसांत संध्याकाळच्या अंधाऱ्या वेळीं देखील साहेबांची तिरकस टोपी

डोक्यावर घालून हिंडणारे लोक पाहिले म्हणजे या पोषाख करणाऱ्याला सोय हा शब्द देखील माहीत नसावा असेंच वाटतें. तीच गोष्ट ' नेकटाय ' ऊर्फ गळोटीची. आधीं कारण नसतां छाती दृटकून उघडी पडेल असला कोट घालणें, आणि मग छाती उघडी पडूं नये म्हणून त्यावर गळोटी घालणें, या करणेकऱ्याच्या वस्याला एकच उपमा साजते; ती अशी कीं, साहेब लोक उन्हाळ्याकरितां म्हणून पर्वतशिखरावर जातात, तेथें गारठा बाधूं नये म्हणून मद्यसेवन करितात, व मद्यसेवनाची उष्णता कमी करण्याकरितां बर्फ घेतात ! कित्येक फॅशनेबल लोकांना गळोटी ही इतकी अनिवार्य होऊन बसली आहे कीं, सभ्य स्त्रीला वक्षःस्थळावरील पदर किंचित् बाजूस सरल्यानें जितकी एक वेळ लाज वाटणार नाहीं तितकी लाज यांना गळोटी नसली तर वाटूं लागते.

अनुकरणाच्या दृष्टीनें पाहिलें तर महात्मा गांधींचें अनुकरण करून खादीची टोपी घालणें हें साहेबाचें अनुकरण करून डोक्यावर चिमणीचें धुराडें, किंवा गळ्यांत गळोटीचा फांस घालण्यापेक्षां खचित कमी हास्यास्पद ठरेल. व त्याहून मौज ही कीं, ज्या साहेबी फॅशन्सचें अनुकरण डोळे मिटून आम्ही करतों त्या शुद्ध विलायतेंत भलभलत्या कारणानींच मूळ उत्पन्न झालेल्या असून, त्यांचा व सुखसोयींचा तिकडेहि मेळ बसला नाहीं तर इकडे तो कोठून बसणार ? मिस बॅलिन नांवाच्या एका इंग्रज ग्रंथकर्त्रीनें युरोपिअन लोकांना खालीलप्रमाणें सर्टिफिकेट दिलेलें आहे– " In manners, custom and dress, the so-called civilised nations of Europe are in the matter of 'apishness' no farther advanced than the most uncultured, savage. *Imitation is the great principle which governs fashion and reason, in this matter, plays but a very minor part.* " चालीरीति व पोषाख यांचे बाबतींत सुधारलेलीं म्हणविणारीं युरोपिअन राष्ट्रें रानटी लोकांप्रमाणेंच माकडचेष्टा करितात. या बाईनें या आक्षेपाचीं उदाहरणेंहि कांहीं दिलीं आहेत. इलिझाबेथ राणी आपल्या गळ्यावरील, आवाळूं झांकण्याकरितां केसाळ गळपट्टा घाली हें पाहून इंग्रज बायकाहि तसेंच करूं लागल्या; व अजूनहि गळ्याभोंवतीं केसाळ कुच्या-केोल्ह्यांची सबंध कातडीं घालून इंग्रज बायका शोभा मिरवितात ! आठव्या हेन्रीनें गालावरील नायटे बुजविण्याकरितां मेणाच्या चकत्या लावल्या तें पाहून लोकहि तेंच करूं लागले. अशाच रीतीनें उंच गळपट्टे, भारी खळ लावलेले गळपट्टे, अस्तन्यांचे कॉलर, गळोटी, उंच खोटांचे निरुंद बूट, कंबर चिरडून टाकणारे कंबरबंद, जघन फुगवून दाखविणाऱ्या हिंगच्या तारा, झगे वगैरेंची उपपत्ति आहे ( सायन्स ऑफ ड्रेस, पृ. २५८ ). विद्वान् इंग्रज ग्रंथकार ले हंट यानें तर इंग्रजी पोषाखाविरुद्ध तडाक्यावर तडाखे उडविले असल्याचें प्रसिद्ध आहे. इंग्रजी कोटासंबंधानें तो लिहितो " Here is absolutely not one iota of sense, grace or economy in the modern coat. *It is an article as costly as it is ugly and as ugly as it is useless. In winter it is not enough, in hot weather it is too*

much." विद्यमान कोटाच्या पोषाखांत सुखसोय, समंजसपणा किंवा काटकसर हीं रतिमात्रहि नाहींत, तो जितका कुरूप तितका निरुपयोगी आणि जितका निरुपयोगी तितकाच खर्चाचा असतो. पोषाखाचे हे सर्व दुर्गुण विलायतेंतून इकडे येऊन द्विगुणित झाले असल्यास काय नवल ?

वरील सर्व विवेचनाचें तात्पर्य इतकेंच कीं, हिंदुस्थानांत अनेक दृष्टींनीं पोषाखाची क्रांति होण्याची आतां वेळ आली आहे; व ती होतांना सुख, सोय, खर्च, स्वदेशाभिमान वगैरे हेतूंकडे लोकांनीं नजर पुरविल्यास तें योग्यच होईल. हे सर्व हेतु संभाळून त्यांतल्या त्यांत प्रांतिक राष्ट्रभक्तिहि कोणास संभाळतां आली तर इष्ट आहे. पण ती संभाळतां येत नसल्यास राष्ट्रीय पोषाखाच्या संशोधनांत कचित् स्वत्व गमावलें तरीहि मोठीशी फिकीर नाहीं. बहुमताच्या बळावर पोषाखाचा निर्णय करण्याची वेळ आली तर सर्व हिंदुस्थानांत टोपीचा नंबर पहिला, फेटा व रुमाल यांचा दुसरा, उघडया डोक्याचा तिसरा व पगडीचा चवथा नंबर लागेल. नर्मदेच्या उत्तरेस बहुतेक टोपीचाच प्रकार आहे; मग ही टोपी विलायती किंवा हंगेरियन घालण्यापेक्षां बिचाऱ्या खादीची घातली तर स्वदेशीला किती तरी उत्तेजन मिळेल ! व एकाच संकेतांत सर्व गुंतले गेल्यामुळें कोणीं कोणास हंसण्याचेंहि कारण नाहीं. पोषाखाची फॅशन बदलावयाची म्हणजे उगाच मुद्दाम गबाळपणा करावयाचा किंवा लक्तरें वागवावयाचीं असा मात्र अर्थ नव्हे. स्वदेशी कपडा पोषाखाला वापरला तरी त्यांतहि स्वच्छता व सफाई या ही जी सभ्यतेचीं मुख्य दोन अंगें ती असलीच पाहिजेत. पण एकदां स्वदेशीच्या दृष्टीनें आपण पोषाखाकडे पाहूं लागलों म्हणजे पोषाखाचा आकार, वजन, मान, किंमत, कपडयाची जात व वाण वगैरे बाबतींत इष्ट अशीच क्रांति घडून येईल यांत शंका नाहीं. ही क्रांति घडवून आणण्याची मुख्य जबाबदारी सुशिक्षित लोकांवरच येऊन पडते, म्हणून स्वदेशीच्या चर्चेत उगीच फुगविलेली व्यापक दृष्टि, अर्थशास्त्राचें अवडंबर, व आंकडयाचें गौडबंगाल न रचतां त्यांनीं स्वतः तावडतोब सक्रिय होण्यास व अशिक्षितांना वळण लावण्यास उद्युक्त झालें पाहिजे.

—केसरी १९२१ आगष्ट १०

## स्वराज्यपक्ष व राज्यक्रांति

इंग्रजांचें हिंदुस्थानावरील राज्य लष्करी सत्तेच्या जोरावर चाललें आहे. लष्करी सामर्थ्य हा इंग्रजी राजसत्तेचा पाया आहे. या पायावर आघात झाल्याशिवाय या सत्तेला धक्का लागावयाचा नाहीं. आणि असा आघात करण्यास राज्यक्रांतीशिवाय दुसरा उपाय नाहीं. ही सरळ आणि साधी गोष्ट कोणत्याहि व्यावहारिक विचारसरणीच्या मनुष्यास पटणारी आहे. ती सिद्ध करण्यास मोठमोठे इतिहासाचे आधार उद्धृत करण्याची कांहीं जरुरी नाहीं. सर्व नद्या ज्याप्रमाणें अखेर समुद्रास मिळतात त्याप्रमाणें परतंत्र देशांत सर्व प्रत्यक्ष अप्रत्यक्ष राजकीय चळवळींचें पर्यवसान अखेर या राज्यक्रांतींत व्हावयाचें असतें. मग ती राज्यक्रांति अत्याचारी असो वा अनत्याचारी असो; ती आज होवो वा कालांतरानें होवो.

कौन्सिलप्रवेशाविरुद्ध कौन्सिलबहिष्कारवाद्यांचा मोठा आक्षेप असा आहे की, कौन्सिलबहिष्काराची चळवळ ही हिंदी राष्ट्रास राज्यक्रांतीच्या दिशेनें खेंचणारी आहे. आणि उलटपक्षीं कौन्सिलप्रवेशाची चळवळ ही लोकांचीं मनें पुनः जुन्या टाकाऊ ठरलेल्या सनदशीरपणाकडे वळवून राज्यक्रांतीला विन्मुख करणारी अर्थात् देशाला राज्यक्रांतीपासून उलट दिशेनें दूर नेणारी म्हणजे पिछेहाटीची आहे.

लोकांनीं बंड करून राज्यसत्ता आपल्या हातीं घेतल्याचीं उदाहरणें जगांत आजपर्यंत अनेक घडलीं आहेत व इतिहासाच्या उदाहरणांवरून शहाणें होऊन त्याप्रमाणें आपली वर्तणूक ठेवावयाची असेल, तर हिंदुस्थानांतील राजकारणी पुरुषांनीं या राज्यक्रांत्यांच्या इतिहासाचें सूक्ष्म दृष्टीनें निरीक्षण केलें पाहिजे.

आज युरोपांत जेथें जेथें लोकसत्ता प्रचलित आहे तेथें तेथें ती क्रांतीनें उत्पन्न झालेली आहे. सुखासुखीं एखाद्या राजानें आपली सत्ता जनसमाजाच्या हवालीं केल्याचें एकहि उदाहरण इतिहासांत सांपडावयाचें नाहीं. ज्या जातीचे, धर्माचे व संस्कृतीचे लोक त्याच जातीचा, धर्माचा व संस्कृतीचा राजा अशी परिस्थिति असतांना देखील लोकांना अत्याचारी राज्यक्रांतीनें आपल्या हातीं सत्ता घ्यावी लागली आहे. मग हिंदुस्थानांत जेथें जातीनें, धर्मानें व संस्कृतीनें सर्वस्वीं भिन्न असे राज्यकर्ते आहेत, तेथें ते क्रांतीशिवाय सुखासुखीं राज्य हातचें सोडतील हें असंभवनीय आहे.

लोकपक्षानें केलेल्या राज्यक्रांत्यांचे इतिहास निरनिराळ्या देशांत स्थल, काल व प्रसंग यांच्या अनुरोधानें निरनिराळे दिसत असले तरी त्या सर्वांचा एक लघुतम साधारण विभाज्य काढतां येतो. म्हणजे सर्व राज्यक्रांत्यांच्या भिन्न क्रमामध्यें कांहीं गोष्टींचें साम्य दिसून येतें. धूमकेतूचें क्षितिजावर आगमन किंवा ज्वालामुखीचा स्फोट याप्रमाणें राज्यक्रांति ही गोष्ट आकस्मिक रीतीनें घडत असली, तरी वरील दोन सृष्टिचमत्कारांविषयीं जसे शास्त्रज्ञांनीं कांहीं सामान्य नियम बांधले आहेत, तसे इतिहासशास्त्रज्ञांनीहि राज्यक्रांत्यांविषयीं कांहीं सामान्य नियम बांधले आहेत. राज्यक्रांतीविषयीं लिहितांना हे इतिहासकार नेहमीं सुरुंगाची उपमा देतात. सुरुंग उडण्यास प्रथम सुरुंग खणून त्यांत दारू भरावी लागते आणि नंतर त्याची वात पेटवावी लागते. राज्यक्रांतीचा सुरुंग अनियंत्रित राज्यसत्तेच्या जुलमानें खणला जातो; त्यांत तीव्र असंतोषाची दारू भरली जाते आणि सरकार व लोकपक्ष यांच्या घर्षणांत केव्हां तरी ठिणगी उत्पन्न होऊन या दारूचा भडका होतो. त्यांत सरकारी जुलमाची कमान चढत जाणें आणि लोकांचा असंतोष अधिकाधिक तीव्र होत जाणें या क्रिया सावकाशपणें चालत असलेल्या उघड दिसतात, आणि या दोन गोष्टींवरून अमुक देशांत राज्यक्रांति होणार असें अनुमान काढतां येतें. राज्यक्रांतीचीं पूर्वचिन्हें किंवा पूर्वतयारी अशा रीतीनें सहज ओळखतां येण्यासारखी असली, तरी प्रत्यक्ष राज्यक्रांतीला अमुकच वेळीं तोंड लागेल हें निश्चित सांगतां येत नाहीं. लोकपक्ष आणि राजसत्ता यांच्या घासाघासींत किंवा संघर्षणांत ही ठिणगी उत्पन्न होते हें खरें; पण ती अमुकच क्षणाला उत्पन्न होईल हें सांगतां येणें कठीण असतें.

सारांश, सरकारचा जुलूम, लोकांचा तीव्र असंतोष व क्षोभ, लोकांची संघटना यांबरोबरच लोकपक्ष व सरकार यांच्या संघर्षणानें या क्षोभाला तोंड लागण्यासारखी परिस्थिति या गोष्टी राज्यक्रांतीस आवश्यक आहेत. लोकांची संघटना किंवा असंतोष-वर्धन या गोष्टी करण्यास सरकारयंत्राशीं प्रत्यक्ष संघटन होणें जरूर नसतें. पण प्रत्यक्ष तोंड लागल्यास लोकसंघटनेच्या यंत्राचें चक्र आणि सरकारी यंत्राचें चक्र यांची चकमक झडावी लागते. पार्लमेंट किंवा पार्लमेंटसारख्या लोकप्रतिनिधींच्या, प्रत्यक्ष सत्तेशीं संबंध येणाऱ्या संस्थांतून लोकपक्षाचा विरोध यांनींच ही चकमक झडते. हा विरोध चालू असतां नेमक्याच वेळीं ही भडका उडविणारी ठिणगी निघेल हें सांगतां आलें नाहीं, तरी या विरोधांतूनच ती ठिणगी उत्पन्न होणार, इतरत्र होणें शक्य नाहीं, ही गोष्ट मात्र तितकीच निश्चित होय.

सर्व जगांत मोठी अशी जी फ्रान्समधील अठराव्या शतकाच्या अखेर झालेली राज्यक्रांति तिच्या इतिहासांत हेंच तत्त्व दिसून येईल. अनेक शतकें चाललेल्या, जुलमानें फ्रान्सची भूमिका क्रांतासीठीं तयार होत होती; पण या क्रांतीला तोंड लागण्यास सरकारनें नाइलाजास्तव लोकांना दिलेल्या अल्पस्वल्प प्रातिनिधिक संस्था व त्यांत लोकांनीं केलेला विरोध याच गोष्टी कारणीभूत झाल्या. M. Theirs हे प्रसिद्ध फ्रेंच इतिहासकार आपल्या फ्रान्समधील राज्यक्रांतीच्या इतिहासांत लिहितात—" Thus the very Concessions of the Government were ungracious and were rather forced from it than freely granted. The Nation felt her strength & determined upon attaining all that could be grasped. A continual opposition urged her ambition and quickly rendered her insatiable. " ( P. 7 ) सरकारनें नाइलाजास्तव व कष्टानें दिलेल्या सवलतींचा परिपूर्ण फायदा करून घेण्याच्या निश्चयानें जी सतत विरोधाची परिस्थिति उत्पन्न झाली, त्या योगेंच लोकांची सत्ता आक्रमण करण्याची महत्त्वाकांक्षा प्रबल होत गेली.

शुद्ध इंग्लंड देशांतहि ज्या राज्यक्रांत्या झाल्या, त्या सर्व पार्लमेंट सभेच्या द्वारेंच झाल्या. या सर्व राज्यक्रांत्यांतील मोठी राज्यक्रांति म्हटली म्हणजे क्रॉम्वेलनें केलेली राज्यक्रांति होय. क्रॉम्वेलच्या वेळीं इंग्लंडची पार्लमेंट सभा ही पूर्ण प्रातिनिधिक स्वरूपाची नव्हती आणि संपूर्ण राजसत्ताहि त्या सभेच्या हातीं आली नव्हती. राजाच्या हातीं बरेच अनियंत्रित अधिकार होते. पार्लमेंट जो कायदा करील तो नामंजूर किंवा तात्पुरता रद्द करण्याचा अधिकार स्टुअर्ट राजांनीं आपल्या अखत्यारींत ठेवला होता. इतकेंच नव्हे तर तो अधिकार ते बजावीतहि असत. पार्लमेंटमधील कित्येक जागा बड्या बड्या उमरावांच्या खिशांत होत्या. स्टुअर्ट राजांच्या अनियंत्रित सत्तेला व जुलमाला कंटाळून जनतेंत क्षोभ उत्पन्न करणारी परिस्थिति तयार झाली होती. क्रॉम्वेलनें " आयर्न साइड्स " नांवाचें सैन्य उभें केलें. या सैन्यांत धार्मिक निष्ठेनें कडवे बनलेले व जीवावर उदार झालेले

लोक असल्यामुळें त्यांच्यांत उत्तम शिस्त होती व ते रॉयलिस्ट पक्षाच्या संख्येनें चौपट पण बेशिस्त असलेल्या सैन्याला भारी होते. अशा रीतीनें पार्लमेंटच्या बाहेर क्षोभ व संघटन यांचा दारूगोळा जय्यद तयार होता; पण या दारूगोळ्याचा भडका उडण्यास ठिणगी पाहिजे होती, ती प्रत्यक्ष राजसत्तेशीं संघर्षण झाल्याशिवाय उत्पन्न होणें शक्य नव्हतें; म्हणून पूर्ण प्रातिनिधिक नसलेल्या व राजाच्या हातीं व्हेटोचा अधिकार असल्यामुळें कमकुवत असणाऱ्या पार्लमेंटांत शिरून व सरकारविरोधी 'इंडिपेंडंट पक्ष' स्थापन करून क्रॉम्वेलनें प्रथम तेथें भांडण सुरू केलें. क्रॉम्वेलच्या सैन्यास पार्लमेंटरी आर्मी किंवा पार्लमेंटचें सैन्य असें नांव पडलें. आणि 'लाँग पार्लमेंट' भरलें, तेव्हांपासून या लढ्याला तोंड लागलें. मार्मिक इतिहासकार क्रॉम्वेलच्या राज्यक्रांतीचा आरंभ लाँग पार्लमेंटच्या पहिल्या बैठकीपासून झाला असें मानतात.

ही अत्याचारी राज्यक्रांतीची गोष्ट झाली. हिंदुस्थानच्या लोकांच्या मनांत अनत्याचारी राज्यक्रांति घडवून आणण्याची महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाली आहे. खरी अनत्याचारी राज्यक्रांति आजपर्यंतच्या जगाच्या इतिहासांत एकच झाली. ती म्हणजे १६८८ सालीं इंग्लंडांत झालेली राज्यक्रांति होय. या अनत्याचारी राज्यक्रांतींत देखील पार्लमेंट सभेनें पुढाकार घेतला होता. आणि यावेळाहि पार्लमेंट सभा ही पूर्ण प्रातिनिधिक स्वरूपाची नसून पूर्णपणें स्वतंत्रहि नव्हती. उमरावांच्या खिशांतील मतदारसंघहि या वेळीं होते व राजाच्या हातांत अनियंत्रित सत्ताहि होती.

सारांश देशांत, एकदां अल्प प्रमाणांत कां होईना, पण प्रातिनिधिक संस्थांचा उदय झाला कीं, राज्यक्रांतिकारकांना त्या सत्तेच्या केंद्राचा उपयोग करून घ्यावा लागतो. प्रातिनिधिक संस्था उत्पन्न झाल्यावर त्यांच्याकडे ढुंकूनहि न पाहतां लोकपक्षानें केलेल्या राज्यक्रांतीचें एकहि उदाहरण इतिहासांत आढळत नाहीं व त्याचें कारणहि उघड आहे. प्रातिनिधिक संस्था ही लोकपक्ष व सरकार यांच्यांत भांडणाचें तोंड लागण्याची जागा असते. अर्थात् तींत झगडा उत्पन्न झाल्याशिवाय राज्यक्रांतीच्या सुरुंगास ठिणगी लागत नाहीं.

सारांश, सरकाराशीं प्रत्यक्ष संघर्षण किंवा तीव्र विरोध करण्याच्या जागा सोडून, लोकांत कितीहि संघटना उत्पन्न करून असंतोष वाढविला तरी तो फुकट होय. उलट सरकारशीं झगडा उत्पन्न झाला असतां लोकांत संघटना व तीव्र असंतोष या गोष्टी नसल्या तर या झगड्याचाहि कांहीं उपयोग होणार नाहीं. "अतृणे पतितो वन्हिः स्वयमेवोपशाम्यति" याप्रमाणें तो फुकट जाईल. हिंदुस्थानसारख्या परतंत्र देशांतील लोकांनीं राज्यक्रांतीची ही सजोड साधनसामुग्री नेहमीं ध्यानांत ठेवली पाहिजे.

राज्यक्रांतीचीं हीं सजोड साधनें लक्षांत घेतलीं तर हिंदुस्थानच्या राजकारणांत आज उत्पन्न झालेले बरेच गैरसमज दूर होतील. पूर्वी कौन्सिलांत गेलेला मवाळ पक्ष व आज कौन्सिलांत शिरलेला स्वराज्यपक्ष यांच्यांतील भेदाचें मर्म नीट कळण्यास हा राज्यक्रांतीचा क्रम लक्षांत बाळगला पाहिजे "जो कौन्सिलांत जाईल तो मवाळ" अशीच भोपट व्याख्या ठरविली तर पूर्वी कौन्सिलांत गेलेले ते जुने मवाळ व आज कौन्सिलांत

जाणारे स्वराज्यपक्षीय लोक हे नवे मवाळ ही विचारसरणी ओघानें प्राप्त होते असा भ्रम उत्पन्न होतो. पण मूळ गृहीत कृत्य चुकीचें असलें म्हणजे सिद्धान्तहि चुकीचा निघतो. कार्य कोणतें व अकार्य कोणतें याविषयीं निर्णय करतांना मोठमोठ्या लोकांच्या अक्षम्य चुका होतात याचें कारण गीताशास्त्रानें असें सांगितलें आहे कीं, ' दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय, " या सिद्धांताकडे त्यांचें दुर्लक्ष होतें. कर्माकर्माचा निर्णय करितांना कर्त्याच्या बुद्धीकडे लक्ष द्यावें लागतें. मवाळ ज्या बुद्धीनें कौन्सिलांत शिरले, त्या बुद्धीनें स्वराज्यपक्ष कौन्सिलांत जात नाहीं हें, अनेक वेळा स्पष्ट सांगितलें असतांहि ज्यांस कळत नाहीं त्यांना बुद्धियोगाचें मर्म तरी कळलें-नसलें पाहिजे अगर कांहीं अंतःस्थ हेतूनें ते मुद्दाम अज्ञानाचें पांघरूण तरी घेत असले पाहिजेत. मवाळांच्या कौन्सिलांतील कामाचा आणि लोकांच्या चळवळीचा प्रत्यक्ष संबंध फार कमी होता. गेल्या तीन वर्षांत मवाळांनीं मतदारांकडे ढुंकून पाहिलें देखील नाहीं, याचें कारण अनास्था हें तर खरेंच; पण त्याहिपेक्षां महत्त्वाचें कारण म्हटलें म्हणजे त्यांचें जें सनदशीर ध्येय व धोरण आहे त्याच्याशीं लोकक्षोभाचा व लोकजागृतीचा संबंध अगदीं थोडा येतो. उलट स्वराज्यपक्षाचें कार्य लोकक्षोभाला कौन्सिलांतील विरोधाची जोड देऊन तो अधिकाधिक तीव्र करणें हें असल्यामुळें, लोकसंघटना व जागृति यांचा आणि स्वराज्य पक्षाच्या कौन्सिलांतील कामगिरीचा जिव्हाळ्याचा संबंध आहे. त्यांची ताटातूट करून चालावयाचें नाहीं. मवाळपक्ष कॉंग्रेसशीं फटकून वागतो आणि स्वराज्यपक्ष हा कट्टर कॉंग्रेसवाले खुनशीपणानें दूर लोटीत असतां, अपमानास्पद परिस्थितींतहि कॉंग्रेसला चिकटून राहतो याचें मर्म तरी हेंच आहे. लोकसंघटना, लोकक्षोभ व लोकजागृति यांशिवाय स्वराज्यपक्षाचें कार्य "अतृणे पतितो वह्निः स्वयमेवोपशाम्यति " असें निरर्थक होणार आहे. मवाळपक्षाचें कार्य तसें नाहीं, सनदशीरपणानें जे अल्पस्वल्प फायदे पदरांत पडतील ते पाडावयाचे येवढेंच त्यांचें ध्येय असल्यामुळें, लोक अनुकूल असोत, वा प्रतिकूल असोत, जागे असोत वा निजलेले असोत, त्यांचें कार्य आपलें मोगलाईप्रमाणें हळूं हळूं चाललेंच आहे. मतदारांची संघटना किंवा जागृति यांची जरूरी मवाळांपेक्षां स्वराज्यपक्षास अधिक वाटते; याचें बीज हेंच होय. बाहेरच्या चळवळीशीं संबंध असणारे लोकच कौन्सिलांत जावेत असें स्वराज्य पक्षास वाटतें याचें कारण तरी हेंच आहे आणि स्वराज्यपक्ष हा 'मवाळां'त जमा करून त्याची बदनामी करूं इच्छिणारे लोक, कौन्सिलांतील काम व बाहेरचें काम याची ताटातूट करून, स्वराज्य पक्ष फक्त कौन्सिलांतीलच काम करणार, बाहेरच्या कार्याकडे लक्ष देणार नाहीं असा मुद्दाम खोटाच गैरसमज पसरविण्यास उद्युक्त होतात याचें कारण तरी हेंच. कारण बाहेरच्या कार्याशीं निकट संबंध असणें हाच स्वराज्यपक्षाचा विशेष होय. तो विशेष लोकांच्या डोळ्यांत धूळ फेंकून दृष्टीआड केला म्हणजे स्वराज्यपक्षाला मवाळ म्हणण्यास सवड सांपडते. स्वराज्यपक्षनिंदकांच्या या युक्तीवरूनच स्वराज्यपक्ष व मवाळ पक्ष हे निरनिराळे आहेत असें सिद्ध होतें.

सरकारनें दिलेल्या सुधारणा पोकळ आहेत ही गोष्ट स्वराज्यपक्षासहि मान्य आहे.

स्वराज्याचा हिरा म्हणून सरकारनें ही सुधारणांची गारगोटी लोकांचे हातांत दिली आहे. तिची किंमत कांहीं नसली तरी लोकपक्षानें पोलाद त्यावर घासून त्या घर्षणाच्या योगानें क्षोभकारक ठिणगी उत्पन्न करण्यासारखी आहे. मद्रासचें कौन्सिल सुरू झाल्याबरोबर त्यांत दिवाणांबद्दल निंदाव्यंजक ठराव येऊन सरकार व लोकपक्ष यांचेमधील घासाघिशीला सुरवात झाली आहे. सर्व प्रां. कौन्सिलें व असेंब्ली यांच्या बैठकी सुरू झाल्या कीं जा लढ्यास चौफेर सुरवात होईल. लोकांना "कौन्सिलांकडे लक्ष देऊं नका." असें कितीहि सांगितलें तरी त्यांचें लक्ष या लढ्याकडे गेल्याशिवाय राहणार नाहीं. कौन्सिलांत चाललेल्या विरोधास बाहेरून दुजोरा देण्याकरितां लोक आपोआप चळवळ करण्यास प्रवृत्त होतील. आणि या दुहेरी चळवळीनें देशाची परिस्थिति पार पालटून जाईल. गेल्या वर्ष दीडवर्षांत राजकारणांत जें शैथिल्य आलें आहे तें नाहींसें होऊन त्यांत तेज चमकूं लागेल. फुजलेला डाव पुनः सुरू होऊन त्यास अपूर्व रंग येईल आणि त्या वेळीं "कौन्सिलासारख्या साधनांचा अव्हेर करूं नका" असा स्वराज्यपक्षानें लोकांची अप्रियता सोसूनहि सारखा घोष कां सुरू केला व आपलें म्हणणें हट्टीपणानें कां शेवटास नेलें, याचा अजूनहि स्वराज्यपक्षाच्या कार्याविषयीं साशंक असलेल्या लोकांना पूर्ण खुलासा पटेल.

कॉंग्रेसपक्ष, स्वराज्यपक्ष व नेमाळपक्ष असे तीन प्रमुख पक्ष सध्या देशांत आहेत. पैकीं कॉंग्रेसपक्ष हा कौन्सिलांकडे दुर्लक्ष करून केवळ बाहेरची संघटना, क्षोभ व जागृति या उपायांनीं अनत्याचारी राज्यक्रांति घडवून आणण्याची इच्छा करितो. स्वराज्यपक्षाचें असें म्हणणें आहे कीं, या बाहेरच्या क्षोभास व संघटनेस जोड लागण्याकरितां कौन्सिलांत जाऊन लोकपक्षाचे प्रतिनिधि जो सतत व तीव्र विरोध करतील त्याची फार मदत होणार आहे. अर्थात् बाहेरच्या चळवळीबरोबरच कौन्सिलाचेंहि एक साधन लोकपक्षाच्या हातीं पाहिजे. नेमाळपक्षाला राज्यक्रांति नको आहे. पावलापावलानें हळूहळू प्रगति होईल तीच पदरांत पाडून घ्यावी येवढेंच त्याचें ध्येय आहे. आणि या ध्येयामुळेंच तो, लोकजागृतीसंबंधानें किंवा लोकमतासंबंधानें फारशी फिकीर बाळगीत नाहीत. हीं तीन मतें स्पष्ट आहेत. ज्याला जें खरें वाटेल व पटेल त्यानें त्या मताला उघडया डोळ्यानें जाऊन मिळावें. पण एकमेकांविषयीं भलभलते गैरसमज पसरवून लोकांची दिशाभूल करण्याचा प्रयत्न करूं नये. त्या योगानें एखाद्या पक्षाची तात्पुरती सरशी झालेली दिसली तरी ती चिरकाल टिकणें शक्य नाहीं.

'लोकमान्य' हिंदुस्थान अंक १९२४ पृ. २७–२८

## न्यायनीतीचा सुलतानी वहाणा

सरकारनें बंगाल्यांत जी दडपशाही सुरू केली तिला हिंदुस्थानांतील सर्व पक्षांचा मिळून विरोध हें एकच समर्पक उत्तर होतें. तें मिळतांच तिचें पेकाट मोडल्याचीं स्पष्ट चिन्हें दिसूं लागलीं आहेत. लॉर्ड रेडिंग यांनी आपला सुलतानी हुकूम जाहीर करतांना

' लोकमतानें या वेळीं मला पाठिंबा द्यावा ' अशी याचना मोठ्या दिमाखानें केली होती. पण नेमस्तांतील नेमस्तांनीं सुद्धां जेव्हां त्यांच्या कृत्याचें समर्थन न करतां निषेधच केला, तेव्हां पायाखालच्या या पातळ फळीचाहि आधार निसटून जाऊन त्यांच्या असमर्थनीय दुष्कृत्याचा फांस उलट त्यांच्या गळ्याला घट्ट बसला तो कसा तरी सोडविण्याकरितां सरकार आतां त्यांत बोटें घालून मोठ्या कसोशीनें प्रयत्न करीत आहे. पण त्याचा फारसा उपयोग होण्याचें चिन्ह दिसत नाहीं. उलट दलदलींत रुतलेला मनुष्य वर निघण्याकरितां जितका प्रयत्न करतो, तितका तो अधिक खोलांतच जातो, त्याप्रमाणें दर खुलाशागणिक त्यांचा अविचारच अधिकाधिक प्रगट होऊन त्यांना अधोगति मिळत आहे.

ऑर्डिनन्सखालीं पकडलेल्यांपैकीं २८ लोकांना ता. २६ पासून बंगाल-सरकारानें आपण होऊनच जवळ जवळ मुक्त केलें आहे. या गृहस्थांना विशिष्ट हद्दीबाहेर जाण्याला प्रतिबंध आहे, व त्या हद्दींतहि त्यांनीं वरचेवर पोलिस अधिकाऱ्यांना आपली हजेरी द्यावी अशी अट घातली आहे. पण एकंदरीनें तो नजरकैदेचा नुसता देखावाच आहे असें म्हटलें तरी चालेल. " तुझा कांहीं गुन्हा नाहीं, पण फिरून मात्र असें करूं नको " अशा शब्दांनीं कित्येक धूर्त न्यायाधीश फौजदारी खटल्यांचा निकाल देतात ! खोट्या फिर्यादीची इज्जत तर राखावयाची व निरपराधी आरोपीला तर दंडावयाचें नाहीं, अशा दुघ-पाण्याच्या अर्धवट न्यायाचा एक प्रकार असतो तसाच हा आहे. बंगाल-सरकारच्या या कृत्याचा अर्थ सुज्ञ लोक तरी मनाशीं इतकाच करतील कीं अटीवर सोडलेल्या या लोकांना पकडण्यांत सरकारची चूकच झाली, तथापि आपली अब्रू जाऊं नये, पोकळ दिमाख थोडा तरी कायम रहावा, म्हणून त्यांनीं इलोंच्या या नजरकैदेचें उगाच एक दोणाचें बाहुलें उभें करून ठेवलेलें आहे. हे अठ्ठावीस लोक एकदम पकडून कैदेंत न टाकल्यानें असा काय अनर्थ ओढवणार होता, व ते कैदेंत टाकल्यानें असा काय, अनर्थ टळला ? या दोनाहि प्रश्नांचीं उत्तरें समाधानकारक मिळणें अशक्य आहे. पण सरकारचे कान धरून त्यांना प्रश्न विचारण्याची व त्याचें उत्तर न दिल्यास योग्य शिक्षा देण्याची सत्ता अद्यापि आपणांस मिळालेली नाहीं. यामुळें असले प्रश्न विचारून ते अजून नुसते हवेंत उडून जातात याला काय इलाज ?

असो. ऑर्डिनन्सखालीं पकडलेल्या इतर केसांचा इनसाफ अद्यापि होणें आहे व तो होईल तेव्हां त्या संबंधानें आपण काय तें बोलूं. पण १८१८ सालच्या रेग्युलेशनखालीं जे लोक पकडून कैदेंत ठेवले गेले आहेत, त्यांचा तर इनसाफच होण्याचा राहिलेला नाहीं. त्यांना सुलतानी अधिकारानें पकडून कैदेंत ठेवलें येवढ्यांतच, सरकारच्या मतें, त्यांच्यावरील फिर्याद, त्यांचा इनसाफ, त्यांजवरच्या दोषारोपाची शाबिती व त्यांना दिलेली शिक्षा या सर्व गोष्टींचा समुच्चयानें समावेश होतो ! ईश्वराच्या एका शब्दांत जसें सगळें सच्चित् ब्रह्म सांठविलेलें असतें, त्याप्रमाणें गव्हर्नर-जनरलच्या एका सहींत सर्व न्याय-ब्रह्म सांठविलेलें आहे. असा हा सुलतानी बहाणा आहे. पण हा बहाणा म्हणजे

शुद्ध बेशरमपणाचा मामला असेंच जग मात्र म्हणत आहे. ऑर्डिनन्सखालीं पकडलेल्या लोकांचा केव्हांतरी, कोणाकडून तरी, कसा तरी इनसाफ होणार अशी अपेक्षा तरी आहे. रेग्युलेशनखालीं पकडलेल्या लोकांसंबंधानें तर ती अपेक्षाच नाहीं आणि रेग्युलेशनचा उपयोग केल्याच्या आजवरच्या उदाहरणांचा अनुभव असाच आहे कीं, या रेग्युलेशनला सरकारनें हात घातला म्हणजे सरकारचा घाबरटपणा व डामरटपणा या दोहोंचा कळस झाला आहे असें समजावें. इनसाफांत आरोपी अखेर सुटले असतां आरोप ठेवण्याइतका तरी कांहीं थोडा असल पुरावा सरकारजवळ असतो. पूर्ण आरोपशाबितीइतका पुरावा सरकारास न मिळाला व आरोपी सुटला तरी बिचारी प्रजा असें म्हणते कीं, आरोपीला थोडा त्रास झाला ही गोष्ट सरकाराला दूषणास्पद ठरण्यापेक्षां त्यांनीं प्रामाणिकपणें आपल्या हातांतील डाव उघड करून न्यायासनापुढें मांडण्याचें धैर्य दाखविलें हें अधिक भूषणास्पद आहे. खेळांत दोन डाव एकावर तर दोन डाव दुसऱ्यावर होतात हें चाललेंच आहे. सरळ व उघड रीतीनें डावांत हरल्यानें कोणास चीड येत नाहीं. पण सरकारानें या रेग्युलेशनचा उपयोग करणें म्हणजे त्यांत डाव खेळणाराचा उमदा खिलाडूपणा दिसून न येतां गुर्मी, अरेरावी, उद्दामपणा किंबहुना नीचवृत्ति आणि उच्चपदस्थ अशा मनुष्याला विकृत असणारा क्षुद्रपणा दिसून येतो. डाव दुसऱ्याच्या घरीं मांडावा, दुसऱ्या गड्याची जागा खालीं पोखरून ठेवून त्यांत दारू भरावी, फाशांत शिसें भरून ते विश्वासघातकी बनवावे, त्यांनीं आपण गुप्तपणें खेळून आधीं आपल्या हाताला संवय करून ठेवावी, प्रतिपक्षी ते टाकीत असतां ओरडून दंगल करून त्याला घाबरवावें, प्रतिकूल दान पडतांच घाईघाईनें गोळा करून खोटें दान सांगावें, दान खोटें सांगून पटावर देतांनाहि फिरून तें आणखी खोटें द्यावें, इतकेंहि करून उलट गड्यानें डाव जिंकला तर भुयारांतील दारूला आग लावून त्याला उडवून द्यावें, असल्या कपटपरंपरेला डाव खेळणें कोण म्हणेल ? रेग्युलेशनखालीं लोकांना पकडणें, त्यांना हवे तितके दिवस कैदेंत ठेवणें, त्यांजवर गुन्हा काय आहे याची माहिती त्यांना आधीं किंवा नंतरहि न देणें, पकडतांना संकट आल्याचा व सोडतांना संकट टळल्याचा खोटा बहाणा करणें, आणि इतकें करून वरती न्यायप्रियता व मुत्सद्देगिरी यांची बढाई मिरविणें—या गोष्टी एखाद्या कपटी द्यूतकारालाहि शोभणार नाहींत, मग ईश्वराचे विश्वासनिधि म्हणविणाऱ्या राज्यकर्त्यांना त्या कशा शोभतील !

रेग्युलेशनखालीं पकडलेल्या लोकांचाहि इनसाफ कां करीत नाहीं, असें कोणी म्हटलें तर त्याला सरकार असें उत्तर देतें कीं, या लोकांविरुद्ध आमचेजवळ पुरावा आहे, भरपूर पुरावा आहे, आमच्या मनाला गुन्हा पटेल असा मात्र पुरावा आहे, तथापि न्यायकोर्टापुढें ठेवतां येईल असा पुरावा नाहीं. पण सरकारी पुराव्याचा हा गुप्तनिधि नेहमींच तिजोरीच्या अंधारांत छपून राहतो असें नाहीं. त्यालाहि केव्हां केव्हां अंधेरांतून उजेडांत वाट फुटते. ही सगळी तिजोरीच्या तिजोरीच उचलून नेऊन फोडून मोकळी करतां येत नाहीं हें खरें; परंतु कित्येक वेळां परोपकारी चोर व त्याचे साथीदार गिरमिट चालवून आंतील थोडाबहुत ऐवज काढून घेऊं शकतात. कित्येक वेळां मालकाच्या विसरभोळेपणामुळें

तिजोरीला कुलूप न लागतां दार उघडें राहतें. आणि कित्येक वेळां तर स्वतः मालकच आपल्या ऐश्वर्यानें लोकांचे डोळे दिपविण्याकरितां आंतील मौल्यवान् जिनसा टेबलावर मांडून किंवा अंगावर घालून लोकांना दाखवितो; अशाच रीतीनें गुप्त गुप्त म्हणून ठेवलेला पुरावाहि केव्हां केव्हां पुढें येतो, व त्यावरून तो पुरावा कवडीमोल आहे असें लोकांस आपोआप कळून येतें. आपण आपल्या इकडीलच एक उदाहरण घेऊं. १८९७ सालीं नातूबंधूंना १८२७ च्या २५व्या रेग्यूलेशनान्वयें पकडून कैदेंत ठेवण्यांत आलें, व ते पक्क्या व कच्च्या मिळून कैदेंत अडीच वर्षे होते. या अवधींत कायदेकौन्सिलांत व पार्लमेंटामध्यें या प्रकरणीं सरकारावर प्रश्नांचा सडकून भडिमार झाला. पैकीं कांहीं प्रश्नांच्या आड सरकारनें निवळ मौनव्रताची ढाल आडवी धरली, कांहींना उत्तरें देऊन न दिल्यासारखीं केलीं, व कित्येक प्रसंगीं प्रश्न करणारानें आपणांस लोकांवर मात करण्याची बरी आयती संधि आणून दिली, अशा भावनेनें सरकारानें माहिती प्रगट केली ती त्यांच्या गळ्यांत आली! प्रथम सरकार असें दर्शवूं लागलें कीं, नातूबंधूंना कैदेंत ठेवल्यामुळें रँडसाहेबाच्या खुनाचा तपास लागण्यास मदत होणार आहे. जणूं कांहीं हे खून एकाद्या कटामुळें झाले, त्यांत नातूबंधु सामील होते, व ते मोकळे असते तर त्यांनीं पुरावा छपविला असता. पण त्यांचीं दप्तरें पकडून नेलीं, त्यांच्या नोकरांना धाकदपटशा व लांचलुचपत देऊन पाहिली, गुप्त पोलिसांनीं महाराष्ट्रभर पिंगा घातला, पण या बंधूंविरुद्ध कांहींच पुरावा मिळाला नाहीं. खुनाच्या कटाचा भ्रम भोपळ्यासारखा फुगला होता तोहि शेवटीं पुण्याचे न्यायाधीश मि. क्रो यांनीं चाफेकर-बंधूंचा इनसाफ करतांना फोडून टाकला. अखेर या बंधुद्वयापैकीं तात्यासाहेबांवर हे घोड्यावर बसण्याचे शौकीन होते व गणपत्युत्सवांतील एका दंग्यांत त्यांच्यावर खोटा खटला होऊन ते सुटले, याशिवाय दुसरा कांहींच पुरावा शिल्लक उरला नाहीं! वडील बंधु बाळासाहेब यांच्या संबंधानेंहि तोच प्रकार, किंबहुना अधिक थाईटच! कारण मग पार्लमेंटामध्यें प्रश्नांच्या कैचींत सांपडल्यावर स्टेट-सेक्रेटरी लॉर्ड जॉर्ज हॅमिल्टन यांनीं गुप्त पुराव्याचें सगळें गांठोडें टेबलावर ठेवून उघडलें, तेव्हां आंतून इतक्याच गोष्टी निघाल्या कीं, बाळासाहेब हे इनामी उत्पन्नाच्या बाबतींत सरकारशीं नेहमीं वाद घालीत असत., गैरशिस्तीत. पैशाच्यासंबंधीच्या. कारभारांत. एका. मुलीला. धमकी. देऊन. तिला. सरकारी. कामापासून परावृत्त करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला, व एक बाई प्लेगनें मेली असतां सोजिरांच्या जुलुमानें मेली असा पंचनामा करण्याविषयीं एका पोलिस पाटलाला बाळासाहेबांनीं भर दिली; पण हे दोनहि आरोप खोटे होते. नातूंनीं ते खोटे म्हणून सरकारास लेखी कळविलें; व अडीच वर्षेभर त्यांनीं एकच मुख्य तक्रार सुरू ठेविली होती; ती ही कीं, तुम्हांला आमच्यावर काय आळ घ्यावयाचे असतील किंवा आरोप ठेवावयाचे असतील ते ठेवा, पण आमची उघड चौकशी करा. तथापि सरकार ही गोष्ट मान्य करीना. वास्तविक या दोन आरोपांत असा काय गहन पुराव्याच्या बाबी असणार कीं, ज्या रीतसर कोर्टापुढें मांडतां येऊं नयेत! पण उघड चौकशी न करण्याचें मर्म हेंच कीं, गूढ संशय

एका गुन्ह्याचा असतो, नंतर तो संशय खोटा ठरतो, व जुलमी अपकृत्याचें समर्थन करण्याकरितां इतर भाकड आरोपांच्या लंगोट्या लावून सरकारला आपली अब्रू रक्षण करावी लागते. धड करड्या सुलतानाचें धैर्य नाहीं व फरड्या न्यायाधीशाचा प्रांजलपणा-हि नाहीं, अशी आमच्या सुधारलेल्या सैतानी सरकाराची अर्धवट स्थिति आहे. न्याया-च्या कामांत मिजास बादशाहीची, पण नोंदणूक वैकाड्याची! आतां आडदांड लष्करी सरदार व आडमुठे उमराव अशांच्या अमदानींत अशा रेग्युलेशनांचा उपयोग झाला तर त्याचें फारसें आश्चर्य वाटत नाहीं. पण इंग्लंडांत उत्कृष्ट सरन्यायाधीश म्हणून ज्यांची कीर्ति गाजली त्यांच्याच अमदानींत असल्या, पौराणिक काळाला शोभणाऱ्या कायद्यांचा अंमल व्हावा याचें मात्र आश्चर्य वाटल्याशिवाय रहात नाहीं. व्यक्तिविषयक सुष्टदुष्टपण काय असेल तो इतर व्हायसरॉय व लॉर्ड रेडिंग यांच्यांत कमीजास्ती असेल असें मानण्या-चें आम्हांला कारण नाहीं. पण अशा रेग्युलेशनांचा उपयोग हा पुराव्याच्या परी-क्षणावर अवलंबून असल्यामुळें चुगलखोरांचें चातुर्य व डिटेक्टिव्हांचा डामरटपणा यांनीं सरन्यायाधीशाच्या अकलेवर मात करावी हें दुर्दैव नव्हे तर काय? आम्हांला तरी असें वाटतें कीं, सरकारी हुद्द्याचा रंगीबेरंगी पोषाक घालून कमरेला तलवार लटकविण्याची हौस जशी एखाद्या गंभीर मुलकी मुत्सद्द्यालाहि येऊं शकते, तशीच जुने ठेवणींतले अधि-कारांचें अलंकार अंगावर घालून एकवार आरशांत पाहण्याची हौसहि गव्हर्नरीच्या पदा-वर बसलेल्या माणसाला येत असावी. एरवीं लॉर्ड रेडिंग यांनीं जुन्या रेग्युलेशनांचा उपयोग कां करावा याचें कोडें आम्हांस उलगडतच नाहीं.

पण जबाबदारीशिवाय सत्ता हातीं असली म्हणजे असेंच व्हावयाचें. हल्लींच्या जबाबदार म्हणविणाऱ्या राज्यपद्धतींत जबाबदारी म्हणजे चुकीबद्दल प्रायश्चित्त भोगण्याची पात्रता येऊनजाऊन कांय ती प्रजाजनांवर आहे. अधिकाऱ्यांनीं प्रजाजनांचा उपमर्द किंवा अन्याय काय वाटेल तो केला, तरी कायद्याचें अभेद्य कवच त्याच्या अंगावर अधिकारग्रहणाबरोबर चढत असल्यानें, प्रजाजनांनी आत्मरक्षणाकरितां किंवा प्रतिकारा-करितां सोडलेले बाण त्यांना लागूंच शकत नाहींत. अधिकाऱ्यांच्या विवक्षित कृत्याबद्दल त्यांजवर फौजदारी व दिवाणी कोर्टांत सरसकट फिर्याद करतां आली तर त्यांच्या चाळ्यांना बराच आळा पडेल. पण हे अधिकारी विंचू लोकांना दंश करून आपली नांगी ऐटीनें वळवून घेऊन बादशाही शिवाच्या पिंडीवर चढून बसतात म्हणून त्यांजवर फिर्यादीआर्यादीची वहाण पडूं शकत नाहीं; नाहीं तर त्यांच्या अन्याय्य कृतीचा न्याय-कोर्टांत चेंदामेंदा होण्याला उशीर कसला? मंतरलेल्या किंवा ओंवळ्या आवाराच्या बाहेर त्यांचें अंग चुकून आलें असता एकादे वेळीं न्यायमनसुबीचें शस्त्र त्यांजवर चालविण्यास सांपडतें व मग तेहि घायाळ होतात. पण असे प्रसंग थोडे येतात. उलट, एका प्रसिद्ध म्हणीप्रमाणें, अधिकाऱ्यांनींच लोकांवर बेअब्रूच्या फिर्यादी करण्यास सरकार उत्तेजन देऊं लागलें आहे.

बरें. प्रत्यक्ष अधिकाऱ्यांवर फिर्याद करतां येत नसली तरी त्यांच्या साथीदारांवर

किंवा वगलबचांवर फिर्याद करूं नये असा कायदा अद्यापि सुदैवानें झालेला नाहीं. म्हणून अधिकाऱ्यांच्या कृत्यावर समोरून नसला तरी बाजूनें प्रकाश पाडतां येऊं शकतो. लार्ड लिटन यांनीं नुकतेंच असें जाहीर विधान केलें कीं, हल्लीं रेग्युलेशन किंवा ऑर्डिनन्स यांखालीं पकडलेला प्रत्येक इसम हा घातपाताची दहशत लोकांना घालणाऱ्या टोळींतील कटवाला आहे! या बेअब्रूकारक विधानाबद्दल तुरुंगांत असलेल्या किंवा अटींवर सुटलेल्या अनेक बंगाली गृहस्थांना लॉर्ड लिटन यांजवर फिर्याद करून 'बाप दाखीव नाहीं तर हिरण्यश्राद्ध कर' असें सहज म्हणतां आलें असतें. परंतु नाइलाज आहे. तथापि कलकत्त्यास 'इंग्लिशमन' व 'कॅथॉलिक हेरल्ड' या पत्रांनीं आपणावर वरील आरोप केल्याचा फायदा घेऊन, सुभाषचंद्र बोस यांनीं कोर्टांत फिर्याद मांडून प्रत्येकाकडून पन्नास हजार रुपयांची भरपाई मरून मागितल्याचें प्रसिद्ध झालें आहे. प्रतिवादीला हे आरोप शाबीत करतां येत नाहींत असें या मुकदम्यांत ठरल्यास तोच न्याय, प्रत्यक्ष नसला तरी परंपरेनें, सरकारलाहि लागू झाला असें लोक आपल्या ठिकाणीं मानणारच! या फिर्यादीची लाथ लॉर्ड रेडिंग व लॉर्ड लिटन यांना प्रत्यक्ष लागणें कायद्यानें अशक्य असलें व त्यांच्या बिंबाला ती न लागली, तरी त्यांच्या प्रतिबिंबाला ती लागली म्हणजे त्यांनाहि ती लागलीच. ती लाथ आपणाला न लागल्याचा लॉर्ड लिटन खुशाल बहाणा करोत; परंतु ज्या सदसद्विवेकबुद्धीपुढें उभा राहून त्यांच्या उजेडांत ते नाकानें वांगीं सोलीत आहेत ती देवता त्यांच्या अंतरंगाला चिमटा घेतल्याशिवाय कधींहि राहणार नाहीं. —केसरी १९२४ डिसेंबर २

## साम्राज्य म्हणजे शेळीचें शेपूट

दक्षिण–आफ्रिकेंतील वसाहतवाल्या हिंदी लोकांचें प्रकरण आतां हातघाईवर आलेलें आहे. मात्र 'हातघाई' याचा अर्थ आपण सामान्यतः समजतों तसा नव्हे. दक्षिण–आफ्रिकेंतील हातघाई म्हणजे तेथील गोरे व काळे वसाहतवाले यांजमध्यें सशस्त्र युद्ध होणार असा अर्थ नव्हे. बिचारे हिंदी लोक दुर्बळ व निःशस्त्र! ते प्रत्यक्ष युद्ध कसें करणार? पण आम्ही हातघाई म्हटली त्याचा अर्थ इतकाच कीं, हिंदी लोकांना दक्षिण–आफ्रिकेंतून बाहेर काढून लावायची गोऱ्या वसाहतवाल्यांना बेसुमार उतावळी झालेली असून, उन्मत्त वायूनें पछाडलेल्या मनुष्याप्रमाणें ते न्यायाचें नेसतें वस्त्र आपल्या हातानें सोडून डोक्याला गुंडाळूं लागले आहेत. थोडे दिवसांपूर्वी दक्षिण–आफ्रिकेचे गृहमंत्री डॉ. मेलन यांनीं "एरिआज रिझर्व्हेशन अँड इमिग्रेशन" नांवाचें बिल द. आ. पार्लमेंटापुढें मांडलें. त्याचा हेतु दुसरा तिसरा कांहीं नसून हिंदी लोकांनीं आपण होऊन हिंदुस्थानांत परत जावें असा आहे. या कायद्याच्या नामाभिधानांतच काय, पण कायद्याच्या कलमांतहि हिंदी हा शब्द कोठें सांपडावयाचा नाहीं. पण जी गोष्ट शब्दाचा उल्लेख केल्याशिवाय घडवून आणतां येते ती घडवून आणण्याला शब्दाचा वायफळ उपयोग कोण करणार? दक्षिण–आफ्रिकेंतील गेलीं पंचवीस–तीस वर्षे हा असाच मुक्या आपेचा खेळ खेळत आलेलीं आहेत. पण

शब्द सोडलेला धडा सुद्धां मनुष्यास वाचणें जसें अवघड नाहीं तसेंच दक्षिण-आफ्रिकेंतील बहिष्कारात्मक अन्यायी कायद्यांच्या मोघम शब्दांचा अर्थ समजणेंहि कोणास कठिण नाहीं.

डॉ. मेलन यांनीं आपल्या भाषणांत मात्र हा आडपडदा ठेविला नव्हता. त्यांनीं एकदमच सांगून टाकलें कीं, हिंदी लोक हे दक्षिण आफ्रिकेंत 'परकीय' होत, व त्यांना परकी लोकाप्रमाणें वागविण्यांत कांहीं एक अन्याय नाहीं. पण हा शब्दप्रयोगहि निरुपयोगीच ठरेल. कारण या विजानें सरसकट परकीय लोकांना मज्जाव करण्यांत येत नसून कांहीं विवक्षित लोकांनाच तो करण्यांत येत आहे. उदाहरणार्थ, मॉरिशियांतील लोक, सेंट हेलिना बेटांतील लोक, मलाई लोक वगैरे कित्येक वर्गांना हे प्रतिबंधक कायदे लागू होत नाहींत. मग 'परकीय' या शब्दाचा अर्थ तरी काय ? बरें, स्वतः गोरे वसाहतवाले हे तरी परकेच नव्हेत काय ? ते तरी दक्षिण-आफ्रिकेच्या क्षेत्रांत अनादि कालीं जन्मलेले कोठें आहेत ? हिंदी लोकांची दक्षिण-आफ्रिकेंतील वस्ती फक्त साठ किंवा सत्तर वर्षांची व त्या मानानें गोऱ्या वसाहतवाल्यांची वस्ती अधिक दिवसांची हें खरें; तथापि त्यांच्याहून आधींचे स्वदेशी काळे लोक तेथें लक्षावधि आहेत ते तरी परके खास नव्हत. कारण हे लोक दक्षिण-आफ्रिकेंत बाहेरून केव्हां आले याचा काळ कोणासच सांगतां येत नाहीं. पण 'परकीय' हा शब्द सोयीचा वाटल्यावरून त्याची सुसंगति किंवा न्याय न पाहतां डॉ. मेलन यांनीं तो योजला हें उघड आहे. डॉ. मेलन यांच्या भाषेचें खरें व्याकरण किंवा शब्द-सिद्धि शिरजोरी-शास्त्रांतच सांपडणार !

साठ वर्षांपूर्वी हिंदी लोक दक्षिण-आफ्रिकेंत जातांना प्रथम कांहीं वेळांपुरते मजूर म्हणून गेले. पण इतर धंदेवाईक हिंदी सद्गृहस्थांना तिकडे जाऊन राहण्यास कायद्यानें बंदी नव्हती. हे मजूर गोऱ्या वसाहतवाल्यांना हवे म्हणूनच तेव्हां तिकडे पाठविण्यांत आले, व आतां ते आपल्याला नकोत म्हणून त्यांना गोऱ्या वसाहतवाल्यांनींच उठवण आणलेली आहे. पण खरोखरी मजुरांचा असा हा प्रश्न आतां राहिलेला नाहीं, तर मुदतबंदीच्या करारांतून मुक्त होऊन स्वतंत्र नागरिकपदाला पावलेले जे मूळचे मजूर व त्यांचे पिढ्या दोन पिढ्यांचे वंशज, आणि ब्रिटिश साम्राज्यांतील स्वतंत्र हिंदी नागरिक, अशांचा तो आज प्रश्न आहे. मूळ मजूर नेले ते अशा करारावर कीं, त्यांच्या मजुरीची मुदत संपल्यावर त्यांनी इच्छा असल्यास त्यांनीं द. आफ्रिकेंत घरेदारें करून रहावें. आणि या लोकांनीं त्याप्रमाणें घरेदारें केलीं, जमिनी विकत किंवा भाड्यानें घेतल्या, उद्योगधंदे आरंभिले, दुकानें मांडलीं व इतर हरतऱ्हेचे संबंध तेथले रहिवासी म्हणून निर्माण केले. हे संबंध आतां इतके दृढ झाले आहेत कीं, हिंदुस्थानांतील आपल्या गांवाची व घराण्याचीहि ओळख हे लोक विसरले. हिंदी येवढेंच त्यांचें नांव त्यांच्या आठवणींत शिल्लक उरलें आहे. पण द. आफ्रिकेशिवाय त्यांना दुसरा स्वतःचा असा देश उरला नाहीं ! अशा लोकांना आतां तेथून पालवून देऊं पाहणें, याहून घोर असा विश्वासघात कोणता ?

मजूरवर्गाच्या वंशजांचा हा विश्वासघात असला तर सुखवस्तु किंवा धंदेवाईक म्हणून जाऊन राहूं इच्छिणाऱ्या साम्राज्यांतील प्रजाजनांचा तो उपमर्द आहे. कारण

नि. साम्राज्याचे नागरिक हा एक हिंदी लोकांना नवा जन्मसिद्ध अधिकार मिळालेला आहे; व त्यावर गोऱ्या वसाहतवाल्यांनीं घाला घालणें म्हणजे तो मूळ अधिकारस्थानाचा अर्थात् साम्राज्याचा उपमर्द होय. ज्या हक्कानें ब्रिटिश साम्राज्यांतला कोणताहि गोरा मनुष्य हिंदुस्थानांत येऊन राहूं शकतो व उद्योगधंदा करूं शकतो त्याच हक्कानें हिंदी मनुष्य द. आफ्रिकेंत जाणार व राहणार. असें असतां एकाचा हक्क मानला जावा व दुसऱ्याचा मानला जाऊं नये हा कोणता न्याय ? व हा अन्याय जर चालूं द्यावयाचा तर ब्रिटिश साम्राज्य हें साम्राज्य कसलें ? आणि त्या साम्राज्याचा बादशहा हा बादशहा कसला ! गोऱ्या वसाहतवाल्यांच्या अन्यायाचा उपसर्ग हिंदी लोकांच्या पुरताच नसून तो ब्रिटिश साम्राज्याच्या मुळाशीं जाऊन भिडत आहे. अर्थात् हा अन्याय चालूं देणें म्हणजे ब्रिटिश साम्राज्य हें राज्य नसून अराजक आहे, तें नांदतें घर नसून तो उचल्यांचा बाजार आहे, तो उढाणटप्पूंचा अड्डा आहे किंवा चोर–दरवडेखोरांची ती गढी आहे अशी कबुली देण्यासारखेंच आहे. आणि मग असें कोणीं म्हटल्यास किंवा राजनिष्ठा हा शब्द निर्मूल ठरतो असें मानल्यास त्यांत वावगें तें काय ?

अशा रीतीनें साम्राज्य हें नांव निंदास्पद किंवा गर्हणीय ठरल्यास त्याचा दोष हिंदी लोकांकडे नाहीं. द. आफ्रिकेच्या नव्या राज्यघटना कायद्याचें कलम १४७ प्रमाणें हिंदी एशिॲटिक किंवा इतर वसाहतवाले यांसंबंधानें द. आफ्रिकन पार्लमेंटानें कोणताहि कायदा करावयाचा तर तो कायदा होण्याला वसाहतींतील मुख्य साम्राज्याधिकारी जो गव्हर्नर-जनरल त्याची संमति लागते; व अशा कायद्याची अंमलबजावणी कशी काय होते या विषयीं लक्ष घालून देखरेख ठेवण्याचा अधिकारहि राजप्रतिनिधि म्हणून त्याला आहे. आणि हल्लीं डॉ. मेलन यांनीं पुढें आणलेलें बिल पाहिलें तर त्याच्या योगानें हिंदी लोकांना स्वाभिमानानेंच काय, पण स्वाभिमान गुंडाळून ठेवून देखील द. आफ्रिकेंत राहणें यापुढें अशक्य होणार आहे. हिंदी लोकांना बळजबरीनें उचलून आगबोटींवर घालून हिंदुस्थानाच्या किनाऱ्यावर नेऊन सोडून देणें येवढेंच काय तें आतां शिल्लक उरलें आहे. बाकी तेथें हिंदी लोकांना राहणें किती अवघड करून ठेवण्यांत आलें आहे हें पाहिलें, म्हणजे आफ्रिकन सरकारनें इतका द्राविडी प्राणायाम तरी कां करावा हें समजत नाहीं. कारण द. आफ्रिकेंत हिंदी वसाहतवाल्यांची संख्या हल्लींहून फ़ारच कमी झाल्याशिवाय हा तंटा तुटणार नाहीं, असें डॉ. मेलन यांनीं आपल्या भाषणांत व सांगितलें आहे.

आपल्या राज्यांत अमुक लोक येऊं देऊं किंवा येऊं देणार नाहीं, किंवा आले तर राहूं देऊं किंवा राहूं देणार नाहीं, हें ठरविण्याचा हक्क सामिरक दृष्ट्या प्रत्येक सरकारला असतो. आणि आजवर त्याचा शिष्टसंमत उपयोग म्हटला म्हणजे गुन्हेगार, बदमाष, बंडखोर अशा लोकांना प्रतिबंध करणें इतक्यापुरताच होता. पण या अधिकारानें अलीकडे आपले हातपाय पसरल्यामुळें सज्जन, सुशिक्षित, स्वावलंबी, कामधंदा करणारे व चालीरीतीनें राहणारे अशा लोकांनाहि केवळ वर्णद्वेषामुळें मज्जाव होऊं लागला आहे ! याला स्वयंनिर्णय हें गोड नांव देतां येणार नाहीं असें नाहीं, पण 'स्वयं' शब्दाचा अर्थ

करतांना अनुयोगी–प्रतियोगी, वादी–संवादी–विवादी, श्रेष्ठ–कनिष्ठ या सर्व संबंधांचा विचार करावा लागतो. वसाहतींत हिंदी लोकांना मज्जाव करणें हें स्वयंनिर्णयाच्या शास्त्राप्रमाणें शुद्ध ठरेल, तर हिंदुस्थानांत गोऱ्या वसाहतवाल्यांना येऊं न देणें हें तितकेंच शुद्ध मानावें लागेल. बहिष्काराच्या युद्धांत कोणाचें अधिक नुकसान किंवा शेवटीं कोणाला हार खावी लागेल हा प्रश्न वेगळा. पण लोकमताला मान देऊन हिंदुस्थानसरकारला हें प्रतिक्रियेचें धोरण स्वीकारावें लागेल. हिंदुस्थान स्वतंत्र असता तर आधीं मुदतबंदीच्या करारानें हिंदी लोक परदेशांत गेलेच नसते; व जे स्वतंत्र नागरिक गेले असते, त्यांचें संरक्षण हिंदी सरकारनें बरोबर केलें असतें. चीन, सोडन, वगैरे ठिकाणीं जाऊन परक्या लोकांच्या कामांत नसता उपद्व्याप करण्याकरितां जें हिंदी सैन्य हल्लीं पाठविण्यांत येतें, त्याऐवजीं द. आफ्रिकन सरकारची गुर्मी जिरविण्याकरितां हिंदुस्थानचा सेनापति आपलें सैन्य घेऊन द. आफ्रिकेवर चालून गेला असता. पण हिंदुस्थानाच्या परतंत्र स्थितींत हें घडणें अर्थात् शक्य नाहीं. तथापि प्रतिक्रिया या नात्यानें गोऱ्या वसाहतवाल्यांवर हिंदुस्थानसरकारास आजहि बहिष्कार घालतां येईल. पण हिंदी सरकार हें जवळ जवळ इंग्रजमय असल्यामुळें ही साधी गोष्ट देखील बिनहरकत घडून येत नाहीं. 'रेसिप्रॉसिटी' म्हणजे 'जशास तसें' वागविण्यासंबंधीं निश्चयाचा ठराव ले. असेंब्ली करूनहि चुकली आहे. पण सरकार त्याविषयीं नियम करून अजून त्याची अंमलबजावणी करीत नाहीं.

पण ही स्थिति अशीच फार दिवस टिकूं शकणार नाहीं. साम्राज्य–सरकारला तिन्हाईतपणाची वृत्ति टाकून, उघड पक्षपात करण्यास सिद्ध होऊन, कोनियाप्रमाणें द० आफ्रिकेंतहि गोऱ्या वसाहतवाल्यांची बाजू उचलून धरावी लागेल. कारण ज्या कामाकरितां हिंदी लोक प्रथम जात नसतां मुदतबंदीच्या करारानें त्यांना वसाहतींत भुलथापीनें नेण्यांत आलें, त्याच कामाकरितां आतां स्वतंत्र हिंदी लोकांना तेथें राहूं द्यावयाचें नाहीं, हें धोरण ठरून चुकलें आहे. पूर्वी संपत्तीच्या उत्पादनाकरितां हिंदी लोक हवे होते. आज उत्पन्न झालेल्या संपत्तींत ते पर्यायानें अंशभागी होणार म्हणून नकोत. पण द. आफ्रिकाच काय, खालीं केप ऑफ गुड होपपासून वर कायरोपर्यंत म्हणजे आफ्रिकाखंडाच्या दक्षिण टोकापासून तों उत्तर टोकापर्यंत–इंग्रजांना गोऱ्या वसाहती वठवावयाच्या असून या दोन टोकांस जोडणाऱ्या आगगाडीनें या सर्व वसाहतींचा एकजीव करून ब्रिटिश साम्राज्याला एक नवा आधारस्तंभ निर्माण करावयाचा आहे. द. आफ्रिकेंत आजवर झाली ती लूट कांहींच नाहीं; खरी लूट यापुढेंच आहे !

ही लूट ईश्वर चालूं देणार की काय हा प्रश्न वेगळा. आफ्रिकेंत नीग्रो लोकांची लोकसंख्या बारा कोटी आहे. पण हे सर्व लोक अद्यापि मागसलेले आहेत. नगररचना, गोत्रबंधन, किंवा सामान्य वाच्यलेखन अशासारख्याहि गोष्टी त्यांना अद्यापि येत नाहींत. तथापि आपोआप त्यांच्यामध्येंहि जागृत झाली असून द. आफ्रिकेंत तरी त्यांच्यामध्यें गोऱ्या लोकांविषयीं द्वेष व स्पर्धा उत्पन्न झाली आहे. बंड करण्याचा अनुभवहि त्यांनी एक वेळ घेतलेला आहे. मात्र त्यांचें बंड यशस्वी झालें नाहीं. हे काळे रहिवाशी स्थानिक अधस्था-

मुळें वाईट हवापाण्यांतहि ते वाढतात; व रोग्यांनीं त्यांना खाण्याऐवजीं अनेक ठिकाणीं तेच रोगाला खाऊन गेले असेंहि म्हणतां येईल. तथापि चांगली जमीन व चांगली हवा कोणती हें या काळ्या मनुष्यालाहि आतां कळूं लागलें आहे. आणि या दृष्टीनें आपल्या देशाचा जेवढा चांगला भाग तेवढा गोरा वसाहतवाला अडवून बसला असून आपल्याच देशांत आपण परकें व बहिष्कृत बनल्याची जाणीव त्यांच्या मध्यें उत्पन्न झाली आहे. तेव्हां ही लूट तरी यापुढें इंग्रजांना बिनहरकत लुटतां येईल कीं नाहीं हा प्रश्नच आहे.

पण आफ्रिकन लोक व गोरे लोक यांच्या हितविरोधाच्या प्रश्नाशीं आपणांस कांहीं कर्तव्य नाहीं. आज आपला प्रश्न हिंदी लोकांपुरता आहे, व ज्या साम्राज्याचें छत्र काळ्या-गोऱ्यांवर उभें आहे तें सावली तेवढी सगळी गोऱ्यांना व ऊन तेवढें सगळें हिंदी लोकांना देणार कीं काय असा रोकडा सवाल उत्पन्न झालेला आहे. आणि याचें उत्तर देतांना प्रधानमंडळाला वसाहतवाल्यांशीं दोन हात करण्यास तरी तयार झालें पाहिजे किंवा साम्राज्य म्हणजे नुसता कपटाचा खेळ आहे अशी कबुली तरी देण्यास तयार झालें पाहिजे. जो कांहीं मिळकत ठेवीत नाहीं अशा दत्तक बापाचें श्राद्ध दत्तक मुलगा कशाला करील? साम्राज्यांतर्गत स्वराज्य या शब्दांचा फोलपणा लोकांच्या बुद्धिप्रत्ययाला येण्याला द. आफ्रिकेंतील हब्शींच्या गोंधळाइतकें दुसरें चांगलें साधन क्वचितच मिळालें असतें. आजच्या स्थितीत हिंदुस्थानाच्या दृष्टीनें साम्राज्यसत्तेला उपमा द्यावयाची तर ती शेळीच्या शेपटी-चीच दिली पाहिजे. शेळीची शेपटी अंगावरच्या माशा वारील इतकी लांब नसते व लाज झांकील इतकी रुंद नसते. ब्रि. साम्राज्य हें हिंदी लोकांचें संरक्षण करूं शकत नाहीं व लाजहि राखूं शकत नाहीं. म्हणून फंदी कवीचें अनुकरण करून हिंदुस्थानानें आतां असें विचारलें पाहिजे कीं, "ना करी रक्षण ना दे भूषण ऐसें साम्राज्य कशाला?" या प्रश्नानें आज द० आफ्रिकेंतल्या रहिवाश्यांचें दुःख निवारण होण्याला प्रत्यक्ष उपयोग होणार नाहीं हें खरें; तथापि स्वराज्याच्या चळवळींत राजकीय परिस्थितीचें असलें सविकल्प ज्ञान अत्यंत उपयुक्त आहे व एवढ्याकरितांच गेल्या रविवारीं आसेतु हिमाचल सर्वत्र जाहीर सभा भरून ब्रिटिश साम्राज्याचें हें खरें स्वरूप उघड करून दाखविण्यांत आलें.

—केसरी, १९२५ ऑक्टोबर १३

## बंड करण्याचा जन्मसिद्ध हक्क

...आत्मसंमतीशिवाय प्रस्थापित झालेल्या कोणत्याहि सत्तेविरुद्ध बंड करणें हा मनुष्यमात्राचा जन्मसिद्ध हक्कच आहे. आणि आम्ही वर दर्शविल्याप्रमाणें राजनीति सांगणारे तत्त्ववेत्ते तो हक्क कबूल करतात. इतकेंच नव्हे तर जॉर्ज वॉशिंग्टनसारख्या भल्या भल्या राजनिष्ठ लोकांनींहि तो अमलांत आणला व दादाभाईसारख्या सत्त्वनिष्ठ तपोनिधीच्या तोंडून त्याचा भरसभेंत उच्चार झाला. मग जे देशभक्त पुढारी दादाभाईइतके प्रतिष्ठित असून अधिक राजस बुद्धीचे, ज्यांच्या ठिकाणीं दादाभाईपेक्षां मनुष्यस्वभावाचें ज्ञान अधिक खोल, चढत्या काळाच्या वाढत्या राष्ट्रीय भावनेनें अनेक नवीन मार्ग ज्यांच्या

दृष्टिपथांत आले, त्यांच्या मनांत किंवा नैमित्तिक संभाषणांत बंड करण्याच्या हक्काची तात्त्विक चर्चा केव्हां उमटल्यास तो असा काय घोर अपराध झाला ? सनदशीरपणाचा पतिव्रताधर्म उपदेशून नवेरशाहीच्या जुलमाखालीं प्रजेनें मुकाट्यानें मान वांकविण्यास तिचें मन वळविण्याचे कपटनीतीचे दिवस इतर देशांप्रमाणें याहि देशांत आतां संपले आहेत.

## त्यांत अशक्य तें काय ?

बंड आज कोणी उपदेशीत नाहीं किंवा कोणाला तें आज शक्यहि वाटत नाहीं. टिळकांसारखे लोक प्रत्यक्ष अत्याचाराविरुद्ध तरुणांना उपदेश करतात. ज्यांना निर्भयपणाची मूर्ति असें लोक मानतात, संतकवि तुकारामबुवांच्या उक्तीप्रमाणें 'आपुलें मरण पाहिलें म्यां डोळां' असें म्हणण्याची ज्यांची तयारी, व सरकारचें गुणवर्णन करतांना त्यांना सैतान म्हणण्यापर्यंत ज्यांची मजल जाते ते मूर्तिमंत अत्याचारितावादी गांधीहि राष्ट्रीय सभेचें 'क्रीड' बनवितांना आपली मजल 'नरो वा कुंजरो' वा असें ठेवण्यापलीकडे नेत नाहींत; स्वातंत्र्य हें साम्राज्यांतच मिळालें तर तें अधिक इष्ट, नाइलाजच तर साम्राज्याबाहेर जाऊन मिळविणें प्राप्त, असें स्पष्ट भाष्य करण्याची सावधगिरी बाळगितात व अनत्याचारित्वाचा उपदेश धडा करून घेण्यापर्यंत नेतात. अशा स्थितींत कोणत्याहि हिंदी पुढाऱ्यांवर बंडखोर वृत्तीचा छाप मारूं पाहणें निवळ बाष्कळपणाचें आहे. त्याहूनहि बाष्कळपणा हा कीं, अशा पुढाऱ्यांच्या तोंडून प्रसंगोपात्त मोठे तेजस्वी किंवा जहाल विचार प्रकट झाले तर ते कृतींत उतरविण्याइतका मर्दपणा त्यांच्या अंगीं नाहीं असा फिरून उलटा एक आरोप त्यांजवर करणें ! पण या दोनहि आरोपांना आम्ही फिरून स्पष्ट उत्तर देतों कीं, बंड करणें आजच्या घटकेला प्राप्त झालेलें नाहीं, कोणाला तें प्राप्त वाटलें तरी शक्य नाहीं, मिळून ती गोष्ट आज कोणी उलट किंवा सुलट लक्षांतहि घेण्याचें कारण नाहीं. तथापि स्वराज्य मिळविण्याचा ज्यांना जन्मसिद्ध हक्क आहे त्यांना, ज्या प्रसंगीं जे उपाय अपरिहार्य ठरतील त्या उपायांनीं तें मिळविणें हाहि ईश्वरदत्त व जन्मसिद्ध हक्क आहे यांत शंका कसली ? आणि समजा कीं, कधीं काळीं तसा प्रसंग आलाच तर टिळक–दास–नेहरू वगैरे पुढारी ज्या वर्गाचें उपलक्षण होत त्या वर्गांतील भावी पुढारी त्या प्रसंगीं निर्वाणीचें शस्त्र घेऊन बाहेर पडण्याचें धैर्य दाखवितील, त्यांत माघार घेणार नाहींत. ब्रिटिश साम्राज्यावर परचक्र आलें असतां फ्रान्सच्या रणभूमीवर जाऊन तें परतविणारे निधड्या छातीचे लोक ज्या हिंदुस्थानांत निपजतात त्यांत स्वतःच्या देशांत व स्वतःच्या देशाकरितां जरूर पडली तर बंड उभारून स्वतःचा जीव धोक्यांत घालण्याला लोक मिळणार नाहींत हें कसें सिद्ध होईल ?

## सुशिक्षितांवरील एक आरोप

येऊन जाऊन यावर उत्तर देवं कीं, हें धैर्य अंगीं असणारी माणसें हिंदुस्थानांतहि आहेत, पण तीं इतर वर्गांत आहेत, सुशिक्षितांत मिळणें नाहीं. पण सुशिक्षित वर्गाची ही

निवळ बदनामी होय असें आम्ही स्पष्ट सांगतों. १८५७ चें बंड निरक्षर शिपायांनी केलें, पण गेल्या तीस वर्षांत हिंदुस्थानांत जी प्रखर चळवळ झाली ती सर्व सुशिक्षितांनींच केली, त्यांत अशिक्षितांचा भाग नाही. या चळवळीचा हेतु बंडाचा नव्हता व तिला प्रत्यक्ष बंडाचें स्वरूप चुकूनहि केव्हां आलें नाही. तथापि या चळवळींत धैर्य, धाडस व स्वार्थत्याग हे गुण कसोटीला लागण्यासारखे शेंकडों प्रसंग घडून आले व त्या शेंकडों प्रसंगीं सुशिक्षित लोक या कसोटीला पूर्णपणें उतरले. शिक्षणानें मनुष्याच्या मनांत एक प्रकारें विवेकाची वृद्धि होते, व ज्या प्रमाणानें विवेक वाढतो त्या प्रमाणानें अनिश्चितता व अनिश्चयामुळें भीति वाढते ही गोष्ट खरी. परंतु शिक्षणाच्या या दुष्परिणामाची मर्यादा आतां गांठली गेलेली असून सुशिक्षित झाला तरी तोहि संमोह नदी उतरून पैल तीराला जातो व कार्यकृत् होतो हा रोकडा अनुभव आतां आलेला आहे. पिनल कोडाच्या व्याप्तींत सांपडल्यानें ज्यांना तुरुंगवास घडला, अशांपैकीं पुष्कळांनीं तो आनंदानें स्वीकारला. कित्येकांनीं तर उत्पन्ना डोळ्यांना दिसणाऱ्या गळफांसांत आपली मान गुंतविली व पेटलेल्या खाईंत देशाचें नांव घेऊन उडी टाकून सतीचें वाण सुशिक्षित पुरुषहि घेऊं शकतो हें दाखविलें आणि पुढेंहि हेंच दाखविणारी पिढी अबाधित निपजत जाईल यांत आश्चर्य कसलें? परकीय साम्राज्याच्या युद्धांत सरकार क्षात्रवृत्तीला हांक मारतें त्याला जर ओ मिळते, तर खुद्द देशानें ती हांक मारली असतां त्यालाहि ती मिळणारच. पुढाऱ्यांच्या बंडखोरीचा गवगवा करणारा 'हिस्टेरिकल' हा आपल्या लेखावरून जरी सरकारपक्षपाती दिसला तरी त्याच्यासारख्यावर ईश्वरकृपा झाल्यास तोहि राष्ट्राला स्वातंत्र्य मिळवून देण्याच्या कार्यांत यथोचित भाग घेणार नाही कशावरून? सरकारपक्षपाती लोक झाले तरी त्यांचे अंगीं पौरुषगुण नसतात असें नाही. त्यांच्या वीरवृत्तीचा सर्व उपशम स्वार्थबुद्धि कमावण्यांत व ती फलप्रद करण्यांत होतो इतकेंच काय तें दुर्दैव. ज्या वेळीं अमेरिकेच्या यशस्वी व उदात्त उदाहरणानें आयर्लंडाला राष्ट्रीय स्वातंत्र्याची चळवळ करावीशी वाटली तेव्हां स्वयंसेवकांचें जें मोठें सैन्य उभारलें गेलें तें सुशिक्षित लोकांतूनच. त्यांना कवाईत शिकविण्याची व्यवस्था झाली, त्यांच्या पलटणी बनविल्या गेल्या. त्यांचे अधिकारी नेमले गेले, या अधिकारी वर्गांत बहुतेक पुढारी सामील असून आपापल्या योग्यतेप्रमाणें निरनिराळ्या हुद्द्यांच्या जागा त्यांनीं पत्करिल्या होत्या, आणि "दिवसा हातांत लेखणी घेऊन उत्कृष्ट लेख लिहिणारा अगर रात्रीं पार्लमेंटामधील वादविवादांत वक्तृत्वानें इतरांस दिपवून टाकणारा असा आयरिश देशभक्त सकाळीं पाहावें तों मैदानावर तलवार लटकावून कामिटाकडून कवाईत व सलामी घेत आणि वरिष्ठांना कवाईत व सलामी देत उभा असलेला दृष्टीस पडे." अशा प्रकारचा देखावा हिंदुस्थानांतहि दृष्टीस पडणें हें खरोखर कल्पनातीत आहे काय?

## बंडखोरीविरुद्ध खरा उपाय

अधो. पूर्वी प्रो. सिज्विक यांचा उतारा दिला त्यांत लिहिल्याप्रमाणें जुन्या राष्ट्रीय भावनेचा आपोआप विधर पडेपर्यंत, किंवा नवी राष्ट्रीय भावना उत्पन्न होऊन ती जुनीचा

विसर पाडीपर्यंत, प्रजेचा बंड करण्याचा जन्मसिद्ध नैतिक हक्क जागृतच राहणार, या नव्या भावनेचा उदय हिंदुस्थानांत होऊं लागला आहे. पण तो त्या भावनेचा अद्यापि फक्त अरुणोदय आहे. पूर्ण बिंबयुक्त असा सूर्योदय नाहीं. कारण त्या भावनेला अनुरूप अशी सत्ता व ती वापरण्याला सोयीच्या अशा प्रातिनिधिक संस्था अद्यापि कांहीं निर्माण व्हावयाच्या आहेत व आहेत त्यांना अधिक स्वातंत्र्य मिळावयाचें आहे. महाराष्ट्रांत तर, शिवकिकनें म्हटल्याप्रमाणें, जुन्या स्वराज्याचा अद्यापि विसर पडलेला नाहीं. यामुळें नव्या सत्तेविरुद्ध प्रतिकार करण्याची सात्त्विक कल्पना कोणाच्या विचारचर्चेत किंवा संभाषणांत आल्यास ती स्वाभाविकच मानली पाहिजे. ती स्वाभाविक म्हणूनच टिळकांच्या आठवणींत तसलीं संभाषणें प्रसिद्ध करण्यांत कोणास हरकत वाटली नाहीं. आणि पंडित मोतिलाल नेहरू यांनीं बंड करण्याच्या तात्त्विक हक्काचा जो मुंबईस उच्चार जाहीर रीतीनें केला तोहि स्वाभाविक म्हणूनच. केवळ अशा उद्गारांनीं तरुण मुलें अत्याचारास प्रवृत्त होतात, हें म्हणणें खोटें आहे. असला बादरायण कार्यकारणसंबंध खरा मानला तर त्याची संगीन साखळी बादशहाच्या सिंहासनाला जाऊन भिडलेली आहे असा माग लागूं शकतो. कारण बंड करण्याची खरी प्रवृत्ति बंडाची नुसती चर्चा कानांनीं ऐकून उत्पन्न होत नाहीं तर पारतंत्र्याचा वीट व जुलमाची चीड काळजापर्यंत जाऊन भिडते तेव्हां! म्हणून हें घडून येण्याला स्वतः सरकारच कारणीभूत होत असतें. वैराग्य हें नुसत्या गुरूपदेशापेक्षां संसारपीडेनेंच अधिक खात्रीनें बाणत असतें. करितां बंडाची भाषा कधीं कानावर येऊं नये असें कोणास वाटत असेल तर त्यानें एकतंत्री सत्तेची संपादणी न करतां लोकांना खरी सत्ता देण्याचाच उपदेश सरकारला करावा. बंड ही एक नैसर्गिक प्रतिक्रिया आहे, व परिस्थितीप्रमाणें समाजांत तें प्रत्येकाला करावें लागतें. प्रजाच तेवढी बंड करते असें नाहीं; राजेहि बंड करतात. इंग्लंडच्या पहिल्या चार्लस राजानें आपल्या पार्लमेंटाविरुद्ध बंड केलें व तिसऱ्या जॉर्जनें आपल्या मंत्रिमंडळाविरुद्ध बंड केलें. जॉर्ज हा मऊपणानें वागतो त्यामुळें त्याचें प्रधानमंडळ शिरजोर झालें आहे. असें पाहून त्याच्या महत्त्वाकांक्षी आईनें त्याला "George, be king" "बाळ तूं राजा हो!" असा उपदेश केला, तो प्रसिद्ध आहे. आधींच राज्यपदावर असलेल्या मुलाला 'तूं राजा हो' या म्हणण्याचा अर्थच हा कीं, तूं आपली सत्ता प्रस्थापित कर म्हणजे प्रधानमंडळाविरुद्ध बंड कर. मुद्राराक्षसांतहि राजा चंद्रगुप्त याला आर्य चाणाक्याविरुद्ध अखेर बंड करावें लागलें असेंच दर्शविलें आहे. हल्लीं पुण्याच्या रंगभूमीवर 'राजाचें बंड' या नवीन नाटकाचे प्रयोग सुरू आहेत. त्यांतील काल्पनिक राजाच्या बंडाचें काल्पनिक उदाहरण एका जुन्या संस्कृत नाटकांतहि सांपडतें. कवि म्हणतो—

अत्युच्छ्रिते मंत्रिणि पार्थिवे च विष्टभ्य पादावुपतिष्ठते श्रीः ।
सा स्त्रीस्वभावादसहा भरस्य तयोर्द्वयोरेकतरं जहाति ॥

याचा अर्थ राजा आणि मंत्री हे दोनहि सारखेच ताठर व महत्त्वाकांक्षी मिळाले असतां राज्यश्रीला म्हणजे निर्णायक सत्तेलाहि पाय सुखरूपणारखे दोघांच्या खांद्यावर

उभें राहावें लागतें. पण स्त्रीस्वाभाविक नाजूक प्रकृतीमुळें ही श्रमाची कसरत तिला सोसत नाहीं, म्हणून शेवटीं तिला त्या दोघांपैकीं कोणा एकाचा तरी त्याग करावा लागतो.' राज्यसत्तेनें अधिष्ठान बदलणें यांचेंच नांव राज्यक्रांति व तें बदलण्यास भाग पाडणें यांचेंच नांव बंड! मग यथाप्रसंग यथानुकूल त्या बंडांत शस्त्रास्त्रांचा उपयोग असो या नसो. 'हिस्टिरिकस'सारख्यांनीं हे राजनीतीचे सिद्धांत लक्षांत घेऊन हिंदी पुढाऱ्यांच्या बंडखोरीचा याष्कळ गवगवा करण्याचें सोडून दिलें, तर असल्या प्रश्नांची अशी चर्चा करण्याचेंहि कोणास कारण पडणार नाहीं.

—केसरी, १९२४ डिसें. १६

## लष्करी अधिकाराची मागणी

सरकारी लष्करांतील वरिष्ठ अधिकारांच्या जागांवर हिंदी लोकांची नेमणूक व्हावी ही आपली मागणी पुष्कळ जुनी आहे. मुलकी खातें वसुली खातें, रेल्वेखातें, पोस्ट खातें इंजिनिअरिंग खातें, इत्यादिमध्यें हिंदी अधिकाऱ्यांचें प्रमाण युरोपिअन अधिकाऱ्यांच्या बरोबरीनें, किंबहुना कित्येक ठिकाणीं शेंकडा ७०–७५ टक्के, असावें ही मागणी सरकारनें मान्य केलेली असून अलीकडे तिचा थोडाबहुत अम्मलहि होत आहे. परंतु लष्करी अधिकाराच्या जागा अजून सरकारनें अगदीं राखीवांतल्या राखीव अशा मानलेल्या होत्या. तिच्या सोवळेपणाला हिंदी मनुष्याचा, कांहीं मर्यादेपलीकडे, स्पर्शहि होऊं नये अशी दक्षता त्यांनीं आजवर घेतली होती. पण भरतीचें पाणी एकदां भरूं लागलें म्हणजे तें लहान सहान प्रवाहांतून ड्बक्यांतून तेवढें भरावें आणि मोठ्या नद्यांतून तें भरूं नये हें शक्य नाहीं. त्याप्रमाणें, मोठा पगार मोठा मान आणि मोठा अधिकार ज्यांत आहे अशा वरिष्ठ प्रतीच्या जागा, मग त्या कोणत्याहि खात्यांतील असोत. लष्कर झालें म्हणून काय झालें; त्याहि हिंदी लोकांना मिळाव्या अशी आकांक्षा सर्वथा स्वाभाविक असून, त्या दृष्टीनें आज ४० वर्षें ती एक मागणी म्हणून लोकांकडून मागण्यांत येत आहे.

वास्तविक हिंदी लोकांना वरिष्ठ अधिकाराच्या जागा देण्यावांचून सरकारला गत्यं-तरच नसतें. या बाबतींत ते करतात तें सर्व उपकारार्थच असतें असें नाहीं. कारण प्रत्येक वरिष्ठ अधिकाराची जागा गोऱ्या मनुष्यादिवाय दुसऱ्याला देऊं नये असें सरकारनें मनाशीं ठरविलें असलें तरी, अशा सर्व जागा भरण्यापुरते युरोपियन उमेदवार मिळत नाहींत, असा अनुभव येतो. अर्थात् जागा रिकाम्या ठेवण्यापेक्षां त्या हिंदी उमेदवारांना याव्या, आणि स्वार्थ साधून परमार्थाचा आवहि घालावा, असें सरकारचें नेहमींचें धोरण असतें; पण लष्करी खात्यासंबंधानें पाहतां जागा रिकाम्या राहिल्या तरी पुरवल्या, परंतु हिंदी मनुष्याला त्या द्यावयाच्याच नाहींत, असा निश्चय झाल्यासारखें सरकारचें वर्तन घडत आहे. पण हा कोंडीदेखील फोडावी अशा इर्षेनें, हिंदी जनतेनें मागणी सुरू केली असल्या-मुळें सरकारनें ती सर्वस्वी अमान्य करणें, आतां अशक्य झालें आहे.

चाळीस वर्षांपूर्वी ड्यूक ऑफ कॅनॉट हे मुंबई इलाख्याचे सेनापति असतां हिंदु-

स्थानांत लष्करी कॉलेज काढण्याची चळवळ झाली होतीच हें महाराष्ट्रांतील मुख्या पिढीच्या वाचकांस स्मरत असेलच. पण तीच गोष्ट आज फिरून नवी झाल्यासारखी लोकांपुढें स्कीन-कमिटीच्या प्रसंगानें आलेली आहे. स्कीन कमिटीलाच सॅन्डर्स्ट कमिटी असेंहि नांव आहे. तिच्यावर बॅ. जिना, कॅ. जोरावरसिंग, कॅप्टन आबासाहेब हफळे, सर अबदुल कयूम वगैरे हिंदु-मुसलमान सभासद नेमण्यांत आले होते. स्वराज्यपक्षाचे अध्वर्यू पं. मोतीलाल नेहरू यांची नेमणूक ह्याच कमिटीवर झाली होती. ती त्यांनी स्वीकारिलीहि होती, आणि त्या जागेचें कांहीं दिवस कामहि केलें होतें. पण स्वतःच्या पक्षांतील गांधिलमाशांनी चावचावून खाल्ल्यामुळें हें प्रतियोगी सहकारांचें धोरण पंडितजींना मोठ्या दुःखानें टाकून द्यावें लागलें आणि त्यांनीं आपल्या जागेचा राजीनामा दिला. या कमिटीनें हिंदुस्थानांत, विलायतेंत व अमेरिकेंत पुरावे घेतले, आणि तिचा अखेरचा रिपोर्ट हल्लीं सरकारकडून नुकताच प्रसिद्ध झाला आहे. पं. नेहरू हे आपल्या जागेला चिकटून राहिले असते तर किती चांगलें झालें असतें! कारण जिनाप्रभृति राष्ट्रीय दृष्टीच्या सभासदांना त्यांची मदतच झाली असती. पण करनकऱ्याच्या चाळ्याच्या भुतानें पंडितजींना पछाडिलें असल्यामुळें, इतर अनेक चुकांप्रमाणें या कमिटीचा राजीनामा देण्याची चूकहि त्यांच्या हातून घडली. ह्या गोष्टीचें दुःख करण्यांत आज कांहीं फायदा नाहीं. तथापि पंडितजींच्या या राजीनाम्याच्या कारणामुळेंच स्कीन कमिटीहि लोकांना एरवींहून अधिक माहीत झाली आहे, एवढ्याकरितांच ह्या गोष्टीची आठवण आज वाचकांस दिली आहे.

या कमिटीचा सविस्तर रिपोर्ट अद्यापि हातीं आलेला नाहीं. तथापि त्यांतील मुख्य सूचना समजल्या आहेत. त्या अशा कीं, १९३३ सालीं हिंदुस्थानामध्यें लष्करी शिक्षणाचें एक कॉलेज सरकारनें काढावें. त्यांत हिंदी तरुण मुलांना उमेदवार म्हणून घ्यावें. आणि योग्य तें लष्करी शिक्षण ठराविक मुदतीपर्यंत देत जावें. हें शिक्षण घेऊन बाहेर पडणाऱ्या विद्यार्थ्यांना लष्करी खात्यांतील वरिष्ठ जागांतील खालच्या जागेवर दाखल करून घ्यावें. यथाक्रम वरच्या जागा पुढें त्यांना देण्यांत याव्या. आणि हिंदी लोकांची ह्या खात्यांत अशी भरती करतांना हेंहि धोरण सरकारनें लक्षांत ठेवावें कीं सन १९५२ सालीं, म्हणजे लष्करी कॉलेज स्थापल्यापासून सुमारें २० वर्षांच्या आंत लष्करी खात्यांतील वरिष्ठ अधिकाराच्या एकंदर जागांपैकीं निम्म्या जागांवर हिंदी लोक असावेत. हा रिपोर्ट लिहिला गेल्याला आज बरेच दिवस झाले, म्हणून दिल्ली असेंब्लीमध्यें बॅ. जिना यांनीं नुकतीच अशी तक्रारहि केली कीं, हा रिपोर्ट प्रसिद्ध करण्याचे कामीं निष्कारण विलंब लावला जात आहे. पण हा विलंब कां लागला असावा त्याचें कारण रिपोर्टाचें तात्पर्य जें वर दिलें आहे, तें लक्षांत घेतां कोणालाहि सहज कळून येईल. १९३३ आणि १९५२ हीं दोन सालें अजून दूरच आहेत. परंतु ह्या दोन सालीं ज्या गोष्टी घडाव्या असा अभिप्राय स्कीन कमिटीनें दिला आहे. त्याचे नुसते शब्द पेंढले तरी त्या इतक्या महत्त्वाच्या आहेत कीं, हिंदद्वेष्ट्या गोऱ्या लोकांना त्या मोठ्या भयंकरच वाटाव्या. ज्यांनीं हिंदी मनुष्य हा सुभेदार-मेजर किंवा रिसालदार-मेजर या हुद्द्यापलीकडे गेलेला आजवर

पाहिजेल्या नाहीं त्यांना तो आज लेफ्टनंट, उद्यां कॅप्टन, परवां मेजर, तेरवां कर्नल आणि पुढें केव्हां तरी कां होईना पण सेनापति झाला, ही गोष्ट कल्पना करण्याला भयंकर वाटावी यांत आश्चर्य नाहीं.

हलीं काळें लष्कर आणि गोरें लष्कर असे लष्कराचे दोन तटच पडल्यासारखें सरकारनें करून टाकलें आहे. पांच काळ्या शिपायांना दोन गोरे शिपाई याप्रमाणें सैन्याची भरती कायम ठेवण्यांत येत असते. काळ्या सैन्यावर देखील वरिष्ठ अधिकारी गोरेच; मग गोऱ्या सैन्यावर वरिष्ठ अधिकारी गोरेच असणार यांत काय नवल ? ह्या काळ्यागोऱ्या सैन्यांकरितां मिळून आज सुमारें ७००० वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या जागा आहेत. आणि एवढ्या सैनिकांत आज हिंदी किती असें विचाराल तर त्याचें उत्तर ८ किंवा १० यांहून दुसरें देतां येत नाहीं. पण हे ८ किंवा १० वरिष्ठ अधिकारी देखील अद्यापि लेफ्टनंट आणि कॅप्टन ह्या हुद्द्यांपलीकडे गेलेले नसून, ह्यांची नेमणूक काळ्या सैन्याच्या तुकडीवरच झालेली आहे. दिवाणी मुलकी खात्यांतच वरिष्ठांतलि वरिष्ठ जागांवर हिंदी मनुष्य सरकारला खपतो, पण लष्करी मानाची अशी कांहीं चमत्कारिक कल्पना गोऱ्या लोकांनीं करून ठेवली आहे कीं, तिजमुळें तुमचा हिंदी लष्करी मनुष्य कितीहि उमदा सुशिक्षित व लढवय्या असला तरी, यःकश्चित् फाटक्या गोऱ्या सोजिरावरहि त्याची हुकमत चालूं नये !

जी भावना मुळींच अशुद्ध व न टिकणारी, ती कालांतरानें खिळखिळी होणें प्राप्तच आहे. महायुद्धापूर्वी गर्विष्ठ गोऱ्या राष्ट्रांची अशी जवळ जवळ प्रतिज्ञा असे कीं, आपसांतील युद्धामध्यें आम्हीं कांहीं झालें तरी काळ्या लष्कराची मदत घेणारच नाहीं. पण महायुद्धामध्यें जर्मनांनीं तुर्कांची, इंग्रजांनीं भारतीयांची, व फ्रेंचांनीं आफ्रिकन लोकांची मदत घेतली ही गोष्ट आतां प्रसिद्ध असून, जुन्या ताठर फाजील अभिमानाचें कंबरडें आतां मोडलें आहे. तो अभिमान पुरा कोसळून जाऊन जमीनदोस्त होणें हा फक्त कांहीं दिनावधींचा प्रश्न आहे. स्कीन कमिटीनें काळ्या लोकांना वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या जागा निम्या देण्याला १९५२ सालची मुदत घातली, आणि हिंदुस्थानसरकार व विलायत सरकार ह्यांचे अस्पष्ट प्रगट झालेले अभिप्राय पाहतां, त्या शिफारशींना ते हरताळ फांसणार असेंहि दिसतें ! पण समुद्रकिनाऱ्यावर उभें राहून हातच्या खराट्यानें भरती मागें हटविण्याचें काम जितकें कोणाला शक्य, तितकेंच हिंदी राष्ट्राच्या भावनेला आणि महत्त्वाकांक्षेला प्रतिबंध करणें सरकारला आतां शक्य आहे.

शिक्षणाचा प्रश्नहि असाच सुटणारा आहे. हिंदुस्थानांतल्या हिंदुस्थानांत आज जे गोरे लष्करी अधिकारी आहेत त्यांपैकीं अनेक लोक शिक्षकांचें काम करण्याला विद्येनें लायक व मनानें तयार असतील यांत कांहीं शंका नाहीं. त्यांतहि अगदीं एखादा मुरब्बी आणावयाचा असला तर इतर तज्ज्ञांप्रमाणें तो बाहेरून आणवतां येईल, आणि खर्चाच्या मानानें पाहिलें तर विलायतेंतील गोरे लोक लष्करी अधिकारी म्हणून इकडे आणविण्याकरितां जो खर्च हलीं आम्हांला विलायतसरकारला द्यावा लागतो, त्यामध्यें एक सोडून

तीन कॉलेजें सुद्धां चालूं शकतील. युद्धकला झाली तरी ती कांहीं मुलखावेगळी गोष्ट नाहीं. दिवाणी मुलकी खात्यांतील कामाला जशी एक प्रकारची बुद्धि किंवा शरीरपात्रता लागते तशीच युद्धविषयक कामाला लागते. आणि ह्या भरतखंडांतील अनेक वंशांचा जुना इतिहास पाहिला तर प्रत्येकाची लढवय्येपणाचीच परंपरा होती असें सिद्ध होईल. अलीकडे मात्र ती परंपरा तुटली. आणि वाहत्या नदीमध्यें एखादा डोंगर कोसळल्यानें जसा तिचा कर्दमयुक्त तलाव बनतो त्याप्रमाणें ह्या राष्ट्राची स्थिति परकीयांच्या आगमनानें झालेली आहे. सगळे जिवंत झरे बुजल्यामुळें सांठवणीचें पाणी अशुद्ध दिसलें तर काय नवल? पण ज्याला 'इंडियनायझेशन' म्हणजे अधिकारसंपादनाचें धोरण असें म्हणतात, त्याचा हेतु हा तलाव उकरून त्यांतील जिवंत झरे पुनः वाहते करण्याचाच आहे.

कोणताहि गोरा शिपाई घेतला म्हणजे तो मात्र सोळा आणे योद्धा, आणि, हिंदी शिपाई घेतला म्हणजे तो मात्र टाकाऊ, भित्रा, अव्यवस्थित असें म्हणण्याचें काय कारण? आणि तें खरें कसें असणार? पण एकदां राज्य जिंकून पकड मारून बसलेल्या सरकारनें कितीहि असंबद्ध प्रलाप केले तरी ते आमच्या हातून खोडून निघणार कसे? युद्धकलेंत हिंदी लोक आजहि किती निष्णात आहेत, ते किती शूर आहेत, किती प्रत्युत्पन्नमति आहेत, किती दीर्घसूचक आहेत, ह्या गोष्टीचा अनुभव इंग्रज अधिकाऱ्यांना येत नसेल असें नाहीं. पण या जगांत श्रीमंताला जसा सर्व गुणांचा मक्ता असतो, त्याप्रमाणें सगळें सत्य काय तें सत्ताधाऱ्यांच्या शब्दांत नांदतें; त्याला कोण काय करणार? प्रत्यक्ष राज्यक्रान्ति करून दाखवावी तेव्हां आमची स्वराज्याची पात्रता सिद्ध होणार! इंग्रजांशीं युद्धप्रसंग करून प्रत्यक्ष त्यांचा पराभव करावा तेव्हांच ते आमचें युद्धकौशल्य मानणार! तोंपर्यंत कोणी कितीहि बोललें तरी अर्थात् फुकटच! जितराष्ट्र असलें तरी त्याच्या माथ्यावर नालायकीचा असा सरसकट छाप मारणें याहून प्रजेचा अधिक अपमान किंवा राज्यकर्त्यांचा अधिक अधमपणा कोणता? पण सत्ता ही सर्वभक्षक असते; ती स्वतःच्या दोषांप्रमाणें दुसऱ्याचे गुणहि खाऊन पचनीं पाडूं शकते.

अशी स्थिति आज हिंदुस्थानांत आहे खरी; तरी पण आशा ही चीजहि कांहीं अशी अपूर्व आहे कीं, अपमानबुद्धि आणि उद्दामपणा त्यांच्या दाट आवरणांतूनहि ती बीजांकुराप्रमाणें आपलें डोकें वर काढल्याशिवाय राहत नाहीं. शंभर वर्षेपर्यंत इंग्रजांच्या मनोवृत्तीचा अनुभव आला असतांहि त्यांच्या राज्यांत वरिष्ठ अधिकाराच्या जागा आम्हांला मिळाव्यात अशी इच्छा, आणि भांडणतंडण करण्यानें तरी कां होईना त्या मिळतील अशी आशा ही कांहीं नाहींशी होत नाहीं व नाहींशी होऊन भागतहि नाहीं. मृताच्या पुनरुत्थापनाची उत्पत्ति जड शरीराला लागू असो वा नसो, व्यक्तीच्या आत्म्याप्रमाणें राष्ट्राच्या आत्म्याला ती खचित लागू पडते. आणि म्हणूनच वरिष्ठ अधिकाराच्या जागा आम्ही मागत आहोंत आणि तोंडानें नाहीं नाहीं म्हणत असतां प्रत्यक्ष हातानें त्या देण्याला सरकारला भाग पाडीत आहोंत.

ह्याच दृष्टीनें स्कीन कमिटीच्या ह्या रिपोर्टाकडे आपणांस पहावयाचें आहे. ७००० लष्करी वरिष्ठ अधिकाराच्या जागांपैकीं, निदान ३५०० जागा हिंदी लोकांना मिळणें ही गोष्ट कल्पनातीत वाटते. ह्या निम्म्या जागा मिळाल्यानें देखील राष्ट्राचें समाधान होणें शक्य नाहीं. कारण अधिकाराची जागा कितीहि उंची असली तरी हिंदी मनुष्याचा हात तिला केव्हां तरी पोंचलाच पाहिजे; ही आमची आकांक्षा दृढ आणि अढळच आहे. परंतु भांडण मांडावयाचें तें दुर्दैवानें आज ह्या निम्म्या जागा हातीं पडण्यासंबंधानेंहि नाहीं. तर एकादें लष्करी शिक्षणाचें नामधारी कॉलेज तरी आमचे हितशत्रु आमच्या हातीं लागूं देतात कीं नाहीं हें पाहण्याविषयीं आहे. सरकार आणि त्यांनीं नेमलेलीं कमिशनें हीं आळीपाळीनें यजमान आणि कोठावळे यांचे खेळ खेळत असतात. जेव्हां सरकार उदार यजमानाचें सोंग आणतें, तेव्हां त्यांनीं नेमलेल्या कमिशनच्या कोठावळ्यांचें पोट दुखूं लागतें. उलट एखाद्या कमिशननें उदारपणाच्या सूचना आणि शिफारसी कराव्या असें घडलें तर, पोट दुखणाऱ्या कोठावळ्याचें किंवा अनुदार यजमानाचें अनुकरण सरकार करूं चाहतें. मिळून कमिशन व सरकार यांचें तोंड जुळण्याचा प्रसंग केव्हांच येत नाहीं. ऊन किंचित् तापल्याबरोबर क्षितिजावर ढग उठूं लागतात, त्याप्रमाणें स्कीन कमिटीच्या ह्या ,उपयुक्त आणि किंचित् उदार स्वरूपाच्या सूचना प्रसिद्ध झाल्याबरोबर हिंदुस्थानसरकार व अँग्लोइंडियन लोक यांच्या दुःस्वासानें शंका-कुशंकांचें आभाळ उठूं लागलें आहे. कोणी म्हणतात, हें करून चालेल कसें ? कोणी म्हणतात हें होईलच कसें ? कोणी म्हणतात, हें करण्यापासून काय फायदा ? तीच गोष्ट दुसऱ्या एखाद्या रीतीनें साधत असेल तर कां साधूं नये ? तात्पर्य शंका उत्पन्न करून प्रतिबंध करण्याचे जितके मार्ग तितक्या मार्गांनीं स्कीन कमिटीच्या फलद्रूपतेला एव्हांपासूनच अडथळे सुरू झाले आहेत.

अर्थात् सरकारशीं हुजत करण्याचा हा एक नवीनच प्रश्न उपस्थित झाला आहे. म्हणून लोकांमध्यें ज्ञानाचा प्रसार करण्याचें साधन ज्यांच्या ज्यांच्या हातीं असेल त्यांनीं ह्या दृष्टीनें चर्चेला प्रारंभ केला पाहिजे आणि स्कीन कमिटीच्या रिपोर्टानें जितकें दिलें तेवढें तरी हातीं पडेल अशाविषयीं चळवळ केली पाहिजे. प्रलक्ष युद्धाच्या काळीं असा एखादा रिपोर्ट बाहेर पडता तर त्यास अधिकच तेज आणि स्वरूप प्राप्त झालें असतें हें उघड आहे. परंतु शांततेचा काळ झाला म्हणून त्यांत कांहीं तेज नसावें असा नियम नाहीं. आणि शांततेच्या काळांतच खरा असंतोष उत्पन्न करणें हें कार्य, किंबहुना कर्तव्य, अधिक महत्त्वाचें ठरत असतें.

—केसरी १९२७ एप्रील ५

## स्वराज्य—पक्षानें काय केलें ?

स्वराज्य-पक्षानें कौन्सिलांत जाऊन काय केलें यावद्दल निरनिराळ्या लोकांकडून प्रश्न विचारण्यांत येतात. कौन्सिलांतून स्थानभ्रष्ट झालेला मवाळ-पक्ष या आक्षेपकांत प्रमुख आहे. त्यानंतर आपल्याला कौन्सिलांत जावयाचें नाहीं व दुसरे गेले त्यांचें यश पाहवत नाहीं; अशा आक्षेपकांचाहि एक वर्ग आहे. स्वराज्य-पक्षाला अडवणूक करणें

जेथें शक्य झालें नाहीं तेथें ती झाली नाहीं म्हणून व शक्य झाली तेथें ती निष्फळ म्हणून असे दुहेरी आक्षेप घेण्यांत येत असल्यामुळें, केवळ कोणीकडून तरी आक्षेप घ्यावयाचे एवढाच त्यांचा हेतु आहे असें दिसतें. पण स्वराज्य-पक्षानें काय केलें याचें प्रत्यंतर सरकारच्या उक्तींतून व कृतींतून जेव्हां मिळतें तेव्हां तें महत्त्वाचें असतें व आक्षेपकांना तात्त्विक उत्तर देण्यापेक्षां त्यांच्यापुढें हें प्रत्यंतर ठेवल्यानें त्यांचीं तोंडें सहजगत्या बंद होऊं शकतात.

## हें चित्र पाहा व हें चित्र पाहा

राजकीय बाबतींत लोकांची स्मृति ही फारच अल्प असते व झालेल्या गोष्टी ते चटकन विसरून जातात. ही विस्मृतिशील मनोवृत्ति प्रगतीच्या दृष्टीनें फायद्याची असली तरी ती सारखी पुढें धांवत असल्यामुळें, मागें काय झालें याची खरी जाणीव उत्पन्न करून देण्याकरितां तिला मागें खेंचावी लागते. स्वराज्य-पक्ष पुढें काय करणार हा प्रश्न नेहमीं विचारण्यांत येतो. पण त्याचें उत्तर भावी काळाच्या उदरांत दडून आहे. स्वराज्य पक्षानें केलेलें कार्य मात्र असें गुप्त नाहीं व भावि कार्याचा विचार चालू असतां मागच्या कार्याचा आढावा घेण्यास जनतेची स्मृति थोडी मागें ओढली पाहिजे. कारण स्वराज्य पक्ष कौन्सिलांत नव्हता त्या तीन वर्षांत काय झालें याचें चित्र डोळ्यांपुढें ठेवल्याशिवाय स्वराज्य-पक्षानें केलेल्या कार्याचें खरें महत्त्व कळणार नाहीं. मुडिमन-कमिटीकडे प्रांतिक-सरकारांनीं जे खलिते पाठविले त्यांत या दोनहि चित्रांचें वर्णन देणें जरूर झाल्यामुळें हा फरक आपोआपच नजरेसमोर आला. पहिल्या तीन वर्षांचें फिक्कें चित्र जवळ ठेवल्यानें पुढच्या काळाचें चित्र आपोआप उठावदार दिसूं लागलें व स्वराज्यपक्षानें कौन्सिलांचें वातावरण कसें आमूलाग्र बदलून टाकलें याची खात्री पटूं लागली. प्रगतीच्या दृष्टीनें नेहमीं वर वर पहात मार्गक्रमण केलें पाहिजे हें खरें; पण ज्या वेळीं विघ्नसंतोषी लोक 'तुम्हीं कांहींच केलें नाहीं, तुमच्या हातून कांहींच होणार नाहीं' अशी निरुत्साहजनक टोंचणी सुरू करतात त्या वेळीं मागें पाहून आपण किती वाट आक्रमण केली याची जाणीव करून देणें, धीर देण्याचे दृष्टीनें, आवश्यक ठरतें.

## सरकार काय म्हणतें ?

स्वराज्य-पक्ष कौन्सिलांत गेला तो उघड उघड विरोध करण्याच्या उद्देशानें व आव्हानपूर्वक गेला. हा विरोध निष्फळ झाला असें दाखविण्याची सरकारची साहजिकच प्रवृत्ति असणार हें उघड आहे. पण सरकारच जेव्हां या विरोधाच्या परिणामाचें वर्णन कांहीं कारणांकरितां करितें त्या वेळीं त्याजकडून एक प्रकारें अनिच्छेनें कबुली मिळते. सारांश, सरकारला स्वराज्य-पक्षाचा विरोध कितपत जाणवला हें सरकारच्याच शब्दानें दाखविल्यास इतर मारामर पुरावे आणण्याचें कारणच पडणार नाहीं, हें निर्विवाद आहे. स्वराज्य-पक्षाविषयीं निरनिराळ्या प्रांतिक सरकारांचे विचार मुडिमन-कमिटीकडे त्यांनीं पाठविलेल्या खलित्यांतून पहावयास मिळतात. या सर्व खलित्यांचें साधारण धोरण एकच

आहे. सुधारणा अयशस्वी झाल्या ही गोष्ट आतां लपवून ठेवणें शक्य नाहीं. तेव्हां त्याबद्दलची जबाबदारी स्वराज्य-पक्षावर व पर्यायानें त्यांना निवडून देणाऱ्या मतदारांवर टाकावी व सुधारणांचे मूलभूत दोष तेवढे झांकून ठेवावेत असाच प्रयत्न या सर्व खलित्यांतून केलेला आहे.

## स्वराजिस्टांनीं हें सर्व केलें

सारांश, सुधारणाकायद्यांत दुरुस्ती करण्यापेक्षां स्वराज्य-पक्षाच्या धोरणांत सुधारणा झाली पाहिजे; आतांपर्यंत सर्व बिघाड त्यांच्या धोरणामुळें झाला असें दाखविण्याचे भरांत न कळत स्वराज्य-पक्षाचे कांहीं चांगले गुणहि प्रांतिक सरकारांनीं कबूल केले आहेत. उदाहरणार्थ, मुंबईसरकार आपल्या खलित्यांत म्हणतें, " स्वराज्य-पक्षाची शिस्त संघटना श्रेष्ठ प्रकारची असल्यामुळें त्यांना जनतेपुढें अधिक लोकप्रिय कार्यक्रम मांडतां आला व त्यांनीं बहुतेक ठिकाणीं मवाळ-प्रतिनिधींचा पराभव केला. स्वराजिस्ट उभे राहिले म्हणून १९२० सालापेक्षां किती तरी अधिक प्रमाणांत मतदार मतें देण्यास आले. कौन्सिलांतील पक्ष या नात्यानें मवाळांचें अस्तित्व नाहींसें झाल्यामुळें दिवाण बदलणें प्राप्त झालें. स्वराज्य-पक्ष हा कौन्सिलांतील सर्वांत प्रबळ पक्ष. पण त्यानें दिवाणगिऱ्या-पत्करावयाच्या नाहींत असें वचन दिलें असल्यानें बाकीच्या पक्षांतून दिवाण निवडावे लागले. "

## स्वराज्य-पक्ष व बाकीचे पक्ष

स्वराज्य-पक्षाचें धोरण व मुंबईकौन्सिलमधील इतर पक्षांचें धोरण यांबद्दल मुंबईसरकारनें काढलेले उद्गार लक्षांत ठेवण्यासारखे आहेत. मुंबईसरकार म्हणतें, " कौन्सिलांतील सर्व बिनसरकारी पक्षांत स्वराज्य-पक्ष हाच एक असा पक्ष आहे कीं, त्याचीं बंधनें ज्ञातिनिष्ठ नाहींत. " बाकीचे दिवाणांना चिकटून राहणारे जे तीन लहान लहान उपपक्ष आहेत त्यांच्याबद्दल मुंबईसरकार म्हणतें, " यांपैकीं प्रत्येक उपपक्ष हा ज्ञातिनिष्ठ आहे आणि आपल्या मतदारांच्या हितसंबंधाच्या प्रश्नांत मात्र ते मन घालतात. प्रत्येक उपपक्षाचे हे हितसंबंध निराळे आहेत व या मर्यादित बाबतींच्या पलीकडे ते कोणत्या प्रश्नावर काय मत देतील याचा नेमच नसतो. " असो. स्वराज्य-पक्ष हा विशिष्ट निश्चित ध्येयानें प्रवृत्त झालेला व त्याबरहुकूम वागणारा पक्ष असल्यामुळें मुंबईसरकारला त्या पक्षाचा हा गुण कबूल करावा लागला. आतां मुंबई-कौन्सिलांत या पक्षाचें हुकमी बहुमत नसल्यामुळें तो पक्ष तितका प्रभावी ठरला नाहीं ही गोष्ट निराळी.

## बंगालसरकारची कबुली

बंगाल्यांत मात्र स्वराज्य-पक्षाला अर्धे बहुमत लाभल्यामुळें त्या पक्षानें सरकारचा अनेक वेळां पराभव केला आणि ही गोष्ट कोणत्याहि मतलबानें का होईना, बंगाल-सरकारला कबूल करावी लागली आहे. तें म्हणतें—" दुसऱ्या कौन्सिलाची निवडणूक

होण्यापूर्वी असहकारितापक्षाचीं दोन शकलें झालीं व त्यां पक्षांतील एका मोठ्या व प्रभावी उपपक्षानें असें ठरविलें कीं, कौन्सिलांत शिरल्यानें आपलें कार्य अधिक साधेल. त्याची संघटना त्याच्या प्रतिपक्षापेक्षां जोरदार होती आणि त्यांना निवडणुकींत पुष्कळच यश मिळालें. दे. दास यांच्या नेतृत्वाखालीं उत्तम शिस्तवार आणि संघटित पक्ष या नात्यानें त्यांनीं कौन्सिलांत प्रवेश केला. अडवणुकीच्या धोरणानें सुधारणाकायदा अव्यवहार्य ठरविण्याचें त्यानें धोरण असून, अडवणुकीनें सरकारला स्वराज्य द्यावयास भाग पाडतां येईल असें त्यास वाटत आहे. त्यांनीं दिवाणगिऱ्या नाकारल्या व त्यांच्या धोरणास स्वतंत्र पक्षाचा पाठिंबा मिळून १४० सभासदांपैकीं ६०च्या वर सभासद या संयुक्त पक्षाचे झाले. हे लोक अगदीं नियमितपणें कौन्सिलला हजर राहत असल्यामुळें, थोड्या मतांनीं कां होईना, पण एकामागून एक असा बऱ्याच वेळां त्यांनीं सरकारचा पराभव केला."

## बंगालसरकारचा अंदाज

कोणी म्हणतात, स्वराज्य-पक्ष नष्ट झाला, कोणी म्हणतात कीं, तो आज ना उद्यां नष्ट होणार. कोणी अशी आशा करतात कीं, पुढच्या निवडणुकीपर्यंत तो खास नष्ट होणार व तेथपर्यंत टिकला तरी त्या निवडणुकींत त्याचा सपशेल पराभव होणार. या सर्व लोकांनीं बंगालसरकारचा अंदाज एकवार अवलोकन करावा. हें सरकार म्हणतें, "पुढच्या निवडणुकीचे वेळीं स्वराज्य-पक्षाचें परिपूर्ण बहुमत होऊन तो पक्ष आंत शिरून सरकारयंत्र मोडण्याच्या उघड आव्हानपूर्वक हेतूनें दिवाणगिऱ्या घेईल व या लढ्याची तिसरी पायरी चढेल असा अंदाज करण्यास हरकत नाहीं." स्वराज्य पक्षाच्या सामर्थ्याचे दृष्टीनें हा अंदाज महत्त्वाचा आहेच. पण स्वराज्य-पक्षानें दिवाणगिऱ्या स्वीकारण्याचा खरा अर्थ काय होईल हेंहि त्यावरून दिसून येतें. अडवणुकीच्याच उद्देशानें दिवाणगिऱ्या स्वीकारण्यास विरोधाची ती चढती पायरी किंवा चढती कमानच ठरते हें आमच्या कांहीं लोकांनीं मतलबाकरितां दृष्टीआड केलें तरी सरकारला त्याची पूर्ण जाणीव आहे असेंच या बंगालसरकारच्या अंदाजावरून दिसून येतें. स्वराज्य-पक्षानें दिवाणगिऱ्या स्वीकारल्यास तो सरकारजमा होईल अगर त्याचा विरोध पार मावळून जाईल असें भासविण्याचा कित्येक प्रयत्न करतात. पण मवाळांनीं कौन्सिलांत जाणें व स्वराजिस्टांनीं तेथें जाणें यांत जितका फरक पडला तितकाच फरक मवाळांनीं दिवाणगिऱ्या स्वीकारणें व स्वराजिस्टांनीं दिवाणगिऱ्या स्वीकारणें यांत आहे. तेव्हां दिवाणगिऱ्यांसंबंधीं वाद सुरू झाल्याबरोबर 'स्वराज्य-पक्ष आतां नष्ट होणार' अशी जी ओरड करण्यांत येते तींत कितपत तथ्य आहे याचा बंगालसरकारची वरील उक्ति लक्षांत ठेवून सर्वांनीं विचार करावा.

## मध्यप्रांताच्या सरकारची तीच तक्रार

मध्यप्रांतसरकारनें आपल्या मतपत्रिकेस एक पुस्ती जोडून तींत १९२० ते २३ पर्यंतचें कौन्सिल व १९२४ नंतरचें दुसरें कौन्सिल यांचीं पृथक् वर्णनें दिलीं आहेत. पहिल्या कौन्सिलांविषयीं तें म्हणतें "मतदारसंघांत कोणत्याच प्रकारची संघटना नव्हती

जाहीर रीतीनें मुद्राराक्षसांतील एका श्लोकाचा उल्लेख करून ('यत्रैपा मेघनीला' इ. तो श्लोक होय ) टिळकांचें प्रतिनिधित्व केळकरांशिवाय कसें पार पडूं शकत नाहीं याचें वर्णन विनोदानें केलेलें कित्येकांच्या स्मरणांत असेल। शेवटीं दोन गोष्टी सांगितल्या म्हणजे ही वाब संपली. पहिली ही कीं, १९१९ सालीं काँग्रेस डेमोक्रॅटिक पक्षातर्फे पुणें शहराकरितां कौन्सिल निवडणुकींत उमेदवार म्हणून केळकरांनाच उभें करण्यांत आलें. दुसऱ्या कोणाला नाहीं. आणि दुसरी गोष्ट ही कीं, १९०९च्या टिळकांच्या मृत्युपत्रांत केसरी–मराठा हीं पत्रें केळकर व खाडिलकर यांना प्रथम देऊं करावी असा उल्लेख होता, व सल्लागार-मंडळ सुचविलें होतें; तरी केळकर–खाडिलकरांनाच सर्वाधिकार दिला होता. आणि १९१८ च्या मृत्युपत्रांत तर केसरी संस्थेचा ट्रस्ट व आपले वारस यांच्या संबंधानें वाद वगैरे तोडून सुव्यवस्था करणाऱ्या पंचांतील मुख्य पंच टिळकांनीं केळकर यांनाच नेमलें. ही गोष्ट लक्षांत घेऊनच १९२० सालीं टिळकांच्या चिरंजीवांनीं केळकरांना केसरी–मराठा संस्थेचे मुख्य ट्रस्टी व चालक नेमलें.

केळकर व खाडिलकर या दोघांच्याहि गुणांची सूक्ष्म परीक्षा टिळकांना होती; व ते दोघेहि केसरी संस्थेंत एकत्र राहून नांदावे व दोघांनींहि आपापल्या गुणांचा फायदा संस्थेला करून द्यावा अशी टिळकांची नुसती इच्छाच नव्हे, तर परोपरीनें त्यांचा प्रयत्नहि होता. परंतु त्यांची इच्छा कांहींहि असली तरी एका म्यानांत दोन सुऱ्या राहूं शकत नाहींत ही गोष्ट त्यांना कळून चुकली होती. वडीलपणाचा अधिकार केळकरांचा व त्यांनीं त्रिकूट काळांत केसरी वांचविला, वाढविला व तेजस्वीहि राखिला. यामुळें केळकरांचा कोणत्याहि तऱ्हेनें गौणपणा नाहीं. उलट इंग्रजी भाषेचें ज्ञान व सार्वजनिक कामांत पडून तीं करण्याची हौस या दोन गोष्टींत तर खाडिलकरांपेक्षां केळकर पुष्कळच सरस व उपयुक्त, हें टिळकांना उघड दिसून आलें होतें. म्हणून केळकरांचा वडीलपणा संभाळून, संस्थेच्या प्रेमाखातर त्यांच्याशीं जुळवून घेऊन, खाडिलकर राहण्यास मनानें तयार आहेत असें त्यांना दिसतें तर, काय वाटेल तें करून, त्यांनीं त्यांना ठेवून घेतलें असतें. परंतु ही गोष्ट अशक्य आहे असें जेव्हां त्यांना दिसून आलें, तेव्हां दोन्ही साधत नाहींत तर एक तरी पुरें साधावें या न्यायानें, मृत्यूपूर्वी महिना दोन महिने केसरीचे संपादक म्हणून केळकरांचेंच फिरून डिक्लेरेशन करून,त्यांनीं ही संस्था सर्वस्वीं मरणशायर केळकरांचे स्वाधीन केली. १९०९ सालीं खाडिलकर केसरीचे संपादक असतां सुरतेस राष्ट्रीय पक्षाचें 'राष्ट्रमत'

नांवाचें दैनिक पत्र आपले हातीं घेण्याला डॉ. नानासाहेब देशमुख, चिंतामणराव वैद्य प्रभृति मंडळींनीं केळकरांना निमंत्रण केलें होतें. पण केसरी संस्था सोडून जावयाचें नाहीं या निर्धारानें, व धोंडोपंत विद्वांस यांच्याहि त्याच आग्रहामुळें, केळकरांनीं तें निमंत्रण स्वीकारलें नाहीं. पुढें १९२० सालानंतर बरोबर याच्या उलटा प्रसंग उद्भवला. तो असा कीं ,टिळकांच्या चिरंजीवांनीं ट्रस्ट केला तेव्हां " केळकर व विद्वांस यांच्या जोडीला तुम्हांस तिसरे ट्रस्टी म्हणून घालतों" म्हणून टिळकांचे जांवई डॉ.साने यांनीं विचारलें असतां, खाडिलकरांनीं त्या गोष्टीला नकार दिला. मग पूर्वीच्या 'राष्ट्रमता'प्रमाणेंच 'लोकमान्य'नांवाचें नवें दैनिक मुंबईच्या राष्ट्रीय पक्षाच्या मंडळींनीं काढलें, त्याचे संपादक होण्याविषयीं त्यांनीं निमंत्रण केलें तें खाडिलकरांनीं स्वीकारलें. परंतु कांहीं दिवसांनीं खाडिलकरांचें व इतर चालकमंडळींचें न जुळल्यामुळें रा. खाडिलकर यांनीं ' लोकमान्य ' पत्र सोडून देऊन ' नवा काळ ' नांवाचें स्वतःच्या मालकीचें, व महात्मा गांधींच्या अनुयायित्वाच्या नव्या धोरणाचें, दुसरें दैनिक पत्र काढलें. तें हल्लीं ठीक चाललें असून खाडिलकरांचा तेथें बस चांगला बसला आहे. केसरीचाहि उत्कर्ष गेल्या बारा वर्षांत कायम असून ती संस्थाहि केळकरांनीं ट्रस्टी, संपादक व संचालक या नात्यानें कशी ऊर्जितावस्थेस आणली आहे, व लो. टिळकांनीं त्यांचेवर टाकलेला विश्वास कसा सफल केला आहे हें लोक पहातातच. केळकर व खाडिलकर यांनीं टिळकांच्या वेळीं सुमारें वीस वर्षें एकत्र राहून सहकारितेनें कांहीं कांहीं कामें केलीं. त्याचप्रमाणें टिळकांच्या मरणोत्तरहि घडतें तर दूध व साखर अशीं एकत्र लोकांना प्यावयास मिळालीं असतीं. पण स्वभावभेद, स्वाभिमान, आत्मविश्वास व राजकारणांतील धोरणाचें वैचित्र्य, इत्यादि गोष्टींमुळें दूध एकीकडे व साखर एकीकडे असें झालें खरें. एका अर्थानें ही गोष्ट खेदकारक होय. तथापि दोन ठिकाणीं दोघांचेंहि चांगलें चालून दोघांनींहि आपापली कर्तबगारी महाराष्ट्राला दाखविली. यावरून टिळकांनीं पस्तीस वर्षांपूर्वीं ज्या दोघां मदतनीसांची निवड केली ती योग्य ठरली. इतकें तरी खास म्हणतां येईल.

टिळकांनीं १९१८ सालीं मृत्युपत्र केलें तें फार घाईनें लिहिलें. असें सांगतात कीं, कोलंबो येथें विलायतच्या प्रवासाचें सामान आगबोटीवर चढविण्याकरितां मोटारींत भरण्यांत येऊं लागलें. तेव्हां शेवटीं रा. धोंडोपंत विद्वांस यांनीं टिळकांना पुन्हा एकदां मृत्युपत्र करण्याचें राहिलें, या गोष्टीची आठवण दिली. तेव्हां त्याच क्षणीं बसून त्यांनीं धोंडोपंतांना तें तोंडानें सांगून एखाद्या

साध्या कागदाप्रमाणें लिहून टाकलें. मूळच्या अस्सल मृत्युपत्रांत टिळकांनीं शोध घातले आहेत. यावरून जो मसुदा तोच अस्सल दस्तऐवज हें सहजच ठरतें. घाईनें मृत्युपत्र लिहिलें नसतें तर तें चतकोर कागदावर लिहिलें नसतें, मोठ्या कागदावर स्वच्छ लिहून त्याच्या प्रति केल्या असत्या, हें उघड आहे. पणअशा घाईत लिहिलेल्या कागदांत तीन महत्त्वाच्या गोष्टींचा उल्लेख करण्याला टिळक विसरले नाहींत. याचें कारण त्या तीन गोष्टी त्यांच्या मनांत अगदीं खोलपर्यंत रुजल्या व दृढ झाल्या होत्या. १. केसरी–मराठ्याचा पब्लिक ट्रस्ट करणें; २. धोंडोपंत यांना त्यांच्या जन्मभर व्यवस्थापक म्हणून ठेवणें; व ३. केळकरांना एकंदर संस्थेचे मुख्य चालक म्हणून नेमणें. पैकीं पहिल्या दोन गोष्टी त्यांनीं मृत्युपत्रांत स्पष्ट लिहिल्या. तिसऱ्या गोष्टीचे दोन भाग पडतात. एक, केसरीचें संपादकत्व व दोन, वडीलकीच्या मानानें सर्वांवर वजन पडेल व सर्वांचा विश्वास राहील म्हणून तंटेबखेडे उत्पन्न झाले असतां त्यांचा सरपंच म्हणून निकाल करण्याचा अधिकार केळकरांना देणें. यांपैकीं, पहिली गोष्ट पुढें १९२० सालीं विलायतेहून आल्यावर स्वतःच करविली. टिळकांनीं ट्रस्ट केला पण ट्रस्टडीड केलें नव्हतें. यामुळें केळकरांना ट्रस्टी या स्पष्ट नांवानें टिळकांनीं कोठें उल्लेखिलेलें नाहीं. पण त्यांना ही गोष्ट माहितीच होती कीं, धोंडोपंतांना मृत्युपत्राचे एक्झिक्यूटर नेमलें म्हणजे त्यांना केसरीसंस्थेचा ट्रस्ट ट्रस्टडीड करूनच पुरा करावा लागेल व ते ट्रस्टडीड करावयास बसले असतां केळकरांशिवाय दुसऱ्या कोणाला ट्रस्टी नेमणें शक्यच नाहीं. व तीच गोष्ट अखेर टिळकांचे पुत्र वारस म्हणून व धोंडोपंत एक्झिक्यूटर म्हणून दोघांनीं मिळून केली. ट्रस्टडीड न होतें तरी मृत्युपत्राच्या आधारें धोंडोपंत हेच एक्झिक्यूटर म्हणून टेस्टॅमेंटरी ट्रस्टी राहते व असे सर्वाधिकारी म्हणूनहि त्यांनीं केळकरांनाच केसरीचे संपादक नेमलें असतें. हें सर्व सांगण्याचें कारण इतकेंच कीं, केळकर हे केसरी–मराठ्याचे सर्वाधिकारी झाले; ते स्वतः टिळक, त्यांचे चिरंजीव, एक्झिक्यूटर धोंडोपंत या सर्वांच्या पसंतीनें, संमतीनें झाले, कायदेशीर रीतीनेंहि झाले, आणि अनिर्वाह्यतेनेंहि झाले. कारण त्यांच्या जागीं अशा अधिकारावर दुसऱ्या कोणाचें नांव कोणास सुचविणें शक्य होतें किंवा आहे ! 'आणि मिळणें हें एकपट व राखणें हें दुप्पट' या न्यायानें देखील केळकरांना मिळालेला सर्वाधिकार योग्यच होता हें त्यांच्या गेल्या बारा वर्षांच्या कारकीर्दीवरून सर्वांना दिसून आलेंच आहे. बारा वर्षांपूर्वी टिळकांनीं मनाला प्रश्न विचारून केळकरांसंबंधीं जें निर्णयात्मक उत्तर दिलें, तेंच आज बारा वर्षांनंतरहि जनतेला आपल्या

मनाला विचारून घावें लागेल. टिळकांच्या वेळीं व त्यानंतर अर्थात्च महाराष्ट्रांत केळकरांना प्रतिपक्षी पुष्कळ होते व झाले. पण त्यांचें सर्वांगीण कर्तृत्व लक्षांत घेतां त्यांना बाजूला सारणारा तर राहोच, व त्यांना प्रतिस्पर्धी शोभणाराच काय पण आत्मविश्वासानें स्वतःला तसें म्हणविणाराहि कोणी मनुष्य निघालां नाहीं. हेवा कोणालाहि करतां येतो. प्रत्यक्ष स्पर्धेला फारच थोडे उभे राहूं शकतात. स्पर्धेत यश मिळविणें ही गोष्ट त्याहून दुरापास्त होय.

असो, १९२० सालीं टिळक अकस्मात् वारले. त्यापूर्वी महाराष्ट्रांतील राष्ट्रीय पक्षाच्या डोळ्यांपुढें कौन्सिलमध्यें शिरून राष्ट्रीय भावनेनें काम करणें हेंच व्यवहारिक ध्येय होतें. आणि तेंच स्वतः टिळकांनीं कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्षाचा जाहीरनामा काढून व निवडणुकींना आपले उमेदवार उभे करून प्रगट केलें होतें. पण टिळक वारले त्याच दिवशीं म. गांधींच्या असहकारितेचा पुकारा झाला. टिळकपक्षांतील कोणत्याहि मनुष्याला त्यावेळीं गांधींची असहकारिता मान्य नव्हती. आणि पुढील महिन्यांत कलकत्यास जादा कॉंग्रेस भरली तींत टिळकपक्षाच्या सर्व प्रतिनिधींनीं असहकारितेच्या ठरावाविरुद्ध मतें दिलीं. पण अखेर गांधीपक्षाचें बहुमत होऊन ठराव पास झाला. आणि नवा मनु प्रवर्तित व्हावयाचा असतां जनतेच्या अंतरंगांत एखादें नवेंच वारें खेळूं लागतें, त्याप्रमाणें निरनिराळ्या प्रांतांतील पुढाऱ्यांचीं मतें विरुद्ध असतांहि दुय्यम प्रतीच्या लोकांनीं जोर केला, व हा नवा उपाय हुलडीनें करून पाहूं असें ठरविलें. अर्थात् कॉंग्रेसमध्यें राहावयाचें तर कॉंग्रेसचा हा ठराव अमान्य करणें ठीक नाहीं, असें धोरण इतर प्रांतांच्या पुढाऱ्यांबरोबर महाराष्ट्रांतील पुढाऱ्यानांहि स्वीकारावें लागलें. आणि त्याप्रमाणें केळकरप्रभृति कौन्सिल-उमेदवारांनीं सर्वांनीं आपापलीं नांवें परत घेतलीं व कौन्सिल-बहिष्काराची चळवळहि केली. तथापि एकंदरीनें हें धोरण आपणांस कायमचें म्हणून स्वीकारतां येत नाहीं, व आज स्वीकारलें तें तात्पुरतें म्हणून स्वीकारलें, हें दर्शविण्याकरतां केळकरांनीं कलकत्याहून पुण्यास येतांच केसरी-मराठ्यांत प्रथमच अशी जाहीर घोषणा करून ठेवली कीं, आज ना उद्यां केव्हां तरी, आम्हीं हें धोरण बदलून घेऊं ! ही गोष्ट माहीत असतांहि टिळक-पक्षाला पुढेंमागें कायमचें वश करून घेऊं, अशा आशेनें गांधी यांनीं महाराष्ट्रीयांशीं सहकारिता ठेवली; व कॉंग्रेसच्या वर्किंग कमिटींत केळकरांना प्रथम तीनचार वर्षे स्थान मिळालें होतें.

केळकर वकील नव्हते यामुळें कोर्टावरील बहिष्कार त्यांना

पडणारा नव्हता; पण त्यांचीं मुलें निमसरकारी कॉलेजांत होतीं, त्या सर्वांना त्यांनीं बाहेर काढलें व टिळक-महाविद्यालयांत घातलें. परंतु कोर्टावरील बहिष्कार पुरेल, आणि तो साधला तर खरोखरी एका अर्थानें देशहिताचाच ठरेल, असें केळकरांचें म्हणणें असतांहि "कोणताहि एक वर्ग क्षणमात्र अप्रिय झाला म्हणून त्यावर आग पाखडूं नये," असें मत केळकर हे वकील वर्गाविषयीं प्रगट करीत; आपखुषीनें कोणीं वकिली थांबविल्यास त्याचें अभिनंदन करीत; पण या सर्व वर्गावर मिळून कोणीं अन्यायानें हल्ले केल्यास ते इतर वर्गाच्या स्वार्थ-त्यागशून्यतेकडे अंगुलिनिर्देश करून तो हल्ला परतवीत. विद्यार्थ्यांच्या बाबतींत तर याहिपेक्षां त्यांचें मन अधिक नाजूक असे. आत्मस्फूर्तीनें कॉलेज सोडणाऱ्या मुलांचें ते अभिनंदन करीत; पण कोणाची कसलीहि परिस्थिति लक्षांत न आणतां सरसकट विद्यार्थ्यांनीं शिक्षणावर बहिष्कार घालण्याच्या विरुद्ध ते उघड बोलतहि. खादीविषयींहि केळकरांचें मत प्रथम-पासूनच विवेचकपणाचें होतें. समाजांतील कोणत्या वर्गाला खादीच्या प्रसारापासून नक्की थोडीबहुत मदत मिळण्याचा संभव आहे हें जाणून त्यापुरती खादीची तरफदारी ते करीत. पण खादीबरोबर देशी गिरण्यांचें कापडहि उत्तेजनार्थ हातीं घ्या, म्हणजे दोहोंच्या बळानें विलायती कापडावरील बहिष्कार यशस्वी होईल, असें ते म्हणत व लिहीत. स्वतः खादी वापरण्यांत देखील ते असाच विवेक करीत. ते अंगांतील कपडे खादीचे घालीत व उपरणेंहि खादीचेंच घेत; पण नेसतें धोतर गैरसोयीचें म्हणून त्यांनीं फारसें कधीं वापरलें नाहीं. डोक्याला पगडीऐवजीं त्यांनीं कांहीं दिवस टोपी घातली; पण गांधी कॅप म्हणतात ती कधींच घातली नाहीं. तथापि, लोकांना विवेक आवडत नाहीं, हुल्लडच नेहमीं आवडते. या दृष्टीनें केळकरांच्या वर्तनाला अर्धवटपणा किंवा धरसोड हें नांव मिळून विशिष्ट वर्गांत ते अप्रिय होण्याला प्रारंभ झाला; व त्या वर्गांतील ती अप्रियता, तेव्हांचीं तीं कारणें गेलीं तरी, आज निराळ्या कारणांकरतां पण टिकूनच आहे.

पण केळकर कॉंग्रेस वर्किंग कमिटीमध्यें असतांच असहकारितेविरुद्ध कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांतच मतभेद उत्पन्न झाला. १९२१ सालीं गांधींनीं आरंभिलेली बारडोलींतील चळवळ गांधींनींच परत घेतली. त्यांच्यावर खटला होऊन त्यांना शिक्षा झाली. आणि "सिव्हिल डिसओबिडियन्स चळवळ अशक्य आहे म्हणून कौन्सिल-बहिष्कार उठवून फिरून कौन्सिल-प्रवेशाची चळवळ करावी," अशी नेहरू-पटेल प्रभृति पुढाऱ्यांच्या

मनांतच कल्पना आल्यामुळें एक चौकशी कमिटी नेमण्यांत आली. तिच्या रिपोर्टाच्या आधारावर कॉंग्रेसमध्यें राहूनच, पण मतभेददर्शक म्हणून कौन्सिलवादी निराळा पक्ष स्थापावा असें कित्येक पुढाऱ्यांच्या मनांत आलें. महाराष्ट्रांत विशेषतः वऱ्हाडांत ही कल्पना प्रथमपासूनच होती. यामुळें इकडील प्रांतिक परिषदांतून तसा ध्वनि उमटे; व अकोल्यास मुद्दाम याकरतां परिषद भरवून कौन्सिलप्रवेशाला महाराष्ट्र अनुकूल असल्याची घोषणा करण्यांत आली होती. पण हा प्रश्न सर्वप्रांतीय असल्यामुळें नेहरू–दासप्रभृति मंडळी अनुकूल होण्याची वाट महाराष्ट्र पहात होता. त्याप्रमाणें पुढें ते अनुकूल झालेहि. दासबाबूंनीं केळकर–अणेप्रभृतींच्या साहाय्यानें स्वराज्यपक्षाचें निशाण उभारलें, आणि गया येथील राष्ट्रीय सभेंत तर स्वराज्यपक्षाची रीतसर स्थापनाहि झाली. त्यामुळें कौन्सिल–प्रवेशासंबंधानें महाराष्ट्रांत तरी फिरून १९१९ साल अवतरलें. मात्र या पांच वर्षांत कांहीं महाराष्ट्रीय पुढारी गांधीपक्षांत कायमचेच सामील होऊन गेले. म्हणून ते स्वराज्यपक्षाला, मनांतून नसला तरी जनांत थोडासा उणेपणा मानीत. ज्या पत्रांचें जीवन गोमाशांप्रमाणें ताज्या घोड्यावर अवलंबून असावयाचें, तीं कौन्सिलवादाला विरोध करीत. तथापि एकंदरीनें पाहतां, जशी १९२० सालची ती हुछड असहकारितेची होऊन गेली, तशीच १९२३ अखेर ही उलटी हुछड कौन्सिल–प्रवेशाची होऊन गेली. महाराष्ट्रांत स्वराज्यपक्षाची रीतसर स्थापना झाली. त्याचें अध्यक्षपद केळकरांनाच देण्यांत आलें.

१९२३ अखेर कायदेकौन्सिलच्या निवडणुकी झाल्या त्यांत केळकर हे मध्यभागातर्फे निवडणुकीला उभे राहिले. आणि तींत त्यांना इतकें यश मिळालें व त्यांना इतकीं मतें मिळालीं कीं, इतर सर्व सहासात उमेदवारांचीं मतें मिळूनहि तितकींदेखील होत नव्हतीं. आणि मतें फारच कमी मिळाल्यामुळें पांच-सहा उमेदवारांचें पांचपांचशें रुपयांचें डिपॉझिट बुडलें! १९२४–२५ सालीं असेंब्लींत पं. मोतीलाल नेहरू हे स्वराज्य पक्षाचे अध्यक्ष होते, पटेल हे उपाध्यक्ष होते, व केळकर हे मुख्य व्हिप होते. पुढच्या वर्षी पटेल हे असेंब्लीचे अध्यक्ष निवडले गेले तेव्हां त्या जागेकरितां खाजगी वाटाघाटींत केळकरांचेंहि नांव पुढें आलें होतें; व अखेर पटेल निवडून आल्यावर त्यांचे जागीं स्वराज्यपक्षाचे उपाध्यक्ष म्हणून केळकरांना निवडण्यांत आलें. पण फिरून १९२६ अखेर एक उपक्रांति झाली. कौन्सिलांत जावयाचें तें जर शक्य तितकें आक्रमण करून लोकहित साधण्यासाठीं, तर एकिन-

क्यूटिव्ह कौन्सिल किंवा प्रधान-मंडळ यांतील जागा सरकारनें लोकपक्षीय पुढाऱ्यांना दिल्या असतां, कौन्सिलचें अध्यक्ष-उपाध्यक्षपद किंवा स्पेशल कमिट्यांतील जागा याप्रमाणें, त्याहि घ्याव्या, मात्र राष्ट्रीय भावना मनांत ठेऊन काम करतील असे सत्पात्र लोक या कामीं पुढें करावे, असें मत महाराष्ट्र व वऱ्हाड-नागपुर या प्रांतांतील लोकांनी उचलून धरलें. पण पं. नेहेरूप्रभृति पुढाऱ्यांना ही गोष्ट मान्य नव्हती. नागपुरच्या कायदे-कौन्सिलचे अध्यक्षपदीं असलेल्या ना. तांबे यांना गव्हर्नर बटलर यांनीं एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलर नेमलें. त्यामुळें स्वराज्यपक्षांत वाँवगोळा पडल्यासारखा होऊन त्याचीं दोन शकलें झालीं; १९२५ सालच्या कानपूरच्या राष्ट्रीय सभेनंतर केळकर-अणे वगैरे स्वराज्यपक्षीय लोकांनीं रिस्पॉन्सिव्हिस्ट नांवाचा नवा पक्ष उत्पन्न केला; व खास स्वराज्यपक्षाच्या तिकिटावर आपण पूर्वी निवडून आलेले, म्हणून त्या नात्यानें यापुढें आपण कौन्सिलांत राहूं नये, अशा विचारानें त्यांनीं आपापल्या जागांचे राजीनामे दिले. रिस्पॉन्सिव्ह पक्षाचें अध्यक्षपद रा. जयकर यांना देण्यांत आलें. सन १९२६ सालीं पुन्हां कौन्सिल-निवडणुकी उपस्थित झाल्या, तेव्हां रिस्पॉन्सिव्ह पक्षाचे एकूणएक पुढारी या नव्या पक्षाच्या तिकिटावर उभे राहून निवडून आले. या पक्षाचा हा विजय स्वराज्यपक्षाच्या पूर्वीच्या विजयापेक्षांहि एका अर्थानें मोठा होता! पूर्वी केळकर, अणे वगैरे लोक काँग्रेसच्या बळावर व दास-नेहेरूप्रभृतींच्या सहकारितेनें निवडून आले, असें कोणास म्हणतां आलें असतें. पण १९२६ सालीं केळकरप्रभृति मंडळी निवडणुकीला उभी राहिली ती काँग्रेस व पं. नेहेरू इत्यादिकांचा विरोध असतांच!. काँग्रेसपक्षाला योग्य प्रतिस्पर्धी मिळता तर या निवडणुकींत त्यांनीं तो केळकरांना खचित उभा केला असता. पण गांधीपक्षाकडे राष्ट्रीय-सभेचें पूर्ण चालकत्व गेलें असलें तरी, केळकरांची लोकप्रियता अजून इतकी शिल्लक होती कीं, त्यांना आपल्यांतला असा प्रतिस्पर्धी निवडणुकींत उभाच राहूं शकला नाहीं. याहि निवडणुकींत त्यांना पहिल्या नंबरचीं मतें मिळालीं. यावेळीं ब्राह्मणेतर पक्षानें आपले उमेदवार उभे केले होते, व एकंदर मतदार-वर्गांत ब्राह्मणेतरच संख्येनें फार अधिक. असें असतांहि केळकरांच्या खालीं आलेल्या तिसऱ्या नंबरच्या ब्राह्मणेतर उमेदवाराला केळकरांच्या निम्याइतकींहि मतें पडलीं नाहींत. पहिल्या खेपेचीं १९२४-२५ हीं दोन वर्षे आणि दुसऱ्या खेपेचीं १९२७-३० अशीं चार वर्षे मिळून केळकर वरिष्ट कायदेकौन्सिलांत सुमारें सहा वर्षे होते. १९३० सालीं सिमल्याची बैठक होण्याचे आधींच केळकरांनीं असेंब्लीच्या जागेचा राजीनामा दिला. त्यानंतर पुन्हां ते निवड-

णुकीस उभे राहिले नाहींत; व कदाचित् फिरून १९२२ सालाप्रमाणें प्रतिक्रिया होऊन कौन्सिल-प्रवेशाची हुल्लड झाली तरी, केळकर फिरून निवडणुकीस उभे राहणार नाहींत असा अजमास आहे.

१९२७ अखेर त्यांनी टिळक चरित्राच्या उत्तरार्धाचे दोन खंड लिहिल्या वर एक वर्षभर म्हणजे १९१८ सालीं केसरीचे संपादकत्व सोडलें होतें. तें फिरून १९२९ च्या जानेवारींत हातीं घेतलें. त्यानंतर पुन्हां दोन वर्षे त्यांनीं तें आपल्या हातीं ठेऊन, १९३१ सालीं केसरीचा चिरस्मरणीय असा ज्युबिली-अंक काढून केसरीचें प्रत्यक्ष संपादकत्व कायमचें सोडलें. तथापि ट्रस्टी या नात्यानें संचालकत्व आपलेकडे त्यांनीं ठेवलेंच आहे. याशिवाय कारणपरत्वें, म्हणजे आवडीप्रमाणें किंवा जरूरीप्रमाणें, ते केसरींत लेख लिहीत असतातच. हें संचालकत्व किंवा लेखकत्व कायम सोडण्याचा आजच त्यांचा विचार दिसत नाहीं. पण आतां वयाला पुरीं साठ वर्षे झालीं, व केसरी--संस्थेचें व सार्वजनिक कार्य आज ३६॥ वर्षे करीत राहिल्यानें एक प्रकारचा कंटाळा व थकवा येणें साहजिक आहे. यामुळें हल्लींचा व्याप, प्रकृतीनें तसा कौल दिल्यास, केव्हांहि सोडून देण्यास त्यांनीं मनाची तयारी केली आहे.

केसरी-मराठा संस्थेचें पडेल तें सर्वकाम सांभाळून, टिळकांच्या हयातींत व नंतरहि कांहीं वर्षे, अवांतर अनेक कामें त्या आजूबाजूस केळकरांनीं चालविलीं होतीं. १८९८ पासून १९२९ पर्यंत ते पुणें शहर म्युनिसिपालिटीचे सभासद होते. १९२४ पासून १९३० पर्यंत ते वरिष्ठ कायदेकौन्सिलचे सभासद होते. याशिवाय असें एकहि वर्ष किंबहुना सहामाही या अवधींत गेली नसेल कीं, जींत त्यांना एखाद्या विशेष परिषदेचें अध्यक्षपद स्वीकारावें लागलें नाहीं. १९२० सालीं ते सोलापूर प्रांतिक परिषदेचे अध्यक्ष होते. त्यानंतर १९२२ सालीं ते वडोदें साहित्य संमेलनाचे अध्यक्ष होते. त्याच वर्षी अकोला येथील स्पेशल राजकीय परिषदेचे तेच अध्यक्ष होते. १९२४ सालीं मुझफरनगर येथील परिषदेचे अध्यक्ष होते. त्याच सालीं दिल्ली येथें ऑल इंडिया संस्थान परिषदेचे अध्यक्ष होते. १९२५ सालीं कानपुरला राष्ट्रीय सभेच्या वेळीं हिंदुमहासभेचें जादा अधिवेशन, संगीतपरिषद्, ग्रंथसंग्रहालय परिषद इतक्यांचें अध्यक्षपद त्यांना देण्यांत आलें होतें. १९२८ सालीं दिल्ली येथें दलितोद्धार परिषद व डाक्का (पूर्व बंगाल) येथें प्रांतिक हिंदु महासभा झाली, ह्याहि सभांचे केळकर अध्यक्ष होते. १९२९ सालीं जबलपुर येथील हिंदुमहासभेचे व त्याच वर्षीच्या अहमदाबाद येथील रयत परिषदेचे आणि तसेंच त्याच सालीं लाहोरच्या हिंदुमहासभेचे ते अध्यक्ष होते. १९३१ सालीं उज्जनी येथील

व वडोदें येथील मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष होते. याशिवाय आणखीहि अशाच कांहीं सभा परिषदा सांगतां येतील. उदाहरणार्थ– यवतमाळ येथें भरलेली टिळक स्वराज्य संघाची मोठी सभा, व तसेंच संयुक्त वऱ्हाड प्रांतिक राजकीय परिषद या दोन्ही सभांचे ते अध्यक्ष होते. १९१० सालीं मेहेकर येथील वऱ्हाड प्रांताच्या सहकारी परिषदेचे ते अध्यक्ष होते. तसेंच पुण्यास भरलेली संगीत परिषद, हरिदास परिषद, याहि सभांचे ते अध्यक्ष होते. या सभादिकांचा विशेष उल्लेख करण्याचें कारण त्यांतील प्रत्येकीचें महत्त्व प्रांतिक परिषदेहून कमी नव्हतें; त्या सभेचे अध्यक्ष म्हणून त्यांना विचारपूर्वक भाषणें लिहून काढावीं लागलीं; व विषय–नियामक कमिटीपासून समारोपापर्यंत सर्व काम कच्चें-पक्कें करावें लागलें. पुण्यांत व पुण्याबाहेर या अवधींत त्यांना स्थानिक स्वरूपाच्या किंवा नैमित्तिक प्रसंगाच्या किती सभांचें अध्यक्षपद स्वीकारावें लागलें याची 'गणति होणार नाहीं' ही मामुली अतिशयोक्तीची रूढ भाषा सोडून दिली तरी, पक्का हिशोब करावयाचा तर खरोखरच गणती करावी लागेल. आणि तो हिशोब करून कागदावर मांडला तर अशा सार्वजनिक कामांत त्यांचा किती वेळ खर्च झाला असेल याची खरी कल्पना येईल. एका उद्योगी गृहस्थानें हा हिशेब करून असें कळविलें आहे कीं १३०४ सभांचे केळकर हे अध्यक्ष होते. शिवाय ग्रंथकर्तृत्व व मासिक पुस्तकांतील लेखन हें केळकरांच्या आवडीचें खातें; आणि इतर लोकांच्या पुस्तकाला प्रस्तावना अभिप्राय लिहून देणें हें स्नेहाच्या किंवा ऋणानुबंधाच्या जुलमाचें खातें, तें सांगण्याचें शिल्लक राहतेंच. १९२० पासून १९३१ हा अकरा वर्षांचा काळ घेतला तर केळकरांचें त्यांतील लिखाण हें पूर्वीच्या वीस वर्षांतील लिखाणाहून पुष्कळच अधिक भरेल. या काळांत त्यांनीं टिळकचरित्राचे तिन्ही खंड मिळून सुमारें १९०० पानें, राज्यशास्त्रग्रंथ सुमारें दोन–अडीचशें पानें, हीं केवळ ग्रंथाच्या रूपानें लिहिलीं. या अकरा वर्षांतील प्रस्तावना, अभिप्राय एकत्र केले तर सुमारें पांचशें पानें भरतील. शिवाय केवळ करमणूक व हौस म्हणून अलीकडे ज्या थोड्या लघुकथा किंवा गूढाभिप्राय गोष्टी किंवा कविता त्यांनीं लिहिल्या त्या याच अकरा वर्षांत. 'गेलीं पांच वर्षें' या राजकीय पुस्तकांत, 'लो. टिळकांचें पुण्यस्मरण' या पुरवणीरूप पुस्तकांत, मुख्यतः केसरींतील लेखच घेतले आहेत; पण जे वर्तमानपत्रीं पाठाचें नसून कांहींसें वाङ्मय स्वरूपाचे आहेत असेच घेतलेले आहेत. याशिवाय नित्य–नैमित्तिक पत्रव्यवहार, स्टेटमेंटें, जाहीरपत्रकें वगैरे वेगळींच.

या सर्व गोष्टींचा येथें नुसता निर्देशच करणें शक्य आहे. परंतु नुसत्या तेवढ्या निर्देशावरूनच केळकरांचा व्याप व उद्योगप्रियता या दोन गोष्टींची कल्पना कोणालाहि येईल म्हणून त्याविषयीं अधिक कांहींच लिहीत नाहीं. या व पूर्वीच्या अवधींत निरनिराळ्या संस्थांशीं संबंध आल्यानें केळकरांना जें काम पडलें त्याची हकीकत प्रस्तुत पुस्तकांतील एका स्वतंत्र प्रकरणांत रा. शंकरराव जोशी यांनीं दिली आहे ती या उद्योगखातींच जमा धरावयास पाहिजे. पण त्या संबंधानेंहि या चरित्रलेखांत नुसत्या निर्देशापलीकडे कांहीं लिहितां येत नाहीं.

एवढा उद्योग केळकरांचे हातून पार पडण्याला तीन कारणें निर्णयात्मक म्हणून सांगतां येतील. १ आत्यंतिक निरलसपणा, २ शरीरप्रकृतीची अनुकूलता व ३ कामाचा उरक. पैकीं प्रकृतीच्या अनुकूलतेला एका दृष्टीनें पहिलें स्थान देणें जरूर आहे. कारण ती अनुकूलता नसली तर निरलस व उद्योगप्रिय मनुष्यहि कांहीं करूं शकत नाहीं. सुदैवानें केळकरांना आजन्मांत शरीरव्याधि अशी कोणतीच जडली नाहीं. चाळिसावे वर्षी चाळशी लागली. पण इतर रीतीनें अजूनहि त्यांचे डोळे निर्विकार व साफ आहेत. ते इतके कीं, ते रात्रीं दिव्याच्या उजेडांत चाळशीच्या साहाय्यानें बारीक अक्षरांचें पुस्तक व प्रुफें वाचूं शकतात. त्यांच्या कानाला एकप्रकारचा किंचित् सूक्ष्म बधिरपणा नेहमींचाच आहे. तो परक्याला सहज कळून येण्यासारखा नाहीं. १९२७ सालीं त्यांच्या कानशिलावर गळूं होऊन ऑपरेशन करावें लागलें. ती जखम बरी झाली. पण पुढें कांहीं दिवस उजव्या कानाला बरेंच कमी ऐकूं येत होतें. तथापि तो विकार कांहीं महिन्यांनीं आपोआपच गेला. १९१८ सालीं ते तीनवार इन्फ्लुएंझा व मलेरिया यांनीं आजारी होते. तसेंच ताप आल्यामुळें प्रकृति सुधारण्याकरितां एकदां ते सिंहगडास व एकदां यवतास जाऊन राहिले होते. पण ते फक्त २।३ आठवड्यांपुरतेच. १९२६ सालीं त्यांना छातीवर पाठीवर पुरळ उठून हार्पिस किंवा नागीण हा विकार झाला होता. पण तोहि ८।१० दिवसांत बरा झाला. याशिवाय सगळ्या साठ वर्षांत केळकरांना प्रकृति बिघडल्यामुळें केव्हांच अंथरुणावर पडून राहावें लागलें नाहीं. हा प्रकृतीचा गुण केवढा मोठा ! पण त्याहीपेक्षां सांगण्याची विशेष गोष्ट ही कीं, अहोरात्र त्यांचा वेळ लेखन–चिंतन–वादविवाद, किंवा लौकिक रीत्या बोलण्या–चालण्यानें घेतां येण्यासारखा लोकांचा परामर्श, म्हणजे एकंदरीनें डोक्याचें काम, लक्ष घालून करण्याचें काम, यांत जात असतांना, आणि प्रवास तर त्यांच्या

मार्गे सारखा लागलेला असून प्रवासांत जेवणखाण झोंप इत्यादि बाबतींत साहजिकपणें नित्य-नियमांचा व सवयींचा भंग होत असतांना, हातानें डोकें धरून बसलेले, किंवा डोक्यावर लेप घालून किंवा तेलपट्टी ठेऊन बसलेले, किंवा क्षीणपणानें कण्हतकुथत लोकांशीं बोलत बसलेले केळकर कधीं पाहिल्याचें कोणास फारसें स्मरत नसेल. सदा उद्योग, व सदा आनंदच नसला तरी कामापुरता उल्हास; या गोष्टी त्यांच्या शरीरपिंडांतच असल्या पाहिजेत. एरवीं अशी गोष्ट होऊंच शकत नाहीं. त्याबरोबर हीहि गोष्ट लक्षांत ठेवावी कीं, ते नित्य नियमानें कसलाहि व्यायाम घेत नाहींत. उद्योगांच्या व व्यवसायांच्या अनुषंगानें जी काय शरीर-मेहेनत पडेल तितकीच. फारच झालें तर, चांगल्या हवेंत ते बाहेर हिंडण्याफिरण्याला एखादवेळीं जातात. तसेंच, आणखी विशेष म्हटला म्हणजे, डोक्यांतील धावत्या चक्रांना ओंगण पडेल किंवा स्निग्धता मिळेल अशी करमणूक किंवा खेळहि त्यांच्या लागीं नव्हता. क्रिकेट, टेनिस, बिलिअर्ड हे खेळ निरनिराळ्या वेळीं ते खेळले. पण गेल्या १९ वर्षांत तरी त्यांनीं त्या खेळाला फांटा दिलेला आहे. स्नेही-मंडळींत कारणपरत्वें बसून गप्पा मारणें याशिवाय त्यांना दुसरी करमणूक म्हणून कांहीं नाहीं असें म्हणतां येईल.

शरीर-प्रकृति-गुणानंतर केळकरांचा निरलसपणा व उरक या गोष्टी महत्वाच्या वाटतात. त्यांना कांहीं न करतां बसलेले असे क्वचितच कोणीं पाहिलें असेल. व तें करणें म्हणजे दुसरें तिसरें कांहीं नसून वाचन किंवा लेखन हेंच होय. त्यांचा बहुश्रुतपणा हें या अखंड व्यासंगाचें मूळ होय. तशीं साधनें नसल्यामुळें त्यांच्या घरचा खास ग्रंथसंग्रह मोठासा नाहीं. पण पुस्तक मिळेल तेथून आणून वाचल्याशिवाय ते सोडीत नाहींत. कामाचा उरक तर त्यांचा विशेषच वाटतो. आणि त्यांचे अनेक व सतत चाललेले उद्योग पाहून पुष्कळ लोक असें आश्चर्य बोलूनच दाखवितात कीं, इतके उद्योग यांच्या हातून होतात तरी कसे ? पण त्याचें बीज अनाळशीपणाप्रमाणें उरकालाहि द्यावें लागतें. कारण कोणतीहि गोष्ट करावयाची म्हटली म्हणजे निश्चय होण्यालाच काय वेळ लागेल तो. पण निश्चय झाल्यावर ती हातावेगळी करण्याला त्यांना वेळ लागत नाहीं. मग तें कोणत्याहि विषयावर लेख लिहिणें असो, खाजगी बैठकींतील सल्लामसलतीचें काम असो, किंवा सभा-परिषदा यांचें जाहीर काम असो. ते लेख लिहिण्यास किंवा सांगण्यास बसले म्हणजे त्यांना चिंतनाच्या प्रस्तावनेंत फार वेळ घालावा लागत नाहीं, व लेखांत उलटसुलट

किंवा आदलाबदल फारशी करावी लागत नाहीं. यामुळें त्यांनीं लिहिलेला किंवा तोंडी सांगितलेला लेख चिताड झालेला असा सहसा सांपडणार नाहीं. कोठें शोध असला तर तो गाळबोटाइतका असतो. तसेंच त्यांच्या लेखांचीं प्रुफें वाचून परत कंपॉझिटरकडे जातात तींहि प्रायः स्वच्छ असतात. जें लिहिलें तेंच प्रायः कायम करण्याकडे त्यांचा कल असतो. आपलें नाट्यवाङ्मय देखील ते पुनःपुनः तपासून बदलून लिहीत नाहींत. याचें कारण एक तर डोक्यांत सहसा गोंधळ नसतो. जी काय कल्पना असेल ती स्वच्छ रेखीव असते, व कोणत्याहि विषयांतील युक्तिवाद त्यांच्या मनांत सांखळीसारखा बांधीव असतो. यामुळें त्यांना एकापुढें एक मुद्दे सरळ लिहितां येतात. तसेंच, त्यांच्या स्वभावाला किचकटपणा आवडतच नाहीं. झालेलें लिखाण अगदीं आपल्या किंवा इतरांच्या मनासारखें नाहीं तरी तें तसेंच तितकेंच असलें तरी चालेल, अशी त्यांची किंचित् अल्पसंतुष्ट वृत्ति असते. कोणीहि लेखक झाला तरी त्याचा असा कोणताच लेख नसतो कीं, तो आणखी तपासला, सुधारला तर अधिक बरा होणार नाहीं. पण सफाईनें व चालचलाऊ रीतीनें काम संपविणें यापेक्षां तें निर्दोष करण्याकडे केळकरांचें लक्ष असावें तसें असत नाहीं. कारण ते म्हणतात कीं, अखेर निर्दोष असें खरोखर कांहींच असत नाहीं. त्यांची अशी वृत्ति होण्याला एक खरें कारण असें आहे कीं, ते संशोधक पंडितांच्या जातीचे लेखक नव्हेत. कोणत्याहि विषयांत त्यांनीं तशा अर्थानें पंडितगिरीचें नांव मिळविलेलें नाहीं. त्यांना तशा प्रकारची बुद्धि नसेल वा आवड नसेल. पण टिळकांचें 'ओरायन' किंवा 'आर्टिक होम' किंवा राजवाडे यांचें 'मराठी भाषेचें व्याकरण' किंवा भांडारकर यांचा 'दख्खनचा इतिहास' अशा प्रकारचे ग्रंथ त्यांनीं लिहिलेले नाहींत. किंबहुना, ते स्वतः-विषयीं पट्टेनें व खऱ्या विनयानें असेंहि म्हणतात कीं, "थोडया भांडवलावर पुष्कळ उलाढाल करणाऱ्या व्यापाऱ्यांपैकीं मी आहें. मी ध्येयवादापेक्षां व्यवहारवादी अधिक आहें. माझ्या विद्वत्तेनें मला समाधान कसें होईल या-पेक्षां तिचा उपयोग लोकांना अधिक कसा होईल याकडे माझी दृष्टि अधिक असते. जन्मभर विद्वान् म्हणवून घेऊन मागें आपल्या हातची एक ओळहि न ठेवलेले अनेक लोक मीं पाहिले आहेत. लोकोपयोगाच्या दृष्टीनें मला मीच बरा वाटतो." सभा-परिषदा यांतील काम उरकण्यासंबंधानें आतां केळकरांची प्रसिद्धीच होऊन बसली आहे. येथेंहि त्यांची दृष्टि तें काम ध्येयवादित्वानें नमुनेदार कसें होईल यापेक्षां काम उरकण्याकडे अधिक असते. सभेचे ठराव

वगैरे करावयाचे असल्यास त्यांचे मसुदे ते स्वतः चटकन् करूं शकतात. आणि लागू गैरलागू याविषयीं त्यांची तर्कशास्त्रदृष्टि तीक्ष्ण असल्यामुळें, कोणी कांहीं उपसूचना वगैरे नवे विचार सुचविल्यास त्यामुळें, स्वतः गोंधळांत न पडतां व इतरांना गोंधळांत न पाडतां सूचनांचें स्वारस्य तेवढें घेऊन व तें उपयोगांतहि आणून ते मोकळे होतात. शिवाय, बखेडा उत्पन्न करण्यापेक्षां असेल तो मिटविण्याकडेच त्यांची वृत्ति असते. यामुळें, व ते स्वतः बहुभाष नसल्यामुळें, काम निकालांत निघण्याला त्यांची मदत चांगली होते. सोलापूर परिषदेंत टिळक, बेझंटबाई व रँ. परांजपे असा तिरंगी सामना सुरू असतां, 'टिळकांचे हस्तक' केळकर यांनीं टिळकांच्या हजेरींत सर्वांचा समन्वय करून विषयनियामक कमिटीचें काम चांगलें केल्याबद्दल व पुनः तें निर्भीडपणें केल्याबद्दल बेझंटबाईकडून शाबासकी मिळविली. आणि शेवटच्या दिवशींचा सामना किंवा लढा तर त्यांनीं अध्यक्ष म्हणून इतक्या कुशलतेनें निकालांत काढला कीं, सर नारायण चंदावरकर यांनीं केळकरांचें अभिनंदन करून ते त्यांना थट्टेनें म्हणाले कीं, " तुम्हांला स्वराज्य दिलें तर काम कसें कराल असें कोणीं विचारलें तर त्याला मी तुमच्या आजच्या कामाचें उदाहरण देईन ! ". काम उरकण्याची ही संवय त्यांच्या पत्रव्यवहारालाहि लागू आहे. यामुळें अर्थात् त्यांना पत्रव्यवहार पुष्कळ करावा लागतो. पण तो ते बहुधा वेळच्या वेळेवर उरकतात. हाताशीं कारकून टायपिस्ट वगैरे साधनें मिळाल्यामुळेंच तें अधिक शक्य होतें हें उघड आहे.

केळकरांच्या जन्मदिवशीं मोडलिंब येथील एका ज्योतिष्यानें त्यांची जन्मपत्रिका तयार केली. तींत खालील कुंडली मांडली आहे.




या टिपणाखालीं त्या ज्योतिष्यानें जो शेरा लिहिला आहे तो नमूद करण्यासारखा आहे. तो असा-"मेषराशी, राक्षसगण, क्षत्रियवर्ण, कृत्तिका नक्षत्र, प्रथमचरण, महानक्षत्रे मुखे पतितम्, तस्य फलं विद्वान् भवति विद्यावान् शरीरस्य आरोग्यता भवति." मोडलिंब हें खेडें कुग्राम आहे. तेथील ज्योतिष्यानें

केळकरांच्या जन्मदिवशीं जे भविष्य वर्तविलें तें खरें ठरून त्यांतील नक्की दोन मुद्दे आज अनुभवसिद्ध झाले असें निश्चितपणानें म्हणतां येईल. स्वतः केळकरांचा फलज्योतिषावर विश्वास नाहीं. त्यांत विद्येचें बीज असेल, पण तें बीज फलप्रद होऊन त्यांचीं फळें खाण्यास मिळतील असा विश्वास धरण्याला सांगण्याइतके अवश्य संस्कार त्या विद्याबीजावर झालेले आहेत असें केळकरांना वाटत नाहीं. परंतु फलज्योतिष्यावर श्रद्धा ठेवणाऱ्या लोकांना तरी मोडलिंबच्या ज्योतिष्यानें वर्तविलेली केळकरांची ही जन्मपत्रिका हें एक मोठेंच भांडवल होण्यासारखें आहे !

आर्थिक स्थितीच्या दृष्टीनें निष्कर्जी राहण्यासारखें संसारांत दुसरें कोणतेंहि सुख आहे असें ते समजत नाहींत. सुदैवानें त्यांचा जन्म निष्कर्जी स्थितींतच गेला. सातार्‍यास ते वकिली करूं लागले तेव्हां चार रुपयांच्या बिऱ्हाडांत ते रहात होते, व त्यांच्या संसाराचा खर्च ते ३०।४० रुपयांत भागवीत. पुण्यास ते आले तेव्हां त्यांना १००।१२५ रुपयांपेक्षां अधिक पगार मिळण्याची उमेद नव्हती; व जवळ जवळ तितक्याच प्राप्तीवर त्यांना पुढें बरींच वर्षें काढावीं लागलीं. तथापि क्वचित् प्रसंगीं अधिक उणें येऊंसें लागल्यास वर्षाअखेर देऊन तोंडमिळवणी करावी अशी पद्धत टिळकांनीं सामान्यतः ठेवली होती. १९११ सालीं त्यांना आपल्या मुलीच्या लग्नाचेवेळीं वंधूकडूनं थोडीबहुत मदतहि घ्यावी लागली. पण १९१२ पासून त्यांच्या वाङ्मयलेखनाला मोबदला मिळण्यास सुरवात झाली. आणि त्या वाङ्मयानेंच त्यांना पुढें हात देऊन चांगली प्राप्ति करून दिली. याशिवाय टिळकांच्या वेळेपासूनच केसरी कचेरींतून 'बोनस' देण्यांत येऊं लागलें होतें; व तीच परंपरा पुढें केसरीची सांपत्तिक स्थिति सुधारत गेल्यामुळें चालू राहिली. स्वतः त्यांनीं विम्याची एक पॉलिसी आपल्या खर्चानें घेतली होती व पुढें केसरी कचेरीनेंहि आपल्या खर्चानें त्यांना एक आणखी पॉलिसी घेऊन दिली. अशा रीतीनें निष्कर्जी जन्म घालविण्याचा केळकरांचा हेतु सफल होऊन, मध्यम प्रतीच्या गृहस्थी पद्धतीनें त्यांना राहतां आलें आहे. दर्जानें त्यांच्याबरोबरीचे चार लोक घरच्या मोटारी वगैरे ठेऊन हिंडतांना पाहून, केळकरांनाहि कांहीं लोक ' तुम्ही मोटार वगैरे कां ठेवीत नाहीं ? ' असें विचारतात. परंतु घरची गाडी किंवा मोटार ठेवण्याइतकी संपन्नता त्यांना अद्यापिहि आलेली नाहीं, हें लोकांना काय माहीत ! कसेंहि असलें; तरी, केळकरांना आपल्या स्थितीविषयीं असंतुष्ट राहण्याचें कारण नाहीं; व ते स्वतः तरी असंतुष्टता ठेवीतहि नाहींत. ते स्नेही लोकांजवळ

असें नेहमीं बोलूनहि दाखवितात कीं, " मी प्रथमपासून वकिलीच केली असती, किंवा नोकरींत शिरलों असतों, तर माझी सांपत्तिक स्थिति कदाचित् याहून अधिक वरी राहिली असती. कारण माझ्याच बरोबरीचे व माझ्या योग्यतेचे लोक वकिली करून श्रीमंत झालेले आहेत. तसेंच माझे प्रत्यक्ष कांहीं वर्गबंधुच पुण्यास स्मॉलकॉज कोर्टाचे जज होऊन त्यांनीं शेवटचा पगार १२०० रु. व पेन्शन ६०० रुपये घेतलेले आहे. वकिली किंवा नोकरी मी करतों तर तशी स्थिति मलाहि सहज प्राप्त झाली असती. पण तेवढ्या फरकामुळें असमाधान मानण्यासारखें काय आहे ? कारण, उलटपक्षीं आवडीचा व्यासंग जन्मभर भरपूर करण्याची संधि, यथाशक्ति सार्वजनिक काम करण्याच्या हौसेची सफलता, व जनरीतीनें ज्याला लौकिक म्हणतात तो पुरुषार्थ, या तिन्ही गोष्टी मला जितक्या लाभल्या तितक्या माझ्या या इतर वर्गबंधूंना कोठें लाभल्या ! तात्पर्य, दैन्यांत दिवस न काढावे लागतां, या दिवसांत सार्वजनिक कार्य व वाङ्मयसेवा मनासारखी करण्यास सांपडणें याला जर यश म्हटलें तर तें यश, मी माझ्या समकालीन पिढीच्या किंवा समवयस्क अशा कोणत्याहि लेखकापेक्षां अधिक मिळविलें आहे असा हक्क मी कां सांगूं नये ! "

पण दुसऱ्याहि एका दृष्टीनें केळकरांना अशाच प्रकारचें यश लाभलें आहे असें यथार्थपणें म्हणतां येईल. एकाद्या मनुष्याच्या हाताला यश आहे असें म्हणण्याच्या पद्धतीनें, केळकरांच्याहि हाताला तें आहे असें थोडेंबहुत म्हणतां येईल. कारण त्यांच्या हातून लोकोपयोगी अशा अनेक संस्थांची उभारणी व अनेक संस्थांचें संवर्धन त्यांच्या शक्तीप्रमाणें झालेलें आहे. त्याला कारण त्यांची सत्स्फूर्ति व लोकांचा त्यांच्यावरील विश्वास. त्यांची ही सत्स्फूर्ति १९१६ सालीं टिळक ज्युबिली फंडाच्या रूपानें प्रथम अनुभवास आली. या फंडाची हकीकत टिळक चरित्राच्या तिसऱ्या खंडांत दिलेली आहे. या फंडाची कल्पना कशी निघाली, तो थोड्याच काळांत कसा जमला, व त्यासंबंधाचा समारंभ किती यशस्वी रीतीनें पार पडला, याचें वर्णन तेथें वाचावयास मिळेल. त्यांत न सांगितलेली अशी एकच गोष्ट पण मुद्याची आहे. ती ही कीं, या फंडाची मूळ कल्पना सर्वस्वी केळकरांची होती, व इतर कित्येकांनीं तिला विरोध केला किंवा त्यावर विरजण घालण्याचा प्रयत्न केला, तथापि केळकरांच्या खाजगी पत्रावरच बहुतेक काम भागून तीन आठवड्यांत एक लक्ष रुपये जमले. ही रक्कम अर्थात् टिळकांसारख्या लोकोत्तर पुरुषाकरितां म्हणूनच जमली हें अगदीं उघड आहे. तथापि त्याचें यश, मूळची स्फूर्ति व प्रयत्न ही ज्यांचीं

त्यांना, अंशतः तरी देणें योग्य होईल. १९१८ सालीं केळकरांनीं शिवाजी मंदिराची कल्पना हातीं घेतली. या ठिकाणीं रु. १५,००० देणगीची रक्कम हातीं मिळाल्यामुळेंच पुढील कार्य झालें हें खरें; तथापि पुण्यांतील सगळ्या जागा शोधणें, शेवटीं हल्लींची शिवाजी मंदिराची जागा निश्चित करणें, ती मिळविण्याविषयीं आटोकाट प्रयत्न करणें, व शिवाजी मंदिर बांधून त्याची कायमची व्यवस्था करणें, याविषयीं केळकरांनीं जसे पुष्कळ प्रयत्न केले तसेच त्यांच्या प्रयत्नाला यशहि आलें. एरवीं हल्लींसारखी विस्तीर्ण व रम्य जागा पुणें शहरच्या मध्यवर्तींत मिळतीना. त्याचप्रमाणें टिळकरोडवरील महाराष्ट्र व्यायाम मंडळ असलेली मोठी जागा व त्यांतील उत्कृष्ट विहीर हीं केसरी-संस्थेकरतां नजर ठेऊन उडी घालून केळकरांनीं संपादिली. तिचा संस्थेकरितां उपयोग करण्याची अजून संधि आलेली नाहीं. तथापि त्या जागेसारखी जागा शहरांत मिळणें हे सत्स्फूर्ति व हाताला यश याशिवाय होऊं शकत नाहीं. टिळकरोडवरील वसाहत लौकर होण्याचें श्रेय पुष्कळसें केळकरांना आहे. टिळक मंदिराचा चौथरा व जागा जगन्नाथ महाराजांनीं उदारपणें व कृतज्ञतेनें दिली आणि होमरूल लीगनें तिजवर अवश्य तो खर्च केला. तथापि होमरूललीग संस्थेला केळकरांसारखा म्हणजे कोणतेंहि काम आवर्जून, मागें लागून, उरक दाखवून, भिजत घोंगडें न टाकतां, व संशयानें अनिश्चितपणानें डोकें भ्रमूं न देतां, तावडतोब निकालांत काढणारा सेक्रेटरी न लाभता तर या स्मारक-मंदिराचें काम अशा रीतीनें पुरें झालें नसतें. पुणें म्युनिसिपालिटींतील लो. टिळकांच्या पुतळ्याविषयीं त्यांनीं यश कसें मिळविलें हें पूर्वी सांगण्यांत आलेंच आहे. तसेंच रायगडावरील शिवाजी स्मारकाचें पुष्कळ दिवस भिजत पडलेलें काम केळकरांनीं कसें निकालांत काढलें व आज तो फंड कसा सुस्थितींत ठेवला आहे, हें लोकांना ठाऊक असेलच. पुणें येथील ताराचंद रामनाथ रुग्णालयाच्या फंड-कमिटीचे पहिल्या दिवसापासून ते अध्यक्ष असून, ते स्वतः केव्हांहि वर्गणीकरतां हिंडले-फिरले नाहींत तरी, डॉ. लागू, वैद्यरत्न नानलशास्त्री इत्यादिकांच्या खटपटीनें व शेट हणमंतराम यांच्या केळकरांवरील विश्वासानें या कार्याच्या सिद्धीला मदत झाली याचा वेळोवेळीं त्यांजकडून उच्चार झालेलाच आहे. १९२० पासून आतांपर्यंत केसरीच्या पैशांतून सत्कार्याला व सत्पात्रीं दान करण्याचें धोरण केळकरांनीं आज बारा वर्षें चालविलें आहे. हातीं पैसा असला तरी तो सत्कार्याला लागणें ही गोष्ट सत्स्फूर्तीशिवाय होत नाहीं. गेल्या १०।१२ वर्षांत केसरीनें लोकोपयोगी

कार्याला किती देणग्या दिल्या त्याची याद गतवर्षी प्रसिद्ध झालेल्या ज्युबिली अंकांत दिली आहे ती कोणींहि वाचून पाहावी. पण केळकरांनीं घेतलेलें याहूनहि मोठें व लोकोत्तर यश म्हटलें म्हणजे १९३० सालीं केळकरांनीं तीन लक्ष रुपयांचा ट्रस्ट निर्माण केला हें होय. ही तीन लक्ष रुपयांची देणगी म्हणजे १९१९ सालीं टिळकांच्या संकटसमयीं त्यांना जनतेनें प्रेमानें दिलेल्या देणगीला कर्ज समजून, कृतज्ञतेनें केलेली कर्जफेड होय ! या कर्ज-फेडींत त्यांनीं वऱ्हाड–नागपूर प्रांताला एक लाख रुपये व कर्नाटकाला पंचवीस हजार रुपये कायम–निधीच्या रूपानें दिले. या रकमा मूळ देणगीवरील व्याज लक्षांत घेऊन ठरविलेल्या आहेत. ही कर्जफेड प्रत्युपकार करून स्नेह तोडण्याच्या बुद्धीनें, आढ्यतेनें, केलेली नाहीं. तर जुना स्नेह-संबंध कृतज्ञता बुद्धीनें अभंग राखून वृद्धिंगत करण्याकरतां व त्या त्या प्रांतांचीं लोकहिताचीं कामें होण्याला अंशतः कायमची मदत व्हावी म्हणून केलेली आहे. १९२८ पासून केळकरांनीं केसरी अर्धसाप्ताहिक केला. या व्यवस्थेंत परस्पर पोष्टाला दिलेच पाहिजेत इतके म्हणजे तेराच आणे वर्गणीदारावर अधिक बसले. परंतु पूर्वी एवढाच केसरी आठवड्यांतून एक ऐवजीं दोन वेळ वाचकांना मिळूं लागला ही सेवा बिनमोल झाली. आणि जो केसरी आपल्या पश्चात् कसा चालेल, कसा टिकेल, अशाविषयीं लो. टिळकांना एका दृष्टीनें यथार्थ चिंता वाटत होती ती नाहींशी तर केलीच; पण त्या केसरीची या दृष्टीची उपयुक्तता वाढविली हें एक प्रकारचें विशेष यश होय. केसरी अर्धसाप्ताहिक करून शिवाय एजंटमार्फत मिळण्याची व्यवस्था केल्यानें तो वाचकांना पूर्वीपेक्षां किती तरी आधीं वाचावयास मिळतो ! केसरीसंस्थे-विषयीं अगदीं ताजी सुधारणा म्हटली म्हणजे फाऊंडरीची वाढ, ग्रंथसंग्रहा-करतां बांधलेला हॉल, व संपादक मंडळाकरतां बांधलेल्या स्वतंत्र खोल्या ही होय. केसरी संस्था वगळून वर ज्या इतर अनेक गोष्टी सांगितल्या त्यांत द्रव्यसाहाय्य अर्थात् निरनिराळ्या व्यक्तींकडून किंवा संस्थांकडून मिळालेलें आहे; पण हाताशीं असतां तें तोंडाला न लागणें, अशा गोष्टी ज्या व्यक्ति-दोषामुळें घडतात असें आपण नेहमीं पाहतों ते कोणतेहि दोष केळकरांमध्यें नसून उलट, कार्यसाधक असे गुण त्यांजमध्यें आहेत व त्यांनीं त्याचा भरपूर उपयोग केवळ सत्प्रवृत्तीनें केला म्हणून त्यांच्या हाताला असें यश लाभलें हें कोण नाकबूल करील ?

इतर परिस्थितीला अनुरूप अशीच केळकरांची गृहस्थितिहि आहे.

त्यांच्या पूर्वीच्या पिढीच्या मानानें त्यांचे बंधु व स्वतः ते यांना विद्या व संपन्नता अधिक लाभली याबद्दल ते समाधान मानतात. आणि पुष्कळ घरीं जें एका पिढींत नाहीं तें दुसऱ्या पिढीला प्राप्त व्हावें हा योग आढळूनहि येतो. थोरेपालट व बदल ही जगाची रीतच आहे. पण केळकर नेहेमीं न्यायबुद्धीनें असें म्हणतात कीं, माझ्या वरचे पिढींतील लोकांत बुद्धिमत्ता नव्हती असें म्हणण्याला मात्र मी तयार नाहीं. बीं चांगलें आहे पण तें कोंकणच्या खडकावर पडलें तर त्याचा काय उपयोग ? त्यांना माझ्यासारखी परिस्थिति लाभती तर तेहि विद्वान् झाले असते. म्हणून श्रेय असेल तर तें आम्हां बंधूंच्या बुद्धीला नाहीं, तर तें परिस्थितीलाच आहे. असो. या परिस्थितीचा फायदा स्वतः केळकरांप्रमाणें त्यांच्या पुढच्या पिढीलाहि मिळाला आहे. स्वतः केळकरांना मिळाला तो असा कीं, घरच्या गरीबीमुळें त्यांच्या सर्वांत वडील बंधूंना एल्एल्. बी. च्या टर्म्स भरणें सोडून देऊन नोकरी धरावी लागली. त्यांचे मधले बंधूहि सरकारी नोकरींत शिरले. त्याचा फायदा केळकरांना असा मिळाला कीं, स्वतः त्यांना एल्एल्. बी. होण्याची फारशी हौस नसतांहि बंधूंच्या उत्तेजनानेंच ते एल्एल्. बी. झाले; व केळकर एल्एल्. बी. नसते तर ते पुण्यासच न येते. मग आजची स्थिति त्यांना कशी लाभती ! त्यांच्या दोघां बंधूंनीं त्यांना लिहिलेंच कीं, "आम्ही दोघे सरकारी नोकरीत शिरलो तेवढे पुरे. आमच्या पैकीं एकाला तरी, स्वतंत्र जीवन लाभलें तरी त्यांत आम्हांला आनंदच आहे." केळकरांच्या पुढल्या पिढींत त्यांच्या इतकीहि विद्या झाली नाहीं. पण ती फक्त युनिव्हर्सिटीच्या शिक्याची विद्या. एरवीं, त्यांच्या घराण्यांत विद्येचें फळ दिसून येतें. त्यांची मुलगी तर युरोपांत पी. एच. डी. ची पदवी मिळवून पुण्यांत एका कॉलेजाची प्रिन्सिपाल आहे व हिंदी महिला विद्यापीठाच्या सेनेटची व सिंडिकेटची सभासद आहे. त्या व्याख्यानें देतात व ठिकठिकाणीं परिषदांचें अध्यक्षस्थान स्वीकारतात. त्यांनीं व त्यांच्या एका बंधूंनीं मिळून 'गीतद्विदल' या नांवाचें कवितांचें पुस्तक केलें आहे. केळकरांचे वडील चिरंजीव काशिनाथपंत हे टिळक विद्यापीठाचे पदवीधर असून पुढें त्यांनीं हायकोर्ट वकिलांची परीक्षाहि दिली. पण याशिवाय अल्पवयांतच त्यांनीं लेखन-व्यवसाय सुरू करून 'नव्या स्मृतीची आवश्यकता' या विषयावर एक लहान पुस्तक व 'हिंदुव्यवहारधर्मशास्त्र' या विषयावर एक मोठा व फार चांगला ग्रंथ लिहिला आहे. केळकरांचे धाकटे चिरंजीव यशवंतराव यांनीं 'गीतगुंफा' या नांवाचें स्वतंत्र कवितांचें पुस्तक नुकतेंच छापलें असून त्यांतील काव्यबुद्धि व स्वतंत्र कल्पना वाचा-

णण्यासारख्या आहेत. पण त्यांचा इतिहासाचा व्यासंग फारच चांगला असून, मराठ्यांचे इतिहास या विषयांतील त्यांचें वाचन इतकें सूक्ष्म झालें आहे कीं, त्यांच्या पोवाड्यांच्या नव्या आवृत्तीच्या पुस्तकाला म्हणजे पोवाड्यांचें संशोधन व त्यावरील त्यांचा निबंध याला, तज्ज्ञांकडून पुष्कळ मान्यता मिळाली आहे. कविता-प्रमाणें ते विनोदी लेखहि चांगले लिहितात. रत्नाकराच्या जून १९३२ च्या अंकांत श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांच्या ' तोतयाच्या बंडा ' वरील टीकेवर इतिहास-दृष्ट्या जी प्रतिटीका त्यांनीं एकदोन मुद्यांवर केली आहे ती त्यांच्या सूक्ष्म अभ्यासाची व मार्मिक लेखणीची चांगली साक्ष देते. केळकरांचे एक सख्खे चुलतभाऊ त्यांच्या घरीं घरच्या मुलांतच अगदीं लहानपणापासून वाढलेले दत्तात्रय केशव केळकर हे बी. ए. झाले व एम्. ए. होऊन न्यू पूना कॉलेजांत प्रोफेसरहि व्हावयाचे. परंतु प्रकृतीच्या कारणानें त्यांना पुढील अभ्यास सोडून धावा लागला. तथापि ' काव्यालोचन ' या नांवानें मराठी साहित्य विषयावर जो एक मोठा ग्रंथ त्यांनीं लिहिला आहे त्याचा दर्जा फार उंच असून हल्लीं एम्. ए. च्या परीक्षेला तो ग्रंथ अभ्यासाला ठेवला जातो. त्याचप्रमाणें केळकरांच्या वहिनी म्हणजे सौ. गिरिजाबाई केळकर यांनीं स्त्रियांसाठीं लिहिलेलें वाङ्मय प्रसिद्ध आहे. त्यांना मूळचा शिक्षण-संस्कार कांहीं नाहीं. जें थोडें शिक्षण झालें तें राजकोट येथें गुजराथी शाळेंत झालें. असें असतां त्यांनीं सराईत लेखकासारखीं मराठींत पुस्तकें लिहिलीं, व सभांतील भाषणां-संबंधानें तर पुस्तकांहूनहि त्यांची अधिक ख्याति आहे. परवांपर्यंत मध्यभागच्या विद्याखात्याच्या पुस्तक-परीक्षण कमिटींत त्या एक सभासद होत्या. तात्पर्य, 'तोतया-चें बंड,' 'टिळक-चरित्र,' 'मराठे व इंग्रज,' 'सुभाषित व विनोद' 'राज्यशास्त्र,' इत्यादि तसेंच ' काव्यालोचन, ' ' हिंदु व्यवहार धर्म शास्त्र, ' ' मराठ्यांचे ऐतिहासिक पोवाडे, ' ' गीतगुंफा ' ' स्त्रियांचा स्वर्ग, ' व ' गृहिणी शिक्षण ' इतकीं पुस्तकें केळकरांच्या एकाच घरांतून लिहून झालीं आहेत ! केळकरांचे वडील बंधु-हि केळकराप्रमाणें एक संपादकच होते. या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे, एकाच घराण्यांत, किंबहुना एकाच कुटुंबांत इतकीं व इतक्या निरनिराळ्या प्रकारची वाङ्मय-व्यासंगी मंडळी निघाल्याचीं उदाहरणें महाराष्ट्रांत थोडींच सांपडतील. याचें कांहींसें श्रेय स्वतः केळकरांकडे येतें. डोळ्यांपुढें दिसतें तें मनुष्य सहजच करूं लागतो. घरीं तालीम व आखाडा काढला तर घरचीं माणसें त्यांत थोडीथोडी मेहेनत करणारच. या दृष्टीनें केळकर कुटुंबाकडे पाहिलें म्हणजे आमराईंत एक मोठा वृक्ष व त्याच्या लगत्याला लहान लहान पण

तशींच आंब्याचीं झाडें दिसतात तसा देखावा वाटतो. यांत दुसऱ्या एका दृष्टीनें अर्थात् गौणपणा आहे. कारण हीं लेखनव्यासंगी मुलें किफायतीच्या नोकऱ्यावर किंवा धंद्यांत असतीं तर केळकरांना आजच संसार चालविण्याचें ओझें खांद्यावरून उतरून खालीं ठेवतां आलें असतें. पण स्वतः केळकरांना तरी नोकरीच्या पहिल्या १६ वर्षांत सांपत्तिक दृष्ट्या कितीसें स्वास्थ्य लाभलें होतें? तात्पर्य, सुविद्यता हीच खरी, द्रव्यलाभ हा यदृच्छालाभ होय! या कुटुंबासंबंधानें आणखी एक गोष्ट सांगण्यासारखी आहे ती ही कीं केळकरांच्या मुलीचा मुलगा ह्याहि होतकरू निघाला आहे. हायस्कुलांत असतांच केवळ आपल्या इच्छेनें त्यानें डफरिन शिपवर मिळणाऱ्या नाविक शिक्षणाचा क्रम पसंत केला; तेथील परीक्षा फर्स्ट क्लासमध्यें पास होऊन हल्लीं तो सिंधा स्टीम नॅव्हिगेशन कंपनीमध्यें ॲप्रेंटिस आहे व पुढें मागें ऑफिसर होईल.

केळकरांचें कुटुंब सौ. दुर्गाबाई ऊर्फ ताई यांचा उल्लेख वरील मंडळींत होऊं शकत नाहीं. याचें कारण त्यांना शाळेंतील पुस्तकी शिक्षण मुळींच मिळालेलें नाहीं. त्या बालविवाहयुगांतील असून त्यांचें लग्न ७।८व्या वर्षी झालें. शिक्षणाचा संस्कार असा पूर्वी किंवा नंतर मुळींच झाला नाहीं. तथापि घरीं जुन्या पिढीच्या सासूसासऱ्यांनीं नेहमीं सहिष्णुतेचें वातावरण ठेवलेलें होतें, यामुळें जावा-नणदांनीं हौसेनें व पुरुषांच्या उत्तेजनानें लिहिणें वाचणें घरच्याघरींच थोडेंबहुत केलें. केळकरांच्या कुटुंबाला पोथीपुस्तक वर्तमानपत्र चांगलेंच वाचतां येतें व समजतें. वर्तमानपत्रें वाचण्याची गोडी त्यांना घरच्या आखाड्यांत सहजच लागली; व सुनांकडून त्या नित्य यांपैकीं कांहींना कांहीं वाचून घेतात. धार्मिक पोथीपुस्तक स्वतःच वाचतात. पण त्यांचा विशेष भर कथा, कीर्तन, पुराण यांवर असून या कामीं त्यांनीं आपल्या जुन्या पद्धतीच्या सासूसासऱ्यांचें व्रत अखंड चालविलें आहे व वाढविलेंहि आहे. केळकरांच्या घरीं रामाची उपासना आहे ती स्वतः केळकरांच्या जन्मापासून त्यांच्या वडिलांनीं घेतलेली; म्हणून वडिलांचे स्मरणार्थ ती केळकरांनीं निष्ठेनें चालविली आहे. परंतु कालमानाप्रमाणें स्वतः केळकरांकडून व पुढच्या पिढीच्या मुलांकडून नित्यनैमित्तिक धर्मकृत्यांची एरवीं जो उपेक्षा होण्याचा संभव होता तो टळण्याचें, आणि तीं सर्व धर्मकृत्यें घरीं यथासांग केलीं जाण्याचें, श्रेय या बाईनांच आहे. घरांतील 'धर्माधिकाऱ्यां'चें स्थान त्यांना सर्व कुटुंबीयांनीं आनंदानें दिलें आहे! आणि दानधर्माचे कामीं केळकरांच्या कुटुंबाचा हात सढळ असल्यामुळें तो धर्माध्यक्षाचा अधिकार त्यांना शोभतोहि.

अशा रीतीनें शिक्षणानें व स्फूर्तीनें त्या सर्वस्वी जुन्या वळणाच्या असल्या तरी नवीन विचारांतहि त्यांची प्रगति बरीच झाली आहे. मुलीला देशस्थ घराण्यांत देण्याला त्यांनीं आनंदानें संमति दिली. १९२२ सालीं स्वतः पिकेटिंगला गेल्या. चळवळीच्या दिवसांत किंवा एरवींहि केळकरांकडे कोणत्याहि जातीचा पाहुणा आला तरी त्याची व्यवस्था त्यांनीं त्याला कोणताहि कमीपणा न येईल अशी ठेवली आहे. घरीं स्वदेशीच वस्तु वापरण्याचें कामीं त्या पुरुषांनाहि मागें टाकतात. त्यांनीं एक टिळकउत्सवमंडळ काढलें असून पुण्यतिथीच्या दिवशीं त्या धर्मार्थ देशी बांगड्या वाटतात. सभांतील व परिषदांतील स्त्री-पुरुष साहचर्य त्यांना दोषास्पद वाटत नाहीं. नाइलाज तर कांहीं मर्यादेपर्यंत सहशिक्षणालाहि पण त्यांची संमति आहे. अस्पृश्यांच्या हक्कांची जाणीव त्यांना बरीच आहे. पुनर्विवाहित स्त्रिया किंवा त्यांचे कुटुंबीय हे घरीं आल्यास त्यांना वागविण्यांत त्या फरक दाखवीत नाहींत. त्यांची मुलगी दीड वर्षें विलायतेस राहून आली तरी तिला प्रायश्चित्त घेण्याचा तगादा त्यांनीं केला नाहीं. अशा रीतीनें नव्याजुन्याचा मेळ केळकरांच्या घरीं बऱ्याच यशस्वी रीतीनें पडलेला दिसतो. त्याचें कारण असें कीं, मुख्य अधिकारांचीं माणसें समजुतीनें परस्परांशीं सहिष्णुता ठेवतात. यामुळें सुधारक म्हणून न मिरवितांना केळकरांची गणना सुधारक म्हणून सुधारकांकडून केली जाते, व सनातनी पक्षालाहि त्यांचेवर नाराज होण्यासारखें घरीं कांहीं घडत असलेलें दाखविता येत नाहीं ! मग केळकरांचे चहाते म्हणतात त्याप्रमाणें हा त्यांचा गुण समजावा, किंवा त्यांना नांवें ठेवणारे प्रतिपक्षी इतर बाबतींत म्हणतात त्याप्रमाणें हाहि त्यांचा दुटप्पीपणाचा दोष समजावा !

ज्यांना आपत्तीचे प्रसंग असे म्हणता येईल असे केळकरांवरहि कांहीं आले. कारण ते झाले तरी त्यांतून कसे सुटणार ? या दृष्टीनें पाहतां पहिला प्रसंग म्हणजे १९०४ सालीं त्यांचे वडील बंधु वारले हा होय. कारण त्यामुळें एकंदर संसाराचा भार ज्या तीन पायांवर उभा होता त्यांतील एक तुटून पडला. यानंतर १९०८ सालीं केळकरांवर हायकोर्टच्या बदनामीचा खटला होऊन त्यांना कैदेची शिक्षा झाली. त्याची माहिती थोडी वर दिलीच आहे. पण ही राजकीय आपत्ति होय; व एका अर्थानें ती आपत्तिहि म्हणतां येत नाहीं. पण १९१३ सालीं त्यांच्यावर ओढवली ती आपत्ति कौटुंबिक असून अत्यंत दुःखद होती. यापूर्वी दोन वर्षेंच त्यांच्या कन्येचा विवाह त्यांचे साताराचे स्नेही डॉ. कुशाभाऊ देशपांडे यांच्या मुलाशीं होऊन १९१३ च्या जानेवारींत त्या मुलीला एक मुलगा झाला. केळकरांचे जावई हे यावेळीं मुंबईस एल्‌एल्.

बी. च्या टर्म्स भरीत होते. असें असतां त्या सालच्या मार्च महिन्यांत एका-एकीं जांवयांना सरदारगृहांत दोपीज्वर विशेष उग्रस्वरूपाचा व विषारी असा येऊन अवघ्या दोन अडीच दिवसांत त्यांचें प्राणोत्क्रमण झालें! योग असा कीं, याच वेळेला मुंबईस 'पब्लिक सर्व्हिस कमिशन'ची बैठक चालू होती. तींत साक्ष देण्याचें निमंत्रण केळकरांना आलें होतें. त्याप्रमाणें ते सरदार-गृहांत जाऊन उतरले. त्या रात्रींच त्यांच्या जांवयांना ज्वर आला. तो कांहीं केल्या हटलाच नाहीं. डॉ. रावसारखे तज्ज्ञ आणून उपचार केले. परंतु ताप आल्यापासून दीड दिवसांत रक्ताला विषार भिनून मेंदूपर्यंत गेला. ज्या दिवशीं केळकरांची साक्ष व्हावयाची त्या दिवशीं सकाळपासून डॉक्टरानें आशा सोडली. अशा स्थितींत साक्ष द्यावी तरी कशी ? व न देतां घरीं रडत बसून तरी काय करणार ? किंबहुना, मनाला कांहीं तात्पुरता वेगळा उद्योग मिळाल्यास तितकाच वेळ गहन चिंतेशिवाय च भावी दुःखाच्या कल्पनेशिवाय जाईल, म्हणून केळकर कमिशनपुढें साक्षीला गेले; व तेवढ्या वेळेपुरता त्यांना दुःखा-चा विसर पडला. फिरून त्याच हेतूनें संध्याकाळीं त्यांच्या स्नेह्यांनीं त्यांना विल्सनकॉलेजांत रॅम्से मॅकडोनाल्ड यांचें व्याख्यान ऐकण्याकरितां म्हणून बळेंच गाडींत घालून नेलें. कारण घरीं रोग्याचे आंथरुणाजवळ डॉक्टरांनीं केळकरां-प्रमाणें रोग्याच्या वडिलांनाहि बसूं दिलें नाहीं. कारण तेथें बसणें म्हणजे उभयता व्याह्यांनीं एकमेकांकडे पाहून एकमेकांचें दुःख वाढविणें असा प्रकार होता. अखेर त्याच रात्रीं जांवयांचें देहावसान झालें. केळकरांनीं देशपांडे यांच्याशीं केलेला हा शरीरसंबंध देशस्थ-कोंकणस्थांतील विवाह होता. त्यापूर्वीचा वीस वर्षांचा बंधुप्रेमासारखा स्नेह लक्षांत घेऊन उभयतांनीं हा विवाह हौसेनें केला होता. केळकरांच्या वृद्ध मातोश्रीनेंहि त्याला आपली संमति आनंदानें दिली होती. जांवईहि सर्व दृष्टींनीं अनुरूप व विशेषतः प्रेमळ असा होता. अशा स्थितींत सुमारें पंधराव्या वर्षी केळकरांच्या मुलीवर हा घाला पडला!! दैवयोगानें त्यांचा नातू हुषार, स्वावलंबी, व होतकरू निघाला असून, केळकरांच्या कन्येनेंहि हिंदमहिलाविद्यालयांतील शिक्षण पुरें करून, युरोपला जाऊन, पी. एच् डी. ची पदवी मिळवून, जन्माचें देशकार्य म्हणून 'हिंदु विडोज होम'चें तहाहयात सभासदत्व पतकरलें आहे; व हल्लीं त्यांना एरंडवणें येथील मुलींच्या कॉलेजवर प्रिन्सिपाल नेमण्यांत आलेलें आहे. तथापि, आकाशाची कुऱ्हाड पडून त्यांच्या संसाराचा जो विध्वंस झाला व केळकरांनाहि जो दुःखाचा प्रसंग आला तो कोणत्याहि स्थितींत जन्मभर टिकणाराच आहे.

यानंतरच्या ८।१० वर्षांत केळकरांवर वर्तमानपत्राच्या धंद्याच्या अनुषंगानें खाजगी स्वरूपाच्या बेअब्रु केल्याच्या दोनतीन फौजदारी फिर्यादी झाल्या. पण त्यांना कांहींच महत्त्व नव्हतें. त्या सर्वांतून केळकर निर्दोषी म्हणून सुटले. फिरून १९२५ सालीं केळकरांवर हायकोर्टाची बदनामी केल्याचा दुसरा खटला झाला. त्यावेळीं पूर्वीप्रमाणेंच त्यांनीं माफी तर लिहून दिलीच नाहीं, पण स्वतः आपला खटला आपणच चालविला. इतकेंच नव्हे तर पूर्वी हायकोर्टानें जन्मभर तुरुंगांत ठेवण्याच्या धाकानें लिहून घेतलेल्या माफीची आठवण त्यांनीं हायकोर्टाला देऊन स्पष्टच शब्दांनीं असें सांगितलें कीं, "अशा तऱ्हेची माफी जुलुमानें घेणें ही गोष्ट देणाराच्या व घेणाराच्याहि स्वाभिमानाला दूषणास्पद होय. जुलुमाच्या रामरामानें पुण्य लागत नाहीं. तरी या वेळीं मला कोर्टानें शिक्षा दिलीच तर तींत माफीच्या सक्तीचें कलम घालूं नये, व त्याऐवजीं निश्चित मुदतीची जी कोणती कैदेची शिक्षा देणें कोर्टास योग्य वाटेल ती त्यांनीं खुशाल द्यावी." कदाचित् हें ठसठशीत उत्तर कोर्टाला पटलें असेल. म्हणून त्यांनीं माफीचें हें कलम शिक्षेंत घातलें नाहीं; व शिक्षा दिली तीहि कैदेची न देतां, फक्त दंडाची दिली. मात्र दंड पांच हजार रुपये चोपून घेतला ! हीः आपत्ति देखील राजकीय स्वरूपाचीच होय. म्हणून तिलाहि प्रापंचिक दृष्ट्या विशेष महत्त्व देतां येत नाहीं. अशा रीतीनें फक्त एकदोन कौटुंबिक आपत्तींशिवाय केळकरांचें आयुष्य मोठें निष्काळजी गेलें. जी काय काळजी किंवा चिंता त्यांना असे ती सार्वजनिक व्यवहारांतली, विशेषतः केसरी ट्रस्ट व टिळकांच्या चिरंजीवांचे संबंध या विषयींची ! गृहप्रपंचाची अशी चिंता त्यांनीं केव्हांच केली नाहीं. तशी चिंता करण्याचें फारसें कारण त्यांना पुढें पुढें राहिलें नाहीं. त्यांनीं जन्मांत एकहि दिवस स्वतः बाजारांत जाऊन जिन्नस खरेदी केला नाहीं. नाहीं म्हणावयास त्यांना घरच्या इमारती बांधणें, वाढविणें, साफ ठेवणें व आपली बैठकीची जागा घरांत निरनिराळ्या दालनांतून बदलणें यांचा एक प्रकारें नाद असल्यामुळें तें तेवढें त्यांच्या आवडीचें काम म्हणून ते स्वतः पाहतात. अगदीं सामान्य प्रतीच्या कपड्यांशिवाय त्यांना दुसरें कांहीं लागत नाहीं. यामुळें स्वतः त्यांच्याकरितां करावयाचें असें घरकाम म्हणून कुटुंबांतील इतर लोकांना फारसें असतच नाहीं. येऊनजाऊन प्रवासाचे प्रसंगींच क्वचित् सामानसुमानाची तयारी म्हणून करावी लागते. पण त्यांतहि अगदीं जरूरीच्या जिनसांखेरीज ते बरोबर कांहींच सरंजाम घेत नाहींत. प्रवासांत रुपाशीं राहण्याचीच त्यांना हौस वाटते ! आणि प्रवासांत

काय किंवा घरीं काय, कदाचित् एका मुईमुगाशिवाय, त्यांच्या आवडीचा असा एकहि पदार्थ सांगण्यासारखा नाहीं.

केळकर हे मुख्य संपादक असले तरी, त्याच्या अनुषंगानें किंवा स्वतंत्र रीतीनेंहि ते सार्वजनिक कामांत पडलेले व कालक्रमानें पुढारीपण पावलेले गृहस्थ आहेत. वाङ्मय विषयाप्रमाणें राजकीय विषयांतहि त्यांचीं स्वतंत्र मतें असून, त्यांच्या विशिष्ट राजकीय पक्षाच्या सभांतून तीं बंदिस्त रीतीनें व वर्तमानपत्रांतून अर्थात् अधिक मोकळेपणानें प्रसिद्ध होतात. राजकीय विषयावरहि त्यांनीं पुष्कळच लिहिलें आहे. व्याख्यानेंहि पुष्कळ दिलीं आहेत. पक्षोपपक्षाच्या घटना केल्या करविल्या आहेत, व आंखीव कांतीव स्वरूपाचे जाहीरनामे लिहिले आहेत. सभा-परिषदांतून व कायदे कौन्सिलांतून ठराव मांडलेले आहेत; त्या अनुरोधानें मतप्रसार केला आहे; वाद लढले आहेत. केळकर टिळकांना येऊन मिळाले तेव्हां अर्थात्च ते राष्ट्रीय हें नांव असलेल्या पक्षांत समाविष्ट झाले. यामुळें नेमस्त किंवा लिबरल हें नांव ज्यांनीं स्वतःला घेतलें त्यांचे केळकर हे ओघानेंच प्रतिपक्षी ठरले. परंतु कोणताहि एक पक्ष म्हटला तरी त्यांत अनेक उपपक्ष असतात, व फिरून प्रत्येक उपपक्षांतहि निरनिराळ्या स्वभावाचे लोक असल्यामुळें प्रकृतिभेदानें कोणत्याहि प्रश्नावर निरनिराळ्या मतांचा संच एकाच पक्षांत दिसून येतो. जी गोष्ट राष्ट्रीय पक्षाची तीच लिबरल पक्षाची. यामुळें दोन्ही पक्षांतील अनुयायांची खेंचाखेंच व सरमिसळ सरहद्दीवर हटकून होते. या गल्लतींत पक्षनामापेक्षां स्वभावसादृश्यानेंच विरुद्ध पक्षांतील माणसें जवळ किंवा लांब होऊं शकतात. केळकर राष्ट्रीय पक्षांत समाविष्ट झाले तरी त्यांचा स्वभाव हा स्वतः त्यांचाच होता. तो कधीं बदलत नाहीं, व आज ३६ वर्षांत बदलला नाहीं. या स्वभावानुसार केळकरांची गणना राष्ट्रीयपक्षाच्या उजव्या म्हणजे धिम्या शाखेंत प्रथमपासूनच होई; व त्या पक्षांतील ज्वलज्जहाल एकांतिक किंवा क्रांतिप्रिय लोकांशीं केळकरांचें केव्हांहि पटलें नाहीं. पण विशिष्ट प्रकारच्या मतापेक्षांहि कोणत्याहि राजकीय पक्षांत कोणाहि समासदाच्या प्रामाणिकपणाला, लायकीला, पात्रतेला, कर्तृत्वाला, पुढारी अधिक महत्त्व देतो. केवळ एखाद्या विशिष्ट तीव्र मताच्या गुणानेंच जर केसरी-मराठयाचा संपादक टिळकांना नेमावयाचा असता तर १८९९ सालींच त्यांनीं केळकरांकडून 'मराठया'चेंहि संपादकत्व काढून घेतलें असतें; व केसरीच्या संबंधांत त्यांचें नांवहि केव्हां घेतलें नसतें. पण उलट प्रत्यक्ष वस्तुस्थिति कशी घडली हें आजवर महाराष्ट्रांतील जनतेनें पाहून पारखून घेतलेंच आहे.

राष्ट्रीय व लिबरल या सरहद्दीच्या आसपास केळकर आपलें ठाणें नेहमीं मांडून बसलेले आढळतात. यामुळें रणक्षेत्रांतील सरहद्दीवर घडतें त्याप्रमाणें, प्रतिपक्षांतील लोकांकडे केळकरांनीं जाणें येणें व उलट प्रतिपक्षांतील लोकांनीं केळकरांकडे येणें जाणें, आणि उभयतांनीं मिळून परस्परांचा विटाळ न मानतां, जेवणखाण करणें, गप्पागोष्टी करणें, फार काय पण राजकीय विषयाव्यतिरिक्त इतर गोष्टींत व कार्यांत सहकारिता करणें या गोष्टी घडत. टिळकपक्षांतील कांहीं लोकांना हें आवडत नसे. पण स्वतः टिळक हे अनित्या-पेक्षां नित्यावर व छायेपेक्षां वस्तूवर अधिक लक्ष देणारे असल्यामुळें, त्यांनीं या गौणपणाची जाणीव आपणांला आहे असें केळकरांना केव्हां केव्हां जाणवलें तरी, त्यांच्या आपल्या मुख्य संबंधांत व्यत्यय आणूं दिला नाहीं. इतकेंच नव्हे तर उलट वर सांगितल्याप्रमाणें त्यांच्यावर वाढता विश्वासच टाकला, त्यांना वाढता अधिकार दिला, व त्यांजकडून वाढत्या महत्वाचें व जोखमीचें काम करून घेतलें. या अवांतर लोकांच्या गैरमर्जीमुळें व कांहीं अंशीं उपद्व्यापामुळें १९०७चे सुमारास केळकर हे केसरी संस्थेचा राजीनामा देण्यास आपण होऊन दोनदां तयार झाले. परंतु टिळकांनीं तो केव्हांहि स्वीकारला नाहीं. उलट समजुतीनें घेण्याविषयीं ते त्यांना समजावून सांगत. मतभेदाची ही तीव्रता १९०७ सालींच प्रथम आली. पण त्याच सालीं व संपलीहि. पुढील सर्व काळासंबंधानें असें निश्चयानें म्हणतां येईल कीं, टिळक पक्षांतील इतर कोणत्याहि मनुष्यापेक्षां केळकरांच्या मताला टिळकांजवळ अधिक मान मिळे; मग अखेर टिळकांनीं आपल्या मनाप्रमाणें योग्य वाटेल तें करावें. कारण टिळकांनाहि स्वतःचा म्हणून विशिष्ट स्वभाव होताच. पण यापुढें टिळकांचें व केळकरांचें कधींच बिनसलें नाहीं. आणि टिळक तुरुंगांत असतांना 'वाटल्यास तुम्ही केसरी हातीं घ्या, माझी हरकत नाहीं,' असें तर त्यांनीं केळकरांना लिहिलेंच, पण आणखी विशेष असेंहि लिहिलें कीं, "For God's sake, do not think of leaving me, for nothing will give me greater pain."

जहाल लोकांच्या दृष्टीनें केळकरांचीं राजकीय मतें शबल स्वरूपाचीं असलीं तरी आपल्या जहाल मतांचा प्रसार करण्याला केळकरांइतका देखील, त्यांना दुसरा कोणी मिळाला नाहीं. या मुख्य दृष्टीनें, केळकरांहून अधिक सरस संपादक, वक्ता किंवा कामकरी टिळकांना मिळता तर त्यांनीं त्याची नेमणूक केसरीचा संपादक किंवा आपला मुख्य चिटणीस म्हणून करून केळकरांना पदरच्या बैठ्या पागेंत जागा दाखविली असती. कारण

केव्हांहि केळकरांपेक्षां केसरीचें व आपल्या अंगीकृत कार्याचें महत्त्व टिळकांना अधिक वाटलें असतें व वाटत होतें यांत शंका नाहीं. म्हणून केळकरांशीं टिळकांनीं ठेवलेले अखेरपर्यंतचे संबंध ही टिळकांच्या इतर अनुयायांवरच एक प्रकारें अप्रत्यक्ष टीका होती. " तुमच्या पैकीं कोणीहि माझ्या कामीं केळकरांची बरोबरी करूं शकत नाहीं, मग वरचढपणा तर राहोच, " असें टिळकांनीं आपल्या इतर अनुयायांना तोंडानें न सांगितलें तरी, हातानें केलेंच कीं नाहीं ! व आज टिळकांच्या पश्चात् केळकरांवर नाराज असणाऱ्या लोकांच्या भावनेला व उद्गारांना कितीहि अधिक ऊत आला असला तरी, टिळकपक्षाचें म्हणून कोणतेंहि काम निघाल्यास ते केळकरांचीच सहकारिता इच्छितात ! म. गांधींच्या मतांचाच प्रसार असेल तेथें गोष्ट वेगळी. टिळकांच्या मरणोत्तरहि आजपर्यंत केळकरांची जागा स्वपक्षांतील दुसरा कोणी घेऊं शकला नाहीं; व त्यांना केळकरांचा पाडाव न करतां आल्यामुळें स्वतःच दुसऱ्या पक्षांत सामील व्हावें लागलें ! मग त्यांना आतां टिळकपक्षच अप्रिय झाला असेंहि म्हटलें तरी हरकत नाहीं.

आपण मांडलेलें ठाण सोडण्याची तयारी नसल्यामुळें आपली कांहीं वर्गांतील अप्रियता वाढत आहे हें केळकरांना उघड दिसत होतें. पण आपल्या मतापेक्षां लोकप्रियतेला अधिक मान केळकरांनीं कधींच दिला नाहीं. त्यांच्या उतरत्या अप्रियतेच्या काळांतहि त्यांना कॉंग्रेस वर्किंग कमिटींत ३।४ वर्षे स्थान होतें व १९२५ सालीं तर कॉंग्रेसच्या अध्यक्षाच्या निवडणुकींत मिसेस नायडू यांच्या बाजूनें म. गांधी व पं. नेहरू यांनीं विशेष खटपट केली नसती तर केळकरांनाच तें पद त्या वर्षी लाभण्याचा संभव होता. उलट, महाराष्ट्राच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें, विशेषतः केळकरांच्या पद्धतीप्रमाणें, त्यांना हें स्थान मिळावें याविषयीं खाजगी खटपट किंवा कारवाई अशी कधींच झाली नाहीं. गांधी-पक्षांत केळकरांची अप्रियता वाढली तरी, महाराष्ट्रांत त्यांची लोकप्रियता टिकून होती हें १९२७ च्या असेंब्लीच्या निवडणुकींत दिसूनच आलें. तसेंच स्वराज्यपक्षांतून फुटून निघाल्यानंतरहि ऑलपार्टीज कॉन्फरन्स मध्यें केळकरांना स्वतःचें म्हणून स्थान होतें. अखेर पं. जवाहरलाल नेहरू यांचे कारकीर्दींत कायदे कौन्सिलांवर फिरून बहिष्कार घालण्याचा ठराव सुटला, तेव्हां केळकरांनीं ऑ. इं. कॉंग्रेस कमिटींतील जागा आपण होऊन सोडून दिली; व ज्या महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचे ते दोन वेळ अध्यक्ष होते तिचें सभासदत्वहि त्यांनीं वरील कारणांमुळेंच सोडलें. यापुढें त्यांच्या व

काँग्रेसचा संबंध सहजच सुटला; व काँग्रेसचें हल्लींचें धोरण पाहतां तो कायमचाच सुटला असें म्हणण्यास हरकत नाहीं. केवळ आपलें जुनें वतन सोडूं नये म्हणूनच केळकरांनीं चार आणे भरून पुणें काँग्रेस कमिटीचें सभासदत्व राखलें होतें. लाहोर येथील अधिवेशनास स्वातंत्र्याच्या ठरावाला त्यांनीं भरसभेंत विरोध केला. कारण हल्लींच्या स्थितींत स्वातंत्र्य ही राजकीय मागणी होऊं शकत नाहीं. १९२८ चा नेहरू रिपोर्ट स्वातंत्र्यावर अधिष्ठित नाहीं. महात्मा गांधींचें राउंड टेबल कॉन्फरन्समध्यें बसणें स्वातंत्र्याच्या तात्कालिक मागणीला धरून नाहीं. आणि एका कायदेभंगाशिवाय बाकी सर्व बाबतींत हिंदी जनता फार तर डोमीनियन स्टेटसच्या कल्पनेच्या आंत वावरत आहे हें कोण नाकबूल करील? केळकरांची ही मतचिकित्साच त्यांच्या लोकप्रियतेला बाधक झालेली आहे. पण ती अप्रियता त्यांनीं उघडया डोळ्यांनीं स्वीकारली आहे. उलट मनांत आणलें असतें तर, राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षपदाजवळ पूर्वीच ते पोंचलेले असतां, कांहीं थोडया मानभावीपणाच्या कसरतीनें त्यांना तें पद हस्तगत करतां आलें असतें व याचें उदाहरण श्रीनिवास आय्यंगार किंवा महंमद अल्ली यांचें आहेच. यथाक्रम मोठ्यांतले मोठे प्रांतिक स्वरूपाचे बहुमान मुंबई इलाख्यांत मिळून गेले होते; त्यांना व १९२९ सालीं काँग्रेसच्या अध्यक्षाच्या निवडणुकींत त्यांना दुसरा नंबर मिळाला होता. अशा स्थितींत म. गांधींची खादीची, स्वातंत्र्याची, बेसुमार स्तुति व काँग्रेस करील तेंच सर्व बरोबर असें केसरींतून लिहिण्याचें धोरण त्यांनीं ठेवलें असतें तर त्यांना अध्यक्षपद मिळणें अशक्य नव्हतें. या मतवैशिष्ट्याच्या संबंधांत एक गोष्ट लक्षांत ठेवावी ती अशी कीं, केळकरांवर इतर कोणतेहि आरोप प्रतिपक्षांनीं केलेले असले, तरी सरकाराशीं संधान ठेवून कोणताहि व्यक्तिस्वार्थ साधण्याच्या हेतूचा आरोप त्यांना कधींच करतां आला नाहीं; व कोणी जीभ उचलून टाळ्याला लावून केलाच तरी तो इतर कोणीं खरा मानला नाहीं. ॲसेम्ब्लीचें काम दुरून पाहणारे लोक सांगतातच कीं, युरोपियन किंवा सरकारी सभासदाशीं कोणताहि लवचिकपणा, खेळीमेळीचा प्रकार, किंवा खाजगी रीतीनें भेटून स्वार्थ साधण्याचे प्रकार न करणारे असे जे थोडे लोक स्वराज्यपक्षांत होते त्यांत केळकरांची गणना सहज केली जात असे. ॲसेम्ब्लीबाहेरहि आजवर ३६ वर्षांत सरकारी अधिकाऱ्यांशीं संधान ठेवून स्वतःकरितां एकहि सवलत केळकरांनीं मिळविल्याचें त्यांच्या शत्रूंना दाखवितां येणार नाहीं. आणि शेवटीं तर १९३० सालीं खुद्द राउंड-टेबल-

कॉन्फरन्सचें निमंत्रण त्यांना मुंबईच्या गव्हर्नरांनीं बोलावून नेऊन देऊं केलें असतां ' मी आज स्वतः केसरीचा संपादक आहें व काँग्रेसचा मोठा पक्ष आज राउंड-टेबलला जात नाहीं ' या दोन मुद्दयांवर त्यांनीं तें निमंत्रण नाकारलें. या एकाच गोष्टींत दोन इतर गोष्टी निश्चितपणें ठरल्या. केळकरांना सरकारानें गोलमेज-परिषदेचें निमंत्रण दिलें यावरून राजकीय समाजांत व राष्ट्रीय पक्षांतहि त्यांना कोणतें स्थान आहे, याविषयीं सरकारची कल्पना काय होती हें दिसून आलें. आणि दुसरे पक्षीं गोलमेज-परिषदेला जाण्याची ही सोन्यासारखी संधि त्यांनीं मुद्दाम अव्हेरली यावरून त्यांचीं मतें खरोखर राष्ट्रीय भावनेच्या स्वरूपाचीं किती आहेत हेंहि सहजच कळून आलें. इतर कित्येकामध्यें नेमस्त मतें व व्यक्तिस्वार्थ यांच्या साहचर्याचा जो कोठें कोठें सकारण संशय येतो, तो केळकरांविषयीं तरी सर्वांशीं निर्मूल आहे. अर्थात् केळकरांचीं मतें केव्हां नेमस्तपणाचीं असलीं तरी, सार्वजनिक हितदृष्ट्या किंवा फारच तर व्यक्तिस्वभावानुरूप आहेत, त्यांना इतर कोणचाहि दोष किंवा आयव चिकटलेला नाहीं, हें निर्विवाद रीतीनें व ढळढळीतपणें सिद्ध झालें आहे. केळकर हे केव्हां केव्हां विनोदानें व सूत्ररूपानें म्हणतात कीं, " गोलमेज—परिषदेचें निमंत्रण मला येणें व तें मीं नाकारणें या दोन गोष्टींतच माझ्या राजकीय धोरणाचें सर्वस्व किंवा सार सांठविलेलें आहे ! " किंचित् खोल विचार करून तें कोणींहि समजून घ्यावें. मतांच्या बाबतींत केळकरांच्या निःस्वार्थीपणाबरोबर त्यांची निर्भयताहि दिसून येते. एरवीं लोकाश्रयावर अवलंबून असणाऱ्या केसरीचे ट्रस्टी, चालक, संपादक अशा जागेवर असतां त्यांनीं म. गांधी किंवा राष्ट्रीय सभा यांच्या धोरणाविषयीं प्रतिकूल मतें केसरींतून प्रतिपादण्याचें धैर्य केलें नसतें. गांधी किंवा समष्टिरूप राष्ट्रीय सभा यांपेक्षां व्यक्ति या नात्यानें आपण किती तरी लहान आहों हें ते जाणतात. तथापि राजकीय क्षेत्रांत व्यक्तीची किंमत किंवा महत्त्व, त्यांचीं खरीं प्रामाणिक मतें व तीं प्रगट करण्याचें त्यांचें धैर्य यांवरूच ठरविलें जातें.

कायदेभंगाच्या बाबतींतहि कोणीं झाली तरी हीच दृष्टि ठेविली पाहिजे. तुरुंगांत जाण्याच्या भीतीनें कायदेभंगाच्या धोरणाला केळकर अनुसरीत नाहींत असा आक्षेप त्यांचे कित्येक निंदक त्यांच्यावर आणतात. हा आरोप दिसण्यांत अगदीं स्वाभाविक आहे. पण त्याविरुद्ध किती तरी गोष्टी सांगतां येतात हें मुळांत पहा. केसरीचें संपादकत्व ही कांहीं पुष्पशय्या नव्हे. ती सुळावरची पोळी, व आपल्या कारणापुरता तो सूळ कोणीं किंचित् बोथट

केला तरी तो सूळच. १९०८ साली आपाचाराची चळवळ चालू असत केळकरांनीं 'मराठया'त लिहिलेले जहाल लेख खटल्यांत टिळकांविरुद्ध अवांतर पुरावा म्हणून दाखल केले गेले. जें धोरण केसरीचें तेंच 'मराठया'चें अशी समजूत. अर्थात् जो राग केसरीवर तो 'मराठया' वर हें केळकरांना उघड दिसत होतें. टिळकांवर सरकारचा राग आणखी विशेष कारणांकरितां असला तरी, सरकार रागाच्या भरांत वाळल्यावरोबर ओलेंहि चुलींत घालतें हें केळकरांना दिसत होतें. पुष्कळ असे प्रसंग आले कीं, त्यावेळीं केळकरांचे लेख टिळकांच्या लेखाइतके तीव्र असत. सात्विक संताप आला असतां खटला होईल याकडे केळकर दुर्लक्ष करीत. ही गोष्ट १९३० सालीं सोलापुर प्रकरणीं त्यांनीं इतर कोणत्याहि पत्रानें न केलेली कामगिरी केली त्यावरून दिसून येईल. तात्पर्य, हल्लींसारख्या काळांत केसरी–मराठा पत्रांशीं ३५।३६ वर्षें जो मनुष्य संपादक–संचालक म्हणून संबंध ठेवतो तो, आपण होऊन तुरुंगांत उडी घालीत नसेल तरी, खटला होऊन तुरुंगांत जाण्याचा संभव त्याच्या मनापुढें उभाच नसेल असें म्हणणाराची गणना मूर्खांतच करावी लागेल. हें सर्वसामान्य झालें. टिळकांवर १८९७ सालीं खटला झाला असतां तुरुंगाला खरोखर भिणारा मनुष्य केसरी–मराठा दोन्ही पत्रांची जबाबदारी स्वतःच्या शिरावर घेताना. होमरूल लीगच्या चळवळींत टिळकांप्रमाणें केळकरांवरहि राजद्रोहाचा खटला होणें अगदीं संभवनीय होतें. १९०८च्या पिकेटिंगच्या चळवळींत व फिरून असहकारितेच्या पहिल्या चळवळींत केळकरांनीं पिकेटिंग केल्यामुळें त्यांजवर दोनदां खटला झाला होता. ज्या लेखाबद्दल महंमदअली व शौकतअली यांच्यावर खटला होऊन कराचीस शिक्षा झाली, त्या लेखावर इतर प्रमुख काँग्रेसपुढाऱ्यांबरोबर मुंबईस केळकरांनीं सही केली होती व तो लेख हट्टानें प्रसिद्ध करण्यांत आला होता. १९०८सालीं केसरीबरोबर 'मराठया'वरहि खटला होणार अशी मुंबईहून बातमी आली होती. गायकवाड वाड्यांत सकाळीं झडतीच्या वेळीं हजर राहण्याला म्हणून पोलिस सुपरिंटेंडंटनें केळकरांना बोलावलें, तेव्हां ते आंघोळ करून, नवे कपडे घालून, जानव्याच्या किल्ल्या काढून कुटुंबाजवळ देऊन, 'मी दोनप्रहरीं घरीं न आलों तर माझा शोध फरासखान्यांत लागेल' असें सांगून गायकवाडवाड्यांत गेले. १९३० च्या चळवळींत त्यांनीं पेण येथें मंडलिक व वेतकर यांना अटक झाल्यानंतर त्याच शिबिरांत जाहीर कायदेभंगाचा कार्यक्रम पुरा केला. परत आल्यावर पुन्हां शिवाजीमंदिरांत बेकायदा मीठ, शंभर रुपयांस विकत घेऊन जाहीर कायदे-

भंग केला. फिरून टिळकस्मारकमंदिरांत बेकायदा वाङ्मय जाहीर सभेंत वाचलें. १९०८ सालीं हायकोर्ट बेअदबीच्या खटल्यांत त्यांनीं माफी न मागतां शिक्षेचा संभव स्वीकारला व त्यावेळीं त्यांनीं स्नेह्यांना लिहिलेल्या पत्रांत (हे पत्र कदाचित् श्री. कृ. कोल्हटकर यांचे जवळ सांपडेलहि) मला ६ महिने कैदेची शिक्षा होण्याचा संभव दिसतो असें स्पष्ट लिहिलें होतें. फिरून १९२५च्या खटल्यांत तर, पूर्वी सांगितल्याप्रमाणें, 'मला माफी मागण्याची शिक्षा देऊं नका तर कैदेची शिक्षाहि वाटेल तेवढी द्या. त्यामुळें तुमच्या स्वाभिमानावरोबर माझाहि स्वाभिमान मला संभाळतां येईल,' असें न्यायमूर्तींच्या तोंडावर समोर उभें राहून स्पष्ट शब्दांनीं सांगितलें होतें ही गोष्ट तर लोकांच्या अगदीं ताज्या स्मरणांतच असेल. तात्पर्य, या सर्व गोष्टी एकत्र लक्षांत घेतां, केळकर जर कायदेभंगाच्या चळवळींत यंदा सामील न झाले तर ते केवळ 'तुरुंगाच्या भीतीनें' सामील झाले नाहींत, त्याला इतर कारणें नसतीलच, असें जो म्हणण्याचें धाडस करील त्याला फक्त धाडसीच म्हणावें म्हणजे झालें. समजा, केळकरांना तुरुंगाची शिक्षा झाली असती तर बहुधा ए. क्लास त्यांना मिळाला असता; व बी. मिळाला असता तरी त्यांना फारसें दुःख सोसावें लागलें नसतें हें इतर पुष्कळ लोकांच्या अनुभवावरूनच १९३० पासूनच कळून आलेलें आहे. आणि लिहिण्या वाचण्याला सर्व साधनें तुरुंगांत मिळाल्यावर केळकरांसारख्या माणसाला आणखी निराळा आनंद तो कसला ? पण हें कांहीं लक्षांत न घेतां, त्यांची निंदा करावी, त्यांना नांवें ठेवावीं, हे विशिष्ट मनोधर्मानेंच घडतें. पण केळकरहि अशा लोकप्रियतेकरतां हापापलेले नाहींत. जगांत यश व कीर्ति यांची तरी पाठशिवणी कोणीं कितपत करावी ? तुरुंगांत न गेल्यामुळें टिळकांची योग्यता केळकरांना लभत नाहीं असें म्हणणारांना हें कळत नाहीं कीं, तुरुंगांत जाण्याचा प्रश्न नसता तरी, टिळकांची योग्यता आपल्याला येईल असें केळकरांनीं कधींहि मानलें नाहीं व म्हटलें नाहीं. आणि दहा वर्षांपूर्वीच केळकरांनीं म्हणून ठेवलें आहे कीं, 'टिळकांच्या गादीवर आज मी आहें असें तुम्ही वाटेल तर अज्ञानानें किंवा प्रेमानें म्हणा. पण ती गादी निरंतर मोकळीच राहील हें खूप समजा.' एका शतकांत एकच निर्माण होणाऱ्या मनुष्याचा वारसा कोणाला मिळाला तरी खरी गादी मिळत नाहीं हें केळकर जाणतात व नेहेमीं बोलूनहि दाखवितात. उलटपक्षीं, तुरुंगांत जाऊन आल्यानें आपण टिळक होऊं किंवा विद्यमान सर्व पुढाऱ्यांना मागें टाकून पुढें जाऊं अशी हांव धरणाऱ्या लोकांना, तुरुंगांतून परत येऊनहि काय लाभतें, किती लाभतें, हें

आतां कळून आलेंच असेल. शिवाय एकदां तुरुंगांतून सुटका झाल्यावर सरकारानें घातलेल्या अटी ज्यांनीं मानल्या त्यांनीं आपल्या तुरुंगप्रियतेच्या सोशिकपणाच्या, स्वार्थत्यागाच्या, मर्यादा किती संकुचित आहेत हें आपल्याच हातानें सिद्ध करून जगाला दाखविलेंच कीं नाहीं !

लिहिण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, केवळ तुरुंगांत जाऊन आल्यानें एखाद्या मनुष्याची देशभक्ति जास्त तीव्र वाटते किंवा त्याची सार्वजनिक कार्य करण्याची अंगभूत लायकी वाढते असें मानणें म्हणजे मनाचा किंचित्‌सा कोतेपणा दाखविण्यासारखें आहे. कांहीं थोड्या अवधींत कैद भोगून आल्याबरोबर एखाद्या व्यक्तीस आपण देशभक्त संबोधूं लागतों व त्याची देशसेवा मान्य करतों तर सतत तीन तपें ज्या गृहस्थानें अखंड लोकसेवा केली व ती देखील नानातऱ्हांनीं केली, त्याला कोणी समंजस मनुष्य कोणत्याहि दृष्टीनें कमी लेखील हें संभवनीय वाटत नाहीं. तुरुंगांत जाणें किंवा न जाणें ही फार तात्पुरत्या महत्त्वाची गोष्ट होय. केळकरांच्या राजकीय विरोधकांच्या मनांत ते तुरुंगांत गेले नाहींत म्हणून जरी अढी असली असें मानलें तरी पण केळकरांच्या अंगांत वास करणाऱ्या अनेक गुणांविषयीं अत्यंत आदर आहे हें सांगावयास नको.

असो. एकंदरीनें व्यापक विचार करतां कोणीहि इतिहासकार धिम्या व शांत मुत्सद्यांत व देशभक्तांत केळकरांची गणना करील यांत संशय नाहीं. स्वभावतःच त्यांचा कल विध्वंसनापेक्षां विधायक कार्याकडे अधिक. क्षणभंगुर हुल्लडींपेक्षां त्यांना अखंड रचनात्मक कामगिरी जास्त प्रिय. म्हणून केळकरांची कर्तबगारी वेगळी व दासबाबू किंवा पं. नेहरू यांची वेगळी. कांहीं देशभक्त दारूच्या बाणासारखे असतात. ते पेट घेऊन आकाशांत वर उडतात, जनतेचें मन थोडा वेळ आकर्षण करून घेतात, पण लगेच नष्ट होऊन जमिनीवर पडतात. परंतु केळकरांची देशभक्ति तशा स्वरूपाची नाहीं. ती नंदादीपासारखी आहे. तींत भरारी व शोभा नाहीं, परंतु तींत जें स्नेहपूर्ण अखंडत्व, सातत्य व शांत प्रकाशदायित्व आहे तें फार थोड्या पुढाऱ्यांच्या देशभक्तींत दृष्टोत्पत्तीस येतें. या दृष्टीनें पाहिलें तर पाठीमागें छत्तीस-सदतीस वर्षांची देशसेवा असलेले असे दोनच पुरुष हिंदुस्थानांत दिसतात. एक पं. मदनमोहन मालवीय व दुसरे केळकर. त्यांच्या राष्ट्रीयत्वाचा झरा राजापुरच्या गंगेप्रमाणें केव्हां तरी वाहणारा नव्हे, तो आंग्लकवि टेनिसननें वर्णिलेल्या चिरकाल प्रवाही जलौघासारखा आहे. आणि या त्यांच्या लोकसेवेच्या संथ नदींत त्यांचें अभंग सौजन्य, त्यांची अपूर्व सदभिरुचि, त्यांची प्रशंसनीय उपकारतत्परता

इत्यादि अनेक दुर्मिळ गुणांचे ओढे येऊन मिसळल्या कारणानें व तींतच त्यांच्या निस्सीम वाङ्मयप्रेमाच्या नौका विहार करीत असल्यामुळें तिला जी मनोहरता प्राप्त झाली आहे ती इतरत्र क्वचित् नजरेस पडते. केळकरांच्याहून जास्त तडफेचे देशभक्त आहेत व होतीलहि. त्यांच्याहून अधिक विद्यासंपन्न व अभिजात वाङ्मयसेवकहि कदाचित् निर्माण होतील. तथापि त्यांच्या अंगीं एकसमयावच्छेदेंकरून वास करणाऱ्या अनेक गुणांनीं विशिष्ट असा अष्टपैलू, निरभिमानी, विनयशाली, वादकुशल व सततोद्योगी लोकनायक व लोकसेवक महाराष्ट्राला, किंबहुना हिंदुस्थानाला, मिळणें ही परमेश्वराची खरोखरच मोठी कृपा होय. त्या परमेश्वराच्या कृपेनें केळकर यांस दीर्घ आयुष्य लाभो व भारतवर्षाला त्यांच्या गुणसमुच्चयाचा भरपूर फायदा मिळो, एवढीच प्रार्थना करून, हें केळकरांचें अल्पचरित्र संपवितों.

---

## श्री. नरसिंह चिंतामण केळकर

(श्री. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, बी. ए., एलएल्. बी.)

मी डेक्कन कॉलेजमध्यें प्रीव्हियसच्या वर्गांत असतांना, श्री. न. चिं. केळकर, हे फर्ग्युसन कॉलेजमधून आमच्या क्लबांत एक दोन वेळां जेवावयाला आले होते. त्यावेळीं मीं त्यांचा परिचय करून घेतला. तेव्हां ते अतिशय मोहक, सतेज आणि तरतरीत दिसत असत. त्यानंतर दोन वर्षांनीं ते आमच्या कॉलेजांत शिकण्यासाठीं बी. ए. च्या वर्गांत आले. त्यावर्षी कॉलेजमध्यें झालेल्या 'मृच्छकटिक' नाटकाच्या संस्कृत प्रयोगांत आम्हीं दोघांनींहि कामें केलीं होतीं. बी. ए. ची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर आम्हीं दोघे वकिलीच्या अभ्यासासाठीं मुंबईस गेलों; व तेथें इतर मंडळींसह क्लब करून राहिलों. त्या वेळची एक मोठी गंमतीदार गोष्ट मला अजून आठवते; ती अशी कीं, दुसऱ्या एल्एल्. बी.च्या परीक्षेच्या वेळीं एक्झॅमिनेशन हॉलच्या बाहेर केळकर पुस्तकें चाळीत होते. ते मला म्हणाले, "कोणते प्रश्न येतील, हें मी तुम्हांला सांगतों. त्यांचीं उत्तरें तुम्ही नीट वाचून ठेवा. माझा आजपर्यंतचा अनुभव असा आहे कीं, दैव मला नेहमीं अनुकूल असतें; व मी जीं पुस्तकें वाचतों, त्यांतूनच नेहमीं प्रश्न येतात."—पण मीं पुस्तकें कधींच चाळलेलीं नसल्यामुळें, त्यांच्या या सूचनेचा मला कांहींच उपयोग झाला नाहीं. मात्र दैवयोग असा कीं, त्यांनीं अंदाज केल्याप्रमाणेंच प्रश्न आले. या परीक्षेच्याच काय, पण इतरहि सर्व बाबतींत त्यांचे, 'मी दैववान् आहें,' हे उद्गार खरे ठरलेले आहेत.

क्लबमध्यें असतांना केळकरांच्या स्वभावाचा एक विशेष नेहमीं दृष्टोत्पत्तीस येत असे. आम्हां विद्यार्थ्यांचे सदोदित कांहींना कांहीं तरी वादविवाद चालत असत. ते निकरावर येण्याच्या सुमारास श्री. केळकर हे तिथें यावयाचे; व वादविवाद कशाबद्दल होता याची चौकशी करून, दोन पक्षांत तडजोड सुचविण्याचा प्रयत्न करावयाचे. तेव्हां साहजिकच दोन्ही पक्ष त्यांच्यावर तुटून पडत. ही तडजोडीची प्रवृत्ति म्हणजे त्यांच्या एकंदर जीवनाची गुरुकिल्लीच होय. तसेंच, त्यांची उद्योगशीलताहि त्यावेळीं दिसून येत असे. ती अशी कीं, आम्ही इतर विद्यार्थी जेवणानंतर सुस्त होऊन झोंपीं जात असूं, तेव्हां हे कांहीं ना कांहीं तरी लिहीत बसलेले असावयाचे. या वेळची आणखीहि एक आठवण देण्यासारखी आहे. ती ही कीं, केळकर हे यावेळीं सर वॉल्टर स्कॉट याच्या "रोक बी' नामक काव्याचें मराठी रूपांतर करीत होते. त्यांतील कांहीं पद्यांचें भाषांतर मीं करून द्यावें, अशी इच्छा त्यांनीं प्रगट केली होती. ती गोष्ट मीं आळसामुळें चालढकलीवर टाकल्याकारणानें, पुढें स्वतः त्यांनींच त्यांतील एका पद्याचें भाषांतर करून मला दाखविलें. त्यांच्या काव्यरचनेचा हा 'ओ ना मा'च होता, असें म्हटलें तरी चालेल. क्लबांत असतांना पारशी व गुजराथी नाटकें पाहण्याचा आम्हांला बराच नाद होता. याच वेळीं मीं माझें 'वीरतनय' नाटक लिहीत होतों. त्या कामीं केळकरांनीं मला बरेंच उत्तेजन दिलें. टीकालेखनाच्या बाबतींत तर त्यांचें मला विशेष उत्तेजन असे.

ग्रंथकार म्हणून माझी समाजांत मान्यता व्हावी, अशी केळकरांची फार इच्छा असे; व मी मुंबईग्रंथसंग्रहालयाच्या वार्षिक समारंभाचें अध्यक्ष व्हावें, याबद्दल त्यांनीं फार खटपट केली होती. या बाबतींत त्यांनीं मला एकदां असें लिहिल्याचें स्मरतें कीं, 'मी आपणांकडून खटपट करितों; पण तुम्ही 'मुष्टीचा' एखादा बॉंबगोळा मधेंच टाकून, सारें काम बिघडवून टाकतां!' ही मुष्टि म्हणजे 'सुदाम्याच्या पोह्यांची'. मला ज्योतिषसंमेलनाचें अध्यक्षपद मिळाल्याबद्दल त्यांना फार समाधान झालें; व माझ्या संमेलनांतील विनोदी भाषणाचें ते कौतुक करीत असत. माझीं 'मूकनायक,' 'मतिविकार,' 'प्रेमशोधन' आणि 'वधूपरीक्षा' हीं नाटकें त्यांच्या विशेष आवडीचीं असत; व त्यांतील पदें ते नेहमीं मजकडून वारंवार म्हणवून घेत. माझी अशी इच्छा होती कीं, पुणें येथें कधीं साहित्यसंमेलन भरण्याचा योग आल्यास, त्याचें अध्यक्षस्थान आपल्याला मिळावें; व केळकरांचीहि इच्छा पुण्याच्या संमेलनाचें अध्यक्षस्थान मला मिळावें अशीच असल्या-

मुळें, त्यांनीं १९२७ सालीं तसा योग आला असतां, मला निवडून आणण्यासाठीं बरीच खटपट केली. आमचा परिचय झाल्याला आतां चाळीस वर्षे होऊन गेलीं आहेत. केळकरांचे व माझे राजकीय बाबतींत मतभेद असून, कॉलेजनंतर आमच्या आयुष्यक्रमांनाहि भिन्न वळण लागलें. असें असतांना सुद्धां आमचा स्नेह अबाधित रहावयाला आमचें वाङ्मयप्रेम, व केळकरांचें सौजन्य हींच मुख्यत: कारण झालीं आहेत.

केळकरांची वाङ्मयसेवा आणि त्यांचें मराठी वाङ्मयांतील स्थान सर्वश्रुतच आहे. त्यावद्दल मीं विशेष लिहावें, असें नाहीं. वाङ्मयाच्या कथा, नाटक, विनोद, इतिहास, निबंध इत्यादि निरनिराळ्या क्षेत्रांत त्यांनीं चांगलेंच नैपुण्य दाखविलें आहे; व 'मराठे व इंग्रज' आणि 'कृष्णार्जुनयुद्ध' हीं त्यांचीं दोन पुस्तकें तर माझ्याहि फार आवडीचीं आहेत. एखाद्या विषयावरील साहित्य गोळा करितांना ते जितके श्रम घेतात, तितकेंच कौशल्य ते त्याची जुळणी करतांना दाखवितात. याचें उत्कृष्ट प्रत्यंतर त्यांच्या 'सुभाषित आणि विनोद' आणि 'मराठे व इंग्रज' या दोन अत्युत्तम ग्रंथांत पहावयास मिळेल. इतर क्षेत्रांप्रमाणें वाङ्मयांतहि त्यांनीं तडजोडीचें धोरण स्वीकारलेलें दिसून येईल. कोणत्याहि विषयाची त्यांनीं केलेली चर्चा कधींच एकांगी किंवा पक्षपातबुद्धीनें प्रेरित झालेली नसते. अरिस्टॉटलची सुवर्णमध्याची कल्पना केळकरांना फार प्रिय असून, तिलाच अनुसरून त्यांनीं आपलें वाङ्मय निर्माण केलें आहे. ते मला एकदां असें म्हणाले असल्याचें आठवतें कीं, "पोट दुखेइतका परमावधीचा विनोद मला साधत नाहीं किंवा अश्रूंचा पूर लोटण्याइतका करुणरसहि मला साधत नाहीं. माझ्या लेखनांत स्मित येईल इतकी विनोदाची लकेर व गहिंवर येण्याइतका करुणरस असतो." या विधानाचें सत्यत्व त्यांच्या नाटकांत प्रत्ययाला येतें. मराठी भाषेच्या व वाङ्मयाच्या अभ्यासकांना मी नेहमीं 'निबंधमाले' बरोबर केळकरांच्या लेखसंग्रहाचेंहि परिशीलन करण्याची शिफारस करीत असतों. त्यांना दीर्घायु प्राप्त होवो व त्यांच्या हातून मराठी भाषेची अशीच अमोल सेवा सतत घडत राहो, याशिवाय प्रस्तुत प्रसंगीं माझी दुसरी काय इच्छा असणार !

---

# केळकरांचें स्वभाव चित्र

( श्री. दिनकर वासुदेव दिवेकर, एम्. ए. )

कस्याऽस्ति कोऽप्यतिशयोऽस्ति स तेन लोके।
ख्यातिं प्रयाति न हि सर्वविदस्तु सर्वे ॥
किं केतकी फलति किं पनसः सपुष्पः।
किं नागवल्ल्यऽपिच पुष्पफलैरुपेता ॥

—सुभाषित

" फार कशाला, मीं तुम्हांला खरें सांगूं का, शहाण्णव सालीं मीं जो 'केसरी–मराठ्या 'ला येऊंन मिळालों तो देखील खूप लिहावयाची हौस म्हणून ! " एकदां सहज चार स्नेही मंडळी गप्पा गोष्टी सांगत असतांना तात्या साहेब केळकरांनीं हें आपलें इद्गत बोलून दाखविलें; आणि खरोखरीच तें वस्तुस्थितीस सर्वस्वीं धरूनहि आहे. त्यांची लिहावयाची हौस किती म्हणून वर्णन करावी ? त्यांच्यासारखे जबरदस्त लेखक तेच ! मध्यरात्रीं झोपेंतून उठवून अग्रलेख लिहून पाहिजे म्हणून मागणी केली तरी सुद्धां देतील ! किंबहुना, दादाभाई नौरोजी वारले तेव्हां असाच प्रसंग आला देखील होता म्हणतात ! त्यांना स्वप्नें पडत असतील तीं बहुधा लेखनाचींच असतील ! त्यांचा एकंदर लेखन–प्रपंच पाहिला म्हणजे अनभिज्ञांसच काय, पण खुद्द त्यांच्या समव्यवसायी बंधूंसहि वाटावें कीं, त्यांच्या शरीरांत मानवी रक्त अभिसरण पावत आहे किंवा निळी–काळी शाई सळसळत आहे ! हाताचीं बोटें नसून टांक आहेत कीं काय ? डोकें नसून विचारवैभव व शब्दसंपत्ति उत्पादन करण्याचा अखंड चालू असणारा कारखाना आहे कीं काय ? कोणाला लेखनकार्यास एकांतवास लागतो, कोणी अगदीं ठराविक वेळीं स्फूर्ति येईल तेव्हांच लिहूं शकतो; कोणाला ओळ ओढण्यापूर्वी तासचे तास मुद्दे काढण्यांत, कच्चा खर्डा तयार करण्यांत, त्याची ' फेअर कॉपी ' करण्यांत घालवावे लागतात; परंतु कांहींहि लिहावयाचें म्हटलें म्हणजे आगीच्या बंबाप्रमाणें हे आपले सदैव सज्ज ! मग तो 'केसरी 'चा अगर 'मराठ्या 'चा अग्रलेख असो, एखादी स्फुटसूचना असो, दिल्ली–सिमल्याचें वातमीपत्र असो, कविता असो, गोष्ट असो, नाटकांतील प्रवेश असो, प्रस्तावना असो, किंवा एखादें साधें पत्र असो. जवळ कोणी लिहिण्यास मनुष्य असो वा नसो. असला तर त्याला सांगावयाचें, नाहीं तर स्वतःच हातानें लिहावयाचें. तीन डझन वर्षांच्या

सतत व्यासंगानें इतकें सगळें वसून गेलें आहे कीं, त्यांनीं तोंडानें कांहीं सांगितलें तरी तें उत्कृष्टच उतरावयाचें. 'यास्तेषां स्वैरकथास्ताएव भवंति शास्त्राणि' या न्यायानें त्यांनीं जें बोलावें तोच अग्रलेख, अशी स्थिति सांप्रत प्राप्त झालेली आहे. सोमवारींच सकाळीं एकदम 'टाईम्स' मध्यें अभावितपणानें अग्रलेख लिहिण्यास योग्य असा विषय उपस्थित व्हावा; घारीच्या नजरेनें चटकन् आपणास काय मुद्दा पाहिजे तो त्यांतून हेरून, अग्रलेख सांगण्यास सुरवात व्हावयाची, खोलींत इकडून तिकडे फेऱ्या घालतां घालतां दोन तासांत काम संपून जावयाचें. जशी फोनोग्राफची प्लेट लावून द्यावी तशी रीत. मध्यंतरीं कोणी कांहीं विचारावयास आलें तरी संगति तुटत नाहीं, प्रतिभा गारठत नाहीं, विचार-परंपरा नष्ट होत नाहीं, विनोदाचा रंग फिका पडत नाहीं, उपमा, दाखले, अवतरणें वगैरेंना खळ पडत नाहीं.

बरें, आश्चर्य हें कीं, लेखन कसेंहि लिहिलें असलें तरी सर्व बाजूंनीं नामांकित असावयाचें. सामान्य पत्राचें उत्तर धाडलें तरी त्यांत देखील वाङ्मय-विलास असावयाचा; मग अधिक महत्त्वाच्या लिखाणांत तो असल्यास काय नवल! त्यांच्याइतकें सुंदर, मधुर व सर्वांगीण वाङ्मय मराठींत कोणींच निर्माण केलें नाहीं असें म्हटलें तरी त्यांत बिलकूल अतिशयोक्ति नाहीं; एखादा तज्ज्ञ आपल्या आवडीच्या विषयांत खेळत असतो तसे ते लेखनांत रमतात व रंगतात. उत्तरहिंदुस्थानी गवयानें गळ्यांतून बाहेर काढून स्वर जसे कांहीं श्रोतृवृंदांत सोडून द्यावे; वडया जवाहिऱ्यानें श्रीमंत व गुलजार गिऱ्हाइकापुढें आपल्या कपाटांतील सोन्या-मोत्यांचे, जडावाचे दागदागिने मांडावे; सुरतेच्या, काशीच्या अथवा मदुरा-कोइमतूरच्या जरीच्या व्यापाऱ्यानें आपलीं जरतारी, बुट्टीदार, शालजोडया, पैठण्या वगैरे सणंगें भराभर घडया मोडून विकत घेणारासमोर पसरून ठेवावीं, तद्वत् त्यांच्या लेखनांत वाचकांसाठीं शृंगार-साज इत्यादि बहुमोल जिन्नसांची भरपूर पखरण केलेली असावयाची. भाषा परिपक्व, शब्द समर्पक, विवेचन सुश्लिष्ट, विनोद गंभीर, टीका प्रयोजक, आदि-अंत परिणामकारक, मथळा मार्मिक. त्यांचा लेख वाचूं लागलें म्हणजे ऐश्वर्यशाली राजवाडयाच्या फळपुष्पसंभारानें सुशोभित केलेल्या, नंदनवनांतील सुगंधित वायुलहरींनीं आंदोलित होणाऱ्या उद्यानांत बसल्याचा भास व्हावा. वाक्यपद्धति अशी प्रगल्भ, प्रौढ व गंभीर कीं, जणुं खानदानी कुळांतील टोपपदरी इरकली लुगडें परिधान केलेली, पायांत पुणेरी जोडा असणारी, समग्रभूषणा अशी पुरंध्रीच. सरदारी थाट आहे, पण आधुनिक सुशिक्षित

तरुणांचा पोकळ व नटवा छचोरपणा नाहीं; सौंदर्य आहे, पण त्याचें उत्तान प्रदर्शन नाहीं; विद्वत्ता आहे, पण अवडंबर नाहीं. त्यांच्या बरोबरीचे लेखक व संपादक महाराष्ट्रांत थोडे का होईना, होऊन गेले व कांहीं आहेत. हि. त्या लेखकांच्या लेखनांतील जोष व नाट्यावेग तात्यासाहेबांच्या लेखनांत सांपडणार नाहीं, वक्रोक्ति सांपडणार नाहीं हें खरें; तथापि जगन्नाथ पंडितांचें ' मृद्वीकामध्यनिर्यन्मसृणरसझरीमाधुरी ' हें विशेषण लावावयाचें त्यांच्याच वाणीला व लेखणीला; आणि—

> Who left scarcely any style of writing untouched,
> And touched nothing that he did not adorn,

हें जॉन्सननें केलेलें गोल्डस्मिथचें गोड व कौतुकाचें वर्णन अक्षरशः कोणास लागूं पडत असेल तर त्यांनाच.

लिहिण्याप्रमाणें बोलणेंहि चित्ताकर्षक, सुलभ, व्यवहारज्ञ, ऐकणारास पटण्यासारखें. नाटकी आविर्भाव, भावनांचा प्रकर्ष, हृत्प्रक्षोभकारक वक्तृत्व, असला कांहीं प्रकार त्यांच्या भाषणांत नसावयाचा. परंतु तें अत्यंत विचार-परिप्लुत असावयाचें. त्यांत प्रतिपाद्य विषयाचे पापुद्रे काढून काढून तो पूर्ण-पणें उघड व स्पष्ट केलेला असावयाचा. त्यांत उदाहरणें, अलंकार इत्यादिकां-च्या मसाला घातलेला असावयाचा; जरूर तेथें टीकेची फोडणी दिलेली असावयाची; क्वचित्प्रसंगीं झगझगीत मोहरीहि लावलेली असावयाची! कांहीं असलें तरी लोकांना तें आवडतें व पसंत पडतें. आतां पुष्कळ वेळीं असें दिसतें कीं, विचार पिंजतां पिंजतां खालीं विशेष कांहींच उरत नाहीं; विषयाचें पृथक्करण इतकें परिपूर्ण व्हावयाचें कीं, माल अवशिष्ट भाग फारच थोडा रहावयाचा. परंतु लोकांपुढें विषयाचें उद्घाटन उत्तम व्हावयाचें व मोठमोठाल्या दुकानांत ' शो-रूम 'मध्यें माल जसा जनतेच्या आवडीनिवडी-करतां मांडलेला असतो, त्याप्रमाणें अनुभवी विवेकीपणानें विचार-वैजयंती-मधील मणि सुटे सुटे करून दाखवावयाचे. ज्यानें त्यानें आपापली अभिरुचि पाळावी व त्याग-स्वीकार करावयाचा असेल तो स्वखुषीनें करावा. ही त्यांची प्रथा. मात्र जें सांगावयाचें तें समयोचितपणानें व निर्भीडपणानें सांगावयाचें. अर्थात् वयोमानाप्रमाणें स्वभावांत नैसर्गिक क्रान्ति व्हावयाची ती झालीच आहे. ती जशी लेखनांत तशी भाषणांत अगदीं अलीकडे प्रसंगोपात्त दृग्गोचर होते. पण मूळ स्वभावांत ती नसल्याकारणानें कोणी तिचा प्रत्यय

विषाद मानीत नाहीं. क्षुल्लक कारणावरून किंवा एखाद वेळेस कारण नसतांना देखील एकदम रागानें वरच्या मजल्याचें बोलावयाचें; फारशी जरूर नसली तरी सहज कोणी केव्हांचे तरी विरोधी असतील त्यांस टोमणा द्यावयाचा असें त्यांचे हातून घडतें. परंतु हें सर्व आगंतुक आहे हें जाणून क्षणिक वाईट वाटल्यावर तें मनांतून नाहींसें होतें.

जात्या ते कल्याण-प्रकृति आहेत, यांत काडीमात्र शंका नाहीं. सहसा कोणाचें नुकसान करावें ही बुद्धिच अजिबात नाहीं. कोणीहि केव्हांहि भेटावयास आलें तरी भेटावें, त्यांच्याशीं मनमोकळेपणानें बोलावें व काय सल्ला द्यावयाचा असेल तो अत्यंत सद्बुद्धीनें द्यावा. दुपारच्या अडीच वाजेपर्यंतच्या आवडीच्या वामकुक्षीच्या वेळीं कोणीं जागें केलें तरीहि हरकत नसावयाची. असें आहे म्हणून हजार व्यवसाय त्यांच्यामागें नको नको म्हणतां चिकटतात. विमा कंपनी आहे, पैसाफंड आहे, सहकारी बँक आहे, शारदोपासक संमेलन आहे, शिक्षण-प्रसारक मंडळी आहे, आतां आणखी डेक्कन एज्युकेशन सोसायटी आहे, आयुर्वेदीय रुग्णालय आहे, संगीतपरिषद् आहे, रायगड स्मारक आहे; काय नाहीं म्हणून लिहावें ! त्यांची कार्ये पार पाडण्याची कुशलता अशी कीं, या सर्व संस्थांचा संसार चालू करून द्यावयाचा व तत्परतेनें आपणांस जेवढी मदत करतां येईल तेवढी सदैव करीत रहावयाचें. कोणी खाजगी सल्ला घेण्यास आला तरी स्वतःस योग्य वाटेल तो सल्ला स्पष्टपणानें द्यावयाचा. कोणीं पत्रानें कांहीं मागणी केली तरी ती शक्य असेल तर द्यावयाची, नसेल तर नाहीं. परंतु त्याला तावडतोब उत्तर हें जावयाचेंच. मनाचा थोरपणा इतका कीं, एखादी चळवळ आपणास सर्वस्वीं मान्य नसली तरी तिलाहि ती केवळ राष्ट्रीयत्वास पोषक म्हणून, हातभार लावावयाचा. एक ना दोन. त्यांचे उद्योग बहुशाखी व अनंत. हल्लीं 'केसरी 'चें संपादकत्व सोडलें व राजकारणांतून वानप्रस्थाश्रम घेतल्यासारखें केलें असलें तरी त्यांच्या व्यापाचें चक्र चालूच आहे. एवढ्या खटाटोपांत देखील गृहकृत्यांतील दक्षता आहेच. घरबांधणी पहाण्याची जिज्ञासा अति तीव्र व आपल्या घरांत दुरुस्ती करण्याची इच्छाहि अनिवार. लॉईड जॉर्ज आपल्या किर्सीय गांवीं वटाटे लावतात म्हणतात. चर्चिल तर गवंड्याचें काम करतात. व्हायकाउंट ग्रे आपल्या वाड्याभोंवती बागबगीचा लावीत. तात्यासाहेबांना घरदुरुस्तीचा, बसावयाची जागा इकडून तिकडे वारंवार बदलण्याचा हव्यास दांडगा. मधून मधून सर्वसंमत व सर्वसंमानित अशा रूढीच्या विरुद्ध मुद्दाम वागावयाचें, व

हें अगदीं साध्या बाबीपासून तों थेट धार्मिक व राजकीय बाबीपर्यंत. लोक वेळेस एक कप चहा पितात तर त्यांना दीड कप लागतोच व हीं त्यांची संवय त्यांच्या मित्रांना आपापसांतील चेष्टेचा विषय होऊन बसली आहे. लोक वडिलांचें श्राद्ध करतात, तर ते वडिलांच्या तिथीस कथा करवितात. 'केसरी' गंभीर राजकीय मतप्रसारासाठीं आहे! मग त्यांत ते जाणूनबुजून 'रजःकण' अथवा गोष्टी प्रसिद्ध करणारच. या प्रकारचा थोडा आग्रहीपणा आहे. आणि मन तर इतकें चंचल कीं, मनांत गोष्ट आली म्हणजे ती अविलंबानें झालीच पाहिजे.

त्यांचें मन, शारीरिक गतीप्रमाणें फार वेगानें काम करीत असलें पाहिजे असें दिसतें. कारण जसें एका कल्पनेवरून दुसरीवर त्यांचें मन उडी मारतें तसें पुस्तकांचेंहि. ते इतक्या लवकर लवकर पुस्तकें वाचतात कीं, प्राकृत जनास अचंबा वाटतो. वाळलेल्या गवतांत जसा अग्नि, त्याचप्रमाणाचें ग्रंथालयांत त्यांचें मन. तेच सांगतात कीं, पूर्वीच्या काळीं राजकारण थोडें स्थिर असतांना, दुपारीं अकरा वाजतां हपीसांत यावें व पांच वाजेपर्यंत वाङ्मयक्षेत्रांत चरत बसावें. टिळकांच्या व जिनसीवाल्यांच्या लायब्ररींतील एखादें पुस्तक काढून पहावें, तों त्यांच्या खाणाखुणा पानांवर हटकून सांपडावयाच्याच. अजूनहि केव्हां मुंबईस गेलें कीं, अनेक कामांपैकीं 'रॉयल एशियाटिक' मध्यें जावयाचें व 'तारापूरवाल्या'कडे जावयाचें, हीं दोन खास असावयाचींच. फार काय, कोठेंहि चांगलें पुस्तक या मासिक दिसलें म्हणजे त्यांनीं आपल्या हँडबॅगमध्यें घालून, घरीं नेऊन वाचलेंच म्हणून खुशाल समजावें. कामाशिवाय दुसऱ्याच्या घराची पायरी चढावयाचे नाहींत; दुसरा आपणाकडे चालून आल्यास त्यांचें काम झाल्यावर एक निमिष स्वस्थ न बसतां किंवा निवळ गप्पा न मारतां, बाहेर जावयाचें असेल तर कोट, पगडी घालून तयारी करतील; अगर घरींच दुसरें काम असेल तर तें करूं लागतील; पण वेळ वायां जाऊं देणार नाहींत. दिल्ली–सिमल्यास ॲसेंब्लीसाठीं गेले असले तरी हींच तऱ्हा. आवश्यक झाल्याशिवाय आपली खोली सोडून दुसऱ्या खोलींत कदापि पाऊल टाकावयाचे नाहींत. स्वतः वाचीत तरी असावयाचें, नाहीं तर कोणी आगाशे वगैरे चिटणीस नेला असेल त्याला यशावर तरी लेख सांगत असावयाचें; अथवा एखादें भाषण डिक्टेट करीत असावयाचें. हा सततचा देखावा पाहूनच दत्तोपंत वेलणकरांनीं फटाळ्यांत व चेष्टेनें विचारावें, "काय तात्यासाहेब, रात्रंदिवस गणपतिबोवासारखे समोर उंदीर घेऊन बसतां बोवा!"

त्यांचे सहाध्यायी कॉलेजांतल्या त्यांच्या वागणुकीचें असेंच वर्णन मजेनें करतात. आज तरी काय, सटीमासाशीं तात्यासाहेब मेहेंदळ्याकडे किंवा वाटेवर जातां येतां अण्णासाहेब भोपटकरांकडे वळतील तेवढेच. बाकी, आपलें घर व हपीस बरें आणि आपण बरें. त्यांच्या स्वभावाचें निरीक्षण केलें म्हणजे बायरननें—

Exhausting thought,
And hiving wisdom with each studious year,

असें गिबनचें चित्र काढलें आहे त्याची आठवण झाल्यावांचून रहात नाहीं.

मनाच्या चंचलत्वाबरोबर मृदुत्वहि अतिशय आहे. बाह्य परिस्थितीचा परिणाम तत्क्षणीं प्रतिबिंबित होतो. वाईट बातमी कानीं आली म्हणजे खेदाची छटा चेहेऱ्यावर दिसावी. वावट पत्रांतून गैरवाजवी टीका आल्याचें त्यांना कोणीं सांगितलें म्हणजे अंतःकरणाला वेदना झाल्यासारखें स्पष्ट दिसावें. मनासारखी गोष्ट झाली नाहीं म्हणजे निराशेची भावना त्यांच्या तोंडावरून पाहाणारानें अनुमानित करावी.

'सज्जनस्य हृदयं नवनीतं यद्वदंति कवयस्तदलीकम् ।
अन्यदेहविलसत्परितापात्सज्जनो द्रवति नो नवनीतम् ॥

असा कवीनें व्यतिरेकालंकार केला आहे; परंतु तात्यासाहेबांचें मन असें नाजूक आहे कीं, स्वतःच्या तापानें विरघळतें व दुसऱ्याच्या तापानें पण विरघळतें. कांहीं महिन्यांपूर्वी सदाशिव पेठेंतील लिमयांच्या टाईप-रायटिंग रूममध्यें लहानशी सभा त्यांच्याच सन्मानार्थ भरली होती. टिळकांचा व आपला दीर्घकालीन संबंध व नानातऱ्हेच्या अडचणी वगैरे इतिहासाचें त्यांना कथाप्रसंगांत स्मरण झालें आणि कंठ एकदम इतका दाटून आला कीं, त्यांच्या डोळ्यांत दुःखाश्रु उभे राहिले; दर्शन चिंताजड झालें व वाचा फुटेनाशी झाली! परवां देशमुखांच्या वाड्यांत बालचरांचे खेळ झाले. समारंभ आटोपून मंडळी परत जातां जातां, उदईक सकाळीं सोलापूरच्या चार लोकांना फांशी देणार, ही निश्चित बातमी येरवड्यास त्यांना भेटून आलेल्या एका गृहस्थानें सांगितली. बातमी कानीं पडतांच त्यांनीं कपाळाला हात लावून 'नशीब' असे निराशेचे उद्गार काढले व बाहेर पडले ते तडक घरींच गेले! व्यक्तीचें काय किंवा जनसमुदायाचें काय, नेहमीं हित व्हावें ही त्यांच्या दयार्द्र अंतःकरणाची मनीषा, म्हणून तर त्यांनीं मुळशीच्या शेतकऱ्यांना बदला जमिनी मिळाव्या यासाठीं हळहळून प्रयत्न केले. तुरुंगांत

गेलेल्यां अमक्या गृहस्थाला गाडीला जुंपलें होतें, तमक्याला तोंडावर पोतें घालून मारलें, अशा हकीगती त्यांना सांगूं लागलें म्हणजे त्यांना इतका गाहिंवर यावा कीं, 'हें कांहीं मला सहन करवत नाहीं' असें म्हणून तो विषयच टाळावा. 'सर्वेऽपि सुखिनः संतु सर्वे संतु निरामयाः' सगळीकडे शांतता अविच्छिन्नपणें वास करावी, सर्वांनीं स्वतंत्रपणें परंतु कर्तव्यनिष्ठेनें आपली कामगिरी करीत रहावें, स्वयंस्फूर्तीनें होईल तेवढा स्वार्थत्याग ज्यानें त्यानें करावा, राष्ट्रकार्यरूपी नामदेवाच्या पालखीस स्वसामर्थ्यानुसार प्रत्येकानें हात लावावा, कोणीं कोणास भरीस घालूं नये, ज्याला जें रुचेल, पचेल व सुचेल तें तो करीतच असतो, या स्वरूपाची त्यांची व्यवहारज्ञतेची व अनुभवसिद्ध अशी मनोभूमिका. एका टोंकास राष्ट्रस्वातंत्र्य व दुसऱ्या टोंकास गृहव्यवस्था, एका टोंकास परमार्थ व दुसऱ्या टोंकास स्वार्थ हीं दोन्ही सांभाळावयाचीं हें त्यांचें ब्रीद. वर्ड्स्वर्थनें चंडोल पक्ष्याच्या काव्यांत त्याचा स्वभाव-विशेष या हृदयंगम शब्दांत वर्णिला आहे—

"A privacy of glorious light is thine,
Whence thou dost pour upon the
world a flood
Of harmony, with instinct more divine;
Type of the wise, who soar, but
never roam—
True to the kindred points of
Heaven and Home."

जरूर त्या फरकानें तात्यासाहेबांचें धोरणहि या धूर्त शब्दांत दिग्दर्शित केल्याप्रमाणें असतें असें म्हटलें तर तें रास्तच होय.

हें धोरण त्यांच्या वर्तनांत व कृतींत] प्रतिबिंबित होतें. मनच आरशाप्रमाणें शुद्ध व स्वच्छ, मग त्यांतून आंतील क्रिया-प्रक्रिया उघड दिसावी हें साहजिकच होय. लहान मुलगा असला तरी तेंच किंवा अखिलभारतीय लोकाग्रणी असला तरी तेंच. आरशाचा धर्मच तो. स्वभावाचा व घरगुती राहणीचा साधेपणा कोणी वडा पाहुणा आला तरी बदलावयाचा नाहीं. विशेष समारंभ असला तरी पोषाक रोजचा साधा असेल तोच कायम. कडक उन्हाळा असला कीं, सदऱ्याशिवाय नुसताच बंद गळ्याचा कोट घालावयाचा; खिशांत घड्याळ असावयाचें तें किल्ली वेळेवर न दिल्याकारणानें बहुधा बंद असावयाचें; फाउंटन पेन असलें तरी तें रिकामें असावयाचें व

त्यांत शाई भरतां येत नसावयाची. हा जो एक जुन्या जमान्यांतील स्वाभाविक साधेपणा तोच सार्वजनिक बाबतींतहि दृष्टोत्पत्तीस येतो. बोलण्या-चालण्यांत लपंडाव, कुटिलपणा अगर 'एक हात काकडी, नऊ हात बीं' असा प्रकार केव्हांच नसावयाचा. कोणत्याहि प्रश्नाचा निकाल करावयाचा तो अगदीं निःपक्षपातीपणानें, धारवाडी कांट्यानें तोलून करावयाचा; व या न्यायीपणाबद्दल इतकी सार्वत्रिक ख्याति कीं, खाजगी तंटे पंचायतीनें तोडण्याचें त्यांच्याकडे येऊन पडावयाचें. येथील कॉसमॉस सोसायटीमध्यें मतभेद उत्पन्न झाले आहेत! तात्यासाहेबांना अॅडव्हायसरी कौन्सिलवर घ्या व तडजोड प्रस्थापित करून घ्या. व्यापारांतील भागीदारींत भांडण झालें आहे! तात्यासाहेबांना, वादी-प्रतिवादींनीं राजीनामा देऊन, लवाद नेमा. भावाभावांत वांटणी करावयाची आहे! चला तात्यासाहेबांकडे कागदपत्र घेऊन. फार कशाला! असें सांगतात कीं, त्यांच्या समतोलपणाबद्दल व निर्विकारीपणाबद्दल सरकार-दरबारीं देखील इतका विश्वास वाटतो कीं, एकच उदाहरण द्यावयाचें म्हणजे १९२५ सालच्या लेजिस्लेटिव्ह असेंब्लीच्या पहिल्या लोकनियुक्त अध्यक्षाच्या निवडणुकीच्या वेळचें. विठ्ठलभाई पटेल व टी. रंगाचार्य हे उमेदवार होते. सरकारची व सभासदांची इच्छा अशी कीं, कॉमन्स सभेप्रमाणें निवडणूक बिनविरोध व्हावी. पण 'नृपति-जनपदाना' प्रिय व मान्य होण्यासारखा असा असल लोक-प्रतिनिधि कोण? सर्वांच्या तोंडीं तात्यासाहेबांचें नांव. अर्थात् पुढें हें घडलें नाहीं हें वेगळें.

त्यांच्या या थोर गुणांचा टिळकांनीं चांगलाच उपयोग करून घेतला व त्यांनींहि तो फार प्रामाणिकपणानें, मनोभावानें व निष्ठेनें करून दिला. टिळकांच्या तुरुंगवासांत या त्यांच्या संबंधांत विघ्नें उपस्थित झालीं, नाहीं असें नाहीं; पण तात्यासाहेबांची उदारमनस्कता व टिळकांच्याविषयीं त्यांचा अत्यंत आपलेपणा यांच्यामुळें त्या अडचणी नाहींशा झाल्या. टिळकांच्या राजकीय कामगिरींत तात्यासाहेबांचा भाग किती व कोणत्या प्रकारचा हें काळ ठरवीलच. दैवयोग मात्र असा विचित्र कीं, १९२० सालानंतर हें सारें पालटलें. 'वैयक्तिक गुण ते सार्वजनिक चारित्र्यांत दुर्गुण' ठरतात हें खरें असेल म्हणा, ड्रायडननें म्हटल्याप्रमाणें—

'Art thou a statesman
And canst not be a hypocrite?'

हें विधान बरोबर असेल म्हणा, किंवा इमर्सनच्या सिद्धान्ताप्रमाणें To be

great is to be misunderstood, हें यथार्थ असेल म्हणा, त्यांच्या गुणांचें चीज होईनासें झालें. त्यांच्या मताविषयीं गैरसमज पसरूं लागला. परिस्थितीस कलाटणी देण्याच्या कार्यांत दुटप्पीपणा पदरीं आला. त्यांचा अचूक दूरदर्शीपणा विश्वासघात ठरला. निर्भीडपणास व स्पष्टवक्तेपणास भित्रेपणाची पदवी मिळाली. कर्तव्यतत्परतेस स्वार्थीपणाचें रूप प्राप्त झालें. गंगालहरींतील श्लोकाप्रमाणें 'गुणानामेवायं तव जननि दोषः परिणतः' अशी स्थिति उत्पन्न झाली. विरोधाच्या व प्रच्छन्नशत्रुत्वाच्या वावटळीवर वावटळी उठल्या, पण त्यांनीं आपली स्थितप्रज्ञता यत्किंचित् ढळूं दिली नाहीं. विषारी टीकेनें देखील त्यांस आपल्या मार्गापासून च्युत केलें नाहीं. टिळकांच्या पाठीमागें बारा वर्षे 'केसरी–मराठा' संस्था अनपेक्षित व नाजुक अडचणींस तोंड देऊन टिकविली, एवढेंच नव्हे तर महाराष्ट्रांत अनन्यसाधारण उत्कर्षाप्रत नेली. परंतु दूरातिक्रम स्वभाव व दुर्निवार परिस्थिति यांचा झगडा सुरू होण्याची आपत्ति आली म्हणजे परिणाम या तऱ्हेचा व्हावा हें नैसर्गिक होय. तथापि ज्याचा जो ईश्वरदत्त गुणधर्म तो अप्रतिहत रीतीनें प्रतीत व्हावयाचा हें निश्चित. केवडयाला फळें येणार नाहींत, पण त्याचा मोहक सुगंध कोण हिरावून घेणार? फणसाच्या वृक्षावर सुवासिक फुलें बहरणार नाहींत, पण त्याचें फळांचें पीक कोण कमी करणार! नागवेलीला तर फळहि नाहीं व फूलहि नाहीं, पण ती निरुपयोगी थोडीच आहे! साऱ्या हिंदुस्थानभरच काय परंतु विलायतेंतहि 'एक धिम्मा व प्रशान्त मुत्सद्दी' म्हणून त्यांची ख्याति आहे. टेनिसननें आपल्या सुप्रसिद्ध खंडकाव्यांतः—

'Who knew the seasons when to take
Occasion by the hand and make
The bounds of freedom wider yet'

अशा राजकारणी पुरुषाचें वर्णन केलें आहे तें जसें कांहीं तात्यासाहेबांच्या मनोवृत्तीच्या मुत्सद्द्याचें. त्यांच्या अंगीं टिळकांची लोकोत्तर धडाडी नाहीं, महात्मा गांधींचा पराकाष्ठेचा निग्रह नाहीं, पंडित मोतीलाल नेहरूंची युक्तिबाज मुत्सद्देगिरी नाहीं, पंडित मदनमोहन मालवीयांची दैवी संपत् नाहीं, श्री० विठ्ठलभाई पटेल यांचा अजेय कायदेबाजपणा नाहीं, श्री० वल्लभभाई पटेल यांचा एकमार्गीपणा नाहीं, श्री० गंगाधरराव देशपांडे यांची भावनावशता नाहीं, पंडित जवाहरलाल नेहरूंची युद्धप्रियता नाहीं, बाबू सुभाषचंद्र बोस यांचा ध्येयवाद नाहीं. परंतु मौज अशी कीं, असें असूनहि यांपैकीं प्रत्येकास



केळकर ऊर्ध्वांग प्रतिमा ( बस्ट )

शिल्पकार श्री. टॉ. एम्. केळकर–बडोदें, यांनी तयार केलेल्या प्रतिमेचें छायाचित्र
इ. १९३२

तात्यासाहेबांविषयीं आदर वाटतो, व तात्यासाहेबांस या प्रत्येकाविषयीं आदर वाटतो. याचें कारण तात्यासाहेबांपाशीं जो असाधारण गुणसमुच्चय वास करतो तो या कोणाच्याहि जवळ नाहीं. हें जसें वस्तुस्थितीस धरून, तसेंच यांच्यापैकीं प्रत्येकाचा जो शिरोधार्य व पराकोटीस गेलेला गुणविशेष तो आपल्या अंगीं नाहीं, याची जाणीव हेंहि सत्यपूर्ण. अशी परस्पर मनोमन ओळख असल्यावर कोणापुढें झालें तरी—

नितरां नीचोऽस्मीति त्वं खेदं कूप मा कदापि कृथाः।
अत्यंतसरसहृदयो यतः परेषां गुणग्रहीतासि॥

या अन्योक्तीची उजळणी कशास हवी ! तात्यासाहेबांपुढें तर सुतरां नको. कारण त्यांच्यासारखा रसिक, विद्वान्, निगर्वी, दूरदर्शी, समयज्ञ, अष्टपैलू, व्यवहारी, सरस्वतीकंठाभरण साहित्यशिरोमणि व राष्ट्रसेवक महाराष्ट्रांत तर कोणीच नाहीं. आणि बाहेरील हिंदुस्थानांतहि विरळाच सांपडेल. परमेश्वर करो आणि सांप्रत उदयगूढ अशी अधिक अनुकूल व प्रसन्न परिस्थिति हिंदी राजकारणांत अवतीर्ण होऊन, तात्यासाहेबांच्या अंगचे अभिजात गुण मायभूमीला वाढत्या प्रमाणांत उपयोगी होवोत म्हणजे झालें !

---

## होतकरू लेखकाची कृतज्ञता.

( श्री. मारुति अनंत पै, कारवार. )

[ श्री. केळकर यांच्या लिखाणाचा नव्या व होतकरू लेखकाच्या मनावर कसा परिणाम होतो, हें दर्शविणारे जे मजकूर आमच्याकडे आले त्यांतील श्री. पै यांच्या लेखांतील एक लहानसा उतारा पुढें दिला आहे. —सं. ]

केळकरांच्या केसरींतील संपादकीय लेखांच्या, कांहीं ग्रंथांच्या व असंख्य अध्यक्षीय भाषणांच्या काळजीपूर्वक वाचनापासून, मराठी साहित्यसेवेच्या माझ्या अन्तःस्थ स्फूर्तीला कसा यथार्थतेनें कळस चढला हें अत्यंत नम्र, पण ईश्वरार्पणबुद्धीनें आपणांस सांगण्याची परवानगी घेतों.

सर्व नसले तरी, बहुतेक आधुनिक मराठी सारस्वत–प्रकारांच्या एका तपाच्या स्थूल परिशीलनान्तीं माझें असें नम्र मत झालें आहे कीं, कोणत्याहि होतकरू नव–लेखकाला प्रत्यक्ष स्फूर्ति–प्रतिमांचे विद्युत्-स्फुलिंग उत्पन्न करण्यास आज सर्व अंगांनीं समर्थ असणारे—अस्सल महाराष्ट्रीय, बुद्धिप्रधान,

विवेकी, तत्त्वज्ञान, लिखाण, रजःकण, वगैरे—व खरोखरीच अन्तःशुद्धि उत्पन्न करणारें, सहज अनुस्यूत होणारें—मार्मिक, आधुनिक उपमांच्या तुषारांमुळें सहज सुंदरतेनें किंबहुना "नैष्ठिक" सौंदर्यानें शोभणारें व तळपणारें,—केळकरांचें ज्ञान-लालसायुक्त, व उद्बोधक लेखन व भाषण वाचलें म्हणजे,—मला—अज्ञाला—केळकर म्हणतांत तसला " ब्रह्मानन्दसहोदर " आनंद होतो, आणि नुसती ' सविकल्प'च नव्हे,—तर " निर्विकल्प समाधी " सारखी जवळजवळ "ब्राह्मी" स्थिति अनुभविण्यास सांपडते ! मला वाटतें, जागतिक रुक्ष ज्ञान मनोरंजक व सुबोध करून, लीलेनें, आम्हांसारख्या खऱ्या भुकेलेल्या अज्ञ ज्ञानलिप्सूंना केळकरांनीं प्राचीन, ज्ञानवृद्ध ऋषिवर्यांसारखें पाजावें ! ! विषयांतर झालें तरी हरकत नाहीं, मी म्हणतों कीं, परवांच्या, महर्षि गटेच्या पुण्यांतील स्मृति-दिनानिमित्त केळकरांच्या " ज्ञानप्रकाशांत " आलेल्या, समारोपात्मक, सुंदर, मार्मिक, त्रोटक, पण अथांग मुद्देसूद भाषणांत जसें अर्थ—विचार—गांभीर्य आलेलें आहे, तसें त्या दिवशींच्या प्रमुख वक्त्यांच्या भाषणांतहि आलेलें नाहीं ! केळकरांचें मागील कोणतेंहि भाषण वा लेखन पहा ! त्यांनीं केव्हांहि केवळ स्व-संवेद्य, मार्मिक, उच्चतम विनोदांचे तुषार प्रथम लीलेनें उडवून त्या अवर्ण-नीय पवित्र वातावरणामुळें श्रोतृ—वाचकांचीं मनें व हृदयें एकदांचीं काबीज केलीं म्हणजे, मगच या ओल्या मनोभूमीवर, आपलीं सुंदर अमोलिक विचार-कुसुमें ते अत्यंत प्रेमानें, सहृदयतेनें व वात्सल्यानें उधळतात, असेंच अक्षरशः माझ्या चिन्तनशील बुद्धीस वाटतें. माझ्या माहितीप्रमाणें केळकर कै. लाल मोहन घोष, कै. सुरेंद्रनाथ बानर्जी, कै. चित्तरंजन दास, कै. लाला लजपतराय, डॉ. रवींद्रनाथ टागोर, पं. मदनमोहन मालवीय, कै. फेरोजशहा मेथा, कै. गोपाळ कृष्ण गोखले, कै. शिवरामपंत परांजपे, कै. डब्ल्यू. सी. बानर्जी, सर्वपल्ली राधाकृष्णन्, श्री. सौ. सरोजिनी नायडू, कै. मोतीलाल नेहरू, बॅ. जतीन्द्रमोहन सेनगुप्त, इ. यांच्यासारख्या थोर वक्त्यांच्या उज्ज्वल मालिकेंत बसत नसतील कारण, पूज्य लालाजींसारखा " वक्ता लेखकश्च दुर्लभः । " दुसरें काय ? पण ही उणीव केळकरांनीं उत्पन्न केलेल्या शाश्वत साहित्यानें केव्हांच भरून काढली आहे !

केळकरांच्या उद्बोधक प्रस्तावनांपैकीं, श्री. बापटकृत " कै. लो. टिळकांच्या आठवणी व आख्यायिका" खंड पहिला, या सुप्रसिद्ध ग्रंथास केळकर यांनीं जोडलेली अत्यंत सौंदर्यदृष्टिपूर्ण ध्वन्यनुसारी, ज्ञानानन्द पोषक प्रस्तावना " भिद्यन्ते हृदयग्रन्थिश्छिद्यन्ते सर्वसंशयाः " अशी याचून, माझी कांहीं

कालपर्यंत स्थिति झाली! सर्वांना, एखाद्या थोर लेखकाच्या एकाच लेखापासून किंवा विचारलहरींपासून दिव्य स्फूर्ति मिळत नसते ही गोष्ट महशूर असली तरी, मी केळकरांच्या या एकाच प्रस्तावनेच्या वाचनानें व तदुत्तर आत्मचिन्तनानें गारुड्याच्या पुंगीपुढें डोलणाऱ्या नागाप्रमाणें डोलूं लागलों!! यांत निव्वळ सत्य अनुभवकथनाचाच उच्च हेतु आहे हें सांगणें नलगे! आतां केळकरांस सार्थपणें इतक्या प्रिय असलेल्या कांहीं आधुनिक उपमांच्या द्वारें वाङ्मयाकाशांत ठेवलेल्या केळकरांसारख्या तेजस्वी ध्रुवताऱ्यामुळें, ईश्वरानें आम्हां नवीन वाङ्मयाभ्यासूंवर किती मोठे उपकार करून ठेवले आहेत, याचा अंमळ विचार करण्याचा मी अल्पसा प्रयत्न करतों.

मला वाटतें, केळकरांच्या आवडीच्या निर्भेळ साहित्यसेवेकडे एकसूत्रीपणानें अविचलित लक्ष पुरविण्यास, त्यांच्या बहुसूत्री राजकारणविषयक "केसरी–मराठ्यां"च्या संपादकत्वामुळें व इतर अनेकानेक व्यापांमुळें भरपूर वेळच मिळाला नाहीं!

प्रो. वा. म. जोशी यांनीं आपल्या मडगांवच्या म. सा. संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणांत म्हटल्याप्रमाणें बोधपूर्ण साहित्याची कसोटी सत्य, सौजन्य, सौंदर्य ( व तत्त्वगर्भ तादात्म्य–प्रतीति ) या पायावर उभारलेली आहे. ही विचारसरणी मान्य केल्यास जोशी यांचें वाङ्मय सत्य, सौजन्य व तादात्म्य यांजवर उभारलेलें तर केळकरांचें सारस्वत सत्य, सौंदर्य व तादात्म्य यांच्याकडेच जास्त झुकणारें असें आहे, असें किंचित् सूक्ष्म विचार केल्यास माझ्या अल्प बुद्धीस वाटतें. आणि माझा आन्तरिक कल सौजन्यापेक्षां सौंदर्याकडे ज्यास्त ओढलेला असल्यामुळें, प्रो. जोशी व श्री. केळकर यांजमध्यें, पूर्ण विचारान्तीं मी केळकरांसच–माझा मनोमय कोश व हृदयाकाश यांजमधील पवित्र संपुटांत–वाङ्मयगुरूचें व विचारप्रणेत्याचें थोर स्थान मागेंच दिलें, यांत नवल तें काय!

केळकरांचे कांहीं अन्यादृश गुणविशेष, माझ्या कल्पनेप्रमाणें, खालीलप्रमाणें थोडक्यांत अजमावतां येतील:—

कारण, कोणतेंहि अभिजात वाङ्मय किंवा भाषण ही त्याच्या जनकाची "बिंब–प्रतिबिंबन्यायानें" छोटीशी आवृत्तिच असते! मला वाटतें ज्योतिष, गणित व तज्जांचे शास्त्रीय संशोधनाचे विषय वगळल्यास, केळकरांनीं साहित्याच्या अन्य विषयांवर निर्हेतुक भ्रमरवृत्तीनें सुंदर, निःस्वार्थ, तत्त्वपोषक, मनोविकासक, उच्च विचार वेळोवेळीं प्रदर्शित केले. त्यामुळें प्रत्येक वाङ्मय-

दालनास रस्किन्नें म्हटल्याप्रमाणें " Ennobled whatever you touched " अपूर्व शोभा व गांभीर्य आणलें; इतकेंच काय तर महा-राष्ट्रभर आपला अव्यक्त व मूक बुद्धिमान् शिष्यवर्ग तयार केला. आजच्या युगांत प्रत्यक्ष ज्ञानदाते सजीव गुरु बहुशः तितपतच योग्यतेचे व आस्थेचे असतात हा अनुभव सर्वत्र प्रसिद्ध असतां, केळकरांनीं मात्र ग्रंथ-भाषणद्वारां अविरतपणें प्रसृत केलेल्या ज्ञानपोषक विशिष्ट विचार-प्रणालीमुळें " ग्रंथराज हे आजच्या युगांत मूक पण खरे गुरु होत " अशा अर्थाची म्हण केळकरांनींच खरोखरी सार्थ केली ! तसें पाहूं गेल्यास केळ-करांनीं साहित्य, कायदा व राजनीतिशास्त्र ( Political Science ) हे विषय सोडून इतर विविध साहित्यप्रकारांमध्यें तज्ज्ञ ( Specialist ) होण्याचें कठिण ध्येय पुढें ठेवलेलें दिसत नाहीं ! भारताचार्य वैद्य, इति-हासाचा भात तयार करोत, रँग्लर महाजनि गणितविषयाचें लोणचें वाटोत, इतर कित्येक विद्वान् कोणी कांहीं, कोणी कांहीं,– त्या, त्या विषयांवरील तज्ज्ञ त्या त्या विषयरूपी त्यांच्या आवडीच्या व व्यासंगाच्या पक्वान्नाचा पाक तयार करोत; केळकर मात्र श्रीकृष्णाप्रमाणें, लोकसंग्रहार्थ, चिकित्सक बुद्धीनें, तशी आपली उपजत सहृदयसहानुभूति न सोडतां त्यांतील प्रत्येक पक्वान्नाचा " हंसक्षीर–न्याया "नें थोडक्यांत आस्वाद घेऊन, तें ज्ञानासाठीं भुके मरणाऱ्या भिक्षूंस थोडथोडें वाढून, " मोठ्या सूत्रांचा आणि लहान सूत्रांचा समन्वय " करितात. प्रत्यक्ष त्यांची भूक भाग-विण्यास केळकरच समर्थ झाले. यांतच त्यांच्या ईश्वरदत्त अष्टपैलु बुद्धीचें सार्थकत्व व बहुरूपी, परोपकारी बुद्धितेजाचें यशोरहस्य सांठविलेलें आहे असें माझें ठाम मत आहे. याचेंच दृश्य प्रत्यंतर म्हणजे, एखाद्या " अतिशय " शास्त्रीय विषयाव्यतिरिक्त–बृहन्महाराष्ट्रांत व बाहेरहि होणाऱ्या कोणत्याहि ज्ञान–यज्ञाच्या शाखेच्या अध्यक्षीय पौरोहि-त्याची सुपारी ( Any subject under The Sun ), केळकरांचें टीकाशास्त्रां-तील अपूर्व व अनन्य कौशल, आणि " विविधत्वांत एकत्व " पाहणारी आपली लोकोत्तर मार्मिक बुद्धि पाहून गुणग्राहक समाजाकडून शेंकडा नव्याण्णव ठिकाणीं केळकरांसच देण्यांत येत आहे; हें मी या दहा वर्षांत तरी वर्तमानपत्रांत नियमितपणें वाचीत आलों आहें ! केळकर कोणत्याहि प्रति-पाद्य विषयाशीं अतिशय थोडक्या पूर्वतयारीत "सविकल्प समाधि" उपभोगूं शकतात याबद्दल आणि तसली चतुरस्र व विशाल बुद्धि, केवळ पूर्वजन्मींच्या थोर पुण्याईमुळें केळकरांस बहाल केल्याबद्दल त्या सर्वसाक्षी ईश्वराचेच आभार मानले पाहिजेत !

---

# केळकर यांची विविधसंस्थांमधील कामगिरी

( संग्राहक शं. ना. जोशी, चिटणीस के. वा. मंडळ, पुणें. )

श्री. तात्यासाहेब केळकर यांचे मोठेपणाचीं गमकें दोन; एक लेखनकौशल्य, व दुसरें कार्यकौशल्य, पैकीं कार्यकौशल्य हें त्यांची निरनिराळ्या संस्थांत जी उल्लेखनीय अशी कामगिरी झाली ती पाहून ध्यानांत आणावयाचें आहे. ही कामगिरी सांगण्यास खरें म्हटलें म्हणजे लायक असे दोघेच म्हणतां येईल. एक स्वतः केळकर व दुसरे त्या त्या संस्थेंतील अधिकृत व्यक्ति. त्यांतहि केळकरांचे पेक्षां संस्थेंतील अधिकाऱ्यानें केळकरांच्या कामगिरीची माहिती दिली असतां ती, डॉक्टरासंबंधानें जसें रोग्यानें सांगावें, किंवा गाडी तयार करणाऱ्या कारागिरासंबंधानें जसें ड्रायव्हरनें बोलावें, अथवा मित्राविषयीं जशी मित्रानें खात्री द्यावी त्याप्रमाणें उचित, निर्णयात्मक व परिणामावह होईल. तेव्हां प्रथम तशा संस्थांकडून म्हणजे संस्थांच्या चिटणीस वगैरे माहितगार अधिकारी सद्गृहस्थांकडून जी माहिती आली ती त्यांचेच नांवें पुढें देतों. म्हणजे त्या कामगिरींतून केळकरांच्या कार्यकौशल्याची ओळख आपणांस सहजच होईल. ही माहिती देण्यापूर्वी ती ज्यांनीं पाठविली त्यांचे आभार मानणें हें कर्तव्य आहे. आलेली सर्व माहिती तशीच छापल्यास शंभर पानेंहि अपुरीं होतील. तेव्हां त्यांतील सारांश तेवढा देणें हेंच शक्य व इष्ट आहे.

( १ ) सार्वजनिक सभा, पुणें—( स. वि. वापट. चिटणीस ) महाराष्ट्रांत किंबहुना हिंदुस्थानांत राजकीय व सार्वजनिक काम करणारी जुन्यांत जुनी जी ही सा० सभा ( स्थापना इ. स. १८७० ), त्या सभेचे श्री. केळकर हे इ. स. १८९६ मध्यें ( आगष्ट १९ ) सभासद झाले. हें साल दुष्काळाचें होतें. म्हणून सरकारदरबारीं लोकांस मदत मिळवून देण्याचे कामीं सभेनें फार प्रयत्न केले. विशेषतः सरकारी फॅमिन रिलीफ कोड जनतेस समजावून देण्याविषयीं ठिकठिकाणीं मंडळी पाठवून सा० सभेनें जी योजना केली, तींत केळकर हे एक मुख्य होते. पुढें इ. स. १९०७ ( मार्च ) मध्यें ते सर्वानुमतें सभेचे चिटणीस झाले व हें काम त्यांनीं इ. स. १९१९ अखेरपर्यंत करून सभेच्या कीर्तींत भर घातली. केळकर चिटणीस झाले त्याच वर्षी ब्रि. पार्लमेंटचे सभासद मि. केरहार्डी व इ. स. १९१० मध्यें श्रीमंत सयाजीराव गायकवाड हे पुण्यास आले असतां त्यांचा तेव्हां सा० सभेनें मानपत्रें देऊन सत्कारसमारंभ केला. आणि ह्या गोष्टी आयत्या वेळच्याच पण उत्तमपणें

झाल्या. त्यांतहि श्रीमंत गायकवाड देण्याचें ठरलें सकाळीं व समारंभ व्हावयाचा त्याच दिवशीं संध्याकाळीं. पण इतक्या घाईत त्वरेनें सर्व साजेशी व्यवस्था करून इंग्रजींत असें विस्तृत व उत्कृष्ट मानपत्र केळकरांनीं लिहिलें कीं, त्याची सर्वांबरोबर स्वतः सयाजीरावांनींहि भाषणांत प्रशंसा केली. इ. स. १९१८ मध्यें स्वराज्यसंघाच्या शिष्टमंडळाला जाहीर पानसुपारी केली. तेव्हांचीहि गोष्ट अशीच आहे. इ.स.१९१९ (नोव्हेंबर) मध्यें केळकर सभेचे चेअरमन म्हणजे कार्याध्यक्ष म्हणून निवडून आले व ह्या जागेवर ते सात वर्षें राहून पुढें अध्यक्ष झाले. कार्याध्यक्षाच्या जागीं त्यांची एकमतानें निवडणूक झाली. त्या वेळची केळकरांच्या विनयाची एक गोष्ट आठवते कीं, तेव्हां प्रो० शिवरामपंत परांजपे, खाडिलकर, सी. के. दामले इत्यादि मंडळी असतां प्रथम केळकरांसच हा मान मिळाला. पण पहिल्याच कार्यकारी मंडळाच्या बैठकींत टेबलासभोंवतीं सारख्या खुर्च्या, सभेच्या पूर्वीं मुद्दाम येऊन मांडवून त्यांत तसे सर्वसारखेपणानें केळकर बसले. सभेचें त्रैमासिक बंद होतें तें १९१६–२० पर्यंत पुन्हां संपादक होऊन केळकरांनीं चालविलें. पुढें तें सभेच्या आर्थिक स्थितीमुळें बंद करावें लागलें. इ. स. १९२७ मध्यें केळकर हे शिवरामपंत परांजप्यांच्या जागीं अध्यक्ष झाले व हल्लीं तेच अध्यक्ष आहेत.

( २ ) पुणें–म्युनिसिपालिटी ( प्रो. शं. रा. भागवत, चीफ ऑफि० )– तात्यासाहेब केळकर यांची ह्या म्यु० पा० तील कामगिरी म्हणजे गेल्या पावशतकाचा पुणें म्यु० पा० चा विहंगमदृष्टीनें पाहिलेला कारभारच होय असें म्हणण्यास हरकत नाहीं. इ. स. १८९६ त स्थापन झालेल्या ह्या संस्थेचे केळकर हे इ. स. १८९८ सालीं सभासद म्हणून, टिळक किंवा राष्ट्रीय पक्षाच्या पाठिंब्याबरोबर, न. आ. द्रविड इत्यादि भिन्न मतांच्याहि लोकांच्या सहानुभूतीनें निवडून आले. येतांच सॅनिटरी कमेटींत त्यांची पोटनिवड झाली. नंतर मॅनेजिंग कमेटी, प्रॉसिक्यूशन कमेटी, कबरस्थान कमेटी, नियमक कमेटी, जकात व ड्रेनेज कमेटी, इत्यादि कमेट्यांवर तात्यासाहेबांची निवड होत असे म्हणजे लोकहिताच्या कसोटीस ते सर्वतोपरी उतरत. ह्यांत त्यांच्या अपक्षपणाची व लोकप्रियतेची साक्ष पटते. ना० गोखले हे पदमजीनंतर अध्यक्ष झाले (इ. स. १९०२), व त्या अवधींत केळकरांनीं स्मशान कमेटी, राज्यारोहण, व्यवस्था कमेटी वगैरे कामीं वेळोवेळीं दाखल होऊन कामांचे निकाल लावलेले आहेत. इ. स. १९०३ ते ०८ सालांत म्यूझियम, मार्केट, प० वर्क्स, गव्हर्नरना मानपत्र, लॅं, एस्टाब्लिशमेण्ट, नाटकगृह, ऑडिट इतक्या कमे-

त्यांचीं कामें त्यांनीं केलीं आहेत. शिवरामपंत परांजपे व पेंडसे हे ह्या वर्षी-च्या निवडणुकींत यशस्वी झाले. पण त्यांनीं राजिनामे दिल्यामुळें केळकर व खाडिलकर हे उभे राहून निवडून आले. १९११सालीं पुनः त्रैवार्षिक निवडणूक व्हावयाची, पण प्लेग, खानेसुमारीचें काम, ह्यांमुळें सहामहिन्यांची मुदत वाढून नंतर निवडणूक झाली. त्यांत तात्यासाहेब निवडून येऊन उपाध्यक्ष झाले. ह्या वेळीं म्यु० पा० च्या घटनेंत फरक झाला. म्हणजे लोकनियुक्त २६ व सरकारनेमणुकीचे १२ अशांचें म्यु० पल बोर्ड बनलें. ह्यांत सभासदांची संख्या वाढली पण प्रमाण वाढलें नाहीं. तात्यासाहेब उपाध्यक्ष होते तरी अंग मोडून काम करण्याचा त्यांचा स्वभाव असल्यामुळें, ते स्वतः प्रत्येक गोष्टींत लक्ष घालीत, व त्याचा उपयोग काम चोख व शाळाशुद्ध होण्यात होई. ह्या मुदतींत म्यु० पा० ची आर्थिकपरिस्थिति सुधारणा कमिटी, पडजागांच्या योजनेबाबत कमिटी, बालक मृत्युसंख्या चौकशी कमिटी, भांबुर्डागांव सुधारणा कमिटी इत्यादि प्रासंगिक व महत्त्वाच्या कमेट्यांवर त्यांनीं कामें केलीं आहेत. इ. स. १९१८ च्या निवडणुकींत श्री. केळकर हे निवडून तर आलेच आणि शिवाय लोकनियुक्त अध्यक्षहि होण्यांचा पहिला मान मिळवून हीं प्रथा पाडण्याचेंहि श्रेय त्यांजकडेच आलें. नगराध्यक्षस्थानीं म्हणून सुमारें एक वर्षभर केळकरांनीं काम केलें. पुढें विलायतेस स्वराज्यसंघाचे शिष्टमंडळाबरोबर व काँग्रेसडेप्युटेशनचे सेक्रेटरी म्हणून जावें लागल्याकारणानें केळकरांनीं अध्यक्षपदाचा ( २३–४–१९ ) राजिनामा दिला. विलायतेहून परत आल्यावर म्यु० पा० नें लोकमान्य टिळकांबरोबर अध्यक्ष तात्यासाहेब केळकर यांस मानपत्र दिलें.

इ. १९२१ च्या आक्टोबरांत सरकारनियुक्त सभासद खा. ब. मुरल्या जलय्या यांनीं ना. प्रिन्स ऑफ वेल्स यांस–ते ह्या वेळीं हिंदुस्थानांत आले होते व पुण्यास यावयाचे होते.–मानपत्र देण्याबद्दलचा ठराव मांडला. इ.१९१९ मधील जालियनवाला बागेंतील त्रि. सरकारकृत अमानुष कत्तल लोकांच्या ध्यानांत होती व असहकारितेविरुद्ध चाललेली दडपशाही लोक अनुभवीत होते. तेव्हां श्री. तात्यासो केळकरांनीं हें ध्यानांत घेऊन मतें द्यावींत असें, लोकमताचा वारा ओळखून सभासदांना बजाविलें. त्याचा इष्ट तो परिणाम होऊन ठराव नापास झाला. येथें सांगण्यासारखी गोष्ट कीं, ह्या सभेपूर्वी व नंतर झालेल्या बऱ्याच सभांना केळकर हजर नसत; पण ह्या सभेला ते आले. आणि ह्याप्रमाणेंच तात्त्विक स्वरूपाचे व विशेष गुंतागुतीचे

प्रश्न म्यु. पा. पुढें विचारास येत त्या त्या वेळीं केळकर समक्ष हजर रहात व देतां येईल ती योग्य मसलत देऊन लोकमताचा बोज कायम ठेवण्याचा प्रयत्न करीत. इ. १९२२ सालीं तात्यासो अध्यक्ष निवडले गेले, ते पुढें तीन वर्षे होते. बावीसच्या जानेवारींत म्यु. पा. चे ५१ सभासद हे सर्व लोकनियुक्त असावेत असा ठराव तात्यासोनीं आणला व त्यावर फारच सुंदसूद भाषण केलें. ह्या तीन वर्षांत केळकरांना पूर्वीप्रमाणें म्यु. पा. कडे लक्ष देण्यास असेंब्लीच्या कामामुळें वेळ मिळाला नाहीं; पण एक चिरस्मरणीय व पुण्यनगरीस भूषणभूत अशी पोरवीची गोष्ट ह्या मुदतींतच धैर्यानें, धोरणानें, व जबाबदारी घेऊन केळकरांनीं घडवून आणली व ती म्हणजे लोकमान्यांचा संगमरवरी पुतळा मार्केटमध्यें उभा करण्याची. या वेळीं म्यु. पा. विरुद्ध दोन दावे चालू होते. म्यु. सभासदांतहि 'पाहूं सावकाशीनें, दाव्याचा निकाल होऊं द्या, पैसे कोठें आहेत ?' इत्यादि बोलणारे होते. ब्राह्मणब्राह्मणेतर पक्षवादित्वहि ह्यांत अंतर्भूत होतें. पण सरकारविरुद्ध लोकपक्ष अशा तात्त्विक झगडयांतील कसोटीचा हा निकाल होता; एका राष्ट्रवंद्य विभूतीच्या चिरस्थायी स्मारकाचा हा एक प्रश्न होता; तेव्हां सरकारी फिर्यादीच्या बागुलबोवाला भिऊन पुतळा उभारण्याचें रहित करावें असें केळकरांना वाटेना व प्रश्न सभेपुढें येतांच १० हजार रुपये म्यु. च्या हवालीं केले व ठराव पास करून घेतला. पुढें हे पैसे त्यांस म्हणजे केसरी–मराठ्याचे ट्रस्टी श्री. केळकर यांस परत दिले गेले. पण ह्या प्रसंगावरून केळकरांची दूरदर्शिबुद्धि व तडफहि चांगली प्रतिबिंबित होते. तात्यासाहेबांनीं इ० १९२७ सालीं असेंब्लीच्या कामामुळें वेळ मिळत नाहीं असें म्हणून व कामाच्या सोयीच्या दृष्टीनेंच म्यु. सभासद नको म्हणत असतांहि राजिनामा दिला. व जवळ जवळ २५।२६ वर्षेपर्यंत म्यु. कारभाराचीं जीं सूत्रें केळकरांनीं चालविलीं होतीं तीं सोडिलीं. म्यु. पा. तील केळकरांच्या कामासंबंधानें दोनतीन गोष्टी मुख्य आहेत. एक असेंब्लीचा काल सोडता असतां त्यांची सर्वांमधील हजेरी 'सर्व सभांस हजर' असें अॅडमिनिस्ट्रेशन रिपोर्टांत नमूद केलेलें आहे. दुसरें, म्यु. पा. तील एकहि वारिक मोठें अंग असें सांपडणार नाहीं, कीं त्यांत केळकरांचें तज्ज्ञत्व दिसून येत नाहीं, आणि तिसरें म्यु. पा. विषयींचा अभिमान. पुणें म्यु. पा. ला तें अधिकार निवृत्त झाले तेव्हां केळकरांचा यथोचित गौरव केला म्हणजे आम्हीं प्रारंभीं म्हटल्याप्रमाणें, म्यु. पा. नें आपल्या गेल्या पाव शतकांतील प्रत्यक्ष इतिहासकाराचाच सन्मान केला.



केळकर, लो. टिळक, रामभाऊ साने.
सोलापूर जिल्हा परिषद–बार्शी, इ. १९२०

(३) मुंबई-मराठी-ग्रंथसंग्रहालय (अं. गो. पुणतांबेकर व ना. म. बाके, उत्पादक व माजी चिटणीस)—मुंबई म्हटलें कीं, मराठी-ग्रंथ-संग्रहालय हा पुढला शब्द आठवतो, इतकीं हीं दोन्ही नांवें एकरूप होऊन विख्यात पावलीं आहेत; आणि त्याला कारण 'केसरी' हें प्रमुख पत्र व त्या पत्राचे, ह्या संस्थेच्या उत्पादकांपैकीं एक असलेले 'आपला अनंत' हे बातमीदार होत. ही संस्था इ. १८९८ (आगष्ट १) मध्यें स्थापन झाली व इ. १९०० मध्यें तात्यासाहेब केळकर हे संस्थेंत आले. संस्थेचा आत्मा जो मराठी-ग्रंथ-संग्रह व त्या आत्म्याच्या धारणार्थ असलेलें जें ह्या संस्थेचें शरीर म्हणजे त्याची इमारत ह्या दोहोंच्याहि बाबतींत केळकरांनीं काळजी वाहिली व साहाय्य केलें आहे. श्री केळकर हे ह्या संस्थेचे आजीव सभासद असून नियामकमंडळांतहि आहेत. इ. १९१८ सालीं संस्थेच्या वार्षिक समारंभाचे ते अध्यक्ष होते व संस्थेचा रौप्य-जुबिली-समारंभहि इ. १९२९ सालीं त्यांच्याच अध्यक्षतेखालीं साजरा झाला. संस्थेच्या तन्दुरुस्तीसाठीं १० हजार रुपये पाहिजेत व ते कर्जाऊ काढतांना खाजगी व्यक्तींकडून न काढतां एखाद्या संस्थेकडून काढावे असें घ्यानीं आलें तेव्हां तात्यासाहेबांनींच आपण होऊन धीर दिला आहे.

(४) पैसाफंड ऊर्फ औद्योगिकनिधि व कांचशाळा (रा. दा. चांदोरकर, चिटणीस)— ह्या संस्थेशीं तात्यासाहेब केळकरांचा संबंध संस्था निर्माण होण्यापूर्वी एक वर्षापासून तों आतांपर्यंत म्हणजे २८ वर्षांचा आहे. प्रोव्हिजनल कमेटीचे सभासद असतांना (इ. १९०३) एक प्रश्नावली पाठवून उत्तरें आणविलीं व इ. १९०४ च्या मुंबई येथील राष्ट्रीयसभा-प्रसंगानें जमलेल्या मंडळींची एक जाहीर सभा बोलाविली. त्यांत पैसाफंडाचें महत्त्व, सभेचा उद्देश इ. केळकरांनीं सांगून मुख्य कमेटी नेमून संस्था स्थापन झाली. ह्या कमेटींत इ.१९१२ पासून केळकर सभासद असून पुढल्याच वर्षापासून ते चिटणीस झाले. व तें काम त्यांनीं १९२१ अखेर केलें. इ. १९२८ मध्यें केळकर हे सर्वानुमतें अध्यक्ष निवडून आले व सध्यांहि तेच अध्यक्ष आहेत. केळकर चिटणीस असतांना इंदूरसंस्थानांत पैसाफंडास वर्गणी गोळा करण्यास बंदी होती ती केळकरांच्याच उदार धोरणामुळें उठली. तसेंच एकदां कमेटीच्या बैठकींत सभासद निवडण्याच्या प्रसंगीं केळकर अध्यक्षस्थानीं असतांना यादळ उद्भवलें, पण तात्यासाहेबांनींच युक्तीनें तें जागच्या जागीं बसविलें. मला तर असा अनेकदां अनुभव आला कीं, कांहीं कामासाठीं

तात्यासाहेबांकडे आधी मं कळवितांहि जावें, पण झटाझट कामाचा योग्य निर्गम लागून मला सत्वर परत तळेगांवींहि जाण्यास सांपडावें.

(५) नवीन समर्थविद्यालय (के. आ. मुळ्ये, प्रमुख न. स. वि.)– जवळजवळ सुरुवातीपासून श्री. तात्यासाहेबांचा ह्या विद्यालयाशीं संबंध आहे. लग्नकार्यादि समारंभांत चैनीच्या गोष्टींना फांटा देऊन ती रक्कम समर्थविद्यालयाला केळकरांनींच प्रथम दिली. संस्थेला तीनशें रुपये देऊन ते सभासद झाले व त्यांची प्रशासकमंडळामध्येंहि निवड झाली होती. कार्यबाहुल्यामुळें इ. १९२४ च्या पुढें सदर मंडळांत ते राहिले नाहींत. विद्यालयाची जमीन, इमारती वगैरे मालमत्ता प्रस्तुतच्या नवीन समर्थ विद्यालयाच्या ताब्यांत येण्यास केळकरांचे बरेच परिश्रम कारणीभूत व उल्लेखनीय असे झाले आहेत. थोडक्यांत म्हणजे प्रत्येक अडचणीच्या प्रसंगीं आपणाला तात्यासाहेबांचें मार्गदर्शकत्व उपकारकच झालें व होईल या भावनेनें त्यांचा आधारच आम्हांला आहे.

(६) दक्षिणी ब्राह्मणसभा, मुंबई (अं. गो. पुणतांबेकर, का. वि. खानविलकर चिटणीस)— ही संस्था ठाकुरद्वारची ब्राह्मणसभा (१८८८), ब्राह्मणविद्यार्थिसाहाय्यक मं. (१९०८), शंकरवाडी (१९१३) व ब्राह्मणहितवर्धिनी सभा (१९१९) ह्या चार संस्थांचें उचित असें एकीकरण होय. ह्या सभेचें १९२३ चें संमेलन, १९२४ वार्षिक सभा, १९२९ ब्राह्मणसंघटनाची आवश्यकता, १९२७ ब्राह्मणांचीं कर्तव्यें ह्या व्याख्यानप्रसंगीं तात्यासाहेबांचीच कामगिरी मार्गदर्शी झाली आहे. तसेंच न्या. रानडे, लो० टिळक, ना. गोखले व खेर यांच्या तसबिरींचे अनावरणसमारंभहि केळकरांनींच केले आहेत व केसरी–मराठासंस्थेंतून १०१ रु. देणगीहि मिळाली आहे.

(७) डेक्कन जिमखाना (प्रो. त्र्यं. भि. हर्डीकर, चिटणीस)–ह्या नांवानें इ. स. १९०६ सालापासून सुरू झालेल्या ह्या संस्थेचे तात्यासाहेब हे एक सेक्रेटरी होते. ते टेनिस व क्रिकेट खेळण्यास येत व लहानाशीं लहान होऊन अल्पावधींत दिलदारपणानें व उल्हासानें समरस बनून खेळत. इ. स. १९११ मध्यें मुंबईचे गव्हर्नर यांचे हस्तें जिमखान्याच्या इमारतीचा कोनशिला बसविली, तेव्हां दे. भ. केळकरांनीं संस्थेचा सर्व इतिहास उत्कृष्टपणें लिहिला व तो कादंबरीकार हरिभाऊ आपटे यांनीं त्या प्रसंगीं वाचून दाखविला. बडोद्याचे माधव दिवाण आठल्ये यांजकडून संस्थेच्या इमारतीचे करमास तीन हजार

रु. ची देणगी मिळाली; तींत डॉ. नानासाहेब देशमुखांबरोबर तात्यासाहेबांचीहि मदत उल्लेख करण्याजोगी झाली. तसेंच शिवाजी-मराठाफंडांतून दरवर्षी हनुमानजयंतीस जुन्या पद्धतीनुसार कुस्त्यांच्या फडाचे वेळीं बक्षिसार्थ म्हणून मिळणारी रक्कम रु. शंभर तात्यासाहेबांच्या सहानुभूतीचें फळ होय. इ. १९१९-२२ पर्यंत जे प्रचंड मैदानी-मर्दानी सामने झाले, इंडियन अलेम्पिक असोसिएशन स्थापन होऊन खेळाडू जे परदेशीं पाठविले गेले त्या कामींहि आलेल्या यशांत केळकर हे मोठे वांटेकरी आहेत. अलीकडे ते उपाध्यक्ष होते व आतां गव्हर्निंगबॉर्डांत सभासद म्हणून आहेत. जिमखान्याच्या ज्युबिली-समारंभाचे वेळीं तात्यासाहेबांनीं केलेलें भाषण व्यायामविषयक वाङ्मयांत कायमचें स्थान मिळवील ह्यांत शंका नाहीं.

(८) पूना टेंपरन्स असोसिएशन (स. वि. बापट)—स्थापनेपासून म्ह० इ. १९०७ पासून ल. र. गोखले यांजबरोबर तात्यासाहेब हे ह्या संस्थेचे मुख्य चिटणीस होते. दुय्यम चिटणीस श्री. शं. ग. लवाटे होते. घोडेगांवच्या गुत्याचे कामीं सरकार मुर्दाडपणानें जें म्हणाले, 'गुत्ता लोकांना पाहिजे म्हणून सुरू केला' तें तेथील लोकांच्या लेखी मतानें केवळ खोटें आहे हें ठरविण्याची खटपट, पुणें शहरांतील १० चे ५ गुत्ते जे झाले त्या बाबतींतील परिश्रम, सबंध दिवस गुत्त्यांचीं दुकानें चालू न राहतां १०॥-८ पर्यंतच उघडीं राहण्याविषयींचे यत्न करण्यांत श्री. लवाटे यांजबरोबर श्री. केळकरांचाहि निर्देश केला पाहिजे. गुत्त्यावर स्वतः केळकरांनीं व त्यांच्या कुटुंबांनीहि पिकेटिंग केलें ही गोष्ट लक्षांत घेणें अवश्य आहे.

(९) सोशल क्लब व नाट्यसंशोधनमंदिर (वि. न. दातार, अध्यक्ष)—'स्टुडन्ट सो. क्ल.' ह्या संस्थेतील सभासदांची विद्यार्थिदशा संपल्यावर हल्लींच्या नांवानें ही संस्था ओळखली जाते. क्लबाच्या सल्लागारमंडळांत श्री. तात्यासाहेब हे २९ वर्षे आहेत. त्यांच्या 'नवरदेवाची जोडगोळी' नाटकाचा प्रयोग क्लबानें सोलापुरास केला होता. क्लबाच्या इमारतीचा (इ. स. १९२४) उद्घाटन-समारंभ तात्यासाहेबांच्या हस्तें झाला. क्लबाच्या सांप्रतच्या कामांत म्ह० नाट्यवस्तुचित्रसंग्रहाचे कामीं तात्यासाहेबांच्या माहितीचा व ओळखीचा फार उपयोग होत आहे, हें प्रांजळपणें सांगणें भाग आहे. ह्या संग्रहाच्या सल्लागार मंडळाचे ते अध्यक्ष आहेत.

(१०) महाराष्ट्र-साहित्यपरिषद् (य. रा. दाते.)— इ. १९१२ मध्यें ह्या परिषदेची स्थापना रीतसर झाली व तेव्हां कार्यकारी मंडळांत आणि

मोडीलिपिसंबंधक कमेटींत तात्यासाहेब होते. त्यानंतर इ. १९१७ मधील इंदूरच्या प्रसिद्ध संमेलनांत बृहत्कोषमंडळांतहि त्यांचें नांव दाखल केलें होतें. इंदूर येथें परिषदेची पुनर्घटना झाली व १० हजारांची देणगी तुकोजीरावमहाराजांनीं दिली. तथापि मुंबई येथें परिषदेची कमेटी व कचेरी; तिच्याकडून कांहींच हालचाल नाहीं; उलट कर्त्यांना विरोधच मासमान होऊं लागला. पुढें बडोद्याच्या सुप्रसिद्ध संमेलनाचे साहित्यभास्कर तात्यासाहेब केळकरच अध्यक्ष होते. तेथेंहि घटना व कार्यचालनाबाबत विचार झाला. पण तोहि पुढें मुंबईच्या स्थिर कमेटीकडून मूर्तरूपांत येईना. तेव्हां गोष्ट निकरावर सहजच आली. पण एकेरीवर येऊं न देण्याची अवघड कामगिरी तात्यासाहेबांनींच कुशलतेनें पार पाडली. बडोद्याचें संमेलन अध्यक्षांमुळें अनेक दृष्टीनें फारच उत्तमपणें यशस्वी झालें. तात्यासाहेबांचा सभानियंत्रणाचा स्पृहणीय गुण तसेंच कामाचा उरक व तडफ वाखाणण्याजोगी आहे हें ह्या परिषदेच्या ज्या लहानमोठ्या बैठकी झाल्या त्यांत स्पष्ट नजरेस आलें. पुण्याच्या इ. १९२७ मधील साहित्यसंमेलनाचे ते स्वागताध्यक्ष होते व दुसरे तात्यासाहेब म्ह० कोल्हटकर हे अध्यक्ष होते. ह्या उभयतांमुळें हें संमेलन किती यशस्वी झालें हें सांगितलें पाहिजे असें नाहीं. लिपीबाबत नेमलेल्या कमेटीचे केळकर हे अध्यक्ष होते. त्या कामाचा वृत्तान्त बेळगांवच्या संमेलनांत वाचला गेला. हें संमेलन कानडी-मराठी वादामुळें स्मरणीय झालें; तसेंच तडजोडीचा तात्यासाहेबांचा स्वभावगुणहि निदर्शनास आला. शुद्धलेखन—कमेटीवर एव्हांच तात्यासाहेबांची नेमणूक झाली व त्याहि कमेटीचा निर्णय सर्वसुलभ व सर्वमान्य झालाच आहे. शेवटीं हैदराबादसंमेलनानंतर परिषदेमध्यें थोडेसें वादळ झालें व दोन निरनिराळ्या सभा मुंबईस झाल्या. परंतु समेट मंडळांत तात्यासाहेब हे आहेत एवढें सांगितलें म्हणजे त्याच्या कार्याविषयीं व परिणामाविषयीं वेगळें लिहिणें नलगे.

(११) कॉसमॉस को–ऑपरेटिव्ह क्रेडिट सोसायटी (का. गो. रानडे माजी चिटणीस, सोलापूर)—ही सोसायटी १९०६ सालीं स्थापन झाली व १९१२ पर्यंत कशीबशी चालून शेवटीं तिचे सेक्रेटरी जोशी हे पळून गेल्यामुळें ती अगदी डबघाईस आली. पण रानडे व पेंडसे यांस जाइंट–सेक्रेटरी नेमलें व त्यांनीं श्री. तात्यासाहेब केळकर ह्यांस सल्ला विचारला व संस्थेचे सभासद होण्याबद्दल विनविलें. केळकरांनीं आश्वासन दिलें व ते स्वतः शेअर घेऊन सभासद झाले. ते होतांच सोसायटीला टळक मंडळी सभासद होऊं

लागून तिचें गंडांतर टळलें. इ. १९१९ मध्यें कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष होण्याचें केळकरांनीं नाकारल्यामुळें अॅडव्हायसरी बोर्डाचे अध्यक्ष म्हणून आग्रहानें त्यांस राहविलें. इ. १९२० पर्यंत तात्यासाहेबांच्या वजनामुळें व कार्यकुशलतेच्या हातोटीमुळें जेथें सभांचा कोरम भरण्याची शंका तेथें सभासदांची गर्दी होऊं लागली. अमलदार सभेस हजर राहूं लागले. दोघांचीहि अस्थानीं भीति होती ती दूर झाली, सलोखा वर्धमान होऊं लागला. सोसायटीचे नियमांत योग्य दुरुस्ती झाली; निवडणुकीस शिस्त लागली, भांडवल वाढविण्याचे व वांटणीचे मार्गांत शुद्धता आली. आणि हजाराऐवजीं लाखाचा व्यवहार सोसायटी आतां (बँक) करूं लागली. सोसायटींत व्याजाचा दर.द. म. दर रुपयास सव्वा पै हा प्रारंभापासून आहे; तो वाढवावा म्हणून इ. १९१८ सालीं स्वतः रजिस्ट्रारसाहेब वार्षिक सभेस हजर राहून धमकीवजा बोललेहि. पण सभेचे अध्यक्ष केळकर होते, त्यांनीं चोख व बाणेदार उत्तर देऊन साहेबांस स्तंभितच केलें व पुनः दर वाढविण्याबद्दल अक्षरहि निघालें नाहीं. मध्यंतरीं तात्यासाहेबांनीं श्री. दा. वि. गोखले यांस निवडून दिलें. हल्लीं तात्यासाहेब सभासद आहेत व अडीअडचणीस त्यांचा बहुमोल सल्ला मिळत असतो.

(१२) भांडारकर रिसर्च इन्स्टिटयूट (डॉ. श्री. कृ. बेलवलकर, चिटणीस)—ह्या संस्थेच्या प्रारंभापूर्वीच्या प्रास्ताविक बैठकीपासून तात्यासाहेबांचा संबंध आहे व तो उत्तरोत्तर वाढतच गेला आहे. १९१९ जुलैंतील आनंदाश्रमांतील सभा, व कार्यकारी मंडळी, संस्थेस १० एकर जागा मिळविणारी मंडळी, विलिंग्डन शिष्टमंडळ, नियामक मंडळ इत्यादि कार्यकर्त्यांत तात्यासाहेब होते व नियामकमंडळाचे ते उपाध्यक्ष आहेत. इ. १९३१ चा वार्षिक रिपोर्ट तात्यासाहेबांनींच प्रसिद्ध केला आहे. तात्यासाहेबांचें धोरण सर्वसंग्राहक असल्यामुळें त्यांचा पुष्कळ उपयोग होतो. परठिकाणच्या मोठ्या मंडळींना ते संस्थेंत घेऊनहि कित्येकदां येतात. मग संस्थेचा उल्लेख प्रसंगीं करतात हें सांगणें नको. त्यांच्याच प्रेरणेनें त्यांच्या विदुषी कन्या डॉ. कमलाबाई ह्या संस्थेंत अभ्यासार्थ येत असतात.

(१३) हिंदी स्वराज्यसंघ (स. वि. बापट)—ह्या संघाची स्थापना १९१६ मध्यें होऊन मुख्य चिटणीस म्हणून श्री. तात्यासाहेब ह्यांस निवडलें. संघानें प्रचंड चळवळ केली व त्यांतील तात्यासाहेबांचा वांटाहि लहान नाहीं. ह्या संघामार्फतचें 'ए केस फॉर होमरूल लीग' हें पुस्तक तात्यासाहेबांच्या लेखनशैलीचें व त्याहून क्षिप्रकारित्वाचें उत्तम उदाहरण म्हणतां येईल.

संघाच्या शिष्टमंडळांबरोबर विलायतेस त्यांनीं जावें असें ठराव अनेकदां केले, पण 'तुम्ही येऊन कामाचा भार हलका करणार कीं नाहीं?' असें लोकमान्यांचें पत्र येतांच तात्यासाहेब पहिल्याच बोटीनें गेले. तेथें काँग्रेसचें 'इंडिया' पत्र चालविलें, व्याख्यानें दिलीं, मुलाखती घेतल्या, बातमीपत्रें पाठविलीं इ. त्यांची कामगिरी सर्वश्रुतच आहे. इकडे आल्यावर तात्यासाहेबांनीं दौरा काढून वऱ्हाड-मध्यप्रांत, कोंकण वगैरे भागांत हिंडून लोकजागृति केली. इ. १९२२ पासून ते संघाचे उपाध्यक्ष आहेत.

(१४) श्री. ना. दा. ठा. भारतवर्षीय महिला विद्यापीठ (प्रो. के. कर्वे, संस्थापक)—१९१६ सालीं विद्यापीठस्थापनेसाठीं नेमलेल्या कमेटीपासून तात्यासाहेबांचा संबंध ही संस्था व आमच्या इतर संस्था ह्यांच्याशीं आला. ते सेनेटचे व कार्यकारी मंडळाचे समासद आहेत. तात्यासाहेब यांची मुख्य कामगिरी म्हणजे त्यांनीं आपली कन्या श्री. कमलाबाई यांस, त्या मॅट्रिक झाल्यावर सामान्य क्रमाप्रमाणें पुढील अभ्यासासाठीं फर्ग्युसन कॉलेजांत जावयाच्या व तसा सल्ला त्यांस त्यांच्या आप्तांकडून मिळालाहि होता, पण केळकरांच्या प्रोत्साहनानें व युक्तिवादानें त्या 'महिला पाठशाळे'त दाखल झाल्या. अर्थातच कमलाबाईंच्या पुढील शिक्षणाला त्याच क्रमानें इष्ट तें वळण लागून त्या प्राच्य विद्यापीठाच्या पी. एच्‌डी. झाल्या व हल्लीं त्या 'महिला पाठशाळे'च्या मुख्य अध्यापिका आहेत. याप्रमाणें एका कर्तृत्ववान् स्त्रीचा लाभ करून देण्यांत तात्यांनीं आपल्या कन्येवर सक्ति केलेली नाहीं, तर हें युक्तिवादानेंच घडवून आणलें आहे. इतर दृष्टींनीहि तात्यांची मदत विद्यापीठास होत असते हें सांगणें नको.

(१५) पुणें-सेंट्रल कोऑपरेटिव्ह बँक, लि. (एम्. व्ही. रवडे अ. मॅनेजर)— ही बँक व तात्यासाहेब केळकर ह्यांचा इतका निकट संबंध आहे कीं, इ. १९१७ ते १९२३ पर्यंत तर बँक म्हणजे तात्यासाहेब अशी स्थिति होती. इ. १९१७ सालीं ही रीतसर स्थापन झाली. पूर्वी एक कॉसमॉस॰ कंपनी होती. त्यांतील मंडळींचीं भांडणें मिटविण्यासाठीं तात्यासाहेबांना आरबिट्रेटर नेमिलें. पुढें ह्यांतूनच ही बँक निघाली. तात्यासाहेब हे पहिले शेअरहोल्डर होते व पहिलीं सहा वर्षे बँकेचे चेअरमन होते. त्यांचे कारकीर्दीत बँकेची भरभराट फारच झाली. म्हणजे पन्नास हजारांवरून आठ लक्षांवर तिचें भांडवल गेलें. संस्थेला स्वतःची इमारत झाली. पायाभरणी समारंभहि तात्यासाहेबांच्याच हस्तें झाला. तात्यासाहेबांच्या धुरीणत्वा-

मुळें बँकेच्या झालेल्या ह्या अभ्युदयाकडे पाहिलें म्हणजे रजिस्ट्रार आटो रॉयफील्ड यांनीं केलेला केळकरांचा गौरव यथार्थच आहे असें वाटेल.

(१६) श्री शिवाजीमंदिर, पुणें (ग. वि. देवधर, देखरेखदार स्वयंसेवक)—ही संस्था कै. ग. ना. गोखले पुणेकर, वकील नागपूर यांच्या छ. शिवाजी महाराज व लोकमान्य टिळक यांजवरील निःसीम प्रेमामुळें त्यांनीं दिलेल्या १९ हजार रुपयांच्या देणगीनें निर्माण झाली (इ. सन १९१९). व तिला मूर्त स्वरूप येण्यास दे. भ. तात्यासाहेब केळकर हे सर्वथा कारणीभूत आहेत. तात्यासाहेब हे गोखले यांचे वेळेपासूनच ट्रस्टी आहेत. मंदिरासाठीं प्रशस्त जागा व आणखी सहासात हजार रुपये मिळविणें वगैरे सर्व गोष्टी मित्र० श्री. अनंतराव फडणीस ह्यांचे द्वारें श्री. तात्यासाहेबांनींच केल्या आहेत. आज ह्या मंदिराचा पुण्यनगरीस किती उपयोग होत आहे, हें निराळें सांगण्याचें कारण नाहीं.

(१७) शिक्षणप्रसारक मंडळी (वि. ग. आपटे माजी प्रिन्सिपाल)—ह्या मंडळीची स्थापना इ. सन १८८८ त झाली. पण इ. सन १९१८ त श्री. केळकर यांचा संस्थेशीं नमूद करण्याजोगा संबंध आला. हल्लींच्या सर परशुरामभाऊ कॉलेजच्या इमारतीची जागा लोकमान्य टिळकांनीं श्री. जगन्नाथ महाराजांना मंडळीस देण्याबद्दल निश्चयपूर्वक सांगितलें. इतर कांहीं मंडळींचा विरुद्ध आग्रह मोडून काढून जागा प्रत्यक्ष ताब्यांत येण्यास केळकरांचेंच साहाय्य झालें. इ. १९१९ च्या सप्टेंबरांत न्यू पूना कॉलेजच्या वार्षिक संमेलनास लोकमान्यांनीं अध्यक्ष होण्याचें कबूल केलें होतें. पण प्रकृति बरी नसल्यामुळें त्यांनीं केळकरांस पाठविलें. केळकर हे मंडळीचे सदस्य असून नियामक-मंडळांत त्यांची निवड झाली. (इ. १९२६). तेथें असतांना (इ. १९२९) प्रि. रा. शहा यांचें राजिनामा—प्रकरण उद्भवलें. तहाह्यात सभासद होऊन तें पवित्र बंधन केवळ अधिक द्रव्यप्राप्त्यर्थ तोडण्याचें अपकृत्य ह्या व इतर संस्थांत कांहींनीं केलें, पण त्यापेक्षां हें शहांचें कृत्य अनेक पटींनीं दुष्ट होतें. असें असतां व शहांसाठीं बावीस हजारावर रु. मंडळीनें खर्च केले असतां शहांनीं जेव्हां उलट आपल्या कृत्याचें मंडन चालविलें, तेव्हां श्री. तात्यासाहेबांनीं ह्या प्रकरणाचा सर्व व योग्य खुलासा केला व मंडळी निर्दोष आहे ह्याविषयीं जनतेची खात्री झाली. पाहिलें तर क्षुल्लक पण परिणामतः तसें नसलेल्या प्रकरणीं, योग्य निर्णय देऊन त्याबद्दल जनतेची खात्री पटविण्यास केळकरांसारख्यांचा विशेष उपयोग होतो.

(१८) टिळक महाविद्यालय व टि. महाराष्ट्र विद्यापीठ (वि. प्र. लिमये आचार्य व स. के. भावे, कार्यवाह)—कॉलेज-बहिष्कारांच्या पूर्तीचें विधायक अंग म्हणून ह्या संस्थांची स्थापना इ. १९२०-२१ मध्यें झाली. संस्थापकांत केळकर प्रमुख होते. विशिष्ट हेतूकरितां ही संस्था चालू रहावी, आणि विद्यार्थ्यांस टर्म आवश्यक नसावी, संस्था रजिस्टर्ड असावी असें तात्यासाहेबांचें धोरण व मत होतें. तात्यासाहेब हे इंग्रजी, राजकारण, इतिहास हे विषय शिकवीत व कांहीं ठिकाणीं व्याख्यानें देऊन त्यांनीं फंडहि जमविला. तात्यासाहेबांच्या चिठीनेंहि पैसा जमल्याचें उदाहरण म्हणून श्री. रावराजे पेडणेकर-गोंवा यांनीं हजार रु. दिले, हें देतां येईल. टिळक-स्मारक, टिळक ज्युबिली फंडांतून मदत त्यांनीं केली आहे. इ. १९३१ पर्यंत ते अध्यक्ष होते. मतभेदाचे प्रसंगानंतरहि सौमनस्य व गुणग्राहकता या गुणांमुळें संस्थेंतील इतर मंडळी व तात्यासाहेब यांचा स्नेह कायम आहे. ह्यावरून केळकरांच्या सार्वजनिक चारित्र्याचें रहस्य चांगलें लक्ष्यांत येतें.

(१९) अनाथविद्यार्थिगृह, पुणें (वि. ग. केतकर, चालक)—देखरेख असलेल्या संघटित पद्धतीनें मधुकरी असावी ह्या दि. ब. गोडबोल्यांच्या कल्पनेंतून ही संस्था अस्तित्वांत आली. ह्या संस्थेची स्थापना इ. १९०९ मध्यें झाली. संस्थापक व सल्लागार मंडळांत श्री. तात्यासाहेब हे प्रथमपासूनच होते. आज हीं दोन्ही नाहींत तरी तात्यासाहेबांचा ऋणानुबंध कायमच आहे. इ. १९१७ सालीं कसबापेठेंतील पटवर्धनांचा वाडा संस्थेस मिळविण्याचे कामीं तात्यासाहेबांचें चांगलेंच साहाय्य झालें आहे. इ. १९२१ चा वाढदिवस, १९२९ मधील नव्या जागेंतील इमारतीचा अनावरण-समारंभ तात्यासाहेबांच्याच अध्यक्षतेखालीं झाला. आज तात्यासाहेबांचा प्रत्यक्ष असा संबंध नाहीं; पण संस्थेच्या वाढीसाठीं ते इतके आपलेपणानें मदत करतात कीं तें सांगणें अशक्य आहे.

(२०) महाराष्ट्रीय मंडळ, पुणें (कृ. न. जेजुरीकर, सेक्रेटरी)—ही व्यायामसंस्था आहे. संस्थेला पुण्याजवळ पण बाहेर, मोकळी, मोठी प्रशस्त अशी जागा प्रथम पाहिजे ती त्यांचे मार्फत—नव्हे त्यांचीच अर्थात् पालक ह्या नात्यानें त्यांजकडे असलेली मिळाली. म्हणून इ. १९२४ मध्यें संस्था स्थापन करतां आली. संस्थेशीं श्री. तात्यासोचा संबंध असा आला. सध्यां ते मंडळाचे उपाध्यक्ष आहेत. हे व श्री. अण्णासाहेब संस्थेत असल्यामुळें लोकांची सहानुभूति भरपूर पण सरकारची वृत्ति सांशक होती. पण तीहि बदलली आहे.

व ह्या पालटीस त्यांचाच सल्ला कारण आहे. त्यांच्याच वजनानें व वारंवार करीत असलेल्या चौकशीमुळें मंडळ सध्यां भरभराटींत आहे.

( २१ ) हिंदुधर्मशास्त्रसंशोधन
( २२ ) रेल्वेमेल सर्व्हिस; स्टाफयूनियन } ( ना. वि. भोंडे-वकील, सेक्रेटरी )—संशोधन-संस्था इ. १९२६ मध्यें स्थापन होऊन तिच्या शाखा नागपूर, कलकत्ता, दिल्ली इ. ठिकाणीं निघाल्या. येथील मंडळांत तात्यासाहेब आहेत. १९२९ मधील परिषदेचे ते स्वागताध्यक्ष होते. रे. मेलसर्व्हिसचे तात्यासाहेब हे सहा वर्षें अध्यक्ष होते. विशेषतः असेंब्लींत असतांना पोष्टा-संबंधींच्या तक्रारी अनेक प्रश्न विचारून, माहिती मिळवून त्यांनीं दूर केल्या आहेत.

( २३ ) स्वदेशी बाजार, प्रदर्शन व रे म्यूझियम ( भा. वि. वारपुरे, कार्यवाह )—या कार्यास प्रथम जर कोणीं अनुकूलता दिली असेल तर श्री. न. चिं. केळकर यांनीं. स्वदेशी बाजार व प्रदर्शन हे त्यांस टिळक स्मारक-मंदिराचा अलंकार वाटतो. केळकर हे ह्या कमेटीचे प्रारंभापासून ( इ. १९२२ ) अध्यक्ष आहेत. डॉ. नायडू व श्री. जगन्नाथ महाराज ह्यांचाहि उल्लेख येथें केला पाहिजे. ४० वर्षांपूर्वीच्या म्यूझियमचें पुनरुज्जीवन करण्यांत केळकरांचीच मदत झाली. सध्यां म्यु. पा. च्या ठरावानुसार तात्यासाहेब हे एक ट्रस्टी आहेत.

(२४) गोपाल-गायन-समाज ( गो. गो. देसाई, संस्थापक व चालक )—इ. १९१८ सालीं ही संस्था स्थापन झाली. संस्थेस स्वतःची इमारत असल्या-शिवाय तिचें कार्य रूप धरीत नाहीं. अशा वेळीं तात्यासाहेबांची मदत झाली. अर्थात् संस्था सार्वजनिक केली पाहिजे ह्या तात्यांच्या म्हणण्याप्रमाणें विश्वस्त-पत्र केलें. आज तात्यासाहेब सल्लागार व पंच आहेत. त्यांचा फायदा इतर दृष्टीनें होतोच. पण ते गायनकलेचे मर्मज्ञ व रसिक आहेत म्हणूनहि पंच होण्यास ते लायक होत. एकदां म्हणजे १९२८ मध्यें पुण्यास संगीत परिषद झाली. तात्यासाहेब परिषदेचे अध्यक्ष व मी सेक्रेटरी. परिषदेच्या प्रसंगानें जलसा झाला. जलशाबाबत सरकारचा टॅक्स आला. पण तात्यासाहेबांनीं कलेक्टरांस पत्र लिहिलें व तें प्रकरण मिटलें. तात्यासाहेबांचें दुसरें एक धोरण असें कीं, आपलें साहाय्य तरी कर्त्याला द्यावयाचें. उ० आमचेंच कीं, आमच्या इमारतीला आणखी थोडी जागा करतां हवी होती व त्यावरील इमारत बांध-ण्यासाठीं आर्थिक मदतहि पाहिजे होती. आमच्या विद्यार्थीमंडळींनीं आपसांत

वर्गणी करून कांहीं मदत मिळवून रकमेची तजवीज केली, पण जागा नाहीं. हें जेव्हां तात्यासाहेबांना कळलें; तेव्हां जागा मिळवून दिली. अगदींच परावलंब्याला ते साहाय्य करीत नाहींत.

( २५ ) ब्राह्मणसभा, पुणें ( कृष्णराव मराठे, कार्यकारी समासद )—श. १८४७ सालीं धनवडे नांवाच्या अब्राह्मणानें ब्राह्मणज्ञातीविरुद्ध म्हणून अमानुष हल्ला केला. ह्या वेळच्या हालचालींतून व विचारांतून ही संस्था स्थापन झाली. उत्पन्नाच्या दर रुपयास एक पै प्रमाणें वर्गणी देणारा एक समासद वर्ग आहे. त्यांतील समासदांत तात्यासाहेब पहिले आहेत. सभेचे ते कार्यकारी सभासद असून सभेनें कांहीं उपयुक्त कार्य करावें अशी त्यांची बरीच इच्छा आहे. म्हणून ते सभेंत वारंवार सूचना, ठराव आणतात. तात्यासाहेबांचे अंगीं गुणाचा गौरव करणें व प्रोत्साहन देणें ही गोष्ट जाणीवपूर्वक व प्रमुख आहे. उपर्युल्लिखित धनवडे ह्या माथेफिरूस आपल्या अंगच्या बळावर श्री. सदुभाऊ गोडबोले ह्या तालीमबाज, साक्षेपी व समंजस तरुणानें धनवडे हा लपला होता तेथून धारिष्टानें धरून व उचलून आणून पोलीस चौकींत पोचविलें. हें कळतांच गोडबोले यांच्या शौर्याची तारीफ महाराष्ट्रमंडळाचे उपाध्यक्ष श्री. तात्यासाहेब यांनींच गोडबोल्यांचे घरीं जाऊन केली.

( २६ ) महाराष्ट्रनिवास, कलकत्ता ( भा. ब. दवळे, चिटणीस )—बृहन्महाराष्ट्रांतील आपल्या महाराष्ट्रीय बंधूस व्यापक एकीकरणाच्या दृष्टीनें तात्यासाहेबांनीं आर्थिक, बौद्धिक वगैरे सर्व प्रकारची मदत केली आहे. ह्या संस्थेच्या यशाचे ते एक प्रमुख वाटेकरी आहेत. त्यांनीं रु. १०० केसरीकडून दिले. इतक्या दूरच्या ह्या संस्थेचे ते एक पंच आहेत.

( २७ ) संस्कृतकॉलेज ( डॉ. श्री. कृ. बेलवलकर, कार्यवाह गीर्वाणमहाविद्यालयसमिति )—ज्याच्या उगमाशीं पेशवाईचा संबंध स्पष्ट आहे तें जुनें 'संस्कृत कॉलेज' इ. १८५६ मध्यें समाप्त होऊन विश्रामबागेंतच सुरू झालेलें हायस्कूल इ. १९२१ सालीं बंद झालें. दरम्यान सिमला येथें प्राच्यविद्याविशारदांच्या परिषदेंत ( इ. १९११ जुलै ) असें कॉलेज पुण्यास विश्रामबागवाड्यांत काढण्याची कल्पना निघाली व मुंबई युनिव्हर्सिटीच्या साहाय्यानें हें कॉलेज मूर्तस्वरूपांत आणण्याचा प्रयत्न झाला. पण तिच्या प्रतिकूल धोरणामुळें सिमल्याची योजना बाजूस पडली व इतक्यांत युरोपांतील युद्धामुळें सरकारचें गाऱ्हाणें देवानेंच ऐकल्या कारणानें म्हणजे पैशाच्या अभावाचें निमित्त राजरोस पुढें येऊन संस्कृत कॉलेजची कल्पना विलीन झाली. पुनः कांहीं

वर्षांनीं विश्रामबागवाड्यांतील कोर्टें हालल्यानंतर कॉलेजकल्पना प्रादुर्भूत झाली व येथें श्री. नरसोपंत केळकर यांचा प्रामुख्यानें संबंध आला. १९२७ जानेवारी मध्यें त्यांच्यास अध्यक्षतेखाली प्रास्ताविक सभा झाली. नंतर त्यांनीं एक हजार रुपये वर्गणी केसरीमार्फत घालून विश्रामबागवाडा मिळत नाहीं, सरकार व युनिव्हर्सिटी तिकडे लक्ष देत नाहीं तरी चालकमंडळींनीं कॉलेजची कल्पना आपल्यापरीनें मूर्तस्वरूपांत आणून चालू ठेवली आहे. केळकरांच्याच वजनामुळें जमखंडीकरांनीं द. म. ३० रु. ची शिष्यवृत्ति सुरू ठेवली आहे.

( २८ ) धर्मार्थ आयुर्वेदिक हॉस्पिटल (डॉ. मा. पु. जोशी, चिटणीस)–पुणें टिळकमहाविद्यालयांतील आयुर्वेदीय शिक्षणशाखेच्या रुग्णालयाचें स्पृहणीय व वर्धिष्णु रूप म्हणजे हें 'ताराचंद रामनाथ' हॉस्पिटल होय. महाविद्यालयाचे अध्यक्ष या नात्यानें ह्या रुग्णालय किंवा हॉस्पिटलशीं केळकरांचा संबंध होता. व वार्षिक समारंभ, इमारत व कायमनिधीकमेटीच्या प्रसंगानें ह्या संबंध वाढता, स्पष्ट व फारच उपकारक झाला. आणि तात्यासाहेब कमेटीचे अध्यक्ष झाले. इ. १९२८ मध्यें श्री. रा. ब. हणमंतराम यांनीं हजारों रुपयांची देणगी देण्याचा हेतु कांहीं अटींसह तात्यासाहेबांस कळविला. पण नियामक मंडळानें घातलेल्या अटी विद्यालयाच्या नियमाविरुद्ध असल्यामुळें, देणगी स्वीकारणें अशक्यअसें सांगितलें; तथापि पुढें तात्यासाहेबांनीं असा मसुदा तयार केला कीं, उभयतांनींहि त्यास मान्यता द्यावी. अर्थात् त्यांत इतर कार्यांची भर पडून (जागा, चालू खर्चाची व्यवस्था इ. इ.) हॉस्पिटलच्या योजनेपर्यंत मजल आली. व यांपैकीं प्रत्येक कार्यास हातांतली कामें बाजूस ठेवून सर्वप्रकारची मदत तात्यासाहेबांनीं केली. अवघ्या सात वर्षांत ह्या संस्थेची प्रगति एथवर आली आहे. ह्याचें बरेंच मोठें श्रेय केळकर यांस आहे.

( २९ ) कॉमनवेल्थ विमा कंपनी–पुणें ( रा. न. अभ्यंकर बी. ए. एलएल. बी. संस्थापक व मॅनेजिंग एजण्ट )–इ. १९२८ नोव्हेंबरमध्यें ही कंपनी स्थापन झाली व आतांपर्यंत एक लाखाचे वर शेअर्स खपून सत्तावीस लक्षांवर विमे उतरले गेले व अखिल हिंदुस्थानांतील नांवाजलेल्या कंपन्यांपैकीं ही एक असा तिचा लौकिक झाला. ह्या कंपनीच्या चालक मंडळाचे अध्यक्ष श्री. तात्यासाहेब केळकर हे आहेत. इतकेंच नव्हे तर ते एक संस्थापक-च आहेत. एव्हवीं त्यांच्या मदतीच्या अभावीं ही संस्था निघतांना व इतक्या उन्नत स्थितीस पोंचतांना. स्थापनेबाबतच्या सर्व आवश्यक गोष्टींस केळकरांचें साहाय्य असून विशेषतः विम्याचें काम सुरू करण्याकरतां सरकारांत

भराव्या लागणाऱ्या पंचवीस हजारांच्या प्रॉ. नोटा देणारांत तात्यासाहेब हे एक आहेत. सुरुवातीचे आमचे इतर नमुनेदार अनुभव सांगितल्यास तो थोर व पुढारी म्हणविणाऱ्या मंडळीच्या स्वभाववैचित्र्याचा मोठा ग्रंथच होईल. इतकेंच येथें उल्लेखितों. पण तें सर्व लक्षांत आणलें असतां श्री. तात्यासाहेबांच्या थोरवीचें खरें स्वरूप पूर्ण निदर्शनास येतें. प्रसंगीं पक्षातीत होण्याचा त्यांचा गुण व निर्विकार मनानें सहकार्य करण्याचा त्यांचा स्वभाव चालक मंडळाचे बैठकींत अनेक वेळां दिसून आला आहे. असा एक अनुभव येथें नमूद करावासा वाटतो. ब्राम्हण म्हटला कीं तिरस्कार करून दूर जावयाचें अशा एका कडव्या ब्राम्हणेतरानें तात्यासाहेब आहेत म्हणून मी तुमच्या कंपनी-च्या कार्यांत भाग घेतों असें आम्हांस कळविलें. काम करण्याचें त्यांचें कौशल्य केळकर ज्या सभेला उपस्थित नाहींत त्या सभेपुढील गुंतागुंतीचे व मतभेदाचे प्रश्न पुढील सभेवर टाकले जातात, ह्या एक गोष्टीवरूनहि लक्षांत आणतां येईल. आणखी एक तात्यासाहेबांचा विशेष सांगावासा वाटतो तो हा कीं, विम्यासारखी संस्था ही जरी व्यापारी असली तरी केवळ नफेबाजीनें न चालवितां विवक्षित टक्यापेक्षां वरच्या डिव्हिडंडापैकीं कांहीं भाग लोकोपयोगी सार्वजनिक संस्थांना मदत करण्यांत खर्च व्हावा, असें एक कलम ह्या कंपनीच्या आर्टिकल्समध्यें ठेवलें गेलें तें तात्यासाहेबांच्या धोरणा-चेंच निदर्शक आहे. कंपनीच्या मॅनेजिंग एजन्सीचा विवक्षित मुदतीचा करार ही गोष्टहि अशीच तुलनेनें पाहण्यासारखी आहे. आणखीहि लहान-मोठ्या गोष्टी तात्यासाहेबांच्या दक्षतेच्या सांगतां येतील. एकंदरींत स्वार्थनिरपेक्ष उदार मनाच्या थोर पुढाऱ्याचे लोकहितैकदृष्ट सावधतेचे सद्गुण तात्यासाहेबांचे ठिकाणीं आहेत हें ह्या कंपनीच्या कार्यनिमित्तानें दिसून आलें.

(३०) डेक्कन एज्युकेशन सोसायटी ( प्रो. वि. ब. नाईक ) — श्री. न. चिं. केळकर यांचा ह्या सोसायटीशीं संबंध फ. कॉ. चे विद्यार्थी या नात्यानें आला. प्रस्तुत उल्लेखनीय संबंध मात्र इ. १९३० मध्यें आला व तोच सोसायटीशीं असा प्रत्यक्ष होय. ह्या सालीं ते फेलो झाले. १९३१ मध्यें ते सोसासायटीच्या कौन्सिलांत निवडून येऊन गव्हर्निंगबॉडीवरहि त्यांची निवड झाली. हा काल सोसायटीच्या इतिहासांतील एक महत्त्वाचा व चिंताजनक झाला. अशा प्रसंगीं सोसायटीस हरएक संकटप्रसंगांतून मार्ग काढण्यास त्यांनीं साहाय्य केलें आहे. सोसायटीच्या लाइफमेंबर्समधील तेढ दूर करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला; पण दुर्दैवानें त्यांत यश आलें नाहीं.

( ३१ ) गांधर्वमहाविद्यालय, पुणें ( प्रो. वि. ना. पटवर्धन, संस्थापक )—तात्यासाहेबांचा संगीत कलेकडील ओढा विद्यार्थिदशेपासूनचा आहे. त्यांना गाणें ऐकण्याचा नाद फार. गातां येत नाहीं तरी पूर्वीच्या चांगल्या घरंदाजी गाण्यांतील व अलीकडील गाण्यांतील फरक कसा आहे हें चिकित्सकपद्धतीनें व मार्मिकपणें म्हणजे तज्ज्ञत्वानें ते सांगतात; इतका अधिकार ह्या कलेंत त्यांचा आहे. कानपूरच्या संगीतपरिषदेचे ते अध्यक्ष होते तेव्हां एक तासभर त्यांनीं इंग्रजींत विवेचक असें व्याख्यान दिलें. व हल्लीं संगीताचा उपयोग कसा करावा हें श्रोत्यांना पटवून दिलें. इ० १९२८ सालीं महाराष्ट्र संगीतपरिषदेस केळकरच अध्यक्ष नियोजित झाले होते. व तेव्हां त्यांनी हिंदी चिजाप्रमाणें बांधलेल्या मराठी चिजा म्हणण्याचा प्रघात पाडावा असें प्रतिपादिलें. व तसें नवें काव्य करूनहि दिलें. त्या परिषदेंत तसा ठरावहि पास झाला व आज त्याची चर्चा व प्रथा चालू आहे. प्रस्तुतचें विद्यालय त्यांच्याच हस्तें उघडण्याचा समारंभ झाला.

येथवर केळकरांच्या कांहीं संस्थांमधील कामगिरीची माहिती प्रारंभीं म्हटल्याप्रमाणें मंडळाकडे आलेल्या माहितींतून दिली आहे. ह्याखेरीज वक्तृत्वोत्तेजक सभा ( वा. कृ. भावे ); संभाजीस्मारकमंडळ ( ना. रा. गुंजाळ ); वैदिक संशोधनमंडळ ( ना. श्री. सोनटक्के ); शिवचरित्रकार्यालय ( द. वि. आपटे ); हैद्राबाद सं. प्र. परिषद् ( राघवेन्द्रशर्मा ); गीताधर्ममंडळ ( सदाशिवशास्त्री भिडे ); डे. इंस्टिट्यूट ऑफ कॉमर्स ( प्रो. ग. कृ. भोपटकर ); शुद्धपंचांगप्रवर्तन कमेटी ( पं. रघुनाथशास्त्री ); कुळकर्णी–वतनपरिषद् ( स. खं. अळतेकर); इतक्या संस्थांशीं तात्यासाहेबांचा संबंध आहे. व त्यांमधील त्यांचें कार्यहि लिहून आलें आहे. पण स्थलाभावामुळें तें उद्धृत करतां येत नाहीं. शिवाय, पुणें मराठी–ग्रंथसंग्रहालय, भा. इ. सं. मंडळ, बृहन्महाराष्ट्रपरिषद्, देवगड ता. रयत. सभा, वेदशास्त्रोत्तेजक सभा पुणें, भा. स. से. मंडळ, मर्कंटाइल बँक, मुंबई टिळक स्मारक मं०, वसंत व्या. माला, लो० पुण्यतिथिमं०, रायगडस्मारक मं०, इ. इ. संस्थांतीलहि केळकरांच्या कार्यकर्तृत्वाचा भाग देण्याजोगा आहे. एकंदरींत ९१ संस्थांची नोंद केळकरांची कामगिरी सांगतांना झाली आहे. ह्यांत सामान्यतः धार्मिक १, स्मारकें ९, राजकारण ९, व्यापार ७, सामाजिक ८, शिक्षणविषयक १०, आणि वाङ्मयविषयक १९ अशी विभागवारी पडते. ह्यांत ज्या संस्था आज चालू नाहींत किंवा कॉंग्रेसविषयक–म्हण० महाराष्ट्र प्रां. कॉं. कमेटी, ऑल इं. कॉं. क०; अथवा कॉंग्रेस वर्किंग क० अशा–आहेत त्या समाविष्ट केल्या नाहींत.

वर ज्याप्रमाणें कांहीं संस्था अशा आहेत कीं, ज्यांत केळकरांचा पूर्वी संबंध होता, आतां नाहीं, त्याचप्रमाणें कांहीं अशाहि संस्था आहेत कीं ज्या नामशेष झाल्या, पण त्यांतील तेव्हांचें केळकरांचें काम नमूद व्हावयास पाहिजे. उदाहरणार्थ इ. १८९६ सालीं जी. आय. पी. रेल्वेमधील तारमास्तरांचा मोठा संप झाला. सहाशेंवर मास्तरलोकांनीं नोकऱ्या सोडल्या; ह्या वेळच्या कमेटींत केळकर होते व त्यांचें त्यामधील काम म्हणजे सोडलेल्या मास्तर-मंडळींची चिंता वाहून त्यांना दुसरीकडे कोठेंतरी कामावर चिकटवून द्याव-याचें. हें केळकरांच्या कामाच्या एका प्रकाराचें उदाहरण झालें. दुसऱ्या प्रका-रचें उदाहरण म्हणजे इ. १९०४ मधील स्वदेशी कोऑ. सोसायटीचें-जींमधून पुढें महाभारताचें भाषांतर प्रसिद्ध झालें, व चांगल्या पण असल्या विसंगत कल्पनामुळें केळकरांना जी सोडावी लागली. सारांश आणखीहि कांहीं अशा संस्था आहेत.

असो. केळकरांच्या ह्या सर्व संस्थांमधील कामगिरीचें मुख्य लक्षण विधायक स्वरूपाचेंच आपणांस दिसून येईल. संस्थांमधील कामगिरी-तच काय, पण वाङ्मयांत, राजकारणांत सर्वत्र हेंच एक रूप तात्यासाहेबांच्या ठिकाणचें विशेषत्वानें प्रचीतीस येतें. रचतें कार्य रचतें व चालतें करून द्यावें हा केळकरांचा स्वभाव, देशहिताच्या कोणत्याहि गुणविशेषाचें आपल्या हातून पोषण व्हावें ही केळकरांची वृत्ति व त्यांच्या ठिकाणीं कामाचा उरक फार, ह्यामुळें अनेक संस्थांत ते असावे असें ज्याला त्याला वाटतें. कांहीं थोर गृहस्थ कामें विविध व पुष्कळ करतांना दिसतात, पण त्यांच्या त्या कामाच्या पद्धतींत उरक म्हणून जो म्हणतात तो दिसत नाहीं. याचें कारण काम वेळच्या वेळीं सत्वर उरकणें हें घडून येत नाहीं. कामें पुष्कळ पण केव्हां-तरी तीं होत राहिल्यास तेथें कामाचा उरक आहे असें म्हणतां येणार नाहीं. तात्यासाहेबांच्या ठिकाणीं तिसरा एक गुण प्रमुखत्वानें दिसून येतो; तो हा कीं, कोणत्याहि व केवढ्याहि विस्ताराचा उत्तम संक्षेप कसा करावयाचा हें त्यांस चांगलें साधतें. आणि ह्यामुळें ज्याला सुवर्णमध्य, मध्य-बिंदु असें म्हणतात तो त्यांच्या हातीं झटकन् येतो व अशा प्रकारें मतभेदां-तील मतैक्याचें नेमकें सूत्र पाडल्यावर भिन्न मतवाद्यांची एक-वाक्यता करणें हें त्यांस सुलभ होतें. चौथ्या गुणाबद्दल असें सांगतां येईल कीं, प्रयत्नवादाला जसें दैव अनुकूल व्हावें तसें त्यांच्या साहाय्याचें आहे. म्हणजे ज्यानें पाण्यांत घागर भरून गुडघ्यावर पेलली आहे व डोक्यावर

किंवा खांद्यावर घेण्यासाठीं कोणी हात देईल काय अशा साहाय्य घेण्याच्या बुद्धीनें जो आसपास पहात आहे, त्याला जसा कोणी सद्गृहस्थ भेटावा व त्यानें घागरीस हात दिल्यामुळें तो पाणीवाला चालूं लागावा तशा प्रकारांतलें तात्यांचें साहाय्य आहे. म्हणजे उद्योगी, गुणी व साहाय्यापेक्षी, बिनताठर सज्जनाला केळकरांची मदत ही मिळावयाचीच. ' विवेकी जाणते वेती सारासारविचारणा ' ह्या समर्थोक्तीस अनुसरून तारतम्यानें पाहणें, अप्रस्तुत अथवा पाल्हाळीक न बोलतां प्रकृतोपयुक्त जें, त्याचाच विचार करणें; खाजगीत्व विसरून किंवा पक्षातीत होऊन विचाराला बसणें ह्या गोष्टी तात्यासाहेबांनीं अंगीं मुरविल्यामुळें त्यांना विविधकार्यकर्तृत्वाचें यश मिळवितां आलें आहे. केळकरांना संपादक, लेखक, मुत्सद्दी ह्या विशेषणांबरोबर ' संस्था-सहाय्यक ' हेंहि एक विशेषण सार्थ होणारें आहे. इतकें त्यांचें हें संस्थाकार्य बहुविध, गुणविशिष्ट व मोठें आहे. ह्या कार्यापुढें केळकरांना आपलें अगदीं आवडीचें जें लेखनकार्य तेंहि करण्यास वेळ नाहीं, अशी स्थिति अनेकदां आली आहे. एकदां ते म्हणतात ' पाण्यांत आकंठ बसून आंग कोरडें ठेवूं पाहणें जितकें व्यर्थ, तितकेंच पुण्यांत राहून लेखनास वेळ मिळेल म्हणणें व्यर्थ. ' इतका कामाचा व्याप त्यांच्यामागें आहे. पण तेवढ्याचाहि आटोप केळकरांनीं सांभाळिला आहे आणि वेळेची तक्रार सांगूनहि त्यांनीं लिहिलें आहे किती, तें महाराष्ट्रवाचक जाणतातच.

# कांहीं ठळक प्रसंगांची कालानुक्रमवार यादी

| | | | |
|---|---|---|---|
| १८७२ | ऑगस्ट | २४ | जन्म. |
| १८८७ | | | विवाह. |
| १८८८ | | | मॅट्रिक. |
| १८९१ | | | बी. ए. |
| १८९४ | | | एल्एल्. बी. |
| १८९५ | एप्रील | | सातारा जिल्ह्यांतील वकिलीची सनद. |
| १८९६ | मार्च | १७ | पुण्यास केसरी–मराठासंस्थेंत दाखल. |
| १८९६ | आक्टोबर | | मराठा पत्राचें संपादकत्व ( डिक्लेरेशन न करितां ) |
| १८९७ | सप्टेंबर | १९ | केसरी–मराठा पत्राचे संपादक. |
| १८९७ | | | उमरावती राष्ट्रीयसभेंत भाषण. |
| १८९८ | सप्टेंबर | | पुणें म्यु० पा०त लोकनियुक्त सभासद. |
| १८९८ | डिसेंबर | | पुणें फर्ग्युसन कॉलेजांत क्रिकेटपटु कुमार रणजितसिंगजी ( हल्लींचे जामनगर संस्थानचे अधिपति ) यांचे स्वागतार्थ स्वा० मं० तर्फे भाषण. |
| १८९९ | जुलै | ४ | केसरीचें संपादकत्व सोडलें. |
| १९०१ | | | ताईमहाराज खटल्यांत वकीलपत्र. |
| १९०२ | | | अहमदाबादच्या राष्ट्रीय–सभाप्रसंगीं विषयनियामक कमिटींत राष्ट्रीय सभेच्या चर्चेंत देशी संस्थानांतील प्रजाजनांच्या हक्काचा प्रश्न घेण्याबद्दल सूचना; ( सर फिरोजशहा मेथा यांचा विरोध ). |
| १९०४ | | | पुणें जि० लो० बोर्डाचे सभासद. |
| १९०७ | | | पुणें सार्वजनिक सभेचे सेक्रेटरी. |
| १९०७ | | | सुरत येथील राष्ट्रीय पक्षाच्या संमेलनाचे सेक्रेटरी. |
| १९०८ | एप्रील | | नेमस्तांनीं सुरतेस ठरविलेल्या कन्व्हेन्शनच्या नियमांना परप्रांतांत मान्यता किती आहे हें पाहण्याकरितां टिळकांच्या सांगण्यावरून उत्तर हिंदुस्थानांत दौरा. |
| १९०८ | जुलै | २६ | मराठापत्रांत ' दी टिळककेस ' हा सुप्रसिद्ध लेख लिहिला. |
| १९०८ | सप्टेंबर | २९ | वरील लेखाबद्दल झालेल्या हायकोर्टाच्या बेअदबीच्या खटल्याचा निकाल व शिक्षा. |
| १९०८ | आक्टोबर | | मराठा पत्राचें संपादकत्व सोडलें. |
| १९०८ | | | पुणें जि० परिषदेचे जबाबदार व्यवस्थापक. |
| १९०९ | एप्रील | २५ | संगमेश्वर ( देवळें ) तालुकासभेचे अध्यक्ष. |
| १९०९ | मे | १० | वसई ( उंबरगांव ) सभेचे अध्यक्ष. |

| | | | |
|---|---|---|---|
| १९०९ | | | कॉं॰ कन्टीन्यूएशन कमेटीचे सेक्रेटरी, |
| | | | कं॰ च्या कामासाठीं कलकत्त्यास प्रयाण. |
| १९०९ | | | मुंबई कायदेकौन्सिलाचे निवडणुकींत उमेदवार ; त्र सरकारी बंदी. |
| १९१० | जानेवारी | ११ | केसरीचे संपादक; व मराठापत्राचे पुनः संपादक. |
| १९१२ | एप्रील | १ | पुणें म्यु॰पा॰चे उपाध्यक्ष. |
| ,, | मे | ११ | सातारा ( कऱ्हाड ) जि॰ सभेचे अध्यक्ष. |
| १९१३ | सप्टेंबर ९ ते १६ | | श्रीगणपत्युत्सवानिमित्त वऱ्हाडांत दौरा. |
| १९१५ | मे | १३ | कुलाबा ( मुंबई ) जि. सभेचे अध्यक्ष. |
| ,, | नवंबर | १० | सार्वजनिक सभेच्या मॅ. क. चे चेअरमन. |
| ,, | | | पुणें येथील प्रां. परिषदेचे सेक्रेटरी. |
| १९१६ | मार्च | २९ | लॉर्ड हार्डिंज यांस मानपत्र अर्पण करण्याकरितां श्री॰ अण्णासाहेब पटवर्धन यांचे अध्यक्षतेखालीं किर्लोस्कर ना॰गृहांत भरलेल्या सभेचे व्यवस्थापक. |
| १९१६ | | | होमरूललीगचे सेक्रेटरी. |
| ,, | | | कोंकणांतील दौरा. |
| १९१७ | एप्रील | २८ | स्व॰ संघाच्या पहिल्या वाढदिवसानिमित्त भरलेल्या [illegible] अध्यक्ष. |
| १९१८ | मार्च | | विलायतेस जावयाचें म्हणून केसरी व मराठा पत्रांचें संपादकत्व सोडलें. |
| १९१८ | जून | १० | मुंबई इलाखा युद्धपरिषदेचे वेळीं सभात्याग. ( लॉ॰ विलिंग्डन, अध्यक्ष : राजनिष्ठेच्या ठरावावर भाषण करतांना राजकीय चर्चा भाषणांत आल्यानें बोलूं दिलें नाहीं. ) |
| १९१८ | | | कॉं॰चे चिटणीस व कॉंग्रेसडेप्युटेशनचे सेक्रेटरी. दोन्ही [faint: चार्जें होणार नव्हतें म्हणून कॉं॰सेक्रेटरीशिप सोडली.] |
| १९१८ | | | मुंबई-मराठी-ग्रंथसंग्रहालयाच्या वार्षिक समारंभाचे अध्यक्ष. |
| १९१८ | | | पुणें शहर म्यु॰ पा॰ चे लोकनियुक्त पहिले अध्यक्ष. |
| १९१९ | जानेवारी | | मुं॰ कायदेकौन्सिलांत निवडून येण्याबाबत उमेदवार उभे राहण्याला करण्यांत आलेली बंदी उठली. |
| १९१९ | एप्रील | ५ | निपाणी येथें भरलेल्या कोल्हापूर-वतनदार-कुळकर्णी-मंडळाच्या पहिल्या परिषदेचे अध्यक्ष. |
| १९१९ | | | कॉंग्रेस डेमॉक्रेटिक पक्षातर्फे पुणें शहराकरितां कौन्सिल-निवडणुकीसाठीं उमेदवार |

| | | | |
|---|---|---|---|
| १९१९ | एप्रील | २७ | पं० मदन मो० मालवीय यांचे अध्यक्षतेखाली विलायतेस जाणाऱ्या काँग्रेसच्या शिष्टमंडळाचा मुंबईत सन्मान. |
| १९१९ | | | विलायतची कामगिरी व इंडियापत्राचें संपादकत्व. |
| १९१९ | डिसेंबर | १ | पुणें म्यु०पा०चें मानपत्र. |
| १९२० | एप्रील | २ | सोलापूर येथील मुंबई इलाखा प्रां० परिषदेचे अध्यक्ष. |
| १९२० | मे | ६ | रत्नागिरी येथील रत्नागिरी जि० प्रथमपरिषदेचे अध्यक्ष. |
| १९२० | जून | २२ | केसरीचे पुन्हा संपादक |
| १९२० | ऑक्टोबर | २४ | वाशीम येथील अकोला जि० परिषदेचे अध्यक्ष |
| १९२० | नवंबर | १४ | ठाणें मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या २० व्या वार्षिक समारंभाचे अध्यक्ष. |
| १९२१ | मार्च | १५ते२२ | सोलापूर जिल्ह्यांत दौरा. |
| १९२१ | मार्च | १८ | मोडलिंब येथें श्रीउमाविद्यालय या संस्थेच्या नव्या इमारतीत तेथील रहिवाशांचें मानपत्र व अहेर. |
| १९२१ | सप्टेंबर | ३ | बल्लारी जिल्ह्याच्या पंचायतीच्या कामाकरितां धारवाडवरून बल्लारीस प्रयाण. |
| १९२१ | नव्हंबर | २६ | बडोदें येथील साहित्य सम्मेलनाचे अध्यक्ष. |
| १९२१ | डिसेंबर | १ | अकोला येथील अखिल महाराष्ट्र परिषदेचे अध्यक्ष. |
| १९२१ | डिसेंबर | २६ | अहमदाबाद खादी बाजारांतील व्यापाऱ्यांचें मानपत्र. |
| १९२२ | जानेवारी | २५ | भोर सं० प्र० प०च्या पहिल्या अधिवेशनाचे अध्यक्ष. कायदेभंगाबद्दल खटला. |
| १९२२ | मार्च | | गोमांतकांत दौरा. |
| १९२२ | जुलै | २०।२१ | कायदेभंग कमिटीपुढे साक्ष. |
| १९२२ | ऑगस्ट | | म० प्रां० कॉ० कमिटीच्या अध्यक्षपदाचा राजीनामा. |
| १९२३ | एप्रिल | २२ | कोकणांत दौरा. |
| १९२३ | सप्टेंबर | १५ | दिल्ली–अखिल भा० संस्थान–प्र० परिषदेचे अध्यक्ष. |
| १९२३ | नवंबर | | ले० असेंब्लीचे मध्यभागातर्फे सभासद. |
| १९२३ | | | महाराष्ट्रांतील स्वराज्यपक्षाचे अध्यक्ष. |
| १९२४ | मार्च | | मुझफरनगर जिल्हापरिषदेचे अध्यक्ष. |
| १९२५ | डिसेंबर | १३ | पुणें महाराष्ट्र बालचर संस्थेच्या वार्षिक समारंभाचे अध्यक्ष. |
| १९२५ | | | प्रतियहकार पक्षाची स्थापना व असेंब्लीच्या सभासदत्वाचा राजीनामा. |
| १९२५ | | | कानपूर–हिंदुमहासभेच्या आद्य अधिवेशनाचे अध्यक्ष. |
| १९२५ | डिसेंबर | २५ | कानपूर येथील अ० भा० तृतीय संगीत परिषदेचे अध्यक्ष. |

| | | | |
|---|---|---|---|
| १९२६ | जून | ४ | २५-५-२६ रोजीं किबेवाडा जळून ज्ञानप्रकाश व आर्यभूषण छापखान्याच्या झालेल्या नुकसानीबद्दल सहानुभूति दाखविण्याकरितां पुणें शिवाजी मंदिरांत भरलेल्या सभेचे अध्यक्ष. |
| १९२६ | जुलई | १० | सोलापूर येथें भरलेल्या सहकारी परिषदेचे अध्यक्ष. |
| १९२६ | | | प्रतिसहकारपक्षातर्फे ले० असेंब्लीचे समासद. |
| १९२७ | जानेवारी | २३ | कर्णमूळावर मुंबई येथें ऑपरेशन. |
| ,, | फेब्रुवारी | २ | पुणें-संस्कृत महाविद्यालय स्थापनेसंबंधींच्या सभेचे अध्यक्ष. |
| ,, | मे | २२ | पुणें-महाराष्ट्र साहित्यसंमेलनाच्या बाराव्या अधिवेशनाचे स्वागताध्यक्ष. |
| ,, | डिसेंबर | २० | तळेगांव दाभाडे येथील महाराष्ट्र हिंदुधर्म परिषदेच्या विशेष अधिवेशनाचे स्वागताध्यक्ष. |
| १९२८ | जानेवारी | २४ | अलिबाग-चेंढरें, कुलाबा जिल्हा परिषदेचे अध्यक्ष. |
| ,, | मे | ५ | पुणें-हैद्राबाद राजकीय परिषदेच्या तिसऱ्या अधिवेशनाचे अध्यक्ष. |
| ,, | जून | ४ | पुणें तिसऱ्या शारदोपासकसंमेलनाचे स्वागताध्यक्ष. |
| ,, | जुलई | ५ | पुणें-महाराष्ट्र सं० प० दुसऱ्या अधिवेशनाचे अध्यक्ष. |
| ,, | ,, | १५ | अहमदाबाद-जिल्हा परिषदेचे अध्यक्ष. |
| ,, | डिसेंबर | ८ | पुणें-कीर्तन परिषदेचे अध्यक्ष. |
| १९२८ | | | दिल्ली येथील दलितोद्धार परिषदेचे अध्यक्ष. |
| १९२९ | मार्च | ३० | यवतमाळ-वऱ्हाड प्रांतिक परिषदेच्या पहिल्या अधिवेशनाचे स्वागताध्यक्ष. |
| ,, | ,, | ३० | सांगली-टिळक मंदिरांत चौथऱ्याची कोनशिला केळकरांच्या हस्तें बसविण्याचा समारंभ |
| १९२९ | जुलै | २१ | शेतकरीसंघाची स्थापना पुण्यास सरदार वल्लभभाई पटेल यांचे अध्यक्षतेखालीं झाली त्यावेळीं प्रास्ताविक भाषण. |
| ,, | आगष्ट | २७ | डाका-पांचव्या बंगाल प्रांतिक हिंदुपरिषदेचे अध्यक्ष. |
| ,, | डिसेंबर | १ | अक्कलकोट-अक्कलकोट सं० प्र० परिषदेचे अध्यक्ष. |
| १९२९ | | | जबलपूर व लाहोरच्या हिंदुमहासभेचे, आणि अहमदाबाद स्वतपरिषदेचे, अध्यक्ष. |
| १९३० | मार्च | १३ | ऑल इं० कॉं० कमिटीचा व महाराष्ट्र प्रां० कॉं० कमिटीच्या सभासदत्वाचा राजीनामा. |
| १९३० | एप्रिल | ७ | ले० असेंब्लीच्या सभासदत्वाचा राजीनामा. |
| १९३० | एप्रिल | २० | पेण-कॉंग्रेस शिबिरांत झेंडा-वंदन-समारंभ व जाहीर कायदेभंग. |

| | | | |
|---|---|---|---|
| १९३० | | | मेहेकर-वऱ्हाड-प्रांताच्या सहकारी परिषदेचे अध्यक्ष. |
| १९३१ | मे | | मिरज सं० प्र० परिषदेचे अध्यक्ष. |
| १९३१ | जून | २२ | वाई-गोरक्षण संस्थेच्या उद्‌घाटन समारंभाचे वेळीं भाषण. |
| ,, | आक्टोबर | १८ | पुणें डेक्कन जिमखान्याच्या ज्युबिली समारंभाचे अध्यक्ष. |
| ,, | डिसेंबर | २१ | बडोदें-वाङ्मय परिषदेच्या पहिल्या अधिवेशनाचे अध्यक्ष. |
| ,, | ,, | २५ | उज्जयिनी-मध्यभारतीय कवि संमेलनाच्या दुसऱ्या अधिवेशनाचे अध्यक्ष. |

[ ही यादी पूर्ण नाहीं; तथापि घाईनें जितकी तयार करितां आली तेवढी दिली आहे—सं. ]

---

## परिशिष्ट २ रें

## केळकरकृत ग्रंथ

| ग्रंथाचें नांव | प्रकार | वर्ष | पृष्ठें |
|---|---|---|---|
| १ नवरदेवाची जोडगोळी | नाटक | १८९४ | ११० |
| २ सरोजिनी | ,, | १८९५ | ११२ |
| ३ ग्यारिबाल्डी | चरित्र | १९०० | २०० |
| ४ सुभाषित आणि विनोद ( आवृत्ति ३ ) | निबंध | १९११ | १७८ |
| ५ Tilak Trial ( सरकार जप्त ) | संग्रह | १९०८ | ६०० |
| ६ आयर्लंडचा इतिहास | इतिहास | १९१० | २०७ |
| ७ तोतयाचें बंड ( आवृत्ती ३ ) | नाटक | १९१२ | १२१ |
| ८ चंद्रगुप्त | ,, | १९१३ | १५६ |
| ९ कृष्णार्जुनयुद्ध | ,, | १९१४ | १३५ |
| १० अमात्यमाधव | ,, | १९१५ | ११४ |
| ११ Case for Indian Home-Rule | निबंध | १९१६ | १२५ |
| १२ वीर-विडंबन | नाटक | १९१७ | १०४ |
| १३ संत भानुदास | ,, | १९१८ | ११८ |
| १४ मराठे व इंग्रज | इतिहास | १९१८ | ३०० |
| १५ विलायतेचीं बातमीपत्रें | पत्रें | १९१९ | १७५ |
| १६ टिळकचरित्र-खंड १ ला | चरित्र | १९२४ | ६८८ |
| १७ केसरीवरील खटला | भाषण-लेख | १९२४ | ८३ |
| १८ काव्योपहार | कविता | १९२६ | ३२ |
| १९ टिळक चरित्र-खंड २, ३ | चरित्र | १९२८ | १३५६ |
| २० राज्यशास्त्र | | १९३१ | ३५० |

लेखसंग्रहरूपानें.

| | | |
|---|---|---|
| १ संस्कृतविद्येचें पुनरुज्जीवन ( आवृत्ति २. ) | १९२८ | ८६ |
| २ केळकरकृत लेखसंग्रह | १९१५ | |
| ३ Land marks of Lokmanya's Life | १९२४ | ३९२ |
| ४ शिक्षणविषयक लेख व व्याख्यानें | १९२५ | ३८१ |
| ५ इतिहासविहार | १९२६ | १८६ |
| ६ गेलीं पांच वर्षे | १९२६ | ६५२ |
| ७ गद्यगुच्छ | १९२६ | १५५ |
| ८ Passing Phase of Politics | १९२६ | ३०२ |
| ९ लोकमान्य टिळकांचें पुण्यस्मरण | १९२७ | १५५ |
| १० संस्थानी राजकारण | १९२९ | १८८ |
| ११ Pleasures and Privileges of the Pen | १९२९ | ५११ |
| १२ मौजेचे चार प्रहर | १९३१ | १०५ |

---

## परिशिष्ट ३ रें.

## केळकरांच्या कांहीं प्रस्तावना

१ सुदाम्याचे पोहे ( १०-७-१९१० ) पृष्ठें ७
२ दर्पदर्पण ( Pride & Prejudice चें रूपांतर ) १९१२
३ रे. टिळकांची कविता ( १-१२-१९१४ ) पृ. ९
४ संसारशास्त्र ( २-१२ १९१४ ) पृ. २
५ टिळकांचा पोवाडा ( २०-१-१९१५ ) पृ. ३
६ मोरोपंतकृत अष्टोत्तरशत रामायणें ( १९१६ ) पृ. २१ )
७ अरविंद बाबूंचीं पत्रें-( १९२१ ) पृ. ३
८ वाग्वैजयंति- ( १३-८-१९२१ ) पृ. ७
९ आधुनिक कविपंचक ( १८-१०-१९२१-) पृ. ३
१० कॅ. लिमये यांचे विनोदी लेख (२२-४-१९२३ ) पृ.३
११ मॅझिनी-जोगळेकर ( १०-१०-१९२३ ) पृ. ३
१२ हरिभाऊ आपटे यांच्या आठवणी व कादंबऱ्या ( २५-२-१९२४ ) पृ. ४
१३ लो.टिळकांच्या आठवणी खंड १ ला ( २२-७-१९२४ ) पृ. ११
१४ बॅ. सावरकरांचें चरित्र ( ६-८-२४ पृ. ४
१५ लो. टिळकांची धर्मविषयक मतें ( ५-१-२५ ) पृ. ३
१६ महाराष्ट्रगीत ( ८-१-२६ ) पृ.५
१७ मयूर-काव्यविवेचन ( २०-५-१९२६ ) पृ. ५

१८ श्रद्धानंद चरित्र ( ६–५–२७ ) पृ. ३
१९ तांबे यांची कविता ( १९–५–१९२७ ) पृ. ६
२० मराठीची सजावट ( ६–९–२९ ) पृ. ५
२१ लालालजपतराय चरित्र ( १९३१ ) पृ. ३
२२ पंडित मालवीय चरित्र ( १–११–१९३१ ) पृ. २
२३ लोकनायक बापूजी अणे–लेख व भाषणें ( २१–११–३१ ) पृ.
२४ कॉलेज विहार ( ३१–३–१९३२ ) पृ. ४
२५ पुनर्भेट ( य. गो. जोशी ) १९३२
२६ कोल्हटकर लेखसंग्रह ( १९३२ ) पृ. ५०
२७ पतिपत्नीप्रेम पृ.६
२८ टिळकविद्यालयत्रैमासिक–लेखसंग्रह. पृ.१
२९ चिंतामणराव वैद्य यांचे लेख व भाषणें
३० मुलांचे बंड
३१ टिळकांचे केसरींतील लेख, खंड १–२–३
३२ भावतरंग
३३ Beauties from Kalidas–
३४ साहित्यांक–'यशवंत' मासिक ( गोमान्तक साहित्यसंमेलन ) पृ. ४
३५ म्युनिसिपल कायदा
३६ साहित्य तोरण
३७ गीतविलास
३८ सहकारी पतपेढ्या
३९ वीर मराठे ( हिंदी ) पृ. ३
४० लो. टिळक आठवणी भाग २ ( अभिनंदन )
४१ देशकी व बागाईत.